# सावरकर-चरित्र

[ कथन ]

लेखक

शिवराम लक्ष्मण करंदीकर

प्रमुख विक्रेते

मॉडर्न बुक डेपो, प्रकाशन.

पुनर्मुद्रण ]  मूल्य १० रुपये.  [ २८ मे १९४७

# प्रस्तावना

[ काव्यप्रतिभा व देशभक्ति यांचा संगम घडलेली किती तरी सुंदर स्थळें सावरकर वाङ्मयांत दाखवितां येतील. मग तें गद्य असो वा पद्य असो. पण तुमच्या मतें उत्कृष्ट असें त्यांतलें एक स्थळ निवडून द्या असें जर कोणी मला म्हटलें तर, सावरकरांनीं ब्रिस्टल तुरुंगांतून आपल्या स्नेह्यांना पाठविलेल्या ' शेवटचा रामराम ' या उद्‌गारांची शिफारस मी करीन.

* * *

" मित्रांनो, ईश्वरानें आपल्यापैकीं प्रत्येकाची भूमिका ठरवून टाकली आहे. आपण प्रत्येकानें आपली भूमिका वठवावी यासाठीं आपली तातातूट होत आहे. ईश्वरानें नेमून दिलेली भूमिका वठवीत असतांना प्रसंगीं जळत्या खडकांना बांधून कोंडून पडावें लागेल. प्रसंगीं कीर्तीच्या उसळणाऱ्या लाटांच्या शिखरावर स्वार होतां येईल. कधीं आपण लोकांना दिसूं, तर कधीं अदृश्य राहूं. कधीं आपण अवनत होऊं, तर क्वचित् उन्नत होऊं ! जगन्नियंत्यानें कोणत्याहि परिस्थितींत ठेवलें तरी ती परिस्थिति सर्वोत्तम आहे असें मानून आपण असें समजलें पाहिजे कीं, आपलें जीवितकार्य एकाकी पार पाडणें हेंच आपल्या वांट्याचें कार्य आहे.

" एकाद्या उदात्त पौर्वात्य नाटकांत भरतवाक्याच्या वेळीं नाटकांत मेलेलीं व न मेलेलीं सर्व पात्रें एकत्र जमतात. आपण सगळे इतिहासाच्या अफाट रंगमंदिरांतील असंख्य नटच आहोंत. आपल्या कृतीची प्रशंसा करणारे मानवजातिरूपी प्रेक्षक टाळ्या वाजविण्यासाठीं आपल्यासमोर बसलेले आहेत. हे प्रेक्षक कृतज्ञ व आनंदी बनून जोरजोरानें टाळ्या वाजवतील तेव्हां त्या टाळ्यांचा गरजणारा आवाज दऱ्याखोऱ्यांपर्यंत जाऊन दुमदुमेल !

" प्रेमळ मित्रांनो, तो क्षण येईपर्यंत रामराम ! "

* * *

" माझा देहपात होऊन माझ्या अस्थि आणि रक्षा कोठें पडतील याचा नेम नाहीं. अंदमानचें वातावरण आधींच निर्जन व भेसूर आहे. तेथें वाहणाऱ्या नदीनाल्यांचा उदासवाणा आवाज तेथील मूळच्या निर्जनपणाला अधिकच भेसूर बनवीत असतो. कदाचित् माझ्या अस्थि नि रक्षा त्या उदास नदीनाल्याच्या जवळ पडून रहातील. किंवा असेंहि घडेल कीं, मध्यरात्रीं आपला नियत खेळ आकाशांत खेळणाऱ्या तारकांचें प्रतिबिंब पोटांत सामावून घेणाऱ्या गंगामातेच्या स्फटिकशुद्ध प्रवाहाच्या शेजारीं कोठें तरी माझ्या अस्थि नि रक्षा पडून रहातील ! त्या कोठेंहि पडलेल्या असोत ! श्रीरामानें आपल्या आवडत्या लोकांचा पक्ष विजयधवल ठरविला आहे,

दुष्टांना माघार घ्यावी लागली आहे, आणि त्यांचा पाय जेयून पुढें पडला तेथवर त्यांना मागें हटविण्यांत आलें आहे. आपला हा भारतवर्ष वैभवांत उभा आहे, मानव जातीचें मार्गदर्शन करणारा दीपस्तंभ म्हणून यापुढें तो तेजस्वितेनें तळपत राहील असा पुकारा झाला, आणि 'हौतात्म्य गाजविणाऱ्या विचारवीरांनो नि कृतिवीरांनो, तुम्ही ज्या संग्रामांत लढलांत आणि पडलांत तो संग्राम यशस्वी झाला, उठा!' अशी घोषणा झाली कीं, त्या वेळीं, त्या पडून राहिलेल्या अस्थि आणि ती पडून राहिलेली रक्षा यांच्यांत फिरून तेज आणि चैतन्य सळसळूं लागेल.

" तोंवर, प्रिय मित्रांनो, रामराम ! " ]

राजश्री विनायकराव सावरकर यांना येत्या २८ मे रोजीं साठ वर्षें पुरीं होऊन एकसष्टावें वर्ष लागणार, या गोष्टीला अनुलक्षून त्यांचें अभिनंदन होणें अत्यंत अवश्य आहे. त्या अभिनंदनाचे प्रकारहि अनेक होतील. पण त्यांचा चरित्रग्रंथ लिहून प्रकाशित करणें हा जो सर्वांत अत्यंत उपयुक्त प्रकार, तो रा. शिवरामपंत करंदीकर यांनीं स्वीकारला व यशस्वी रीतीनें पार पाडला याकरितां मी आधीं रा. करंदीकर यांचेंच अभिनंदन करितों.

याला माझीं कारणें अशीं: सावरकर यांच्या ६१ व्या वाढदिवसानिमित्त मुख्यत: प्रकट सभा भरतील. त्यांत लेखी मानपत्रें दिलीं जातील. तोंडी भाषणें होतील. पण हीं मानपत्रें, किंबहुना आयत्या वेळीं उठून केलेलींहि भाषणें, हीं कशीं छापील ठशाचीं असतील याविषयीं, नेहमींच्या अनुभवावरून, कोणालाहि कल्पना येईल ! स्तुतीचे तेच ते ठराविक शब्द व वाक्यें—फक्त 'पदपरिवर्तन' करून म्हटलेलीं—यांची त्यांत रेलचेल असेल. परंतु सावरकरांच्या जीवन-चरित्राची सुसंगत व साधार अशी माहिती, तीं सर्व मानपत्रें व भाषणें एकत्र केलीं तरी, त्यांतून कोणास काढतां येणार नाहीं. चिकित्सक पद्धतीनें गुणग्रहण करूं इच्छिणाराचें समाधान त्या निवळ भावनेच्या उद्गारांनीं होणार नाहीं. ती भावना शुद्ध असणार याविषयीं शंकाच नाहीं. पण शुद्ध भावनेला चिकित्सक उपपत्तीची जोड मिळाली तर ती अधिक टिकाऊ व बलवान होते. व्याकरण समजल्याशिवायहि शुद्ध भाषा बोलतां येते. पण शुद्ध भाषा बोलतां येण्याबरोबर, त्या शुद्धतेची जामिनकी देणारें व्याकरणहि अवगत असलें तर अधिक बरें नव्हे काय ? शुद्ध खरें; पण शुद्ध कां ? या प्रश्नाचें उत्तर देऊं शकणारा मनुष्य, तें उत्तर न देऊं शकणारापेक्षां अधिक आत्मप्रत्ययी ठरतो.

भाषा व व्याकरण यांचा हा दाखला घेऊन बोलावयाचें तर मी असें म्हणेन कीं, सावरकर हे मोठे देशभक्त व स्वातंत्र्यवीर आहेत असें नुसतें म्हणणारापेक्षां, ते देशभक्त व स्वातंत्र्यवीर कशानें ठरतात हें मनांत समजणारा व लोकांना सांगूं शकणारा मनुष्य मला अधिक समाधान देऊं शकेल. आणि करंदीकर यांनीं लिहिलेला हा सावरकर-चरित्रग्रंथ तें कार्य उत्तम रीतीनें करील, असें मला वाटतें.

सावरकरांच्या एकसष्टाव्या वाढदिवसाकरितां त्यांचें चरित्रच लिहून छापून त्यांच्या मित्रांना व चाहत्यांना सादर करावयाचें, या योजनेबद्दल करंदीकरांचें अभिनंदन करितांना हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, हें चरित्र-लेखनाचें काम इतर चरित्र-लेखनाइतकें साधें सोपें नव्हतें. कालक्रमवार लावून टांचून ठेवलेली चरित्रसाधनरूप कागदपत्रांचीं बाडेंचीं बाडें तयार व स्वाधीन असतां शेवटीं तीं फुकट गेलीं, नाश पावलीं, आणि चरित्र-लेखन तसेंच राहिलें, अशा घडलेल्या गोष्टी आपणाला कांहीं माहित आहेतच ना ! म्हणून सावरकरांच्या चरित्राचीं साधनें अत्यंत दुर्मिळ असतां तीं मिळवून, असें मोठें, साधार सुसंगत चरित्र निश्चित अवधींत वाचकांच्या हातीं देण्याचें काम करंदीकर यांनीं केलें, तें किती जिकीरीचें, परिश्रमाचें झालें असलें पाहिजे याची कल्पना कोणाहि माहितगार तज्ज माणसाला येईल ! या साधनांपैकीं कांहीं स्वतः सावरकरांनीं लिहून ठेवलेल्या किंवा प्रसिद्ध केलेल्या लेखांचींच आहेत हें खरें. तथापि त्यांतली कोणतीं जप्त, कोणतीं खुलीं याची माहिती मिळविणें व तीं वाचून त्यांतील सत्त्वसार कणाकणानें घेऊन त्यांची जुळणी करणें, हें काम मोठें कष्टप्रद झालें असलें पाहिजे. सावरकर हे स्वतः लोकांच्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत जिवंत असल्यामुळें, त्यांनीं किंवा त्यांच्यासंबंधीं लिहिलेलें कोणतेंहि लेखन जप्त करणें हें निष्फळ म्हणून हास्यास्पद ठरतेंच. शिवाय इतर सर्व राष्ट्रांच्या चळवळींचे इतिहास उपलब्ध इतकेंच नव्हे तर ग्रंथालयांतून आदरपूर्वक नांदत मिरवीत असतां सावरकरांचें अद्भुत चरित्रपर वाङ्मय मात्र नष्ट करणें याला, इंग्रजांना समजणारें Vandalism हेंच नांव मी लावीन ! पण कोंबडा झाकून दाबून ठेवला म्हणून उजाडायचें रहात नाहीं, हेंहि सरकारनें खूप समजून रहावें !

या प्रस्तावनेंत सावरकरांचा उल्लेख प्रारंभीं राजश्री या साध्या शब्दानें मी करीत आहें. देशभक्त, स्वातंत्र्यवीर अशा उज्ज्वल शब्दांनीं करीत नाहीं, याला थोडें कारण आहे. ' टिळक-चरित्र ' ग्रंथाच्या शेवटीं मी माझे एतद्विषयक विचार खालील शब्दांत मांडले आहेत :—" विशेषणें वापरण्याच्या कामीं आपल्याइकडे करावी तेवढी काटकसर केली जात नाहीं. यामुळें दुहेरी तोटा होतो. एक तर अपात्र अशाहि व्यक्तींना लावल्यानें तीं विशेषणें निरर्थक बनत जातात. शिवाय सत्पात्र अशाहि लोकांसंबंधीं बोलतांना तीं उगीच वरचेवर उपयोगांत आणलीं गेल्याकारणानें, सदोष पुनरुक्तीचा परिणाम, वीट किंवा उपहासबुद्धि यांत होतो...देशभक्त, देशभक्त ( दे. भ. ) या शब्दांचा उपयोग आपल्याकडे पूर्वी इतका बेसुमार झाला, व कदाचित् अजूनहि होत आहे, कीं ते शब्द कानावरून नुसत्या वाऱ्यासारखे निघून जातात. त्यांचा बोध मनावर कांहींच होत नाहीं. टिळकांसंबंधानें बोलतांना ' लोकमान्य ' या सुंदर शब्दाचाहि, आमच्या मतें, असाच दुरुपयोग झाला आहे. तो निदान या पुस्तकांत ( टिळक-चरित्रांत ) तरी टळावा, अशी सावधगिरी मी ठेविली आहे, मान्यतादर्शक विशेषण हें आडनांव झालें कीं संपलें."

पदकें व चलनी नाणीं यांतील भेद सांभाळायला नको काय ? कोणाहि मोठ्या माणसाचें मोठेपण, देशभक्ताची देशभक्ति, या गोष्टी त्याच्या चरित्राच्या व प्रत्यक्ष कृतींच्या वर्णनावरूनच लोकांना खऱ्या अनुमानितां येऊं शकतात. तेंच खरें मोठेपण व तीच खरी देशभक्ति.

गणितशास्त्रांत प्रत्यक्ष उदाहरणें आंकड्यांनीं सोडवावीं तेव्हांच उपपत्ति खरी ठरते. माणसाला देव, भगवान्, महात्मा इत्यादि विशेषणेंहि वाटल्यास लावावीं. डोळे मिटून शब्द हाताळणाराचा हात कोण धरणार ? पण तीं विशेषणें कोणत्या कारणांनीं खरीं ठरतात हें त्याला विवेचक रीतीनें सांगतां आलें तरच त्या विशेषणांचें खरें स्वारस्य !

सावरकरांचें चरित्र लिहितांना रा. करंदीकर यांनीं अशीच भूमिका स्वीकारली आहे हें पाहून मला बरें वाटलें. ते प्रथमच पृष्ठ ३ वर लिहितात:—"अतिमानुषत्वाचें आवरण घालून चरित्र लिहिण्याची प्रवृत्ति मला आवडत नाहीं. अवतारकल्पना मूळ कोणत्याहि कारणानें निघालेली असो, त्या कल्पनेवर विसंबून राहण्यास सवकलेल्या हिंदुसमाजानें स्वतःचें अपरिमित नुकसान करून घेतलें आहे. आम्ही आपल्या नेभळेपणानें, स्वार्थीपणानें, विवेकभ्रष्टतेनें धर्माची ग्लानी होऊं द्यावी, अधर्माचें अभ्युत्थान होऊं द्यावें ! आणि आमचा आम्ही आत्मघात करून घेतल्यावर परमेश्वरानें अवतार घेऊन आम्हांला सांवरून धरावें ! ही जी श्रमविभागणी आम्ही केली आहे ती आमच्या नाकर्तेपणावर पांघरूण घालणारी व परमेश्वराच्या पदरीं मूर्खपणा बांधणारी आहे. यासाठीं 'अवतारी' पुरुषाच्याहि चरित्राचें चित्रण 'मानवी' प्रमाणांत व स्वरूपांत करावयास पाहिजे. आपल्या डोळ्यांसमोर वावरणाऱ्या कोणाहि व्यक्तीच्या चरित्राचें 'देवीकरण' करण्याला मी तयार नाहीं. स्वतः सावरकर ज्या बुद्धिवादाचे उपासक आहेत त्या बुद्धिवादाची वंचना करावयाची नसेल तर, सावरकरांच्या अद्भुत व असामान्य चरित्राचें मानवी स्वरूप कायम ठेवणेंच अवश्य आहे."

पण 'देवीकरण' न केलें तरी सावरकरांचें चरित्र 'असाधारण, असामान्य, अलौकिक, लोकविलक्षण, अद्भुत' हीं विशेषणें त्याला यौगिक अर्थानें लावण्याला अनेक दृष्टींनीं योग्य आहे. सावरकरांना 'देशभक्त', 'स्वातंत्र्यवीर' हीं विशेषणें जपून लावलीं तर खचित शोभण्यासारखीं आहेत. मला स्वतःलाहि तीं मान्य आहेत. पण तीं आडनांवासारखीं उठल्या सुटल्या लावणें मात्र मला पसंत नाहीं. एकाद्यानें प्रसंगविशेषीं शालजोडी किंवा जरीकांठी वस्त्र वापरलें तरच त्याची शोभा किंवा त्याचें महत्त्व. पण रोज वापरून त्याचा बोळा केला तर तें महावस्त्र नव्हे. मीहि या प्रस्तावनेंत, सावरकरांच्या चरित्रांतल्या कांहीं गोष्टींचा प्रथम उल्लेख करून त्या लोकांना पटवूं शकलों, तरच मीं त्यांना लावलेलीं उज्ज्वल विशेषणें सार्थ ठरतील. म्हणून मी तीं विशेषणें या प्रस्तावनेच्या शेवटापर्यंत राखून ठेवतों !

होय. मी म्हणतोंच कीं सावरकरांचें चरित्र ' असामान्य ' आहे. आणि तें सिद्ध करण्याकरितां मी वाचकांना असें विचारीन कीं, मीं याखालीं ज्या गोष्टी त्या चरित्रांतल्या म्हणून मधून मधून नमूद करणार आहें, त्या तशा इतर कितीशा कोणत्या हिंदी मनुष्यांत—मनुष्यांत म्हणजे अनुयायांतच काय पुढाऱ्यांतहि—आढळून आल्या हें कोणीहि सांगावें !

सावरकरांच्या कुलपरंपरेसारखी कुलपरंपरा लाभलेले अनेक आहेत. तुमच्या आमच्या पुष्कळांचे आजे पणजे मराठेशाही नष्ट झाल्यावेळीं व १८५७ च्या बंडाच्या वेळीं होते. आणि त्यांच्या भावना त्यांवेळीं कशा असतील याची कल्पना तुम्हाआम्हाला करितां येते. पण त्याचें श्रेय आज तुमच्याआमच्या खातीं जमेस धरतां येत नाहीं. सावरकरांना बालपणांत लाभलेल्या सुखःदुखांच्या अनुभवांनीं त्यांचा मोठेपणा सिद्ध होत नाहीं. तसे अनुभव पुष्कळांना असतात. सावरकरांनीं ' गोमांतक ' काव्य लिहिलें त्यांतील कुटुंबवर्णन, व विशेषतः बाललीला, या यथार्थ आत्मचरित्रवर्णनपर आहेतच असें माझें मत नाहीं. तें एक काव्य आहे. सावरकरांचे बालपणांतील गुण व अवगुण प्रायः इतर चार लहान मुलांसारखेच होते. आजच्या विस्तारशील दृष्टीनें त्यांकडे पाहण्याचें कारण नाहीं. बाल सावरकरांनीं बरोबरीच्या मुलांना मारलें, किंवा स्वतः खोडकरपणामुळें मार खाल्ला, याचें उगीच कौतुक तें काय करावयाचें ? बालपणींच सावरकर मोठे सत्यव्रत होते अशी समजूत करून घेऊन, या बाबतींत चरित्रग्रंथकारांनीं त्यांची तुलना मोहनदास गांधी यांच्याशीं करून, तींत सावरकरांना श्रेष्ठ व गांधींना कनिष्ठ ठरविलें तेंहि योग्य आहे असें मला वाटत नाहीं. कारण ' सत्यप्रतिज्ञ ' हें विशेषण आपल्या बिरुदावलींत बसतें असें स्वतः सावरकर आजहि मानतात असें मला वाटत नाहीं ! तीच गोष्ट त्यांच्या बालपणच्या मित्रमेळ्याचीहि समजावी ! बालसावरकरांच्या सारखी क्षात्रवृत्ति, म्हणजे द्वाडपणा, वाडशीपणा, असणारीं मुलें पुष्कळ आढळतात. लहानपणीं चाकू वगैरे शस्त्रांनीं ज्यांनीं जखमा करून न घेतल्या अशीं मुलें किती ! लहानपणीं सावरकरांनीं आपल्या ब्राह्मणेतर जातीच्या स्नेह्यांच्या घरीं चटणीभाकर खाल्ली असेल. पण कदाचित् तो त्यांच्या जिव्हालौल्याचा पुरावाहि अर्थात् थट्टेनें, कां म्हणूं नये ? सावरकरांनीं अलीकडे केलेल्या झुणकाभाकरी भोजनाचें ध्येयवादी स्वरूप, त्या खादाडपणाला—त्या पंगतींना, हटकून देतां येत नाहीं. पोरपणीं बरोबरीच्या कुणबाऊ बाळगोपाळाच्या घरीं फराळ करणें वेगळें ! आणि अस्पृश्यता-निवारणाच्या चळवळीचें एक अंग म्हणून पन्नाशी उलटलेल्या हिंदु पुढाऱ्यानें महार-मांगांच्या पानाशीं पान व मांडीशी मांडी भिडवून भोजन करणें वेगळें !

सामान्य गोष्टींच्या संबंधांत सावरकरांचें बालपण, तरुणपण, प्रौढपण हीं सर्व इतर चार लोकांसारखींच ठरतात. कारण सावरकर झाले तरी मनुष्यस्वभावाच्या पुष्कळ गोष्टींत सामान्यच आहेत. पण मनुष्याचें सामान्यत्व किंवा असामान्यत्व

हें अशा गोष्टींवरून न ठरवितां, कांहीं इतर विशेष गोष्टींवरूनच ठरवावें लागतें. अशा गोष्टी थोड्या असतात पण त्याच महत्त्वाच्या असतात. आणि सावरकरांत अशा असामान्य गोष्टी कोणच्या याचें थोडेसें विवेचन करूं.

सावरकरांचें वक्तृत्व, लेखन व काव्य हीं सर्वच असामान्य कोटींतील आहेत. बॅ. सावरकर यांच्या लेखनाला व वक्तृत्वाला, माझ्या आठवणीप्रमाणें आज सुमारें चाळीस बेचाळीस वर्षांपूर्वी प्रारंभ झाला. प्रथम त्यांचें व्याख्यान मी सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत ऐकलें. तेव्हांच हा वक्ता जन्मसिद्ध आहे अशी माझी खात्री झाली. कै. शिवरामपंत परांजपे यांच्याप्रमाणें बॅ. सावरकर यांच्या लेखन-वक्तृत्वाचा मूळ झरा अत्यंत तीक्ष्ण अशा देशाभिमानांत असूनहि, या गुरुशिष्यांच्या लेखनशैलींत व भाषणशैलींत जमीनअस्मानाचें अंतर होतें. कल्पनाशक्ति दोघांचीहि पल्लेदार, परंतु शिवरामपंतांच्या लेखनकलेंत घातुक नाजुकपणा होता, त्याऐवजीं या त्यांच्या शिष्याच्या लेखणींत व वाणींत कठोर निर्भयता व गांवठी आडदांडपणा आढळून येई. शिवरामपंत कोरलेल्या नखांनीं रेशमी चिमटे घेत. सावरकर प्रतिपक्षावर हातापेक्षां आपल्या कराळ दातांचाच उपयोग अधिक करीत. वाचक व श्रोते यांना आपण हंसविलें असें पाहून आपला प्रयत्न यशस्वी झाला असें कै. शिवरामपंत यांना मनांत वाटे. उलट आपल्या भाषणांत किंवा लेखांत चुकून नर्म विनोद येऊन त्यामुळें लोक हंसले, असें दिसल्यास, "तुम्हीं हंसतां काय ? हंसण्याची तुम्हाला लाज वाटली पाहिजे ! आणि या तुमच्या थिल्लरपणाला मी कारणीभूत झालों असेन तर मीच अधम चांडाळ होय." असें म्हणून सावरकरांनीं मनांतल्या मनांत स्वतःच्या तोंडांत मारून घेतली असती. शिवरामपंतांच्या कलेचा हेतु आपल्या शत्रूविषयीं द्वेष उत्पन्न करण्याचा मुख्यतः असे; तर सावरकरांचा हेतु त्याच्याविषयीं जळजळीत राग उत्पन्न करण्याचा असे. शिवरामपंत केव्हांहि संपूर्ण समर्पक व व्याकरणशुद्ध अशींच वाक्यें बोलत, पण त्यांत स्पष्टोक्तीचा मात्र सर्वस्वीं अभाव असे. एक वेळ मानवी पातिव्रतेचा उरोज क्वचित् उघडा पडलेला दिसेल, परंतु शिवरामपंतांची राक्षसी विषकन्या कोणाला स्तनपान देऊन मारावयाला आली असली तरी, त्या मर्याद-शीलेचा पदर विदारण केल्याशिवाय त्याचें तोंड त्या विषारी 'बोंथी'ला लागणें शक्यच नव्हतें ! उलट सावरकरांचें लिहिणें बोलणें असल्या अंगोचर पडदपोषींचें कधींहि नव्हतें. त्यांच्या कलेच्या रथाच्या निशाणावर "या आणि पहा" हीं अक्षरें नसून "येतों आणि दाखवितोंच" अशीं अक्षरें असावयाचीं ! शिवरामपंतांच्या अवगुंठित छद्मी व बहाणेदार लेखनवक्तृत्वानें कितीतरी भोळ्या मनांची फसवणूक होऊन त्यांच्या वाच्यार्थाच्या भुलभुलाईत तीं कोलमडून जाऊन हास्यास्पद ठरलीं असतील ! पण सावरकरांचें लिहिणें बोलणें भोळ्या गोळ्याच्याहि मनांत आवेशाचा संचार करून; त्याला पक्केपणा आणणारें असे. शिवरामपंताचे हे गुण व दोष त्यांना

अखेरपर्यंत चालले होते व टिकटून राहिले होते. सभापंडित सावरकरांचेहि गुणदोष पसतीस-सदतीस वर्षांपूर्वी मी पाहिले ते आजहि तसेच प्रतीत होतात.

बाळपणींच झालेली काव्यस्फूर्ति व काव्यशक्ति या गोष्टी सावरकरांमध्यें असामान्य कोटीपैकीं होत्या असें खचित म्हणतां येईल. त्यांच्या इतक्या अल्प वयांत कविता करणारीं, विशेषतः त्यांनीं केल्या तशा प्रकारची कविता करणारीं मुलें किती आढळतील ? त्यांची प्रतिभा मुखर होऊं लागण्याच्या वेळीं ते १२-१४ वर्षांपेक्षां अधिक वयाचे नसावे. आणि त्यांनीं आपली प्रतिभा अनुकरणानें मिळविली असें म्हणावें तर त्या वयांत त्यांनीं कोणाच्या कितीशा कविता वाचल्या असतील ? शिवाय या कवितांमध्ये महाराष्ट्र भक्तीची जी चमक दिसून येते ती तरी त्यांना दुसऱ्यापासून अनुकरणानें मिळालेली नव्हती हें खचित.

सावरकरांची मनोरचना पाहिली तर तींत कवित्व व स्वातंत्र्यवादी देशभक्ति यांची सरमिसळ पूर्णपणें झाली आहे. त्यांच्या देशभक्तीच्या भावनेला चटकन् काव्याचें स्वरूप येतें, व त्यांच्या काव्यांत स्वातंत्र्याची आवड कोठें ना कोठें चमकल्याशिवाय राहात नाहीं. संकटमय अशा जीवनांतहि त्यांनीं किती व कशी काव्यरचना केली हें पाहून कौतुक वाटतें. रा. मायदेव यांच्या प्रसिद्ध होणाऱ्या 'सावरकर-काव्यसंग्रहां'त त्यांच्या काव्यबुद्धीचें स्वरूप वाचकांना पाहावयास मिळेलच. पण त्यांना या कामीं आलेल्या अडचणींची कल्पना मात्र तीं काव्यें वाचून येण्यासारखी नाहीं. शिवाय या अडचणींमुळें त्यांचें सर्व काव्य उपलब्धहि नाहीं. तुरुंगवासांत लेखनसाहित्य किती मिळणार ? शिवाय त्या साहित्यानें लिहिलेल्या कवितांचे कांहीं विषयहि असे राजकीय स्वरूपाचे कीं, त्या कविता तुरुंगाबाहेर पडण्यास प्रतिबंधच व्हावयाचा ! म्हणून कांहीं कांहीं कविता त्यांना आपल्या आपण पाठ करून संग्रहीं ठेवाव्या लागल्या, व कांहीं तुरुंगांतील इतर कैद्यांकडून पाठ करवून त्यांच्याबरोबर बाहेर धाडाव्या लागल्या ! लेखनसाहित्य भरपूर मिळतें, व कविता करण्याला सुचणारे विषय कमी राजकीय स्वरूपाचे असते तर, सावरकरांचे हातून एकाददुसरें 'महाकाव्य' खचित निर्माण झालें असतें. 'लेखण्या मोडून साहित्यिकांनीं तरवारी हातीं घ्याव्या' अशा तऱ्हेच्या एकांगी दिसणाऱ्या त्यांच्या उद्गारांचें खरें मर्म न समजल्यामुळें त्यांच्यावर कित्येकांनीं आक्षेप घेतले आहेत. पण ते निवळ वावदुकी ठरतात. सावरकरांनीं साहित्यिकांना केलेला हा प्रसिद्ध उपदेश केवळ नैमित्तिक स्वरूपाचा होता, नित्याचा नव्हता. स्वतंत्र जीवनाच्या काळीं देशभक्तीच्या प्रसारांत जिनें सहाय केलें, व पारतंत्र्यांतहि जिनें जिवाला समाधान मिळवून दिलें, त्या लेखणीवर बहिष्कार घालण्याइतके ते कृतघ्न नाहींत हें कोणासहि सहज समजण्यासारखें आहे. माझ्या समजुतीप्रमाणें, वरील उपदेश करतांना, सावरकरांच्या डोळ्यापुढें कांहीं ठळक अशीं 'वीर-कवीं'चीं किंवा 'कवि-वीरां'चीं उदाहरणें असावीं. अशीं उदाहरणें युरोपच्या इतिहासांत अनेक दाखवितां येतील. ग्रीक इतिहासांत अनेक

नाटककार कवी असेच झाले. गेल्या महायुद्धांत युरोपांत अशींच कांहीं उदाहरणें घडलीं. एकच उदाहरण सांगावयाचें तर इटालियन कवि डी. आननझिओ याचें असें कीं, नित्य स्वरूपांत तो राष्ट्रीय शाहीर असतां, व्हर्सायच्या तहांत इटलीला फ्यूमचें बंदर दिलें नाहीं तेव्हां त्यानें, पूर्वीच्या गॅरिबाल्डीसारखी, हातीं तरवार धरून स्वयंसेवकांचें पथक उभारून, त्या बंदरावर हल्ला करून तें हस्तगत केलें! आजच्या युद्धांत सैन्यामध्यें शिरणाऱ्या हिंदी तरुणांची स्थिति अशी भूषणास्पद नाहीं हें खरें. तथापि लेखणी टाकून तरवार घेण्याच्या उपदेशाचें मर्म उघडच होतें. लेखणींतून वीररस स्रवविणें हें तरवारीनें रक्तपात करण्यासारखेंच आहे. नांगर व तरवार हीं त्यांतील पोलादामुळें परिवर्तनशील असतात. वावदूक आक्षेपकांनीं येवढें तरी ध्यानांत ठेवावें कीं, सावरकरांचा हा उपदेश 'परोपदेशे पांडित्यं' असा नव्हता व नाहीं. त्यांनीं काव्यलीलेप्रमाणें शस्त्रलीलाहि रंगविली आहे! म्हणून प्रसंगविशेषीं एक सोडून केवळ दुसरें करावें असा उपदेश करण्याचा हक्क त्यांना सहजच प्राप्त होतो.

उत्कट देशभक्ति आणि स्वातंत्र्याच्या ध्येयाची निर्भय घोषणा करण्याचें धैर्य हा सावरकरांच्या अल्पवयांतलाच गुणविशेष ठरतो. तो त्यांच्या कॉलेजांतील जीवनापासूनच दिसून येतो. पण कॉलेज सोडल्यानंतर विलायतेला जाण्याच्या उद्योगापासून त्यांच्यांत, व त्यांच्या वयाच्या आणि त्यांच्याप्रमाणें विलायतेला जाणाऱ्या तरुणांत, खरा फरक दिसून येतो. विलायतेला जाऊन आय्. सी. एस्. ची परीक्षा पास होण्याचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवणाऱ्या, बुद्धिमान तरुणांच्या, दोन पिढ्या त्यांच्यापूर्वी होऊन गेल्या होत्या. आपण विलायतेला गेलों तर आय्. सी. एस्. परीक्षेची तयारी करण्याला लागणारी तीव्र बुद्धिमत्ता आपल्यामध्यें नाहीं असें सावरकरांनीं कधींहि कबूल केलें नसतें. आणि तें ध्येयच डोळ्यांपुढें असतें तर त्यांनीं अवश्य तें द्रव्यसहाय्य मिळविण्याची यशस्वी खटपट केली असती. पण, त्यांना सिव्हिल सर्व्हंट होण्याकरितां विलायतेला जावयाचें नव्हतें. किंवा बॅरिस्टरीची परीक्षा देण्याकरितांहि जावयाचें नव्हतें. तर तिकडे जाऊन हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या मतप्रसाराचा एक नवा अड्डा किंवा आखाडा हिंदी तरुणांमध्यें निर्माण करावयाचा होता!

येथें हें मुद्दाम सांगतों कीं, सिव्हिल सर्व्हंट म्हटला कीं तो देशद्रोहि असें म्हणणारांपैकीं मी नाहीं. सरकारी नोकर म्हटला कीं त्याला पाहून नाक मुरडणारा किंवा हीन ठरविणारा असाहि मी नाहीं. याविषयीं माझी विचारसरणी अशी:— देश स्वतंत्र होईल तेव्हां राज्यकारभारांतले सर्वच वरिष्ठ अधिकारी एतद्देशीय असतील हें उघड आहे. पण आज देशांत इंग्रजांचें राज्य असतांहि, शक्य तितक्या अधिक वरिष्ठ जागांवर स्वदेशी लोकच नेमले जावे असा एक न्यायाचा हक्क म्हणून आपण सांगत असतों. अर्थात् अशा जागा मिळविणें ज्याला शक्य असेल, व जो त्या स्वीकारील, असा कोणीहि हिंदी मनुष्य निघूं नये ही कल्पना उघडच हास्यास्पद ठरते! त्या जागा आपल्यांपैकींच कोणीतरी घ्यायला हव्या ना! मग त्या

घेणारांना जर आपण सरसकट स्वार्थी, नादान, देशद्रोही, देशबुडवे या सदरांत घालूं लागलों तर, त्यांत त्यांची परीक्षा न होतां आपलीच होईल. पाणपोई घालणें हें पुण्य म्हणून सांगावें, पण त्याचबरोबर पाणपोईवर पाणी पिणारा पापी ठरवावा, हा जसा एक कोलदांडा तसाच हा दुसरा कोलदांडा ठरेल कीं, वरिष्ठ जागांचें हिंदीकरण व्हावें; पण कोणीहि सज्जनानें, देशभक्तानें, स्वतःला जननिंदेच्या नरकांत लोटून घेण्यास तयार होऊनच मग त्या स्वीकाराव्या ! कौन्सिलर, कमिशनर, न्यायाधीश इत्यादि जागा या देशद्रोही नादानांकरितांच राखून ठेवल्या जाव्या असें म्हणावयाचें कीं काय !

आधीं सरकार अशा जागांवर नादानांची नेमणूक करील कशी ! व त्यांनीं केली तरी त्या जागांचें काम नादानांच्या हातून चांगलें होईल कसें ? तें काम अयशस्वी ठरणें यांत देशावरच अपात्रतेचा शिक्का पडतो. म्हणून माझें मत नेहमीं असें कीं, वरिष्ठ सरकारी नोकऱ्या मिळविणारा मनुष्य हाहि प्रथम सामान्यतः देशभक्तच न म्हणा पण देशप्रेमी तरी समजावा. मात्र ती नोकरी करीत असतां, आणि तिच्या पर्यवसानानंतर तो देशाशीं कसा वागतो यावर बारीक नजर ठेवून त्याला कमीअधिक श्रेय द्यायचें तें द्यावें. सरकारी नोकर हा, आपण सरकारची सेवा पत्करली, स्वतंत्र जीवन जें अधिक भूषणास्पद तें स्वीकारलें नाहीं, या जाणिवेनें स्वतःच्याच न्याय-बुद्धीनें मनांत जितका चूर असतो तितका पुरे झाला ! शिवाय समंजस सरकारी नोकर 'मी देशभक्त' म्हणून कधींहि मिरवितांना तुम्हांला दिसणार नाहीं. तो स्वतंत्र वृत्तीच्या देशसेवकालाच आपणांहून अधिक मान देईल ! तसेंच आपली संपत्ती हें आपल्या नोकरीचें फळ आहे असें समजून तिचा उपयोग स्वदेशाला शक्य तितका करून देईल. आणि अशी समजुतीची वागणूक न ठेवील तरच तो खरा स्वार्थी, नादान ठरेल. शिवाय उलट असेंहि विचारतां येईल कीं, जे 'देशभक्त' म्हणून नाचतात मिरवितात त्यांतहि असले नादान स्वार्थी लोक सांपडत नाहींत कीं काय ! पण हा अप्रिय मुद्दा मी येथें वाढवीत नाहीं.

यदृच्छेनें सरकारी नोकरींत शिरलेले, शिरावें लागलेले लोक असे अनेक दाखवितां येतील कीं, ज्यांनीं पुढें लोकसेवेचाच मार्ग स्वीकारला, व स्वतंत्र पेशाच्या देशसेवकांबरोबरीनें नांवाजण्यासारखें देशसेवेचें काम केलें. दुसरे पक्षीं असेहि लोक दाखवितां येतात कीं ते पुढें देशभक्त असे न्यायबुद्धीनें गणले गेले असले, तरी एकवेळ त्यांचें पाऊल सरकारी नोकरीकडे वळलें होतें. पण कांहीं कारणानें तो मार्ग त्यांनीं सोडला किंवा त्यांना सोडावा लागला. नामदार गोखले हे, एल्. सी. ई. ची परीक्षा पास होऊन पाहिल्या नंबराकरितां राखून ठेवलेल्या सरकारी इंजिनीअरच्या जागेच्या अपेक्षेनें पुण्याच्या सायन्स कॉलेजमध्यें प्रविष्ट झाले होते पण ती दिशा त्यांनीं लौकरच सोडली. देशबंधु चित्तरंजन दास हे आय्. सी. एस्. च्या परीक्षेला बसले पण नापास झाले. बाबू अरविंद घोष हे आय्. सी. एस्. परीक्षा पास झाले, पण पुढें घोड्यावर बसण्याच्या परीक्षेंत नापास झाले म्हणून ती पहिली परीक्षा फुकट गेली!

पण गोखले, दास, घोष अशांच्या उदाहरणांवरून हेंच घ्यावयाचें कीं, सरकारी मोठ्या नोकरींत शिरावें अशी कल्पना एक वेळ मनांत येऊन गेलेले लोकहि आंतून शुद्ध देशभक्तिप्रेरित असूं शकतात. आणि तीच गोष्ट सरकारी नोकरी मध्येंच सुटल्या-सोडलेल्यांची, किंवा नोकरी पुरी करून देशसेवेंत पडलेल्यांची समजावी. अगदीं खालीं मुळापासूनच फुलें लटकणारीं फुलझाडें दुर्मिळ असणार ! पण शेंड्याला लटक-णाऱ्या फुलांची योग्यता मुळाला चिकटणाऱ्यापेक्षां कमी असते काय !

नोकरींत न शिरलेल्या लोकांसंबंधानेंहि असेंच तारतम्य ठेवावें लागतें. नोक-रींत न शिरतां कोणी तरुण, वकील बॅरिस्टर व्यापारी झाला तरी तो अगदीं प्रारंभा-पासूनच मोठा देशभक्त असतो असें नाहीं. तर पुढें केव्हां त्या मार्गाला तो लाग-ल्यास भरपाई करून देतोहि. महात्मा गांधी हे प्रथम धंदेवाईक बॅरिस्टरच नव्हते काय ? पण याविषयीं पंडित मोतीलाल नेहरू यांचेंच एक उदाहरण दिलें तर पुरें होईल. कारण ते देशसेवेंत पडले त्यापूर्वी द्रव्याच्या राशि भरण्यांत व सुखलोलुपतेच्या सरोवरांत क्रीडा करण्यांत, वयाच्या पंचावन्नाव्या वर्षापर्यंत दंग होते !

सावरकरांसंबंधानें बोलावयाचें तर, ते आय्. सी. एस्. परीक्षेचें उद्दिष्ट डोळ्यां-पुढें ठेवून विलायतेला गेले नाहींत येवढेंच त्यांचें वैशिष्ट्य नसून, बॅरिस्टर होण्या-करितां गेले. तेहि पण बॅरिस्टर होणें हेंच मुख्य उद्दिष्ट मनांत न धरतां गेले हाच त्यांचा विशेष होय. विलायतेच्या स्वतंत्र वातावरणाचा फायदा घेऊन, म्हणजे तेथें जीभ सैल सोडण्यांत धोका नसतो या गोष्टीचा फायदा घेऊन, अद्वातद्वा बोलणारे तरुण विद्यार्थी विलायतेंत किती तरी भेटतात ! परंतु त्यांच्यांत व सावरकरांत पुष्कळच तफावत होती. विलायतेंत जीभ सैल सोडणाऱ्या पुष्कळ विद्यार्थ्यांचें मुख्य उद्दिष्ट परीक्षा पास होऊन द्रव्यप्राप्तीची तयारी करून परत येणें हें असतें. इतर विलायती चैनीबरोबर ते उच्छृंखलपणें बोलण्याचीहि चैन करून घेतात इतकेंच काय तें ! परंतु, सावरकरांची गोष्ट वेगळी होती. ते इकडून गेले तेच मुळीं अशा एका धनि-कानें दिलेली शिष्यवृत्ति घेऊन गेले कीं, जो स्वतःच यापूर्वी विलायतेंत हिंदी स्वातंत्र्य-वादाचा उघड पुरस्कार करूं लागला होता ! हे धनिक देशभक्त म्हणजे पंडित शामजी कृष्णवर्मा होत. त्यांनीं विलायतेंत स्वातंत्र्यवादी तरुणांचें केंद्र निर्मिण्याचा उपक्रम केला होता, व याविषयीं त्यांनीं इकडे टिळकांना जी माहिती पुरविली तिचा सुगावा लागूनच सावरकर ही शिष्यवृत्ति घेऊन विलायतेस गेले. या शिष्यवृत्तीचें नांवच ' शिवाजी शिष्यवृत्ति ' असें होतें !

१९०५ सालीं शामजींनीं 'इंडियन होमरूल सोसायटी' ही संस्था काढली होती. आणि त्या सोसायटीच्या कांहीं सभासदांच्या राहण्याजेवण्याच्या व्यवस्थेसाठीं 'इंडिया हाऊस' नांवाचें बोर्डिंग काढलें होतें. पण या 'परतंत्र' संस्थेंत प्रवेश केल्यावर, स्वतःचे असे जे उद्योग सावरकरांनीं केले तेच त्यांचें खरें वैशिष्ट्य दाखवितात. कारण

विलायतेस जाणाऱ्या तरुणांच्या वृत्तीचा ओघ देशकार्याकडे वळविणें ही गोष्ट सोपी नव्हती, पण त्याच गोष्टींत त्यांनीं आपलें लक्ष घातलें. या अवधींत सावरकरांनीं विलायतेंत काय पाहिलें व काय केलें याची चांगली कल्पना येण्याला त्यांचीं 'लंडनचीं बातमीपत्रें' हा ग्रंथ फार उपयोगी पडेल. त्यांनीं स्वतः केलेल्या गोष्टींप्रमाणेंच इतरांनीं केलेल्याहि कोणत्या गोष्टींत सहकारिता केली यावरून त्यांना ध्यास कोणता लागला होता हें कळून येतें. विलायतेस जाण्यापूर्वी त्यांनीं स्वातंत्र्याच्या ध्येयाचा उच्चार केला होता. परदेशी कपड्यांच्या होळया केल्या होत्या. गुप्त मंडळ्या स्थापल्या होत्या. स्वातंत्र्याचे पोवाडे रचले होते. अर्थात् हिंदुस्थानच्या कोंदट राजकीय हवेंतून निघून ते विलायतच्या मोकळ्या हवेंत गेल्यावर, आणि तेथें अनेक देशांच्या स्वातंत्र्यवादी लोकांचा सहवास त्यांना घडल्यावर, त्यांनीं ती पूर्वपरंपरा नुसती चालविली इतकेंच नव्हे तर अधिक पुष्ट व सुदृढ केली यांत आश्चर्य नाहीं.

साम्राज्यसत्तेला प्रतिकार करणें या कल्पनेला स्वातंत्र्यवादी राजकारणांतली साक्षरता म्हटलें तर, गांधींच्या अप्रत्यक्ष प्रतिकाराच्या 'ओनाम्या'पासून सुरुवात करून सशस्त्र बंडाच्या प्रतिकाराच्या 'क्ष ज्ञ' या अक्षरांपर्यंत सर्व साक्षरता सावरकर तोंडानें शिकले व त्यांनीं हातांनीं गिरविली.

लंडनमधील सावरकरांच्या उद्योगांविषयीं प्रस्तुत ग्रंथाचें ४ थें व ६ वें प्रकरण वाचकांना अत्यंत मनोरंजक व बोधप्रद वाटेल. विस्तारभयास्तव मी त्यांतील माहिती येथें फारशी देऊं इच्छित नाहीं. तथापि या वेळीं (१९०५-०८) हिंदुस्थानला स्वातंत्र्य, निदान 'वसाहती' स्वराज्य, मिळावें असें निःसंशय ध्येय असणाऱ्या लोकांच्या मनांत, साधनाच्या दृष्टीनें किती व कशा मर्यादा पडत होत्या, मतामतांचा गलबला हा कसा गोंधळ उत्पन्न करणारा झाला होता, तथापि असें असतां सावरकरांनीं मात्र आपलें ध्येय व धोरण रेखीव निश्चल कसें ठेवलें, हें लक्षांत येण्याकरितां व त्यापुरतेंच, तत्कालीन तरुणांच्या व पुढाऱ्यांच्या मतांचें किंचित् दिग्दर्शन करतों.

**झिया उद्दीन अहंमद:**—( सुऱ्हावर्दी यांस पत्र ) हिंदुस्थानला 'होमरूल' मिळणें हें अलीगडच्या म्हणजे मुसलमानी समाजाच्या धोरणाच्या अगदीं विरुद्ध आहे. शामजींच्या होमरूल सोसायटीचा उपाध्यक्ष तूं राहूं नको.

**बॅरिस्टर असफअली:**—मी राष्ट्रीय हिंदी लोकांशीं संबंध ठेवणें हें माझ्या मुसलमान मित्रांना आवडत नाहीं, तें मी कां करीन?

**नामदार गोखले:**—वसाहतीचें स्वराज्य हेंच ध्येय. सनदशीर चळवळ हेंच साधन. त्यांत बहिष्कार व करबंदी येथपर्यंत न्याय्य प्रतिकाराची मजल जाऊं शकते. पण सशस्त्र प्रतिकार वर्ज्य मानावा.

**सुरेंद्रनाथ बानर्जी:**-इंग्लंडांत मी मॅझिनीवर व्याख्यानें देत असें. पण त्यांना सांगत असें कीं त्यांनीं क्रांतिकारक ध्येयाचा त्याग करावा. ( स्वतःवर राज्याभिषेक करून घेणाराचे हे विचार ! )

मोहनदास गांधीः—हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळावयाचें तर तें ब्रिटिश साम्राज्यांत व त्या साम्राज्याच्या हातूनच मिळेल ! सशस्त्र प्रतिकार हा अधार्मिक, पापमय आहे !

दादाभाई नौरोजीः—पूर्ववयांत केलेल्या (सनदशीर चळवळीच्या) प्रयत्नांतून निराशेचे इतके प्रसंग मजवर ओढवले आहेत कीं त्यांच्यामुळें कोणाचेंहि अंतःकरण विदीर्ण व्हावें. त्यामुळें कोणीहि मनुष्य वैतागेल. मी तरुण असतों तर बंडाला प्रवृत्त झालों असतों.

पं. शामजी कृष्णवर्माः—आक्रमणाचा प्रतिकार करणें हें नुसतें क्षम्य नसून अवश्यहि आहे. सशस्त्र प्रतिकार क्षम्य; पण रक्तपाताशिवाय हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळणेंहि शक्य होईल. नाहीं कोणी म्हणावें ?

लो. टिळकः—तुमच्या सशस्त्र प्रतिकाराच्या तत्त्वमंडनांत कांहीं चूक नाहीं. पण तयारी किती आहे सांगा ! किरकोळ तयारीनें कांहीं होणार नाहीं. आम्ही हें सर्व करून भागलों आहों. अनुभवानें शहाणा होऊन मी तुम्हांला सांगतों कीं, जो मार्ग तुम्ही चोखाळूं पाहात आहां त्याची अद्यापि वेळ आलेली नाहीं. म्हणून देश तयार होईपर्यंत तुम्ही धीर धरा व सावधपणें चाला.

हाइंडमनः—रशियन लोकांची भावना जर समर्थनीय असेल तर, इंग्रजांची परकी लांछनास्पद घातकी जुलमी सत्ता झुगारून देण्यासाठीं भारतीयांनीं कोणतेहि प्रयत्न केले तरी ते अधिकच समर्थनीय आहेत. असें मी जाहीर करितों.

पां. म. बापटः—

सूचना मांडिल्या कोणी कोणी त्या उपसूचना ।
म्हटलें मी मला कांहीं यांतील पटतेंच ना ॥
(बॉंब) यंत्र माझें चालवीन यशायश हरि-करीं ॥
नको हें ठरलें त्यांचें माझेंहि ठरलें तदा ।
नको भाषा. मधुपुरीं जातों मज करा विदा ॥

वरील मतांचा क्रम लावावयाचा झाला तर, एका टोकाला सशस्त्र प्रतिकार हा धर्मनिषिद्ध ठरवून त्याला नरकवासाची शिक्षा सांगणारे मिथ्या धर्मतत्त्वज्ञानी पोपमहाराज मोहनदास गांधी, आणि दुसऱ्या टोकाला मदनलाल धिंग्रा व त्याच्या खालोखाल लॉर्ड मोर्ले व पार्लमेंट सभागृहांतील मंत्रिमंडळ यांजवर बॉंब टाकण्यास निघणारे सेनापति बापट हे येतात. आणि खरें बोलावयाचें तर सावरकर यांचाहि क्रम, त्यांच्या अंगच्या सावधपणामुळें, बापटांच्या खालींच लागतो. कारण प्रत्यक्ष कृतीची वेळ आली तेव्हां त्यांनीं बापटांना निवृत्त केलें. सावरकरांच्या या माघारवेऊ वृत्तीचें पद्यात्मक वर्णन सेनापति बापट यांनींच खालील शब्दांत केलें आहे.—

'आंग्ललोकसभास्थानीं टाकावा रसगोलक ।
वाटे, पदे जरी तुम्हां ! तुम्हीं कीं मुख्य चालक !' ॥

पण सावरकर म्हणाले :—

'नको जसा तुटे तारा चमके पुढतीं तम ।
तसें होईल हें कर्म. व्यर्थ हें. हा नको श्रम ॥
जा तुम्ही भारता आतां माथें शांत करा अति ।
ठरल्या रीतीनें चाला. नको व्यर्थ चमत्कृती ॥
ज्ञानप्रसार करणें तसा गोलकसंग्रह ।
जागजागीं भारताला पुढें येतील सुग्रह' ॥

आणि टिळक तरी सावरकरादि नाशिकच्या तरुण मंडळीला दुसरें काय सांगत होते! सावरकरांनीं पिक्रिक ॲसिडनें हात पिवळे केले असतील, तर टिळकांनीं स्वतः हातांत बॉंब न घेतां तो त्यांच्या अनुयायांनीं उडवितांना दुरून पाहिला असेल इतकाच फरक! याचा अर्थ हाच कीं, मतें, योजना कुणाच्या कांहीं असल्या तरी, प्रत्यक्ष कृतीचा क्षण हा सांगून येत नाहीं व सांगून आल्यावर टळत नाहीं. पण पूर्वतयारीच्या कल्पना प्रत्येकाच्या वेगळ्या असतात. स्वतः आपण एकटे एक तयार झालों म्हणजे ती तयारी पुरे असें बापटांना वाटे! त्याच्या खालची पायरी सावरकरांची. त्यांच्या दृष्टीनें बॉंब करण्याच्या विद्येचा प्रसार हिंदुस्थानच्या अनेक प्रांतांतून आधीं होऊन राहिला पाहिजे, आणि मगच कृतीला प्रारंभ व्हावा. टिळक याहि पलीकडे जाऊन म्हणत कीं, नुसत्या बॉंबनेंहि कांहीं होणार नाहीं. क्रांतीची तयारी पाहिजे ती याहून अधिक सर्वांगीण सामुदायिक पाहिजे. तात्पर्य, सशस्त्र प्रतिकार हें पाप मानलें तर, तें हाताप्रमाणें मनानेंहि घडत असल्यामुळें, मोहनदास गांधींच्या मताप्रमाणें धिंग्रा बापटांपासून टिळकांपर्यंत सर्वच नरकाचे धनी होण्याला योग्य होते! मात्र गांधींचीहि परीक्षा घेण्याची वेळ ईश्वर आणणार होता ती त्यानें १९४२ सालीं आणली! काळानेंच सूड घेतला म्हणावयाचा! कारण गेल्या ऑगस्टपासून देशांत झालेल्या चळवळींत सशस्त्र प्रतिकाराच्या साधनांचा उपयोग सर्रास करण्यांत आला, आणि तो बंड पुकारणाऱ्या गांधींच्या घोषणेमुळें झाला, असें सरकार अजून म्हणत आहे! गांधींनीं आजवर, राजकारणाला खोटें तत्त्वज्ञान लावून अनत्याचारित्वाचे खंडीभर कांदे नाकानें सोलले ते पूर्वी सर्व फुकट गेले! पण आतां त्यांच्या डोळ्यांना पाणी आलें! या सर्वांवरून बोधच घ्यावयाचा तर तो हा कीं, राजकारणांतील अनेकांचें साध्य एकच असलें तरी साधनांचे प्रकार, ते उपयोगांत आणण्याचा योग्य क्षण, यांविषयीं प्रत्येकाचें मत वेगवेगळें असूं शकतें. म्हणून राजकारणांत टिळकांसारखें सर्वसंग्राहक धोरण हेंच बरोबर, आणि गांधींसारखें एकांतिक पण अंतीं न टिकणारें असें तुसडें मत चूक, यांत शंका उरत नाहीं.

टिळकांनीं माधवराव अणे यांच्याशीं एकदां जी तात्त्विक चर्चा केली ती येथें लक्षांत ठेवण्यासारखी आहे. ते म्हणाले, "परोपकारी वृत्ति ही निरनिराळ्या प्रकृतीच्या मानानें निरनिराळ्या रूपानें प्रकट होत असते. परोपकारी वृत्तीच्या मनुष्यानें

देशाच्या सांप्रतच्या विपन्नावस्थेचा विचार करावयास सुरुवात केली तर त्याच्या प्रकृतिमानाप्रमाणें तो तीन मार्गांपैकीं एका मार्गाचा स्वीकार करतो. दया, करुणा, श्रद्धा इत्यादि गुण ज्याच्या ठिकाणीं निसर्गतः विशेषत्वानें वास करितात, व प्रापंचिक सुखाविषयीं जो स्वभावतः उदासीन असतो, तो साधुत्वाच्या मार्गास लागतो व देशावरील संकटपरिहारार्थ परमेश्वरी कृपेची याचना करितो. ज्यांच्या स्वभावांत मूळचीच तामसी वृत्ति अधिक व क्रोधादिकांचा आविर्भाव विशेष असे जे लोक ते अराजक मार्गानें व अत्याचारी कृतीनें आपला कार्यभाग साधण्याच्या उद्योगास लागतात. परंतु ज्याच्या ठिकाणीं सर्वच वृत्ति कांहीं प्रमाणबद्ध अतएव व्यवहारसन्मुख स्थितींत असतात, अशीं माणसें सद्यःप्राप्त साधनांनींच प्रस्तुत संकट निवारण्याचा प्रयत्न करतात. या सर्वांचा हेतु एकच असल्यामुळें, या मध्यम मार्गानें जाणाऱ्या माणसावर दोन्हीं बाजूंच्या प्रमुख व्यक्तींचा प्रसंगविशेषीं रोष होतो ! परंतु कार्याची गति जशी वेगवान् होत जाते तशी सर्वांचीच आक्रमणकक्षाहि कमी कमी दूर होत जाते, व एक काळ असा येतो कीं या तीनहि मार्गांचे लोक मध्यम मार्गाला प्रामुख्य देऊन त्याच्याच आश्रयानें व नेतृत्वाखालीं आपापले उद्योग त्या मार्गाला पोषक होतील अशा रीतीनें करावयास लागतात." या विवेचनांत टिळकांच्या राजकारणांतील मार्गाचें व नित्य नैमित्तिक आचरणाचें मर्म आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

—लो. टिळक चरित्र, खंड ३ भाग ८, पृ. ४६-४७.

टिळकांनीं केलेल्या मीमांसेचीं उदाहरणें प्रत्येक राष्ट्राच्या इतिहासांत आढळतात. कारण प्रत्येक पुढाऱ्याला जन्मभर एकाच मार्गानें स्वतः जातां येत नाहीं, किंवा दुसऱ्याला जाण्याचा उपदेश करतां येत नाहीं. त्याला नित्य नैमित्तिक हा भेद, हा विवेक करावा लागतो. हें तारतम्य संभाळावें लागतें. परंतु, नैमित्तिक किंवा प्रासंगिक धोरण ठरवितांना त्याच्या मनाची चलबिचल झाल्याशिवाय राहात नाहीं. म्हणून त्याच्या वर्तनांत आज एक सांगितलें, उद्यां एक सांगितलें; किंवा आज एक केलें उद्यां एक केलें, असा विसंगतीचा सूक्ष्म दोष दाखवितां येतो. म्हणून पुढाऱ्या-मुत्सद्यांच्या धोरणाला जिवंतपणीं नक्की विशेषणें लावण्याच्या भरीला न पडणें बरें. एकच विशेषण त्यांना अबाधित रीतीनें लावतां येण्यासारखें असतें तें ' देशभक्त ' हें विशेषण. पण हें विशेषण लोकांनीं सरसकट मानण्याइतकें जेव्हां लागतें तेव्हां त्या व्यक्तीच्या नित्य व नैमित्तिक, तात्त्विक व व्यावहारिक, अशा दीर्घकालीन वर्तनाचा-आचरणाचा विचार करूनच तें लावण्यांत येत असतें. मात्र सशस्त्र प्रतिकाराच्या बाबतींत, कोणत्याहि देशांतील राष्ट्रभक्त, पुढारी, मुत्सद्दी घेतले तरी त्यांनीं सशस्त्र प्रतिकाराला तात्त्विक विरोध केला नाहीं, इतकेंच नव्हे तर तें धोरण न्यायाचें, तें न्यायनिष्ठ व नीतिनिष्ठ असेंच मानलें.

सावरकरचरित्र जो वाचील त्याच्या एक गोष्ट लक्षांत येईल कीं, सावरकरांचीं राजकीय मतें आज चाळीस वर्षांच्या दीर्घ काळांत स्थिर आहेत. दुसऱ्या बाजूचें, म्हणजे

अशा मतांच्या चंचलपणाचें, उदाहरण द्यावयाचें तर तें लाला हरदयाळ यांचें देतां येईल. दोघेहि देशभक्त, स्वार्थत्यागी, साहसी. तथापि दोघांच्या मनोधारणेंत किती फरक! सावरकरांविषयीं बोलावयाचें तर असें म्हणतां येईल कीं त्यांचीं अंतिम ध्येयें अढळ होतींच; पण तीं पदरांत पाडून घेतांना, बाजारी व्यवहाराप्रमाणें आणाभर अरतापरता करून मध्यम क्रम स्वीकारण्याचीहि तयारी त्यांना पसंत होती. तसेंच राष्ट्रस्वातंत्र्यार्थ शस्त्रप्रतिकाराच्या अंतिम मार्गाचें समर्थन ते केव्हांहि सारख्याच आग्रहानें करीत असले तरी, 'निष्कारण' व्यक्तिवध त्यांना केव्हांच मान्य नव्हता. अंदमानांत बारीसाहेबांशीं बोलतांना ते म्हणाले "इंग्रजांच्या कित्येक गुणांचा मी चाहता आहे ... मी हत्येचा पक्षपाती आहें हें तुम्हांला कोणी सांगितलें ?"

गेल्या महायुद्धाच्या वेळीं (१४सप्टेंबर १९१४)सावरकरांनीं अंदमानाहून हिंदुस्थान सरकारला एक आवेदनपत्र धाडलें. त्यांत ते म्हणतात—" हिंदुस्थानास स्वतंत्र राष्ट्राच्या पदवीस पोंचावेंणें हें आमचें ध्येय होतें व आहेहि. तथापि या ध्येयाच्या सिद्धीसाठीं रक्तपाताचा, सशस्त्र प्रतिकाराचा मार्गच काय तो अवलंबन करावयाचा अशी कांहीं आम्ही शपथ घेतलेली नाहीं. इतकेंच नव्हे तर इतर कोणताहि उपाय जर सफल होण्याचा संभव असता तर आम्ही सशस्त्र प्रतिकाराचा अवलंब केलाच नसता! जी गोष्ट साधनांची तीच साध्याची...उभ्या मानवजातीचें राजकीय सात्त्विक एकीकरण हेंच ज्यांचें अंतिम ध्येय आहे त्या आम्हांस त्या ध्येयाच्या सिद्धीसाठीं तदनुकूल असलेल्या सर्व संस्था त्या ध्येयाकडे जाणाऱ्या मार्गावरील टप्पे म्हणून ग्राह्यच वाटतात...आज ज्यास ब्रिटिश साम्राज्य म्हटलें जात आहे त्यांत अंतर्भूत असणाऱ्या हिंदुस्थानादि देशांस जर स्वस्वप्रकृतिप्रमाण आणि तत्तत्परिस्थितिप्रमाण स्वातंत्र्य उपभोगूं देण्यांत येईल, तर, आम्ही त्या साम्राज्याशीं एकनिष्ठ राहणें हेंच आमचें कर्तव्य समजूं. अशा रीतीनें आयर्लंड-पासून हिंदुस्थानपर्यंत सर्व देशांस एकसूत्रीपणांत गोंवण्याचें कार्य करणारें तें साम्राज्य 'ब्रिटिश साम्राज्य' हें नांव देखील त्याज्यच मानील—इतर नांव प्राप्त होईतों त्यास 'आर्य साम्राज्य' असें पाहिजे तर म्हणावें.

" ह्या साम्राज्याच्या प्रस्तुत चालकांच्या अंगांत जर तसें सात्त्विक साहस करणारें धैर्य असेल तर तदंतर्गत असलेल्या हिंदुस्थानच्या विस्तृत आणि प्रमुख राष्ट्रास तरी त्यांनीं तें स्वातंत्र्य उपभोगितां येईल असे अधिकार त्वरित देऊन टाकले पाहिजेत. युद्धाच्या धांदलीत इतर कांहीं करतां न आलें तरी औपनिवेशिक स्वायत्तता (Colonial self-Government) जर हिंदुस्थानास देण्यांत येईल आणि वरिष्ठ विधिमंडळांत हिंदीं प्रातिनिधींचें निरपवाद बहुमत स्थापित करण्यांत येईल तर आम्ही आमच्या मताचे क्रांतिकारक आपला पूर्वीचा सशस्त्र प्रतिकाराचा मार्ग स्थगित करून या युद्धांत इंग्लंडचा पक्ष मनःपूर्वक एकनिष्ठेनें अवलंबितील.

" आमचें हें विधान मनःपूर्वक आहे कीं नाहीं हें सिद्ध करून दाखविण्याची संधि आम्हांस देण्यासाठीं आणि इंग्लंड खरोखरच हिंदुस्थानच्या दास्यशृंखला तोडण्यास इच्छित आहे याविषयीं हिंदी लोकांच्या मनांत विश्वास उत्पन्न करण्यासाठीं सरकारनें प्रथमतः आम्हां राजबंदिवानांसहि त्वरित मुक्त केलें पाहिजे. आम्ही असें वचन देतों कीं, जर आम्हांस या वेळीं मुक्त करण्यांत येईल तर आम्ही, हिंदुस्थानवर स्वारी करून येण्याची शक्य ती खटपट करणाऱ्या अफगाणतुर्कादिक आशियांतील विदेशी मुसलमानी टोळधाडीपासून, स्वदेशाचें संरक्षण करण्यासाठीं सैन्यांत भरती होऊन हिंदुस्थानच्या सीमासमरावर किंवा इतर तदनुषंगिक अशा कोणत्याहि रणक्षेत्रांत जाण्यास कचरणार नाहीं."

अंदमानाच्या बंदिवासांतून सुटका करून घेण्याकरितां सरकारला लालूच दाखवावी म्हणून हें नेमस्तपणाचें धोरण सावरकरांनीं स्वीकारलें होतें, असें म्हणणाराला उत्तर हेंच कीं, आज ते पूर्ण स्वतंत्र असतांहि आजच्या महायुद्धांत वरील धोरणच त्यांनीं स्वीकारलें आहे आणि सैन्यभरतीचा उपदेश हिंदी तरुणांना ते करीत आहेत. त्या कालीं सावरकर सैन्यभरतीला तयार होते ते शत्रुपक्षांत मुसलमान (तुर्क-अफगाण) होते म्हणून त्यांच्याशीं असणाऱ्या वैरबुद्धीनें, असेंहि कोणाला म्हणतां येणार नाहीं. कारण आज शत्रुपक्षांत सरहद्दीपलीकडचीं मुसलमान राष्ट्रें नाहींत असें असतां ते सैन्यभरतीचा तोच उपदेश करीत आहेत. तसेंच त्या उपदेशाचें कारण ते आज इंग्रजांचे विशेष मित्र आहेत असें नव्हे, तर युद्धाच्या निमित्तानें आपल्या हिंदी तरुण देशबांधवांना युद्धकर्माचा, क्षात्रकर्माचा, परिचय होण्याची ती एक संधि आहे, व पुढें कधीं काळीं प्रसंग गांठी पडलाच तर या परिचयाचा उपयोग होईल, म्हणून. मला वाटतें १९२९ सालपर्यंत राष्ट्रीय सभेनें जें ध्येय, सामोपचारार्थ म्हणून सरकारशीं स्वीकारलें होतें तेंच आजहि स्वीकारण्यास सावरकर तयार होतील. कारण कर्ज-फेडीला हप्तेबंदी होऊं शकते, व कर्जफेडीची सर्व रक्कम ऋणको पदरांत रोख घेऊन आला असतां त्याला थोडी सूट देखील मिळूं शकते हें सावरकर जाणतात. मात्र 'हे माझ्या परम प्रिय मित्रा व्हॉइसराया, मी बंड करण्यास निघालों आहें' असल्या खोचट मित्र–शत्रुत्वाच्या हास्यापद मिश्रणाचें प्रदर्शन त्यांनीं कधीं केलें नसतें.

सशस्त्र प्रतिकार हा राजकारणांत तत्वतः मान्य असला तरी, त्याचा प्रत्यक्ष प्रयोग किंवा उपयोग सहसा कोणी करीत नाहीं. याचें कारण हें कीं, एकट्यादुकट्या राज्यकर्त्या व्यक्तीचा वध करण्यानें स्वराज्य हस्तगत होत नाहीं. आणि ती व्यक्ति स्वतः सात्विक निरपराधी निरुपद्रवी असली तर तो वध निंद्यहि वाटतो. बरें, सामुदायिक सशस्त्र बंड करावें तर त्याला जनतेची आयत्या वेळीं एकदम तयारी होत नाहीं व शस्त्रास्त्रादि साधनेंहि मिळत नाहींत. यामुळें सशस्त्र प्रतिकार हा मान्य असणारेहि देशभक्त स्वतः अनुकूल काळाची वाट पहात बसतात व इतरांनाहि त्यांना तसेंच सांगावें लागतें. याच्याहि उप्पर एकाद्या प्रसंगानें, विशेष कारणानें,

व्यक्तिवध करून भावनेला पाट फोडणारा एकादा निघतो. किंवा व्यक्तिवध अमान्य पण बंडखोरी मान्य असे असणारे लोक, आपला प्रयत्न यशस्वी होणार नाहीं अशी जाणीव असताहि, धोका पतकरून, बंडाचा उपक्रम करून, 'करूनच झालें तर होईल' 'केल्यानें होत आहे रे' या विश्वासानें, 'आपण आपल्यापुरतें केलें मग कांहीहि होवो' अशा विचारानें व कृतीनें आपली तळमळ शांत करितात. पण हे अपवाद सोडले तर बंडाच्या अव्यवहार्यतेची कल्पना पटून केवळ मनांत धुमसत राहणारे देशभक्तच पुष्कळ. 'मुहूर्तं ज्वलितं श्रेयः नच धूमायितं चिरं' असें म्हणून दैवाचें नांव घेऊन हात उचलणारा एकादाच. उलट मोहनदास गांधींसारखा, म्हणजे सशस्त्र प्रतिकाराला पापाच्या सदरांत घालणारा, विपरीत देशभक्त एकादाच ! पण सत्य हें मिथ्या तत्त्वज्ञानावर शेवटीं सूड घेतल्याशिवाय राहत नाहीं. आणि गांधींचेंहि तसेंच झालें ! कारण टिळकांचें सशस्त्र प्रतिकाराचें तत्त्व हें 'अत्याचारी' असें ठरवून, तें हाणून पाडून, जगांत सात्त्विक अनत्याचारित्वाचें तत्त्व प्रस्थापित करण्याकरतांच आपला अवतार आहे असें मानणारे व प्रतिपादणारे, आणि हिंदुस्थानांतील एका टोंकाशीं घडलेल्या चौरीचुरा येथील दंग्यामुळें दुसऱ्या टोंकाशीं बारडोली येथील चळवळ थांबविणारे १९२२ सालांतले गांधी, वीस वर्षांनंतर, १९४२ त शेवटीं, तरुण अनुयायांनीं केलेल्या सशस्त्र प्रतिकारात्मक चळवळीच्या मोहाला निराशेमुळें बळी पडलेच कीं नाहीं ?

मी स्वतः आयर्लंडचा इतिहास पुष्कळ वाचला आहे; यावरून म्हणतों कीं, या तत्त्वचर्चेंत आयर्लंडच्या इतिहासाचें समालोचन हें कोणाहि मार्मिक निरीक्षकाचें समाधान करूं शकेल. कारण, वर वर्णन केलेल्या सर्व प्रकारचीं उदाहरणें त्या इतिहासांत अगदीं तंतोतंत मिळतात ! केवळ इंग्रज व आयरिश गुप्त हेरांचा वध केला कीं आपण कृतकार्य झालों असें मानणारे आयरिश देशभक्त होऊन गेले. व्यक्तिवध निंद्य पण सामुदायिक बंड हें न्याय्य असें प्रतिपादणारे होऊन गेले. बंड न्याय्य पण व्यवहार्य नाहीं म्हणून त्यांची कल्पना सोडून देणारे व सनदशीर कायदेशीर पार्लमेंटरी चळवळीनेंच होईल तें करूं असें म्हणणारे होऊन गेले. बंड अव्यवहार्य असलें तरी करूंच करूं असें म्हणून आनंदानें प्राण खर्ची घालणारे होऊन गेले. स्वतः कधीं शस्त्र हातीं न घेणारे पण इतरांच्या शस्त्रकर्माचें समर्थन करणारे होऊन गेले. पण गांधींच्याप्रमाणें राष्ट्रीय सशस्त्र प्रतिकाराला पाप ठरवूं पाहणारा विपरीत वावदूक तत्त्ववादी आयर्लंडच्या इतिहासांत एकहि झाला नाहीं ! किंबहुना जगाच्या इतिहासांतही झाला नसेल !

परंतु व्यक्तिशः अगर सामुदायिक रीतीनें सशस्त्र प्रतिकार करणें केव्हां योग्य किंवा अयोग्य या विषयींच्या अभिप्रायांत इटकून मेळ पडतोच असें नाहीं. म्हणून टिळक, दास, लजपतराय, भाई परमानंद, सावरकर यांच्यासारखे हिंदी पुढारी; ग्लॅडस्टन, ब्राइट यांच्यासारखे सात्त्विक इंग्रज मुत्सद्दी; कॅव्हूर, मॅझिनी, गॅरिबाल्डी यांच्यासारखे इटा-

लियन राष्ट्रभक्त; टॉलस्टॉय व क्रोपाट्कीन यांच्यासारखे रशियन क्रांतिकारक; यांच्या धोरणाविषयीं आपण एकच विशेषण लावूं लागलों तर तें चूक ठरेल. नुसत्या आयरिश इतिहासांतील फीनियन चळवळीच्या पुढाऱ्यांपासून विद्यमान डी व्हॅलेरापर्यंत आयरिश देशभक्त घेतले, तर संशोधकाला यासारखें विपुल क्षेत्र कदाचित् सगळ्या जगाच्या इतिहासांत एकत्र सांपडणार नाहीं. म्हणून केवळ मासल्यादाखलच नित्य शांततावादी तथापि नैमित्तिक शस्त्रप्रतिकारवादी, असा जो एक मीघर नांवाचा पुढारी होऊन गेला त्यांचें Sword Speech नांवाचें एक भाषण Irish Orations नामक पुस्तकांत मला आढळलें तें येथें मुद्दाम दिलें आहे :

"No member of this Association has suggested an appeal to arms. No member of this Association advised it. No member of this Association would be so infatuated as to do so. In the existing circumstances of the country, an excitement to arms would be senseless and wicked, because irrational. To talk now-a-days of repealing the Act of Union by force of arms would be to rhapsodize......There might be a riot in the street—there would be no revolution in the country! The secretary, Mr. Crean, will for more effectually promote the cause of Repeal, by registering votes in Green Street than registering fire-arms in the Head Police Office Conciliation Hall on Burgh Quay is more impreganable, than a rebel camp on Vinegar Hill. The hustings at Dundalk will be more successfully stormed than the Magazine in the park. The registry club the reading room, the polling booths, these are the only positions in the country we can occupy. Voters certificates, books, pamphlets, newspapers, these are the only weapons we can employ. Therefore, my lord, I cast my vote in favour of the peaceful policy of this Association. It is the only policy we can adopt. If that policy be pursued with truth, with courage, with fixed determination of purpose, I firmly believe it will succeed.

"But, my lord, I dissented from the resolutions before us, for other reasons. I stated the first—I now come to the second I dissented from them, for I felt that by assenting to them, I should have pledged myself to the **unqualified repudiation of physical force** in all countries, at all times, and under every circumstance. This I could not do. For, my lord, I do not abhor the use of arms in the vindication of national rights. There are times when arms will alone suffice, and when political ameliorations call for a drop of blood, and many thousand drops of blood. OPinion, I admit, will operate against opinion. But as the honourable member for Kilkenny has observed, force must be used against force. The soldier is proof against an argument—but he is not proof against a bullet. The man that will listen to reason—let him be reasoned with, but it is the weaponed arm of the patriot that can alone prevail against battalioned despotism.

"Then, my lord, I do not condemn the use of arms as immoral, not do I conceive it profane to say, that the King of Heaven—the Lord of

Hosts! The God of Battles! bestows His benediction upon those who unsheath the sword in the hour of a nation's peril.

" From that evening on which in the valley of Bethulia, He nerved the arm of the Jewish girl to smite the drunken tyrant in his tent, down to this day, in which He has blessed the insurgent chivalry of the Belgian priest, His Almighty hand hath ever been stretched forth from His throne of Light, to consecrate the flag of freedom—to bless the patriot sword Be it in the defence, or be it in the assertion of a people's liberty, I hail the sword as a sacred weapon; and if, my lord, it has sometimes taken the shape of the serpent and reddened the shroud of the oppressor with too deep a dye, like the anointed rod of the High Priest, it has at other times, and as often, blossomed into celestial flowers to deck the freeman's brow.

" Abhor the sword ? Stigmatise the sword ? No, my lord, for in the passes of the Tyrol it cut to pieces the banner of the Bavarian, and through those cragged passes struck a path to fame for the peasant insurrectionist of Inspruck!

" Abhor the sword ? Stigmatise the sword ? No, my lord, for, at its blow, a giant nation started from the waters of the Atlantic, and by its redeeming magic and in the quivering of its crimson light, thee chrippled colours sprang into the attitude of a proud republic, limitless and invincible and prosperous.

" Abhor the sword ? Stigmatise the sword ? No, my lord, for it swept the Dutch marauders out of the fine old towns of Belgium—scourged them back to their own phlegmatic swamps—and knocked their flag and sceptre, their laws and bayonets, into the slugish waters of the Scheldt. "

Thomas Francis Meagher ( Page 359. )—Irish Oratory and Orators.

१९ व्या शतकाच्या उत्तरार्धांतील एक सुप्रसिद्ध इंग्रज चळवळ्या समाजभक्त जॉर्ज जेकब हॉलियोक यांचे चरित्र गेल्या पंधरवड्यांत मी वाचलें त्यांतहि मला हाच बोध मिळाला. हा गृहस्थ मोठ्यांत मोठा, लहानांत लहान, असा होता. मतस्वातंत्र्याची केवळ मूर्ति. धंदा छापखाना व ग्रंथप्रकाशन. ध्येय कनिष्ठ वर्गाची सुधारणा. विशेष परिश्रम, धर्म व राजकारण यांची गुंतागुंत सोडविणें. या गृहस्थानें आपल्या तारुण्यांत सशस्त्र प्रतिकाराचा नुसता विचारच नव्हे तर आचारहि केला होता. इंग्लंडांत येऊन राहिलेल्या निर्वासित क्रांतिकारकांशीं दाट ऋणानुबंध ठेवला होता. स्वतः हातानें बॉंबगोळे तयार केले होते व उडवून पाहिले होते. त्याचें आत्मचरित्र वाचल्यास आयर्लंडांतील गुप्त व प्रकट चळवळीच्या इतिहासाची ती इंग्लिश पुरवणीच असें वाचकांना वाटेल.

असो. सावरकरांच्या तरुणपणच्या उद्योगांसंबंधानें बोलायचें तर, अनुभवी जगानें मानलेला असा एक सिद्धांत त्यांनाहि लागू पडतो तो हा कीं, माणसाच्या जातिवंत प्रवृत्तीला कोंब फुटावयाचा तो वयाच्या पहिल्या पंचविशींतच फुटतो. ' मिशा व मतें एकदमच फुटतात ' असें सुभाषित गडकरी यांनीं रचलेलें प्रसिद्ध

आहे. या मतांमध्यें सुविचारी, कुविचारी, अविचारी असे तीनहि प्रकार असतात. म्हणून या पंचविशीला गद्धे पंचविशी असें एक ' प्रेमळ विनोदी ' नांव मिळालें आहे. कारण गाढवपणा हा केवळ असत् प्रवृत्तींतच असतो असें नाहीं तर आपल्या सत्प्रवृत्तीचा अविचारी अतिरेक झाल्यास तोहि 'गाढवपणा'च ठरतो कीं ! आणि तो शब्द प्रांजलपणानें स्वतःला लावून घेणारे उमदे लोकहि आढळतात ! पण गैरसमज करणारा हा कटु निंदात्मक शब्द वर्ज्य ठरवून मीं ' गद्धेपंचविशी ' ऐवजीं ' दिव्य पंचविशी ' असा नवा शब्द बनवूं इच्छितो. असला म्हणजे चांगल्या प्रकारचा बेछूटपणा दिव्य पंचविशींत करणारे व केलेले देशभक्त प्रत्येक तेजस्वी राष्ट्रांत होऊन गेले आहेत. आणि सावरकर हे त्यांतच एक जमा धरावे लागतात. मला तर वाटतें कीं, आपल्या पहिल्या पंचविशींत सावरकरांनीं विलायतेंतल्या मुक्कामांत देशभक्तीच्या जितक्या गोष्टी केल्या तितक्या करणाऱ्या हिंदी तरुणांचीं उदाहरणें फारच थोडीं सापडतील आणि हेंच सावरकरांचें असामान्यत्व असें म्हणतां येईल. सावरकर विलायतेला गेले तेव्हां ते अवघे बावीस वर्षांचे होते. आणि ते कैदेंत कायमचे पडले तेव्हां सत्तावीस वर्षांचे होते. या वयांत विलायतेला जाणारे हिंदी तरुण सामान्यतः कसे असतात, कसे वागतात, याची कल्पना करतां येईलच. मोहनदास गांधी यांनीं आत्मचरित्रात ( ' माझे सत्याचे प्रयोग ' या पुस्तकांत ) असें लिहिलें आहे कीं, मला विलायतेंत गेल्यावर प्रारंभीं इंग्रजी पद्धतीचें नृत्य-गायन इत्यादि विषयांचे पाठ घेणें शिष्टाचारपालनाच्या दृष्टीनें अवश्य वाटलें.' पशुपति अय्यर यांसारख्या तरुणाना विलायतेंत गेल्यावर ' आपण हिंदु जन्मलों ही चूक केली ' असें वाटूं लागलें ( पृ. १५२ ). कांहीं तरुणांनीं हेरगिरीची सरकारी सेवा करून पैसे मिळविले. खाण्यापिण्याची चैन करणें हें तर सांगायलाच नको. चांगलें उदाहरण घेतलें तरी ' आपला अभ्यास बरा कीं आपण बरे यापलीकडे कांहीं नाहीं ! ' पण विलायतेस प्रथम निघतांनाच देशभक्तिप्रेरित ध्येय मनांत धरून निघणारे, शिवाय विलायतेंत भेटणाऱ्या समवयस्क तरुणांना देशभक्तीच्या मार्गाकडे वळविण्याची आकांक्षा व उमेद धरून निघणारे, आणि प्रत्यक्ष विलायतेंत गेल्यावर त्याकरितांच सर्व प्रकारचे उद्योग करणारे हिंदी तरुण किती सांपडतील ! सावरकरांनीं वेळांत वेळ काढून, अभ्यास करून, बॅरिस्टरीची परीक्षा तर दिलीच; पण तें कार्य जसें कांहीं गौण, व देशभक्तिसंघटनाचें कार्य हेंच मुख्य असें मनांत धरून ते वागले हें उघड दिसतें.

१९०५ ते १९०९ सालच्या पुढें परवांपर्यंत त्यांचें सर्व आयुष्य कारागृहांत गेलें, किंवा कारागृहाबाहेर पण वस्तुतः सरकारी बंदींत बंधनांत गेलें, यामुळें स्वतंत्रपणें राजकीय अशी कोणतीच चळवळ सावरकरांना करितां आली नाहीं. आणि त्यांची बंधमुक्तता झाल्यावर ते, कॉंग्रेसला किंवा एखाद्या क्रांतिकारक संघाला न मिळतां टिळकांच्या प्रतिसहकारी राष्ट्रीय पक्षाला मिळाले, व हिंदुत्वरक्षणासाठीं हिंदुमहासभेचें पुढारीपण त्यांनीं हातीं घेतलें. यावरून सावरकरांना आज तरी कया प्रका-

र्चा विषयक मतप्रतार करावयाचा आहे हें उघड दिसून येतें. मात्र १९०५ ते १९०९ या कालांत आपण जें केलें त्याबद्दल त्यांना पश्चात्ताप तर वाटत नाहींच, इतकेंच काय पण त्या वेळच्या ज्या कित्येक गोष्टी प्रसिद्ध झाल्या नव्हत्या त्याहि ते आज प्रगट सभांतून उघडपणें सांगतात. व त्या वेळच्या धोरणाबद्दल यथार्थ अभिमानहि बाळगतात. तथापि, कांहीं कांहीं गोष्टी मनुष्याच्या आयुष्यांत एकेकदांच घडून येतात; त्या तो सतत करूं शकत नाहीं व इच्छितहि नाहीं तथापि एकाद्या नामांकित मनुष्यासंबंधानें ज्याला केवळ गत गोष्टी किंवा निव्वळ इतिहास याहून अधिक म्हणतां येणार नाहीं अशा हकीगती स्मरणांत असतात, म्हणून त्याचें चरित्र लिहिण्याचा प्रसंग आला असतां त्या अवश्य लिहाव्या लागतात. 'मी आपल्या हातानें पार्लमेंटवर बाँब फेंकण्याला निघालों होतों' असें सेनापति बापटांनीं पुण्यास एका सभेत सांगितल्याचें पुष्कळांनीं ऐकलें असेल. आणि त्याच्या त्या एक वेळच्या धोरणाला राजकीय गुन्ह्याचें जें स्वरूप असेल त्याबद्दल त्यांनीं प्रायश्चित्तहि भोगलें आहे. पण राजकीय गुन्ह्याचें स्वरूपच असें असतें कीं शिक्षा भोगल्यानें त्याची निष्कृति होते! त्या अशा अपराधांचा डाग अपराध्याच्या अंगाला कायमचा चिकटवून ठेवूं असें स्वत: सरकारलाहि म्हणतां येत नाहीं! म्हणूनच सावरकरांना बंधमुक्त करणारें मुंबईचें मंत्रिमंडळ ( ना. कूपर-जमनादास मेथा), व त्या मंत्रिमंडळानें बंधमुक्त केलेले सावरकर, हे गोखले हॉलमध्यें भरलेल्या बंधमुक्ततेनंतरच्या पहिल्याच सभेत मांडीला मांडी लावून बसलेले लोकांना दिसले! पण अशीं अनेक उदाहरणें जगाच्या इतर इतिहासांतील दाखवितां येतात. सावरकरांनीं पिस्तुलें इकडे रवाना केलीं असतील किंवा पिस्तुल चालविणाऱ्या धिंग्राचें उघड समर्थन केलें असेल. पण स्वत: त्यांनीं कोणावरहि पिस्तुल चालविलें नाहीं. आज इंग्रज साम्राज्याच्या सैन्यांत फील्ड मार्शल व युद्ध मंडळाचे एक सभासद असणारे जनरल स्मटस् हे बोअर युद्धांत ( १९०० चा सुमार—सावरकरांआधीं पांच सात वर्षें ) हातांत बंदूक घेऊन इंग्रजांविरुद्ध लढत होते, व त्यांनीं बंदुकीनें कैक इंग्रज सैनिकांचा प्रत्यक्ष वध केला असेल. आयर्लंडचा इतिहास घेतला तर असे दाखले किती तरी सांपडतील. ज्या आयरिश हातांनीं पिस्तुल झाडलें त्याच हातांशीं इंग्रज मुख्य प्रधानानें हस्तांदोलन करून मैत्रीचा तह ठरविला असेंहि घडलें आहे. ज्याला फांशीची शिक्षा झाली पण अमलांत आणायची राहिली असा एक डी व्हॅलेरा आज आयरिश रिपब्लिकचा अध्यक्ष आहे. दुसरा असाच एक सर चार्ल्स गॅव्हन डफी हा साम्राज्यांतर्गत ऑस्ट्रेलियन वसाहतीचा मुख्य प्रधान झाला. तात्पर्य, गत व वर्तमान यांमध्यें अवश्य तो भेद करणें हेंच शहाणपणाचें लक्षण होय. आणि सावरकर चरित्रांतील एक दोन पूर्व प्रकरणांकडे लोकांप्रमाणें सरकारनेंहि इतिहास या नात्यानेंच पाहिलें पाहिजे. मी तर असें म्हणूं शकेन कीं, न्यायमूर्ति रौलेट यांनीं लिहिलेल्या सेडिशन ( राजद्रोह ) कमिटीच्या रिपोर्टाची एक प्रकारची पुरवणीच या सावरकर चरित्राला

मानतां येईल. राजद्रोही, अर्थात् देशभक्त, हिंदी लोकांनीं तळमळीनें, काय का
तीव्र स्वरूपाच्या चळवळी केल्या हें तपशीलवार नमूद करण्यांत रौलेट रिपोर्टाच
जितका सत्यनिर्देशक उद्देश मानतां येईल तितकाच, सावरकर-चरित्रांतलीं तीं त
प्रकरणें तपशीलवार लिहिण्यांत करंदीकर यांचाहि मानला पाहिजे. झालें तें का
होऊन गेलें, वेळ पडेल तर उद्यांहि कदाचित् होईल, पण आज तरी खास नाहीं
असाच अशा लिखाणांचा अन्वयार्थ लावावा लागतो. म्हणून मी म्हणतों कीं
करंदीकरकृत सावरकर-चरित्र ग्रंथ हा इतिहास ग्रंथांत जमा आहे मतप्रचारक-ग्रंथां
तो जमा नाहीं.

'करंदीकरकृत सावरकर- चरित्र ' हा ग्रंथ केवळ इतिहासवजा आहे. त
कोणत्याहि रीतीनें मतप्रचारक मतप्रसारक ग्रंथ मानतां येत नाहीं. इतिहास म्हण
केवळ पूर्वीं एक वेळ होऊन गेलेल्या गोष्टी. सावरकरांनीं १९०५ पासून १९०
पर्यंत केलेल्या अनेकांगी राजकीय चळवळींची माहिती या ग्रंथांत दिली आहे हें ख
पण त्या वेळचीं सर्वच मतें स्वतः सावरकरहि आज जनतेंत पसरीत नाहींत किं
पसरूं इच्छित नाहींत. सुदैवानें आज सावरकर विद्यमान असून, ते कोणतीं विशे
मतें मान्य करितात किंवा कोणत्या विशेष मतामतांचा प्रसार आज करूं इच्छि
तात, हें जगाच्या वेशीवर टांगण्याइतकें प्रगट व प्रसिद्ध आहे. आज सावरकर गु
मंडळ्या बनवीत नाहींत. युरोपांतून हिंदुस्थानांत शस्त्रास्त्रें (पिस्तुलें) आणवी
नाहींत. कोणाच्याहि वैयक्तिक वधाचें समर्थन करीत नाहींत. सैन्यांत इंग्रज सरका
विरुद्ध फितवाफितवी किंवा बंडाची उठावणी करीत नाहींत. उलट, आज इंग्रजां
अधिराज्य असतां, तें तूर्त क्षणापुरतें मान्य करून जर्मनी व जपान या इंग्रजांच्या श
विरुद्ध लढण्याकरितां, इंग्रज मुख्याधिकारी असलेल्या लष्करांत शिरण्याविषयीं ते हिं
तरुणांना उपदेश करीत आहेत. वरिष्ठ लष्करी अधिकाराच्या जागा द्याल तरच सैन
भरतीला सहाय्य करूं अशी, म्हणजे पूर्वीच्या महायुद्धाच्या वेळीं टिळकांनीं घात
तशी अटहि ते घालीत नाहींत ! व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळांत हिंदुत्वनिष्ठ
होईनात पण हिंदी सभासद बसावे, आणि राज्यकारभाराचा गाडा हांकण्यास त्यां
सहाय्य करावें, असा विधायक शांततावादी प्रयत्न ते करितात. असहकारिते
चळवळ युद्धकालीं करून सरकारला युद्धप्रयत्नांत अडथळा करणें गैर आहे या मत
चे ते निदान आज आहेत. किंबहुना कॉंग्रेसनें उभारलेल्या चळवळीचा ते प्रसिद्ध
निषेध करितात. हिंदुस्थानांत न्यायाच्या पद्धतीवर सर्व वर्गांना योग्य तें स्थान रा
लोकशाही मिळविण्याच्या कामीं इंग्रज साम्राज्यशाहीचें सहाय्य मिळालें तर स्वीक
रण्याला ते तयार आहेत. या सर्व गोष्टींवरून १९०५ ते १९०९ या कालावधींत
सावरकर कालमानाप्रमाणें वेगळे होते, आज ते तसे नाहींत, मात्र उद्यां या देश
राजकीय घटनापरिस्थिति काय होईल हें आज नक्की कोणालाहि सांगतां येत नाहीं
आणि स्वतः सावरकरांनाहि त्याचा कयास आज बांधतां येत नाहीं, यामुळें भविष्

काळीं सावरकर कोणतें धोरण व साधनमार्ग स्वीकारतील, याविषयीं सर्वस्वीं मतस्वातंत्र्य राखून ठेवूनच आज योग्य तें ते करीत आहेत इतकेंच म्हणतां येईल.

हें आजचें त्यांचें चरित्र सामान्य वाटलें तरी बॅरिस्टरीची परीक्षा उत्तीर्ण होण्यापर्यंतचा काळ ही सावरकरांची विद्यार्थिदशा म्हणतां येईल. व या अवधींत त्यांनीं ज्या गोष्टी केल्या त्या मात्र असामान्य होत. त्या अशा आहेत :—

देशभक्तिभावनेनें कवित्व केलें. शिक्षकाविरुद्ध स्वाभिमान प्रकट केला. स्वदेशीचा उपदेश केला. बहिष्कारप्रदर्शनार्थ परदेशी कापडाच्या होळ्या केल्या स्वातंत्र्याच्या ध्येयाचा उघड पुरस्कार केला. कायद्याची भीति मनांत बाळगली नाहीं. बरोबरीच्या विद्यार्थ्यांना आपल्याच दिशेनें विचार करावयास लावून त्यांना आपले अनुयायी व सांप्रदायी बनविलें. ज्यांचीं स्वातंत्र्यवादी मतें आधींच कळून आलीं होतीं अशांची शिष्यवृत्ति मिळविण्याची खटपट केली. विलायतेस गेल्यावर उघडपणें त्यांचाच आश्रय व संगत केली. विलायती लोकांपुढें वक्तृत्वपूर्ण व्याख्यानें देऊन स्वातंत्र्यवाद प्रतिपादिला. आपलें राहतें ठिकाण हें जहाल स्वरूपाच्या उद्योगांचें केंद्र बनविलें. युरोपच्या इतिहासांतील राज्यक्रांतिकारक चळवळींचा अभ्यास केला व पुरस्कारार्थ लेख लिहिले. मॅझिनीचें चरित्र लिहून अंतिम स्वरूपाचा राष्ट्रस्वातंत्र्यवाद प्रतिपादिला. हिंदुस्थानांतील १८५७ सालच्या बंडाचा नवा अर्थ करून सांगितला व त्यावरील माहिती मिळवून मराठी व इंग्रजी ग्रंथ लिहिले. विलायती छापखानेवाले छापण्यास धजेनात असे लेख व ग्रंथ युरोपांतील इतर देशांत छापविले. आक्षिप्त ठरलेलें व जप्त झालेलें वाङ्मय अनेक युक्तिप्रयुक्तीनें विलायतेंत व हिंदुस्थानांत प्रसृत केलें. प्रत्यक्ष खुनी मनुष्यांशीं जाहीर रीतीनें सहानुभूति प्रकट केली. सहज विकत मिळणारीं हत्यारें कधींकाळीं उपयोगी पडतील, पण आज निदान त्यांचा परिचय असावा, अशा हेतूनें पॅरिसमध्यें मिळविलेलीं पिस्तुलें गुप्त रीतीनें हिंदुस्थानांत आपल्या स्नेह्यासवंगड्यांकरितां पाठविण्यांत धाडसी वृत्तीप्रमाणें बुद्धिचातुर्यहि दाखविलें. शेवटीं सरकारचें घरणें आलें व खटला झाला तेव्हां किंचित्‌हि भीति दर्शविली नाहीं, खेद दाखविला नाहीं, पश्चात्ताप प्रकट केला नाहीं. अशा संकटांकडे राष्ट्रीय तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें समाधानी वृत्तीनें कसें पाहतां येतें हें तरुणांना शिकवलें. तुरुंगवासांतील हालअपेष्टा सोसण्याची तयारी दाखविली. जिवावर उदार होऊन कातडी सोलली जाण्याचा धोका पत्करून मार्सेलिस बंदरांत जहाजाच्या बारिकशा भोकांतून समुद्रांत उडी टाकली; आणि आपल्या संकटांतून युरोपच्या राजकारणांत आंतरराष्ट्रीय कायदेशीर हक्कांचें वादळ कसें उठवितां येईल याविषयीं कल्पना चालवन कायदा व राजकारण या विषयांतील प्रौढ बुद्धिमत्ता प्रकट केली. तात्पर्य, वयाच्या विशीसत्ताविशींत असे देशभक्तिप्रेरित उद्योग आजवर किती हिंदी तरुणांनीं केल्याचें दाखवितां येईल ? आणि विशेष गोष्ट ही कीं, या सर्व उद्योगांत सावरकर हे इतरांचे अनुयायी नसून पुढारीपणानें वावरत होते, त्यांच्या संगतींत आलेली इतर प्रांतांतील

तरुण मुलें त्यांचें पुढारीपण मान्य करीत होतीं आणि त्यांच्यासंबंधीं नुसती आदरबुद्धि नव्हे तर प्रेमाचा जिव्हाळा प्रकट करीत होतीं असेंच दिसून येतें. जॅक्सनचा खून न होतां सावरकर हिंदुस्थानात सुखरूप परत येते, व त्यांना बॅरिस्टरी-वकिली करण्याची परवानगी मिळती, तर त्यांचें पुढील चरित्र काय झालें असतें असा प्रश्न एकाद्याला सहज सुचणारा आहे. पण त्याचीं उत्तरें अनेक होतील व त्यांना केवळ मनाच्या कल्पना याखेरीज अधिक महत्त्व देतां येत नाहीं. परंतु मला वाटतें कीं, हिंदुस्थानांत आल्यावर प्रथम धोका उत्पन्न झाला असता, म्हणून लोकमान्य टिळकांचें उदाहरण डोळ्यापुढें ठेवून मर्यादा संभाळीत प्रगतिपर मार्ग कसा काढावा या मार्गाचें संशोधन त्यांनीं करून पाहिलें असतें. पण तें त्यांना न साधतां त्यांच्यावर राजद्रोहाचे खटले होऊन पं. जवाहिरलालप्रमाणें त्यांना वारंवार तुरुंगांत जावें लागलें असतें. तथापि आज प्रत्यक्ष बंड करण्याची कल्पना किती अव्यवहार्य आहे हें लक्षांत आल्यानें, त्यांनीं बोलण्यांत शिवरामपंत परांजप्यांची भाषा व प्रत्यक्ष कृतींत टिळकांचें मुत्सद्दीपणाचें धोरण यांचा मेळ चातुर्यानें घातला असता. कारण आज तीव्र भावना बोलून दाखवितांनाहि ते असें सयुक्तिक बोलतात कीं, थंड डोक्याच्या नामदार शास्त्री यांच्यासारख्या चिकित्सकालाहि त्यांत आक्षेपाची काडीहि शिरक-वितां येत नाहीं.

प्रस्तुत सावरकर–चरित्र मतप्रसाराचा ग्रंथ नाहीं, तर केवळ इतिहास आहे हें वर दर्शविलें आहेच. आणि हा ग्रंथ इतिहासाच्या दृष्टीनें वाचणाराच्या मनांत, तो बहुश्रुत असेल तर, जगाचा इतिहास त्याच्या डोळ्यांपुढें उभा राहिल्याशिवाय राहणार नाहीं. तो हेंच सांगेल कीं, ज्या ज्या देशांत पूर्वी परकीय अधिकाऱ्यांविरुद्ध बंडें झालीं, किंवा स्वदेशीच पण एकतंत्री राजसत्ता नाहींशी होऊन राज्यक्रांत्या झाल्या, त्यांतील देशभक्तवृत्तीच्या तरुणांनीं सावरकरांसारखेच उद्योग केले. त्यांतले कांहीं स्वदेशांतच राहून करतां आले ते केले व कांहीं हद्दपार झालेल्या स्थितींत परदेशींहि केले. खुद्द लंडन किंवा न्यूयॉर्क घेतलें तर, त्या शहरीं अशा निर्वासित तरुण देशभक्तांनीं इंग्रज व अमेरिकन सहानुभूतीच्या पंखाखालीं राहून स्वदेशस्वातंत्र्याचे उद्योग कसे केले हें पाहिलें म्हणजे सावरकरांनीं जगाचीच एक रीत अनुसरली, पण स्वदेशांतील इतर तरुणांच्या दृष्टीनें मात्र असामान्य व अद्भुत असेंच कांहीं केलें, असें म्हणावें लागतें. मित्रराष्ट्रांनीं परस्परांच्या बंडखोरांना आश्रय द्यावा कीं देऊं नये या प्रश्नाचें उत्तर आंतरराष्ट्रीय कायदा जो देतो, त्याच्याविरुद्ध उत्तर मनुष्यस्वभाव देतो. या स्वभावाला अनुसरूनच लंडन शहरानें पूर्वकाळीं इतर सर्व देशांच्या बंडखोरांना निवारा व आश्रय दिला. आणि या गोष्टीचा इंग्रज व अमेरिकन लोक मोठा अभिमानहि बाळगतात. लंडननें मॅझिनी, गॅरिबाल्डी, लुई कोसूथ, ब्लँक अशा परदेशी बंडवाल्यांनाच काय पण पळपुट्या अशा राजांनाहि आश्रय दिला आणि त्या मानसिक औदार्याचें भूषण मानलें! न्यूयॉर्क शहरांत एकाच वेळीं निर्वासित देशभक्त गॅरिबाल्डी हा मेणबत्त्या

करीत होता; लेड्रू रॉलिन हा बंदरावर हमाली करी; लुई ब्लँक हा नृत्याचे धडे देई; फेलिक्स पिॲट हा नाटकाचे पडदे उचलून उदरनिर्वाह करी; ला मार्टिन हा भिक्षा मागे. एक फ्रेंच तरुण रस्त्यांतून भाजी विकी आणि एका जर्मन देशभक्तानें शेव्हिंग सलून—न्हाव्याचें दुकान–काढलें होतें. पण लंडन हें मुंबईप्रमाणें ब्रिटिश साम्राज्यांतच असल्यामुळें, तेथें सावरकर, पंडित शामजी, कामाबाई अशांना थारा-निवारा कसा मिळणार ? म्हणून त्यांना तो पॅरिसमध्यें फ्रेंच लोकांकडून मिळवावा लागला. आणि अशी कल्पना करतां येते कीं, हिंदुस्थानला परत येणें अशक्य झाल्यामुळें कदाचित् सावरकर हेहि पॅरिसमध्यें राहून क्रांतिकारक उद्योग करीत जन्म घालविते ! कारण, स्वदेशीं परत येऊन फांसावर लटकणें किंवा जन्मभर तुरुंगवास पत्करणें यापेक्षां देशकार्यार्थ खुषीची हद्दपारी स्वीकारलेली काय वाईट ? असें तारतम्य पटणें शक्य आहे. मला आठवतें कीं, मी मध्यवर्ती विधिमंडळांत असतां अशा कांहीं निर्वासितां-तर्फे होममेंबरकडे खासगी विचारणा केली, व म्हणालों कीं, "या लोकांना जर स्वदेशीं परत यावयाचें आहे तर त्यांना पासपोर्ट मिळण्याला सरकारनें हरकत कां घ्यावी ? ते इकडे आल्यावर त्यांच्या तशा चळवळींना सहजच मर्यादा व बंधन पडेल." पण होममेंबर गंभीर स्वरानें मला म्हणाले, "केळकर, तुम्ही या भानगडींत न पडाल तर बरें ! कारण तुम्ही ज्यांना पासपोर्ट मिळावे असें इच्छितां त्यांतले कांहीं सरकारचे मोठे गुन्हेगार असून, ते हिंदुस्थानांत आले तर त्यांना जन्मभर तुरुंगवास किंवा फांशीची शिक्षा भोगावी लागेल. मग ते आज आहेत तेथेंच ठीक आहेत कीं !" यावर मी त्यांना प्रथम हद्दपार झालेल्या पण शेवटीं परत स्वदेशीं येण्यास सांपडलेल्या कांहीं युरोपियन तरुण देशभक्तांचीं उदाहरणें सांगितलीं. त्यावर ते म्हणाले, "होय. असेंहि घडूं शकतें, पण येथें ती वेळ अजून यावयाची आहे." आणि स्वतः सावर-करांच्या उदाहरणानें हें आतां दिसलेंच कीं ! सर्व जन्म बंदिवासांत जाईल, व कदाचित् तुरुंगांतच मृत्यु येईल, अशी निराशाजनक मनःस्थिति असतांहि, सावरकर हे सर्व तऱ्हेचे बंदिवास भोगून निभावून परत आले, मोकळे झाले, व आज उघड व उजळ माथ्यानें देशांतील एका प्रमुख पक्षाचे पुढारी म्हणून ते विधायक राजकारण करीत आहेत ! आजचे सावरकर डोळ्यांपुढें दिसणाऱ्या एखाद्या अजाण मनुष्याला सावरकरांचें पूर्वचरित्र सांगितलें तर त्याचा कदाचित् विश्वासहि बसणार नाहीं. परंतु आज सामान्य दिसणाऱ्या सावरकरांनीं, असामान्य हा शेरा लिहावा लागण्यासारख्याच गोष्टी, पूर्वचरित्रांत केल्या आहेत. आणि म्हणूनच कोणा एकाद्या प्रसंगीं विवेकबुद्धीनें त्यांना 'देशभक्त' व 'स्वातंत्र्यवीर' हें विशेषण लावलें तर तें मात्र सार्थ व समर्थनीय होईल, असें मी निश्चयानें म्हणतों.

सावरकरांच्या एकसष्टाव्या वाढदिवसाचे एक दोन समारंभ पुण्या-मुंबई सारख्या ठिकाणीं होतील व ते हजारों लोक पाहतील. पण करंदीकरांनीं लिहिलेलें हें सावरकर-चरित्र जो वाचील त्याला, त्याच्या नुसत्या वाचनानेंच, आपण त्या तशा

तरुण मुलें त्यांचें पुढारीपण मान्य करीत होतीं आणि त्यांच्यासंबंधीं नुसती आदरबुद्धि नव्हे तर प्रेमाचा जिव्हाळा प्रकट करीत होतीं असेंच दिसून येतें. जॅक्सनचा खून न होतां सावरकर हिंदुस्थानात सुखरूप परत येते, व त्यांना बॅरिस्टरी-वकिली करण्याची परवानगी मिळती, तर त्यांचें पुढील चरित्र काय झालें असतें असा प्रश्न एकाद्याला सहज सुचणारा आहे. पण त्याचीं उत्तरें अनेक होतील व त्यांना केवळ मनाच्या कल्पना याखेरीज अधिक महत्त्व देतां येत नाहीं. परंतु मला वाटतें कीं, हिंदुस्थानांत आल्यावर प्रथम धोका उत्पन्न झाला असता, म्हणून लोकमान्य टिळकांचें उदाहरण डोळ्यापुढें ठेवून मर्यादा संभाळीत प्रगतिपर मार्ग कसा काढावा या मार्गाचें संशोधन त्यांनीं करून पाहिलें असतें. पण तें त्यांना न साधतां त्यांच्यावर राजद्रोहाचे खटले होऊन पं. जवाहिरलालप्रमाणें त्यांना वारंवार तुरुंगांत जावें लागलें असतें. तथापि आज प्रत्यक्ष बंड करण्याची कल्पना किती अव्यवहार्य आहे हें लक्षांत आल्यानें, त्यांनीं बोलण्यांत शिवरामपंत परांजप्यांची भाषा व प्रत्यक्ष कृतींत टिळकांचें मुत्सद्दीपणाचें धोरण यांचा मेळ चातुर्यानें घातला असता. कारण आज तीव्र भावना बोलून दाखवितांनाहि ते असे सयुक्तिक बोलतात कीं, थंड डोक्याच्या नामदार शास्त्री यांच्यासारख्या चिकित्सकालाहि त्यांत आक्षेपाची काडीहि शिरकवितां येत नाहीं.

प्रस्तुत सावरकर–चरित्र मतप्रसाराचा ग्रंथ नाहीं, तर केवळ इतिहास आहे हें वर दर्शविलें आहेच. आणि हा ग्रंथ इतिहासाच्या दृष्टीनें वाचणाराच्या मनांत, तो बहुश्रुत असेल तर, जगाचा इतिहास त्याच्या डोळ्यांपुढें उभा राहिल्याशिवाय राहणार नाहीं. तो हेंच सांगेल कीं, ज्या ज्या देशांत पूर्वी परकीय अधिकाऱ्यांविरुद्ध बंडें झालीं, किंवा स्वदेशीच पण एकतंत्री राजसत्ता नाहींशी होऊन राज्यक्रांत्या झाल्या, त्यांतील देशभक्तवृत्तीच्या तरुणांनीं सावरकरांसारखेच उद्योग केले. त्यांतले कांहीं स्वदेशांतच राहून करतां आले ते केले व कांहीं हद्दपार झालेल्या स्थितींत परदेशींहि केले. खुद्द लंडन किंवा न्यूयॉर्क घेतलें तर, त्या शहरीं अशा निर्वासित तरुण देशभक्तांनीं इंग्रज व अमेरिकन सहानुभूतीच्या पंखाखालीं राहून स्वदेशस्वातंत्र्याचे उद्योग कसे केले हें पाहिलें म्हणजे सावरकरांनीं जगाचीच एक रीत अनुसरली, पण स्वदेशांतील इतर तरुणांच्या दृष्टीनें मात्र असामान्य व अद्‌भुत असेंच कांहीं केलें, असें म्हणावें लागतें. मित्रराष्ट्रांनीं परस्परांच्या बंडखोरांना आश्रय द्यावा कीं देऊं नये या प्रश्नाचें उत्तर आंतरराष्ट्रीय कायदा जो देतो, त्याच्याविरुद्ध उत्तर मनुष्यस्वभाव देतो. या स्वभावाला अनुसरूनच लंडन शहरानें पूर्वकाळीं इतर सर्व देशांच्या बंडखोरांना निवारा व आश्रय दिला. आणि या गोष्टीचा इंग्रज व अमेरिकन लोक मोठा अभिमानहि बाळगतात. लंडननें मॅझिनी, गॅरिबाल्डी, लुई कोसूथ, ब्लँक अशा परदेशी बंडवाल्यांनाच काय पण पळपुट्या अशा राजांनाहि आश्रय दिला आणि त्या मानसिक औदार्याचें भूषण मानलें ! न्यूयॉर्क शहरांत एकाच वेळीं निर्वासित देशभक्त गॅरिबाल्डी हा मेणबत्त्या

करीत होता; लेड्रू रॉलिन हा बंदरावर हमाली करी; लुई ब्लँक हा नृत्याचे धडे देई; फेलिक्स पिॲट हा नाटकाचे पडदे उचलून उदरनिर्वाह करी; ला मार्टिन हा भिक्षा मागे. एक फ्रेंच तरुण रस्त्यांतून भाजी विकी आणि एका जर्मन देशभक्तानें शेव्हिंग सलून—न्हाव्याचें दुकान--काढले होतें. पण लंडन हें मुंबईप्रमाणें ब्रिटिश साम्राज्यांतच असल्यामुळें, तेथें सावरकर, पंडित शामजी, कामाबाई अशांना थारा-निवारा कसा मिळणार ? म्हणून त्यांना तो पॅरिसमध्यें फ्रेंच लोकांकडून मिळवावा लागला. आणि अशी कल्पना करतां येते कीं, हिंदुस्थानला परत येणें अशक्य झाल्यामुळें कदाचित् सावरकर हेहि पॅरिसमध्यें राहून क्रांतिकारक उद्योग करीत जन्म घालविते ! कारण, स्वदेशीं परत येऊन फांसावर लटकणें किंवा जन्मभर तुरुंगवास पत्करणें यापेक्षां देशकार्यार्थ खुषीची हद्दपारी स्वीकारलेली काय वाईट ? असें तारतम्य पटणें शक्य आहे. मला आठवतें कीं, मी मध्यवर्ती विधिमंडळांत असतां अशा कांहीं निर्वासितां-तर्फे होममेंबरकडे खासगी विचारणा केली, व म्हणालों कीं, "या लोकांना जर स्वदेशीं परत यावयाचें आहे तर त्यांना पासपोर्ट मिळण्याला सरकारनें हरकत कां घ्यावी ? ते इकडे आल्यावर त्यांच्या तशा चळवळींना सहजच मर्यादा व बंधन पडेल." पण होममेंबर गंभीर स्वरानें मला म्हणाले, "केळकर, तुम्ही या भानगडींत न पडाल तर बरें ! कारण तुम्ही ज्यांना पासपोर्ट मिळावे असें इच्छितां त्यांतले कांहीं सरकारचे मोठे गुन्हेगार असून, ते हिंदुस्थानांत आले तर त्यांना जन्मभर तुरुंगवास किंवा फांशीची शिक्षा भोगावी लागेल. मग ते आज आहेत तेथेंच ठीक आहेत कीं !" यावर मी त्यांना प्रथम हद्दपार झालेल्या पण शेवटीं परत स्वदेशीं येण्यास सांपडलेल्या कांहीं युरोपियन तरुण देशभक्तांचीं उदाहरणें सांगितलीं. त्यावर ते म्हणाले, "होय. असेंहि घडूं शकतें, पण येथें ती वेळ अजून यावयाची आहे." आणि स्वतः सावर-करांच्या उदाहरणानें हें आतां दिसलेंच कीं ! सर्व जन्म बंदिवासांत जाईल, व कदाचित् तुरुंगांतच मृत्यु येईल, अशी निराशाजनक मनःस्थिति असतांहि, सावरकर हे सर्व तऱ्हेचे बंदिवास भोगून निभावून परत आले, मोकळे झाले, व आज उघड व उजळ माथ्यानें देशांतील एका प्रमुख पक्षाचे पुढारी म्हणून ते विधायक राजकारण करीत आहेत ! आजचे सावरकर डोळ्यांपुढें दिसणाऱ्या एखाद्या अजाण मनुष्याला सावरकरांचें पूर्वचरित्र सांगितलें तर त्याचा कदाचित् विश्वासहि बसणार नाहीं. परंतु आज सामान्य दिसणाऱ्या सावरकरांनीं, असामान्य हा शेरा लिहावा लागण्यासारख्याच गोष्टी, पूर्वचरित्रांत केल्या आहेत. आणि म्हणूनच कोणा एकाद्या प्रसंगीं विवेकबुद्धीनें त्यांना 'देशभक्त' व 'स्वातंत्र्यवीर' हें विशेषण लावलें तर तें मात्र सार्थ व समर्थनीय होईल, असें मी निश्चयानें म्हणतों.

सावरकरांच्या एकसष्टाव्या वाढदिवसाचे एक दोन समारंभ पुण्या-मुंबई सारख्या ठिकाणीं होतील व ते हजारों लोक पाहतील. पण करंदीकरांनीं लिहिलेलें हें सावरकर-चरित्र जो वाचील त्याला, त्याच्या नुसत्या वाचनानेंच, आपण त्या तशा

एकाद्या समारंभांतील आनंदापेक्षां अधिक आनंद सेवन करीत आहों, असें वाटल्याशिवाय राहणार नाहीं. कारण मीं प्रारंभीं सांगितल्याप्रमाणें, पानामागून पान वाचतांना, सावरकरांचें वैशिष्ट्य काय हें त्याला या पुस्तकामुळें साधार प्रतीत होत जाईल. कांहीं विशिष्ट प्रकारची मान्यता पावलेल्या लोकांच्या एकसष्टीचा समारंभ करून ती मान्यता व्यक्त करणें व त्यांना आयुरारोग्य चिंतणें ही गोष्ट आतां नित्यक्रमाची होऊन बसलेली आहे व ती सर्वथा योग्यहि आहे. कारण आपणाला कोण किती कसे कशाकरितां मान देतात हें म्हातारपणीं मनुष्याला कळणें हें समाधान देणारेंच आहे! तथापि इतर अनेक एकसष्टी व सावरकरांची एकसष्टी यांत फार मोठा फरक आहे असें मी तरी मानतों. कारण सावरकरांना वयाच्या एकसष्टाव्या वर्षापर्यंत आयुष्य लाभणें ही गोष्ट स्वतः त्यांची त्यांना, व त्यांचें चरित्र माहित असणाऱ्या इतरांना, केवळ कल्पनातीत होय असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. हें जें आयुष्य त्यांना लाभलें तें मृत्यूला चुकवून फसवून बगल देऊन लाभलें असें नसून, मृत्यूला सामोरें होऊन, धडक देऊन, झुंज घेऊन, मागें हटवून मिळविलेलें आहे. अकल्पित रीतीनें मृत्यूचा घाला पडणें हें निराळें. आणि आपल्या जाणत्या कृत्यांचा परिणाम म्हणून तो येण्याचा संभव दिसत असता, आपण अंगीकारलेलें देशसेवेचें व्रत न सोडतां, वज्रमुष्टीच्या खेळांतल्याप्रमाणें, मृत्यूशीं हात करीत राहणें व त्यावर विजय मिळविणें हें निराळें.

१९०५ पासून १९२० पर्यंत सावरकर व मृत्यु हे केव्हांहि समोरासमोर ठाकून उभे नव्हते असें झालें नाहीं. इंग्लंडांत, मार्सेलिसच्या बंदरांत, अंदमानाच्या कारागृहांत त्या दोघांचा डोळा एकमेकांवर भिडून राहिलेला होता. लो. टिळक हे एरवीं तापट असतां तुरुंगांतील त्यांची वागणूक नेहमीं शिस्त व कायदा संभाळणारी, शांतताप्रधान, व केवळ स्थितप्रज्ञासारखी होती असें सांगत. यामुळें आकस्मिक रीतीनें त्यांना मृत्यू येईल अशी भीति त्यांच्या मित्रांना कधीं वाटली नाहीं. शिवाय १९०८ ते १९१४ या अवधींत तरी टिळकांचें बंदिवासी जीवन अंदमानांतील बंदिवासी जीवनासारखें सश्रम व भयंकर नव्हतें. लोक आपल्या ठिकाणीं टिळकांच्या तुरुंगवासाचीं वर्षें मोजीत होते, पण ती गणना निश्चित संपणार व टिळक परत येणार असा एक प्रकारचा विश्वास जनतेला धीरावीत होता. दुर्दैवानें सावरकरांच्या वांट्याला त्याहिपेक्षां खडतर तपश्चर्या आली खरी. आधीं विलायतेंतल्या उत्शृंखल चळवळींतहि कदाचित् त्यांना मृत्यू यावयाचा. मार्सेलिसच्या बंदरांत पोहत असतां सावरकरांवर झाडल्या गेलेल्या गोळया हे तितके अपमृत्यूच नव्हते काय? आणि अंदमानांतील बंदिवासाची रोमांचकारक व दुःखद कहाणी वाचीत असतां तर सावरकर हे दुःसह शरीरकष्टानें-आजारानें, सरकारी पहारेवाल्या पठाणांच्या किंवा गोऱ्या बारी साहेबाच्या चाबकाच्या आघातांनीं कसे मरण पावले नाहींत याचेंच आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं. येवढेंच काय, पण मृत्यूनें दुर्लक्ष केलें असतां, स्वतःच आत्म-

हत्या करण्याचे विचार सावरकरांच्या मनांत एक दोनदां येऊन गेले होते असें तेच लिहितात. बरें, शिक्षेची मुदत तरी किती! अनेक अपराधांची संकलित शिक्षा म्हणून पन्नास वर्षांचें काळेंपाणी, म्हणजे ती पुरी भोगण्याला सावरकरांना एक जन्महि पुरावयाचा नाहीं! बंदिवासांतलि त्यांची वागणूकहि नमतें न घेणारी पूर्ण स्वाभिमानी! उत्तरास प्रत्युत्तर देऊन आत्मसमर्थन करण्याला ते तयार; सोबत्या बंदिवानांची कड घेण्याला व त्याकरितां पहारेवाल्यांशीं भांडण्याला ते तयार; संप करण्या–करविण्याला ते तयार; कांटेरी पिंजऱ्यांतला पक्षी पिंजऱ्याला धडक देणाऱ्या स्वभावाचा भेटला तर त्याचें अंग नित्य किती रक्तबंबाळ होऊं शकेल याची कल्पना तुम्हांआम्हाला करितां येतेच कीं नाहीं! तात्पर्य या सर्व प्रतिकूल गोष्टी लक्षांत घेतल्या तर सावरकरांना साठ वर्षें कशीं पुरीं करतां आलीं याचें नवल वाटल्याशिवाय राहत नाहीं.

१९३२ सालीं माझ्या एकसष्टीचा समारंभ झाला त्याला टाईपरायटरवरील घंटेची उपमा मी दिली होती. ती माझ्या जीवनक्रमाला योग्य अशीच होती. कारण स्वतंत्र जीवन भोगीत असतां, मी शक्य तितके नित्य नियम, स्वकर्म व्यवस्थितपणें करीत होतों. टाईपरायटरवरच्या ओळीच्या टोंकापर्यंत सरळ बिनधोक पोंचलों होतों. म्हणून जीवनाच्या टाईपरायटरवरील माझ्या उद्योगी श्रमसोशिक पण सुखी व आनंदी जीवनाशीं सुरेल असाच ध्वनि तिजवरील घंटा काढीत आहे, फार तर पुढील थोड्या आयुष्याविषयीं सावधगिरीची सूचना देत आहे, अशी उपमा मला सुचली. पण सावरकरांच्या एकसष्टीच्या समारंभाला मला निराळीच उपमा सुचते ती अशी :—

"परकीय सत्तेचा पाडाव करण्याच्या मोहिमेवर अनेक तरुण समानशील देशभक्त अरण्यांतून वाट चालत निघाले आहेत. त्यांतील कांहीं सत्त्वस्थ व्यक्ति नाकासमोर पाहून मार्ग आक्रमीत आहेत. कांहीं बाजूच्या झाडांवर फळें फुलें दिसतात त्यांच्या लोभानें थांबताहेत, व तीं काढून घेतल्यावर फुलांचा सुगंध घेत घेत व फळें खात खात, मात्र किंचित् गति वाढवून, पुढें गेलेल्यांना जाऊन मिळत आहेत. कांहींजण अधिक परोपकारी, ते हातांतील छडी-काठीनें वाटेवरील कांटेरी झाडें झुडपें झोडीत मागून येणारांना सुखाची वाट करून देत आहेत. पण त्यांतला एक सैनिक शिकारीचा शोकिन असल्यामुळें स्वच्छंदी वृत्तीनें एका गुहेच्या तोंडांत शिरला. तो दिवसभर अदृश्यच झाला. इतरांनींहि तो वाट चुकला असें समजून त्याची आशा सोडली. पण सर्व दिवसभर या गुहेंतून वाट चालत असतां संध्याकाळच्या सुमाराला त्या गुहेच्या तोंडांतून येणारा प्रकाश त्याला दिसला, आणि बाजूनें चालत जाणाऱ्या त्याच्या सोबत्यांची चाहूलहि त्याला लागली. तेव्हां तो धीट तरुण खोल गंभीर अशा गुहेंतून गर्जून हांक मारून मोठ्यानें शीळ घालून 'मला वाट सांपडली रे गड्यानों! मी आलों!' असें त्यांना कळवीत आहे."

सावरकरांच्या एकसष्टीच्या समारंभांत ते जें भाषण करतील तें या खोल अंधाऱ्या गुहेंतून घुमवून मारलेल्या हांकेसारखें त्यांच्या सहकाऱ्यांना आनंददायक

ठरेल ! सावरकर हे माझ्यासारखे लोकांच्या डोळ्यांसमोर बसून कर्तव्यनिष्ठेनें टाईपरायटरवर लिहीत नव्हते तर अंधाऱ्या गुहेंतून मार्ग आक्रमण करीत होते. म्हणून बाहेर पडले ते जखमी घायाळ रक्ताचे ओघळ जाणार, पण आनंदी व पूर्वीसारखेच तडफदार, असे लोकांना दिसत आहेत. दोन जन्मांनीं भोगून न संपणाऱ्या काळे पाण्यांतून वांचून आले म्हणून सावरकरांच्या जन्माला साठ दुणे एकशेंवीस वर्षे झालीं असा चुकीचा हिशेब कोणाला सुचेल पण १९०९ ते १९२१ हीं बारा वर्षे वजा घालतां त्यांचें आयुष्य आज अठ्ठेचाळीस वर्षेच आहे. आजचे समारंभ हा फक्त पुढची वानगी आहे. त्यांची खरी एकसष्टी आपण १९५५ सालीं करूं —असा हिशेब हाच माझ्या मतें अधिक बरोबर ठरेल. ती पुढची खरी एक-सष्टी करण्या-स्वीकारण्याइतकें तरी दीर्घायुष्य व आयुरारोग्य सावरकरांना लाभावें अशी प्रार्थनारूप मागणी आपणाला ईश्वरापाशीं हक्कानें करतां येईल! आणि ती करून मी ही प्रस्तावना संपवितों.

पुणें, दिनांक<br>१ मे, १९४३.

न. चिं. केळकर

# लेखकाचें हृद्गत

सावरकर-चरित्र हें पुस्तक पुरें होऊन तें ग्राहकांच्या नि वाचकांच्या स्वाधीन करण्याचा योग आज साधत असल्यामुळें मला समाधान वाटत आहे. समाधानाचें कारण असें कीं, जो संकल्प सुमारें दीड-दोन वर्षांपूर्वी मनांत उद्भवला तो आज परमेश्वराच्या कृपेनें यथापरिस्थिति सफल झाला. या समाधानांत अहंकर्तृत्वाचा अंश लवमात्रहि नसल्यामुळें, मी संकल्प 'सिद्ध झाला' अशी भाषा वापरली आहे. बरेच दिवसपर्यंत चालून सिद्ध होणारें कोणतेंहि काम कोणाहि एका व्यक्तीच्या कर्तृत्वानें सिद्ध होत नाहीं; अनेकांच्या चित्तांत वसत असलेला सदिच्छारूपी परमेश्वर त्या कार्याला साहाय्य करतो म्हणूनच तें कार्य सिद्ध होतें, अशी माझी दृढ समजूत आहे. प्रस्तुत चरित्र-लेखन-कार्यहि याच श्रद्धेमुळें पार पडलें असल्याकारणानें, मी प्रथम त्या सदिच्छारूपी परमेश्वराला वंदन करतों.

१९३७ मे ते १९३९ डिसेंबर या अवधींत सावरकरांना भेटून त्यांच्याशीं कांहीं प्रश्नांसंबंधीं चर्चा करण्याचे प्रसंग मला लाभले. 'लाभले' याचा अर्थ असा कीं, बाजूला रहाण्याची सध्यांची प्रवृत्ति त्या वेळीं माझ्या वृत्तींत नसल्यामुळें, असे प्रसंग निर्माण करून, मी कांहीं प्रश्नांविषयीं चर्चा सुरू केली व सावरकरांचीं त्या प्रश्नांसंबंधींचीं मतें समजून घेण्याचा प्रयत्न केला. सावरकरांचें पूर्व चरित्र व त्यांची राजकारणी विचारसरणी याचा या अवधींत जो अल्पस्वल्प परिचय घडला, त्यामुळें सावरकर-चरित्र लिहिण्याचा विचार त्या काळांतच, अगदीं अस्फुट स्वरूपांत का होईना, मनांत उद्भवूं लागला, असें म्हणावयाला हरकत नाहीं.

१९३९ च्या शेवटीं मी 'त्रिकाळ' पत्र बंद केलें तेव्हां दैनिक वृत्तपत्राच्या व्यापांतून मला अनेक वर्षें मुक्त रहावें लागेल, अशी माझी कल्पना नव्हती. १९४० च्या सप्टेंबर महिन्याच्या सुमारास 'काळ' पत्र फिरून चालवायला घ्यावें, असा विचार मनांत येऊन मी त्या दिशेनें कांहीं वाटाघाटी केल्या. त्या वाटाघाटी कां फसल्या हें या ठिकाणीं सांगण्याचें कारण नाहीं. १९४१ सालीं ऑगस्ट महिन्याच्या आरंभीं 'त्रिकाळ' पत्र पुनरुज्जीवित करण्याचा संकल्प मी लोकांपुढें मांडला. दि. २८ मे १९४३ रोजीं सावरकरांचा ६१ वा वाढदिवस साजरा होईल; त्याच्या एक वर्ष आधीं दैनिक 'त्रिकाळ' पत्र मुंबईस सुरू करावें, अशी कल्पना त्या वेळीं माझ्या मनांत वावरत होती. पण, ही कल्पना लोकांपुढें मांडल्यावर दोन–तीन महिन्यांच्या अवधींतच चालू महायुद्धाचें स्वरूप पार पालटून गेलें; आणि, दैनिक पत्र सुरू करण्याचा संकल्प आतां कांहीं वर्षें तरी सिद्ध होत नाहीं, हें मला स्पष्ट-पणें दिसूं लागलें.

केवळ निष्क्रियतेंत काळ घालवून चालणार नाहीं, हेंहि मला दिसत होतें. या सुमारास महाराष्ट्रांत हिंदु राष्ट्रीय निधि सुरू झालेला होता आणि त्या निधींतून हिंदुमहासभेच्या कार्यासाठीं पगारी प्रचारकहि नेमले जाऊं लागले होते. या प्रचारक-वर्गांत दाखल होण्याचें मी मनांत आणलें असतें तर या निष्क्रियतेच्या संकटांतून माझी मुक्तता होऊं शकली असती. एकाद्या संस्थेचा प्रचार करणारा इसम निर्वेतन काम करतो कीं सवेतन काम करतो ही गोष्ट माझ्या मतें अगदीं गौण आहे. तो काम आस्थेवाईकपणानें नि प्रामाणिकपणें करतो कीं नाहीं, हा मुद्दा महत्त्वाचा मानला जावा, असें मला वाटतें. पण, सर्वांचीच वृत्ति अशी असूं शकत नाहीं. पगारी प्रचारक व त्याचें जिणें हें काय मोलाचें आहे हें पूर्वी एकवार मी अनुभविलें होतें आणि त्या अनुभवाचा कडवटपणा माझ्या जिभेनें कधींहि विसरूं नये, असाच तो अनुभव होता. त्यामुळें, पगारी प्रचारक बनण्याचा मार्ग माझ्या दृष्टीनें वर्ज्यच होता. हिंदुमहासभेच्या कार्यासाठीं पगारी प्रचारक नेमण्याची पद्धत सुरू झाल्यामुळें, आणि पगारी प्रचारकांचा वर्ग निर्माण झाल्यावर, माझ्यासारखा निष्कांचन मनुष्य निर्वेतन काम करतो ही गोष्ट सामान्यबुद्धीला व तर्काला पटणारी नसल्यामुळें, हिंदुमहा-सभेच्या प्रचाराचें काम निर्वेतन करणेंहि मला अशक्य होऊन बसलें. या सक्तीच्या निष्क्रियतेतून मुक्त कसें व्हावें, हा प्रश्न माझ्या मनांत जोरजोरानें घोळूं लागला.

हिंदुमहासभेच्या कार्याला पोषक असेंच कांहीं लिहिण्यांत हा वेळ घालवावा असा विचार मनांत आला नि मी प्रथम 'पाकिस्तानचें संकट' हें पुस्तक लिहि-ण्याला प्रवृत्त झालों. १९४१ च्या सप्टेंबर-ऑक्टोबरमध्यें मी या पुस्तकाच्या लेखनाला प्रत्यक्ष प्रारंभ केला; त्यापूर्वींच, सावरकर-चरित्र लिहिण्याचा उद्योग हातीं घ्यावा हा विचार माझ्या मनांत बळावूं लागला होता व त्या दिशेनें मी कांहीं पुस्तकें वाचलीं होतीं व कांहीं साधनेंहि गोळा केलीं होतीं. १९४१ च्या डिसेंबरांत 'पाकिस्तानचें संकट' संकल्पित वेळांत प्रसिद्ध झाल्यामुळें, मला पुढील उद्योगाविषयीं उत्साह वाटूं लागला. म. म. पांडुरंग वामन काणे, प्रा. द. के. केळकर, मुंबईचे माजी अर्थमंत्री श्री. लठ्ठे, जनरल नानासाहेब शिंदे अशा विविध मतांच्या चिकित्सक लोकांकडून या पुस्तकाबद्दल जीं मतें व्यक्त करण्यांत आलीं तीं प्रोत्साहक ठरलीं. सावरकर-चरित्राचा उद्योग आपण हातीं घेतला तर तो प्रकार 'पायरीला पाय लावण्याच्या' पद्धतीचा ठरणार नाहीं, असें मला याच अभिप्रायांमुळें वाटूं लागलें; आणि १९४२ च्या फेब्रुवारी महिन्यांत चरित्रलेखनाचा उद्योग सुरू करण्याचें मी मनानें ठरविलें.

पण, वर्षसव्वावर्षपर्यंत हा उद्योग करावयाचा तर, त्याला निर्वेधपणा लाभावा, यासाठीं कांहीं आर्थिक योजना आंखणें अवश्य होतें. 'त्रिकाळ' फिरून सुरू करावयाचा ही कल्पना मनांत घोळूं लागतांच, मी कांहीं मित्रांना भेटून, त्या योजनेसाठीं 'नैतिक ऋण' म्हणून कांहीं रक्कम गोळा केली होती. या मित्रांपैकीं

बहुतेकांच्या संमतीनें ती रक्कम चरित्रलेखनाच्या काळांत स्वतःच्या योगक्षेमासाठीं खर्चावयाची असें ठरवून मी त्या उद्योगाकडे वळलों. एका दृष्टीनें हे सद्गृहस्थ आपल्या पैशांवर पाणी सोडण्याला तयार झाले; कारण, पुस्तक प्रकाशितच झालें नाहीं अगर प्रकाशित होऊनहि तें लाभकारक ठरलें नाहीं तर, त्यांचा पैसा क्वचित् परत मिळूं शकणार नाहीं, हें त्यांना माहीत होतें. या चरित्रलेखनाच्या कार्यांत ज्यांच्या निर्व्याज प्रोत्साहनाचा मला अत्यंत कृतज्ञतापूर्वक निर्देश केला पाहिजे, त्यांत हे सर्व सद्गृहस्थ आहेत. सरासरी दीड हजार रुपयांचें हें पाथेय आपल्यापाशीं आहे; तेवढ्यावर आपण वर्षसव्वावर्ष चालणारा हा प्रवास पुरा करूं, अशा विश्वासानें मी १९४२ च्या फेब्रुवारी महिन्यांत या चरित्र-लेखनाच्या उद्योगांतील पाहिलें निश्चित पाऊल पुढें टाकलें.

हें काम सुरू केल्यापासून आजतागायत मी जे उद्योग केले त्या सर्वांचें वर्णन मी विस्तारभयास्तव करीत नाहीं. अशा चरित्र-लेखनाची जुळणी कसकशी होत जाते हें सामान्य वाचकाला समजण्याच्या दृष्टीनें हें वर्णन उपयुक्त ठरेल असा विश्वास वाटत असूनहि, तें वर्णन वगळणेंच मला अवश्य वाटतें. कारण, तें वर्णन लिहावयाचें तर तें संक्षेपानें लिहितां येणार नाहीं; आणि, तें विस्तारानें लिहावयाचें तर पुष्कळच जागा अडेल. म्हणून मी इतकेंच सांगतों कीं, हें काम करीत असतांना, साधनें मिळविण्याच्या दृष्टीनें मी बरेच कष्ट केले आहेत, पुष्कळ व्यक्तींना भेटलों आहें, कित्येक ठिकाणीं जाऊन माहिती गोळा केली आहे, आणि कित्येक वृत्तपत्रांच्या जुन्या फाइली चाळल्या आहेत. मी केलेल्या या उद्योगाच्या खुणा चरित्र वाचीत असतांना वाचकांना आपोआपच आढळतील.

मी हें चरित्र लिहिण्याला प्रवृत्त झालों तो जिज्ञासू वृत्तीनें, अभ्यासूपणाच्या भूमिकेवरून प्रवृत्त झालों. एखाद्या परीक्षेसाठीं Thesis लिहितांना खरा विद्यार्थी ज्या पद्धतीचा अवलंब करील त्या पद्धतीचाच अवलंब या चरित्रांत मी केला आहे. अशा दृष्टीनें पाहिलें तर, आज प्रसिद्ध होत असलेलें हें चरित्र 'साधन-ग्रंथा'च्या स्वरूपाचें आहे. यामुळेंच, मी या ग्रंथाला 'सावरकर-चरित्र: कथन' असें नांव दिलें आहे. यापुढें केव्हां तरी हाच उद्योग पुढें चालवून मी जें दुसरें पुस्तक लिहिणार आहें त्याचें नांव 'सावरकर-चरित्र : विवेचन' हें असेल. या ग्रंथांत सावरकर-चरित्राच्या १९२४ पर्यंतच्या विभागाचें वर्णन ज्या पद्धतीनें करण्यांत आलें आहे त्याच पद्धतीनें सावरकर-चरित्रांतील उरलेल्या विभागाचें वर्णन त्या पुस्तकांत प्रथम करण्यांत येईल आणि त्या पुस्तकाच्या उरलेल्या भागांत सावरकरांची विविध कार्य-क्षेत्रांतील योग्यता विवेचक पद्धतीनें सांगण्यांत येईल. 'कवि सावरकर', 'सावरकर आणि इतिहासलेखन', 'सावरकरांचीं नाटकें', 'सावरकरांचें राजकारण' अशीं प्रकरणें त्या पुस्तकांत समाविष्ट करण्यांत येतील. सावरकरांच्या ६१ व्या जन्मदिनाचें टिपण साधून मी हा ग्रंथ प्रकाशित करीत आहें हें खरें असलें तरी, त्या ग्रंथावरून

ज्यांना कांहीं निष्कर्ष काढावयाचे असतील त्यांनीं ते आजच काढूं नयेत, अशी माझी सर्वांना विनंति आहे. परिस्थितीकडे पाहून, पुढील संकल्पित ग्रंथहि मी शक्य तितक्या लवकर प्रसिद्ध करीन. तो पुरा झाल्यावर, या एकंदर ग्रंथाविषयीं वाचकांनीं काय तीं अनुमानें बसवावीं.

आज प्रसिद्ध होत असलेल्या या ग्रंथाचें स्वरूप अशा प्रकारचें आहे. आपण स्वतःला सावरकरांच्या राजकीय मतांचे अनुयायी म्हणवितों; पण, आपल्याला सावरकर खऱ्या अर्थानें समजलेले नाहींत असें मनोमन वाटूं लागल्यामुळें, सावरकर खरोखर आहेत तरी काय हें समजून घेण्याच्या जिज्ञासाबुद्धीनें प्रेरित होऊन, मी जी माहिती गोळा केली ती माहिती केवळ ऐतिहासिक माहिती म्हणून मी आज प्रसिद्ध करीत आहें. ती प्रसिद्ध करण्याचा हेतु असा कीं, सावरकरांचे टीकाकार व त्यांचे अनुयायी या दोघांनींहि टीका करतांना व अनुयायित्व करतांना डोळसपणानें वागावें. या डोळसपणाची वाढ व्हावी या बुद्धीनें, संकलित माहिती प्रसिद्ध करण्याला मी प्रवृत्त झालों आहें. सावरकरांनीं अगर त्यांच्या पूर्वसहकाऱ्यांनीं केलेल्या कोणत्याहि गोष्टीचें समर्थन, पुरस्कार अगर प्रचार करण्याचा हेतु या पुस्तकाच्या प्रकाशनांत नाहीं.

आणि, ज्यांना माझ्या स्वभावाची ओळख आहे त्यांना हें सहज मान्य होईल कीं, मी हें पुस्तक कोणत्याहि गोष्टीचा प्रचार करण्यासाठीं लिहिलेलें नाहीं. माझ्या स्वतःच्या हातून जी गोष्ट होऊं शकेल तेवढ्याच गोष्टीचा प्रचार करणें मला साधतें, जी गोष्ट माझ्या आहाराबाहेरची आहे ती करण्याला इतरांना प्रोत्साहन देणें मला साधत नाहीं. हिंदुमहासभेचा निजामविरोधी लढा चालू होता त्या वेळीं निजाम-हद्दींत जाऊन निःशस्त्र प्रतिकार करावा, असा प्रचार मी करीत होतों. याचें कारण असें होतें कीं, आपण स्वतः त्या निःशस्त्र प्रतिकारांत सामील होऊं शकूं असा विश्वास मला वाटत होता व त्या दिशेनें मी तयारी करीत होतों. पण, 'त्रिकाळ' कार्यालयांतील तुटपुंजें मनुष्यबळ अनपेक्षित रीतीनें कमी झालें व मला त्या निःशस्त्र प्रतिकारांत भाग घेतां आला नाहीं. या निःशस्त्र प्रतिकाराला आपण इतरांना प्रवृत्त केलें व कोणत्याहि कारणानें का होईना, आपण मात्र त्यांत भाग घेतला नाहीं, ही रुखरुख अद्यापहि माझ्या मनांतून नाहींशी झालेली नाहीं ! जें लोकांना करावयाला सांगावयाचें तें करण्याची तयारी स्वतः आपण अगोदर केली पाहिजे, ही माझी विचारसरणी आणखीहि एका महत्त्वाच्या प्रसंगीं सिद्ध झालेली आहे. १९४० सालीं मुंबईच्या 'टाइम्स' पत्रानें महाराष्ट्रांतील सैन्यभरतीबद्दल एक लेख लिहिला. त्या लेखांतील विचारपरंपरा साफ चुकीची असल्यामुळें—आणि त्या विचारपरंपरेचें खंडन केलें नाहीं तर महाराष्ट्रांतील क्षात्रवृत्तीला अन्याय होईल असें मला वाटल्यामुळें—स्वातंत्र्यवीर सावरकर यांच्या संमतीनें मी मुंबईचे गव्हर्नर सर रॉजर लमूले यांना भेटलों होतों. मराठ्यांच्या सैन्यभरतीबद्दल बोलतांना मी त्यांना असें सांगितलें होतें कीं, लोकांच्या विश्वासाला पात्र ठरलेल्या माणसांच्या मदतीनें,

तरुणांना सैन्यांत दाखल होण्याची विनंति तुम्हीं कराल तर, महाराष्ट्रांतले हवे तितके तरुण सैन्यांत दाखल होतील. या चर्चेच्या प्रसंगीं मी गव्हर्नरसाहेबांना असें सांगितलें होतें कीं, 'लष्करांत शिरा' या माझ्या म्हणण्यावर लोकांचा विश्वास बसावा यासाठीं मी स्वतः प्रथम सैन्यांत दाखल होण्याला तयार आहें. हा प्रसंग मुद्दाम आठवून सांगण्याचें कारण असें कीं, कोणत्याहि गोष्टीचा प्रचार करावयाचा तर ती गोष्ट आचरणांत आणण्याला आपण स्वतः सिद्ध झालें पाहिजे, हें मी पूर्वीपासून जाणून आहें.

माझ्या ठिकाणीं ही भावना अगदीं स्थिर असल्यामुळें, 'पाकिस्तानचें संकट' हें पुस्तक लिहितांना, त्या पुस्तकाच्या शेवटच्या प्रकरणांत, सेनापति बापट यांच्या एका श्लोकांतून स्वतःला पेलेल असा एक अर्थ मी काढला आहे.

हजारोंचा तनुत्याग जुटाया देश हा व्हावा
हजारोंचा तनुत्याग सुटाया देश हा व्हावा

असें बजावणाऱ्या सेनापतींच्या मनांत 'तनुत्याग' शब्दाचा अर्थ कांहींहि असला तरी, हिंदु तरुणांनीं सद्यःकालीं या चरणांतून कोणता बोध काढावा हें सांगण्याच्या हेतूनें मी 'पाकिस्तानचें संकट' या पुस्तकाच्या पृष्ठ २२९ वर पुढील मजकूर लिहिला आहे :

*हिंदु समाजांतील दैन्य, दारिद्र्य, भोळेपणा, निराशा यांची हकालपट्टी व्हावयाची असेल तर, त्या कार्यांत अहर्निश झिजणारे आणि अशा रीतीनें झिजून तनुत्याग करणारे हजारों मिशनरी पुढें आले पाहिजेत.*

मी कोणत्या तऱ्हेच्या तनुत्यागाचा प्रचार करूं इच्छितों याचें दिग्दर्शन वरील मजकुरांत मी यापूर्वींच केलें आहे. प्रस्तुत पुस्तकाची 'अर्पण–पत्रिका' ही देखील माझ्या या विचारसरणीलाच पोषक आहे. आपल्या कुटुंबांतील कर्ते पुरुष देशसेवाव्रतांत गुंतल्यामुळें किंवा गुंगल्यामुळें ज्या हिंदु स्त्रियांना जीवन अत्यंत कष्टमय स्थितींत कंठावें लागलें त्यांचें हौतात्म्य मला विशेष आदरणीय वाटत असल्यामुळेंच अशा स्त्रियांच्या गौरवार्थ मीं प्रस्तुत पुस्तक कांहीं एका विशिष्ट पद्धतीनें अर्पण केलें आहे.

धिंग्रा, कान्हेरे, हरदयाळ वगैरे मंडळींनीं ज्या गोष्टी केल्या त्यांचें अंधानुकरण इतरांनीं करावें, असें सांगण्याला अवश्य असणारी अंधानुयायाची वृत्ति माझ्या अंगीं नाहीं, या माझ्या म्हणण्याला हा ग्रंथच उत्कृष्ट पुरावा आहे. मी सावरकरांचें चरित्र लिहिण्याला प्रवृत्त झालों, पण, त्या चरित्राच्या लेखनांत व मुद्रणांत मीं सावरकरी भाषा व सावरकरी लिपी वापरिली नाहीं. याचाच अर्थ असा कीं, सावरकरांची झाली तरी प्रत्येक गोष्ट अनुकरणीय व प्रचारार्ह आहे असें मी मानीत नाहीं. स्वतःच्या कर्तृत्वाचा, परिस्थितीचा, बुद्धीचा, मगदूर पाहून ज्यानें त्यानें काय तें करावें आणि अशा विवेकानंतर मनुष्य जें करतो तेवढेंच त्याला टिकवितां

येतें—'सांगितलेली बुद्धि आणि उसनी शिदोरी' पुरी पडूं शकत नाहीं—हाच या बाबतींतला माझा सिद्धान्त आहे.

हें चरित्र लिहिण्याचें काम सुरू केल्यावर या कार्याच्या व्यावहारिक बाजूचा विचार माझ्या मनांत मधूनमधून येऊं लागला. मुद्रणासाठीं अवश्य असणाऱ्या कागदाची दुर्मिळता व त्याच्या भरमसाट वाढलेल्या किंमती यांचा विचार मनांत घोळूं लागल्यावर, एकदां मला असेंहि वाटलें कीं, संकल्पाप्रमाणें चरित्र लिहून काढणें एवढेंच कार्य आपल्या हातून होऊं शकेल; चरित्राच्या मुद्रणाचें काम तूर्त तरी अशक्य म्हणून आपल्याला सोडून द्यावें लागेल! मी अशा विवंचनेंत असतांना या अडचणीचा परिहार ज्यांच्या शुद्ध सहानुभूतीमुळें झाला ते डॉ. रा. ह. भडकमकर व श्री. शि. वि. मोडक यांचे आभार मी तर मानतोंच; पण, हें पुस्तक वाचणाऱ्या सद्‌गृहस्थांनींहि त्यांचे आभार मानले पाहिजेत, असेंहि सुचवून ठेवणें हें मी आपलें कर्तव्य समजतों. या चरित्राच्या साधनांच्या संकलनाच्या कार्यांत ज्या अनेक व्यक्तींचें मला साहाय्य झालें त्यांत श्री. अनंत जनार्दन करंदीकर, सेनापति बापट, श्री. ग. वि. केतकर, संत पांचलेगांवकर महाराज, म. म. पां. वा. काणे, इत्यादींचा नामनिर्देश मला केलाच पाहिजे. मुंबईच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटी'च्या ग्रंथालयाचे व्यवस्थापक, 'केसरी-मराठा' संस्थेच्या ग्रंथालयाचे व्यवस्थापक, स. प. कॉलेजच्या ग्रंथालयाचे व्यवस्थापक, भारतसेवक समाज व फर्ग्यूसन कॉलेज या संस्थांच्या ग्रंथालयाचे व्यवस्थापक व 'चित्रशाळा' मुद्रणालयाचे व्यवस्थापक इत्यादींनीं ग्रंथ पुरवून—व ते कित्येक दिवसपर्यंत मजजवळ राहूं देऊन—मला जें साहाय्य केलें त्याचाहि निर्देश या ठिकाणीं करणें अवश्य आहे. या चरित्राचीं प्रकरणें लिहून झाल्यावर तीं मजकडून वाचून घेऊन–अगर स्वतः वाचून—ज्या मित्रमंडळींनीं मला बहुमोल सूचना केल्या त्यांचेहि मी मनःपूर्वक आभार मानतों.

या पुस्तकाच्या मुद्रणाचा प्रश्न निघाला तेव्हा 'लोकसंग्रह मुद्रणालया'च्या व्यवस्थापकांनीं मला जी एक सूचना केली ती फार महत्त्वाची होती. मी 'पाकिस्तानचें संकट' हें पुस्तक याच मुद्रणालयांत छापलें. पुस्तकाचें हस्तलिखित श्री. ल. ब. अर्थात् अण्णासाहेब भोपटकर यांना दाखवून, तें छापावयाला कायदेशीरदृष्ट्या कांहीं हरकत नाहीं अशी खात्री करून घेऊन, मगच मी तें छापखान्याकडे दिलें होतें. हाच क्रम या चरित्रग्रंथाच्या बाबतींतहि चालावा ही सूचना मला सर्वस्वीं स्वीकार्य वाटली. या पुस्तकाचें हस्तलिखित वाचून, त्यांत कायदेशीर दृष्ट्या कांहीं आक्षेपार्ह आहे कीं काय हें पहाण्याचें काम मुंबईचे ॲडव्होकेट श्री. काशिनाथ नारायण अर्थात् बाबासाहेब घारप यांनीं केलेलें आहे. त्यांनीं केलेल्या सूचनांचा उपयोग करून, कांहीं मजकूर गाळून व कांहीं बदलून, मगच या पुस्तकाचें हस्तलिखित मुद्रणालयाच्या स्वाधीन करण्यांत आलेलें होतें. हस्तलिखित वाचण्याचें हें दगदगीचें काम केल्याबद्दल व तें वाचून महत्त्वाच्या सूचना केल्याबद्दल मी श्री. बाबासाहेब घारप

यांचे मन:पूर्वक आभार मानतों. 'लोकसंग्रह' छापखान्याच्या व्यवस्थापकांनीं व त्या छापखान्यांतील कार्यकर्त्यांनीं हें पुस्तक छापून देण्याच्या कामीं जी आस्था दाखविली व जें अगत्य बाळगिलें त्याबद्दल मी त्यांचेहि मन:पूर्वक आभार मानतों.

हें पुस्तक ठराविक वेळांत छापून होणें अवश्य होतें. दि० ११ मार्च १९४३ रोजीं या पुस्तकाचीं पहिलीं १६ पृष्ठें छापून निघालीं व आतां म्हणजे दि. ७ मे रोजीं या पुस्तकाच्या मुद्रणाचें काम बहुतेक पुरें झालें आहे. जवळ जवळ ६७५ पृष्ठांचा मजकूर व २४-२५ पृष्ठें भरतील इतकीं चित्रें इतक्या अल्प काळांत छापावीं लागलीं. यामुळें मुद्रणांत कांहीं किरकोळ दोष राहिले असले, कांहीं अशुद्धें राहिलीं असलीं अगर कांहीं बारीकसारीक चुका झाल्या असल्या तर वाचकांनीं क्षमा करावी. मुद्रणालयांतल्या कार्यकर्त्यांनीं, माझ्या अन्य सहकाऱ्यांनीं व स्वत: मी या बाबतींत शक्य ती दक्षता घेतली आहे. या पुस्तकांत जीं छाया चित्रें घालण्यांत आलीं आहेत, त्यांतलीं कांहीं पुण्याचे फोटोग्राफर, श्री. केशवराव गोडबोले यांनीं माझ्यासाठीं मुद्दाम काढिलीं. ब्लॉक्स तयार करण्याचें बहुतेक काम पुण्याचे ब्लॉकमेकर श्री. भाऊसाहेब आगाशे व श्री. भाटे यांनीं केलें आहे. पुस्तकाच्या पुठ्यावर जें कल्पना-चित्र घातलें आहे तें मुंबईचे श्री. दिगंबर अच्युतराव साठे यांनीं काढिलें आहे व त्याचे ब्लॉक्स करण्याचें काम मुंबईचे मेसर्स डी. बी. नेरॉय यांनीं केलें आहे. कांहीं ब्लॉक्स श्री. ग. वि. केतकर यांनीं वापरण्यासाठीं दिलेले आहेत. या सर्वांच्या मदतीचा मी कृतज्ञतापूर्वक निर्देश करतों.

मी हें चरित्र लिहीत आहें, याबद्दल ज्यांना अत्यंत अभिमान वाटत असे अशा माणसांपैकीं तीन माणसें या चरित्र-लेखनाच्या अवधींत इहलोक सोडून गेलीं! त्यांचेंहि स्मरण मला या प्रसंगीं केलें पाहिजे! 'त्रिकाळ' कार्यालयांतील माझ्या सहकाऱ्यांपैकीं श्री. गणेश रामचंद्र अर्थात् भाऊ चितळे हा दि. २३-३-१९४२ रोजीं इहलोक सोडून गेला! स्वत:ला लहान समजणारीं पण वस्तुत: मोठीं असणारीं अशीं जीं माणसें 'त्रिकाळ' चालवीत असतांना मला लाभलीं त्यांतल्या एका माणसाच्या आकस्मिक निधनामुळें मी कांहीं दिवस तर दिङ्मूढच झालों होतों! हें काम थांबवावें असाहि विचार माझ्या मनांत कित्येक प्रसंगीं येऊन जाई; पण, हें काम असें सोडून दिलें तर भाऊसारख्या सहकाऱ्याची माझ्यावरील निष्ठा अस्थानीं ठरेल असें वाटून, मन घट्ट करून, सदुद्योगांत गुंतून राहण्यासारखा दुसरा विरंगुळा मनाला असूं शकत नाहीं हें ओळखून, मी हा उद्योग पुढें चालविला. नाशिकचे वैद्यभूषण वामनशास्त्री दातार यांची व माझी ओळख अगदीं अलीकडचीच होती; पण, या अल्पकाळांत शास्त्रीबुवांनीं मजबद्दल इतकें ममत्व दाखविलें कीं, त्यांच्या व माझ्या वयांतला फरक विसरून, मी त्यांना स्नेहीच समजूं लागलों होतों. या चरित्राचीं एकदोन प्रकरणें वाचून शास्त्रीबुवांनीं तीं पसंतहि केलीं होतीं. या चरित्राच्या प्रकाशनापर्यंत शास्त्रीबुवा हयात असते तर 'परगुणपरमाणून्पर्वतीकृत्य नित्यम्'

या न्यायानें त्यांनीं मला किती धन्यवाद दिले असते, याची मला उत्तम कल्पना आहे. १९४० च्या उत्तरार्धापासूनचा कांहीं काळ पुण्यांत मला जवळजवळ एकलकोंडे-पणानें घालवावा लागला. या काळांत माझा ज्यांच्याशीं स्नेह जमला ते श्री. गोपाळ कृष्ण अर्थात् बाबाराव चितळे हे आज हयात असते तर त्यांनाहि हा चरित्रग्रंथ पुरा झालेला पाहून फार धन्यता वाटली असती. सावरकर-चरित्राच्या निमित्तानें जबलपूर येथें जाऊन मी गेल्या ऑक्टोबर महिन्याच्या आरंभीं सावरकरांचे पूर्व-सहकारी बॅ. ग्यानचंद वर्मा यांना भेटलों. हे गृहस्थ त्या वेळीं आजारी होते. पण, ते पुढें १–२ महिन्यांतच इहलोक सोडून जातील अशी कल्पना त्या वेळी त्यांच्याहि मनांत आली नाहीं व माझ्याहि मनांत आली नाहीं. गेल्या डिसेंबरच्या मध्याच्या सुमारास तेहि इहलोक सोडून गेले व त्यामुळें, या चरित्रग्रंथाविषयीं आपुलकीनें विचार करणारा एक सद्गृहस्थ नाहींसा झाला ! या चरित्रग्रंथाच्या लेखनाला आरंभ केल्यावर, गांधीजींना भेटावें म्हणून मी त्यांच्याशीं जसा पत्रव्यवहार केला होता त्याप्रमाणेंच पंजाबचे भूतपूर्व पंतप्रधान सर शिकंदर हयातखान यांच्याबरोबरहि मी पत्रव्यवहार केला होता. त्यांच्या चिटणिसांकडून मला जें उत्तर आलें तें मोठेंसें प्रोत्साहक नव्हतें; तरीहि, एकवार लाहोरला जावें असा माझा विचार होता; पण, सर शिकंदर हयातखान यांच्या निधनाची दुःखद वार्ता प्रसिद्ध झाल्यामुळें, तो विचार मला सोडून द्यावा लागला !

हें चरित्र लिहितांना मी जीं साधनें मिळविलीं तीं मिळवितांना मला पुष्कळ कष्ट पडले. पण, एका देशभक्तानें जे कष्ट प्रत्यक्ष भोगले त्यांचें वर्णन करण्याचे कष्टहि आपल्याला सहन करतां आले नाहींत तर जिणें व्यर्थ होय, अशा भावनेनें मी ते कष्ट आनंदानें केले ! 'भवीं अमृत आपदा' या सेनापती बापटांच्या सूत्रांतलें सत्य मला सामान्य जीवनांत कृतींत उतरवितां आलें नसलें तरी, या चारित्रलेखनाच्या कार्यांत ज्या अडचणी आल्या त्यांचा स्वीकार करतांना मी तें सत्य थोडेंफार अनु-भविलें. पण, कष्टानें मिळविलेलीं साधनें वापरतांना जो कोंडमारा होऊं लागला त्याला तोंड देतांना मात्र मी बेजार झालों. सावरकरांनीं पूर्ववयांत लिहिलेलें पुष्कळच वाङ्मय त्या काळीं सरकारनें जप्त करून टाकलें व मध्यंतरीं सुमारें २७ महिनेपर्यंत सात प्रांतांत काँग्रेसचीं मंत्रिमंडळें अधिकारावर असूनहि, त्यांनीं हें जप्त वाङ्मय बंधमुक्त केलें नाहीं. १९१९ सालीं त्या वेळच्या राजेसाहेबांनीं राजक्षमा घोषित केली तेव्हां त्यांनीं असें जाहीर केलें कीं, नव्या सुधारणांची सुरुवात ही एका नव्या युगाची सुरुवात आहे. राज्यकर्त्यांच्या दृष्टीनें ज्यांनीं पूर्वीच्या काळांत आक्षेपार्ह कृत्यें केलीं त्या व्यक्ती मुक्त होऊन, नव्या पद्धतीशीं जुळतें घेण्याची संधि त्यांना देण्यांत आली त्या वेळींच, त्या व्यक्तींचें जुनें लेखन व त्यांचे जुने विचार हे वस्तुतः 'इतिहास' या शुद्ध क्षेत्रांत जमा झाले ! अशा व्यक्तींच्या तत्कालीन मतांचें ऐतिहासिक दृष्टया दिग्दर्शन करतांना, त्या लेखनाचा व त्या विचारांचा निर्देश

टाळतां येण्यासारखा नसल्यामुळें, तेवढा निर्देश त्या दृष्टीनें करावयाला हरकत नाहीं, अशा बुद्धीनेंच मी असे कांहीं निर्देश केले आहेत.

एकाद्या पुस्तकावर ' जप्त वाङ्मय ' असा छाप सरसहा पडला म्हणजे काय होतें तें ' माझी जन्मठेप ' या पुस्तकाचा उपयोग या चरित्राच्या कामीं करतांना माझ्या चांगलेंच प्रत्ययास आलें. कोणतीहि कठोर कसोटी लावली तरी आक्षेपार्ह ठरणार नाहीं असा सुंदर वर्णनात्मक, कथात्मक व विवेचनात्मक भाग या ग्रंथांत किती तरी आहे. तो वगळून सावरकरचरित्राची उभारणी करणें म्हणजे सारस्वताच्या शोभेची हेतुपुरस्सर हानि करणें होय, असें मला वाटलें. सध्यां सगळीं सरकारी खातीं युद्धप्रयत्नांत गढून गेलीं आहेत याची जाणीव मला असल्यामुळें, एकेक उतारा मुंबईसरकारकडे पाठवून तो आक्षेपार्ह नाहीं असें प्रशस्तिपत्र द्या असा लकडा सरकारच्या मागें लावणें हें युद्धप्रयत्नांत व्यत्यय आणण्यासारखें ठरेल, असेंहि मला वाटलें. म्हणून केवळ चरित्राच्या सजावटीच्या दृष्टीनें उपयुक्त ठरणारे या पुस्तकांतील उतारे स्वतःची विवेचकबुद्धि वापरून मी या चरित्रांत उद्धृत केले आहेत. चरित्राची सजावट शास्त्रशुद्ध पद्धतीनें करण्याच्या शुद्ध हेतूनें हे उतारे वापरलेले आहेत. सरकारी हुकुमाचें उल्लंघन करावें असा हेतु त्यांत मुळींच नाहीं.

सावरकर-चरित्र मराठींत लिहिण्याचा उद्योग सुरू केल्यावर चरित्राचीं साधनें जसजशीं गोळा होऊं लागलीं तसतसा एक नवा विचार माझ्या मनांत खेळूं लागला. एवढी सामग्री अनायासें गोळा होतच आहे; मग, महत्त्वाच्या सामग्रीचा स्वतंत्रपणें उपयोग करून मराठी चरित्र तयार करतांनाच इंग्रजी चरित्रलेखनाचा उद्योग कां करूं नये, हा प्रश्न मला सुचूं लागला. हा उद्योग मला करतां येणार नाहीं हेंहि मला स्पष्ट दिसूं लागलें. शेवटीं, माझ्या एका माननीय हितचिंतकानें इंग्रजी चरित्र लिहिण्याचा उद्योग अंगावर घेण्याची सिद्धता दर्शविली. या चरित्रांतली महत्त्वाची सामग्री उपयोगांत आणून लिहिलेलें स्वतंत्र इंग्रजी चरित्र जवळजवळ पुरें झालें आहे, हें कळविण्याला मला आनंद वाटतो. मराठी चरित्राच्या आकाराचीं सुमारें ५०० पृष्ठें भरतील एवढें हें चरित्र होईल. हिंदुमहासभेचे कार्याध्यक्ष डॉ. शामप्रसाद मुकर्जी यांनीं या इंग्रजी चरित्राची प्रस्तावना लिहिण्याला संमति दर्शविली आहे, हें या प्रसंगीं जाहीर करण्याला मला अभिमान वाटत आहे. मराठी चरित्राच्या प्रकाशनाच्या कामांतून व जबाबदारींतून पार पडलों असें दिसूं लागतांच, मी या इंग्रजी चरित्राच्या प्रकाशनाकडे वळेन, असा आज संकल्प आहे. महाराष्ट्राबाहेरच्या सावरकरभक्तांच्या प्रोत्साहनानें हा संकल्पहि सफल होईल, अशी आशा मला वाटत आहे.

हें चरित्र वाचतांना, वाचकांनीं एकच दृष्टि ठेवावी अशी माझी त्यांना विनंति आहे. पुस्तक जरासें मोठें झालें कीं, त्याला ' ग्रंथ ' हें नांव द्यावयाचें आणि अशा ग्रंथकाराला ' साहित्यिक ' समजून त्या दृष्टीनें पुस्तक वाचावयाचें, अशी एक प्रवृत्ति

आपल्या समाजांत रूढ आहे. ही प्रवृत्ति शिल्लक ठेवून कोणी हें पुस्तक वाचतील तर त्यांच्या पदरीं निराशा पडल्याशिवाय रहाणार नाहीं; कारण, मी साहित्यिक नाहीं; आणि, साहित्यिक नसल्याचा विषाद मला कधींकाळीं वाटलाच असला तर, अत्रे-महाशयांनीं साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद 'मंडित' केल्यापासून तो विषादहि मला वाटेनासा झाला आहे ! मी साहित्यिक नाहीं, असें सांगण्यांत मला अलीकडे अभिमानच वाटतो ! एका साध्या माणसानें साध्या माणसांसाठीं लिहिलेलें एक पुस्तक, अशी साधी दृष्टि ठेवून वाचकांनीं हें पुस्तक वाचावें; कारण, त्यांत साहित्यगुण कांहींहि नाहींत. कांहीं परिश्रम करून संकलित केलेली माहिती या पुस्तकांत दिलेली आहे, इतकेंच ! शरीर झिजविण्याला नाखुष नसणाऱ्या कोणाहि सामान्य माणसाला हें काम करतां आलें असतें ! इतक्या साध्या स्वरूपाचें हें काम आहे.

चरित्रविषयक माहिती गोळा करीत असतांना मी कांहीं परिश्रम केले हें खरें; पण, सावरकर-चरित्र नीट लिहिण्याच्या दृष्टीनें अजूनहि पुष्कळसे परिश्रम व्हावयाला पाहिजेत. १९०६ ते १० या वर्षांतल्या 'लंडन टाइम्स'च्या फाइली मी वाचल्या. इंग्लंडमधील इतर प्रमुख वृत्तपत्रांच्याहि या काळांतल्या फाइल्स वाचणें अवश्य आहे. 'Imperial Council Debates' मधील कांहीं माहिती मी मिळविली. पार्लमेंटच्या वादविवादांतील माहिती व प्रांतिक विधिमंडळांच्या चर्चेच्या निमित्तानें बाहेर आलेली माहिती मी वाचूं शकलों नाहीं ! 'अमृतबझार पत्रिका', 'हिंदु' 'क्रॉनिकल', 'ट्रिब्यून' इत्यादि वृत्तपत्रांचे लंडन येथील प्रतिनिधी त्या पत्रांकडे जीं वार्तापत्रें धाडीत तीं पाहणें अवश्य असूनहि, मला तीं पहातां आलीं नाहींत. मद्रास प्रांतांत पूर्वी प्रसिद्ध होत असलेल्या 'इंडिया' साप्ताहिकांत श्री. व्ही. व्ही. एस्. अय्यर यांनीं लंडनहून धाडिलेलीं बातमीपत्रें प्रसिद्ध होत असत. या पत्राचे जुने अंकहि मी पाहूं शकलों नाहीं. Gaelic American, Indian Sociologist, Talwar, Bande Mataram इत्यादि पत्रांचे जुने अंकहि पहाणें अवश्य होतें. पण, हे अंक मिळणेंहि दुर्घट; आणि, ते पहाण्याची सवडहि मला झाली नाहीं !

या चरित्राची पूर्तता करण्याच्या दृष्टीनें जो एक विचार माझ्या मनांत वारंवार येई, तोहि या ठिकाणीं नमूद करणें मला अवश्य वाटतें. सावरकरांच्या अंदमान-मधील जीवनामुळें महाराष्ट्राला परिचित झालेला बारीसाहेब मरून गेला असला तरी, त्याची बायको व मुलगी या दोघी जणी हयात असण्याचा दृढ संभव असल्यामुळें त्यांच्याशीं पत्रव्यवहार करून, त्यांच्या सावरकरविषयक आठवणी हस्तगत कराव्या असें मला अनेकवार वाटे. पण, महायुद्धाच्या सध्यांच्या दंगलींत या उद्योगांतून विशेष कांहीं हातीं लागण्यासारखें नसल्यामुळें, मी हा नाद सोडून दिला. चालू युद्धाच्या समाप्तीनंतर केव्हां काळीं या चरित्राची नवी आवृत्ति काढण्याचा योग मला साधतां आला तर, त्या वेळीं हा उद्योग अवश्य करावा, असें वारंवार मनांत येतें. सावरकरांचे पूर्वपरिचित बॅ.राणा, श्री. वीरेंद्र चट्टोपाध्यायप्रभृति देशभक्त

'निर्वासित भारतीय' म्हणून युरोपांत आहेत. त्यांच्या सावरकरविषयक स्मृतीहि मिळविणें अवश्य आहे. सावरकरांच्या बरोबर गाजून गेलेले मदनलाल धिंग्रा, लाला हरदयाळ, श्री. व्ही. व्ही. एस्. अय्यरप्रभृति देशभक्तांच्या मुलांमाणसांची व आप्तेष्टांची माहिती केव्हांतरी मिळवून ती प्रकाशांत आणावी हा विचार माझ्या मनांत जसा डोकावून जातो त्याप्रमाणेंच, क्वचित् असेंहि मनांत येतें कीं, 'पंडित' जॅक्सन, कर्झन वायली इत्यादींच्या आप्तेष्टांसंबंधींचीहि माहिती मिळवून, तीहि प्रकाशांत आणावी. जॅक्सन, कर्झन वायली, इत्यादि लोक भारतीय देशभक्तांच्या रोषाला बळी पडले असले तरी, त्यांच्या आप्तेष्टांबद्दल भारतीयांनीं मनांत रोष बाळगावा, असें नाहीं. आणि एका भारतीयाच्या रोषाला पात्र ठरून जिवंत राहिलेल्या एका इंग्रजानें त्या भारतीयाबद्दलचा रोष पुढें मनांतून काढून टाकला हें प्रत्यक्ष उदाहरणानेंच सिद्ध झालेलें असल्यामुळें तर, जॅक्सन, कर्झन वायलीप्रभृतींच्या आप्त-स्वजनांबद्दलचा रोष आपणहि मनांत न ठेवणें हेंच आपलें कर्तव्य ठरतें. श्री. वासुदेवराव गोगटे यांनीं सर अर्नेस्ट हॉटसन यांच्यावर पिस्तुल झाडण्याचा प्रयत्न केला होता, ही गोष्ट प्रसिद्ध आहे. १९३७ सालीं गोगटे यांच्या मुक्ततेचा प्रश्न उत्पन्न झाला तेव्हां, त्या वेळच्या मंत्रिमंडळांतील गृहमंत्री श्री. कन्हयालाल मुनशी यांनीं सर अर्नेस्ट हॉटसन यांना एक पत्र धाडलें होतें. गोगटे यांच्या मुक्ततेला आपण संमति द्यावी इतकेंच श्री. मुनशी यांनीं आपल्या पत्रांत सुचविलें होतें. हॉटसन-साहेबांनीं नुसति संमति दिली इतकेंच नव्हे तर, गोगटे यांच्यासाठीं शंभर रुपयेहि पाठवून दिले. गतगोष्टी कितीहि अप्रिय असल्या तरी त्या विसरून जाऊन, नव्या दृष्टीनें नव्या घटनांचा विचार करण्याची ही वृत्ति आपणहि आपल्या अंगीं बिंबविली पाहिजे.

आणि, धिंग्रा—कान्हेरे यांच्यासारखे भारतीय तरुण आणि त्यांच्या रोषाला बळी पडलेले कर्झन वायली जॅक्सनसारखे इंग्रज यांच्यासंबंधींचा विचार उद्यांच्या स्वतंत्र भारताचे नागरिक या दृष्टीनें आपण करूं, तेव्हां हीच वृत्ति सर्व दृष्टींनीं उपकारक ठरणार आहे. उद्यां हिंदुस्थान स्वतंत्र झाला आणि लंडनमधील एकादा हिंदु स्वतंत्र भारताचा नागरिक म्हणून 'पेंटेन्व्हिली' कारागृहांत गेला आणि मदन-लालजींचें निधनस्थान म्हणून त्यानें त्या ठिकाणाला अभिवादन केलें तर, इंग्लंडमधील इंग्रजांना जसें कौतुक वाटेल त्याप्रमाणेंच, व्यापाराच्या वगैरे मिषानें स्वतंत्र भारतांत आलेला एकादा इंग्रज नाशिकच्या विजयानंद थिएटरांत गेला आणि 'जॅक्सनच्या हौतात्म्याची भूमि ती हीच' असें म्हणून त्यानें त्या स्थानाला अभिवादन केलें तर त्याचेंहि कौतुक करणें आपलें कर्तव्यच ठरेल. या चरित्रांत ज्या गतगोष्टींचें शुद्ध ऐतिहासिक घटना म्हणून वर्णन करण्यांत आलेलें आहे, त्यांच्याकडे पाहतांना वाच-कांनीं ही उद्यांची उदात्त दृष्टि ठेवावी, अशी विनंति आहे. वासुदेव बळवंत फडके यांची निधनभूमि म्हणून एडन हें जसें आपल्याला पवित्र तीर्थासमान वाटत राहील,

सावरकरप्रभृतींची क्लेशभूमि म्हणून अंदमान हें जसें सदैव आपल्याला पावन वाटत राहील, विष्णु गणेश पिंगळे यांचें निधनस्थान म्हणून लाहोरचा तुरुंग हा जसा सदैव आपल्या स्मरणांत राहील त्याप्रमाणेंच, मुझफरपूर, नाशिक, तिनेवेल्ली हीं ठिकाणेंहि केनेडी बायांची मृत्यूभूमि, जॅक्सनची निधनभूमि व अॅशची निधनभूमि म्हणून, हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावरहि, इंग्रजांना संस्मरणीय व दर्शनीय वाटत राहातील, हें आपण विसरून जातां कामा नये. समर प्रसंग चालू असतो तोंपर्यंत दोन भिन्न दळांतले सैनिक मरणमारणाचा उद्योग करीत असतात; पण तो प्रसंग संपतांच त्यांचे संबंध सलोख्याचेहि बनूं शकतात हा अनुभव रणदेवता शांत झाल्यानंतर पुष्कळच उदाहरणांत येत असतो. वस्तुतः महायुद्ध संपून रणदेवता शांत होतांच इंग्लंड हिंदुस्थानचें स्वातंत्र्य मान्य करील अशी आशा तुम्हां आम्हां सर्वांस वाटत आहे. तसें घडलें कीं, इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यामधील लढाहि संपून जाईल. गत गोष्टींकडे उदात्त दृष्टीनें पाहण्याचें वळण आपण आपल्या बुद्धीला लावून ठेवलेलें असलें तर, त्या वळणाचा त्या सुप्रसंगीं फार उपयोग होईल.

हें विस्तृत चरित्रहि एका अर्थीं अपूर्णच कसें आहे हें वर सांगितलेंच आहे. पण त्याचाहि उपयोग झाल्याशिवाय राहाणार नाहीं. चित्रगुप्तलिखित सावरकर-चरित्र हें इंग्रजी चरित्र, श्री. रानडे-लिखित सावरकर चरित्र, डॉ. भोपे यांनीं लिहिलेलें सावरकर चरित्र, श्री. गो. गो. अधिकारी व श्री. मो. शि. गोखले यांनीं लिहिलेलीं सावरकर चरित्रें हीं सर्व पुस्तकें मनोरंजक असलीं तरी, त्यांत एक न्यून आहे. समकालीन आधार न देतां यांतलीं बहुतेक चरित्रें लिहिलीं गेलेलीं आहेत. त्यामुळें तीं कमजास्त प्रमाणांत कादंबरीवजा वाटतात. सावरकरांचें चरित्र मुळांतच इतकें अद्भुत आहे कीं, तें लिहितांना कादंबरीकाराचा थाट आणण्याचें कांहीं कारणच नाहीं. सत्यस्थितिचें वर्णन आणि तद्द्वारा इतिहास-कथन एवढा हेतु डोळ्यांपुढें ठेवून चरित्र लिहिलें कीं, त्यांत नवलाई उत्पन्न झाल्याशिवाय राहाणार नाहीं. असें असल्यामुळें, हें चरित्र लिहितांना शक्य तितके समकालीन आधार दिले आहेत व स्वतः सावरकरांचें तत्कालीन लेखन वाचकांना सादर करून ज्यानें त्यानें आपलें मत बनवावें, अशी सवडहि ठेविली आहे. यापुढें एकादा समर्थ सावरकर–भक्त सावरकर–चरित्र लिहावयाला उद्युक्त होईल तेव्हां साधन-सामग्री गोळा करण्याचे त्याचे श्रम अंशतः तरी कमी होतील, इतकीच व्यवस्था मला करतां आली आहे. सावरकरांनीं जें आत्म-चरित्र लिहिलें आहे तें १९०१ सालापर्यंतच्या भागासंबंधींचें आहे. कधीं काळीं सवड झाली व त्यांनीं आपलें आत्मचरित्र पुढें लिहावयाचें ठरविलें तर, त्यांची स्मरणशक्ति जागृत करण्यालाहि या चरित्राचा उपयोग होईल, अशी आशा वाटते.

या चरित्राचीं बहुतेक सर्व प्रकरणें स्वतः सावरकरांच्या अवलोकनांतून गेलेलीं आहेत. सावरकरांची प्रकृति व त्यांच्या मागें असणारा अनेक प्रकारच्या कार्यांचा

व्याप यांमुळें प्रकरणें वाचण्याचा त्रास त्यांना देतांना मला मोठा संकोच वाटे ! पण कांहीं प्रकरणें तरी त्यांनीं पाहणें अत्यंत अवश्य आहे, असें मला प्रथमपासूनच वाटत असल्यामुळें, त्यांना हा त्रास देण्याचें साहस मी केलें. त्यांनीं हा त्रास सहन केला याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. फर्ग्युसन कॉलेजांत सावरकर यांच्या बरोबर असलेल्या त्यांच्या कांहीं मित्रांनीं तत्कालीन आठवणी लिहून पाठवून मला उपकृत केलें आहे. त्यांचेहि मी आभार मानतों. या चरित्राला प्रस्तावना लिहिण्याचें कबूल करून श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं या वयांत इतकी विस्तृत प्रस्तावना, केवळ त्यांनाच साध्य झालेल्या विवेचक पद्धतीनें, लिहिली याबद्दल त्यांचेहि आभार मानणें हें मी आपलें कर्तव्य समजतों.

या चरित्राच्या प्रकाशनासाठीं अवश्य असणारें द्रव्य सध्यांच्या बिकट परिस्थितींत कसें उभें राहील या विवंचनेंत मी पुष्कळ दिवस होतों. प्रसिद्धिपूर्व मूल्य ठरवून नांवें नोंदण्याची योजना प्रसिद्ध केली नि त्या योजनेला पुरेसा पाठिंबा मिळाला नाहीं, तर आपण चरित्र-विषयाला उगीचच कमीपणा आणला असें होईल, या भीतीनें ही योजना जाहीर करण्याचा धीर मला कित्येक दिवसपर्यंत होईना; पण, अखेरीस ही योजना जाहीर करण्याला मी तयार झालों. महाराष्ट्रीय वाचकवर्गानें या योजनेला ज्या तत्परतेनें पाठिंबा दिला ती तत्परता पाहून माझें अंतःकरण कृतज्ञतेनें भरून आलें. अत्यंत बिकट प्रसंगीं महाराष्ट्रीय जनतेनें माझ्या कार्याला पाठिंबा दिला, असा हा दुसरा प्रसंग होय. त्या पहिल्या प्रसंगीं महाराष्ट्रीय जनतेबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं मी

> जेथें जातों तेथें तूं माझा सांगाति ।
> चालविशी हातीं धरूनियां ॥

हें संतवचन वापरलें होतें. त्याच वचनाचा फिरून एकवार उपयोग करून, मी महाराष्ट्रीय जनतेचेहि आभार मानतों.

या चरित्रग्रंथाच्या उद्योगांत गुंतल्यामुळें, गेल्या दीडदोन वर्षांत मला अनेक थोर देशभक्तांच्या सहवासाचा बौद्धिक आस्वाद अनुभवितां आला. यापुढील काळांत मी कोठेंहि असलों तरी आणि कांहींहि करीत असलों तरी, माझ्या मनांत दरवळून राहिलेला हा आस्वाद नाहींसा होईल, असें मला वाटत नाहीं. सावरकर व त्यांच्या तोडीचे भारतीय देशभक्त यांच्या चरित्रांचा अभ्यास करण्याची गोडी लागणें ही गोष्ट ‘ बहुत सुकृतांच्या जोडी ’ मुळेंच घडणारी आहे ! केव्हां तरी केलेल्या ज्ञाताज्ञात सुकृतामुळें ही गोडी मला लागली, हा या जन्मांतील फार मोठा लाभ होय, असें मी तरी समजतों. मला काय अगर माझ्यासारख्या सामान्य शक्ति-बुद्धीच्या शेंकडों माणसांना काय, सावरकरहि होतां येणार नाहीं, टिळकहि होतां येणार नाहीं आणि बापटही होतां येणार नाहीं ! पण, देश परतंत्र आहे, तीस कोटी हिंदु दास्यांत व दैन्यांत आहेत, ही जाणीव चित्तांत सतत तेवत ठेवून, या दास्य-

सावरकरप्रभृतींची क्लेशभूमि म्हणून अंदमान हें जसें सदैव आपल्याला पावन वाटत राहील, विष्णु गणेश पिंगळे यांचें निधनस्थान म्हणून लाहोरचा तुरुंग हा जसा सदैव आपल्या स्मरणांत राहील त्याप्रमाणेंच, मुझफरपूर, नाशिक, तिनेवेल्ली हीं ठिकाणेंहि केनेडी बायांची मृत्यूभूमि, जॅक्सनची निधनभूमि व अॅशची निधनभूमि म्हणून, हिंदुस्थान स्वतंत्र झाल्यावरहि, इंग्रजांना संस्मरणीय व दर्शनीय वाटत राहातील, हें आपण विसरून जातां कामा नये. समर प्रसंग चालू असतो तोंपर्यंत दोन भिन्न दळांतले सैनिक मरणमारणाचा उद्योग करीत असतात; पण तो प्रसंग संपतांच त्यांचे संबंध सलोख्याचेहि बनूं शकतात हा अनुभव रणदेवता शांत झाल्यानंतर पुष्कळच उदाहरणांत येत असतो. वस्तुतः महायुद्ध संपून रणदेवता शांत होतांच इंग्लंड हिंदुस्थानचें स्वातंत्र्य मान्य करील अशी आशा तुम्हां आम्हां सर्वांस वाटत आहे. तसें घडलें कीं, इंग्लंड व हिंदुस्थान यांच्यामधील लढाहि संपून जाईल. गत गोष्टींकडे उदात्त दृष्टीनें पाहण्याचें वळण आपण आपल्या बुद्धीला लावून ठेवलेलें असलें तर, त्या वळणाचा त्या सुप्रसंगीं फार उपयोग होईल.

हें विस्तृत चरित्रहि एका अर्थी अपूर्णच कसें आहे हें वर सांगितलेंच आहे. पण त्याचाहि उपयोग झाल्याशिवाय राहाणार नाहीं. चित्रगुप्तलिखित सावरकर-चरित्र हें इंग्रजी चरित्र, श्री.रानडे-लिखित सावरकर चरित्र, डॉ. भोपे यांनीं लिहिलेलें सावरकर चरित्र, श्री. गो. गो. अधिकारी व श्री. मो. शि. गोखले यांनीं लिहिलेलीं सावरकर चरित्रें हीं सर्व पुस्तकें मनोरंजक असलीं तरी, त्यांत एक न्यून आहे. समकालीन आधार न देतां यांतलीं बहुतेक चरित्रें लिहिलीं गेलेलीं आहेत. त्यामुळें तीं कमजास्त प्रमाणांत कादंबरीवजा वाटतात. सावरकरांचें चरित्र मुळांतच इतकें अद्भुत आहे कीं, तें लिहितांना कादंबरीकाराचा थाट आणण्याचें कांहीं कारणच नाहीं. सत्यस्थितिचें वर्णन आणि तद्द्वारा इतिहास-कथन एवढा हेतु डोळ्यांपुढें ठेवून चरित्र लिहिलें कीं, त्यांत नवलाई उत्पन्न झाल्याशिवाय राहाणार नाहीं. असें असल्यामुळें, हें चरित्र लिहितांना शक्य तितके समकालीन आधार दिले आहेत व स्वतः सावरकरांचें तत्कालीन लेखन वाचकांना सादर करून ज्यानें त्यानें आपलें मत बनवावें, अशी सवडहि ठेविली आहे. यापुढें एकादा समर्थ सावरकर—भक्त सावरकर—चरित्र लिहावयाला उद्युक्त होईल तेव्हां साधन सामग्री गोळा करण्याचे त्याचे श्रम अंशतः तरी कमी होतील, इतकीच व्यवस्था मला करतां आली आहे. सावरकरांनीं जें आत्म-चरित्र लिहिलें आहे तें १९०१ सालापर्यंतच्या भागासंबंधींचें आहे. कधीं काळीं सवड झाली व त्यांनीं आपलें आत्मचरित्र पुढें लिहावयाचें ठरविलें तर, त्यांची स्मरणशक्ति जागृत करण्यालाहि या चरित्राचा उपयोग होईल, अशी आशा वाटते.

या चरित्राचीं बहुतेक सर्व प्रकरणें स्वतः सावरकरांच्या अवलोकनांतून गेलेलीं आहेत. सावरकरांची प्रकृति व त्यांच्या मार्गे असणारा अनेक प्रकारच्या कार्यांचा

व्याप यांमुळें प्रकरणें वाचण्याचा त्रास त्यांना देतांना मला मोठा संकोच वाटे ! पण कांहीं प्रकरणें तरी त्यांनीं पाहणें अत्यंत अवश्य आहे, असें मला प्रथमपासूनच वाटत असल्यामुळें, त्यांना हा त्रास देण्याचें साहस मी केलें. त्यांनीं हा त्रास सहन केला याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. फर्ग्युसन कॉलेजांत सावरकर यांच्या बरोबर असलेल्या त्यांच्या कांहीं मित्रांनीं तत्कालिन आठवणी लिहून पाठवून मला उपकृत केलें आहे. त्यांचेहि मी आभार मानतों. या चरित्राला प्रस्तावना लिहिण्याचें कबूल करून श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं या वयांत इतकी विस्तृत प्रस्तावना, केवळ त्यांनाच साध्य झालेल्या विवेचक पद्धतीनें, लिहिली याबद्दल त्यांचेहि आभार मानणें हें मी आपलें कर्तव्य समजतों.

या चरित्राच्या प्रकाशनासाठीं अवश्य असणारें द्रव्य सध्यांच्या बिकट परिस्थितींत कसें उभें राहील या विवंचनेंत मी पुष्कळ दिवस होतों. प्रसिद्धिपूर्व मूल्य ठरवून नांवें नोंदण्याची योजना प्रसिद्ध केली नि त्या योजनेला पुरेसा पाठिंबा मिळाला नाहीं, तर आपण चरित्र-विषयाला उगीचच कमीपणा आणला असें होईल, या भीतीनें ही योजना जाहीर करण्याचा धीर मला कित्येक दिवसपर्यंत होईना; पण, अखेरीस ही योजना जाहीर करण्याला मी तयार झालों. महाराष्ट्रीय वाचकवर्गानें या योजनेला ज्या तत्परतेनें पाठिंबा दिला ती तत्परता पाहून माझें अंतःकरण कृतज्ञतेनें भरून आलें. अत्यंत बिकट प्रसंगीं महाराष्ट्रीय जनतेनें माझ्या कार्याला पाठिंबा दिला, असा हा दुसरा प्रसंग होय. त्या पहिल्या प्रसंगीं महाराष्ट्रीय जनतेबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठीं मी

जेथें जातों तेथें तूं माझा सांगाति ।
चालविशी हातीं धरूनियां ॥

हें संतवचन वापरलें होतें. त्याच वचनाचा फिरून एकवार उपयोग करून, मी महाराष्ट्रीय जनतेचेहि आभार मानतों.

या चरित्रग्रंथाच्या उद्योगांत गुंतल्यामुळें, गेल्या दीडदोन वर्षांत मला अनेक थोर देशभक्तांच्या सहवासाचा बौद्धिक आस्वाद अनुभवितां आला. यापुढील काळांत मी कोठेंहि असलों तरी आणि कांहींहि करीत असलों तरी, माझ्या मनांत दरवळून राहिलेला हा आस्वाद नाहींसा होईल, असें मला वाटत नाहीं. सावरकर व त्यांच्या तोडीचे भारतीय देशभक्त यांच्या चरित्रांचा अभ्यास करण्याची गोडी लागणें ही गोष्ट ' बहुत सुकृतांच्या जोडी ' मुळेंच घडणारी आहे ! केव्हां तरी केलेल्या ज्ञाताज्ञात सुकृतामुळें ही गोडी मला लागली, हा या जन्मांतील फार मोठा लाभ होय, असें मी तरी समजतों. मला काय अगर माझ्यासारख्या सामान्य शक्ति-बुद्धीच्या शेंकडों माणसांना काय, सावरकरहि होतां येणार नाहीं, टिळकहि होतां येणार नाहीं आणि बापटही होतां येणार नाहीं ! पण, देश परतंत्र आहे, तीस कोटी हिंदु दास्यांत व दैन्यांत आहेत, ही जाणीव चित्तांत सतत तेवत ठेवून, या दास्य-

विमोचनाच्या कार्यार्थ आपल्याला अल्पस्वल्प असें कांहीं तरी स्वशक्त्यनुसार निश्चित करतां येईल व तेवढें करून परतंत्र देशांतल्या सुशिक्षित माणसाचें कर्तव्य केल्याचें समाधानहि आपल्याला मिळवतां येईल हा बोध या चरित्रापासून घेतां आला, हें मी सुदैव समजतों. श्री ज्ञानेश्वर महाराजांनीं

परि गीताईश्वर भोळा। ले व्यासोक्ति कुसुममाळा ॥
माझिया दुर्वांदळा। ना न म्हणोचि ॥

या ओंवींत गीता–ईश्वराचें जें वर्णन केलें आहे तें राष्ट्ररूपी ईश्वरालाहि लागू पडणारें आहे. श्री ज्ञानेश्वरांच्या गीता–ईश्वराप्रमाणेंच राष्ट्ररूपी ईश्वरहि भोळा आहे. सावरकरांसारख्या थोर देशभक्ताच्या देशकार्याच्या कुसुममाळा तो ज्या आपलेपणानें स्वीकारतो त्याच आपलेपणानें, तुम्हीआम्हीं सामान्य लोकांनीं केलेल्या साध्याभोळ्या सेवेचें दूर्वादळहि तो स्वीकारतो ! तेवढें दूर्वादळ तरी राष्ट्ररूपी ईश्वराला सतत अर्पण करण्याचा आपण निश्चय केला तर, राष्ट्ररूपी ईश्वर आणि त्या ईश्वराच्या सेवेंत आयुष्याचा होम करणारे सर्व थोर देशभक्त यांना खरें समाधान वाटेल, एवढेंच म्हणून हें चरित्र मी वाचकांना सादर करतों.

सदाशिव पेठ, पुणें.
शके १८६५, अक्षय्य तृतीया
दि. ७ मे १९४३.

शि. ल. करंदीकर

———

# मध्यंतरींच्या घडामोडी

'सावरकर-चरित्र : कथन' हें पुस्तक प्रथम १९४३ मध्यें मे महिन्याच्या आरंभीं प्रसिद्ध झालें. संपूर्ण चार वर्षांनंतर आज तें पुस्तक पुनर्मुद्रित होत आहे. १९४२-४३ सालीं पुस्तकाचें लेखन व मुद्रण चालू होतें तेव्हांच, पुस्तकावर सरकारी अवकृपा होईल हें मला कळून चुकलें होतें. पुस्तकाचें मूल्य खूप कमी ठेवून, त्याचे आगाऊ ग्राहक नोंदविण्याची कल्पना मनांत ठाम करून ती मी कृतींत उतरविली याचें एक कारण असें होतें कीं, सरकारी अवकृपेचा आघात होण्यापूर्वींच पुस्तकाच्या शक्य तवढ्या अधिक प्रती खपाव्या व त्याचा भरपूर प्रचार व्हावा. पुस्तकाच्या प्रकाशनानंतर सुमारें पांच महिन्यांनीं मुंबई सरकारनें पुस्तक जप्त केल्याची आज्ञा प्रसिद्ध केली त्यावेळीं सरकारी अधिकाऱ्यांना माझ्या घरीं फक्त एकच प्रत मिळाली व एकंदरींतच त्यांना दहाबारा प्रतींहून अधिक प्रती मिळाल्या नाहींत ही गोष्ट माझा हेतु किती उत्तम प्रकारें सफल झाला होता याची साक्ष म्हणून सरकारी अधिकाऱ्यांच्याहि स्मरणांत राहील, असें मला वाटतें.

सरकारनें पुस्तक जप्त केलें तत्पूर्वींच मी या पुस्तकाच्या प्रती मुंबई विद्यापीठाच्या तर्खंड पारितोषिकासाठीं व दक्षिण महाराष्ट्र—साहित्य—पुरस्कार—समितीतर्फे जाहीर झालेल्या पारितोषिकासाठीं सादर केल्या होत्या. तर्खंड पारितोषिकासाठीं मुंबई विद्यापीठानें जी परीक्षकसमिति नेमलेली होती तिच्या सदस्यांकडे पुस्तकाच्या प्रती विद्यापीठाकडून धाडण्यांत आल्या. इतकेंच नव्हे तर परीक्षकांनीं आपला अभिप्रायहि सादर केला नि त्यानंतर पुस्तक सरकारजमा झाल्याची आज्ञा प्रसिद्ध झाली. ही आज्ञा थोडी अगोदर निघाली असती तर पुस्तकाच्या प्रती परीक्षकांपर्यंत पोंचल्याहि नसत्या कदाचित्! सरकारजमा झालेल्या या पुस्तकाला पारितोषिक देण्यांत येऊं नये असेंहि परीक्षकांना सुचविण्यांत आलें होतें. परंतु, त्यांनीं या बाबतींत योग्य तो आग्रह धरल्यामुळें व या बाबतींत होऊं पाहणाऱ्या अन्यायाला मुंबईचे श्री. भास्करराव तर्खंड जे. पी. यांनींहि विरोध केल्यामुळें, मुंबई विद्यापीठाच्या कारभारी मंडळानें अखेरीस या पुस्तकाला तर्खंड पारितोषिक देण्याचें मान्य केलें. या पुस्तकाचा अशा प्रकारें अभिमान धरल्याबद्दल मी तर्खंडपारितोषिकाची परीक्षक समिति, श्री. भास्करराव तर्खंड व विद्यापीठाचें कारभारीमंडळ या सर्वांचे मनःपूर्वक आभार मानतों. तर्खंड पारितोषिकाचा अनुकूल निकाल लागल्यामुळें, पुस्तकाला दक्षिण महाराष्ट्र साहित्य पुरस्कार समितीतर्फे पारितोषिक मिळण्याचा मार्गहि मोकळा झाला. तर्खंड पारितोषिकाचे रुपये दोनशें चाळीस व द. म. साहित्य पुरस्कार समितीतर्फे रुपये तीनशें अशा दोन्ही रकमा मला १९४५ सालच्या पावसाळ्यांत मिळाल्या.

हीं पारितोषिकें मिळून पुस्तकाचा गौरव झाला याचें फार मोठें श्रेय या पुस्तकाच्या कामीं मुंबई हायकोर्टानें दिलेल्या अनुकूल निर्णयाला द्यावें लागेल. मुंबई सरकारनें १९४३ च्या ऑक्टोबर महिन्यांत या पुस्तकाबाबत दोन हुकूम काढले. पुस्तकाचा प्रसार बंद करणें व पुस्तकाच्या प्रती जप्त करणें हा एका हुकुमाचा हेतु होता; हें पुस्तक मुद्रित करणाऱ्या पुण्याच्या लोकसंग्रह मुद्रणालयाकडून जामीन मागणें हा दुसऱ्या हुकुमाचा हेतु होता. या दोन्ही हुकुमांविरुद्ध हायकोर्टाकडे दाद मागणें शक्य होतें; पण, पहिल्या हुकुमाविरुद्ध दाद मागणें ही गोष्ट फारच खर्चाची व त्रासाची होती. म्हणून फक्त दुसऱ्या हुकुमाविरुद्ध दाद मागावी असें ठरून, त्याप्रमाणें, पुस्तकाचे मुद्रक श्री. वि. गं. केतकर यांनीं जामिनकीची रक्कम भरून हायकोर्टाकडे अर्ज केला. पुस्तक जप्त झाल्यानंतर सुमारें वर्षानें हा अर्ज हायकोर्टात सुनावणीस निघाला व न्या. मू. छागला, न्या. दिवेटिया व न्या. मू. लोकूर यांनीं जामीन मागणीचा सरकारी हुकूम रद्द केला ! मुंबईचे सुप्रसिद्ध कायदेपंडित, श्री. का. ना. अर्थात् बाबाराव धारप यांचा या पुस्तकाशीं प्रथमपासूनच निकटचा संबंध आलेला होता. हायकोर्टात अर्ज दाखल करण्यापासूनचें सर्व काम श्री. बाबाराव धारप यांनीं अत्यंत आत्मीयतेनें, निरलसपणानें व कौशल्यानें केलें. अर्जाची प्रत्यक्ष सुनावणी तीन दिवस चालली होती. पांडित्य, हजरजबाबीपणा, संयम, खंबीरपणा वगैरे गुण अंगीं असल्यामुळें श्री. बाबाराव धारप यांनीं या कामीं यश संपादिलें. श्री. बाबाराव धारप यांचे आभार मानावे तर तें औपचारिक दिसेल. पण, या प्रकरणांत त्यांनीं जें थोर कार्य केलें त्याचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणें हें माझें कर्तव्य आहे. वर्षभर प्रकृतीच्या अस्वास्थ्याच्या वेदना सहन करून श्री. बाबाराव धारप हे सुमारें तीन महिन्यांपूर्वी महाड येथें जाऊन राहिले आहेत. ईश्वरकृपेमुळें त्यांच्या प्रकृतींत हळुहळू सुधारणा होत आहे. लौकरच पूर्ण बरे होऊन श्री. बाबाराव धारप हे आपल्या कार्यक्षेत्रांत फिरून चमकूं लागावे व त्यांचें लोकोपकारी कार्य अखंड चालावें अशी माझी परमेश्वरापाशीं प्रार्थना आहे. महाराष्ट्राचे थोर नेते ने. ना. बाबासाहेब जयकर हेहि हायकोर्टात या पुस्तकाचें प्रकरण प्रविष्ट झाल्यापासून त्याच्याकडे अत्यंत आत्मीयतेनें पहात होते. त्यांनीं व्यक्त केलेल्या ममत्वाबद्दल व त्यांनीं केलेल्या मार्गदर्शनाबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

हायकोर्टानें सरकारी हुकूम रद्द केला व मुद्रणालयानें भरलेली जामिनकीची रक्कम परत देवविली. यामुळें, सरकार पुस्तक जप्त केल्याबद्दलचा हुकूमहि रद्द करील अशी अपेक्षा होती. पण सरकार आडमुठेपणानें वागलें व हा हुकूम रद्द होण्याचें लक्षण दिसेना ! या सरकारी आडमुठेपणामुळें वरील पारितोषिकांचा निकालहि कांहीं महिने कुचंबत पडला होता; पण, अखेरीस तो निकाल एकदांचा लागला व पारितोषिकांच्या रकमाही माझ्या पदरांत पडल्या ! जप्तीचा हुकूम रद्द व्हावा म्हणून मी एक-

वार मुंबईच्या गव्हर्नर साहेबांनाहि भेटलों ! पण, ‘पोलिटिकल’ खात्याच्या मर्जीपुढें गव्हर्नर साहेबांची सदिच्छाहि दुबळी ठरली ! आज ना उद्यां प्रांतांत लोकप्रातिनिधींचा कारभार सुरू होईल व तो झाला म्हणजे पुस्तकावरील जप्ती नाहींशी होईल अशी खात्री मला वाटत होती; आणि, गेल्या एप्रिल महिन्यांत प्रांताचा कारभार हातीं घेतांच, खेरमंत्रिमंडळानें जप्तीचा हुकूम रद्द केल्यामुळें, मला वाटत असलेली ही खात्री खरी ठरली. सुमारें अडीच वर्षें जप्त होऊन पडलेलें हें पुस्तक फिरून उजळ माथ्यानें समाजांत वावरूं लागलें. खेर मंत्रिमंडळानें या कामीं जी तत्परता व न्यायबुद्धि दर्शविली तिच्याबद्दल मी मंत्रिमंडळाचे मनःपूर्वक आभार मानतों.

या पुस्तकाच्या प्रती पूर्वींच खपून गेल्या असल्यामुळें, बंधमुक्त झालेलें हें पुस्तक वाचकांसाठीं पुनर्मुद्रित करणें मला अवश्य वाटूं लागलें. मुद्रणासाठीं लागणारा कागद वापरण्याची परवानगी मुंबई सरकारनें तत्परतेनें दिली. पण, मी स्वतः गेल्या मार्च महिन्यापासून अंथरुणाला खिळून पडल्याकारणानें, कागद प्रत्यक्ष हस्तगत करण्याच्या कामीं मला अनेक अडचणी अनुभवाव्या लागल्या. मुद्रणालयांतलें काम व तेथील कामगार यांच्या व्यस्त प्रमाणामुळें, पुस्तक छापून घेणें व तें शक्य तितक्या लौकर प्रसिद्ध करणें या गोष्टीहि सोप्या नव्हत्या: पण, पुणें येथील आदर्श मुद्रणालयाचे व्यवस्थापक, माझे मित्र श्री. न. वि. सरदेशपांडे व त्या मुद्रणालयांतील कामगारवर्ग या सर्वांनीं मनावर घेतल्यामुळें हें पुस्तक आज वाचकांच्या स्वाधीन करणें मला शक्य झालें आहे. श्री. सरदेशपांडे व त्यांचा सहकारी कामगारवर्ग या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. माझ्या सध्यांच्या प्रकृतिमानामुळें पुस्तकाच्या विक्रीची दगदगहि मला सोसतां येण्यासारखी नव्हती. या पुनर्मुद्रणाच्या विक्रीची जबाबदारी पत्करून पुण्याच्या मॉडर्न बुकडेपोचे व्यवस्थापक श्री. ना. त्र्यं. भिडे, बी. ए. यांनीं मला या दगदगींतून सोडविलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. पुनर्मुद्रणाच्या वेळीं पुस्तकाचें मूळचें मुखपृष्ठ बदलावें अशी कल्पना माझ्या मनांत बरेच दिवस घोळत होती. ती सिद्धीस नेण्याची सर्व जबाबदारी माझे मेहुणे, मुंबईचे कमार्शियल आर्टिस्ट चि. दिगंबर अच्युतराव साठे, यांनीं आनंदानें पार पाडली. मूळ पुस्तकांतला मजकूर प्रायः जशाच्या तसा पुनर्मुद्रित केलेला आहे. फक्त पहिल्या प्रकरणांतील तीन चार पानें मजकूर गाळलेला आहे. पहिल्या आवृत्तींत या प्रकरणांत गांधीवादावर टीका करण्यांत आलेली होती. ही टीका या ठिकाणीं अप्रस्तुत ठरेल असें स्वतः स्वातंत्र्यवीर सावरकर यांनीं मला सांगितलें होतें; व पुस्तक प्रसिद्ध झाल्यावर त्याचीं जीं परीक्षणें प्रसिद्ध झालीं त्यांतहि हाच आशय व्यक्त झाला होता. या ठिकाणीं गाळलेली ही टीका ‘सावरकर-चरित्र-विवेचन’ या पुढील भागांत समाविष्ट करण्यांत येईल.

हें मराठी पुस्तक प्रसिद्ध होत आहे त्याच वेळीं बडोदें मुक्कामीं या पुस्त-

काचा गुजराथी अनुवादहि प्रसिद्ध होत आहे. यानंतरच्या वर्षाभराच्या अवधींत या पुस्तकाचें इंग्रजी व हिंदी भाषांतरहि प्रसिद्ध होईल, अशी आशा वाटत आहे. जनताजनार्दनाच्या कृपेनें ही आशा सफल होईल, असा विश्वास वाटतो.

दिनांक २८ मे १९४७
सदाशिव पेठ, पुणें २

शिवराम लक्ष्मण करंदीकर.

---

# अनुक्रमणिका



———

# चित्रसूचि







# अर्पण-पत्रिका

हिंदु देशवीरांच्या कुटुंबांतील स्त्रियांच्या अज्ञात हौतात्म्याच्या गौरवार्थ
ती. सौ. यमुनाबाई सावरकर यांना.



तसेच, हिंदुराष्ट्राच्या आशास्थानीं असणाऱ्या हिंदु बालबालिकांच्या गौरवार्थ
चि. कु. प्रभा ( त ) ताई व चि. विश्वास सावरकर यांना,
अनुक्रमें, सादर व सप्रेम समर्पण.

# स्वातंत्र्यवीर

# सावरकर यांचें चरित्र

## प्रकरण १ लें

## कुलवृत्त, जन्म व बाल्य

जन्मासी बाल तें येतां, गगनीं सुमवर्ष ते।
थवे दिव्यविमानांचे दाटले अथवा न ते।।

प्राचीन पूज्य गोत्रर्षी आशीर्वाद वदूं स्वयें।
गंधर्वसंघ वा गाऊं तदा ये अथवा न ये।।

मुलाचें मुख वात्सल्यें चुंबण्यांताचि गुंतलीं।
नभीं तें चुकलीं देखूं तीं मातापितरें जरी।।

तथापि सुतजन्माची जी प्रीत्युत्कटता तधीं।
होय हर्म्यीं अयोध्येच्या दुंदुभींतुनि गाजती।।

सामान्य मायबापांच्या त्या सामान्याहि कीं घरीं।
प्रीत्युत्कटत्व तैसेंची असामान्य, मुकें जरी।।

—गोमांतक : पूर्वार्ध : १०२–१०६.

देशभक्त विनायक दामोदर सावकर यांचें असामान्य चरित्र लिहिण्याला प्रवृत्त होणाऱ्या पुष्कळशा भारतीयांची बुद्धि श्रीरामचंद्रपांडवप्रभृति पौराणिक पुरुषश्रेष्ठांकडे ओढ घेऊं लागली तर ती गोष्ट अगदीं क्षम्य व स्वाभाविक आहे. बुद्धासारख्या त्यागवीरापासून टिळकांसारख्या कर्मवीरापर्यंतच्या अनेक पुरुषश्रेष्ठांना 'भगवान्' या अतिमानुषत्वदर्शक शब्दानें गौरवावें व त्या सर्वांची 'अवतार' म्हणून संभावना करावी हें भारतीय हिंदूंच्या बुद्धीला लागलेलें सनातन वळण आजच्या शास्त्रीय शतकांतहि फारसें बदललेलें नाहीं. अंदमानांत वर्षानुवर्ष कष्टमय जीवन कंठणाऱ्या त्यागी हिंदु देशभक्तांनीं जे आत्मचरित्रपर वृत्तांत लिहून ठेविले आहेत त्यांतहि त्यांनीं

स्वतःचें साम्य प्रभु रामचंद्रादिकांशीं कल्पिलेलें असल्यामुळें[१] त्यांचीं चरित्रें लिहिणाऱ्या लेखकांनीं तेंच साम्य पुढें रेटीत न्यावें हें क्रमप्राप्तच आहे. इतर भारतीय क्रांतिकारकांच्या बाबतींत क्रमप्राप्त ठरणारा हा प्रकार देशभक्त विनायकराव सावरकर यांच्या संबंधांत विशेषच क्रमप्राप्त ठरण्याजोगा आहे. इक्ष्वाकु वंशांतले अन्य राजे व श्रीरामचंद्र यांच्यामधील भेद वर्णन करणाऱ्या भवभूतीनें

पुत्रसंक्रांतलक्ष्मीकैर्यद् वृद्धेक्ष्वाकुभिर्धृतम् ।
धृतं बाल्ये तदार्येण पुण्यमारण्यकं व्रतम् ।।

हा श्लोक लिहिला आहे. त्या श्लोकांतील सूचना ज्यांना तंतोतंत लागू पडते त्या विनायकरावजी सावरकरांनीं अंदमानादि कारावासाच्या वनवासांत तेरा वर्षें—म्हणजे प्रभुरामचंद्राच्या विवासनकाळाहून अवघें एकच कमी वर्ष—काढिलीं ! धर्मादि पांडवांनीं वनवास व अज्ञातवास मिळून एकंदर तेरा वर्षांचा काळ कष्टांत काढिला. सावरकरांना १०–११ वर्षांचा अंदमानवास, तीन–साडेतीन वर्षांचा कारावास व त्यानंतर तब्बल तेरा वर्षें रत्नागिरी येथें अज्ञातवास–मिळून उणींपुरीं २६—२७ वर्षें हाल-अपेष्टांत घालवावीं लागलीं आहेत बरें, सरकारनें त्यांच्या अज्ञातवासासाठीं जो भूभाग निवडला तोहि असा कीं, त्यायोगें त्यांच्यासंबंधींची अतिमानुपत्वाची कल्पनाच वृद्धिंगत व्हावी ! ब्रह्मदेशचे थिबा राजे यांना ब्रिटिश सरकारनें ब्रह्मदेशांतून हद्दपार केल्यावर त्यांचें वास्तव्य शेवटपर्यंत रत्नागिरीस होतें ही गोष्ट अनेकांच्या स्मरणांत असेल व रत्नागिरीस असलेला थिबा राजांचा राजवाडा या गोष्टीची साक्ष अद्यापहि देत आहे ! पुष्कळांच्या लक्षांत नसलेली—व लक्षांत न येणारी—एक पौराणिक हकीकतहि प्रस्तुत म्हणून या ठिकाणीं सांगण्यासारखी आहे. वामनानें केलेल्या सशस्त्र क्रांतीमुळें साम्राज्याला पारखा झालेला बलिराजा आपलें उरलेलें आयुष्य रत्नागिरी—राजापूर या भागांतच—म्हणजे, सशस्त्र क्रांतीच्या प्रयत्नानें ब्रिटिश साम्राज्य खिळखिळें करूं पाहणारा हा देशभक्त ज्या भागांत निर्वासित म्हणून ठेवण्यांत आला होता त्याच भागांत—कंठीत होता, असें मत पं. श्री. दा. सातवळेकर यांनीं प्रतिपादिलें आहे.[२]

अवतारी विभूतींच्या जीवनावर जें अद्भुतत्वाचें व अतिमानुपपणाचें आवरण घालण्यांत येतें तें घालून सावरकरांचें चरित्र चित्रित करणें ही गोष्ट अशा अनेक

१ राजनैतिक कारस्थान : द्वितीय खंड, चतुर्थ मंडल, पृ. १४५ : बारींद्रकुमार घोष यांच्या वृत्तांतांतील उतारा : श्रीरामचंद्राप्रमाणेंच आम्हांस वनवास प्राप्त झाला होता; परंतु त्यांच्यांत व आमच्यांत फेर काय तो एवढाच कीं, आमच्याकरितां स्वयंपाक तयार करणारी पतिवत्सल सीतादेवी कोणी बरोबर नव्हती, त्याप्रमाणेंच लक्ष्मणासारखा भ्रातृवत्सल बंधूहि नव्हता. जंगलांतून मधुर फळफळावळ तोडून व वेंचून आणून देणारी वानरसेनाहि आमच्याजवळ नव्हती !

२ जीवनप्रकाश : पृ. १७५.

कारणांमुळें क्षम्य अगर स्वाभाविक ठरणारी असली तरी, चरित्रलेखनाची ही प्रवृत्ति प्रस्तुत लेखकाला तत्त्वतःच संमत नाहीं. अवतारकल्पना मूळ कोणत्याहि कारणामुळें निघाली असो, त्या कल्पनेवर विसंबून राहण्याला संवकलेल्या हिंदुसमाजानें स्वतःचें अपरिमित नुकसान करून घेतलें आहे, असें प्रस्तुत लेखकाचें म्हणणें आहे. आम्ही आपल्या नेभळेपणानें, स्वार्थीपणानें व विवेकभ्रष्टतेनें धर्माची ग्लानि होऊं द्यावी व अधर्माचें अभ्युत्थान होऊं द्यावें; आणि, आम्हीं हा आत्मघात करून घेतल्या-बरोबर परमेश्वरानें अवतार घेऊन आम्हांला सांवरून धरावें, ही जी श्रमविभागणी आम्हीं केली आहे, ती आमच्या नाकर्तेपणावर पांघरूण घालणारी व परमेश्वराच्या पदरीं मूर्खपणा बांधणारी आहे. हिंदुसमाजाचें टिकाऊ कल्याण व्हावें असें ज्याला मनःपूर्वक वाटत असेल त्या प्रत्येकानें ही श्रमविभागणीची कल्पना पायासकट उप-टून टाकण्याला प्रवृत्त झालें पाहिजे, असें प्रस्तुत लेखकाला वाटतें. यासाठीं, अवतारी पुरुषांच्याहि चरित्रांचें चित्रण मानवी प्रमाणांत व स्वरूपांत करावयाला पाहिजे असें प्रस्तुत लेखकांचें मत. असल्यामुळें, आपल्यासमोर वावरणाऱ्या कोणाहि व्यक्तीच्या चरित्राचें 'देवीकरण' करण्याला तो तयार होणार नाहीं. स्वतः सावरकर ज्या बुद्धिवादाचे उपासक आहेत त्या बुद्धिवादाची वंचना करावयाची नसेल तर, सावर-करांच्या अद्भुत व असामान्य चरित्राचें मानवी स्वरूप कायम ठेवणेंच अवश्य आहे. प्रस्तुत प्रकरणाच्या शिरोभागीं सावरकरांच्या 'गोमातक' काव्यांतले जे चरण उद्धृत करण्यांत आले आहेत ते एका अर्थी आत्मवृत्तांतपर आहेत. त्या चरणांत जी सूचना आहे ती दृष्टीसमोर ठेवूनच सावरकरांच्या चरित्राचा चित्रपट उलगडून दाखविणें हितावह ठरेल, अशी प्रस्तुत लेखकाची दृढ श्रद्धा आहे.

सावरकर घराण्याचा अंतर्भाव महाराष्ट्रांतल्या चित्तपावन ब्राह्मण समाजांत होतो. हें घराणें वासिष्ठ गोत्री आहे. चित्तपावन ब्राह्मण समाजांतल्या व्यक्तींची १४ गोत्रांत म्हणजे कुळांत विभागणी करण्यांत आली, तेव्हांपासून 'वासिष्ठ' हें गोत्र किंवा कुळ प्रसिद्ध आहे. पुढें या १४ कुळांचा विस्तार होऊन जीं साठ कुळें अस्तित्वांत आलीं त्यांतलीं साठे, बोडस, वोक[ओक], बापट, बागुल, धारू, गोगटे, भाभे, पोंगशे, विंझे, साठ्ये व गोवंडे हीं बारा कुळें वासिष्ठ या एका कुळाच्या पोटां-तून निघालीं.[१] चित्तपावनांच्या कुळांचा विस्तार यापुढें कसा होत गेला—किंवा, कसा होत गेला असावा—याविषयींची कांहीं मनोरंजक माहिती इतिहासाचार्य कै० राजवाडे यांनीं 'ठेंगें मत' या निबंधांत दिली आहे.[२] चित्तपावनांच्या १४ गोत्रांतून निर्माण झालेल्या ६० कुळांचा विस्तार होत होत त्यांचीं २०३ आडनांवांचीं कुळें बनण्याला जो काळ लागला त्या अवधींत वासिष्ठगोत्रोत्पन्न १२ शाखांना नवे १९ कोंभ फुटले, असें दिसतें. हीं जीं नवीं १९ आडनांवें किंवा कुटुंबनामें रूढ झालीं त्यांतलीं कोण-

१ भा इ. सं. मंडळ ग्रंथमाला, पुस्तक ६ : राजवाडे यांचा निबंध : पृ. १७.
२ भा. इ. सं. मंडळ ग्रंथमाला, पुस्तक ९ वें.

कोणतीं मूळ १२ पैकीं कोणत्या आडनांवांतून उत्क्रांत झालीं याचा पत्ता लागलेला आढळत नाहीं. कारलेकर, दातार, दांडेकर, पेठे, घारपुरे, पर्वते, अभ्यंकर, दात्ये, मोडक, सावरकर, भातखंडे, वैद्य, विनोद, दिवेकर, नातू, महाबळ इ० आडनांवें वासिष्ठ गोत्री आहेत. हीं आडनांवें शक १२०० पासून शक १४०० पर्यंतच्या काळांत क्रमाक्रमानें प्रचारांत आलीं असावीं, असा तर्क इतिहासाचार्यांनीं लढविला आहे.

इतिहाससंशोधनाच्या खोल पाण्यांत शिरण्याची प्रस्तुत लेखकाची इच्छा नसल्यामुळें अगर सावरकर–घराण्याचा सुसंगत कुल-वृत्तांत बनविणें हें त्याचें उद्दिष्ट नसल्यामुळें, मूळच्या बारा वासिष्ठगोत्री कुलांपैकीं कोणत्या कुळांतून सावरकर घराणें निघालें या प्रश्नाचा ऊहापोह करण्याचें त्याला कारण नाहीं. सावरकर हें आडनांव या कुटुंबाला मिळालें तें कोंकणांतच मिळालें, हें मात्र निर्विवाद आहे. खुद्द सावरकरांच्या घरांत जी ऐकीव माहिती प्रचलित आहे तिचा या तर्काला आधार आहे. धोपावकर व सावरकर हीं जीं दोन घराणीं, भट व भानू या प्रसिद्ध घराण्यांप्रमाणें, कोंकणांतून घांटावर सहकारितेनें आलीं त्यांपैकीं धोपावकर घराण्यांतली मंडळीहि असेंच सांगतात कीं, हीं दोन्ही आडनांवें मूळ कोंकणांतच रूढ झालेलीं होतीं. आज कोंकणाबाहेर जितके सावरकर आढळतात त्या मानानें बरेच सावरकर कोंकणांत—विशेषतः चिपळूणनजीक गुहागर तालुक्यांत–आढळतात. खरे–कुल–वृत्तान्त या पुस्तकांत जे ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध झालेले आहेत त्यांपैकीं क्रमांक २९ हा कागद[1] श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे यांच्या काळचा शके १६७८ मधील [ इ० स० १७५६ ] आहे.

> *‘वेदमूर्ति रा. महादेव दीक्षित बिन हरि दीक्षित उपनाम सावरकर गोत्र वाशिष्ठ सूत्र हिरण्यकेशी व नारायणभट बिन काशीनाथभट उपनाम खरे गोत्र कौशिक सूत्र हिरण्यकेशी गुहागरकर हल्लीं वस्ती मौजे भगूर’ या ‘थोर सत्पात्र’ ब्राह्मणांच्या कुटुंबांचा योगक्षेम चालावा म्हणून या दोन ब्राह्मणांना राहुरी गांव ‘नूतन इनाम’ करून*

दिल्याबद्दलचा हा कागद आहे. यांत मौज अशी आहे कीं, नारायणभट खरे हे वस्तुतः धोपावकर खरे असूनहि त्यांची ओळख त्यांच्या धोपाव [किंवा धोपावें ?] या गांवावरून करून देण्यांत आलेली नसून, खऱ्यांचें मूळ वसतिस्थान गुहागर असे मानून, त्या गांवावरून या वेदमूर्तींची ओळख करून देण्यांत आलेली आहे. महादेव दीक्षित सावरकर यांची ओळख कोणत्याहि मूळ गांवाच्या आश्रयानें करून देण्यांत आलेली नाहीं, हा मुद्दा महत्त्वाचा आहे. यावरून निष्कर्ष निघतो तो असा कीं, नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दींत घांटावर आलेले सावरकर हे नुसते सावरकर म्हणूनच ओळखले जात होते; अमूक गांवचे सावरकर असें सांगण्याला मूळ गांवाचें स्मरण जितकें स्पष्ट असावें लागतें तितकें त्या काळींहि उरलेलें नव्हतें.

---

१ खरे–कुल–वृत्तान्त : पृ. ४०,

स्वतः सावरकरांनीं लिहून ठेविलेल्या आत्मचरित्रांत त्यांनीं आपल्या कुल-कथेचा निर्देश केला असला तरी तो पुष्कळसा तांत्रिकच आहे. गुहागर पेट्यांतल्या पालशेत गांवीं 'सांवरवाडी' हें एक ठिकाण आहे; त्यावरून सावरकर हें नांव पडलें, अशी ऐकीव माहिती त्यांनीं नमूद करून ठेविली आहे. निमये—लिमये हें मूळ आड-नांव असणाऱ्या आम्हा करंदीकरांच्या कुळनांवाच्या कथेशीं सावरकर या कुळ-नांवाच्या कथेचें पुष्कळसें साम्य दिसतें. एका गांवांत एकाच उपनांवाचीं अनेक कुटुंबें नांदत असलीं कीं, व्यवहारांत त्यांचें परस्परभिन्नत्व व वैशिष्ट्य सूचित करण्यासाठीं अनेक उपाय योजावे लागतात; व व्यवहारसौकर्य कशाहि उपायानें साधण्याची मानवी मनाला संवयच असल्यामुळें, असे उपाय सहज सुचतात. पालशेत गांवांतल्या सांवर-वाडी या ठिकाणांत पूर्वी सांवरीचीं—म्हणजे शेंवरीच्या कापसाचीं—झाडें विपुल असावीं व त्यामुळें त्या ठिकाणाला सांवरवाडी हें वैशिष्ट्यसूचक नांव मिळालें असावें. त्या ठिकाणाच्या सन्निध वास्तव्य असणाऱ्या अगर त्या ठिकाणाचें स्वामित्व उपभोग-णाऱ्या कुटुंबाला सांवरवाडीकर—सौकर्यार्थ संक्षेपानें सांवरकर—हें नांव मिळालें असावें व तेंच व्यवहारांत रूढ होऊन मूळचें आडनांव मागें पडलें असावें, असा संभव दिसतो. सध्यां सावरकर या आडनांवांतलें आद्याक्षर निरनुस्वार लिहिण्याची पद्धत पडली आहे हें खरें असलें तरी, विनायकराव सावरकरांचे बालपणांतील जिवलग स्नेही कै. देशभक्त गोपाळराव देसाई यांनीं आपल्या कीर्तिमान् मित्राच्या ज्या आठवणी लिहून ठेविल्या आहेत त्यांत हें आद्याक्षर प्रायः सानुस्वारच लिहिलेलें आहे, ही गोष्ट या ठिकाणीं सांगून ठेवण्यासारखी आहे.

सावरकर हें आडनांव अशा प्रकारें व्युत्पादितां आलें तरीहि एक महत्त्वाचा प्रश्न अनिर्णीत स्वरूपांतच शिल्लक राहतो. वासिष्ठ गोत्रांत समाविष्ट झालेलीं जीं मूळचीं ११—१२ कुळें त्यांतल्या नेमक्या कोणत्या कुळांतून सावरकर निघाले हा प्रश्न स्पष्ट-पणें उलगडत नाहीं. सध्यां गुहागर तालुक्यांत नांदत असलेल्या प्रमुख चित्तपावन कुटुंबांची जी अल्पस्वल्प माहिती प्रस्तुत लेखकाला मिळालेली आहे ती अशी आहे कीं दामले, खरे, पटवर्धन, गद्रे, ओक, परचुरे, बापट, नेने, रानडे, सोमण, केळकर, भागवत, वैद्य, गोळे प्रभृति कुटुंबें त्या भागांत नांदत असून, बाहेरहि त्यांचा वंश-वेल पुष्कळच विस्तारलेला आहे. त्या भागांत सावरकरहि नांदत आहेत हें यापूर्वी सांगण्यांत आलेंच आहे. गोत्रदृष्ट्या विचार केला तर असें निष्पन्न होतें कीं, सावर-कर हे मुळांत बापट तरी असावे अगर ओक तरी असावे. गुहागर पेट्यांत बापट घराणें असलें तरी त्याचें प्रमाण बरेंच अल्प आहे. विस्तार, प्रतिष्ठा, पुरातनत्व इत्यादि दृष्टींनीं या भागांत असलेलें ओक घराणेंच बापट घराण्याच्या मानानें जास्त सुस्थिर दिसतें. त्या भागांतले कांहीं ओक हे वतनदार देशमुखहि आहेत. या देशमुखीचा संबंध राघोबादादा पेशव्यांचें कुटुंब आनंदीबाई यांचें माहेर या भागांत होतें, या अनु-संधानानें उलगडून दाखविणें क्वचित् शक्य ठरेल हें लक्षांत घेऊनहि असें मान्य

करावें लागतें कीं, वासिष्ठगोत्री ओक घराणें कोंकणच्या या भागांत फार दिवस नांदत आलें आहे. खरे-कुल-वृत्तांत या पुस्तकांत केशव पांगरकर वोक या[1] नांवाचा एक इसम त्या भागांतून पुणें प्रांतीं आल्याचा उल्लेख आढळतो. या उल्लेखांतील 'पांगरकर' या शब्दावरून अशी सूचना मिळते कीं, ओक घराणें त्या भागांत बरेंच विस्तारलें असल्यामुळें, त्यांतिल शाखोपशाखांचें वैशिष्ट्य निर्दिष्ट करण्यासाठीं त्यांच्या आड-नांवाला आणखी कांहींतरी जोड देण्याची जरूरी त्या काळींच भासूं लागली होती. हा केशव ओक 'पांगरकर' होता याचा अर्थ एक असा तरी आहे कीं, तो पांगारी या गांवचा रहिवासी होता; किंवा त्याचा दुसरा अर्थ असा संभवतो कीं, पांगाऱ्याचीं झाडें ज्या ठिकाणांत विपुल आहेत अशा ठिकाणानजीक तो रहात असावा वा त्या ठिकाणाचें स्वामित्व तो उपभोगीत असावा. या पांगरकर केशव ओकाच्या नांवा-वरून निष्पन्न होणारा तर्क व वर दिलेली विचारपरंपरा यांच्या साहाय्यानें प्रस्तुत लेखकानें असें अनुमान बसविलें आहे कीं, सावरकर हे मुळांत ओक असावे.[2]

सावरकर व धोपावकर या दोन घराण्यांतील विद्वान् ब्राह्मण भगूर येथें राहात होते व नानासाहेब पेशव्यांच्या कारकीर्दींत भगूरनजीक नदीपलीकडे असलेला राहुरी गांव त्या उभयतांना इनाम म्हणून देण्यांत आला, ही हकीकत यापूर्वी दिली आहे. नाशिकच्या धोपावकर मंडळींकडून या इनामासंबंधींची कांहीं दंतकथात्मक माहिती मिळाली. मराठ्यांचा कोणी एक सरदार भगूरमार्गानें निजामहद्दींत मोहिमेवर चालला होता. मोहिमेंत सहज यश मिळेल असा विश्वास वाटत नसल्यामुळें तो कांहींसा फिकिरींत होता. इतक्यांत त्याला असें कळलें कीं, गांवांत कोणी तपोनिष्ठ ब्राह्मण राहात असून त्याचा आशीर्वाद फलप्रद ठरतो, असा लोकांचा अनुभव आहे. ही माहिती मिळाल्यावर, तो सरदार धोपावकर घराण्यांतल्या त्या सत्पुरुषाच्या दर्शनाला गेला व त्याचा शुभाशीर्वाद मिळवून मग तो पुढें स्वारीवर गेला. मोहीम यशस्वी झाल्यामुळें त्याला या सत्पुरुषाच्या आशीर्वादाची महती वाटूं लागली व परतीच्या वेळीं तो मुद्दाम भगूर येथें थांबला. सत्पुरुषाच्या दर्शनाच्या वेळीं त्यानें अशी विनंति केली कीं, महाराजांनीं पुण्यास चलावें; तेथें कांहीं तरी इनाम देण्याची आपण व्यवस्था करूं. हे सत्पुरुष स्वतः निरिच्छ असल्यामुळें त्यांनीं पुण्यास जाण्याला नकार दिला; पण, सावरकर घराण्यांतला कोणी पुरुष या साधूचा शिष्य म्हणून जवळ होता; त्याला मात्र त्यानें पुण्यास धाडिलें. हा शिष्य पुण्यास गेल्यावर राहुरी गांव इनाम देण्यांत आला. हा इनाम गांव सावरकर व धोपावकर–खरे या उभय-तांच्या नांवें मिळाला व चालला याचें कारण असें कीं, हीं दोन घराणीं कोंकणांतून

---

१ पृ. ५८.

२ श्री. विनायकराव सावरकर यांना असें अंधुक स्मरण आहे कीं, त्यांच्या लहानपणीं घरांतल्या कांहीं वृद्ध स्त्रिया 'अरे तुम्ही बापट' असें म्हणत. ओक कीं बापट, हा प्रश्न आतां कुलवृत्तांतलेखकांनीं संशोधावा !

आलीं तेव्हांच त्यांच्या दरम्यान उभयतांनीं सर्व प्राप्ति एकत्र करावी व ती आपापसांत निम्मेनिम वांटून घ्यावी, असा संकेत ठरला होता. सावरकर यांनीं आपल्या आत्मचरित्राचा जो भाग लिहून ठेविला आहे त्यांत भगूरला येऊन प्रथम वास्तव्य करणाऱ्या आपल्या पूर्वजाचें नांव हरभट असें सांगितलें आहे. १७५६ सालीं मिळालेल्या इनामाचा वर जो उल्लेख आला आहे त्यांत इनाम मिळविणाऱ्या सावरकर घराण्यांतल्या पुरुषाचें नांव महादेवभट बिन हरभट असें आहे. त्यावरून असा निष्कर्ष निघण्यासारखा आहे कीं, सावरकर–धोपावकर हीं घराणीं कोंकणप्रांत सोडून नाशिकप्रांतीं स्थिर झालीं तीं पहिल्या बाजीरावसाहेबांच्या काळांत स्थिर झालीं असावीं. राहुरी गांवच्या इनामाबद्दलच्या कागदांतला कांहीं भाग वर उद्धृत केला आहे त्यांत महादेवभट व हरभट या दोघांहि पुरुषांना 'दीक्षित' ही पदवी लावण्यांत आलेली आहे. त्यावरून असें निष्पन्न होतें कीं, यज्ञदीक्षा घेणाऱ्या व वेदशास्त्रांच्या अध्ययनांत पारंगत असलेल्या पुरुषांची परंपरा या घराण्यांत चालू होती.

सावरकर घराण्यांतलि कर्त्या पुरुषांची बुद्धि इतउत्तरच्या काळांत राजकारणी कामकाज व उलाढाली यांकडेहि वळली असली तर त्यांत आश्चर्य मुळींच नाहीं! स्वातंत्र्य व स्वराज्य यांचा माहिमाच असा आहे कीं, त्यांच्यामुळें सामान्य बुद्धीहि पल्लेदारपणानें चौफेर विहरते व कर्तृत्व गाजविण्याच्या नव्यानव्या संधी त्या बुद्धीच्या आटोक्यांत येऊं लागतात. पानिपतचा प्रसंग, थोरले माधवरावसाहेब पेशवे यांची करडी कारकीर्द, बारभाईंचें कारस्थान व सवाई माधवराव पेशव्यांच्या म्हणजेच नाना फडणिसांच्या कर्तृत्वाचा काळ, या चाळीसपन्नास वर्षांच्या अवधींत सावरकर घराण्यांतलि पुरुषांनीं कोणकोणत्या क्षेत्रांत काय काय करामत केली याची संशोधनबुद्धीनें निश्चिति करण्याचा उद्योग प्रस्तुत चरित्रलेखकाला हातीं घेतां आला नाहीं. पण, प्रस्तुत लेखकाचे एक हितचिंतक, प्रसिद्ध इतिहाससंशोधक श्री. शंकरराव जोशी वांईकर यांनीं मोठ्या परिश्रमानें काढून दिलेले दुसऱ्या बाजीराव पेशव्यांच्या काळचे कांहीं उल्लेख सूचक आहेत. बळवंतराव रामचंद्र सावरकर हे गृहस्थ पुण्यास हुजूर कारकून होते व १८११ सालीं विजयादशमीच्या प्रसंगीं श्रीमंत बाजीरावसाहेब यांना सोनें देण्याच्या प्रसंगीं ज्या मुत्सद्द्यांनीं व सरदारांनीं सोनें दिलें त्यांत बळवंतराव सावरकरांनीं एक मोहोर दिली, असा उल्लेख वाड-रोजानिशींत[१] आढळतो. याच कारकीर्दींत, परशुरामपंत सावरकर या नांवाचे कोणी पुरुष पुणें दरबारांत बऱ्याच योग्यतेस चढले असावे असें राजवाडे यांच्या ऐतिहासिक लेखसंग्रहांतल्या[२] पुढील उल्लेखावरून दिसतें. पेशवे व इंग्रज यांच्यामधील युद्धप्रसंग प्रायः टळत नाहीं असें दिसूं लागलें होते. पेशव्यांचे सेनाधुरंधर बापू गोखले हे सर्व तयारीनिशीं सिद्ध झाले होते व इंग्रजांची फौजहि खडकीजवळ गोळा झाली होती. युद्धप्रसंग टाळण्याचा शेवटचा यत्न करण्याच्या उद्देशानें अल्पिष्टनसाहेबाकडे

१ पृ. २७३ २ खं. ४, पृ. १५४.

दि. ५-९-१८१७ रोजीं विठोजी नाइक गायकवाड व परशरामपंत सावरकर यांना धाडिलें. इंग्रजांनीं आपली फौज मागें घेऊन ती घोडनदी येथें ठेवावी, असें या मराठा प्रतिनिधींनीं अल्पिष्टनसाहेबास कळविलें.

पेशवेदप्तराच्या संशोधनाचें व संपादनाचें काम सुरू झाल्यावर कांहीं दिवस श्री. यशवंत नरसिंह अर्थात् अण्णाराव केळकर हे त्या कार्यात गुंतले होते. त्या अवधींत हजारों जुने कागदपत्र वाचण्याची संधि त्यांना मिळाली. अशा कांहीं कागदपत्रांत वाचलेली, सावरकरवंशांतल्या एका गृहस्थाची माहिती त्यांच्या स्मरणांत राहिली व ती त्यांनीं प्रस्तुत लेखकाला एकदां सहज सांगितली. आपल्यापुढें आतां पळापळीचा प्रसंग उभा राहणार आहे हें जेव्हां दुसऱ्या बाजीराव पेशव्यांना स्पष्टपणें दिसूं लागलें तेव्हां त्यांनीं कुटुंबांतील स्त्रियांच्या संरक्षणाचें काम कांहीं विशेष विश्वासू माणसांवर सोंपविलें. त्या माणसांत कोणी एक सावरकर नांवाचे इसम होते. विनायकराव सावरकरांच्या अप्रकाशित आत्मवृत्तांत दुसऱ्या बाजीराव पेशव्यांचा उल्लेख एके ठिकाणीं आलेला आहे. शेवटच्या बाजीरावाची 'पळपुटी पायधूळ' भगुरास लागली होती व भगूरच्या मुक्कामांत बाजीरावानें हिरव्या हरभऱ्यांच्या सोल्यांची खमंग उसळ खाल्ली, ही ऐकीव माहिती सावरकरांनीं लिहून ठेविली आहे. श्री. केळकर यांनीं स्मरणानें सांगितलेली हकीकत व स्वतःच्या स्मरणांत असलेली सावरकर यांनीं लिहून ठेविलेली हकीकत यांचा मेळ घालून असा निष्कर्ष काढतां येण्यासारखा आहे कीं, सावकार म्हणून धोपावकर घराणें जसें पेशवाईच्या शेवटापर्यंत पेशव्यांना महत्त्वाचें वाटत राहिलें तसें सावरकर घराणेंहि विश्वासू म्हणून पेशव्यांना महत्त्वाचें वाटत असावें.

खुद्द सावरकरांचें घराणें जसें पेशवाईच्या उत्तरार्धात राजकारण, मुत्सद्देगिरी, पराक्रम इत्यादि गुणांशीं निगडित झालेलें दिसतें, त्याप्रमाणेंच, विवाहसंबंधामुळेंहि या घराण्याचा संबंध कर्तृत्ववान् घराण्यांशीं जडत गेलेला दिसतो. या संबंधींचें एक उदाहरण सावरकरांनीं सांगितलेलें आहे. विनायकरावांचे वडिल दामोदरपंत यांचे मातामह हे एक पटाईत, नाणावलेले वीर होते व त्यांच्या पदरीं मक्राणी स्वारांचें एक पथक होतें. भोंवतालच्या देशांत झालेलें लुटारूंचें बंड मोडण्याची कामगिरी त्यांच्यावर सोपविण्यांत आल्यावर, हें पथक घेऊन ते लुटारूंवर चाल करून गेले; व लुटारूंचा मोड केल्यावर ते परत आले तेव्हां येतांना त्यानीं त्या लुटारूंच्या मुख्य आराध्य देवतेची मूर्ती बरोबर आणली. दामोदरपंतांच्या आजोळची ही अष्टभुजा देवीची मूर्ती पुढें सावरकरांच्या घरांत आली व तीच पुढें सावरकरांची कुलदेवता म्हणून मान्यता पावली.[१] अशा उभयविध मार्गांनीं भगूरच्या सावरकर घराण्यांत

---

[१] वरील हकीकत सावरकरांच्या अप्रकाशित आत्मचरित्राच्या आधारें दिली आहे. दे. भ. गणेशपंत सावरकर यांनीं लिहून धाडिलेल्या आठवणींत ह माहिती भिन्न स्वरूपांत आढळते. थोरले माधवरावसाहेब पेशवे यांचे समकालीन त्रिसाजी हरि

स्वदेशाच्या जिवंत राजकारणाची परंपरा भिनून गेली असल्याचें दृश्य पेशवाईचा अंत होण्याच्या सुमारास दिसतें.

बाजीरावसाहेबांनीं राज्याची सोडचिठ्ठी इंग्रजांना लिहून दिली व ते इंग्रज सरकारचे पेन्शनर बनून ब्रह्मावर्तास जाऊन राहिले. पेशव्याची ही ब्याद ब्रह्मावर्तासारख्या दूरस्थ ठिकाणीं डांबून ठेवलेली असली आणि पेशव्याच्याकडून जिंकून घेतलेल्या अवाढव्य मुलुखांत नवी घडी बसविण्याचें काम अल्फिष्टनसारख्या हुषार, धोरणी व गोडबोल्या इसमावर सोंपविलेलें असलें म्हणजे, महाराष्ट्रांतल्या लोकांना स्वराज्य-नाशाचें दुःख जाणवणार नाहीं, अशी कुंपणी सरकारची कल्पना होती. बाजीरावाच्या कारकीर्दींत बजबजपुरी माजली होती ती एकदांची संपली म्हणून समाधानाचे सुस्कारे सोडणारे लोक, नवीन राज्यव्यवस्थेमुळें ज्यांचा स्वार्थी दृष्टीनें लाभ झाला होता असे लोक किंवा राज्यसत्तेंत बदल होणें म्हणजे काय हें ज्यांना कळूंच शकत नव्हतें असे अडाणी लोक, यांना स्वराज्यनाशाचें दुःख बराच वेळ जाणवलें नसेल हेंहि खरें; पण ज्यांना कांहीं राजकीय संवेदना होती अशा लोकांना, फार अल्प काळांत, घडलेल्या प्रकाराबद्दलची हळहळ वाटूं लागली, यांत शंकाच नाहीं. तीर्थयात्रेच्या निमित्तानें, यज्ञयागादि प्रसंगांच्या निमित्तानें महाराष्ट्रांतील मंडळी उत्तर हिंदुस्थानकडे जात. त्या वेळीं त्यांना बाजीरावसाहेबांची ब्रह्मावर्त येथें काय हलाखीची स्थिति आहे हें पाहावयाला वा ऐकावयाला मिळे. स्वसत्तेचा लोप व परसत्तेचें आक्रमण या गोष्टी किती क्लेशजनक आहेत याची टोंचणी या मंडळींच्या मनाला कशी लागत असे याची कल्पना कै. गणेशशास्त्री लेले यांनीं लिहिलेल्या ‘ तीर्थयात्राप्रबंध ’ या पुस्तकावरून करतां येण्यासारखी आहे. जवळ असतांना अप्रिय वाटत असलेल्या बाजीरावसाहेब पेशव्यांविषयीं महाराष्ट्रांत अशा प्रकारें शिल्लक राहिलेलें ममत्व ते १८५१ सालीं मृत्यु पावले त्या वेळीं कोणत्या प्रकारें व्यक्त झालें असेल, हें सहृदय माणसांनीं कल्पनेनेंच समजून घेतलें पाहिजे. बाजीरावसाहेबांच्या मृत्यूचा हा प्रसंग घडला त्या वेळीं विनायकराव सावरकरांचे चुलते महादेवराव अर्थात् बापूकाका यांचें वय विशीच्या सुमाराचें असेल व विनायकरावांचे वडील दामुअण्णा हे नुकतेच जन्मलेले असतलि, असा अंदाज करतां येतो.[१]

डलहौसीची कारकीर्द सुरू होऊन शिल्लक उरलेलीं स्वदेशी राज्यें एकामागून एक खालसा करण्याचा सपाटा सुरू झाला व त्याची झळ सातारच्या छत्रपतींचें घराणें, तंजावरचें राजघराणें, झांशीचें संस्थान, नागपूरकर भोसल्यांचे राज्य इत्यादि महाराष्ट्रीय रियासतींना लागूं लागली त्या वेळीं महाराष्ट्रांत जो क्षोभ माजला त्यांतून

---

सावरकर यांनीं माळव्यांतील मकाणे जातीच्या लोकांना जिंकून त्यांच्यावर वर्चस्व स्थापिलें या जमातीकडून देवीची मूर्ति मिळाली ती सावरकरघराण्याची कुलदेवता झाली.

१ दे. भ. गणेशपंत सावरकर यांच्या संग्रहीं असलेली सावरकर घराण्याची वंशावळ पान १० वर आहे.

सावरकर-घराणें अलिप्त राहिलें असेल¹ ही गोष्ट शक्य वाटत नाहीं. त्यांतून पुढें जो १८५७ सालचा सशस्त्र क्रांतीचा प्रसंग उद्भवला त्या वेळीं सावरकरांचे चुलते बापु-काका हे चांगले २५-२६ वर्षांचे होते व सावरकरांचे वडीलहि भोंवतालच्या घडामोडी हळूहळू आकलन करूं लागले होते. 'बंडवाल्यां' नीं कांहीं प्रसंगीं तरी टोपी-वाल्यांच्या तोंडचें पाणी पळविलें होतें; त्या प्रसंगांचीं वर्णनें कानीं आल्यावर




* दत्तक दिल्यामुळें नांव बदललें व विनायक दीक्षित हें नांव प्राप्त झालें.

१ पेशवाई बुडाल्यावरहि कांहीं काळपर्यंत सावरकर घराण्याला १२०० रु. वर्षासन म्हणून मिळत असत. इनाम कमिशननें ज्या अनेक सनदा दडपल्या त्यांत सावरकरांची वर्षासनाविषयींची सनद दडपली. पुढें कित्येक वर्षांनीं वर्षासन म्हणून २९ रु. देण्याला ब्रिटिश सरकारनें सुरुवात केली.

स्वराज्याचा व पेशवाईचा अभिमान बाळगणाऱ्या या तरुणांच्या भावना कशा उद्दीपित झाल्या असतील, हें कोणालाहि सहज समजूं शकेल ! नानासाहेब पेशवे, झांशीच्या राणीसाहेब, सेनापति तात्या टोपे इत्यादींनीं गाजविलेल्या पराक्रमांचीं वर्णनें ऐकण्यासाठीं हे तरुण कसे उत्सुक झाले असतील व हीं वर्णनें ऐकल्यावर त्यांना किती धन्यता वाटली असेल हें शाब्दिक वर्णनाच्या साहाय्याशिवायही प्रत्येक मराठी हृदयाला **समजूं शकेल !**

स्वराज्य व स्वधर्म यांच्या सिद्धीसाठीं करण्यांत आलेली ही उठावणी अयशस्वी झाल्यावर १८६० च्या सुमारास महाराष्ट्रांत फिरून सगळीकडे सामसूम झालें! त्यावेळीं हे बंधूहि जगाच्या मामुली रिवाजाप्रमाणें कालक्रमणा करूं लागले असतील तर त्यांत कांहींच नवल नाहीं. बापुकाका हे वडिलकीच्या नात्यानें घरची सावसावकारी पाहात व इनाम जमिनींच्या बद्दलचे व्यवहारहि उलगडीत. नव्या काळच्या गरजा लक्षांत घेऊन, धाकट्या भावाला इंग्रजी शिक्षण देणें अवश्य आहे हें ओळखून, त्यांनीं त्याच्या शिक्षणाची नाशिक येथें व्यवस्था करून दिली. घरांतलीं कार्यप्रस्थें उरकण्याची जबाबदारीहि बापुकाकांवरच असल्यामुळें, त्यांनीं आपल्या एकुलत्या एक बहिणीसाठीं कोठूरच्या कानिटकरांकडे स्थळ पाहिलें व तिचें लग्न उरकून टाकिलें. बापुकाका हे इंग्रजी शिकले नसले तरी त्यांनीं नव्या राजवटींतल्या कायदेकानूंची चांगली माहिती करून घेतली होती व त्यामुळें त्यांचें भगूर गांवांत व पंचक्रोशींत लोकांवर व सरकारी अधिकाऱ्यांवर वजन चांगलें होतें. बापुकाका व्यायामांतहि चांगले निष्णात होते. त्या वेळच्या रिवाजाप्रमाणें त्यांचें लग्न १८५०-५२ च्या सुमारासच झालें असलें पाहिजे. धाकटे बंधु दामुअण्णा यांचें मराठी शिक्षण भगूरला पुरें झाल्यावर त्यांच्या इंग्रजी शिक्षणाची नाशिक येथील हायस्कुलांत सुरुवात झाली. त्यांचें शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालें होतें. रसिकपणानें काव्याचा परामर्ष घेण्याचा दामुअण्णांना जसा या वयांत छंद लागला तसाच कविता रचण्याचाहि छंद त्यांना या वयांतच लागला असण्याचा संभव आहे. त्या वेळीं भगूर गांवांत इंग्रजी शिक्षण घेतलेले दामुअण्णा हे प्राय: एकटेच असल्यामुळें, त्यांना ग्रामस्थांकडून विशेष मान दिला जात असे. या मानाला अनुरूप असे इतर अनेक गुणहि दामुअण्णांच्या ठिकाणीं होते. त्यांचा तोंडावळा सुबक होता; त्यांच्या शरीराचा रंग निमगोरा होता व त्यांच्या शरीराचा बांधा भरदार व पिळदार होता. वाक्‌चातुर्य या गुणामुळेंहि त्यांची भोंवतालच्या मंडळीवर सहज छाप पडत असे.

मॅट्रिकपर्यंतचें इंग्रजी शिक्षण संपवून अण्णा घरीं येऊन राहिले तत्पूर्वींच त्यांचें लग्न झालें होतें व शिक्षण आटोपल्याबरोबर ते संसारी बनले. कोठूरच्या मनोहर घराण्यांत अण्णांची सासुरवाडी होती. दामोदरपंत व त्यांचें कुटुंब राधाबाई या उभयतांचें वय विवाहसमयीं नेमकें काय होतें हें निश्चित सांगतां येत नसलें तरी, वधूवरांच्या वयांत सुमारें ७-८ वर्षांचें अंतर असावें, असें दिसतें. दामोदरपंतांचें कुटुंब

१८९२ सालीं निवर्तलें त्या वेळीं त्यांचें अंदाजी वय ३२-३३ होतें असा लेखी उल्लेख आढळतो. त्या वेळीं दामुअण्णांचें वय सुमारें ४० वर्षांचें होतें. गणेशपंत सावरकर, विनायकराव सावरकर इत्यादि भावंडांच्या जन्मकालाचा विचार केला व गणेशपंतांच्या आधीं झालेले दोन मुलगे फार अल्पायुषी ठरले होते ही माहिती स्मरणांत धरली म्हणजे असें मानावेंसें वाटूं लागतें कीं, इ. स. १८७० च्या आगेमागें दामुअण्णा विवाहबद्ध होऊन संसारांत रमूं लागले होते. हा संसार फार सुखासमाधानाचा होता व या सुखासमाधानाचें फार मोठें श्रेय दामोदरपंतांच्या सुशील पत्नीला—राधाबाईंना—मिळण्यासारखें होतें, हें विनायकराव सावरकर यांनीं लिहिलेल्या गद्य व पद्य वृत्तांवरून जसें अनुमानितां येतें, त्याप्रमाणेंच, भगूर गांवीं असलेल्या वृद्धांनीं सांगितलेल्या तोंडी माहितीवरूनहि तें अनुमानितां येतें. प्रस्तुत लेखक भगूर गांवीं गेला होता त्या वेळीं त्याला साठीच्या आगेमागें असलेलीं जीं ३।४ माणसें भेटलीं त्या सर्वांनीं या माउलीच्या रूपसंपदेबद्दल व सुशीलसंपदेबद्दल मोठे आदराचे व प्रशंसेचे उद्गार काढिले.

ही माउली आपल्या चिल्यापिल्यांना सोडून भरल्या संसारांतून उठून देवाघरीं गेली तेव्हां तिच्या विश्वविख्यात मुलाला—विनायकाला—नुकतें नववें वर्ष लागलें होतें. त्यामुळें विनायकरावांच्या स्मृतीवर उमटलेला मातृमूर्तीचा ठसा पुष्कळच अस्पष्ट आहे असें त्यांनींच लिहून ठेविलेल्या एका वाक्यावरून दिसतें. 'आज माझी आई माझ्यापुढें मूर्तिमंत उभी राहिली तर मी तिला एकदम ओळखूंहि शकणार नाहीं,' असें विनायकरावांनीं लिहून ठेविलें आहे. तें खरें असलें तरी, स्वमातेच्या वर्तनांतल्या व वृत्तींतल्या वैशिष्ट्यांचे विनायकरावांच्या मनावर उमटलेले ठसे चांगले ठसठशीत आहेत. शुचिता व स्वच्छता यांवर या माउलीचा भारी कटाक्ष असावा; आणि, विनायकरावांना व त्यांच्या पत्नीला जसा फुलांचा व फुलझाडांचा लळा आहे तसाच तो या माउलीलाहि असावा, हें 'गोमांतक' काव्यांतील पुढील वर्णनावरून निष्पन्न होतें:

**एकदोन शकुंतांनीं लकेऱ्या दिधल्या कुठें ।**
**पहांटेस अशा एका रमा नित्य तशी उठे ॥**
**सडासंमार्जना दासी असूनि स्वकरें करी ।**
**स्वयें मग शुचिर्भूता स्नाता होउनि सुंदरी॥**
**लाविली फुलवाडी जी तिनेंचि परसामधीं ।**
**देवपूजेप्रती तोडूं जाई तींत फुलें तधीं ॥**
**सुगंधांत फुलांच्या ती सुरंगांत उषेचिया ।**
**रंगुनी क्षण तैं पाहे सृष्टिकौतुक तन्मया ॥**
**खुडूं मग फुलें लागे गातां मंजुल गीतिशीं ।**
**शांततेची प्रभाताच्या वाचा मूर्तिमती तशी ॥**

—गोमांतक : पूर्वार्ध : १२०-१२४.

सासरीं जावयाला निघालेल्या शकुंतलेला कण्वमुनींनीं जो उपदेश केला त्याचें सार या माउलीच्या नित्याच्या वर्तनक्रमांत कसें सहजगत्या उतरलेलें दिसे हें पुढील वर्णनावरून स्पष्ट होत आहे :

गृह निर्मल सैंपाक सुरसाल तिचा सदा ।
गमे लहानथोरांशीं व्हावीशीच प्रियंवदा ॥
आग्रहें वाडिलां सेवी लहानां शिकवीतसे ।
वाणीनें वेतनाहूनी सेवकां सुख देतसे ॥
तीं सदा ऋणको येतां तिच्या शेतकरी घरीं ।
भाकरी ऊन दे, जी तत्स्मित स्वादुतरा करी ॥

—गोमांतक : पूर्वार्ध : ९२–९४.

आपलें वैभव हें आपलें एकट्याचें वैभव नव्हे, त्याच्या उपभोगांत इतरांनाहि सहभागी होऊं देण्यानेंच तें वैभव खऱ्या अर्थानें टिकाऊ ठरतें, वैभवाचा सामुदायिक उपभोग घेण्याच्या निमित्तानें धर्मवृत्तीची जोपासना करणें व शेजारपाजारच्या लोकांचा संतोष संपादणें हेंच आर्यस्त्रीधर्माचें रहस्य होय हें मनोमन माहीत असल्यामुळें, ही साध्वी कशा प्रकारें वागत असे यासंबंधींचें पुढील वर्णन नमुनेदार आहे:

आपल्या आंबराईच्या आंब्यांहीं घर जैं भरे ।
सुरंग, सुरस, स्वादु ते ते वेंचुनि ती करें ॥
सुवासिनींस जातींच्या सर्व बोलवुनी घरीं ।
अंगणीं आम्रराशींतें तयांच्या लुटवी करीं ॥

--गोमांतक : पूर्वार्ध : ९५–९६.

अशा या सुगृहिणीच्या समागमांत दामोदरपंतांचा संसार कसा चालला होता याची कल्पना विनायकरावांनीं 'गोमांतक' काव्यांत रमा-माधव या जोडप्याच्या संसाराचें शब्दचित्र रेखाटण्याच्या निमित्तानें सर्वांपुढें मांडली आहे. त्यांतील पुढील भाग लक्षांत ठेवण्यासारखा आहे :

प्रिया त्या समची त्याची युवतीच वयें जरी ।
गृहिणीपदकर्तव्या प्रौढा पूर्ण तशी करी ॥

—गोमांतक : पूर्वार्ध : ९१.

* * *

किंचित्कोपी तरी होता प्रेमकोमल तत्पती ।
जीव कीं प्राण ते लेखी तिज जेंवि तयास ती ॥
वेणी घाली तिची हस्तें, प्रेमें न्हाणि तिला स्वयें ॥
लाजतां ती तिशीं रागें क्षणमात्र वदूं नये ।

--गोमांतक : पूर्वार्ध : ९८–९९.

या पतिपत्नींचा संसार एकंदरींत फार आनंदांत व सुखासमाधानांत चालला होता. बापुकाका व अण्णा या दोघा भावांत प्रसंगीं भाऊबंदकीवरून जे वाद उपस्थित होत त्यांचे पर्यवसान कधीं कधीं मारामारीपर्यंतहि होई ही गोष्ट कुटुंबसौख्यांत बिघाड उत्पन्न करणारी असली तरी, अण्णांच्या सर्व मानसिक व्यथांचा परिहार एका गोष्टीमुळें होत असे. पत्नीचा सुस्वभाव व प्रेमळपणा यांमुळें तर ते संतुष्ट असतच ; शिवाय, लग्न झाल्यानंतरच्या काळांत त्यांच्या आर्थिक स्थितींतहि जी सुधारणा होत चालली त्यामुळें त्यांना असेंहि वाटे कीं, प्रत्यक्ष लक्ष्मीच पत्नीच्या रूपानें आपल्या घरांत वावरत आहे. या सौख्यांत एक मोठें न्यून होतें. बापुकाकांना झालेलीं एक-दोन मुलें अल्पायुषी ठरलीं त्याप्रमाणेंच अण्णांच्या कुटुंबाला झालेले पहिले दोन मुलगे अत्यंत आल्पायुषी ठरले.

**यत्र नास्ति दधिमंथनघोषः । यत्र नो लघुलघूनि शिशूनि ।**
**यत्र नास्ति गुरुगौरवपूजा । तानि किं बत वनानि गृहाणि ॥**

या श्लोकांत सुभाषितकारानें गृहानंदाचीं मूलभूत कारणें म्हणून ज्या तीन गोष्टींचा निर्देश केला आहे त्या तीनहि गोष्टी स्वरूपतः एकच आहेत. कारण, घरांत कासंड्या भरभरून दूध निघत असलें आणि डेरे भरभरून ताक घुसळलें जात असलें तरी, त्या दूधदुभत्याचा स्वैर उपभोग घेण्याला घरांत लेंकरें नसतील, तर त्या समृद्धीला अवकळा आलीच पाहिजे. गुरुजनांचा आदरसत्कार राखला जाण्यासाठींहि लहानलहान लेंक-रांची अपेक्षा असतेच. तात्पर्य, लेंकरें हीच घराची खरी शोभा आहे, 'गृहरत्नानि बालकाः' हें वचन अगदीं खरें आहे. या गृहरत्नांचा दोन्ही कुटुंबांत अभाव असल्या-मुळें, एरवीं सुखी असलेलें हें कुटुंब मनानें उद्विग्नच होतें. पहिले दोन मुलगे अल्पायुषी ठरल्यानंतर, १८७९ सालीं दामोदरपंतांचें कुटुंब तिसऱ्या खेपेला प्रसूत झालें व कुटुंबांत पुत्रजन्म झाला त्या वेळीं सर्वांना किती आनंद झाला असेल, हें सांगावयाला नको ! आपल्या चरित्रनायकाचे ज्येष्ठ बंधु गणेशपंत यांचा जन्म दि. १३ जून १८७९ रोजी ( मि. ज्येष्ठ कृष्ण ९ शके १८०१ सूर्योदयात् गत घटी ४७ पळें ३६ ) झालेला आहे.

या मुलाचें संगोपन व लालनपालन करण्यांत दामोदरपंत व त्यांची पत्नी यांचा काळ मोठ्या आनंदांत जात असला तरी, पहिले दोन मुलगे अल्पायुषी झाले असल्यामुळें, पहिलीं एक दोन वर्षे उलटून जाईपर्यंत तरी, या मातापितरांच्या चित्तांत एक प्रकारची गूढ अस्वस्थता नांदत होती, असें समजण्याला हरकत नाहीं. निपुत्रिकपणापेक्षां एकपुत्रिकपणा केव्हांहि बरा असें हिंदुमनाला वाटत असलें तरी, एका अर्थी एकपुत्रिकपणा हा निपुत्रिकपणाच्याच जोडीचा आहे, हा विचारहि हिंदु मनांत वारंवार उद्भवतो, हें नाकारून चालणार नाहीं; व या विचाराचें अणकुचीदार टोंक मनाला मधूनमधून बोंचत असल्यामुळेंहि, दामोदरपंत व त्यांचें कुटुंब यांचें चित्त कांहींसें असमाधानी होतें; पण, पहिला मुलगा तीन वर्षांचा झाल्यावर दामोदरपंतांच्या

पत्नीला जेव्हां दिवस गेले तेव्हां या पतिपत्नीच्या मनांतली ही अस्वस्थता नाहींशी होण्याच्या मार्गाला लागली. या खेपेस दामोदरपंतांच्या पत्नीला जें पुत्ररत्न झालें तें म्हणजेच आपले चरित्रनायक विनायकराव होत. २८ मे १८८३ रोजीं सोमवारीं रात्रीं (शके १८०५ वैशाख कृष्ण ६, सूर्योदयात् गत घटी ३९ पळें ५५) या बालकाचा जन्म झाला. गणेशपंत सावरकरांनीं आपल्या या विख्यात भावाची कुंडली[१] मुद्दाम तयार करून घेतली ती पुढीलप्रमाणें आहे:--

१०, ९, ८, ७ रा., चं. ११, १२, ६, के. १, मं. शु. नें, ३ गु., ५ ह., र. श. बु. २, ४

१ चिपळूण येथील सत्पुरुष वे. शा. सं. के. भि. वापट यांनीं या कुंडलीचें फल पुढीलप्रमाणें वर्तविलें आहे :

[ १ ] अग्नितत्त्वाचें लग्न असून लग्नेश लग्नासमोर शुभ क्षेत्रीं, यामुळें, शरीरवर्ण आकर्षक, पाणीदारपणा, सभ्यपणा, शुभ प्रवृत्ति या गोष्टी मिळाल्या

[ २ ] द्वितीयेश षष्ठांत पापयुक्त, यामुळें पित्रार्जित इस्टेट, द्रव्ययोग यांचा चांगला योग दिसत नाहीं.

[ ३ ] तृतीयांत शुभग्रह भांवडें दर्शवितो पण, तो अष्टमेश असून तृतीयेशहि षष्ठांत; त्यामुळें भावंडांवर संकटें किंवा भ्रातृवियोग किंवा भ्रातृसौख्यहानि दर्शविली जाते.

[ ४ ] चतुर्थेश चतुर्थाच्या चतुर्थात म्हणजे दशमाच्या दशमांत, हे योग उच्चपद, मानसन्मान, गौरव, ऐश्वर्य, कीर्ति, राजयोग दर्शवितात.

[ ५ ] पंचमेश पंचमांत व त्याचा केंद्रस्थ गुरूशीं शुभयोग-हा प्रबळ विद्यायोग होतो. त्याच स्थानांतील राहु विद्येंत विघ्नें, क्लेश दर्शवितो.

[ ६ ] द्वादश स्थानासमोर असलेल्या षष्ठस्थानांतील ग्रहांचे आपसांतील व हर्शलशीं होणारे अशुभ योग देहदुःख, दंड, कैद, दूर ठिकाणीं दंडस्थान यांस कारण झाले.

[ ७ ] सप्तमेश वक्री-अस्तप्राय व षष्ठांत, यामुळें स्त्रीसौख्यहानि. पण तेथें गुरूच साक्षात् असल्यामुळें, स्त्रीच्या रक्षणास कारण झाला.

[ ८ ] अष्टमेश तृतीयांत हा योग प्रवासांत जिवावरचे प्रसंग दर्शवितो.

[ ९ ] नवमांत हर्शल व नवमेश रवीची षष्ठस्थानांत शनीशीं होऊन नेलेली युति, पितृसौख्य व दैवी भाग्य यांच्या लाभास तितकीशी चांगली होत नाहीं. पण याच योगामुळें अस्पृश्यतानिवारणादि चळवळी हातून घडल्या.

[१०] दशमेश षष्ठांत, वक्री-अस्तंगत म्हणून विद्येचा धंद्यानिमित्त उपयोग दाखवीत नाहीं. दशमाच्या दशमांत गुरु नसता तर, कीर्ति-सन्मान योग न होतां अपमान, अवज्ञाच झाली असती.

( पुढील पानावर चालू )

या मुलाचें विनायक हें नांव ठेवण्यांत त्याच्या आईबापांचा कांहीं विशिष्ट हेतु [१] होता कीं काय, त्यांचें बारसें कितीशा थाटामाटानें करण्यांत आलें, त्याला बाळलेणें कोणतें करण्यांत आलें होतें, त्याला कांहीं बालरोगांचा त्रास झाला कीं काय, त्याचें उष्टावण केव्हां झालें वगैरे अनेक प्रश्नांचीं तपशीलवार उत्तरें अनेक लोक मोठ्या कौतुकानें व उत्सुकतेनें वाचतील हें अगदीं खरें असलें तरी, तीं उत्तरें देण्याला अवश्य असणारी साधार माहिती उपलब्ध नाहीं हें प्रांजलपणें कबूल करणें प्राप्त आहे. ' गोमांतक ' काव्यांतील ' रमा-माधव ' या जोडप्याच्या संसाराचें शब्दचित्र हें दामोदरपंत व राधाबाई यांच्या संसाराचें कल्पनाचित्र आहे, त्या काव्यांतलें ' भार्गव ' हें गांव भगूरच्याच पद्धतीचें आहे व भार्गव गांवाजवळची दारका नदी म्हणजे भगूरलगतची दारणा नदीच होय, ही माहिती सावरकरांच्या आत्मचरित्रांत दिलेली असल्यामुळें, त्या काव्यांतल्या ' शंकर ' या बालकाच्या शैशवाचें वर्णन म्हणजेच विनायकाच्या शैशवाचें वर्णन असें अनुमानिणें शक्य आहे. हें अनुमान आधारभूत समजून, गोमांतकांतील कांहीं सुंदर पद्यपंक्तींच्या आधारें, बालविनायकाच्या पहिल्या चारपांच वर्षांतील जीवनाचें कल्पनाचित्र रेखाटणें शक्य आहे हीहि गोष्ट भाग्याचीच समजली पाहिजे. बालविनायक सरासरी दीडदोन वर्षांचा होईपर्यंत तो कसा दिसत असेल, आईबापांना तो कसा भासला असेल वगैरे माहिती पुरविणाऱ्या पुढील पद्यपंक्ती फार सुंदर आहेत :

---

[११] पंचमेश पंचमांत व तोहि मंगळ व लाभेश लाभस्थानास पाहतो व तोहि शुक्र; यांमुळे काव्य-नाटक-साहित्य यांमुळें किंवा दुसऱ्या कांहीं गोष्टींच्या द्वारा द्रव्यलाभ दर्शविला जातो.

[१२] चंद्रशनि अशुभ योग व कुटुंबेश षष्ठांत व सप्तमेशहि षष्ठांत, शुक्रासमोर राहु हे कुटुंबसौख्यांत कमीपणा, संसारसुखांत व्यत्यय आणणारे योग आहेत.

**विशेष गोष्टी**

[१] पंचमांतील बली मंगळ क्वचित् रजतमोगुणांची उसळी दर्शवितो, तर लग्नासमोर असलेला गुरु अत्यंत परोपकारी, शांत, शुभ प्रवृत्ति दर्शवितो.

[२] तृतीयेश षष्ठांत, नवमांत हर्शल, मिथुनांत गुरु, चंद्र तृतीयांत शनिक्षेत्रांत हे योग शिक्षणार्थ वगैरे परदेशगमन--जलप्रवास, प्रवासांत संकटें इत्यादि गोष्टी सुचवितात. ( पुढील पानावर चालू )

[ ३ ] सप्तमस्थ गुरूनें स्वतःचें व स्त्रीचें अनेक संकटांतून संरक्षण केलें.

[ ४ ] तृतीयांत चंद्र व समोर अंशतः हर्शल, बुध-नेपच्यून युति, पंचमांत शुक्र यांमुळें विलक्षण कल्पकता. रसिकता, काव्यनाटक-लेखन, प्रबळ स्फूर्ति हे योग उत्पन्न झाले.

१ विनायक हें नांव ठेवण्याचें कारण पुढीलप्रमाणें असल्याचें दे. भ. बाबाराव सावरकर यांनीं कळविलें आहे : बॅ. सावरकर यांनीं जन्मतांच रड घेतली नि पिईनात. पुष्कळ उपाय झाले; पुढें ' तुम्ही विनायक दीक्षित असाल तर प्या-तुमचें नांव ठेवूं ' म्हणून चुलत्यानें अंगारा लावला नि लागलेच प्यावयास लागले नि त्यावरून त्यांचें नांव विनायक म्हणून ठेविलें.

कर्णीं सुंदर डोलावे डूल दुडदुड् चालतां ।
होई आपणची प्रेमें घांस आईस घालता ॥
घोडा खेळावया ताता कामा जाऊं मुळीं न दे ।
वस्त्रची लपवी, राही दाराच्याचि उभा मधें ॥
जसा जसा तिचा गेला बाल वाढत सद्‌गुणी ।
श्रेय प्रेय तिच्या जाती एक होउनि जीवनीं ॥

—गोमांतक : पूर्वार्ध : ११४–१६.

वात्सल्यानें थबथबलेल्या मातृप्रेमविषयक कविता लिहिण्यांत आपले महाराष्ट्रीय कवि ' यशवंत ' हे फार नामवंत आहेत. त्यांच्या कवित्वाची आठवण करून देणाऱ्या पुढील ओळी पाहण्यासारख्या आहेत :

शैशवीं दूधभाताचा घांस लावुनि लोणचें ।
ताटलींतुनि जो देई आई त्यासम कोणचें ।।
मिष्ट पक्वान्न हो लागे आयुष्यांत पुन्हां ? तसें ।
प्रेम कोण पुन्हां आईनिरपेक्ष करीतसे ! ! ।

—गोमांतक : पूर्वार्ध : १३२–३३.

हें बालक तीनचार वर्षांचें झालें त्या सुमारास त्याची निरीक्षणशक्ति कशी वाढूं लागली, पिलाच्या चोंचींत चाऱ्याचे कण कोंवळिकीनें भरून त्याला अन्नब्रह्माची ओळख करून देणाऱ्या पक्षिणीप्रमाणें, या बालकाची माता त्याला ज्ञानब्रह्माची ओळख कशी करून देऊं लागली वगैरे गोष्टी पुढील चरणांवरून समजण्यासारख्या आहेत :

मग जै तुलसीपाशीं जपा ती जपण्या बसे ।
तिचा बाल तिला तैशी पाहुनी कुतुकें हंसे ॥
पूजा ती करितां पाहे शिवायास पलोपलीं ।
धूरची उदबत्त्यांचा धरायासि बघे करीं ॥
शुद्धोष्ण तोय देऊनी बालासी मग न्हाववी ।
एकेक शब्द देऊनी स्तोत्रें पावन गाववी ॥

---

[ ५ ] बुध-नेपच्यून युति व द्वितीयेशाच्या द्वितीयांत बृहस्पति यांमुळें भाषा-विषयांत व वक्तृत्वांत अद्‌भुतपणा येतो.

[ ६ ] नवमस्थ किंवा दशमस्थ हर्शल आयुष्यांत विलक्षण गोष्टी घडतात असें सुचवितो.

[ ७ ] पंचमांतील जोरदार मंगळ व तेथें असणारा केतु व अग्नितत्त्वांचें धनु-र्विद्यासूचक लग्न यांवरून बौद्धिक स्वातंत्र्यलालसा व क्षात्रतेज सूचित होतें—लढाऊ वृत्ति सूचित होते.

येतांयेतां फुलोनीया पाकळ्या कमलाच्यिया ।
बघे उमलत्या मालाकार श्रीस जसा तया ।।
कौतुकें प्रिय आश्चर्ये तशी ती जननी बघे ।
फुल्लदहृदीं तया अर्थज्ञान केंवि विकास घे ।।

—गोमांतक : पूर्वार्ध : १२६-१३०

हें मूल पांच वर्षांचें झालें तेव्हां तें किती बोलकें बनलें होतें व त्याची जिज्ञासा किती जागृत झाली होती हें पुढील दोन ओळींत दिग्दर्शित झालें आहे :

त्या बाल वस्तुवस्तूंच्या पुसे नामगुणां झणीं ।
टाळी वाजवुनी केव्हां केव्हां अंगुलि दावुनी ।।

—गोमांतक : पूर्वार्ध : १४२

'शंकर' या बालकाच्या तीव्र जिज्ञासेचें वर्णन पुढील नमुनेदार ओळींत केलेलें आहे. बालविनायकानें या ओळींतले प्रश्न आपल्या आईला खरोखरच विचारले होते अशी कल्पना न करतां, पुढील ओळी वाचतांना वाचकांनीं हें लक्षांत ठेवावें कीं, सध्यांच्या शास्त्रीय युगांत बालमनाला कोणते प्रश्न सुचावे याचें दिग्दर्शन करण्यासाठीं विनायकराव सावरकरांनीं या ओळी लिहिल्या आहेत :

"माणसें हीं अशीं आई उडूं गे शकतील का ?"
पुसे बाल तया प्रेमें वदली कुरलालका ।।
"दे बाल देव पक्ष्यांसी पंख तेंवि न मानवा ।
न वा पंख घडाया ये विमानीय अम्हां नवा ।।"
सचिंत क्षण तो, वेगें जयावेशभरें कथी ।
"अशी कां माणसें युक्ति उडाया करिती न तीं ?"
बैलांचे बदली मोठ्या मोठ्या एक असा कुनी ।
पक्सी घेउनि त्याखालीं घत्त गालिस बांधुनी ।।
दिला उलवुनी त्यासी लगाम धलुनी तलीं ।
उलतील न कां ते जे बसती तिजभीतलीं ।।"

—गोमांतकः पूर्वार्धः १४४-४८.

बालविनायकाला पांच वर्षें पुरीं होऊन सहावें वर्ष लागलें त्या अवधींत त्याच्या पाठीवरील बहीण व तिच्या पाठचा भाऊ नारायण या दोघांचा जन्म झाल्यामुळें, विनायकाच्या आईला त्याच्याकडे पूर्वीसारखें लक्ष पुरविणें शक्यहि नव्हतें व तसें करण्याची जरूरीहि नव्हती. देखणेपणा, बोलकेपणा इत्यादि गुणांमुळें हा मुलगा सर्वांचाच लाडका होता व हळूहळू त्याच्या अंगीं असलेल्या बुद्धिमत्तेची चमक प्रगटूं लागली त्याबरोबर तो सर्वांच्याच कौतुकाचा विषय होऊन बसला. वडील इनामदार असल्यामुळें घरीं जीं अनेक कुळें-डाळें येत त्यांचाहि या बालकावर मोठा लोभ असे

व तीं त्याला ‘ छोटे जहागीरदार ’ या नांवानें संबोधीत असत. राहुरी या इनाम गांवीं व इतर कांहीं ठिकाणीं सावरकरांच्या मालकीच्या आंबराया होत्या. वसंत ऋतूंत या आंबरायांमधील फळांच्या गाड्या घेऊन कुळें दाराशीं येत व कित्येक वेळां त्यांचा मुक्कामहि सावरकरांच्या घरीं होई. अशा वेळीं हे ‘ छोटे जहागीरदार ’ या मंडळींत मिसळले म्हणजे त्यांना मोठें समाधान वाटे. शेजारच्या समवयस्क मुलांना गोळा करून छोटेखानी देवळें बांधावीं व बालगोपाळांच्या मदतीनें पालखी तयार करून ती मिरवावी हा या बालकाचा या वयांतला छंद होता. या मुलाला आतां शाळेंत घालण्याची वेळ झाली असें ओळखून अण्णांनीं त्याला त्याच्या वयाच्या सहाव्या वर्षीं गांवांतल्या मराठी शाळेंत घातला. या शाळेचे कांहीं जुने कागद अद्याप अस्तित्वांत आहेत. त्यांची पाहणी केल्यावर प्रस्तुत लेखकाला असें आढळलें कीं, दिनांक ९ सप्टेंबर १८८९ रोजीं या मुलाचें नांव शाळेंत नोंदविण्यांत आलें. सातवें वर्ष संपण्याच्या सुमारास म्हणजे १८९० च्या उन्हाळ्यांत या मुलाचें मौंजी-बंधन झालें.

घरात स्वीय संस्कृतीचें संगोपन होत असलें व घरांतील मुलांना योग्य वळण लावण्याची दक्षता घेण्यांत येत असली म्हणजे घरांतील बुद्धिमान् मुलांच्या मनाची मशागत आपोआपच चांगल्या प्रकारें होत जाते. सध्यांच्या काळीं निदान शहरा-बाजारांत राहणाऱ्या मुलांना वळण असें कांहीं लागतच नाहीं; याचें कारण असें कीं, घरचीं वडिल माणसें व शाळेंतलि शिक्षक यांच्या दुहेरी राज्यव्यवस्थेंत, मुलांना वळण लावण्याची जबाबदारी खरोखर कोणाची हा प्रश्न कायमचा अधांतरीं लोंब-कळत राहतो व कोणच्चि वळण लावण्याला प्रवृत्त होत नसल्यामुळें, बाजार व बोल-पट यांच्या बकालीपणाची छाप मुलांच्या मनांवर बसते. पन्नाससाठ वर्षांपूर्वींच्या महाराष्ट्रांत हें बेदादीचें साम्राज्य सुरू झालेलें नव्हतें. सावरकरांचे वडील दामोदर-पंत हे स्वतः करडे, टापटिपीचे व धार्मिक प्रवृत्तीचे गृहस्थ होते. घरांत असलेल्या अष्टभुजा देवीची पूजाअर्चा विधियुक्त करण्यांत त्यांना धन्यता वाटत असे. रात्रीं मुलांसमक्ष पुराणादि ग्रंथांचें वाचन,[1] पूजा-संध्यादि आन्हिकाचें आचरण, शुचिर्भूत-पणाबद्दलचा कटाक्ष अशा गुणांमुळें अण्णांनीं आपल्या घरांत एक विशिष्ट प्रकारचें उदात्त वातावरण कायम ठेविलें होतें.

बालविनायक शाळेंत जाऊं लागल्यावर त्याच्या अभ्यासाबद्दलची तक्रार त्याच्या वडिलांच्या कानीं कधीं आली नाहीं हें खरें; पण, या अभ्यासांतील नैपुण्या-

---

१ हें प्रकरण लिहून हातावेगळें झाल्यावर दे. भ. बाबाराव सावरकर यांनीं लिहिलेल्या आठवणी हातीं आल्या. त्यांतील पुढील माहिती महत्त्वाची आहे : आई मजकडून भारतकथासंग्रह, पांडवप्रताप, रामवीजय, हरिविजय कधीं कधीं कांहीं विशेष चरित्रें वाचवून घेत असे. रात्रीं सर्व कुटुंबियांनीं बसावें नि वाचावें असा परिपाठ असे.

बद्दलहि त्याचा फारसा लौकिक झाला नाहीं. अन्य प्रकारांनीं मात्र त्याचा लौकिक वाढत चालला होता. त्या वयांतहि या मुलाची स्मरणशक्ति फार चांगली होती. मुंजीनंतर या मुलाला ज्या गृहस्थांनीं संध्या शिकविली ते श्री. दाजी धोपावकर वृद्धावस्थेंतला आपला काळ सध्यां भगुरास घालवीत आहेत. विनायकानें पांचसहा दिवसांत सगळी संध्या जवळजवळ मुखोद्गत केली ही गोष्ट त्यांनीं मोठया अभिमानानें प्रस्तुत लेखकाला सांगितली. अशा प्रखर स्मरणशक्तीच्या मुलानें सहज कानीं पडणारें स्तोत्रें वगैरे वाङ्मय किती सौकर्यानें पाठ केलें असेल हें कोणाच्याहि सहज ध्यानांत येईल. नवरात्र सुरू झालें व दारासमोर असलेल्या देवघरांत बसून, अण्णा शुचिर्भूतपणानें व भक्तिभावानें सप्तशतीचा पाठ म्हणूं लागले म्हणजे तर या मुलाची वृत्ति विलक्षण रीतीनें एकाग्र होऊन जात असे. सप्तशतीचें पठण अंधश्रद्धेनें करणाऱ्या पुष्कळांना सप्तशतींत काय आहे हें माहितहि नसतें. इतर धार्मिक आचारांप्रमाणेंच हाहि आचार केवळ पारलौकिक कल्याण साधावें या बुद्धीनेंच करण्याकडे त्यांची प्रवृत्ति असते.

**'रूपं देहि, जयं देहि, यशो देहि द्विषो जहि ।**
**देहि सौभाग्यमारोग्यं देहि देवि परं सुखम् । '**

या श्लोकांत, अगर,

**' विधेहि द्विषतां नाशं विधेहि बलमुच्चकैः । '**
**' विद्यावन्तं यशस्वंतं लक्ष्मवितं जनं कुरु ॥ '**

इत्यादि चरणांत जें मागणें मागितलेलें आहे तें परलोकविषयक नसून, तें सारें मागणें ' याच देहीं याच डोळां ' मिळवावयाच्या व भोगावयाच्या गोष्टींविषयीं आहे ही जाणीव प्रौढ अशाहि पुष्कळच पाठकांना नसते. विदेशी शत्रूंच्या संघटनेमुळें व कपटनीतीमुळें राज्यभ्रष्ट झालेल्या सुरथ राजाला उपदेश करण्याच्या प्रसंगानें,

**गतविभवाची पुनः प्राप्ति करण्यास । मोहीम चालवायास ॥**

त्या राजानें कसें प्रवृत्त व्हावें हें स्पष्ट करण्याच्या उद्देशानें, ऋषींनीं राजाला जो उपदेश केला तो उपदेश सप्तशतींत अंतर्भूत झालेला असल्यामुळें, सद्यःस्थितींत सप्तशती-पाठाचें महत्त्व विशेषच आहे हेंहि पुष्कळांच्या ध्यानींमनीं नसतें. चांगल्या-चांगल्या प्रौढांची जर ही स्थिति तर, सप्तशतीचें पठन चाललें असतांना, जीव कानांत एकवटून तो पाठ ऐकणाऱ्या विनायकाला त्या स्तोत्राचें अर्थदृष्टया असलेलें महत्त्व कळलें नसलें तर नवल काय ?

अर्थ कळत नसला तरी या स्तोत्राचें श्रुतिसुभगत्व या मुलाला प्रतीत होत होतें.

**या देवी सर्वभूतेषु बुद्धिरूपेण संस्थिता ।**
**नमस्तस्यै नमस्तस्यै नमस्तस्यै नमोनमः ॥**

इत्यादि श्लोकांतून ध्रुपदाप्रमाणें पुनरुक्त होत गेलेल्या दुसऱ्या चरणांतला चढता ठेका,

योो मां जयति संग्रामे यो मे दर्पं व्यपोहति ।
यो मे प्रतिबलो लोके स मे भर्ता भविष्यति ॥

अशा श्लोकांतून व्यक्त झालेल्या स्वाभिमानाचें व दर्पाचें त्या श्लोकांच्या शब्दयोजनेंत पडलेलें प्रतिबिंब इत्यादि गुणविशेषांचा परिणाम विनायकाच्या बालमनावर सहजगत्या होत गेला. ऐकूनऐकून सप्तशतीचा बहुतेक पाठ त्याला मुखोद्गत झाला व त्या पाठामुळें व त्या पाठाचे मनावर जे संस्कार उमटले त्यामुळें हें मूल देवी-भक्त बनलें !

देवीवरील भक्तीची वाढ विनायक ११।१२ वर्षांचा होईपर्यंत चांगलीच झाली व इंग्रजी शिकावयाला लागून, विनायकाच्या बुद्धीचे डोळे विकसित होई-पर्यंत ती बऱ्याच अंशीं टिकूनहि राहिली. आई जशी वत्सल व ममताळू तशीच देवीहि वत्सल व ममताळू आहे असें विनायकाला वाटूं लागलें. एकाद्या साधका-प्रमाणें तन्मय होऊन तो देवीपूजनांत गढून जाऊं लागला. लिहिण्यावाचण्यांत थोडी प्रगति झाल्यावर विनायकानें अण्णांना न कळवितां देवीभागवताची मराठी पोथी देयमूल्यानें ( व्ही. पी. ) मागवून घेतली. ही पोथी वाचून झाल्यावर त्याला असें वाटूं लागलें कीं, आपण 'दुर्गादास-विजय' नांवाचा ओवीबद्ध ग्रंथ मराठींत लिहावा. राणा प्रताप, श्रीशिवाजीमहाराज इत्यादि देवीभक्तांचीं उदात्त चरित्रें विनायकाच्या वाचनांत येऊं लागल्यामुळें त्याला असें वाटलें कीं, जुन्या देवीभक्तांचीं चरित्रें गाइल्यावर या आधुनिक देवीभक्तांचीं अगर दुर्गादासांचीं चरित्रेंहि त्यांत समाविष्ट करून आपल्या ग्रंथाला अद्ययावत् स्वरूप आणावें. देवीच्या भक्तीचा विनायकाच्या बालमनावर असा कांहीं विलक्षण परिणाम होऊं लागला कीं, श्रवण, दर्शन, इत्यादि शक्तींच्या बाबतींत कांहींतरी दैवी अंश आपल्या ठिकाणीं आहे, असें त्याला भासूं लागलें. सहजगत्या घडलेल्या कांहीं गोष्टींमुळें, त्या बालकाच्या मनांत उपजलेली ही भावना वृद्धिंगतहि झाली. एकदां असें झालें कीं, विनायकाच्या धाकट्या बहिणीच्या कानांतला मोत्यांचा दागिना हरवला व कितीही शोध केला तरी तो सांपडेना. शेवटीं विनायक देवीसमोर एकाग्रतेनें बसला व तो फडताळाखालीं अंधारांत पडलेला आहे असा भास त्याला होऊं लागला. त्याप्रमाणें शोध करण्यांत आल्यावर, हरवलेला दागिना नेमका त्या ठिकाणीं सांपडल्यामुळें, सर्वांना आश्चर्य वाटलें ! ग्रहांचीं फलें, स्वप्नें इत्यादि गोष्टींचा क्वचित् प्रसंगीं पडताळा पटत असला तरी तो केवळ काकतालीय न्याय होय, विचारी माणसांनीं अशा गोष्टींमुळें विचकूंहि नये व आशकहि बनूं नये अशीं सुभाषितें स्वतःशीं गुणगुणणारीं माणसेंसुद्धां जर या भाकड गोष्टींवर विश्वास ठेव-तात तर बाल्यावस्थेंत असलेल्या विनायकाचा अशा गोष्टींवर विश्वास बसला अगर आपल्या अंगीं कांहीं दिव्य शक्ति आहे असें त्याला क्षणभर वाटलें असलें तर त्यांत आश्चर्य कसलें !

या भक्तिभावनेच्या वाढीप्रमाणेंच या काळांत विनायकाच्या ज्ञानाचीहि वाढ होऊं लागली होती. चांगलें वाचतां येऊं लागल्याबरोबर, गांवांत वेगवेगळ्या लोकांकडे येणारीं पुणें—वैभव, जगद्‌हितेच्छु, गुराखी, केसरी वगैरे वृत्तपत्रें आणून तीं वाचण्याचा व त्यांतील विषयांचा समवयस्क बालकांबरोबर काथ्याकूट करण्याचा त्याला नाद लागला. माडीवर पडून असलेल्या पुस्तकांपैकीं 'पेशव्यांची बखर' 'निबंधमाला' वगैरे पुस्तकेंहि त्याच्या वाचनांत येऊं लागलीं. 'पेशव्यांची बखर' फिरूनफिरून वाचण्याचा या मुलाला या वयांतच जो छंद लागला तो पुढें एका कवनाच्या रूपानें व्यक्त झाला. पेशव्यांच्या बखरींत सवाई माधवरावसाहेबांच्या कालाचें वर्णन चाललें असतांना, रंगपंचमीच्या एका प्रसंगीं पुण्यांत झालेल्या रंगोत्सवाचें वर्णन करण्यांत आलेलें आहे. या वर्णनाचा ठसा विनायकाच्या बालमनावर फार स्पष्टपणें उमटल्याकारणानें, त्यानें पुढें लिहिलेल्या एका फटक्यांत या रंगोत्सवाची गर्दी मोठ्या भपकेबाजपणानें वर्णिलेली आढळते :

सरकारांनीं सरदारांनीं सर्व जनांनीं दूरस्ती ।
रंग करुनियां ठीकठिकाणीं केलि सुशोभित ती वस्ती ॥
पागे पथके मानकरी आणि कारभारि हे सरदारा ।
श्रीमंत प्रभु माधवरायासहीत आले दरबारा ॥
ज्यानिं रोवुनी महाप्रतापें जरिपटक्याशीं अटकेला ।
त्यांची स्वारी तेथें आली श्रीमंतांना न्यायाला ॥
उडूं लागले गुलाल पल्ले हौद खपाविले फौजेनें ।
रंगाची आशी खेळुनि स्वारी वाड्यामध्यें मौजेनें ।
नंतर स्वारी तिसरे प्रहरीं शहरिं निघाली थाटानें ।
वाडा डावा घालुनि गेली बुधवाराच्या वाटेनें ॥

पौराणिक कथाभागाचें श्रवण, स्वतःच्या प्रयत्नानें चाललेलें वाचन व विचारशील मन यांचा संयोग झाल्यामुळें, या मुलाचा मानसिक विकास व त्याच्या कल्पनेचा परिपोष आठव्या वर्षाच्या सुमारास किती झालेला होता हें स्पष्ट करणारी एक आठवण सावरकर यांनीं स्वतःच्या आत्मवृत्तांत नोंदून ठेविली आहे. विनायक शाळेंत जाऊं लागल्यावर दिनक्रम असा ठरलेला असे कीं, मधल्या सुटींत घरीं यावयाचें, फराळ करावयाचा, आईशीं प्रेमानें बोलत बसावयाचें व मग, शाळा फिरून भरण्याचे सुमारास, शाळेंत जावयाचें ! एक दिवस असें घडलें कीं, फराळाच्या वेळीं कांहीं धुसफूस झाल्यामुळें, विनायक रागावला व नेहमींप्रमाणें आईशीं बोलावयाचें तें न बोलतां तसाच शाळेंत निघून गेला. पण, शाळेंत परत गेल्यावर त्याला चैन पडेना. आईवरील रागामुळें आपण तिच्याशीं अबोला धरला याचा त्या बालकाला पश्चात्ताप झाला. काळ उलटया गतीनें चालूं लागेल व आपण ज्या

प्रसंगीं ही चूक केली तो प्रसंग काळाच्या त्या अभिनव प्रगतींत फिरून उत्पन्न होईल तर, झालेली चूक आपण दुरुस्त करूं—आईवर रुसणारहि नाहीं व रुसलों तरी तिच्याशीं अबोला धरणार नाहीं—असें त्या बालकानें मनोमन ठरविलें. इतक्यांत, आदल्या दिवशींच रात्रीं ऐकलेल्या कांहीं पौराणिक कथाभागाचें त्याला स्मरण झालें. कालाच्या ओघांत ' कल्प ' होतात अशी कल्पना त्या कथाभागांत येऊन गेली होती तिचें त्याला स्मरण झालें. कालाचा ओघ बदलून पूर्वींचे प्रसंग तसेच पुनरुक्त झाले तर आपण आईशीं अबोला धरणार नाहीं या कल्पनेंत मन गुंगलें आहे तोंच, त्याला असें आठवलें कीं, प्रत्येक कल्पांत त्याच त्या गोष्टी घडत असतात. हें आठवल्याबरोबर त्याला असें कळून चुकलें कीं, काळाची गति उलटी फिरली आणि आपण त्या प्रसंगापाशीं येऊन ठेपलों कीं, राग, रुसवा, अबोला या गोष्टीहि टळणार नाहींत. आईशीं रुसवा धरल्याची ही चूक अशा प्रकारें दुरुस्त होऊं शकणार नाहीं हें पाहून, विनायकाच्या बालमनाला फार वाईट वाटलें.

आईवर रागावल्याची सावरकरांच्या चरित्रांतील ही हकीकत वाचणाऱ्या एकाद्या इसमाला इंग्लिश कवि Cowper यानें वर्णिलेल्या अशाच एका प्रसंगाचें स्मरण होणें शक्य आहे. आपल्या मृत मातेच्या चित्राला उद्देशून Cowper कवीनें

' On the Receipt of My Mother's Picture '

ही कविता लिहिली आहे. आई असतांना तिच्याशीं आपण कसे वागलों, त्या वागण्यांत चुका कशा झाल्या इत्यादि गोष्टींचें स्मरण केल्यावर, या कवीनें मातृनिधनाच्या प्रसंगाचा उल्लेख केला आहे. आईच्या मृत्यूनंतर पोरक्या झालेल्या Cowper ची समजूत पाडण्यासाठीं इतर माणसें ' आई उद्यां येईल ' असें त्याला सांगत असत व हें पोरकें पोर उद्यांच्या आशेवर तरंगत राहात असे. आई फिरून भेटली म्हणजे आपण कसे वागूं, पूर्वींच्या चुका दुरुस्त करण्याची दक्षता आपण कशी बाळगूं, इत्यादि मनोराज्यें रंगविण्यांत कवीचें बालमन दंग होत असे. दिवसामागून दिवस लोटले; तरीहि आईचें दर्शन घडेना! तेव्हां या बालकाच्या मनावर निराशेचा पगडा बसला. भलत्या आशेच्या मोहांत सांपडून आपण उद्यांच्या कल्पनेनें कसे फसून गेलों हें सांगतांना या कवीनें वर उल्लेखिलेल्या कवितेंत ' Dupe of tomorrow even from a child ' असे शब्द योजिले आहेत. सावरकरांच्या मनांत उत्पन्न झालेली कल्पाची विशाल कल्पना आणि Cowper च्या मनांत उत्पन्न झालेली Dupe of tomorrow ही कल्पना यांमध्यें विशालता व उदात्तता या दृष्टीनें कोणती कल्पना श्रेष्ठ ठरेल, हें ठरविण्याचें काम वाचकांनाच सहज करतां येईल. सावरकरांच्या कवितेंत जो कल्पनेचा विशालपणा व उदात्तपणा आढळतो त्याचीं बीजें या वयापासूनच त्यांच्या मनोभूमींत वाढत चाललेलीं होतीं असें या प्रसंगावरून मानलें तर तें चुकीचें ठरण्यासारखें नाहीं.

देवीवरील भक्ति, वाचनाच्या नादानें होणारी बुद्धीची वाढ इत्यादि गुण विनायकाच्या अंगीं बालवयांत होते याचा असा अर्थ नव्हे कीं, बहुतेक मुलांच्या अंगीं असणाऱ्या खोडकरपणापासून तो अगदीं अलिप्त होता. या खोडकरपणांत विनायक किती तरबेज होता हें यापुढील काळांत झालेल्या कांहीं गोष्टींच्या वर्णनाच्या वेळीं वाचकांना कळेलच. प्रौढ वयांतल्या आपल्या खोडकरपणामुळें ज्यांनीं आपल्या अनेक प्रतिपक्षांना दिङ्मूढ करून सोडलें ते विनायकराव सावरकर बालपणांतच तेवढे अगदीं गरीब व सालस असतील, अशी कल्पना करणें हेंच अस्वाभाविक आहे. ते खोडकर होते; पण, त्यांचें भाग्य असें कीं, वडिलांचा त्यांच्यावर विशेष लोभ असल्यामुळें, या खोडकरपणाबद्दल मिळणारा 'खाऊ' त्यांना अगदीं क्वचितच मिळत असे. पण,

**न रागेजणारी कधीं नंदराणी । करी कृष्ण खोडी जियेला शिराणी ।।**

या ओळींत वामनपंडितांनीं वर्णिलेली यशोदा मातादेखील जशी प्रसंगीं कृष्णावर रागावत असे, त्याप्रमाणेंच, केव्हांतरी विनायकावर रागावण्याचा प्रसंग अण्णांनाहि टाळतां येत नसे. अशाच एका प्रसंगीं अण्णा खूप रागावले व दंगामस्ती व खोड्या करणाऱ्या विनायकालाहि चारदोन चापट्या लगावण्याच्या निर्धारानें माडीवरून खालीं उतरले. हा प्रसंग घडला तेव्हां विनायकाचे थोरले बंधु बाबा जवळ होते. आपल्या धाकट्या भावावर मार खाण्याचा प्रसंग येणार हें थोरल्या भावाला आवडलें नाहीं. मार टाळण्यासाठीं काय युक्ति योजावी याचा या थोरल्या भावानें विचार चालविला. पलीकडेच असलेली तिजोरी उघडी दिसली. तिचा आश्रय घेतला कीं काम भागेल असें वाटून, त्यानें विनायकाला तिजोरींत लपवून टाकलें. वडील माडीवरून खालीं आले, विनायक कोठें दिसत नाहीं म्हणून ते वरपांगीं रागावले; पण, आपल्याला चुकविण्याची करामत मुलानें दाखविली याबद्दल खरोखर संतुष्ट होऊन ते 'लबाड, गेला कुठें तरी' असें गर्जत माडीवर गेले. थोरल्या बंधूंच्या युक्तीमुळें विनायकाचा मार टळला; पण, तिजोरींत कोंडून पडावें लागल्यामुळें, त्याच्यावर गुदमरून जाण्याचाहि प्रसंग आला. वडील माडीवर गेल्यावर थोरल्या भावानें तिजोरीचें दार उघडलें तों विनायक अगदीं घाबरलेला दिसला. विनायक व त्याचे थोरले बंधु यांचें परस्परप्रेम व त्यांच्या स्वभावामधील भेद यांचें पुढील आयुष्यांत जें दिग्दर्शन झालें त्याची खूण बालपणांतल्या या प्रसंगानेंहि पटण्यासारखी आहे.

विनायकाच्या खोडकरपणाचा आणखीहि एक प्रसंग याच ठिकाणीं सांगून टाकणें उचित होणार आहे. येसूवहिनींनीं लिहून ठेवलेल्या आठवणींत हा प्रसंग वर्णिलेला आहे. विनायक १२-१३ वर्षांचा असतांना तो एकदां हातांत काठी घेऊन माजघरांत दांडगाई करीत होता. त्याची धाकटी बहीण शेजारींच कांहीं तरी करीत होती. दांडगाई करण्याच्या ऐन रंगांत आलेल्या विनायकाचें भोंवतीं कोण आहे इकडे लक्षहि नव्हतें. काठीचा तडाखा लागून बहिणीच्या हातांत आदल्याच

दिवशीं भरण्यांत आलेल्या बांगड्या वाढवल्या. त्याबरोबर तें लेंकरूं रडूं लागलें. काठी लागून बांगड्या वाढवल्या असें अण्णांना कळलें तर दोघाहि भावंडांना बोलणीं खावीं लागणार हें उघड दिसत होतें. तेव्हां दोघाहि भावंडांच्या संगनमतानें असें ठरलें कीं, अवचित पडल्यानें बांगड्या वाढवल्या असें अण्णांना सांगावें व बोलणीं अगर मार खाण्याचा प्रसंग टळला तर टाळावा. पुढें हें प्रकरण अण्णांपर्यंत पोंचलें. विनायकाच्या बहिणीनें ठरलेली बतावणी केली. पण, तिनें दिलेल्या उत्तरानें अण्णांचें समाधान झालें नाहीं. अण्णा रागावून बोलूं लागल्याबरोबर त्या बापड्या मुलीनें खरी हकीकत सांगून टाकली. त्याबरोबर अण्णांचा राग विनायकाकडे वळला. विनायकाला मारण्याला सहसा प्रवृत्त न होणारे अण्णा या प्रसंगीं खूपच रागावले होते व त्यांनीं बहुधा विनायकाला चांगलाच मार दिला असता. पण, विनायक रडवेला झाला व 'फिरून खोटें बोलणार नाहीं' असें त्यानें कबूल केलें. त्यामुळें या प्रसंगीं त्याची मारांतून सुटका झाली.

अण्णा स्वभावानें रागीट होते तसेच ते मोठे मानी व संकोचीहि होते. विनायकाहून धाकटा भाऊ नारायण याचा जन्म १८८८ च्या मे महिन्यांत झाला. त्यानंतरच्या बाळंतपणांत–म्हणजे सन १८९० च्या आगेंमागें केव्हां तरी–मूल आडवें आलें. पत्नीचे क्लेश पाहून अण्णांना अत्यंत अस्वस्थ वाटूं लागलें. त्या वेळीं प्रसिद्ध असलेले नाशिकचे डॉ. बिवलकर यांना बोलावून आणण्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें दिसूं लागलें. वेळ रात्रींची; नाशिकास धाडण्याला आपणापाशीं कोणी हुकुमी माणूसहि नाहीं व स्वतःचा असा गाडीघोडाहि नाहीं या गोष्टींच्या जाणिवेनें अण्णा अतिशय कष्टी झाले. धोपावकर यांच्या घरीं चांगल्या घोड्यांची गाडी होती; पण, कांहीं व्यवहारविषयक वादांमुळें या घराण्यांतील प्रमुखांचें व अण्णांचें या सुमारास बरें नव्हतें. धोपावकरांकडे जाऊन शब्द काढण्याचाहि धीर त्यांना होईना व पत्नीच्या यातना पहात त्यांना स्वस्थहि बसवेना. सावरकरांचीं म्हणून दोन घरें सध्यां भगुरास दाखविलीं जातात. जुनें व नवें घर हीं शेजारींशेजारींच आहेत. जुनें घर धोपावकरांच्या घराच्या दिशेनें नव्या घरापेक्षां जवळ आहे. दोन घरांतलें अंतर सरासरी फर्लांगभर भरेल. तासाभराच्या अवधींत अण्णांनीं या अंतरांत ५–४ वेळा येरझारा घातल्या; पण, घरांत जावें कसें, 'गाडी नाशिकला धाडा' असें धोपावकरांना म्हणावें कसें, या प्रश्नांच्या चक्रांतून त्यांचें मन मोकळें होईना. अण्णा अस्वस्थपणें येरझाऱ्या घालीत आहेत हें कोणातरी ग्रामस्थाच्या ध्यानांत आल्यावर, त्यानें धोपावकरांच्या घरांतल्या प्रमुखांना ती गोष्ट कळविली. त्यांनीं बाहेर येऊन अण्णांना गांठलें व 'येरझारा कां चालल्या आहेत' असें विचारलें. मग अण्णांनीं सारी हकीकत सांगितली. तावडतोब गाडी नाशिकला धाडण्यांत आली व मध्यरात्रीनंतर दीडदोन वाजण्याच्या सुमारास बाळंतिणीची कशी तरी सुटका झाल्यावर, डॉ. बिवलकर नाशिकला रवाना झाले.

सुखी कुटुंब या दृष्टीनें सावरकरांचें कुटुंब या सुमारास चांगल्या स्थितींत होतें. घरच्या कर्त्या पुरुषाला गांवांत मानमान्यता होती. घराण्याचें पूर्वीचें वैभव अगदीं जसेंच्या तसें राहिलें नसलें तरी, कशाची ददात वाटावी, दैन्याचें भेसूर चित्र दिसूं लागल्यामुळें भांबावल्यासारखें वाटावें, अशीहि स्थिति खास नव्हती. घरांतील कर्ता पुरुष व त्याची गृहिणी यांचे संबंध प्रेमाचे व आदराचे असले म्हणजे घरांत जें समाधान नांदतें तें या कुटुंबांत चांगल्या प्रकारें नांदत होतें. ज्यांच्याकडे पाहून भविष्यकाळ आशादायक वाटत रहावा व सद्यःकालचे कष्ट सुसह्य वाटूं लागावे अशीं, घरातल्या भांड्यांच्या उतरंडीप्रमाणें शोभणारीं, चार लेंकरेंहि घरांत नांदत होतीं. आपल्या सद्भाग्याचा सात्त्विक आनंद उपभोगीत अण्णा कालक्रमणा करीत आहेत तोंच त्यांना 'प्रभूनें पात्रिका भालीं कुणाच्या पूर्ण लिहिलेली' या कव्युक्तीचा अनुभव आला. शके १८१४ च्या ज्येष्ठ महिन्यांत भगूरच्या आसपास महामारीची सांथ सुरू झाली व हळुहळू तिनें भगूर गांवांतहि प्रवेश केला. पण, ही सांथ सावरकरांच्या कुटुंबावर झडप घालील असें कोणाच्या ध्यानींमनींहि नव्हतें. ज्येष्ट महिना समाप्त होण्याच्या सुमारास घरांत कांहीं नैमित्तिक धर्मकृत्य उभें राहिलें. या धर्मकृत्याचा दिवस उजाडला. त्या दिवशीं सकाळपासूनच राधाबाईंना रेच होत होते. पण, स्वतःच्या आजाराकडे शक्यतोंवर कानाडोळा करीत रहाण्याच्या हिंदु स्त्रियांच्या स्वभावधर्मानुसार, राधाबाईंनींहि दुपारपर्यंत कोणाला कांहीं कळूं दिलें नाहीं. स्वयंपाक होत असतांनाहि त्यांना एकवार बहिर्दिशेला जावें लागलें. पण, फिरून स्नान करून त्यांनीं स्वयंपाक पुरा केला. पंक्तींत वाढतांवाढतां त्यांना एकदम भोंवळ आली व त्या जमिनीवर पडल्या. त्यांना देवघराशेजारच्या जागेंत निजविण्यांत आलें. त्यांच्या माहेरच्या मंडळींना तार करून बोलावण्यांत आलें. उपचार सुरू होतेच; पण, दुखण्याला उतार पडण्याचें लक्षण दिसेना. आषाढ शुद्ध प्रतीपदेच्या दिवशीं उजाडण्याच्या सुमारास राधाबाईंचा प्राणप्रयाणसमय जवळ आल्याचीं लक्षणें स्पष्ट दिसूं लागलीं. त्यांना ग्लानि आली. धाकटा मुलगा बाळ याला त्यांच्याजवळ नेण्यांत आलें. चार वर्षांच्या या लेंकराला सोडून आपण कायमच्या जाणार या जाणिवेनें त्या माउलीच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वाहूं लागल्या. थोड्याच वेळांत त्यांचें प्राणोत्क्रमण झालें.

या प्रसंगानंतर होणाऱ्या सर्व गोष्टी जनरीतीप्रमाणें झाल्या; पण, हा प्रसंग झाल्यावर अण्णांना जुन्या घरांत राहवेना. तें घर त्यांना भयाण वाटूं लागलें. म्हणून ते आपल्या लेंकरांसह या घराशेजारींच बांधण्यांत आलेल्या नव्या घरांत राहूं लागले. त्या वेळीं अण्णांचें वय ४०।४२ च्या आसपास होतें. त्या काळच्या समजुती लक्षांत घेतल्या तर, अण्णांनीं दुसरें लग्न करणें समाजदृष्ट्या दूषणीय खासच ठरलें नसतें; पण, स्वतःच्या मनाशीं सगळ्या गोष्टींचा नीट विचार करून, अण्णांनीं लग्न न करण्याचा निर्धार केला. यापूर्वीं आपण आपल्या लेंकरांचें संगोपन केलें तें बापाला

उचित अशा कर्तव्यदक्षतेनें केलें, यापुढें आपल्याला नुसती ही दक्षताच दाखवून भागणार नाहीं, या दक्षतेच्या जोडीला आपण मातेचें वात्सल्यहि स्वतःच्या वृत्तींत आणलें पाहिजे ही जाणीव अण्णांच्या ठिकाणीं जागृत झाली व मुलांसंबंधींच्या बारीकसारीक गोष्टींतहि ते जातीनें लक्ष घालूं लागले. या कामांत अण्णा निमग्न असले तरी, राधाबाईच्या मृत्यूमुळें त्यांच्या मनावर जें विषण्णतेचें पटल पसरलें तें पुढें केव्हांहि कमी झालें नाहीं. राधाबाईनीं घरांत प्रवेश केला तेव्हांपासून आपल्यावर लक्ष्मीचीहि कृपा होत गेली; ती गृहलक्ष्मीच आतां नाश पावल्यामुळें, यापुढें आपलें भाग्य ओसरत जाणार अशी अण्णांच्या मनाची दृढ समजूत झाली; व पुढील अनुभव जमेला धरले तर, ती समजूत खोटी होती असेंहि म्हणतां येणार नाहीं.

अण्णांचा विधुरावस्थेंतला प्रपंच अशा प्रकारें चालला असतांना त्यांचे थोरले चिरंजीव बाबा व दुसरे चिरंजीव तात्या यांचा शिक्षणक्रम चालूच होता. या मुलांना मातृसुखाला मुकावें लागलें त्याबरोबर घरांत रमणारें त्यांचें मन बाहेर अधिक रमूं लागलें. विनायक या सुमारास मराठी तिसरींत अगर चौथींत असावा; व त्याच्या भोंवतीं आता मित्रपरिवार गोळा होऊं लागला होता. गांवांतले राणूशेट शिंपी यांचे मुलगे परशुराम व राजाराम हे विनायकाचे स्नेही बनले. अशा स्नेह्यांशीं सर्वस्वीं बरोबरीच्या व समतेच्या नात्यानें वागावें ही या मुलाची सहज प्रवृत्तीच असावी, असें दिसतें ! कारण, त्यांच्या घरीं जाऊन ताजी भाकर व लसणाचें तिखट खाण्यांत त्यांना कसलाहि संकोच वाटत नसे. या मंडळींच्या घरचा तमासगीर ताफा होता. विनायकाच्या अंगीं असलेला कवित्वाचा अंकूर जेव्हां हळुहळू प्रकट होऊं लागला तेव्हां, या ताफ्यासाठीं कांहीं लावण्या व झगडे तयार करून देण्याची कामगिरी विनायकावर सोंपविण्यांत येऊं लागली. विनायकाचे दुसरे एक बाल-मित्र म्हणजे नुकतेच १९४१ सालीं परलोकवासी झालेले देशभक्त गोपाळराव आनंदराव देसाई. यांचें हस्ताक्षर फार चांगलें होतें व पुढें विनायकाचें कवित्व जेव्हां अंकुरित होऊं लागलें तेव्हां कविता लिहून ठेवण्याचें काम गोपाळराव मोठ्या आनंदानें करूं लागले. वामनराव धोपावकर, भिकू वंजारी वगैरे समवयस्कहि विनायकाच्या मित्रपरिवारांत समाविष्ट होत असत. या मुलांचा खेळण्याचा अड्डा सावरकरांच्या घरींच मुख्यतः असे. जुन्या परंपरेंत मुरलेले व जुन्या परंपरेंतलें रहस्य ओळखणारे अण्णा, शस्त्रें व शस्त्रविद्या यांचे बाबतींत अगदींच उदास बनलेले नव्हते. जुन्या पद्धतीची बार भरण्याची बंदूक वापरण्याचा व तरवार बाळगण्याचा परवाना त्यांनीं मिळविला होता. शिवाय त्यांच्या घरांत गुप्ती, जुन्या तरवारी, इत्यादि शस्त्रेंहि होतीं. अशा पुरुषानें आपल्या लेंकरांच्या खेळांनाहि एक विशिष्ट दिशा लावण्याचा प्रयत्न केला, यांत नवल नाहीं. धनुष्य-बाण वापरण्याचा अभ्यास, घोड्यावर बसण्याचें शिक्षण, लुटुपटीच्या लढाया इत्यादि प्रकारांत विनायकाच्या बालवयांतला खेळण्याचा वेळ गेला तो अण्णांच्या दक्षतेमुळें, असें मानावयाला कांहींच हरकत नाहीं.

तरवार, धनुष्य-बाण इत्यादींचा उपयोग करण्यांत बाबांचा हात चांगलाच गरावला होता असें दिसतें. पिवळ्या कण्हेरीचें फूल देठाला धक्का देऊन अलगत खालीं पाडण्याइतकें व उडत्या घारी-कावळयांना घायाळ करून पाडण्याइतकें नेमबाजीच्या विद्येंतले कौशल्य बाबांनीं संपादिलें होतें. बाबा तरवार फिरवीत आहेत व विनायक अर्थात् तात्या त्यांच्या तरवारीची हालचाल चुकवून आपला बाण त्यांच्यावर सोडण्याचा प्रयत्न करीत आहे असा खेळ एकदां चालला होता. बाण सोडल्याची नुसती हूल दाखवावी; पण, बाण सोडूं मात्र नये असें विनायकानें अनेक वेळां केलें. त्यामुळें बाबा कांहींसे असावध राहिले. इतक्यांत तात्यानें बाण सोडला. बाबांच्या हाताच्या मुठीला नेम बसून बोटें झणझणलीं, एका बोटांतून रक्तहि निघालें व तरवार हातांतून गळून पडली. हें पाहातांच तात्या विजयोत्साहाच्या भरांत उद्गारला:—

क्षत्रिय तेज असे हें जें तुजला पीडितें अशा पातें ।

स्वतःच्या अंगच्या क्षात्रतेजाची जाणिव बालपणापासूनच असलेल्या विनायकाच्या वाचनांत वृत्तपत्रें येऊं लागलीं व सभोंवारच्या राजकीय घडामोडींकडे तो आपल्या बालबुद्धिनुसार पाहूं लागला त्या वेळीं, महाराष्ट्रांतली क्षात्रवृत्ति झपाट्यानें लोप पावूं लागली होती. १८५७ च्या राष्ट्रीय उत्थानानंतर या देशांत इंग्रजांचे पाय स्थिरावले व ‘ कुंपणी सरकार ’ च्या राज्याऐवजीं राणीचें राज्य सुरू झालें. त्यानंतरच्या चार दोन वर्षांत घडलेली राष्ट्रहानिकारक गोष्ट म्हणजे शस्त्रें वापरण्याच्या लोकांच्या प्रवृत्तीला व स्वातंत्र्याला पडलेला पायबंद ! १८५७ च्या उत्थानाला जी तीव्रता आली ती राजेरजवाडे, इनामदार, सरंजामदार इत्यादींच्या साहाय्यामुळें व सहानुभूतीमुळें आली हें ओळखणाऱ्या इंग्रजांनीं या तोलदार वर्गाच्या हाताशीं असलेलें लष्करी सामर्थ्य नष्ट करून त्यांना पेन्शनर बनविल्यामुळें, देशांतली लष्करी शक्ति व लष्करी प्रवृत्ति नष्टप्राय झाली होती. नवशिक्षितांची पहिली पिढी नव्या राजवटीचीं व नव्या राज्यकर्त्यांचीं स्तुतिस्तोत्रें गाण्यांत प्रायः दंग झालेली होती. राणीच्या जाहिरनाम्यांतल्या मिष्टास वचनांची गोडी या वर्गाच्या तोंडांत अद्याप घोळत होती. जाणत्या लोकांमधील असंतोष व्यक्त होऊं लागला त्याबरोबर, १८७१ सालीं इंडियन पीनल कोडमध्यें राजद्रोहाचें कलम घुसडण्यांत आलें. मुद्रण-नियंत्रणाचा कायदा, शस्त्रनिर्बंधाचा कायदा इत्यादि कायदेहि अस्तित्वांत आले. हें सर्व घडत होतें तरीहि शस्त्रबळावर उठावणी करण्याची प्रवृत्ति मधूनच केव्हांतरी उचल खात असे. पंजाबांतली कूकांची उठावणी व महाराष्ट्रांतली वासुदेव बळवंत फडके यांची उठावणी यांचा निर्देश उदाहरण म्हणून करतां येण्यासारखा आहे.

१८८३ सालीं विनायकराव सावरकर जन्मले व त्याच वर्षी वासुदेव बळवंत फडके यांचा एडनमध्यें देहान्त झाला. बंडाच्या स्वरूपांत स्वराज्यप्राप्तीचे प्रयत्न

करण्याचें युग संपून चळवळीच्या स्वरूपांत ते प्रयत्न चालविण्याचें युग या सुमारास सुरू झालें. १८८५सालीं इंडियन नॅशनल कॉंग्रेस अस्तित्वांत आली ती, सुशिक्षितांतला असंतोष वाक्स्वरूपांत व्यक्त व्हावा—त्या असंतोषाला याहून तीव्र स्वरूप प्राप्त होऊं नये—या उद्देशानें अस्तित्वांत आली. सुशिक्षितांचा नोकऱ्यांत व राजकारणांत अधिकाधिक प्रमाणांत समावेश व्हावा, या कॉंग्रेसच्या मागणीला १८९२च्या कौन्सिल-विषयक कायद्यानें उत्तर देण्यांत आलें. मराठी शाळेंत शिकत असलेल्या विनायकाच्या वाचनांत वृत्तपत्रांतून चर्चिलें जाणारें राजकारण येऊं लागलें त्या वेळीं, त्या राजकारणांत तेजस्विता अशी नव्हतीच, असें म्हटलें तरी चालेल! मनाची ही भूक शमविण्यासाठीं विनायक ज्या वाङ्मयाकडे व गोष्टींकडे वळूं लागला त्यांत, महाराष्ट्राच्या स्वराज्यकालीन वाङ्मयाप्रमाणेंच, वासुदेव बळवंत फडके यांच्याविषयींचें वाङ्मय व गोष्टी यांना स्थान मिळत असेल. ही गोष्ट अगदीं संभवनीय आहे.

थोरला मुलगा बाबा याचा भगूरच्या शाळेंतला शिक्षणक्रम संपत आला त्या सुमारास अण्णांच्या मनांत दोन प्रकारचे विचार येऊं लागले, असें दिसतें. इंग्रजी शिक्षणासाठीं मुलाला नाशिकास धाडावयाचा विचार त्यांनीं ठरविला; पण मुलाला नाशिकला धाडून देण्याआधीं त्याला चतुर्भुज करून टाकण्याचेंहि त्यांनीं ठरविलें. मुली पाहण्याला प्रारंभ झाला व शेवटीं श्रीक्षेत्र त्र्यंबकेश्वर येथील श्री. नानाराव फडके यांची पुतणी पसंत करण्यांत आली. हें लग्न त्र्यंबकेश्वर येथें झालें. तें १८९६ च्या प्रारंभीं झालें असावें, असें अनुमानितां येतें. घरांत आलेल्या या मुलीचें नांव यशोदा असें ठेवण्यांत आलें. या लग्नाच्या वेळच्या कांहीं आठवणी 'येसूवहिनीं'च्या हस्ताक्षरांत लिहून ठेविलेल्या प्रस्तुत लेखकानें पाहिल्या आहेत. आपल्या अंगचा धीटपणा, बोलकेपणा, चौकसपणा व लाघवीपणा यांमुळें विनायकानें या लग्नाच्या वेळीं वधूपक्षाकडील मंडळींवर फार छाप पाडली, असें या आठवणींवरून दिसतें. लग्नसमारंभ आटोपून मंडळी नववधूसह भगूरला निघाली तोंच येसूवहिनींचे डोळे आले! बैलगाडींतून नाशिकहून भगूरला जातांना विनायकानें आपल्या वहिनीला भोंवतालची सृष्टिशोभा कशी वर्णून सांगितली, वाटेंत व घरीं पोंचल्यावर त्यानें वहिनींच्या डोळ्यांबाबत किती दक्षता दाखविली इत्यादि हकीकतहि या आठवणींत मोठ्या मनोरंजक रीतीनें वर्णिलेली आहे. १८९६ च्या जूनच्या सुमारास अण्णांनीं बाबांच्या पुढील शिक्षणाची सोय नाशिक येथें करून दिली असावी, असें दिसतें.

जवळजवळ विनायकाच्याच वयाची येसूवहिनी घरांत आल्यापासून विनायकाचें मन फिरून घरांत आनंदानें वावरूं लागलें. रांगोळ्या काढणें, कागदाचें कातरकाम करणें वगैरे त्याचे छंद मध्यंतरीं जरा मागें पडले होते; ते आतां फिरून जागृत झाले. महाकाव्य रचण्याची महत्त्वाकांक्षा धरून विनायकानें यापूर्वीच एकदां आगपेटीच्या आकाराच्या कागदांची पोथी सिद्ध केली होती. पण, त्या पोथीवर 'श्रीगणेशा' लिहितांच त्याला असें आढळून आलें होतें कीं, मनपसंत सुंदर महाकाव्य लिहावयाचें तर, तें असल्या हस्ताक्षरांत लिहिणें श्रेयस्कर नाहीं! अक्षर

घटविण्याच्या निमित्तानें विनायकाची महाकाव्यनिर्मितीची इच्छा जरा बाजूला सरली हें खरें असलें तरी, जागृत होऊं लागलेली विनायकाची काव्यशक्ति अनेक मार्गांनीं व्यक्त होऊं लागली होती. ' दुर्गादास-विजय ' ग्रंथाच्या रूपानें ती व्यक्त होत होती, तमासगीर ताफ्यासाठीं रचलेल्या फटक्यांच्या रूपानें ती व्यक्त होत होती, वगैरे गोष्टी यापूर्वींच सांगण्यांत आल्या आहेत. वहिनी घरांत आल्यानंतर ही काव्यशक्ति आणखीहि एका रूपानें व्यक्त होऊं लागली. वहिनींच्या तोंडीं असलेलें गजगौरीचें गाणें विनायकानें जसें ऐकूनऐकून पाठ करून टाकिलें त्याप्रमाणेंच, बायकांच्या तोंडीं असलेल्या ओंव्यांची व उखाण्यांची लकबहि त्यानें ऐकून ऐकून झटकन् उचलली. येसूवहिनी, विनायकाची धाकटी बहिण माई आणि भोंवतालच्या मुलीबाळी एकत्र बसून ओंव्या म्हणूं लागल्या कीं, विनायक स्वतःच रचलेल्या ओंव्या म्हणून त्यांच्याशीं स्पर्धा करूं लागे व त्यांना दिपवूं पाही.

यापूर्वींच विनायकाचें भगूर येथील शाळेंतलें बहुतेक शिक्षण-म्हणजे मराठी पांचवीपर्यंतचें शिक्षण-संपूर्ण झालें होतें. थोरला भाऊ नाशिक येथें इंग्रजी शिकण्यासाठीं गेला त्यापूर्वींच विनायकाची पांचव्या इयत्तेची परीक्षा झालेली असावी; कारण, १८८९ सालीं सप्टेंबर महिन्यांत मराठी शाळेंत नांव दाखल केलें तेव्हांपासूनचा हिशोब केला म्हणजे असें ठरतें कीं, १८९६ सालाच्या प्रारंभापूर्वींच विनायक पांचवीची परीक्षा देऊन तींत उत्तीर्णहि झाला असावा. यानंतरच्या वर्षदीड वर्षाच्या अवधींत त्यानें घरीं बसल्याबसल्या इंग्रजी पहिल्या व दुसऱ्या यत्तेचा अभ्यास पुरा केला. या कामांत स्वतः अण्णांचीच त्याला पुष्कळ मदत झाली असली पाहिजे. घरींच अभ्यास करावयाचा होता तरीहि तो वेळापत्रकाप्रमाणें करण्याची शिस्त विनायकानें स्वतःला लावून घेतली होती. शाळेंतल्याप्रमाणें अभ्यासाचा लकडा मागें नसला तरी, घरीं चाललेला इंग्रजीचा अभ्यास नियमितपणें व्हावा व अवांतर वाचनीहि यथाप्रमाण व्हावें, या गोष्टीवर त्याचा मोठा कटाक्ष असे. वाचलेल्या पुस्तकांतलि विचारसरणी व भाषासरणी यांचा ठसा मनावर कायम उमटावा म्हणून, वाचून झालेल्या पुस्तकांतले उतारे लिहून ठेवण्याची व त्यांतल्या मुद्यांचें टांचण करून ठेवण्याची संवय त्यानें स्वतःला लावून घेतली होती. या टांचणबुकाला ' सर्वसार-संग्रह ' असें नांव देण्यांत आलेलें होतें. विनायकराव सावरकर यांच्या पुढील आयुष्यांतहि त्यांची ही संवय बराच काळपर्यंत टिकून होती. १९०८ च्या पुढील काळांत घरांच्या वारंवार झडत्या होऊं लागल्या; त्यांत विनायकरावांचीं पत्रें, छायाचित्रें, आन्हिकी, कवितासंग्रह वगैरे अनेक वस्तू नष्ट झाल्या; त्याप्रमाणेंच, सर्वसारसंग्रहाचीं जतन करून ठेवलेलीं बाडेंहि नष्ट झालीं. अभ्यास-वाचन वगैरे आटोपल्यावर जो वेळ उरे तो गंमतीनें घालविण्यांतहि विनायकाचा हातखंडा असे.. कुत्र्याच्या पिल्लांसारखें ओरडून, बकरीच्या करडांसारखें ओरडून, वैनींच्या आवाजाची हुबेहूब नक्कल करून व डोक्यावर पदरहि घेऊन गजगौरीचें किंवा इतर

कसलें तरी गाणें म्हणून, तात्या सर्वांची करमणूक करीत असे. वहिनी घरांत आल्यावर तात्या 'भाऊजी' झाले व स्वाभाविकपणेंच त्यांना 'अहो जाहो' म्हणण्यांत येऊं लागलें. तात्यांच्या वृत्तींत नकलेपणा होता तसा खोडकरपणाहि होता. बाबा नाशिकाहून परत आले नि प्रसंगीं त्यांच्याशीं तात्यांचें भांडण झालें म्हणजे हे भाऊ कांद्यांचा अस्त्राप्रमाणें उपयोग करीत. बाबांवर कांदे भिरकावून तात्या वहिनींच्या मागें लपले म्हणजे बाबांना स्वस्थ बसणें भाग पडे. एकदां तात्या असे लपल्यावरहि बाबांनीं कांदे भिरकावले; त्याबरोबर, 'बाबानें वहिनीला कांदे मारले' असा तात्यांनीं पुकारा केला. वडील रागावतील या भीतीनें बाबांना तेथून पाय काढावा लागला! तात्यांच्या स्वैरसंचारांत जसा आनंदीपणा असे तसा साहसीपणाहि असे. त्यांच्या आनंदीपणाची कल्पना त्यांनींच केलेल्या आंबराईच्या वर्णनांत उमटली आहे :

> या या, वाटसरूंनो ! या, पानमंदिरिं या तरी ।
> बहार ती वसंताची आंबराइतची खरी ।।
> माध्यान्हीं भिल्लिणी ज्यांची उन्हानें तनु तापली ।
> तृषा भागविती आम्रांसवें निर्भय या स्थळीं ।।
> पाडासी लागले आम्रवृक्ष पक्वसुधारसें ।
> त्यागिती सत्फलें हीं तीं योगयुक्त मुनी तसे ।।
> ल्हाया शीतल ती छाया न्हाया निर्झर अच्छ हा ।
> गाया कोकिलमैना या प्याया आम्रफलें अहा ।
> शैशवांत जशी आई विरहांत जशी प्रिया ।।
> आनंद आंबराई दे उन्हाळ्यांत तशीच या ।।
>
> — गोमांतक : पूर्वार्ध : १५०–५४.

या ओळी वाचतांना कल्पनेसमोर जें चित्र उभें राहतें तें अत्यंत मनोहर आहे. भगूरच्या सान्निध्यांत वाहणाऱ्या दारणा नदीच्या पात्रांतून तात्या व त्यांचे समवयस्क मित्र पलीकडे गेलेले आहेत, 'सावरकरांची आंबराई', 'धोपावकरांची आंबराई' वगैरे आंबरायांतून ते यथेच्छ हिंडतफिरत आहेत, पाड लागलेलीं व पक्व झालेलीं आम्रफळें यथेच्छ सेवून ते आपली तृषा भागवीत आहेत व नाना प्रकारचे खेळ खेळून व गाणीं गाऊन ते रमतगमत परत गांवाकडे येत आहेत असा सावरकरांच्या बालपणांतला रम्य देखावा आंबराईच्या या वर्णनामुळें मनांत खेळूं लागतो. या प्रकारच्या आनंदमय क्रीडाकौतुकांना साहसी कृत्यांचीहि जोड मिळालेली होती. भगूरच्या शेजारून जाणाऱ्या रेल्वेरुळांपलीकडे जो डोंगर दिसतो त्यावर तात्या व त्यांचे समवयस्क मित्र संध्याकाळीं फिरावयास जात असत. एकदां तात्यांनीं हातांतल्या तारेंत काळा सर्प पकडला होता व इतर मित्रांचें न ऐकतां तो त्यांनीं बराच वेळपर्यंत बाळगला होता, अशी आठवण कै. गोपाळराव देसाई यांनीं लिहून ठेविली आहे.

भगूर येथील शिक्षण संपलें त्या सुमारास तात्यांनीं महाभारताचें मराठी भाषांतर, काव्येतिहाससंग्रह या मासिकाचे पुष्कळसे अंक, निबंधमाला वगैरे ग्रंथ वाचून काढिले होते. 'नवनीत' तर त्यांनीं पुष्कळसें पाठच केलें होतें. वर वर्णन केलेल्या टापटिपीनें हें सारें वाचन झालें असल्यामुळें जिज्ञासा, हजरजबाबीपणा, वादपटुता वगैरे गुण तात्यांच्या ठिकाणीं वाढूं लागले होते. इंग्रजी थोडेंफार वाचतां येऊं लागल्याबरोबर त्यांनीं अण्णांच्या मदतीनें पोप या इंग्रजी कवीनें केलेलें होमरच्या इलियड या महाकाव्याचें भाषांतर कसें तरी वाचून काढलें. माडीवर अडगळींत पडलेल्या या पुस्तकांप्रमाणेंच खंडशः व क्रमशः इंग्रजींत लिहिलेला भिन्न-भिन्न देशांचा इतिहासहि तात्यांना सांपडला व तोहि वाचण्याला त्यांनीं आरंभ केला. अरबांचा इतिहास कथन करणाऱ्या खंडांतलीं पहिली कांहीं पानें गहाळ झालीं होतीं. अरबांच्या स्थितीचें वर्णन वाचणाऱ्या तात्यांना 'यापूर्वीं अरबांची स्थिति कशी होती' हा प्रश्न सुचला व तो त्यांनीं अण्णांना विचारला. 'तें वर्णन फाटलेल्या पानांत केलें असेल' असें उत्तर अण्णांनीं दिलें. हीं फाटलेलीं पानें सांपडलीं तरीहि मुलानें विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर त्यांत सांपडेलच असें नाहीं ही गोष्ट अण्णांच्या ध्यानांत आली नाहीं. पण 'या पूर्वीं स्थिति काय होती' हा प्रश्न खरोखरच इतिहासाच्या अनादि व अनंत स्वरूपाशीं जाऊन भिडणारा आहे. कोठलाहि इतिहास घेतला तरी त्याचें पहिलें पान प्रायः अनुपलब्धच असणार ही कल्पना तात्यांच्या मनांत या बालवयांत उद्भवली व ती पुढें परिणत होऊन 'सप्तर्षि' या कवितेंत समाविष्ट झाली. या कवितेंतल्या २१५ ते २२२ या सर्वच आर्या या दृष्टीनें वाचण्यासारख्या आहेत. पुढील आर्येवरून मुळांतल्या विवेचनाची कांहीं तरी कल्पना करणें वाचकांना शक्य होईल, अशा समजुतीनें ती आर्या उध्दृत केली जात आहे :

इतिहासाचें पहिलें पान न मिळणें कधीं पहायातें ।
'आरंभ तुझा दुसऱ्या पानापासूनि' शाप हा यातें ॥

हातीं येईल तें पुस्तक वा पोथी वाचीत सुटण्याच्या तात्यांच्या या वेळच्या प्रवृत्तीचें आणखीहि एक उदाहरण संस्मरणीय आहे. माडीवरील पोथ्यापुस्तकांत कांहीं हस्तलिखित वा मुद्रित पोथ्या होत्या. ज्या उपनिषदांना आरण्यकें असें म्हणण्याची रूढि आहे व ज्या उपनिषदांचें पठण घरांत करूं नये—वनांत जाऊन करावें—अशी लोकांची समजूत आहे तीं उपनिषदें तात्या वाचूं लागले. त्यांना त्यांचा अर्थ कळत होता असें नव्हे; पण त्यांतल्या वाक्यांच्या व ऋचांच्या कर्णमाधुर्यानें तात्यांच्या मनावर मोहिनी घातली व त्या नादांत ते वाचीत पुढें चालले. अण्णांच्या ध्यानांत ही गोष्ट आली तेव्हां त्यांच्या मनांत चर्र झालें! पत्नीच्या मृत्यूपासून आपल्या संसारावर अरण्याची कळा पसरली आहे असें मानणाऱ्या त्यांच्या मनाला आपल्या आवडत्या मुलाच्या भावी संसाराचीहि चिंता वाटूं लागली! घरांत आरण्यकें वाचणाऱ्या या मुलाचा संसार जनदृष्ट्या सुखाचा होणार नाहीं अशा

भीतीनें त्यांच्या मनाला घेरलें व तात्याला समजुतीच्या गोष्टी सांगून या प्रकारच्या वाचनापासून त्यांनीं त्याचें मन परावृत्त केलें. **'धृतं बाल्ये तदार्येण पुण्यमारण्यकं व्रतम्'** ही भगवान् भवभूतीची उक्ति आपल्या या चिरंजिवांच्या जीवनक्रमाला तंतोतंत लागू पडत आहे या गोष्टीची प्रतीति पटेपर्यंत अण्णा जगलेवांचले असते तर आपला भविष्यवाद खरा ठरला म्हणून त्यांना खरें वाटलें असतें, कीं आपल्या मुलाला भोगावे लागणारे कष्ट पाहून ते विव्हल झाले असते, कीं देशस्वातंत्र्यार्थ झगडणाऱ्या वीरश्रेणींत आपल्या सुपुत्रानें मानाचें स्थान पटकावलें याबद्दल त्यांना अभिमान वाटला असता, हें ज्यानें त्यानें आपल्या कल्पनेच्या कुवतीप्रमाणें ठरवावयाचें आहे.

तात्यांचा भगूर येथील विद्यार्जनाचा कार्यक्रम संपला त्या सुमारास घडलेली एक गोष्ट त्यांच्या बहुतेक सर्व चरित्रकारांनीं बऱ्याच रसाळपणानें रंगविली आहे. सावरकरांच्या हिंदु-मुसलमानप्रश्नाविषयींच्या मतांच्या व धोरणाच्या रंगांत ही बालवयांतली घटना रंगविणें प्रस्तुत लेखकाला विशेषसें संमत नाहीं. तरीहि, झालेली एक गोष्ट एवढ्याच दृष्टीनें ती गोष्ट सांगणें अवश्य आहे. १८९४-९५ सालच्या सुमारास मुसलमानी आक्रमणांच्या गोष्टी वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होऊं लागल्या. त्या वाचल्यावर भगूरच्या शाळेंत जाणारे तात्या व त्यांचे समवयस्क मित्र यांचींहि मनें प्रक्षुब्ध झालीं. या अत्याचारांमुळें चिडून गेलेल्या या मुलांनीं एके दिवशीं संध्याकाळच्या सुमारास गांवाच्या वेशीपाशीं असलेल्या ओसाड मशिदीवर गनिमी काव्याच्या पद्धतीनें चाल केली व मशिदींत शिरून कांहीं मोडतोड व नासधूस केली. उर्दू शाळेंतल्या मुसलमान मुलांना ही हकीकत कळल्यावर, दुसऱ्या दिवशीं शाळा सुरू होण्याच्या अगोदर हिंदू विद्यार्थी व मुसलमान विद्यार्थी यांची मारामारी झाली. मुसलमान मुलांना या मारामारींत माघार घ्यावी लागली व घडलेला कोणताच प्रकार शिक्षकांच्या कानावर न घालण्याच्या अटीवर दोन्ही पक्षांचें सख्यहि झालें. या प्रकरणामुळें चिडलेल्या एकदोघा मुसलमान विद्यार्थ्यांनीं तात्यांच्या तोंडांत बोंबील कोंबून त्यांना बाटविण्याची 'कसम' खाल्ली होती, असें रानडे-लिखित सावरकर-चरित्रांत[१] नमूद करण्यांत आलें आहे. या मुसलमानभाईनीं या सुमारास खाल्लेली ही 'कसम' त्यांना मुकाट्यानें गिळावी लागली; कारण, वाळलेले किंवा ओले कसलेच मासे तात्यांच्या तोंडांत कोंबण्याचे कामीं त्यांना त्या काळांत यश आलें नाहीं ! पुढें विलायतेस जात असतांना तात्या मत्स्याहारी बनले हें खरें; पण त्या वेळीं 'मासे खाल्ल्यामुळें हिंदू बाटतो' ही विचित्र कल्पना त्यांच्या मनांतून पार नाहींशी झाली होती. मशिदीवरील हल्ल्याच्या प्रसंगीं त्यांना आपल्या सोबत्यांचा फार मजेदार अनुभव आला ! मशिदींत घुसण्याच्या ऐन वेळीं कित्येकांनीं असें सांगितलें कीं, आंत घुसण्याइतकेंच पाहरा करण्याचें कामहि महत्त्वाचें आहे ! यांतल्या कांहीं जणांनीं पाहऱ्यावरून पोबाराहि केला ! सावरकरांच्या जीवनांत त्यांना सहकाऱ्यांच्या व इतरांच्या स्वभावाचे जे विविध अनुभव यावयाचे

१ पृष्ठ १२

होते त्यांची सुरुवात या प्रसंगीं झाली, असें म्हणावयास हरकत नाहीं. आपल्या सहकाऱ्यांचें शरीरबळ वाढावें व त्यांचा धैर्योत्साहहि वृद्धिंगत व्हावा या हेतूनें तात्यांनीं यानंतर लष्करी शिक्षणाची गांवठी व्यवस्था केल्याबद्दलचाहि उल्लेख रानडे–लिखित चरित्रांत करण्यांत आलेला आहे.

थोरल्या मुलाचें लग्न करून टाकल्यावर अण्णांच्या मनांत आपल्या एकुलत्या एक मुलीचेंहि लग्न उरकून घेण्याची कल्पना घोळूं लागली व ते तिच्यासाठीं स्थळें पाहूं लागले. त्यांच्या माईला शिक्षण वगैरे फारसें देण्यांत आलेलें नव्हतें. येसूवहिनी घरांत आल्यावर विनायकानें वहिनींना व आपल्या बहिणीला जी अक्षर-ओळख करून दिली तेंच या दोघींचें शिक्षण. उपवर वधूची परीक्षा त्या काळीं सध्यांच्या पद्धतीनें केली जात नसल्यामुळें माईचें लग्न लवकरच ठरलें व त्र्यंबकेश्वर येथील काळे यांच्याकडे मुलगी देऊन अण्णा एका विवंचनेंतून मुक्त झाले. या लग्नाच्या वेळीं तात्या त्र्यंबकेश्वरास गेले होते. त्या वेळीं त्यांचा नाशिकचे शीघ्रकवि श्री. बळवंत खंडूजी पारख यांच्याशीं प्रथम परिचय झाला. तात्यांचा मुक्काम त्र्यंबकेश्वर येथें होता त्या अवधींत इतर मंडळीबरोबर ते गंगाद्वार पाहावयास गेले होते. उतरतांना कठडेवजा पायऱ्यांवरून जलदीनें उतरण्याची पैज लागली. पन्नास एक पायऱ्या झपाझप उतरून झाल्यावर तात्यांचा पाय निसरला व ते पडले. कपाळाला दोन खोंका पडून रक्त भळभळा वाहूं लागलें. शेजारींच राहात असलेल्या एका गोसाव्यानें पाणी दिलें तेव्हां घाव धुण्यांत आला व त्यांत पाणकणीस भरलें तेव्हां रक्तस्राव कमी झाला. त्र्यंबकेश्वरचे कारभारी श्रीमंत जोगळेकर यांनीं आपलें जरीकांठी उपरणें फाडून खोकेवर तेलपट्टीहि बांधली !

भगूरची शाळा सुटल्यापासून वर्ष दीडवर्ष तात्या घरींच होते. यानंतर अण्णांनीं त्यांना इंग्रजी शिक्षणासाठीं नाशिकास कसें ठेविलें, नाशिक येथील त्यांच्या वास्तव्यकाळांत महाराष्ट्रांत चाफेकरप्रकरणानें क्षोभ कसा निर्माण केला, त्या क्षोभामुळें तात्यांच्या मनांतली सुप्त स्वातंत्र्यप्रीति जागृत कशी झाली, त्यांनीं नाशिकच्या तरुण मंडळींना संघटित कसें केलें इत्यादि घटना सांगण्याला स्वतंत्र प्रकरणच लिहिणें अवश्य असल्यामुळें, सावरकरांच्या बाल्यवर्णनाचें हें प्रथम प्रकरण या ठिकाणींच संपविणें श्रेयस्कर आहे.

———

# प्रकरण २ रें

# नाशिक येथील विद्यार्जन

भुवमधिपतिर्बालावस्थोऽप्यलं परिरक्षितुं ।
न खलु वयसा जात्यैवायं स्वकार्यसहो भरः ॥ —कालिदास.

भगूर येथील मराठी शाळेंत पांच इयत्तांचें शिक्षण पुरें करून, विनायकानें पुढील वर्षदोन वर्षांत घरीं बसल्याबसल्या इंग्रजीचेंहि कांहीं ज्ञान संपादन केलें होतें. आपल्या मुलाच्या या उद्योगीपणाबद्दल अण्णांना कितीहि समाधान वाटत असलें तरी, होतकरू मुलाच्या शिक्षणाची नीट व्यवस्था लागलेली नाहीं आणि त्याच्या आयुष्याचा काळ वायां चाललेला आहे ही रुखरुख अण्णांच्या मनाला एक़सारखी त्रास देत होती. आईविना पोरक्या झालेल्या या आवडत्या लेंकराला स्वतःपासून दूर ठेवणें त्यांच्या अगदीं जिवावर येत होतें; पण अखेरीस मुलाच्या भवितव्याचा विचार अरून, अण्णांनीं या मुलाला नाशिकास शिक्षणासाठीं धाडण्याचा निश्चय केला. थोरला मुलगा बाबा यापूर्वी नाशिक येथें इंग्रजी शिकण्यासाठीं गेलेलाच होता; त्याच्याच देखरेखीखालीं व त्याच्याच सहवासांत तात्याचें शिक्षण व्हावें असें ठरवून अण्णांनीं, कष्टी मनानें का होईना, तात्याची नाशिकला रवानगी केली.

तात्या इंग्रजी शिकण्यासाठीं नाशिकला आले त्या वेळीं ते व बाबा या दोघांचें बिऱ्हाड ' कानड्या मारुती ' जवळ होतें. प्रथम कांहीं दिवस हें बंधुद्वय हातानेंच स्वयंपाक करून जेवत असे. अर्थातच, या स्वयंपाकाच्या धामधुमीकडे विशेष लक्ष बाबांनाच पुरवावें लागे. मातोश्रीच्या मृत्यूनंतरच्या काळांत भगूर येथील घरांत बाबांना जे अनेक अनुभव घ्यावे लागेल त्यांतच पाकसिद्धीचा अनुभव व त्या विषयाचें शिक्षण[1] या गोष्टीहि त्यांना आत्मसात् कराव्या लागल्या. तात्यांवर अशा दगदगीच्या कामांत लक्ष घालण्याचा प्रसंग येऊं नये अशी दक्षता बाबा ज्याप्रमाणें भगूर येथें बाळगीत असत तशीच दक्षता ते नाशिक येथेंहि बाळगूं लागले. पण, ही पाकसिद्धीची दगदग संभाळून अभ्यास करणें आपल्यालाहि जमत नाहीं हा अनुभव आल्यावर, हा कार्यक्रम रद्द करण्यांत आला व हे दोघे बंधू खाणावळींत जेवूं लागले. मागून घेऊन कांहींहि खाण्याच्या बाबतींत तात्यांची वृत्ति फार संकोची असल्यामुळें,

---

१ दे. भ. बाबाराव सावरकर यांना मिळालेला हा अनुभव व हें शिक्षण सावरकरबंधूंना पुढें अंदमानांत कसें उपयोगी पडलें हें विनायकराव सावरकर यांनीं 'माझी जन्मठेप' या ग्रंथांत (उत्तरार्ध : पृ. १२८ ) वर्णिलें आहे.

या वेळीं त्यांची पुष्कळ वेळां उपासमार होत असे; पण, बाबांचें लक्ष तात्याच्या खाण्यापिण्याकडे चांगलेंच असल्यामुळें, त्यांनीं एका ठराविक दुकानांत तात्यासाठीं जिलबीचा रतीब लाविला होता. हलवायाच्या दुकानांत जाऊन तेथें जिलबी वगैरे पदार्थ खाणें हें त्या काळीं शिष्ट समाजाला संमत नव्हतें. पण, तात्यांनीं त्या वयांतहि या शिष्टसंमतीची फारशी पर्वा केली नाहीं आणि आपला दिनक्रम चालू ठेविला.

तात्या इंग्रजी शिक्षणासाठीं नाशिकला आल्यावर, तेथें नुकत्याच निघालेल्या शिवाजी स्कूलमध्यें प्रथम त्यांचें नांव घालण्यांत आलें. भगूर येथें झालेला अभ्यास उपयोगी पडला व त्यांना तिसरींत बसविण्यांत आलें. तिसरींत सुमारें चारपांच महिने काढल्यावर वार्षिक परीक्षेंत उत्तीर्ण होऊन तात्या याच शाळेंत चौथ्या इयत्तेंत गेले. ही शाळा रानडे–विद्वांस–जोशीप्रभृति तरुण मंडळींनीं नुकतीच काढलेली होती. मराठी रंगभूमीचे एकनिष्ठ उपासक म्हणून महाराष्ट्राला परिचित असलेले कै. अनंत वामन बर्वे हे त्या वेळीं नाशिक येथें राहात होते आणि शिवाजी स्कूल चालविणाऱ्या मंडळीशीं बर्वे यांचा चांगलाच परिचय होता. ही सर्व तरुण मंडळी लोकमान्य टिळकांच्या राजकारणाचा अभिमान बाळगणारी होती. नाशिकच्या जीवनावर टिळकांच्या राजकारणाचा ठसा उमटावा असा या मंडळींचा प्रयत्न असे आणि त्या वेळीं नाशिक येथें जे पुढारी म्हणून समजले जात त्यांच्या मार्फतीनें आपला प्रयत्न साध्य करण्यासाठीं ही मंडळी झटतहि असत. या वेळीं नाशिकला दोन वृत्तपत्रें चालू होतीं. मुखत्यार वकील खरे हे ' नाशिक–वैभव ' पत्र चालवीत असत आणि श्री. अनंतराव बर्वे हे ' लोकसेवा ' पत्र चालवीत असत.

नाशिकच्या वातावरणांत राजकीय विचारांची जोपासना करण्याचा प्रयत्न अशा रीतीनें चालू असला तरी, त्या सुमारास नाशिकचें एकंदर जीवन राजकारणाच्या दृष्टीनें सामान्यतः उदासीन व चैतन्यहीन असेंच होतें. क्षेत्र म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या कोणत्याहि स्थानाची त्या परिस्थितींत जी गत निसर्गतःच झाली असती तीच नाशिक क्षेत्राचीहि झालेली होती. तीर्थक्षेत्रांचा बडेजाव टिकावयाचा असेल तर त्यासाठीं स्वकीय राजकीय सत्ता ही सामर्थ्यसंपन्न व तेजस्वी असणें अवश्य आहे. स्वकीय राजकीय सत्तेचा लोप होतांच अशा क्षेत्रांवर प्रेतकळा पसरावी, हें अपरिहार्य आहे. पुण्याचें अनुकरण करून नाशिक शहरानें नव्या विद्या आणि नव्या चळवळी या बाबतींतहि विशेष कांहीं केलेलें नव्हतें. कांहीं जुनी संस्कृत विद्या नाशिकांत धुगधुगी धरून राहिलेली होती. बुद्धीला पुरेसा वाव मिळेल असें क्षेत्रच समोर दिसत नसल्या-मुळें, नाशिकांतील त्या वेळचे पुष्कळसे तरुण ख्यालीखुशालीकडे व चेष्टाकुचेष्टांकडे आकर्षिले जात असत. तात्या इंग्रजी शिक्षणासाठीं नाशिकला येऊन राहिल्यानंतर पहिले कांहीं महिने त्यांना अगदीं चुकल्यासारखें वाटत असे. वडील बंधु बाबा व त्यांच्या वयाचे त्यांचे शाळूसोबती हे नाशिक येथील जीवनाच्या या विशिष्ट वाहतींत सांपडले होते. अशा प्रकारच्या जीवनाशीं समरस होण्याला अवश्य असणारी मनो-

वृत्ति तात्यांच्या ठिकाणीं नव्हती. भोंवतालच्या परिस्थितीचें अवलोकन करून स्वतःचें मित्रमंडळ गोळा करून व आपल्या मनोवृत्तीला रुचेल असा आयुष्यक्रम ठरवून त्याप्रमाणें वागण्याची तात्यांनीं सुरुवात केल्यावर, वयानें त्यांच्याहून वडिल असणारी ही मंडळी त्यांच्याभोंवतीं गोळा झाली हें खरें; पण, हें घडण्यापूर्वीं जो वर्षाभराचा काळ गेला तो काळ तात्यांना एकलकोंडेपणानें घालवावा लागला. भोंवतालच्या मंडळींच्या विलासी जीवनापासून तात्या अलिप्त रहात असल्यामुळें, या मंडळींकडून त्यांचा उपहासहि होत असे. तात्यांना भगूरपासून लागलेला वाचनाचा नाद या काळांतहि कायम होता. या नादाचीहि या वडील मंडळींकडून थट्टा केली जाई. ग्रंथकीट (Book-worm) या निंदागर्भ शब्दाचा अहेर तात्यांना करण्याला ही मंडळी कचरत नसत.

नाशिकला तात्यांचें शिक्षण सुरू झालें तें नेमकें कोणत्या वेळीं सुरू झालें हें अनुमानानेंच ठरविणें प्राप्त आहे. पहिलें वर्ष सोडलें तर पुढील सर्व वर्षांत तात्या प्रत्येक वर्षीं एक इयत्ता या क्रमानेंच प्रगति करीत गेलेले आढळतात. चौथी पास झाल्यानंतर ते नाशिक येथील सरकारी हायस्कुलांत जाऊं लागले आणि या हायस्कूलचे विद्यार्थी म्हणूनच ते दि. १९-१२-१९०१ रोजीं लागलेल्या मुंबई विद्यापीठाच्या निकालांत मॅट्रिक परीक्षेंत उत्तीर्ण झाले. या तारखेपासून मागें विचार करीत चाललें तर असें दिसतें कीं, तात्या नाशिकला प्रथम आले ते १८९७ च्या जून-जुलै महिन्याच्या सुमारास आले असावे. पहिल्या वर्षीं नाशिकच्या परिस्थितीशीं ते समरस होऊं शकले नाहींत आणि त्यामुळें त्यांचा भगूरकडे स्वाभाविकपणेंच ओढा राहिला. या वर्षीं गणेशोत्सवाच्या दिवसांत तात्या भगूरला गेले होते व भगूरला पूर्वींपेक्षां मोठ्या प्रमाणावर गणेशोत्सव साजरा करण्याची त्यांनीं पराकाष्ठा केली. भगूरच्या आपल्या बालमित्रांना गोळा करून त्यांनीं तेथील मेळ्याला भव्य स्वरूप दिलें आणि या मेळ्यासाठीं त्यांनीं स्वतः ७।८ पदें रचून दिलीं. या पदांपैकीं एकाच्या शेवटीं

उद्धारा आर्यजनां आर्यभूमिला
त्या स्वतंत्र छात्रि आर्य ठेवणें त्वरें
प्रार्थुनिया कार्याला लागलों बरें ॥

असे चरण होते.[१] त्या काळांतहि तात्यांची मनःप्रवृत्ति कशा प्रकारची होती हें लक्षांत येण्याच्या दृष्टीनें हे चरण नमूद करण्यासारखे आहेत.

नाशिकास परत आल्यावर तात्यांनीं तेथें होऊन गेलेल्या गणेशोत्सवाचें वर्णनहि कविताबद्ध केलें. या कविता आर्यावृत्तांत असून त्यांची संख्या १३ आहे. नाशिकचा उत्सव पुण्यासारखा गाजला नाहीं तरी, चार मेळ्यांनीं चांगली कामगिरी बजाविली इत्यादि गोष्टींचा निर्देश करण्यांत आल्यावर या कवीच्या मनांतली हळहळ पुढीलप्रमाणें व्यक्त झाली आहे :

---

१ वहिनींच्या आठवणी : अप्रकाशित.

जीं रामकृष्णवासें सत्क्षेत्रें पावलीं अशा सुपदा ।
हरहर त्यांतचि ब्राह्मण भोगिति निर्बंधनें सदा अपदा ॥ ८ ॥

* * *

राजा परकी, शिक्षण परकी, लक्ष्मीहि जाहली परकी ।
आतां प्रभो दयाळा तुजविण कोणीच ना रिपू हांकी ॥ ११ ॥

नाशिक येथील वातावरणांत वागतांना तात्यांना 'उदासीन हा काळ कोठें न कंठे' असा अनुभव येत असला तरी, त्यांच्या बुद्धीचें तेज त्यांच्या शाळेंतील शिक्षक वर्गाच्या लक्षांत येऊं लागलें होतें. या शिक्षक मंडळींच्या मार्फत तात्यांच्या बुद्धिमत्तेची कीर्ति बाहेरहि पसरूं लागली. याचा परिणाम असा झाला कीं, तात्यांनीं या सुमारास लिहिलेला 'हिंदु संस्कृतीचा गौरव' हा निबंध 'नाशिकवैभव' पत्राचे संपादक श्री. खरे यांच्यापर्यंत जाऊन पोंचला व त्यांना तो निबंध फार आवडल्यामुळें त्यांनीं आपल्या पत्राच्या दोन अंकांत तो लेख संपादकीय लेख म्हणून प्रसिद्ध केला. याच वर्षीं नाशिकला ज्या वक्तृत्वाच्या चढाओढी झाल्या, त्यांतहि तात्यांच्या बुद्धिमत्तेचें व वक्तृत्वाचें तेज झळकून दिसलें. वक्तृत्वाचे विषय व चढाओढीचे दिवस जाहीर झाल्या-नंतर पुष्कळ दिवसपर्यंत तात्यांनीं परीक्षक मंडळाकडे अर्जच केला नव्हता. शेवटीं त्यानीं अर्ज करण्याचें ठरविलें. वस्तुतः अर्ज करण्याची मुदत टळून गेलेली होती; पण, श्री. अनंत वामन बर्वे यांना तात्यांच्या ठिकाणीं असलेल्या सुप्त शक्तींची ओळख पटूं लागली असल्यामुळें, त्यांनीं उशिरा आलेला हा अर्ज स्वीकारला. अर्ज ज्या क्रमानें आले होते त्याच क्रमानें अर्जदारांचीं भाषणें होऊं लागल्यामुळें, तात्या भाषण कर-ण्याला उभे राहिले त्या वेळीं श्रोते कंटाळलेले होते; पण, तात्या बोलूं लागले व त्यांच्या तोंडून दहावीस वाक्यें निघालीं त्याबरोबर श्रोत्यांचा कंटाळा पार नाहींसा झाला. सर्व वक्त्यांमध्यें वक्ता या दृष्टीनें तात्यांना पहिला क्रमांक मिळाला; पण त्यांनीं जे विचार प्रतिपादिले होते ते त्यांच्या वयाच्या व शिक्षणाच्या मानानें इतके प्रगत होते कीं, परीक्षकांना त्या बाबतींत कांहीं शंका आल्या. या मुलानें ज्या निबंधाच्या आधारें हे विचार मांडले तो निबंध दुसऱ्या कोणीं तरी लिहून दिला असला पाहिजे अशी कुजबूज परीक्षक मंडळांत सुरू झाली. पण, श्री. बर्वे यांना खरा प्रकार माहीत असल्यामुळें परीक्षकांची शंका शेवटीं निरास पावली व सर्वांनीं मोठ्या आनंदानें तात्यांना या चढाओढींतलें पहिलें बक्षीस दिलें. आज सावरकरांच्या ज्या अमोघ व स्फूर्तिदायक वक्तृत्वावर हजारों लोकांचे समूह तल्लीन होऊन जातात त्या वक्तृत्वाची पहिली फैर नाशिकच्या या चढाओढीच्या वेळीं निघालेली आहे.

एकीकडे मामुली विद्याभ्यास चालू असतांना, विविध प्रकारच्या वाचनानें मन विकसित करण्याचा कार्यक्रम चालला असतांना आणि बुद्धीच्या ईश्वरदत्त देणगीनें लहानमोठ्या लोकांना आकृष्ट करण्याचें कार्य चालू असतांना, तात्यांच्या मनोवृत्तींत

एका गोष्टीमुळें खूप खोलवर चलबिचल चाललेली होती. ही गोष्ट एका व्यक्तीला अगर एका शहराला धक्का देणारी नसून ती सगळ्या प्रांताच्या—इतकेंच नव्हे तर सगळ्या देशाच्या—राजकीय विचारालाच धक्का देणारी होती. तात्या इंग्रजी शिकण्यासाठीं नाशिकास आले त्याच सुमारास व्हिक्टोरिया राणीच्या राज्यारोहणाचा हीरक महोत्सव साजरा करण्याचा खटाटोप देशभर चाललेला होता. प्लेग व दुष्काळ या दुहेरी संकटांच्या खाईत कोटयवधि लोक रुतले असतांना या देशांतील परकी राज्यकर्त्यांनीं हा समारंभ साजरा करण्याचें ठरविलें, ही गोष्ट लोकांच्या दुःखावर डागण्या देण्यासारखी होती. दुष्काळ ही आपत्ति जशी गरीब—श्रीमंत सर्वांनाच असह्य झालेली होती त्याप्रमाणेंच प्लेगची आपत्तीहि समाजाच्या सर्व थरांना असह्य झालेली होती. प्लेगची आपत्ति अस्मानी समजून लोक कदाचित् नुसते हवालदील होऊन स्वस्थ बसले असते; पण, प्लेग-प्रतिबंधक उपायांच्या निमित्तानें सरकारी अधिकाऱ्यांनीं जी सुलतानी सुरू केली तिच्यामुळें समाजांत सर्वत्र पसरलेला असंतोष तीव्रतर झालेला होता. या असंतोषाची आम्हांला कांहींहि पर्वा नाहीं, आमच्या साम्राज्य-वैभवाचें प्रदर्शन समारंभाच्या रूपानें आम्हीं करणारच, असा हटवादीपणा सरकारनें चालविला होता. दि. २२-६-१८९७ रोजी चाफेकरबंधूंनीं गणेश खिंडीच्या रस्त्यावर रँन्ड व आयर्स्ट या दोघा इंग्रज अधिकाऱ्यांचा हातोहात खून केला व त्यामुळें साम्राज्याच्या वैभवासाठीं चाललेल्या समारंभाच्या मर्मावरच आघात व्हावा, तशी स्थिति झाली.

राणीच्या राज्यारोहणाची डायमंड ज्युबिली म्हणून जो दिवस ठरला होता त्याच दिवशीं, पुण्यासारख्या परंपराप्रसिद्ध अशा शहरीं, हा प्रकार घडल्यामुळें सर्व देशभर एकच गलबला सुरू झाला. या गलबल्याच्या वार्ता वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होऊं लागल्याबरोबर, नाशिक येथें विद्यार्जन करीत असलेल्या सावरकरांचें मन क्षुब्ध होऊं लागलें. बालवयापासून त्यांच्या मनावर जे संस्कार चढत चाललेले होते त्यांचा विचार केला असतां, पुण्यास घडलेल्या या असामान्य प्रकारामुळें त्यांच्या मनांत चलबिचल व्हावी, हें स्वाभाविकच होतें. रॅन्ड व आयर्स्ट यांच्या वधानंतर ज्या घडामोडी महाराष्ट्रांत एका पाठोपाठ एक होऊं लागल्या त्या तर कोणीहि भावनावश माणसाला प्रक्षुब्ध करतील, अशाच होत्या. लो. टिळकांवरील राग शमविण्यासाठीं सरकारनें त्यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरला होता व पुण्याच्या सरदार घराण्यांतील नातूबंधूंना सरकारनें एका बुरसटलेल्या कायद्याच्या आधारें तुरुंगांत टाकलें होतें. रॅन्ड व आयर्स्ट यांना परलोक दाखविणाऱ्या इसमांचा तपास लागावा म्हणून सरकारनें मोठमोठीं बक्षिसें लाविलीं तरी कित्येक महिनेपर्यंत हा गुन्हा करणाऱ्या लोकांचा पत्ताच लागला नव्हता. शेवटीं द्रविडबंधूंनीं माहिती पुरविल्यामुळें, चाफेकरबंधूंपैकीं थोरले बंधु श्री. दामोदरपंत यांना अटक करण्यांत आली होती. ही अटक होतांच चाफेकरबंधूंपैकीं दुसरे श्री. बाळकृष्णपंत हे मोंगलाईत पळून गेले व दरेच दिवसपर्यंत ते सरकारच्या हातीं लागलें नाहींत. चाफेकरबंधूंपैकीं तिसरे बंधु वासुदेवराव व

त्यांचे सहकारी महादेव विनायक रानडे यांनीं द्रविडबंधूवर दंश धरला व त्यांना परलोक दाखविला. या सर्व गोष्टी इतक्या द्रुतगतीनें घडत गेल्या कीं, वर्तमानपत्रें वाचणाऱ्या त्या काळच्या लोकांना कित्येक महिनेपर्यंत या एका विषयाशिवाय दुसरा विषयच सुचत नव्हता.

राणीच्या राज्यारोहणाच्या हीरक महोत्सवाला अपशकुन करण्याचे कांहीं प्रयत्न इतरत्रहि झाले होते. ज्युबिलीच्याच दिवशीं पेशावरास एका गाझीनें एका युरोपियनास दिवसाढवळ्या गोळी घालून ठार मारलें होतें. त्याच सुमारास ठाणें येथें चाललेल्या दरवड्याच्या एका खटल्यांतला आरोपी गंगाराम याच्याजवळ कांहीं जुनीं हत्यारें सांपडलीं व माथेरानवर हल्ला करून सगळे युरोपियन कापून काढण्याचा कट आम्ही करीत होतों, अशी गंगारामनें जबानी दिली[1] अशा फुटकळ हकीकती वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाल्यावर, त्या तात्यांच्या वाचनांत आल्या नसतील असें नाहीं. कारण, प्रमुख मराठी वृत्तपत्रें वाचण्याचा नाद त्यांना यापूर्वींच लागलेला होता. तात्यांच्या मनोविकासाला उपयोगी पडतलि अशा मात्र या फुटकळ घटना नव्हत्या, हें निर्विवाद आहे. बालमनावर टिकाऊ संस्कार घडण्याच्या दृष्टीनें अशा पुष्कळशा फुटकळ घटनांचा उपयोग फारसा होत नाहीं. जी घटना वारंवार घासली जाते त्याच घटनेचा संस्कार बालमनावर चिरकाल उमटतो. या दृष्टीनें पाहिल्यास चाफेकर प्रकरणांतलि महत्त्वाच्या घटनांचा कालक्रम दृष्टिसमोर ठेवून, त्यांच्या द्वारा तात्यांच्या मनाचा विकासमार्ग निश्चित करीत जाणें, हें श्रेयस्कर ठरणारें आहे.

दामोदरपंत चाफेकर यांना पकडण्याच्या कामीं द्रविडबंधूंनीं दिलेली माहिती उपयोगी पडली, हें वर सांगितलेंच आहे. द्रविडबंधूंनीं १८९७ च्या सप्टेंबर महिन्याच्या प्रारंभीं पुणें पोलिसला ही माहिती दिली. दामोदरपंत चाफेकर यांना पकडण्यांत आल्यावर त्यांनीं दि. ८ आक्टोबर १८९७ रोजीं मुंबई येथें प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट मि. हॅमिल्टन यांजपुढें जो जबाब दिला तो अत्यंत व्यापक असून, सावरकरांसारख्या संस्कारक्षम किशोराच्या मनावर त्याचा विलक्षण परिणाम झाला असेल हें कोणालाहि मान्य होण्यासारखें आहे. दामोदरपंत चाफेकर यांच्या या जबाबाचा विस्तृत आशय श्री. न. चिं. केळकर यांनीं टिळक चरित्राच्या पूर्वार्धात[2] दिलेला आहे. तो या ठिकाणीं शब्दशः उद्धृत करणें अवश्य आहे.

*' वासुदेवराव पटवर्धन, दामुअण्णा कुळकर्णी वगैरे सुधारक यांना आणि थोरात, वेलिणकर वगैरे धर्मांतर केलेल्या हिंदूंना मींच ठोक दिला; मुंबईतील राणीच्या पुतळ्यावर मींच डांबर ओतलें व पुतळ्याच्या गळ्यांत जोड्यांची माळ घातली; युनिव्हर्सिटीचा मंडप मींच जाळला; पुण्यांत प्लेगच्या अमदानींत सोजीर लोकांनीं केलेले अत्याचार पाहून मला त्वेष आला व त्यांचा मुख्य अधिकारी रँडसाहेब याला मारून सूड उगविण्याचा मीच निश्चय केला.*

---

१ न. चिं. केळकर : लोकमान्य टिळक यांचें चरित्र : पूर्वार्ध, पृष्ठ ५४५
२ पृष्ठ ५७९.



श्री. बाळकृष्णपंत चापेकर



श्री. वासुदेवराव चापेकर



श्री. म. वि. रानडे

*बंदुकी अमुक ठिकाणाहून चोरल्या, दारूगोळा अमुक ठिकाणीं मिळविला, पिस्तुलें व तरवारी अमुक ठिकाणाहून घेतल्या, रँडसाहेबाला मारण्याचे पूर्वीचे प्रयत्न असे असे फसले; शेवटीं, ज्युबिलीच्या दिवशीं, दिवसभर ईश्वरप्रार्थना करून व हत्यारें बरोबर घेऊन, मी व माझा भाऊ बाळकृष्ण असे गणेशखिंड रस्त्यावर गेलों, मीं रँडसाहेबाला गोळी घातली व बाळकृष्णानें ले. आयर्स्ट याला मारलें, हत्यारें नाल्यावरील पुलाखालीं छपवून ठेवून आम्हीं कालव्याचे रस्त्यानें परत आलों; दुसरे दिवशी लोंढे यांचे विहिरींत हत्यारें टाकून देऊन ता. २४ जून रोजीं मुंबईस निघून आलों व फिरून कीर्तनें करूं लागलों; पुढें टिळकांवर खटला झाला, नातूंना पकडलें, इतर लोकांना त्रास झाला म्हणून मींच पोलिसच्या स्वाधीन होऊन कबुलीजबाब देण्याचें ठरविलें. ब्रुइनसाहेब हे माझे स्नेही आहेत. त्यांचेजवळ मी माझा सर्व वृत्तांत लेखी दिला आहे; पण त्यांच्या माझ्या दरम्यान काय गोष्टी झाल्या त्या मी त्यांच्या संमती-शिवाय उघड करूं शकत नाहीं.'*

१८९७ च्या नोव्हेंबर महिन्याच्या शेवटींशेवटीं दामोदरपंत चाफेकर यांज-वरील खटला सेशनकमिट झाला व थोड्याच दिवसांनंतर खटल्याचा निकाल होऊन दामोदरपंतांना फांशीची शिक्षा सांगण्यांत आली. कांहीं दिवस येरवडयांत काढल्या-नंतर, त्या वेळीं त्याच तुरुंगांत असलेले लो. टिळक यांच्याजवळची गीता मागून घेऊन व ती गीता हातांत ठेवून दामोदरपंत दि. १८-४-९८ रोजीं फांशी गेले. दामोदरपंतांवरील खटल्याची सुरुवात झाल्यापासून ते फांशी गेले तेथपर्यंतचा सर्व वृत्तान्त 'केसरी'त प्रसिद्ध होत होता; आणि, या वृत्तान्ताच्या वाचनामुळें, सावर-करांच्या मनावर जो परिणाम घडून आला तो त्यांच्या जीवनाचें ध्येय निश्चित करण्याच्या दृष्टीनें फार महत्त्वाचा ठरला.

१८९७ च्या शेवटींशेवटीं इंग्रजी तिसऱ्या इयत्तेची परीक्षा उत्तीर्ण होण्याच्या सुमारास कांहीं दिवस तात्यांची प्रकृति ठीक नव्हती. त्यांना प्रथम ताप येऊं लागला तो बराच रेंगाळला. त्यांतून उठून ते नाशिकास गेल्यावर थोडया दिवसांनीं देवी आल्या व त्यामुळें नाशिक सोडून ते कांहीं दिवस भगूरला जाऊन राहिले. भगूरच्या एकांतांत व रिकामपणांत चाफेकर प्रकरणांतील घटनांचा विचार त्यांच्या मनांत अधिकच जोरानें सुरू झाला. वृत्तपत्रांच्या मानेवर लटकत असलेल्या निर्बंधविषयक तरवारीमुळें चाफेकरांसंबंधीं लिहितांना चांगल्या धैर्यशाली वर्तमानपत्रांनाहि 'माथेफिरू' 'वेडापीर' वगैरे शब्द वापरावे लागत असत. चाफेकरांच्या वर्तनाविषयीं तात्यांनीं आपलें मत यापूर्वींच बनविलेलें होतें. पुढें 'गोमांतक' हें काव्य लिहितांना त्यांनीं अशा प्रकरणीं जो शब्दप्रयोग वापरला तो शब्दप्रयोग त्यांना या वयांत सुचला नसेल, हें शक्य आहे; पण चाफेकरांचें वर्तन म्हणजे 'रित्या हळहळीला आलेलें जित्या चळवळीचें स्वरूप होय' हा निर्धार, वेगळ्या शब्दांत का होईना, तात्यांनीं ठामपणें केला होता.

*स्वदेशाच्या छळाचा सूड घेऊन चाफेकर फांसावर चढले, त्यांच्या प्राण-ज्योतीनें जातां जातां चेतविलेली शत्रुंजयवृत्ति, यज्ञकुंडांत समिधेमागून समिधा टाकून अग्नीच भडकावीत नेणें असेल तर त्याचें दायित्व आपल्यावरीह पडत आहे, हा विचार[1] त्यांच्या मनांत बळावूं लागला.*

'चाफेकरांचें कार्य कुणी तरी चालविणें इष्ट व अवश्य असेल तर तें कार्य मीच कां चालवूं नये हा प्रश्न' त्यांच्या मनांत एकसारखा उद्‌भवूं लागला.[2] उपजत क्षात्र-वृत्तीला पोषक असें कांहींच भोंवतालच्या वातावरणांत दिसत नव्हतें तोंपर्यंत गुदमरून गेलेल्या सावरकरांना भोंवतालच्या परिस्थितींतल्या या उत्तेजक घटनेनें विचारप्रवण केलें व चेताविलें, हें मानसशास्त्रदृष्ट्या बरोबरच आहे.

दिवसामागून दिवस चालले तरी मनांतलि हा अस्वस्थपणा कमी होण्याचें लक्षण दिसेना; तेव्हां, शेवटीं तात्यांनीं त्यांचें त्या वेळचें शेवटचें आश्रयस्थान गांठण्याचें ठरविलें. भगूर सोडण्यापूर्वी जसे ते घरांतील अष्टभुजा देवीपुढें चित्त एकाग्र करून तासन्तास बसत असत तसेच ते या मानसिक अस्वस्थतेच्या प्रसंगींहि बसूं लागले; आणि अशा एकाग्र मनानें चिंतन करीत असतांनाच शेवटीं त्यांनीं देवीपुढें शपथ घेतली.

*देशाचें स्वातंत्र्य परत मिळविण्यासाठीं सशस्त्र क्रांतीचा केतू उभारून मी मारतांमारतां मरेतों झुंजेन.[3]*

अशा आशयाची ही शपथ होती. यापूर्वीच सुरू करण्यांत आलेल्या 'दुर्गादासविजय' ग्रंथाला अद्ययावत् स्वरूप यावें म्हणून तात्यांनीं हा शपथविधीचा प्रसंग ओंवीबद्ध करून त्या हस्तलिखित ग्रंथांत नमूद करून टाकला. चाफेकर प्रकरणासंबंधीं मनांत उचंबळ-लेली खळबळ अंतस्थ रूपानें या शपथेंत परिणत झाली. या खळबळीच्या बाह्य स्वरूपाला एक वेगळाच वाङ्मयीन आकार आला. याच सुमारास तात्यांनीं चाफेकरांचा फटका रचण्याला सुरुवात केली. फटका रचण्याचें कार्यहि देवीसाक्षच होत असे आणि या रचनेच्या तंद्रींत मध्यरात्र उलटून गेली तरी तात्या रंगलेले असत. अशी तंद्री लागून तात्यांचें लेखनकार्य चाललें असतांनाच एकदां अण्णांनीं त्यांना पाहिलें. तात्यांच्या हातां-तलि काव्य पाहून अण्णांच्या पितृहृदयाला समाधान वाटावें इतकी रसिकता आणि वत्सलता त्यांच्या ठिकाणीं निःसंशय होती; तथापि, आपल्या अल्पवयी व कोमल लेंकरानें असें अपरात्रपर्यंत जागून हृदय पिळवटून निघणाऱ्या कविता लिहाव्या ही गोष्ट त्या सहृदय पित्याच्या मनाला मोठीशी रुचण्यासारखी नव्हती; त्यामुळें, या प्रकाराबद्दल त्यांनीं तात्यांची थोडीशी कानउघाडणी केली. 'स्वदेशी कापड' या शीर्षकाचा फटका सावरकरांनीं याच सुमारास लिहिला. पुण्याच्या 'जगद्‌हितेच्छु' पत्रांत प्रसिद्ध झालेल्या या कवनांत ६० चरण आहेत.

---

१ सावरकरांचें अप्रकाशित आत्मवृत्त.

२ अप्रकाशित आत्मवृत्त. ३ अप्रकाशित आत्मवृत्त.

१८९८ च्या उन्हाळ्याच्या सुट्टीनंतर शाळेंतील अभ्यास व इतर मामुली कार्यक्रम यांच्याकडे तात्यांचें लक्ष लागलें असलें तरी, इतर गोष्टींकडे त्यांचें दुर्लक्ष होतें असें म्हणतां येणार नाहीं. हें वर्ष संपून तात्या नाशिकच्या सरकारी शाळेंत पांचव्या इयत्तेंत गेल्यानंतर थोड्याच दिवसांनीं चाफेकर प्रकरणाला एक वेगळेंच स्वरूप आलें. बक्षिसाच्या आशेनें चाफेकरबंधूंची माहिती सरकारला पुरविण्याला द्रविडबंधू उद्युक्त झाले होते. चाफेकरबंधूंपैकीं सर्वांत धाकटे बंधु वासुदेवराव व त्यांचे मित्र रानडे[1] यांनीं दि. ८-२-१८९९ रोजीं रात्रीं दहा वाजण्याच्या सुमारास द्रविडबंधूंचा खून केला. खुनाच्या दुसऱ्या दिवशीं वासुदेवराव चाफेकर, रानडे व त्यांचे स्नेही साठे यांना फरासखान्यांत बोलावून नेण्यांत आलें होतें. प्रश्नोत्तरें चालू असतां फौजदार रामजी पांडू हे वासुदेवरावांना कांहीं टाकून बोलले. त्याबरोबर त्यांनीं अंगरख्यांत लपविलेलें सहा बारी पिस्तुल बाहेर काढलें व तें प्रथम रामजी पांडू व नंतर ब्रुइनसाहेब यांजवर झाडलें. १८९९ च्या मे महिन्यांत दिनांक १२, ८ व १० रोजीं बाळकृष्णपंत चाफेकर, वासुदेवराव चाफेकर व रानडे यांना अनुक्रमें फांशीं देण्यांत आलें. या अघटित घटनांचा परिणाम तात्यांच्या मनोवृत्तीवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. टिळक, चाफेकर, रानडे यांचा उघडउघड गौरव करणारें एकांकी नाटक लिहिण्याला तात्यांनीं या सुमारास आरंभ केला. हें एकांकी नाटक लिहून पूर्ण झाल्यावर तात्यांचे भगूरचे स्नेही राणू शिंपी वगैरे लोक त्या नाटकाचा प्रयोगहि बसवूं लागले.[2] इतक्यांत, भगूरच्या पाटील-कुळकर्ण्यांना या गोष्टीची कुणकुण लागली आणि त्यांनीं वेगवेगळ्या प्रकारें खटपटी करून हा प्रयोग बंद पाडला.

चाफेकरांवरील कवनाला साफसुफी देण्याचें व त्याला अद्ययावत् स्वरूप देण्याचें कार्य याच काळांत झालें असावें. सावरकर यांच्या जुन्या कवितांच्या एका संग्रहांत हें कवन संपूर्णतया दिलेलें आढळतें. या कवनाचा रचनाकाल म्हणून दिनांक ७-५-१८९९ हा दिवस दिलेला आहे. तो या काव्याच्या रचनासमाप्तीचा दिवस असावा. प्रत्येक चौकांत १६ चरण व असे बारा चौक मिळून १९२ चरण व ध्रुपदाचे दोन चरण असे सर्व मिळून या फटक्याचे १९४ चरण आहेत. प्लेगांतील भीषण दृश्यें व प्लेगनिवारक कार्य करणाऱ्या सोजिरांचें अतिरेकी वर्तन यांचें वर्णन दुसऱ्या चौकांत केलेलें आहे. तिसऱ्या चौकांतले पुढील चरण सावरकरांच्या मनोभूमिकेंतला एक स्थायिभाव व्यक्त करीत असल्यामुळें संस्मरणीय आहेत :

---

१ हे रानडे प्रि. वैजनाथ काशिनाथ व इतिहासाचार्य कै. विश्वनाथ काशिनाथ या राजवाडेबंधुद्वयांचे भागिनेय म्हणजे भाचे होत.

२ राणू शिंप्याच्या घराण्यांतील एक वृध्द गृहस्थ अद्याप भगूर येथें आहेत. कोणताहि सूचक प्रश्न न विचारतांहि त्यांनीं या एकांकी नाटकाबद्दलची माहिती प्रस्तुत लेखकाला स्मरणानें सांगितली.

स्वजनछळातें ऐकुनि होती तप्त तरुण ते अरुण जणों ।
देशासाठीं प्राणा देती धन्य धन्य त्या कां न म्हणों ? ॥

* * *

शतावधी ते जन्मा येती मरोनि जाती ना गणती ।
देशासाठीं मरती त्यांसी देशपिते कीं बुध म्हणती ॥

आपली संकल्पित कामगिरी करावयाला निघालेल्या दामोदरपंत चाफेकरांचें शब्दचित्र व त्यांच्या पत्नीचे धैर्याचे उद्गारहि अगदीं मोजक्या शब्दांत पण मार्मिकपणानें चितारण्यांत आलेले आहेत :

लालभडक ते नेत्र चमकती, हस्त स्फुरती, धीर मना ।
श्रीदामोदर सिद्ध जाहला जायालागीं खलशमना ॥
कान्ता वदली " कान्ता जातां देशहिताला करावया ।
पतिराया घ्या निरोप जावें त्वरित कीर्तिला वरावया " ॥
पवन जवन परि मागें सारित गणेशखिंडीप्रति आला ।
कालासम मग समय साधितो घालायला तो घाला ॥

रँड व आयर्स्ट यांच्या खुनानंतर पुण्यांत धरपकड कशी झाली हें वर्णून सांगतांना या बालकवीनें लो. टिळकांबद्दलचा आपला आदर पुढील चरणांत कसा व्यक्तविला आहे हें पाहण्यासारखें आहे :

कधीं फडकले जादा पोलिस कधीं पकडिलें नातूंना
जळीं स्थळीं त्या दिसूं लागला रँडवधासह तो "पूना"
देशवीर महाराज शूर श्रीटिळक तयांचें क्षेम असो ।
खरा हिरा हा कसासि उतरे काळभीति बाळासि नसो ॥

चाफेकर व त्यांना पकडून देणारे द्रवीडबंधू यांच्यामधील विरोध कवीनें एका फटकाऱ्यांत मोठ्या सफाईनें स्पष्ट केला आहे :

छळक छळ करी परी मजा कीं वरी कीर्ति जो छळ केला ।
चाफेकर यशरत्न झळकवी, द्रवीड अंधःकार भला ॥

दामोदरपंत फांसावर चढत असून मुक्तिनवरीला वरावयाची सिद्धता करीत आहेत हें अलंकारिक वर्णन तर फारच बहारीचें आहे :

न्यायाधिश हा जोशी उत्तम उदय मुहूर्ता योग्य गणी ।
सत्य-देशहित वऱ्हाड जमलें, कीर्ति-नीति ह्या वऱ्हाडणी ॥
टिळक गजानन नमस्कारिला फांस बोहलें मग पुरलें ।
स्मरले गीतामंत्र दामुनें मुक्तिनवरिला हो वरिलें ॥

परी अहाहा ! मायावी ही नवरी वर पळविला कुठें ।
कुठें हरपलें वऱ्हाड सारें; अंगाला बहु कंप सुटे ।।

ज्येष्ठ बंधूंच्या वधामुळें क्रुद्ध झालेल्या वासुदेवराव चाफेकरांचें पुढील वर्णन किती यथार्थ आहे पहा :

द्रवीड-कोपें दाह होतसे ज्वाला नेत्रांतुनि सुटती ।
लाही झाली दाहि दिशांतें सूड अक्षरें हीं उठती ।।
करकर चावी अधर, चोळितो करांसि, निश्चल पळ बसला ।
सूड शब्द कर्णांत गुंगतो वासुदेव मग स्मित हंसला ।।
बोले मत्ता मशका दुखवुनि सिंह सुटाया धडपडसी ।
यमनगरीला बदली करितों उचल जलद चल तव पडशी ।।

अकराव्या चौकांत चाफेकर–रानडे या मित्रद्वयाचे अनेक गुण गुंफण्यांत आले असून हें मित्रद्वय 'योग्य कां न तें नमनाला' हा पुनरुक्त प्रश्न विचारण्यांत आला आहे. आपण चाफेकर–रानडे यांचें गुणवर्णन करण्याला कां प्रवृत्त झालों हे वाचकांना कळवितांना कवि म्हणतो :

असोत अरिचे ठायीं परि गुण अनुकरणीयाचि जरि होती ।
अभिमानास्पद तरि न गमावी स्वजनकीर्ति मज कां हो ती ।।

चाफेकर–प्रकरणाचें उपाख्यान म्हणून टिळकांवरील खटल्याचें प्रकरण उपस्थित झालें; पण, टिळकांच्या श्रेष्ठ व्यक्तिमत्वामुळें तें उपाख्यान मूळ आख्यानाइतकेंच महत्त्वाचें ठरलें. या खटल्यांत झालेली शिक्षा भोगून टिळक सुटले त्या प्रसंगीं शिवाजी हायस्कूलला जी सुट्टी मिळाली त्या सुट्टींत सावरकरांनीं केलेली 'श्रीटिळकआर्यभूभेट' ही कविता पुण्याच्या जगद्‌हितेच्छु पत्रांत प्रसिद्ध झाली. या कवितेचा रचनाकाल दि. ७–९–९८ असल्याचें समजतें. या कवितेच्या एकंदर सात आर्या आहेत. आपल्या मातेच्या मृत्यूला सहा वर्षें झालीं या प्रसंगाचें स्मरण होऊन सावरकरांनीं 'मातृशोकालापाष्टक' ही कविता १८९९ मध्यें रचिली. आर्या वृत्तांत रचिलेल्या या कवितेंतली अखेरची आर्या पुढीलप्रमाणें आहे :

वंदन पदकमलीं तव नंदन करि गीत गात आर्यांत ।
मंद न धी होउ, झिजो चंदनसा देह देशकार्यांत ।।

या वर्षी फेब्रुवारी–मार्चच्या सुमारास तात्या कर्जतला आले होते. बाबांचे मेहुणे श्री. अण्णाराव फडके यांचें लग्न कर्जतला होणार असल्यामुळें, घरोब्याची सर्वच मंडळी कर्जतला आलेली होती. कांहीं कारणामुळें लग्न एक आठवडाभर लांबणीवर पडल्यामुळें, बाबा, तात्या व त्यांच्या बरोबरीची मंडळी पुण्यास आली. जव्हारचें त्या वेळचे कारभारी भाऊराव चिपळूणकर यांचा मुक्काम त्या वेळीं पुण्यांतील जव्हार-

करांचे वाड्यांत असल्यामुळें आणि चिपळूणकर घराण्याशीं या मंडळींचा पूर्वीपासूनच घरोबा असल्यामुळें, ही सर्व मंडळी जव्हारकरांच्या वाड्यांतच उतरली होती. तात्यांनीं या वेळीं पुणें शहर प्रथम पाहिलें. शनिवारवाडा, पर्वती वगैरे ऐतिहासिक स्थळें किती वेळां पाहिलीं तरी तात्यांचें समाधानच झालें नाहीं. ही मंडळी पुण्यांत होती त्याच वेळीं पुण्यांत ताबुतांची मिरवणूक निघाली होती. 'महाजनो येन गतः स पन्थाः' या न्यायानें वागणारी तात्यांच्या बरोबरीची इतर मंडळी ताबुत पाहण्यांत गर्क झाली होती त्या वेळीं, शनिवारवाड्याशेजारीं फिरत राहून, त्या वाड्याचें गत वैभव कल्पनेनें निर्माण करण्याचा प्रयत्न तात्या करीत होते. चाफेकर-प्रकरण लोकांच्या बोलण्यांतून या वेळीं गेलेलें नव्हतें. खुद्द पुण्यांत कित्येक मंडळी चाफेकरांची निंदा-नालस्ती करण्यापर्यंत मजल मारीत आहेत हें पाहून तात्यांच्या बालमनाला अतिशय विषाद वाटला !

पुण्याहून निघून तात्या व त्यांच्या बरोबरीची इतर मंडळी कर्जतला परत आली आणि ज्या कार्यानिमित्त ही सर्व मंडळी नाशिकहून आलेली होती तें कार्यहि पार पडलें. कर्जतहून नाशिकला परत जाण्यापूर्वी घडलेली एक गोष्ट तात्यांच्या जीवनवृत्तांताच्या दृष्टीनें फार महत्त्वाची ठरली. कर्जतशेजारीं असलेल्या दहिवली या गांवीं एक वक्तृत्व-समारंभ होणार आहे अशी वार्ता कळल्यावरून, तात्यांनीं या समारंभांत भाग घेण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें वक्तृत्वस्पर्धेतील एक उमेदवार म्हणून त्यांनीं आपलें नांवहि दाखल केलें. दोनचार दिवस मोडून, वक्तृत्वासाठीं नेमण्यांत आलेल्या विषयावरील आपला निबंध तात्यांनीं लिहून काढला आणि या तयारीनिशीं ते या समारंभाला गेले. चढाओढींत तात्यांचा क्रमांक पहिला ठरला. अध्यक्षस्थानीं असलेल्या गृहस्थांनीं तात्यांच्या वक्तृत्वांतील भाषा व माहिती त्यांची स्वतःची नसावी असा संशय व्यक्त केल्यामुळें, तात्यांनींहि त्यांना जरा स्पष्टोक्तिपूर्ण उत्तर दिलें. यामुळें, अध्यक्षमहाशयांचा तात्यांवर बराच राग झाला. या समारंभाचे जे कार्यवाह होते त्यांच्या घरीं रात्रीं तात्यांना जेवावयास जावें लागलें. तेथील मंडळींनीं पुण्याचें 'काळ' पत्र एक वर्षपर्यंत तात्यांना बक्षीस म्हणून देण्याचें ठरविलें. 'काळ' पत्राशीं तात्यांचा या प्रसंगीं प्रथम परिचय झाला. या सुमारास 'काळ' पत्रांत प्रसिद्ध झालेला 'चाफेकर' आणि 'रानडे' हा संपादकीय लेख पुढें बरेच दिवसपर्यंत चांगलाच गाजत राहिला होता. तात्यांच्या मनाची घडण या सुमारास बव्हंशीं तयार होत आली असली तरी तात्यांचें ज्ञान, भाषासरणी व मानसिक उत्साह इत्यादि गोष्टी अद्याप संक्रमणावस्थेंतच होत्या. यापुढें तात्या 'काळ' पत्राचें परिशीलन सतत करीत राहिले आणि 'काळ' च्या भाषासरणीचा व विचारसरणीचा तात्यांच्या मनाच्या उत्क्रांतीवर पुष्कळच परिणाम झाला. तात्यांच्या क्रांतिकारक जीवनांतील कृतिविषयक भागाचें गुरुत्व 'काळ' पत्राकडे जाईल कीं नाहीं हा प्रश्न वादग्रस्त असला तरी, त्यांच्या क्रांतिकारक जीवनाच्या वैचारिक

स्फूर्तीचें गुरुत्व 'काळ'पत्र व त्याचे संपादक कै. प्रो. अण्णासाहेब परांजपे यांजकडे जातें, ही गोष्ट मान्य केली पाहिजे.

पुणें-कर्जतकडून तात्या-बाबाप्रभृति मंडळी परत नाशिकास आली व त्यांचा तेथील जविनक्रम सुरू झाला. या जीवनक्रमाचें यापुढील स्वरूप वर्णन करून सांगण्या-पूर्वीं या सुमारास घडलेल्या कांहीं किरकोळ गोष्टी या ठिकाणीं नमूद केल्या पाहिजेत. बाबांच्या वर्गांत असणारे श्री. रामभाऊ दातार यांची व त्यांच्या कुटुंबांतील मंडळींची सावरकरबंधु व त्यांचें कुटुंब यांच्यांशीं ओळख पुष्कळ वाढली होती. या ओळखीचें पर्यवसान घरोब्यांत झाल्यामुळें, सावरकरबंधूनीं नाशिकांतील आपलें पूर्वीचें बिऱ्हाड बदललें होतें व ते तिळभाडेश्वराच्या गल्लींत दातारांच्या शेजाराला येऊन राहिले होते. १८९८ सालीं नाशिक येथें प्लेग झाला तेव्हां दातारांच्या कुटुंबांतील मंडळी स्थलांतर म्हणून भगूरला गेली होती आणि सावरकरांच्या राहत्या घराशेजारच्या त्यांच्याच जुन्या घरांत या मंडळींचें कांहीं दिवस वास्तव्यहि होतें. दातार कुटुंबांशीं झालेला हा परिचय व तिळभांडेश्वराच्या गल्लींतील हें वास्तव्य या गोष्टीचा सावर-करांच्या भावी जविनक्रमावर केवढा परिणाम झाला हें क्रमाक्रमानें विशद होईलच.

तात्या नाशिकला आल्यापासून त्यांचें वाचन व अभ्यास वगैरे कार्यक्रम सुरळीत चालले होते; पण, बाबांची स्थिति तशी नव्हती. नाशिकमधील नाटकी मंडळींच्या सहवासामुळें बाबांचें मन अभ्यासांत विशेष रमत नसे हें तर खरेंच; पण, बाबांचा अभ्यास रेंगाळत राहिला याला आणखीहि एक कारण आहे. बाबांना यापूर्वींपासूनच वेदान्तविषयक ग्रंथांच्या व धार्मिक ग्रंथांच्या वाचनाची चटक लाग-लेली होती; ईश्वरी अधिष्ठान हा त्यांच्या विचारांतला मोठा महत्वाचा भाग होता. या विचारसरणींत धर्मभोळेपणाचा अंशहि पुष्कळच प्रमाणांत होता. 'राख किंवा मठी दिसली कीं बाबांचें मन तेथें हटकून रमत असे.'[1] नाशिक हें क्षेत्राचें ठिकाण असल्यामुळें, त्या ठिकाणीं गोसावी-बैराग्यांचे तांडे सततच येतजात असत. अशा कांहीं गोसावी-बैराग्यांच्या संगतीचा बाबांच्या मनावर या सुमारास विशेष परिणाम झाला आणि त्यांना बैराग्याची लहर येऊन ती प्रबळ होऊं लागली. ही लहर अना-वर होण्याच्या ऐन सुमारास दातारांच्या कुटुंबावर जी आपत्ति ओढवली ती ओढ-वली नसती तर, बाबा कदाचित् या सुमारास विवेकानंदांच्या मायावती आश्रमांत जाऊन तेथें स्थायिकहि झाले असते.

पण, १८९९ च्या मार्च महिन्यांत प्लेगची आपत्ति दातारांच्या कुटुंबापर्यंत येऊन भिडली. श्री. रामभाऊ दातार यांचे वडील वे. शा. सं. केशवशास्त्री यांना या सुमारास प्लेग झाला आणि या आजारांत त्यांचें शेवटीं प्राणोत्क्रमणहि झालें. या दुखण्यांत केशवशास्त्री यांची शुश्रूषा करण्याच्या कामीं बाबांनीं रामभाऊ दातारप्रभृति मंडळींना अत्यंत आस्थेवाईकपणानें मदत केली. या आपत्कालीन मदतीमुळें, सावर-कर-कुटुंब व दातार-कुटुंब यांच्यामधील पूर्वींचा स्नेहसंबंध दृढतर झाला. नाशिकला

1 अप्रकाशित आत्मचरित्र

प्लेगचा कहर उसळलेला असल्यामुळें, अण्णानीं बाबा व तात्या या दोघानांहि भगू-रला बोलावून घेतलें. नाशिकला सुरू झालेला प्लेग हळुहळू आसपास पसरूं लागला आणि आषाढश्रावणाच्या सुमारास त्र्यंबकेश्वर येथेंहि प्लेग सुरू झाला. आपली मुलगी व जांवई यांनीं त्र्यंबकेश्वर येथें प्लेगच्या दूषित वातावरणांत राहणें श्रेयस्कर नाहीं असें अण्णांना वाटल्यामुळें, त्या उभयतांना भगूर येथें आणण्यासाठीं त्यांनीं बाबांची रवानगी केली.

बाबा भगूर सोडून गेले आणि खुद्द भगुरांतहि प्लेगचे उंदीर पडूं लागले. त्या वेळीं सरकारी अधिकाऱ्यांचा प्लेगदूषित घरांतील लोकांना फार उपसर्ग पोंचत असल्यामुळें, घरांत उंदीर पडले तरी त्या गोष्टीचा बोभाटा न करण्याकडे लोकांची सामान्यतः प्रवृत्ति असे. सावरकरांच्या घराच्या बाबतींत हाच प्रकार घडला. गांवांतील परिचित मंडळींपैकीं तुकाराम शिंपी प्लेगनें मेला. शेजारच्या गवंड्याच्या घरांतलाहि एक कर्ता पुरुष मेला. अशा कांहीं आजारी माणसांच्या समाचारासाठीं अण्णा कर्तव्य-बुद्धीनें गेले. एके दिवशीं रात्रीं घरीं परत येत असतांना अण्णा पाय मुरगळून पडले आणि ते घरीं परत आले ते लंगडतच आले. या लंगडण्यांत कांहीं विशेष भिण्या-सारखें आहे असें त्या वेळीं कोणालाहि वाटलें नाहीं.

दुसऱ्या दिवशी दुपारीं जेवणाचे वेळेपूर्वीं अण्णा देवघरांत उभे असतांना तात्यांचें लक्ष त्यांच्याकडे गेलें. अण्णा जांघेंत चांचपीत उभे आहेत हें तात्यांनीं पाहिलें. जेवणखाण आटोपेपर्यंत अण्णा कांहीं बोलले नाहींत आणि तात्यांनाहि कांहीं विचार-ण्याचा धीर झाला नाहीं. जेवण करून अण्णा माडीवर गेले व त्यांनीं तात्यांना हांक मारून आपल्याला प्लेग झाला असल्याचें सांगितलें. या भयंकर सांथीचा हल्ला खुद्द आपल्या वडिलांवरच झाला हें पाहतांच तात्यांचें मन चरकलें. पण, स्वस्थ बसून भागण्यासारखें नसल्यामुळें, त्यांनीं एक गांवठी औषध तयार करून तें अण्णांच्या गांठीवर लाविलें. बापुकाका गांवांत होते खरे; पण भाऊबंदकीची अढी मनांत बळ-कट असल्यामुळें, ते आजारी भावाच्या समाचाराला आले नाहींत! त्यांचें गांवांत वजन असल्यामुळें, सरकारी अधिकाऱ्यांकडून होणारा त्रास टाळण्याच्या कामीं मात्र त्यांचा उपयोग झाला. रात्रभर अण्णांची तगमग चालू होती. वहिनी आणि तात्या हीं लेकरें त्यांची यथाशक्ति शुश्रूषा करीत होतीं. वडिलांपासून दूर निजावें लागल्यामुळें धाकटा बाळ अस्वस्थ झाला होता. त्याची समजूत घालण्याचें व त्याला निजविण्याचें कामहि या दोघां लेंकरांनाच करावें लागत होतें. पहांटेच्या सुमारास अण्णा कण्हूं लागले. सकाळीं त्यांच्या गांठीला जळवा लावल्या; पण त्यामुळें दुपारच्या सुमारास गोळा अधिकच फुगून आला. इकडे हें संकट अशा रीतीनें भेडसावीत आहे तोंच दुसरें एक संकट दत्त म्हणून उभें राहिलें. दुपारच्या सुमारास बाळ रडूं लागला आणि आपल्या जांघेंत दुखत असल्याचें सांगूं लागला. बाळाला पुढच्या बंगल्यांत निजवून वहिनी व तात्या हीं दोघें जणें घरांतल्या दोघा आजारी माणसांची आलटूनपालटून

शुश्रूषा करूं लागलीं. रात्रीं दोघांहि रुग्णांना वायूचा झटका येऊं लागला. अण्णांना येणारा वायूचा झटका तर इतका भयंकर होता कीं, त्यांना आवरणें अशक्य झालें व माडीचीं दारें लावून घेऊन स्वस्थ राहण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं, बाबा, भास्करराव काळे व माई ही मंडळी येऊन पोंचली; त्या सुमारास अण्णा शुद्धीवरहि नव्हते. पाहुणे मंडळीच्या जेवणाची व्यवस्था दुसरीकडे करावी लागली. संध्याकाळच्या सुमारास कोठूरहून बाबा-तात्यांचे मामा आले. भोंवतालचा सर्व प्रकार पाहून ते भांबावून गेले आणि कांहींशा वैतागानें रागावून बोललेहि. शेवटीं या रात्रीं अण्णांचें देहावसान झालें; पण त्यांना अनावर वात झालेला असल्यामुळें ते बंद माडींत पडून होते आणि रात्रीं त्यांचें प्राणोत्क्रमण नेमकें केव्हां झालें हें समजूं शकलें नाहीं. वडिलांच्या मृत्यूचा दिवस म्हणून सावरकर यांनीं आपल्या अप्रकाशित आत्मचरित्रांत शके १८२१ अधिक श्रावण वद्य ३० हा दिला आहे. पण तपासाअंतीं असें आढळतें कीं, या ठिकाणीं विस्मरणानें अल्पशी चूक झाली आहे. या वर्षीं अधिक श्रावण महिना नव्हता. श्रावण वद्य ३० म्हणजे दि. ५-९-१८९९ ही इंग्रजी तारीख ठरते; आणि, नाशिकचे दिवंगत नेते वैद्यभूषण वामनशास्त्री दातार यांनीं गोविंद कवींच्या कवितासंग्रहाच्या प्रारंभीं कविचरित्रांत जी माहिती दिली आहे तिच्या आधारानेंहि असेंच म्हणणें प्राप्त ठरतें कीं, ' अधिक श्रावण ' हे शब्द विस्मरणानेंच पडलेले असावे.

*'याच सालीं (सन १८९९) भाद्रपदांत गणपति उत्सवाचे सुमारास सावरकरांचे गांवीं—भगूर येथें—प्लेगचा कहर उसळला,'*

असें श्री. दातार यानीं लिहिलें आहे. श्रावण अधिक असता तर 'गणपति उत्सवाचे सुमारास ' हे शब्द दातारशास्त्री यांच्या लेखांत आले नसते. आत्मचरित्र लिहिलें गेलें त्या वेळीं भगूरचा प्लेगचा वृत्तांत घडून पुष्कळच वर्षांचा काळ लोटलेला होता. मध्यंतरींच्या काळांत सावरकरांच्या हातून अनेक त्रिखंडव्यापी खटपटी झालेल्या होत्या. अंदमानांतील जीवनक्रमाची छायाहि त्यांच्या मनावर पसरलेली होती. या सर्व प्रकारांमुळें बारीकशा एका तपशिलांत विस्मरणानें चूक होऊन 'अधिक श्रावण' हे शब्द पडले असतील, हें अगदीं संभवनीय आहे.

अण्णांचा मृत्यु व त्यानंतरचे दुःखद प्रसंग यांना धीरानें तोंड देऊन सावरकरबंधूंना पुढील व्यवस्थेला लागावें लागलें. बाळाला भगूरलाच ठेवून इतर मंडळींनीं कोठूरला चलावें असा सल्ला मामांनीं दिला. पण तो मान्य करण्याला बाबांनीं साफ नकार दिला. भगूर येथें गांवशिवेपाशीं महादेवाचें एक व गणपतीचें एक अशीं दोन देवळें आहेत. सावरकरांच्या राहत्या घरापासून हीं देवळें सुमारें दोनअडीच फर्लांग आहेत. घर सोडून तेथें जाऊन राहण्याचें बाबांनीं ठरविलें. बाबा, वहिनी व तात्या अशीं तिघें या देवळांत जाऊन राहिल्यानंतर,

बाबा फिरून घरीं आले व आसन्नमरण स्थितींत असलेल्या बाळाला खांद्यावर टाकून ते फिरून देवळाकडे गेले. बाळच्या तोंडांतून या वेळीं रक्ताचे ओघळ वहात होते व तो जगेल अशी आशा कोणालाच वाटत नव्हती. बाळला गणपतीच्या देवळांत ठेवून बाकीची मंडळी दुसऱ्या देवळांत राहूं लागली. बापूकाकांना आतां मात्र या लेंकरांपासून दूर राहवेना ! म्हणून तेहि या देवळांत वस्तीला आले. गांवांत प्लेगच्या सांथीचा कहर उसळलेला असल्यामुळें, काळोख पडल्याबरोबर सगळें वातावरण भयाण बनत असे. अशा त्या वातावरणांत, देवळाबाहेर बसलेल्या एका कुत्र्याच्या सोबतींत हीं लेंकरें काळ कंठीत असतां त्यांच्यावर आणखी एक संकट चालून आलें. बापूकाकांनाहि प्लेगनें पछाडलें आणि त्यामुळें राहण्याच्या दृष्टीनें दोन्ही देवळें सुरक्षित नाहींत, असें ठरलें.

सावरकर-कुटुंबावर ओढवलेल्या या प्रसंगाची वार्ता नाशिकला पोंचली व रामभाऊ दातार कांहीं मंडळींसह लगोलग भगुरास आले. सर्व मंडळींना बरोबर घेऊन ते नाशिकला परत गेले. दोन्ही आजारी माणसांना त्यांनीं आपल्या घरीं उतरून घेतलें. नाशिकास पोंचल्याच्या दुसऱ्या दिवशीं बापूकाकाहि वारले. बाळच्या आजाराचा सर्व दृष्टींनीं विचार करून अखेरीस त्याला प्लेग-रुग्णालयांत धाडण्याचें ठरलें. बाळाचें दुखणें फारच विकोपाला गेलेलें असल्यामुळें त्याला एकट्याला रुग्णालयांत ठेवण्यास बाबा तयार होईनात. इतरांनीं त्यांना परोपरीनें सांगून पाहिलें; पण, त्या सगळ्यांकडे दुर्लक्ष करून बाळच्या शुश्रूषेसाठीं स्वतः प्लेग-रुग्णालयांत राहण्याचा बाबांनीं निश्चय केला. बाळच्या जिवाबद्दलच्या विवंचनेनें आधींच व्यग्र झालेल्या तात्यांच्या व वहिनींच्या मनाला बाबांच्या सुरक्षिततेबद्दलहि चिंता वाटूं लागली. साध्या रुग्णालयांतहि रोग्यांच्या सन्निध अहोरात्र राहण्याचा प्रसंग आला तर चांगल्या खंबीर मनाचा मनुष्यहि वेडा बनेल. हें तर प्लेग-रुग्णालय होतें ! रात्रींच्या वेळीं ऐकूं येणारे निरनिराळ्या रोग्यांच्या कण्हण्या-कुंथण्याचे आवाज, भोंवतालीं पसरलेली मृत्यूची छाया अशा सर्वांशीं झगडत बाबानीं या मृत्यूच्या गुहेंत दिवस काढले, हें त्यांच्या अलौकिक धैर्याला व कर्तव्यनिष्ठेला साजेसेंच आहे. बाळची गांठ दोनदां कापण्यांत आली; पण टाके फाटल्यामुळें त्याच्या वेदनांत भरच पडली. तथापि बाबा डोळ्यांत तेल घालून त्याची शुश्रूषा करीत होते. बाबांचे कपडे व जेवण घेऊन तात्यांना दोन वेळां रुग्णालयांत जावें लागे. नाशिकच्या त्या वेळच्या भयाण वातावरणांत वेळींअवेळीं इतकें दूर जावें-यावें लागत असतांना तात्यांच्या मनांत कोणते भयप्रद विचार थैमान घालीत असतील, याची कल्पनाच केलेली बरी ! बाळबद्दल तर बहुतेक मंडळीं निराशच झालेली होती. बाबांवरहि आजारी पडण्याचा प्रसंग येतो कीं काय ही गूढ भीति तात्यांना एकसारखी अस्वस्थ करीत होती. कपडे व जेवण घेऊन रुग्णालयाच्या दाराशीं पोंचल्यावर बाबांचें दर्शन झालें म्हणजे तात्यांचा जीव तेवढ्यापुरता शांत होत असे. हा क्रम चालू असतां शेवटीं एक दिवस असा आला

कीं, त्या दिवशीं तात्यांना वाटत असलेली भीति मूर्तिमंत खरी ठरली! बाबाही प्लेगनें आजारी आहेत ही गोष्ट वहिनीला कळवून त्या निष्पाप जिवाच्या मनोव्यथा वाढविणें श्रेयस्कर नाहीं असें तात्यांनीं ठरविलें आणि त्यांनीं बाबांच्या आजारीपणाची गोष्ट षट्कर्णी होऊं दिली नाहीं.

संकटांची ही परंपरा आतां परमोच्च बिंदूपर्यंत जाऊन पोंचली असल्यामुळें, ती यापुढें उताराला लागावी हें निसर्गनियमानुसार स्वाभाविक होतें. बाबा आजारी पडले खरे; पण सुदैवानें त्यांचें दुखणें विकोपाला गेलें नाहीं. बाळलाहि हळुहळू बरें वाटूं लागलें. थोडक्याच दिवसांत तो घरीं आला आणि दोनतीन महिन्यांत तो हिंडूं-फिरूंहि लागला. कौटुंबिक जिवनाचे आधार तटातट तोडून टाकणाऱ्या या प्लेगच्या आपत्तीशीं सावरकर-बंधू झुंजत असतांनाच कांहीं घटना अशा घडून आल्या कीं, त्यांचा या बंधूंच्या भावी जीवनावर व नाशिक शहराच्या भावी जीवनावर खोल ठसा उमटला. बाबा प्लेग-रुग्णालयांत असतांना त्यांची श्री. म्हसकर यांच्यांशीं जमलेली गट्टी ही अशा घटनांपैकींच एक प्रमुख घटना आहे. म्हसकर व त्यांचे मित्र पागे यांचा सावरकरबंधूंशीं परिचय वाढत गेला; या वाढत्या परिचयामुळें परस्परांच्या राजकीय विचारांतील साम्याची परस्परांना ओळख झाली; या परिचयाच्या वाढत्या कक्षेंत नाशिकांतील अनेक तरुणांचा हळुहळू समावेश झाला आणि यांतूनच पुढें, 'मित्रमेळा' या प्रसिद्ध संस्थेची घटना निर्माण झाली.

बाळच्या शुश्रूषेसाठीं बाबा प्लेग-रुग्णालयांत राहिले होते त्या वेळीं त्यांना कोणी तरी सहानुभूतीचा व समानशीलाचा मित्र तेथें मिळाला तर हवाच होता. रुग्णालयांतील नोकरवर्गाशीं परिचय होतांहोतां बाबांना असें आढळून आलें कीं, रुग्णालयांत कारकुनी काम करीत असलेले श्री. म्हसकर यांच्या ठिकाणीं सरकारी नोकरींत असलेल्या सर्वसामान्य माणसापेक्षां कांहीं वेगळें पाणी आहे. म्हसकर यांचें भोंवतालच्या राजकीय हालचालींकडे पुष्कळच लक्ष असल्यामुळें, हळुहळू स्वराज्य व स्वधर्म या विषयांवर बाबांचें त्यांच्याशीं बोलणें होऊं लागलें. होतांहोतां या ओळखीचें स्नेहांत रूपांतर झालें. म्हसकर यांचें नांव त्रिंबकराव असें असून ते बापूराव या नांवानें ओळखले जात. म्हसकर यांचे मित्र रावजी कृष्ण पागे हेहि सरकारी नोकरींतच कारकुनाचें काम करीत असत. म्हसकर हे अल्पभाषी असून भोंवतालच्या अनेक उपयुक्त उद्योगांना ते अंतस्थ मदत करीत असत. पागे यांची वृत्ति भिन्न होती. दहा मंडळींच्या बैठकींत मिरवावें व त्या मंडळींवर आपली छाप पाडावी असें त्यांना वाटत असे. पागे व म्हसकर हे दोघेहि बराचसा विचार एकत्र करीत असत; व त्यांचे कांहीं लेख म्हसकर व पागे यांच्या आडनांवांतील इंग्रजी आद्याक्षरें एकत्र करून बनविलेल्या, 'एम. पी.' या टोपण नांवानें पुण्याच्या 'काळ' पत्रांत प्रसिद्ध होत असत. हे दोघेहि स्नेही आपल्या हौसेमुळें नाशिकच्या सार्वजनिक जीवनांत बऱ्याच उलाढाली करीत असत. त्या वेळीं नाशिकचे पुढारी म्हणून जी मंडळी ओळखली जात

ती मंडळी, पांढरपेशा समाजांतील इतर ठिकाणच्या बहुतेक पुढाऱ्यांप्रमाणेंच, बैठकींत बसून सूत्रें हालविण्याचें राजकारण करणारी होती. त्या काळीं राजकारण मोठ्याशा भर-धांव गतीनें धावूं लागलेलें नसल्यामुळें—आणि इतकेंहि करणारी मंडळी त्या काळांत मोज-कीच असल्यामुळें—एवढ्या अल्प श्रमावरहि अशा मंडळींचें पुढारीपण टिकूं शकत असे. अशा पुढाऱ्यांना हुकुमी उपयोगी पडणारे, हरकामे व हरहुन्नरी लोक नेहमींच आपल्या हाताशीं हस्तक म्हणून हवे असतात. नाशिकच्या त्या वेळच्या प्रतिष्ठित पुढाऱ्यांना म्हसकर-पागे ही जोडी हस्तक म्हणून उपयुक्त वाटे. म्हसकर-पागे हे मात्र अशा पुढाऱ्यांची खरी योग्यता ओळखून असत. तेहि अशा पुढाऱ्यांना आपले दिखाऊ हस्तकच समजून चालत असत.

म्हसकर व पागे यांची प्रथम बाबांशीं ओळख झाल्यानंतर थोड्याच दिव-सांत त्यांची तात्यांशींहि ओळख झाली. तात्यांनीं केलेल्या कवनांची कीर्ति न सांगतांच सगळीकडे पसरत चालली होती व पुण्याच्या 'जगद्धितेच्छु' पत्रांत तात्या मधून-मधून बातमीपत्रेंहि लिहितात ही गोष्ट प्रसिद्ध होऊं लागल्यामुळें अनेक जण त्यांच्याकडे आपापल्या वृत्त्यनुसार पाहूं लागले होते. बाळ व बाबा यांनीं प्लेग—रुग्णालयाची रजा घेतल्यानंतर म्हसकर यांचें सावरकरांच्या घरीं येणें-जाणें वाढूं लागलें. म्हसकरांनीं या सुमारास विद्यार्थि-संघ नांवाची बारीकशी संस्था स्थापिली होती; तिची माहिती तात्यांना कळली व तात्यांनीं भगूरला घेतलेल्या शपथेचें वृत्त म्हसकरांना कळलें. म्हसकरांनीं स्थापिलेल्या विद्यार्थि-संघाहून भिन्न प्रकारचें असें एक गुप्त मंडळ स्थापन करण्याची आवश्यकता तात्या म्हसकरांना पटवून देऊं लागले आणि म्हसकरांनाहि ती कल्पना हळुहळू पटूं लागली. तात्यांनीं पागे यांच्याशीं कोणत्याच प्रकारची चर्चा केली नाहीं. पण म्हसकर यांच्यामार्फत पागे यांना बऱ्याचशा गोष्टी कळत असत.

तात्या व म्हसकर यांच्या दरम्यान ही चर्चा चालली होती त्या सुमारासच तात्यांचा स्वतःचा मित्रपरिवारहि हळुहळू वाढत चालला होता. तिळभांडेश्वराच्या बोळांतील वर्तकांच्या कुटुंबांतले त्र्यंबकराव हे तात्यांचे समवयस्क असल्यामुळें त्यांची व तात्यांची मैत्री वाढत चालली होती. रामभाऊ दातार यांचे धाकटे बंधू—कै. वैद्यभूषण वामनशास्त्री दातार—हे तात्यांहून अवघे तीनचार महिन्यांनींच लहान होते. या वेळपर्यंत या तरुणाची शिक्षण वगैरे हरएक बाबतींत हेळसांड झालेली होती. रामभाऊ दातार हे वृत्तीनें बेडर व मायाळू असले तरी, कुटुंबपोषणाचा भार त्यांना एकदम स्वशिरावर घ्यावा लागल्यामुळें, त्यांचें स्वतःचेंहि शिक्षण दुर्लक्षिलें गेलें व धाकट्या भावाच्या शिक्षणाकडेहि त्यांना लक्ष देतां आलें नाहीं. त्र्यंबकराव वर्तक यांची स्थिति वेगळी होती; ते शिक्षणाभिमुख व महत्त्वाकांक्षी होते; आणि त्यामुळें तात्यांसारख्या ज्ञानार्जनांत रंगलेल्या व महत्त्वाकांक्षी समवयस्क तरुणाकडे त्यांचें मन स्वाभाविकच आकृष्ट झालें. रामभाऊ दातारांच्या धाकट्या भावाच्या शिक्षणादि

गोष्टीकडे तात्या यथाशक्ति लक्ष देऊं लागले व लौकरच तात्यांनीं त्याला आपल्या मित्रपरिवारांत कायमचें ओढून घेतलें.

म्हसकर व तात्या यांच्या दरम्यान गुप्त मंडळाच्या स्थापनेबद्दलची चर्चा जोरांत सुरू झाली तो काळ म्हणजे १८९९ चा ऑक्टोबर–नोव्हेंबर महिना होय. म्हसकर व पागे हे दोघेहि 'केसरी'च्या राजकीय कार्यपद्धतीचा पुरस्कार करणारे होते; पण त्यांच्या मनाचा सगळा ओढा 'काळ'कर्ते, प्रो. परांजपे यांच्या निर्भेळ स्वातंत्र्य-वादाकडे व क्रांतिवादाकडे होता. त्यामुळें तात्यांच्या त्या वेळच्या सशस्त्र क्रांतिच्या कल्पना त्यांना मनांतून मान्य होऊं लागल्या. फुटकळ सुधारणांचा काथ्याकूट करीत न बसतां पूर्ण राजकीय स्वातंत्र्य याच ध्येयाची घोषणा निर्भयपणें केली पाहिजे हा तात्यांचा आग्रहहि या जोडीला मानवूं लागला. पण त्या वेळीं चाफेकर-प्रकरणांतलि दडपशाहिमुळें सर्वांचींच मनें हादरून गेलेलीं असल्यामुळें, शपथबद्ध होण्याला म्हस-कर लौकर तयार होईनात व गुप्त मंडळांच्या स्थापनेलाहि त्यांचें मन लौकर सिद्ध होईना. इकडे तात्या व म्हसकर-पागे यांच्यामधील दुवा अशा रीतीनें सांधला जात होता तोंच, तिळभांडेश्वराच्या बोळांतली व आसपासची तरुण मंडळीहि तात्यांकडे आदरानें व आत्मीयतेनें पाहूं लागली होती. या मंडळींच्या वृत्तींत तात्यांच्या विषयीं जो बदल झाला तो कसा व कां झाला हें नाशिकचे कै. वैद्यभूषण वामनशास्त्री दातार यांनीं पुढील शब्दांत[१] नमूद करून ठेविलें आहे :

*विशेषत: रा. विनायकराव सावरकर हे या गल्लींत राहण्यास आल्यापासून त्या गल्लींतील त्यांच्या समवयी मुलांच्या मनांत महत्त्वाकांक्षेचें वारें खेळूं लागलें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या वेळीं रा. सावरकरांचें वयहि त्यांच्या बुद्धीचें कौतुक करण्याइतकें लहान होतें. तथापि त्यांच्या त्या आकर्षक चेहेऱ्यावरील दिसणारी बुद्धिमत्ता व तरतरी आणि त्यांचा सततोद्योगी स्वभाव यांचा परिणाम आसपास राहणाऱ्या विद्यार्थ्यांवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्या वेळीं रा. सावरकर हे जगद्धितेच्छु वर्तमानपत्रांत किर-कोळ बातमीपत्रें लिहीत असत. त्यांच्याविषयीं कोणी मत्सरानें, कोणी कौतु-कानें, कोणी महत्त्वाकांक्षेनें तर कोणी प्रेमानें पाहूं व विचारूं लागल्यानें प्रत्येकाच्या बुद्धीला त्यायोगें चालना मिळून जिवंतपणा व निराळें वळण लागल्याशिवाय राहिलें नाहीं.*

तात्यांचा सहवास लाभून त्यांच्या मार्गदर्शनानें स्वातंत्र्यध्येयाचें आकलन होण्यापूर्वीं तिळभांडेश्वराच्या गल्लींत राहणाऱ्या तरुण मंडळींची वृत्ति कशा प्रका-रची होती याचें ओझरतें दिग्दर्शन यापूर्वीं झालें आहे. या ठिकाणीं त्या वृत्तीचें वर्णन जास्त मोठ्या प्रमाणावर करणें अवश्य आहे. या सुमारास या बोळाच्या आस-

१ कवि गोविंद यांच्या कवितासंग्रहाला जोडलेलें कविचरित्र : पृ.७.

पास जी तरुण मंडळी होती त्यांचे दोन अड्डे होते. यांतला एक अड्डा देवीच्या मठांत होता व या अड्ड्यांत बहुशः भिक्षुकमंडळीचा समावेश झालेला असे. या अड्ड्याचे पुढारी धोंडभट विश्वामित्र हे धार्मिक आचारप्रसंगीं पक्के सनातनी व सोंवळे दिसत हें खरें असलें तरी, इतर बाबतींत ते पुष्कळसे नवाळलेले व चांगलेच रंगेल होते. या विश्वामित्रांच्या वाड्यांतच आनंदीबाई दरेकर या नांवाच्या मराठा समाजांतल्या बाई राहात असत. या बाईचा एकुलता एक मुलगा गोविंद अर्थात् आबा हा जिवावरच्या दुखण्यांतून कसाबसा निभावला असला तरी तो जन्माचा लुलापांगळा झाला होता. आनंदीबाई मोलमजुरी व काबाडकष्ट करून आपलें व आपल्या लाडक्या मुलाचें पोट भरीत असत. या बाईचा पांगळा मुलगा हाच पुढें प्रसिद्धीस आलेला गोविंद कवि होय ! या आबा दरेकरांच्या नेतृत्वाखालीं त्या भागांतलें एक टोळकें या सुमारास चांगलेंच नांवारूपाला आलें होतें.

आबा दरेकर विश्वामित्रांच्या वाड्यांत राहावयास आले त्यापूर्वी ते नाशिकच्या विजयानंद नाट्यगृहाशेजारीं असलेल्या जळक्या वाड्यांत राहात होते. वडिलांच्या मृत्यूनंतर कांहीं वर्षांनीं आबांचें मराठी शिक्षण सुरू झालें; पण आजारीपण व त्यांतून निघालेला पंगूपणा यांमुळें त्यांना १०–११ वर्षें वयाच्या सुमारासच शिक्षणाला रामराम ठोकावा लागला! आबांचें वय १७–१८ वर्षांचें होईपर्यंत त्यांचा त्या जुन्या जागेंत जो जीवनक्रम होता तो मोठा मासलेवाईक होता. भोंवतालीं जी कोणी मंडळी जमतील त्यांत आबांना अग्रेसरत्वाचा मान मिळावयाचा हें या वेळेपासूनच ठरलें होतें; पण या सुमारास आबांच्या भोंवतीं असणारी मंडळी उनाडक्या करण्यांतच पुरुषार्थ मानणारी असल्यामुळें, आबाहि या सुमारास उनाडपणाच्या अनेक गोष्टी करूं लागले. हा उनाडपणा चालला असतांनाच, आबांच्या अंगीं असलेल्या उपजत रसिकपणाला व कवित्वाला अंकुर फुटूं लागले. डफ व तबला वाजविण्याची कला आबांना अवगत झाली व ते लावण्याहि रचूं लागले. उदरनिर्वाहाचें एक मर्यादित साधन म्हणून आबा कातरकामहि करूं लागले. पूर्वीचें बिऱ्हाड बदलून आबा विश्वामित्रांच्या वाड्यांत येऊन राहिले याचा अर्थ त्यांनीं स्थलांतर केलें इतकाच नसून एका संस्कृतीच्या मंडळींतून निघून दुसऱ्या प्रकारच्या संस्कृतीच्या मंडळींच्या सहवासांत ते दाखल झाले, असा आहे. या नव्या मंडळींचा सहवासहि फारसा उन्नतिकारक नव्हता; कारण, तिळभांडेश्वराच्या गल्लींत आबांना जे संवगडी प्रथम भेटले ते नाटकें पाहणें, गाणें-बजावणें करणें, सोंगट्या, गंजिफा, बुद्धिबळें खेळणें या तऱ्हेच्या खुशालचंदीपणाच्या कार्यक्रमांतच गढून गेलेले असत. देवीच्या मठांतल्या अड्ड्यांतली मंडळी व आबा दरेकरांच्या आधिपत्याखालीं नांदणारी मंडळी या दोन उनाड टोळक्यांचा त्रास गल्लींतल्या मोठमोठ्या मंडळींना सहन करावा लागत असे, हें वैद्यभूषण कै० वामनशास्त्री दातार यांनीं वर उल्लेखिलेल्या चरित्रात्मक लेखांत व सावरकर यांनीं आपल्या आत्मचरित्रांत नमूद करून ठेविलें

आहे. आबा दरेकरांचें शालेय शिक्षण किती झालें होतें हें वर सांगितलेंच आहे. शिक्षणाची मर्यादा ही असूनहि, आबांनीं या सुमारास 'मन्मथप्रभाव' नांवाचें नाटक लिहिण्याला प्रारंभ केला, ही गोष्ट आबा त्या वेळीं ज्या वातावरणांत वाढत व वागत होते त्याचा विचार केल्यास स्वाभाविकच ठरते. या दोन्ही टोळक्यांतल्या मंडळींच्या जीवनक्रमाचें यथार्थ वर्णन करतांना सावरकर यांनीं आपल्या आत्मचरित्रांत पुढील वाक्यें लिहिलीं आहेत :

*ह्या गल्लींतली ही मंडळी जुटीनें व चैनबाजीनें उनाडक्या नि चैन करीत त्याप्रमाणेंच ती मंडळी, लहर लागली तर, परोपकाराचीं कामेंहि करीत. अनाथांचें रक्षण करावें, दुर्जनांचें दंडन करावें, कौटुंबिक संकटांच्या प्रसंगीं साहाय्य करावें अशीहि लहर या मंडळींना केव्हां केव्हां येत असे. या मंडळीचा त्या वेळचा जीवनक्रम एकंदरींत निष्कपट आणि निष्काळजी, फुटकळ आणि फुकट, हौशी आणि रंगेल, अव्यवस्थित आणि असंगत, बहुधा निरुपद्रवी आणि बहुधा निरुपयोगी, क्वचित् उपद्रवी आणि क्वचित् उपयोगी असा असे.*

या उनाड टोळक्यांपैकीं एका टोळक्याचे म्होरक्ये आबा दरेकर हे वयानें तात्यांहून आठनऊ वर्षांनीं वडील होते.[१] तरीहि दुसऱ्यांच्यां अंगीं असलेल्या गुणांचें कौतुक करण्याचा गुण आबांच्या अंगीं जन्मसिद्धच होता. तात्यांच्या कवित्वगुणाची वाहवा होऊं लागली त्याबरोबर त्यांचीं कवनें स्वतः पाहण्याची अनावर इच्छा आबांच्या मनांत उत्पन्न झाली. चाफेकरांवरील सावरकरकृत कवनें पाहण्याच्या इच्छेनें आबा प्रथम सावरकरांच्या खोलींत गेले. कवनें पाहून झाल्यावर कवितांचीं वृत्तें, कवितांतील अलंकार, काव्याची शब्दसंपत्ति इत्यादि विषयांवरील सावरकरांचें म्हणणें आबांनीं ऐकून घेतलें. आबांच्या ठिकाणीं काव्यस्फूर्ति हा ईश्वरीगुण फार मोठ्या प्रमाणांत होता हें खरें; पण, या प्रतिभेला आतांपावेतों विकसित प्रज्ञेचें साहाय्य मिळालेलें नव्हतें. सावरकरांच्या सहवासामुळें आबांना ही दृष्टि लाभली व ते आपल्या कवितेचें स्वरूप या दिशेनेंहि उदात्त व भरघोस व्हावें म्हणून बुद्धिपुरस्सर प्रयत्न करूं लागले. पुढें सावरकरांच्या ध्येयवादांत गुंगलेला 'मित्रमेळा' निघाला व आबा त्यांत समाविष्ट झाले. या नव्या ध्येयदर्शनामुळें तर आबांचा काव्यात्मा एका नव्याच विश्वांत वावरूं लागला ! सावरकरांच्या भेटीमुळें आबांचा कायाकल्प झाला व ते स्वातंत्र्यशाहीर गोविंद कवि म्हणून पुनर्जन्म पावले, असें म्हणण्यांत अतिशयोक्तीचा अंश फारसा नाहीं !

म्हसकर-पागे, दातार-वर्तक, दरेकर-विश्वामित्र इत्यादि म्होरक्यांना आत्मसात् करून भोंवतालच्या तरुणांचें संघटन करण्याचे विचार तात्यांच्या मनांत घोळत होते

१ दरेकर यांची जन्मतारीख : ९-१२-१८७४.

त्या सुमारास त्यांचें मन घरगुती अडचणींच्या विचारांपासून सर्वस्वीं मुक्त होतें, असें नाहीं. अण्णा आणि बापुकाका हीं घरांतील दोन्ही कर्तीं माणसें अनपेक्षित रीतीनें ८-१५ दिवसांच्या अंतरानें मृत्युमुखीं पडल्याकारणानें, भगूरचा जमीनजुमला, देणें-घेणें इत्यादि व्यवहारांचा सांवळागोंधळ माजावा हें अगदीं क्रमप्राप्तच होतें. भगूर सोडून नाशिकला येतांना सावरकर-बंधु ज्या संकटपरंपरेशीं टक्कर देत होते तिचा विचार केला म्हणजे हें उघडउघड निष्पन्न होतें कीं, भगूरच्या घरगुती व्यवहारांची पक्की व्यवस्था लावून ठेवण्यासारखी परिस्थितीच तेव्हां नव्हती! भोंवतालच्या समाजाची सार्वजनिक व्यवहारांतली दानत चांगली असली तर, अशा प्रंसगीं उघड्या पडलेल्या लेंकरांना मदत देण्याला कोणी तरी कर्तव्यबुद्धीनें पुढें येतो! पण, ही दानतच संपुष्टांत आलेली असली म्हणजे, अजाण लेंकरें, नडलेल्या बायाबापड्या यांच्यावरील आपत्प्रसंग म्हणजेच आपला स्वार्थ साधून घेण्याची सुवर्णसंधि असें मानण्याची वृत्ति बळावते. खुद्द सावरकरांचे वडील अण्णा व त्यांचे चुलते बापुकाका यांच्यामध्यें भाऊबंदकी कशी चाले हें यापूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. सावरकरांचें कुटुंब व भगूरमधील इतर कांहीं ब्राह्मण कुटुंबें यांचाहि व्यावहारिक बाबतींत संघर्ष असे, हेंहि यापूर्वींच्या वृत्तांतात सूचित झालेंच आहे. भोंवतालच्या मंडळींची मनोवृत्ति अशा प्रकारची असल्यावर, उजाड पडलेल्या घरांतल्या वस्तुमात्राचें काय होईल हें काय सांगायला पाहिजे!

सावरकरबंधूंच्या मातोश्री वारल्यापासून भगूरच्या सावरकरांच्या घरावर लक्ष्मीची अवकृपा कशी होत चालली हें यापूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. अण्णांच्या मृत्यूपूर्वीं कांहीं महिने भगूरच्या घरांत चोरी झाल्यामुळें, सावरकर--कुटुंबाचें बरेंच आर्थिक नुकसान झालें होतें. भगूर सोडण्याच्या घाईतहि तात्यांनीं व बाबांनीं घरांतलीं भांडींकुंडीं कांहींशा व्यवस्थेनें ठेविलीं होतीं. व्यवहाराचे कागदपत्र गडबडींत तसेच राहिले होते. थोडीशी शांतता मिळतांच बाबा या घरगुती व्यवहाराकडे पाहण्यासाठीं म्हणून भगुरास आले; तोंवर, भांड्यांना व कागदपत्रांना पाय फुटून त्या वस्तू कोठच्या कोठें पसार करण्यांत आल्या होत्या! अशी स्थिति उद्‌भवली म्हणजे खरे-खोटे सगळे धनको दत्त म्हणून समोर उभे राहतात व देणेदाराला सतावून सोडतात; ऋणकोपैकीं मात्र कोणीहि प्राय: कांहींहि सरळपणानें देत नाहीं! हा जगभर येणारा अनुभव बाबा-तात्यांनाहि येऊं लागला! नाशिकला संसारासाठीं लागणारा खर्च व धनकोंचीं तोंडें मिटविण्यासाठीं उभा करावा लागणारा पैसा याची व्यवस्था करतांकरतां बाबांचा जीव मेटाकुटीस येऊं लागला!

घरच्या या अडचणींमुळें नाशिकच्या प्रपंचाची ओढगस्त पुष्कळच होत असे आणि ती तात्याच्या लक्षांत येऊन त्याच्या मनाला त्रास होऊं नये अशी धडपड बाबा एकसारखी करीत असत. असें असलें तरीहि, घरांत खरा प्रकार काय घडत आहे हें एखाद्या प्रसंगानें तरी तात्यांच्या लक्षांत येईच येई. घरांत एखाद्या

वस्तूवांचून अगदीं अडलेंच म्हणजे वहिनींना ती गोष्ट प्रसंगविशेषीं तात्यांना कळवावी लागे व 'तात्याला ही गोष्ट कां सांगितलीस?' असा दटावणीचा प्रश्न बाबांनीं विचारला म्हणजे वहिनींना 'इकडे आड नि तिकडे विहीर' असें होऊन जात असे. या परिस्थितीला तोंड देण्याचा एक उपाय म्हणून बाबांनीं या सुमारास दुष्काळी कामावर नोकरीहि पत्करली; पण, पुढें ज्याप्रमाणें बाबांचें सरकारी अगर इतर कोणत्याच नोकरीशीं कधीं जमलें नाहीं, त्याप्रमाणेंच याहि नोकरीशीं त्यांचें फार दिवस जमलें नाहीं. या परिस्थितीमुळें वहिनींचे सगळे दागिने हळुहळू घर सोडून गेले. त्या माउलीला या सोनेरी वैभवाची मातब्बरी कधींच फारशी वाटली नव्हती! आपल्या कुटुंबांतील तरुण पुरुषांच्या कर्तृत्वशाली भवितव्याकडे लक्ष देऊन ही साध्वी सारे हाल निमूटपणें सोशीत होती. इतर कारणांमुळें उद्भवणाऱ्या प्रापंचिक व आर्थिक अडचणींत बाबांच्या भोळेपणामुळें व श्रद्धाळूपणामुळें भरच पडत असे! बाबा एकदां भगूरला गेले असतां, तेथील एका जुन्या कुळाची व त्यांची भेट झाली! नदीच्या कांठीं अमूक ठिकाणीं दहा हजारांचा गुप्त ठेवा आहे असें या कुळानें बाबांना सांगितलें. हा ठेवा हस्तगत व्हावयाचा असेल तर देवतांना कांहीं बळीबिळी दिले पाहिजेत, असेंहि तो बाबांना म्हणाला! नोकरीची जामिनकी पटविण्यासाठीं म्हणून कोणाजवळून तरी घेतलेले सुमारें तीनशें रुपये या वेळीं बाबांच्या हातीं होते. एवढा मोठा ठेवा मिळाला कीं आपलें दैन्य संपेल या आशेच्या आहारीं जाऊन, बाबांनीं जवळचे पैसे या कुळाच्या स्वाधीन केले. देवीला सांकडें घातलें म्हणजे ठेव नक्की मिळेल अशा विश्वासानें बाबांनीं घरांतली अष्टभुजा देवीची मूर्ति भल्या मोठ्या दगडींतल्या पाण्यांत आकंठ बुडवून ठेविली! तीनशें रुपयांचा लाभ झाल्यामुळें लालचावलेलें तें कूळ बाबांकडून कांहीं तरी जास्त पैसे मिळाले तर ते काढण्याच्या विचारांत होतें; इतक्यांत तात्या कांहीं कारणामुळें आकस्मिकपणें भगूरला आले. त्यांनीं बाबांची परोपरीनें समजूत घातल्यावर बाबांची फसवणूक एवढ्यावरच थांबली! देवीची मूर्ति पाण्यांतून काढल्यावर बाबांनीं ती गांवांतल्या खंडोबाच्या देवळांत नेऊन ठेविली.[१]

म्हसकर व तात्या यांचीं जीं संभाषणें चालत त्यांत खंड पडलेला नव्हताच गुप्तमंडळाच्या स्थापनेला कांहीं तरी निमित्तानें दिवसगत व्हावी म्हणून म्हसकर असें सुचवूं लागले कीं, या गुप्तमंडळाची स्थापना, वाढ, कार्यक्रम वगैरे सर्वच गोष्टी 'काळ' कर्ते परांजपे यांच्या पूर्वसंमतीवर अवलंबून ठेवाव्या! गुप्त संस्था काढून सशस्त्रक्रांतीचा मार्ग चोखाळण्याच्या बाबतींत तात्या तर निश्चयी बनलेले होते! शेवटीं वाटाघाटी होऊन तडजोड म्हणून असें ठरलें कीं, गुप्तमंडळ स्थापा-

---

१ देवळाली स्टेशनपासून सुमारें दोन फर्लांग अंतरावर रेल्वेरुळांच्या अगदीं लगत हें खंडोबाचें देऊळ आजहि उभें असून, त्यांत सावकरांची ही देवी अद्यापहि ठेवलेली आहे.

वयाचें; पण ' काळ ' कर्त्यांचा अभिप्राय हातीं येईपर्यंत मंडळांत आणखी कोणाला घ्यावयाचें नाहीं व त्यांच्या अनुमतीशिवाय कोणतेंहि क्रांतिकारक कृत्य करावयाचें नाहीं. असें ठरल्यावर १८९९ च्या नोव्हेंबरअखेर म्हसकरांनीं शपथ घेतली व दोघांतिघांचेंच गुप्तमंडळ प्रथम स्थापण्यांत आलें. परांजपे काय म्हणतात तें कळेपर्यंत बाबांनाहि या बाबतींत कांहीं कळवावयाचें नाहीं, असें ठरलें. या गुप्तमंडळाचें पहिलें नांव ' राष्ट्रभक्तसमूह ' हें होतें व तें म्हसकरांनीं सुचविलें होतें. मंडळाचे हेतु अधिक स्पष्टपणें सुचविणारें एखादें नांव असावें असें तात्यांचें म्हणणें होतें; पण तें मान्य करण्यांत आलें नाहीं. ' रामहरि ' हा या मंडळाचा खुणेचा गुप्त शब्द होता.

गुप्तमंडळाच्या स्थापनेची वाटाघाट होतांहोतांच आणखीहि कांहीं गोष्टी सुचूं लागल्या. गुप्तमंडळांत नव्यानव्या विश्वासू माणसांची भरती होत; राहावयाची तर त्यासाठीं, ज्याच्यामधून निवड करतां येईल असें एकादें व्यापक व प्रकट मंडळ असलें पाहिजे ही गोष्ट स्पष्ट दिसूं लागली. अशा प्रकारचें एकादें मंडळ स्थापावें, हें मंडळ निरुपद्रवी दिसणारें व उघड काम करणारें असावें, या मंडळांतल्या तरुणांच्या मार्फत नाशिक शहरांत चालणाऱ्या प्रकट, वैध व नैर्बंधिक चळवळी हस्तगत करून घ्याव्या व या मंडळांत जे खंबीर, कर्तृत्ववान् व विश्वासू ठरतील त्यांना हळुहळू गुप्तमंडळांत समाविष्ट करून घ्यावें, अशी विचारसरणी निश्चित होत चालली. १९०० सालीं वर्षारंभाच्या दिवशीं ' मित्रमेळा ' म्हणून जी संस्था स्थापण्यांत आली, ती या विचारसरणींतूनच उत्क्रांत झालेली होती. ' मित्रमेळा ' ही संस्था म्हणजे ' राष्ट्रभक्तसमूह ' या गुप्त संस्थेची उघड काम करणारी शाखाच होती. राष्ट्रभक्तसमूहाच्या स्थापनेनंतर महिनाभराच्या अवधींतच मित्रमेळ्याची स्थापना झाली. चापेकर-प्रकरण सुरू होतांच सरकारनें पुण्याच्या नातूबंधूंना अटकेंत ठेविलें, हें यापूर्वीं सांगण्यांत आलें आहेच. दि. २१-१२-१८९९ रोजीं मुंबई सरकारनें नातूबंधूंच्या सुटकेचा हुकूम सोडला! या हुकुमाची अंमलबजावणी होऊन नातूबंधू प्रत्यक्ष सुटण्याला कांहीं दिवस लागले. ही बातमी नाशिकला पोंचल्यावर एकदोन दिवसांनीं-म्हणजे बहुतकरून शनिवार दि. ३०।१२।१८९९ या दिवशीं—म्हसकर, पागे, दातार, सावरकर बंधू वगैरे मंडळी कोणता तरी नाट्यप्रयोग पहावयास गेली होती. मध्यें थोडा वेळ काढून नाशिककरांतर्फे नातूबंधूंचें अभिनंदन करण्याची संधि आजच्या आज साधावी अशी ऊर्मि या तरुण मंडळींच्या मनांत उसळूं लागली; पण वडीलधाऱ्या पुढाऱ्यांपैकीं कोणाचीच संमति त्यांच्या सूचनेला मिळेना! अशा प्रकारच्या सभा वगैरे कार्यक्रम यापुढें अडूं नयेत म्हणून एक मंडळ असलें पाहिजे, असें या मंडळींना वाटलें व दि. १-१-१९०० रोजीं मित्रमेळ्याची स्थापना झाली. दोन चार दिवसांत या संस्थेचे चालचलाऊ नियम वगैरे तयार झाले व मित्रमेळ्याच्या साप्ताहिक बैठकी वगैरेंचा कार्यक्रम सुरू झाला.

मित्रमेळा हें नांव सर्वंकष असून त्यांत आक्षेपार्ह असें कांहींच नव्हतें. यामुळें मित्रमेळ्यांत तरुणांची आवक वाढूं लागली. १९०० सालीं उन्हाळयांत नाशिकला श्रीशिवजयंतीचा उत्सव झाला तो मित्रमेळयांतील तरुणांच्या उत्साहामुळेंच पार पडला. हळुहळू जुने पुढारी मागें पडून ही तरुण मंडळीच पुष्कळसा कार्यभर उचलूं लागली. श्रीशिवजयंतीचा उत्सव हा ऐतिहासिक उत्सव आहे, तो कांहीं राजकीय स्वरूपाचा उत्सव नव्हे असें यापूर्वीं कटाक्षानें सांगण्यांत येत असे. या वर्षीं नाशिकला उत्सव झाला तेव्हां हा उत्सव राजकयिच आहे; गतस्वातंत्र्य परत मिळविणारे थोर राष्ट्रवीर म्हणूनच श्रीशिवाजीमहाराज आम्हांला वंद्य व स्मरणीय आहेत असें ठासून सांगण्यांत आलें. या सालचा गणेशोत्सवहि बव्हंशीं मित्रमेळ्याच्या पुढारीपणाखालींच पार पडला. या गणेशोत्सवांत सावरकरांचीं व्याख्यानें झालीं व आबा दरेकरांचीं कवनें म्हणण्यांत आलीं. नाशिकच्या गणेशोत्सवांतलें मित्रमेळ्याचें महत्त्व त्या वेळच्या प्रतिष्ठित पुढाऱ्यांनाहि कसें अल्पावधींत मान्य करावें लागलें हें 'केसरी'च्या दि. १-१०-१९०१ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या, नाशिक येथील उत्सवासंबंधीच्या पुढील उल्लेखावरून स्पष्ट होईल :

*यंदा येथें चारपांच ठिकाणीं सार्वजनिक उत्सव झाले असून मेळेहि चारपांच होते. मेळ्यांपैकीं मित्रमेळ्याची व्यवस्था बरी होती. हायकोर्ट वकील रा.रा. पाटणकर व 'लोकसेवा' कर्ते रा. बर्वे यांनीं उत्सवाचें महत्त्व लोकांच्या मनावर चांगलें बिंबवून दिलें.*

मित्रमेळा स्थापन झाल्यावर लौकरच त्यांतली तरुण मंडळी साप्ताहिक बैठका भरवूं लागली. प्रथमप्रथम या बैठका आलटूनपालटून म्हसकर, पागे, दरेकर, इत्यादिकांच्या घरीं क्रमाक्रमानें भरत असत. लौकरच त्या आबा दरेकरांच्या माडींत कायमच्या एकाच स्थळीं भरूं लागल्या. आबा दरेकरांच्या माडींत ज्या ठिकाणीं या बैठका होत तेथें प्रथमप्रथम फक्त १८५७ च्या क्रांतियुद्धांतलि वीरशिरोमणींचीं चित्रें लाविलेलीं होतीं. मित्रमेळयाला एकतर्फी राजकारणी वास येऊं नये म्हणून या चित्रांसमवेतच कांहीं देवदेवतांचीहि चित्रें लावण्यांत आलीं. व्याख्यानांचीं टांचणेंटिपणें मोठ्या खुबीनें ठेवण्यांत येत असत. निरुपद्रवी व्याख्यानांचीं टांचणें मुद्दाम संरक्षून ठेवण्यांत येत असत; कडक भाषणांचा मागमूससुद्धां शिल्लक राहूं नये, अशी दक्षता घेतली जात असे. मित्रमेळयाच्या या साप्ताहिक बैठकींचा हेतु त्यांतलि सदस्यांना ज्ञानसंपन्न करणें हा होता. राष्ट्रीय शाळांतूनहि जें ज्ञान विद्यार्थ्यांना मिळत नाहीं तें ज्ञान या साप्ताहिक बैठकींमुळें तरुणांना मिळत असे. बाबा, रामभाऊ दातार वगैरे मंडळी पुष्कळ दिवसपर्यंत या साप्ताहिक बैठकींचा कंटाळाच करीत असत. ' विशेष कांहीं असलें तर सांगा, म्हणजे आम्ही येऊं ' असें सांगून, नाट्यसंगीतादि विषयांत रंगणारी ही मंडळी नित्याच्या बैठकी टाळीत असत. मित्रमेळयाच्या सदस्यांच्या किमान ज्ञानाची अपेक्षा काय आहे हें स्पष्ट व्हावें म्हणून

संस्थेच्या सदस्यांकडून अवश्य वाचनीय अशा २०-२५ ग्रंथांचा संच तयार करण्यांत आला व हीं पुस्तकें तरी प्रत्येकानें वाचलीं आहेत कीं नाहीं हें पाहण्यावर भर देण्यांत येऊं लागला.

सावरकरांच्या ठिकाणीं असलेल्या अनेक गुणांमुळें या सुमारास त्यांना सार्वजनिक समारंभांतून वगैरे कशी मान्यता मिळत चालली होती हें एका प्रसंगाच्या द्वारा सांगतां येण्यासारखें आहे. लोकमान्य टिळकांचे व्याही व नाशिकचे घरंदाज पुढारी गंगाधरपंत अर्थात् बापुराव केतकर यांच्या निधनानंतर दि. (२७-६-१८९६) त्यांच्या स्मरणार्थ नगरभवन बांधण्याचें नाशिककरांनीं ठरविलें. या नगरभवनाच्या पाया-समारंभासाठीं न्या. मू. माधवरावजी रानडे यांना बोलावण्याचें ठरलें. स्वागतांच्या वगैरे प्रसंगाला शोभून दिसतील अशा कविता करण्याचें काम अनंतराव बर्वे व म्हसकर यांच्या आग्रहामुळें सावरकरांवर सोपविण्यांत आलें. हा समारंभ दि० २२-४-१९०० रोजीं पार पडला, तेव्हां सावरकरांनीं रचिलेल्या कविता मुद्रित होऊन 'लोकसेवा' पत्राचा विशेषांक वांटण्यांत आला होता. न्या. मू. रानडे यांचेविषयीं सावरकरांना वाटत असलेला आदर या कवितांत व्यक्त झाला आहे म्हणून या कवितांस महत्त्व देणें उचित ठरणार आहे. काव्यरचनेच्या क्षेत्रांत सावरकरांच्या कर्तृत्वाचा विकास कसकसा होत गेला हेंहि ठरविण्याच्या दृष्टीनें या प्रसंगींच्या कांहीं कविता देणें उपयुक्त आहे :

सत्कीर्ती विमला वरोनि रमला जो मायभूतें भला ।
औदार्यें भरला, भवास तरला, सत्पुत्र तो शोभला ॥
देशार्थ श्रमला, कधीं न दमला, त्या सद्यशोमंदिला ।
श्रीमत् केतकरा स्वभूहितकरा साष्टांग मीं वंदिला ॥१॥

* * *

आधीं देशहितार्थ यत्न करिती ऐसे किती जन्मती ।
त्यामाजीं परतंत्र देश अमुचा ! कुंठीत जेथें मती ।
ऐश्याही समयीं कसें हरिसि बा ह्या देशउद्धारका ।
आर्यांचे कलिजे कसे हिसडसी? दीनांवरी मार कां ॥२॥

* * *

ज्या ज्या सत्कृति थोर थोर करिती त्यांची वसावी स्मृति ।
साधूंचीं करितात ह्यास्तव जनीं हीं स्मारकें सन्मती ॥
आजी नाशिकवासि केतकर जो दैवें अम्हां लाभला ।
त्याचा स्मारकयोग ह्या जुळतसे आनंद झाला भला ॥ ३ ॥

* * *

बांधावें नगरगृहास ठरलें पाया तया घालण्या ।
येती जस्टिस रानडे झडकरी मानोनि बोलावण्या ।।
थोरांचे स्तवनार्थ थोरचि भले, आम्हांस या कारणें ।
झालें दर्शन साधुचें फिटतसे या चक्षुचें पारणें ।। ४ ।।

'केरळकोकिळ' कर्ते महाराष्ट्रभाषा-चित्रमयूर श्री. आठल्ये यांनीं मित्रमेळ्याला भेट दिली व मित्रमेळ्यातर्फे त्यांचें स्वागत करण्यांत आलें तो प्रसंग व वरील प्रसंग यांमध्यें कांहीं महिन्यांचें तरी अंतर आहे. पण, तात्यांच्या कवितारचनेची ओळख करून देण्याच्या दृष्टीनें तो प्रसंगहि याच ठिकाणीं नमूद करावयाला हरकत नाहीं. श्री. आठल्ये यांच्या कवितेचें वळण व त्यांच्या टीकेची तीक्ष्णता यांचा तात्यांच्या मनावर पुष्कळच परिणाम झालेला होता. हा परिणाम पुढील पद्यपंक्तींत प्रतिबिंबित झालेला दिसत आहे :

होती नांदत कीर्तिदेवि तुजला सेवूनि अत्यादरें ।
श्रीगीताजननी तुझी तव गृहा येतां त्वरें त्या दरें ।।
सासूचा छळ आठवूनि निसटे गेली पळोनी दुरी ।
माझ्या कर्णपथें असें कळविण्या धैर्यास जिव्हा करी ।।

*　　*　　*

बिंदूंचें बनतें तळें हृदयिं या सृष्टिक्रमासी धरा ।
हिंदू जे असतील ते मिळवुनी एकी त्वरेनें करा ।।
निंदूनी जनघातकारक सुखा देशाभिमाना वरा ।
शुक्लेंदूसम वर्धमान यश हो विज्ञापना ईश्वरा ।।

तात्यांनीं कै. लोकमान्य टिळकांवर 'श्रीटिळकस्तवन' या नांवानें केलेल्या नऊ आर्यांचा उल्लेख याच ठिकाणीं करतां येण्यासारखा आहे. '**दृढ स्नेह असे जो जो राष्ट्रहितोद्युक्त त्याशीं तिलकांचा**' व '**देवा तुझ्या हवालीं केला हा कीर्तिनीतिचा ठेवा**' या दोन आर्यांर्धांत लोकमान्यांच्या कांहीं ठळक गुणांचें संकीर्तन मार्मिकपणानें केलेलें आहे. न्या मू. रानडे यांच्या निधनानंतर कविता करून त्या थोर विभूतीबद्दलचा आपला आदर तात्यांनीं व्यक्त केला. पृथ्वी वृत्तांत रचलेल्या ११ श्लोकांच्या या कवितेंतला पुढील श्लोक लक्षांत ठेविला म्हणजे न्यायमूर्तींच्या मृत्यूमुळें जनतेला इतका शोक कां वाटला हें नेमकें कळतें :

अर्धीं निपजती किती झटति देशकार्यीं असे ।
तशांत सम कोणिही विबुध माधवाच्या नसे ।।
म्हणोनि रडतों प्रभू; न बहु न्यायमूर्तीस्तव ।
स्वभक्तजनकामदा विफल हो न माझा स्तव ।।

मित्रमेळ्याचा कार्यव्याप वाढूं लागला त्याबरोबर भोंवतालच्या मंडळींवर तात्यांच्या जीवनक्रमाची छाप अधिकाधिक पडूं लागली. यापूर्वी तात्यांना टाकाऊ समजणारी मंडळी आतां त्यांच्या वर्तनाचें रहस्य ओळखूं लागली. तात्यांनीं चालविलेल्या वैयक्तिक विद्यार्जनाला व त्यांनीं बाळगिलेल्या राष्ट्रीय महत्त्वाकांक्षेला यापूर्वी या मंडळींचा उघड आशीर्वाद तर मिळतच नसे; उलट, या उद्योगांची व भावनांची या मंडळीकडून थट्टाच केली जाई. ही थट्टा सहन करूनहि, तात्यांनीं आपल्या उपजत प्रवृत्तीच्या बळावर आपला क्रम तसाच चालू ठेविल्यामुळें, इतर मंडळींवरहि त्याचा परिणाम होऊं लागला. मित्रमेळ्यांतील सर्व तरुण शाळेंतल्या परीक्षांमध्यें उत्तीर्ण झाले पाहिजेत असा मित्रमेळ्याच्या प्रमुखांचा कटाक्ष असल्यामुळें, अभ्यासांत मागासलेल्या तरुणांना मदत म्हणून आपापसांत शिकवण्या करण्याची पद्धत रूढ करण्यांत आली. तात्यांचे जे अनेक उद्योग चालत त्यांमुळें त्यांचा शाळेंतला अभ्यास थोडाफार मागें राहिला तरी, वार्षिक परीक्षेच्या महिनादोनमहिने अगोदर शाळेंतल्या अभ्यासावरच सगळी शक्ति एकत्र करून ते परीक्षेंत न चुकतां उत्तीर्ण होत असत. मित्रमेळ्यांतील तरुणांचा ज्ञानप्रांतांतला विकास अशा प्रकारें चालला असतांना, त्यांची समाजसेवेच्या क्षेत्रांतहि योग्य प्रमाणांत प्रगति होत होती. १९०० सालीं नाशिकांत प्लेग झाला तेव्हां मित्रमेळ्यांतली पुष्कळ मंडळी नाशिकासच ठाम राहिली. बाबा, रामभाऊ दातार वगैरे मंडळींनीं स्वयंसेवक या नात्यानें प्रेतें वाहून नेण्याचें वगैरे काम सुरू केलें. अशा कामगिरीनिमित्त अपरात्रीं स्मशानांत गेल्यावर ही मंडळी तेथेंच डफावर थाप टाकून गाण्यांत रंगून जाण्यासहि चुकत नसत ! अशाच एका प्रसंगीं तात्या या मंडळीबरोबर स्मशानांत गेले होते व तेथें त्यांना बराच वेळपर्यंत थांबावें लागलें ! स्मशानांतील जाईजुईच्या फुलांचा वास या प्रसंगानें तात्यांच्या मनांत इतका कायमपणानें घुसला कीं,

*अद्यापहि या फुलांचें दर्शन झालें अगर त्यांचा वास दरवळला कीं त्यांना बालपणांतल्या त्या प्रसंगाचें स्मरण हटकून होतें.* [1]

प्लेग असूनहि सावरकर कुटुंबांतली मंडळी नाशिक येथेंच राहिली हें खरें; पण, पुढें कांहीं दिवसांनीं, सर्वांनीं नाशिकांत राहणें अवश्य नाहीं असें वाटल्यामुळें, बाबांनीं तात्याप्रभृति सर्व कुटुंबीय मंडळींना कोठुरास रवाना केलें व ते स्वतः मात्र नाशिक येथेंच राहिले. कोठूरच्या या मुक्कामांत तात्यांचें स्वतःचें वाचन व त्यांच्या चळवळी या तर चालूच होत्या. शिवाय त्यानीं बाळच्या शिक्षणाकडेहि कांही लक्ष दिलें. बरोबरीच्या किशोरांच्या संगतींत गोदावरीच्या तीरीं बसून गप्पागोष्टी कराव्या, त्यांना कविता म्हणून दाखवाव्या, क्वचित् सार्वजनिक व्याख्यानहि द्यावें असा क्रम चालू असतांना, तात्यांनीं शेवटीं कोठूरला मित्रमेळ्याची शाखा स्थापून टाकिली व बरोबरीच्या कांहीं तरुणांना त्यांनीं शपथबद्धहि करून टाकिलें. तिकडे

१ अप्रकाशित आत्मचरित्र.

नाशिकांत बाबांना प्लेग झाला! बरोबरीच्या मंडळींकडून सेवाचाकरी केली जात होती तरी त्यांना वायु झाला आणि त्या भरांत त्यांनीं तात्याला व बाळला भेटण्याचा ध्यास घेतला. दोन्ही जांघांत प्लेगच्या गांठी असूनहि, ते नाशिकहून लंगडतलंगडत कोटूरच्या वेशीबाहेरच्या देवळापर्यंत कसे गेले व भावंडांना पाहिल्यावर, अन्नाचा घांसहि न घेतां परत कसे फिरले, हें एक त्यांचें त्यांनाच माहित! १९०१ च्या जानेवारीच्या प्रारंभीं नाशिकचा प्लेग ओसरल्यामुळें, तात्या वगैरे सर्व मंडळी फिरून नाशिकला आली! सुदैवानें बाबांचाहि पुनर्जन्म झाला होता! त्यामुळें ही सर्व मंडळी आनंदानें राहूं लागली!

२२ जानेवारी १९०१ रोजीं महाराणी व्हिक्टोरिया ख्रिस्तवासी झाली; त्याबरोबर, हिंदुस्थानांतल्या राजनिष्ठ लोकांच्या शोकाला गंगायमुनांच्या पुराचें स्वरूप येऊं लागलें! हें दुःखप्रदर्शन व एडवर्ड बादशहांच्या राज्याभिषेकानिमित्त वाटणाऱ्या आनंदाचें प्रदर्शन या दोनहि प्रदर्शनांत पुष्कळसा भाबडेपणा होता हें खरें; पण, कांहीं ठिकाणीं हें प्रदर्शन धोरणीपणानेंहि करण्यांत येत होतें. चाफेकर-प्रकरणांत पोळलेले कांहीं लोक या प्रदर्शनांत सामील होऊं लागले ते अशा धोरणीपणामुळेंच! स्वतः टिळक यांनीं या वेळीं 'केसरी'च्या द्वारा या धोरणीपणाचाच पुरस्कार केला असल्यामुळें, मित्रमेळयांतल्या म्हसकरप्रभृति कांहीं सदस्यांनीं याच धोरणाची तळी उचलून धरण्याचा प्रयत्न चालविला. मित्रमेळ्याच्या वतीनें होणाऱ्या उत्सवांत शिवजयंति, श्रीगणेशोत्सव इत्यादि उत्सवांसमवेतच अकबरजयंतीचाहि उत्सव साजरा करण्यांत येत असे.[1] उत्सवादि हर्षामर्षाच्या प्रसंगीं मित्रमेळ्याचें स्वरूप व्यापक पद्धतीचें असतें असें दिसल्यानें संस्था सरकारी रोषास बळी पडण्याचा प्रसंग टळेल या भावनेनें प्रेरित होऊन, म्हसकरप्रभृति मंडळी आग्रहपूर्वक असें प्रतिपादूं लागली कीं, संस्थेनें व्हिक्टोरियाच्या मृत्यूबद्दल दुःखप्रदर्शनहि करावें आणि नव्या बादशहाबद्दल राजनिष्ठाहि व्यक्त करावी. या मतप्रणालीला सावरकरप्रभृति कांहीं सभासदांनीं जोराचा विरोध केला. "राजा असो कीं राणी असो, ती कोणाची हा प्रश्न आहे! इंग्रजांची राणी म्हणजे आपल्या शत्रूची राणी! अशा प्रसंगीं राजनिष्ठा व्यक्त करणें ही राजनिष्ठा नव्हे—ती गुलामगिरीची गीता आहे,[2]" या आशयाच्या विचारसरणीचा पुरस्कार करून सावरकरांनीं म्हसकरप्रभृतींचें म्हणणें या प्रसंगीं मोडून काढलें. परिणामीं राजनिष्ठेची सभा तर झालीच नाहीं; उलट असें ठरलें कीं, अशा सभांस नि ठरावांस शक्य तर विरोध करावा!

यानंतर थोडक्याच दिवसांनीं तात्या त्र्यंबकेश्वरीं गेले होते व या विरोधप्रदर्शनाची थोडीशी चुणूक तात्यांच्या त्र्यंबक येथील मुक्कामांत तेथील मंडळींना दिसलीहि! या तीर्थाच्या ठिकाणीं सावरकरबंधूंचे बरेच आप्तेष्ट राहात असल्यामुळें, मित्र-

1 कवि गोविंद यांच्या कवितासंग्रहाला जोडलेलें, वैद्यभूषण वामनशास्त्री दातार यांनीं लिहिलेलें, कविचरित्र : पृ. १०. २ अप्रकाशित आत्मचरित्र.

मेळ्याच्या विचारसरणीचें लोण यापूर्वींच येथवर येऊन पोंचलें होतें. नव्या बादशहांच्या समारंभाप्रीत्यर्थ या ठिकाणीं जो उत्सव चालला होता त्यांत म्हणण्यासाठीं एका स्थानिक पंडितानें कांहीं संस्कृत श्लोक रचिले होते ! या श्लोकांच्या गुणांची चर्चा चालली असतांना, तात्यांना त्या ठिकाणीं बोलावण्यांत आलें. श्लोकांत काव्य-गुण असल्याचें तात्यांनीं मान्य केलें; पण, ते काव्यगुण राजनिष्ठेच्या नादानें व्यक्त झाल्याबद्दलची नापसंतीहि त्यांनीं स्पष्ट शब्दांत बोलून दाखविली ! Truly these are pearls; but they are thrown before swine ['उकिरडा फुंकणाऱ्या प्राण्यापुढें पडलेल्या मोत्यांची जी गत तीच या काव्याचीहि गत झाली आहे !'] असें मत तात्यांनीं व्यक्त केल्यामुळें या पंडितांचा व तात्यांचा बराच वाद झाला ! शेवटीं पंडितरायांनीं उदारपणानें तात्यांची विचारसरणी मान्य केली !

एडवर्ड बादशहांना आयुरारोग्य चिंतण्याचा व राजनिष्ठाप्रदर्शनाचा मोठा समारंभ त्र्यंबकला साजरा करण्यासाठीं तेथील सरकारी–निमसरकारी लोक झटत होते व या समारंभासाठीं दीपोत्सव करणें, पताका लावणें इत्यादि कार्यांत भिक्षुक-मंडळीहि गर्क झाली होती ! इतक्यांत गांवांतल्या पुष्कळशा भिंतींवरून हस्तलिखित पत्रकें झळकलीं ! "तुमची राष्ट्रमाता ज्यानें बटीक केली त्या राजाचा उत्सव म्हण-जेच तुमची स्वतंत्रता ज्या दिवशीं मेली त्या दुर्दिनाचा वाढदिवस. परराज्याशीं राजनिष्ठा म्हणजेच स्वराष्ट्राशीं द्रोह," अशा आशयाचीं पत्रकें तात्या व बाबांचे मेहुणे श्री. अण्णा फडके यांनीं रातोरात गुपचूपपणें भिंतींवर लाविलीं, असा समज त्या वेळीं गांवभर पसरला होता. दीपोत्सवाला गालबोट लावण्याच्या इराद्यानें कुशा-वर्त वगैरे प्रमुख ठिकाणचे दिवेच मालवून टाकण्यांत आले व कांहीं ठिकाणच्या पताकाहि फाडून टाकण्यांत आल्या !

इतक्या गोष्टी घडत असूनहि, गांवांत समारंभ झाला व दुर्दैव असें कीं, समा-रंभाच्या अध्यक्षांनीं आपल्या भाषणांत 'एडवर्ड बादशहा हे आपले खरोखरच बाप आहेत' असे शब्द उच्चारले ! भोंवतालच्या प्रक्षुब्ध वातावरणांत अशा अलंकारिक व अतिशयोक्तिपूर्ण शब्दांचा विपर्यास व्हायला वेळ कितीसा लागणार ! या वाक्यां-ची समस्यापूर्ति व तें वाक्य उच्चारणाराची संभावनापूर्ति करणारीं भित्तिपत्रकें थोड-क्याच काळांत भिंतीभिंतीवर झळकूं लागलीं ! 'तर मग आपले वडील आपल्या मातुश्रींचे कोण ?' हा लागट व टारगट प्रश्न या पत्रकांतून अध्यक्षमहाशयांना विचारण्यांत आला होता. त्र्यंबकसारख्या क्षेत्राच्या ठिकाणीं रिकामटेकडया लोकां-कडून या प्रश्नावर किती कसरत करण्यांत आली असेल, हें कोणीहि कल्पनेनें ओळखूं शकेल. गांवांतल्या पुष्कळशा तरुणांना सरकार पकडणार आहे असा समज त्याच वेळीं गांवभर पसरला होता; पण, हें प्रकरण शेवटीं धरपकड वगैरे कांहींहि न होतां विझलें !

तात्यांच्या विचारांना व उत्साहाला लागत चाललेलें हें वळण पाहून म्हस-कर व पागे फारच विचारांत पडले. भोंवतालच्या तरुण मंडळींच्या कार्यक्रमांना

कांहीं तरी पायबंद बसला पाहिजे, असें त्यांना मनापासून वाटूं लागलें. मित्र-मेळ्याच्या स्थापनेच्या वेळीं झालेल्या विचारविनिमयाचें म्हसकरांना स्मरण होऊं लागलें. क्रांतिकारक कृत्यें करण्यापूर्वी ' काळ ' कर्ते परांजपे यांचा सल्ला घ्यावयाचा हा संकेत त्या वेळीं मान्य झालेला असल्यामुळें, प्रो. परांजपे यांना नाशिकला बोलावण्याचा अट्टाहासाचा प्रयत्न म्हसकर यांनीं सुरू केला. कोणी कांहींहि सल्ला दिला तरी मुख्य तत्त्वाविरुद्ध नि मूळ शपथेविरुद्ध आचार करणें मित्रमेळ्यांतल्या कार्यकर्त्यांना शक्य नाहीं, असें तात्या कटाक्षानें सांगूं लागले ! परांजपे यांना बोलावण्याला तात्यांचा विरोध नव्हता; पण त्यांच्या शब्दांचें निमित्त पुरेसें होऊन तरुणांनीं सुरू केलेलें कार्य व त्यांचे उत्साहप्रद विचार यांच्यावरच दडपण येतें कीं काय, अशी शंका मात्र तात्यांना वाटत होती. या वेळीं प्रो. अण्णासाहेब परांजपे नाशिकला येऊं शकले नाहींत व त्यामुळें त्यांच्या आगमनावर अवलंबून असलेल्या बऱ्याच भानगडी जागच्या जागींच जिरल्या!

याच सुमारास तात्यांच्या आयुष्यांतली आणखी एक महत्त्वाची गोष्ट घडून आली. ते मॅट्रिकच्या वर्गांत गेल्याला आतां सुमारें तीनचार महिने झाले होते. सामान्यतः असें गृहीत धरण्याला मुळींच हरकत नव्हती कीं, आणखी ७–८ महिन्यांत तात्यांचा शालेय अभ्यासक्रम पुरा होऊन, उच्च शिक्षणाचा प्रश्न त्यांच्या-पुढें दत्त म्हणून उभा राहील. उच्च शिक्षण घेण्याची तीव्र तळमळ तात्यांच्या मनांत होती व ' तात्याचें उच्च शिक्षण झालेंच पाहिजे ' असा बाबांचा बाणाच होता. तात्यांचें उच्च शिक्षण चालू रहावें या हेतूनें रा. म्हसकर यांनीं ' काळ ' कर्ते प्रो. परांजपे यांना एक पत्र लिहिलें होतें. उच्च शिक्षणाची सोय व्हावी एतदर्थ मुद्रणालयांतल्या जुळाऱ्यापासून ( **Compositor** ) तर लेखकापर्यंत कसलेंहि हलकें-मोठें काम करण्याची आपली सिद्धता आहे असें स्वतः तात्यांनींहि परांजपे यांना कळविलें होतें. ' निर्वाणीचा पांडुरंग ' म्हणून तात्यांनीं या सालीं घरच्या घरीं पब्लिक सर्व्हिस परीक्षेचा अभ्यास चालविला होता व पुढें याच वर्षी ते ही परीक्षा ' पास ' हि झाले, हें अगदीं खरें; पण, कसेंहि करून तात्यांनीं कॉलेजांत जावयाचें व शिक्षण घ्यावयाचें हाच निर्धार तात्या व त्यांचे सहचर आणि हितचिंतक यांच्या मनांत वसत होता, यांत मात्र तिळमात्र संशय नाहीं.

आपलें उच्च शिक्षण व्हावें यासंबंधीं तात्यांच्या मनांत किती आतुरता होती व आपल्या या कर्तबगार कनिष्ठ भावाचें उच्च शिक्षण पुरें झालेंच पाहिजे असा बाबांच्या मनांतला निर्धार किती खंबीर होता हें या सुमारास घडलेल्या एका प्रसंगावरून स्पष्ट होतें. तात्या मॅट्रिकच्या वर्गांत गेले नि त्यांना दोषी तापानें पछाडलें. एक दिवस तर तात्यांची स्थिति फारच चिंताजनक झाली. त्यांना नीटशी शुद्धहि नव्हती. अर्धवट शुद्धींत ते बाबांना म्हणाले : बाबा! माझ्या शिक्षणाचें कसें होईल ? तो प्रश्न ऐकून बाबांच्या मनांत चर्र झालें ! तात्यांच्या उच्च शिक्षणाचा प्रश्न

निघाला कीं सगेसोयरे नि इष्टमित्र काय म्हणत याची त्यांना आठवण झाली. धाकट्या भावाला उच्च शिक्षण मिळावें म्हणून वरच्या दोघां भावांनीं वेळींच नोकरी पत्करावी असा या लोकांच्या उपदेशाचा आशय असे. बाबांनीं तो केव्हांच मानला नव्हता. ' आपला तात्या कांहीं तरी उच्च ध्येय साध्य करण्यासाठीं अव-तरला आहे; त्याला लागणारीं साधनें व अनुकूलता यथाकाल लाभत जाईल, ' अशी बाबांची दृढ श्रद्धा होती. त्यामुळें तात्यांचा हा केविलवाणा प्रश्न कानीं पडतांच बाबा कांहींशा अंतःस्फूर्तीनें म्हणाले : तात्या, शिक्षण अवश्य होईल ! काय वाटेल तें करीन—वेळ पडली तर भिक्षा मागेन; पण तुला शिक्षण दिल्यावांचून राहणार नाहीं. या उत्तरानें तात्यांचें समाधान झाल्यासारखें दिसलें व या समाधाना-मुळें वाटलेल्या शांतीचा परिणाम म्हणून असो कीं अन्य कांहीं कारणानें असो, तात्यांच्या दुखण्याला या वेळेपासून उतार पडूं लागला.

उच्च शिक्षण चालू ठेवण्याचें एक साधन म्हणून सधन श्वशुरगृहाची कल्पनाहि केव्हां केव्हां या मंडळींच्या विचाराच्या क्षितिजांत चमकून जात असे. ज्यांनीं क्रांतिकार्यांत जन्म घालविण्याचा निर्धार बालवयांतच केला आहे अशा तरुणांनीं वैवाहिक जीवनाची जबाबदारी स्वीकारावी कीं नाहीं, हा महत्त्वाचा प्रश्न या मित्रमंडळींत वारंवार चर्चिला जात होता. ' उत्तमा आत्मनः ख्याताः पितुः ख्याताश्च मध्यमाः । अधमा मातुलात् ख्याताः श्वशुराच्चाधमाधमाः ॥ इत्यादि वचनांचा अशा वादप्रसंगीं एका पक्षाकडून उपयोग केला गेला तर, दुसऱ्या पक्षाकडूनहि असें सांगण्यांत येई कीं, खऱ्या अर्थानें मिळणारी ख्याति ही साधनांवर अवलंबून नसून, ती ज्या त्या व्यक्तीच्या निसर्गसिद्ध गुणांवरच मुख्यतः अवलंबून आहे! 'वैवाहिक जबाबदारीच्या अवास्तव कल्पना तरुणांच्या मनांत थैमान घालतात याचें कारण शिपाईबाण्याचा लोप; विश्वासराव, दत्ताजी शिंदे अशीं शूर माणसें विशीपंचविशीच्या आंत धारातीर्थी पडलीं, म्हणून ज्याप्रमाणें त्या काळच्या महाराष्ट्रियांचीं लग्नें १४–१५ वर्षें वयाच्या सुमारास व्हावयाचीं थांबलीं नाहींत त्याप्रमाणेंच, सध्यांच्या काळचे तरुण देशभक्तीच्या खडतर मार्गाचें आक्र-मण करणार आहेत यासाठीं त्यांचींहि लग्नें थांबविण्याचें वा लांबविण्याचें कारण नाहीं ' असाही कोटिक्रम या मंडळींच्या वादविवादप्रसंगीं केला गेला असेल, हें अगदीं शक्य आहे. देशकार्य करण्याचा ज्या तरुणांनीं निश्चय केला आहे त्यांपैकीं कोणी विवाहबद्ध व्हावें व कोणी विवाहबद्ध होऊं नये याविषयींचें वृत्तबद्ध विवेचन सावरकर यांनीं ' कमला ' काव्यांत यानंतर सुमारें एक तपानें केलें. हें विवेचन मित्र-मेळ्यांत या सुमारास या विषयासंबंधीं ज्या चर्चा चालत त्यांची यथार्थ कल्पना करून देणारें असल्यामुळें, त्या विवेचनांतल्या कांहीं पंक्ती या ठिकाणीं देणें अवश्य आहे. ' कमला ' काव्याचा नायक मुकुंद यानें आपला मित्र मुकुल याला

" मुकुला मग तूं कां ना विवाह करिसी तरी ? "

असा प्रश्न विचारल्यावर मुकुलानें

" तुझ्यासम न कीं मातें आत्मप्रत्यय अंतरीं " ॥

असें उत्तर मोकळ्या मनानें दिलें. महद्धर्म व अल्पधर्म यांचा झगडा टळण्याचे दृष्टीनें कोणत्या देशार्थी तरुणानें विवाहितावस्था पत्करावी व कोणत्या तरुणानें ती पत्करूं नये याचें विवेचन करतांना मुकुल म्हणतो :

यद्यपी राष्ट्रमंत्राचा बीजमंत्र विवाह रे ।
गंगाची आटतां गंगास्नान-पुण्य कसें घडे ॥
परंतु परतेची जैं आपदा प्रियभू छळी ।
धर्मार्थेची सख्या होती आपद्धर्म तदा बळी ॥
अर्धमुक्तचि तैं अर्धांगीच्या बाहुलतेंतुनी ।
होय रे सखया जाणें हाय ह्या विषमीं रणीं ॥
भीति धीटाहि तैं घाया प्रीतिचा असल्या हवी ।
चळती अचलांचींहि शिखरें पडतां पवी ॥
पुण्यही श्लाघ्यही होती तैं वैवाहिक बंध रे ।
आत्मदुर्बल जे माझ्यासम, घातुक त्यां त्वरें ॥
रोग्यां पौष्टिक तैसें त्यां रतिमंगल वर्ज्यसें : ।
प्राप्तची न तयाचा कीं, त्याग दुष्करसा नसे ॥
चुकोत अल्पधर्मी ना महद्धर्म करावया ।
म्हणूनि विहिताची कीं अविवाहितताचे यां ॥
परंतु जो मनस्वी हे दोन्ही धर्म शके करूः ।
कामिनींच्या कटाक्षांहीं, जातां येइ न जो धरूः ॥
धर्मवीर्यत्व तीसंगें ज्याचें लुप्त न जो परी ।
तिलाचि अपुल्या संगीं धर्मवीर्यवती करी ॥
धन्य धन्यचि तो धीमान् धर्मवीर चितोरचा ।
राजीवाक्ष अयोध्येचा, तान्हा भारतभूमिचा ॥
तूं मुकुंद ! तसें व्हावें, होऊं तूं क्षमची तसें, ।
विश्वास हा मनीं माझ्या, आकांक्षा मजही असे ॥
आमुची देशभक्ती तों निर्नदीकसरोपमा ।
तुझी जयांत जन्मा घे गंगा संतत त्या समा ॥

धर्मार्थ एकची त्यागूं आम्ही प्राण, तुम्ही परी।
कान्ता, सुतां, स्वतां आत्मत्याग हा त्रिगुणें तरी ॥
ध्येय मी राष्ट्रभक्तीचें क्वचित्; जीवन हो तुझें।
पितृत्वाचें, पतित्वाचें ध्येय राष्ट्रसुभक्तिचें ॥

—कमला : पृ. ३१-३२ : २७९-२९२.

वैवाहिक जीवन व सांसारिक बंधन यांचा देशकार्यविषयक क्षेत्रांत व्यत्यय येतो असें म्हणून ही जबाबदारी टाळणाऱ्या आणि ही जबाबदारी शिरावर पडली या सबबीवर देशकार्याकडे प्रायः दुर्लक्ष करणाऱ्या लोकांनीं मनन करण्यासारखे कांहीं विचार वरील पंक्तींत आहेत; त्याप्रमाणेंच, असे कांहीं विचार सावरकर यांनीं लिहून ठेविलेल्या अप्रकाशित आत्मवृत्तांतांहि आहेत :

*कर्तव्याचें रणशिंग फुंकलें जातांच, पत्नीसाठीं वा मातेसाठीं मला मरवणार नाहीं असें निमित्त जो पुढें करतो तो बहुधा त्या सर्वांच्या मोहापेक्षां आंतून स्वतःच्या प्राणाच्या मोहानेंच मरण्यास सिद्ध नसतो, हें वाक्य नमुनेदार आहे. देशभक्त आघाडीसच पडला तर त्याचीं बायकामुलें अनाथ होतील का, या प्रश्नाचें सावरकर यांनीं दिलेलें उत्तर मनन करण्यासारखें आहे. त्याच्या पत्नीपुत्रांनीं आपला नाथ असा महान् हुतात्मा झाला या विचारासरशीं आपल्या त्या अनाथपणासच वास्तविक स्पृहणीय सनाथत्व मानलें पाहिजे. पण, तेंहि होत नसेल तर, अशा अनाथ स्त्रियांनीं सुखेनैव तशाच कोणा थोर पुरुषाशीं पुनर्विवाह करून, आपला संसार पुन्हां थाटावा, अशी अनुज्ञा मनःपूर्वक देण्याइतका तो क्रांतिवीर बहुधा उदार असेलच!*

क्रांतिवीराच्या पत्नीनें पुनर्विवाह करावा व त्याला त्या वीरानें अनुज्ञा द्यावी ही या अवतरणांतली कल्पना प्रत्यक्ष व्यवहारांत प्रायः असिद्ध राहील असें पुष्कळांना वाटण्याचा संभव आहे. पण, माननीय महाराष्ट्रीय क्रांतिवीर सेनापति पां. म. बापट यांच्या जीवनवृत्ताचा ज्यांना परिचय आहे त्यांना हें आठवेल कीं, सेनापतींच्या जीवनांत या कल्पनेंतला एक भाग प्रत्यक्ष घडला आहे. युरोपहून परत आल्यावर सेनापति बापट यांना कांहीं वर्षें अज्ञातवासांत कंठावीं लागलीं. त्या अवधींत त्यांनीं आपल्या सहधर्मचारिणीला एक व आपल्या एका अविवाहित मित्राला एक अशीं दोन पत्रें धाडून, या कल्पनेचा पुरस्कार केला होता, ही गोष्ट सेनापतींनीं लिहिलेल्या वृत्तबद्ध आत्मचरित्रांत नमूद करण्यांत आलेली आहे. स्वातंत्र्यवीर सावरकर व सेनापति बापट यांच्या त्यागीपणाच्या कांचनगंगा शिखरावर आरूढ झालेल्या इसमानेंच असे विचार व्यक्त केले तर ते शोभून दिसतात; 'येरा गबाळानें' तेच विचार व्यक्त केले तर त्यांना शुद्ध बाष्कळपणाचें व बेजबाबदारपणाचें स्वरूप प्राप्त होतें हें लक्षांत ठेवूनच, सेनापतींचे पुढील विचार वाचणें हितप्रद ठरणार आहे :

नष्टे, मृते, प्रव्रजिते, क्लीबे कलहदारुणे ।
पतिते च पतौ पत्न्याः पतिरन्यो विधीयते ॥
सूत्र हें मान्य मजला, पत्र पत्नीस मी तदा ।
अज्ञातवासीं लिहिलें जाणूनी यौवनापदा ॥
"नष्ट मी, नष्ट मजला जाण, लग्न करीं प्रिये ।
न होवो यौवनाचा या ताप दुःसह मत्स्त्रिये ॥"
अविवाहित मित्रासी एका त्या समयींच मी ।
लिहिलें "मम पत्नीतें वरा सद्य व्हा तुम्ही ॥"

—सेनापति बापट-वाङ्मय : समग्र ग्रंथ : पृ. १९.

आपल्या संकल्पित क्रांतिकार्याला विवाहामुळें आडकाठी येणार नाहीं हें तात्यांच्या मनानें नक्की ठरविलें असलें तरी, या प्रश्नाची व्यावहारिक बाजू अगदीं निकडीनेंच विचारांत घ्यावी लागेल असें मात्र तात्यांना वाटलें नव्हतें. त्या वेळची कौटुंबिक परिस्थिति लक्षांत घेऊन तर त्यांनीं व बाबांनीं असेंच ठरविलें होतें कीं, लग्नाचा प्रश्न तूर्त विचारांतहि घ्यावयाचा नाहीं. पण, शेवटीं जो बनाव बनला तो असा कांहीं बनला कीं, त्यापुढें तात्या व बाबा या दोघांचेंहि कांहीं चालू शकलें नाहीं. तात्या मॅट्रिकच्या वर्गांत जाऊन तीनचार महिने झाले असतील तों एक दिवस त्यांचे मामा घरांत आले व 'तात्याचें लग्न ठरवून आलों' असें ते म्हणूं लागले. आपली कसल्याच प्रकारची संमति न मिळवितां ठरविलेलें हें लग्न मान्य करणें तात्यांच्या जिवावर आलें. पण मामांचा शब्द मोडणें अनेक दृष्टींनीं अवघड होतें. एक तर मामा हे तात्या व बाबा या उभयतांनाहि वडिलांसमान पूज्य वाटत होते आणि मामांचाहि या आपल्या भाच्यांवर तसाच लोभ होता. दुसरें असें कीं, मामांनीं ज्या कुटुंबाशीं संबंध जुळविण्याचें ठरविलें होतें तें कुटुंबहि मामांच्या व स्वतः सावरकरांच्या कुटुंबाच्या घरोब्यांतलेंच होतें. चिपळूणकर कुटुंबांतील मंडळींचा या दोन कुटुंबांतील मंडळींशीं घरोबा होता इतकेंच नव्हे तर, या दोन्ही कुटुंबांतील बायकामंडळींची व चिपळूणकर कुटुंबांतील बायकामंडळींची चांगलीच जानपछान होती. तात्यांच्यासाठीं जी वधू नियुक्त करण्यांत आलेली होती तिची व वहिनींची नुसती ओळख होती इतकेंच नव्हे तर, त्या दोघींचें कांहीं नातेंहि होतें.

या नियुक्त वधूचे वडील श्री. रामचंद्र त्र्यंबक अर्थात् भाऊराव चिपळूणकर हे त्या वेळीं जव्हार संस्थानांत श्रेष्ठपदावर असून त्यांचें त्या संस्थानचे कारभारांत वजनहि चांगल्या प्रकारचें होतें. जव्हार संस्थानचे त्या वेळचे युवराज हे भाऊरावांना आपल्या भावासारखे लेखीत. भाऊरावांचा एकंदर बाणा सरदारी थाटाचा होता. ते उंच व गोरेपान असून मोठे देखणे होते. घोड्यावर बसणें, बंदूक मारणें, स्वारी शिकारीस जाणें इ० विषयांत ते चांगलेच तरबेज असून, त्यांना गायनादि ललित कलां-

चाहि मोठा शोक असे. त्या वेळच्या प्रतिष्ठित घराण्यांतील पुष्कळशा कर्त्या पुरुषांप्रमाणें भाऊरावहि धार्मिक वृत्तीचे असून, त्यांचा दातृत्वाबद्दलहि लौकिक चांगला होता. त्यांनीं तात्यांना बाल्यावस्थेपासून पाहिलेलें होतें व तात्यांचे वडील अण्णा हे वारल्या-नंतरच्या काळांत त्यांनीं सावरकर-कुटुंबाची आपलेपणानें पूसतपासहि केली होती. लग्नाची प्रत्यक्ष गोष्ट बोलली जाण्यापूर्वी तीनचार वर्षें तरी, त्यांनीं तात्यांकडे आपले भावी जामात या दृष्टीनें पाहिलें होतें. अशा आस्थेवाईक व प्रतिष्ठित सद्‌गृहस्थाचा शब्द मोडणें हें सर्वांच्याच मोठें जिवावर आलें. कालहरण करण्याच्या दृष्टीनें बाबांनीं 'परीक्षा झाल्यावर लग्नाचें पाहूं' असेंहि म्हणून पाहिलें; पण, कोणत्याहि वधूपित्याला अशा बाबतींतला विलंब ज्याप्रमाणें असह्य वाटतो त्याप्रमाणेंच भाऊराव चिपळूणकर यांनाहि हा विलंब असह्यच वाटला. त्यांचा आग्रह टाळतां येत नाहीं असें दिसल्या-वर, तात्यांनीं आपलें मनोगत त्यांना स्पष्ट शब्दांत कळविलें. कॉलेजच्या शिक्षणाच्या खर्चाचा भार संभाळण्याचें वचन भाऊराव देत असतील तर लग्नाला संमती देण्याला हरकत नाहीं, असें तात्यांनीं सांगितलें. तात्यांचें उच्च शिक्षण व्हावें ही गोष्ट भाऊ-रावांनाहि इष्टच वाटत असल्यामुळें त्यांनीं असें सांगितलें कीं, माझ्या मुलांचें शिक्षण मी करीन हें वचन जसें कोणास मी द्यावयास नको तसेंच हेंहि वचन द्यावयास नको; तें माझें कर्तव्यच आहे. इतकी वाटाघाट झाल्यानंतर हें लग्न निश्चित ठरलें. भाऊ-राव चिपळूणकर यांची मुलगी माई ही तात्यांसाठीं वधू म्हणून निश्चित करण्यांत आली.

हें लग्न १९०१ सालीं नाशिक येथें झालें हें निश्चित आहे. तें कोणत्या महिन्यांत झालें या बाबतींत मात्र दोन भिन्न नोंदी सांपडतात. लग्न माघ महिन्यांत झालें असें सावरकर यांनीं आपल्या आत्मचरित्रांत लिहिलें आहे. वहिनींनीं लिहून ठेविलेल्या आठवणींमध्यें लग्न शिमग्यांत झालें, असें म्हटलेलें आहे. अशा घरगुती बाबतींत पुरुषांच्या आठवणीपेक्षां स्त्रियांची आठवणच जास्त विश्वसनीय ठरते असा अनुभव असल्यामुळें, हें लग्न शिमग्यांत झालें असें गृहीत धरून चालण्याला हरकत नाहीं. लग्न आटोपल्यावर लागलाच मॅट्रिकच्या परीक्षेचा लकडा मागें लागला असें सावरकरांनीं लिहून ठेविलें आहे; पण या लिहिण्यांत कांहीं तरी घोटाळा आहे. लग्न माघ महिन्यांत झालेलें असो अगर फाल्गुनांत झालेलें असो, त्या वेळीं १९०१ साल-च्या मार्च-एप्रिल महिन्याचा सुमार होता, हें निश्चित आहे. याचाच अर्थ असा कीं, तेव्हांपासून मॅट्रिकच्या परीक्षेला सहासात महिन्यांचा अवधि होता. त्या वेळीं मॅट्रि-कची परीक्षा हल्लीप्रमाणें भर उन्हाळ्यांत होत नसे; ती ऑक्टोबर-नोव्हेंबरच्या सुमा-रास होत असे, हें लक्षांत ठेविलें पाहिजे.

भाऊराव चिपळूणकर यांनीं श्वशुर या नात्यानें तात्यांच्यासाठीं काय केलें व या दोन कुटुंबांचे संबंध अनेक संकटपरंपरांना न जुमानतां किती ममत्त्वाचे राहिले हें सावरकर यांनीं १९१८ सालीं अंदमानमधून धाडिलेल्या पत्रांतल्या पुढील अवतरणा-वरून लक्षांत येण्यासारखें आहे :

सावरकरांचे श्वशुर



श्री. रामचंद्र त्र्यंबक अर्थात् भाऊसाहेब चिपळूणकर



श्री. वि. दा. सावरकर,
(१९०१ सालांतलें छायाचित्र)

If there be any man or any family next to dear Baba to whom I owe all that is best in me, and owing to whose noble patronage and winning solicitude I had unusual chances and facilities of assimilating the noblest things of this world and even of doing something for our common Mother-land, then that man and that family is theirs (Chiploonker's). But the sense of having been the cause of so much worry and loss and pain to them with whom the dearest ties of blood and love and mutual respect have bound me, has already been so keen a source of sadness and mental unhappiness to me that I do not dare to add an inch more to it all. And so have I denied myself the gratification of expressing my thankfulness or love. Otherwise who cannot be proud of those fine youths such as my own brothers-in-law are—at any rate promised to be ? And of him who brought me up as dearly as them ? .. And of that saintly, dutiful mother ? *

( जगांतल्या उत्तमोत्तम वस्तू आत्मसात् करण्याची संधि व साधनें मला लाभलीं व आपल्या सर्वांना प्रिय वाटणाऱ्या आपल्या मायदेशासाठींहि कांहीं करण्याचा योग मला लाभला. ज्यांच्या थोर पुरस्कारामुळें व प्रेमळ आपुलकीमुळें हें साधलें—व त्यामुळें माझ्या ठिकाणीं जें कांहीं सर्वोत्तम असेल त्याचें श्रेय ज्यांना कृतज्ञपणें दिलें पाहिजे—अशा व्यक्तींच्या परिगणनेंत परमपूज्य बाबांच्या खालोखाल स्थान जर कोणाला देणें रास्त असेल तर त्या व्यक्ती म्हणजे श्री. भाऊराव चिपळूणकर व त्यांच्या कुटुंबांतलीं माणसें, ह्याच होत. या मंडळींशीं रक्ताचा, प्रेमाचा व आदराचा अति नाजूक संबंध जुळल्यावरहि, माझ्यामुळें त्यांना अतिशय त्रास झाला, त्यांची हानि झाली व त्यांना पिडा पोंचली. ह्या जाणिवेच्या तीव्रतेमुळें माझें मन अत्यंत कष्टी होत आलें आहे व त्यामुळें मला अतिशय उद्वेग वाटत आला आहे. अशी स्थिति असल्यामुळें, त्यांच्या दुःखांत लवमात्रहि भर टाकण्याचा धीर मला होत नाहीं. यामुळेंच, या मंडळींबद्दलची कृतज्ञताबुद्धि अगर प्रेमभाव व्यक्त करण्याचें समाधानहि मी दूर सारीत असतों. एरव्हीं, माझ्या मेहुण्यांसारख्या उमद्या तरुणांबद्दल—निदान त्यांच्या उमदेपणाबद्दल आशा धरावी असे तरी ते खास होते—अभिमान कोणाला वाटणार नाहीं ? त्यांच्यावरच्या इतकेंच प्रेम मजवर करून ज्यांनीं माझें लालनपालन केलें त्या माझ्या श्वशुरांबद्दल कोणाला अभिमान वाटणार नाहीं ? आणि, माझ्या कर्तव्यतत्पर व यतितुल्य सासूबाईबद्दलहि अभिमान कोण बाळगणार नाहीं ? )

चिपळूणकरांच्या या मुलीच्या लग्नानंतर थोडक्याच दिवसांनीं त्यांच्या दुसऱ्या मुलीचेंहि लग्न ठरलें व तें नाशिकजवळ असलेल्या ओझर ( तांबट ) गांवीं झालें. तात्यां या विवाहप्रसंगीं हजर होते. या वेळीं वऱ्हाडी मंडळींत नाशिकचे शीघ्र कवि बळवंत खंडोजी पारख हे होते. तात्यांच्या कवित्वगुणाची ओळख पारख यांना यापूर्वींच झालेली होती. त्यामुळें या लग्नप्रसंगीं त्यांचा व तात्यांचा जो

* An Echo from Andamans ; pp 60-61.

सहवास घडला तो उभयतांनाहि मोठा उपकारक ठरला. ओझर ( तांबट ) येथील मुक्कामांत या दोघां कवींचा समस्यापूर्तींचा करमणुकीचा खेळ सतत चाललेला असे. नाशिकच्या नारो शंकराच्या देवळांतल्या घंटेला उद्देशून तात्यांनीं केलेली पुढील कविता बळवंतरावांच्या चांगलीच लक्षांत राहिलेली होती :

दिल्लीचें पद हालवोनि वरिली तेजें जिहीं संपदा ।
राहोनी निरपेक्ष, वाहुनि दिली श्रीशंभुच्या शं-पदा ॥
होते ते तुमचे सुपूर्वज असे यत्कीर्तितें ना लय ।
नारोशंकरचें असें कथितसे आम्हांसि देवालय ॥ १ ॥

तात्यांच्या या व अशा प्रकारच्या अन्य कविता ऐकून या रसिकवरानें असें भविष्य वर्तविलें होतें कीं, या तेजस्वी युवकाची क्रांतिकारी कविता त्याच्या स्वतः-च्याच तेजानें एक दिवस जळून भस्म होईल.

१९०१ सालीं नाशिक येथें झालेल्या शिवजन्मोत्सवाच्या वेळीं आणि गणेशो-त्सवाच्या वेळीं मित्रमेळ्यांतील तरुणांचें कार्य उठून दिसलें हें त्यावेळच्या 'केसरीं' त यासंबंधींच्या ज्या त्रोटक नोंदी सांपडतात त्यावरूनहि सिद्ध होत आहे. दि. २३-४-१९०१ च्या 'केसरीं' त नाशिकच्या शिवजयन्त्युत्सवाबद्दल पुढील नोंद करण्यांत आलेली आहे :

*शनिवार रोजीं शिवजयन्त्युत्सव विजयानंद थिएटरांत झाला. मित्रमेळ्यानें श्रीशिवाजी महाराजांची तसबीर मोठ्या थाटानें मिरवणूक काढून पंचवटींतून उत्सवाचे जागीं आणली. गोपाळराव बिवलकरांचे अध्यक्षतेखालीं श्री. बर्वे यांचें व्याख्यान झालें. रा. बळवंत खंडूजी पारख यांनीं शिवजन्मावरील आपल्या कविता म्हटल्या. एका विद्यार्थ्यानें शिवरायाचे स्तुतिपर लहानसा संस्कृत निबंध वाचला.*

'केसरी' नें दिलेली गणेशोत्सवाबद्दलची नोंद यापूर्वींच देण्यांत आलेली आहे.

गणेशोत्सवाच्या पूर्वींपासूनच तात्यांच्या मागें परीक्षेच्या अभ्यासाचा लकडा लागला होता. उपान्त्य परीक्षा आटोपल्यानंतर तात्या एक महिना मुंबईस अभ्यासासाठीं जाऊन राहिले होते. नाशिकहून ते निघाले त्या पूर्वींच्या शनिवारीं मित्रमेळ्याची जी साप्ताहिक बैठक झाली ती मित्रमेळ्याच्या भावी कार्याच्या व व्यवस्थेच्या दृष्टीनें बरीच महत्त्वाची ठरली. मुंबईस तात्यांचा मुक्काम आंग्रेवाडींत श्री. बर्वे यांजकडे होता. परीक्षा वगैरे उरकल्यानंतर तात्या अलिबाग येथें जाऊन आले. अलिबागच्या मुक्कामांत तेथें सहज होत असलेल्या वक्तृत्वसभेंत बोलण्याची त्यांना संधि मिळाली. भाषणाच्या ओघांत तात्या प्रचलित राजकारणाकडे वळले आणि बोअरयुद्धांत इंग्रज लोकांचें धोरण कसें स्वार्थी आहे, इत्यादि गोष्टींच्या आधारें त्यांनीं टीकेची खूप झोड उठवून दिली. अध्यक्षांना तें

सहन झालें नाहीं. ही टीका अप्रस्तुत असल्याचा शेरा मारून, अध्यक्षांनीं तात्यांना अडथळा केला. त्यामुळें तात्यांनीं आपलें भाषण मध्येंच थांबविलें. समारोपाच्या वेळीं अध्यक्षांनीं तात्यांनीं केलेल्या विषयांतराचा उल्लेख केला. या विषयांतरामुळें या तरुणाला बक्षिस देतां आलें नाहीं, याबद्दल त्यांनीं खेद व्यक्त केला; पण, तात्यांच्या तडफदार वक्तृत्वाची प्रशंसा करण्याला मात्र ते चुकले नाहींत.

परीक्षा वगैरे आटोपून तात्या परत नाशिककडे वळले तों नाशिकांत प्लेगची वार्षिक धामधूम सुरू झालेली होती. परीक्षेचा निकाल लागेपर्यंतचा काळ आजोळीं म्हणजे कोठुरास घालविण्याचें तात्यांनीं ठरविलें. कोठूरच्या या मुक्कामांतहि तात्यांनीं बाळच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष पुरविल्यामुळें, तात्या नाशिक सोडून पुण्यास गेले त्या वेळीं बाळचें इंग्रजी दोन इयत्तांचें शिक्षण घरींच पुरें झालेलें होतें. तात्यांच्या कवित्वाची कीर्ति कोठूरच्या तमासगीर मंडळीपर्यंतहि पोंचलेली असल्यामुळें, या मंडळींनीं कांहीं लावण्या करून देण्याचा आग्रह तात्यांना केला. तात्यांनींहि 'दारुडा' 'दोन बायकांचा दादला' अशा कांहीं विषयांवर उपदेशपर लावण्या रचून दिल्या. कोठूर येथील या वास्तव्यांत आपण " सर्व पेशव्यांत थोर पेशवे कोण व कां ? " या विषयावरील निबंध लिहून तो कै० हरी नारायण आपटे यांजकडे पाठविला, असें सावरकरांनीं आपल्या अप्रकाशित आत्मवृत्तांत लिहून ठेविलेलें आहे; पण, तसें लिहिण्यांत थोडी चूक झाली आहे. 'करमणुकी'साठीं लिहिलेल्या निबंधाची हकीकत एक वर्ष अगोदरची आहे. करमणुकीसाठीं जे बक्षिसांचे निबंध मागविले होते, त्यांची मुदत दि. ८–१२–१९०० पर्यंतची होती. तात्यांनीं अल्पावधींत निबंध लिहून पाठविला. एकूण ३४ निबंध आले होते त्यांत त्यांचा निबंध सर्वश्रेष्ठ व बक्षिस देण्याला योग्य ठरला. दि. २२–१२–१९०० च्या करमणुकीच्या अंकांत चढाओढीचा निकाल प्रसिद्ध झाला व पुढें सावरकरांचा निबंध करमणुकींत प्रसिद्ध-हि झाला, अशी हकीकत श्री. रा. म. आठवले यांनीं यापूर्वीं प्रसिद्धिली आहे.

कोठूर गांव गोदावरीच्या तीरावर वसलेलें असल्यामुळें तात्यांना या मुक्का-मांत मोरोपंतांच्या ' गंगावकिली ' च्या धर्तीवर ' गोदावकिली ' हें काव्य रचण्याची स्फूर्ति झाली. या कवितेंतील पुढलि ओळींत मोरोपंती वळण आणि देशाच्या पार-तंत्र्याबद्दलची हळहळ या गोष्टींचें प्रतिबिंब स्पष्टपणें पडलेलें आहे :

> आजवरी बाह्यांगा न्हाणिति माता न अंतरंगातें ।
> श्रीसांबाशिराखालें साधाया कार्य येत गंगा तें ॥१॥
> घांट न हे पाट स्वयें मांडुनि, न्हाणावया अम्हां लोकां ।
> स्वांगीं पसरवि खेळवि जगजननी दे अवर्णनिय तोखा ॥

× × ×

सांप्रत सर्वांचि झालें माते हें भरतखंड हीन खरें ।
परवशता बहु दुःसह् बरवीं हृदयस्थ नडगिर्वी न खरें ॥
तत्तारणा झटावें सद्ये संतत समस्त गांवकरी ।
गांव जुटीनें उठला तरि तदाहित केवि दुष्ट राव करी ॥

× × ×

मजला मम प्रियमित्रा संरक्षा वासुदेवतात्यांना ।
मजसम प्रसन्न व्हावी सद्विद्या आशु देवता त्यांना ॥

× × ×

दे वर अम्हां असा कीं, ह्या हस्तें देशशत्रु दंडावे ।
उद्धार त्रिवर्ग सर्वे, तो आधिं, असें अम्हीं न तंडावें ॥

कोठूरचा हा मुक्काम संपून तात्या नाशिकला परत आल्यानंतर दोनतीन दिवसांतच म्हणजे दि. १९–१२–१९०१ रोजीं मॅट्रिक परीक्षेचा निकाल लागून तात्या उत्तीर्ण झाल्याची तार मुंबईहून आली. ह्या पुढील कार्यक्रम ठरलेलाच असल्यामुळें, एका बाजूला पुण्यास जाण्याची तयारी सुरू झाली व दुसऱ्या बाजूला मित्रमेळ्याची व्यवस्था तात्यांच्या गैरहजेरींत कशी चालावी याविषयींचे विचारहि सुरू झाले. नाताळच्या सुट्टीनंतर जानेवारीच्या आरंभींच पुण्याचें फर्ग्युसन कॉलेज सुरू झालें हें खरें; तथापि, ठिकठिकाणीं सुरू झालेली प्लेगची धामधूम पूर्णपणें बंद झालेली नसल्यामुळें, कॉलेजांत बाहेरून येणाऱ्या विद्यार्थ्यांचीं नांवें हळुहळू दाखल होत होतीं. दि. २४–१–१९०२ रोजीं तात्यांनीं फर्ग्युसन कॉलेजमध्यें पहिल्या वर्षांत आपलें नांव दाखल केलें.

———

# प्रकरण ३ रें

# फर्ग्युसन कॉलेजांतील अध्ययनकाल.

Bliss was it in that dawn to be alive
But to be young was very Heaven *

--William Wordsworth

नाशिक हायस्कूलमधील शिक्षण संपवून विनायकराव सावरकर यांनीं १९०२ च्या आरंभींच पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्यें आपलें नांव नोंदविलें. १९०५ च्या अखेरपर्यंत त्यांचें अध्ययन या कॉलेजमध्यें चाललें होतें. पुण्याच्या, महाराष्ट्राच्या किंवा भारताच्याच दृष्टीनें नव्हे, तर सर्व जगाच्या दृष्टीनें हा काळ अत्यंत महत्त्वाचा होता. तराजू व तरवार यांच्या जोरावर इंग्रजांनीं हिंदुस्थानसारख्या विस्तीर्ण व संपन्न देशावर स्वामित्व प्रस्थापित केल्यामुळें व सूक्ष्म अशा औद्योगिक व आर्थिक धोरणांच्या साहाय्यानें इंग्लंडनें या स्वामित्वाला सुमारें चाळीस वर्षांच्या दीर्घ काळांत स्थैर्य आणल्यामुळें, इंग्लंडची सत्ता अतोनात वाढली होती. युरोपच्या एका कोंपऱ्यांतल्या एका भिकारड्या देशांत जन्मलेले भणंग लोक कल्पनातीत ऐश्वर्याचे व सत्तेचे स्वामी बनल्यामुळें, त्यांच्या डोळ्यांवर जी धुंदी येऊं लागली तिचा त्रास युरोपांतल्या इतर राष्ट्रांना असह्य वाटूं लागला होता. आशिया, आफ्रिका, ऑस्ट्रेलिया, अमेरिका या चारी खंडांत आपलें वर्चस्व प्रस्थापूं पाहणाऱ्या इंग्रजांचा मत्सर युरोपांतल्या रशियाजर्मनीप्रभृति राष्ट्रांना वाटावा, अशी स्थिति एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं शेवटीं निर्माण झालेली होती. रशियाचा अवाढव्य मुलूख हिंदुस्थानच्या वायव्य व उत्तर सरहद्दीपासून विशेषसा दूर नसल्यामुळें, त्या भागांत रशिया कांहीं विशेष गडबड करील कीं काय, इराणप्रभृति देशांतहि रशिया कांहीं कारस्थानें करील कीं काय, अशी भीति या काळांत इंग्रजांना वाटत असे. १८८७ सालीं क्वेट्टा प्रांत बलुचिस्थानास जोडण्यांत आला व १८९५ सालीं चित्रळचें प्रकरण उपस्थित करण्यांत आलें—या दोन्ही घटना रशियाच्या बाजूच्या सरहद्दीला बळकटी आणण्याच्या हेतूनेंच घडविण्यांत आल्या होत्या. हिंदुस्थानच्या पूर्वसरहद्दीलगत फ्रेंचांची सत्ता वाढत असून, इंडो—चायनांत फ्रेंचांचे पाय पसरत चालले आहेत असा संशय आल्याबरोबर, ब्रह्मदेशच्या थिबा राजाची उचलबांगडी करून व ब्रह्मदेश अंकित करून घेऊन, इंग्रजांनीं त्या भागाचाहि बंदोबस्त करून टाकला होता.

---

* त्या ( क्रांतिकल्पाच्या ) उषःकालीं नुसतें जिवंत असणेंहि आनंदमय होतें; त्या काळीं आयुष्याच्या चढत्या उमेदींत असण्यांत तर स्वर्गसुख सांठलेलें होतें.

निःशस्त्र बनविण्यांत आलेल्या भारतांतले नवशिक्षित जगाकडे पाहूं लागले त्या सुमारास, जगांत इंग्लंडच्या सर्वांगीण श्रेष्ठतेचा ढोल पिटला जात होता. अशा श्रेष्ठ सत्ताधीशांशीं लढण्याझगडण्याचें कांहींच साधन आपल्या हातीं उरलें नाहीं हें पाहून, कित्येकांनीं भारतांतल्या ब्रिटिश सत्तेला 'विधिघटित' ही संज्ञा देण्याला सुरुवात केली. अमेरिकेनें इंग्लंडविरुद्ध लढून स्वातंत्र्य कसें संपादिलें, ऑस्ट्रिया-सारख्या बलाढ्य सत्तेविरुद्ध उठावणी करून इटलींतल्या माझिनी-गॅरिबाल्डीप्रभृति देशभक्तांनीं राष्ट्रैक्य व राष्ट्रस्वातंत्र्य यांची सिद्धि कशी करून घेतली, नेदर्लंडमधल्या लोकांनीं परकी सत्तेचें जोखड झुगारून देण्याच्या यत्नांत काय काय खटपटी केल्या, इत्यादि ऐतिहासिक घडामोडी मनांत खेळवून व जनांत रंगवून कित्येकांनीं 'दुधाची तहान ताकावर' भागविण्याचा उपक्रम सुरू केला. नव्या राजवटींत मिळूं लागलेल्या नोकऱ्याचाकऱ्या व उपभोगतां येऊं लागलेल्या सुखसोयी यांच्यावर भाळून गेलेल्या कांहीं भोळसटांनीं व स्वार्थांधांनीं ब्रिटिश राज्यपद्धतीचें रामराज्याशीं साम्य कल्पिण्याला सुरुवात केली. वरपांगीं असा सगळा 'अल्बेली'चा कारभार चालू असला तरी, स्वदेश व स्वधर्म यांच्या अवनतीमुळें असंतुष्ट झालेला एक वर्गहि समाजांत होताच! नवशिक्षितांच्या महत्त्वाकांक्षा पूर्ण होतील अशा रीतीनें त्यांची सत्ताकेंद्रांतून योजना करण्याची राज्यकर्त्यांची इच्छा नसल्यामुळें, हा वर्गहि अधिकाधिक रुष्ट व असंतुष्ट बनूं लागला होता. या वर्गाच्या असंतोषाला वाट फोडून देण्याचें एक साधन म्हणून 'इंडियन नॅशनल काँग्रेस'चा जन्म झाला होता.

काँग्रेसच्या प्रस्थापनेनंतर सात वर्षांनीं कौन्सिलांचा पहिला कायदा पास झाला. त्यामुळें सुशिक्षित वर्गाचें समाधान झालें नाहीं. उलट, त्या सुमारासच सुरू झालेल्या इल्बर्ट बिलासंबंधींच्या वादविवादामुळें सुशिक्षितांच्या असंतोषांत भरच पडली. न्यायदानाच्या क्षेत्रांत गोराकाळा हा वर्णभेद नसावा अशा भावनेनें बनविण्यांत आलेल्या इल्बर्ट बिलाला हिंदुस्थानच्या गोऱ्या अधिकारीवर्गानें संघटित विरोध केला व शेवटीं व्हाइसरॉयला हें बिल मागें घ्यावें लागलें. ब्रिटिशांच्या रोमरोमांत मुरलेल्या वर्णश्रेष्ठतेच्या कल्पनेची प्रतीति सुशिक्षित हिंदी लोकांना पटण्याच्या दृष्टीनें ही घटना जशी महत्वाची आहे त्याप्रमाणेंच, 'सामर्थ्य आहे चळवळीचें' या वचनाची यथार्थता सुशिक्षितांना पटवून देणारा प्रसंग या दृष्टीनेंहि या घटनेचें महत्त्व फार आहे.

खुद्द इंग्लंडचा इतिहास, इटलीचा इतिहास, अमेरिकेचा इतिहास वगैरेंच्या द्वारा आपल्या वृत्तींतल्या स्वातंत्र्यप्रेमाचा परिपोष करणाऱ्या असंतुष्ट हिंदी सुशिक्षितांना या सुमारापर्यंत असें वाटत असे कीं, युरोपियन राष्ट्रांचें सामर्थ्य परस्परांच्या तुलनेंत उणेंपुरें कसेंहि असलें तरी, युरोपियन विरुद्ध आशियाटिक, युरोपियन विरुद्ध आफ्रिकन असा लढा सुरू झालाच तर त्यांत युरोपियनांचें वर्चस्व अबाधितच रहाणार! एकोणिसाव्या शतकाच्या शेवटच्या दशकांत घडलेल्या कांहीं प्रसंगांमुळें त्यांचा

युरोपियनांच्या या वर्चस्वावरील विश्वासहि हादरला व त्यामुळें स्वातंत्र्यप्राप्तीच्या दिशेनें चळवळ करण्याला त्यांना अधिक विश्वास वाटूं लागला. दि. १।३।१८९६ रोजीं आफ्रिकेंतल्या ॲबिसीनियन सेनेनें इटलीच्या सेनेचा अडोवा येथें पराभव केला व तिचा चांगलाच धुव्वा उडविला. इंग्रजांच्या मानानें किती तरी मागसलेल्या बोअर लोकांनीं १८९९ सालीं इंग्रजांविरुद्ध लढण्याला सुरुवात केली. दोनअडीच वर्षे चाललेल्या या संग्रामांत कांहीं प्रसंगीं तरी इंग्रजांच्या तोंडचें पाणी चांगलेंच पळालें ! चीनमध्यें बुभुक्षित युरोपियनांचा बुजबुजाट वाढत चालला आहे हें सहन न झाल्या-मुळें, ' बॉक्सर्स ' नांवाच्या तेथील गुप्त संघटनेंतल्या मंडळींनीं पेकिंगवर चाल केली. हा प्रसंगहि १९०० सालीं घडला.

सत्तालोभ व साम्राज्यविस्तार यांच्या आहारीं गेलेल्या इंग्लंडला रशियाची भीति वाटत असल्यामुळें, इंग्लंडनें या सुमारासच जपानपाशीं तह केला. १९०२च्या जानेवारी महिन्याच्या शेवटींशेवटीं झालेल्या या तहाचा एक परिणाम असा झाला कीं, युरोपियन राष्ट्रांना एका तरी पौर्वात्य राष्ट्राला कांहीं अंशीं तरी बरोबरीच्या नात्यानें वागवावें लागतें असा विश्वास पौर्वात्यांच्या मनांत वाढीस लागला. रशिया व इंग्लंड यांच्यामधील या स्पर्धेमुळें इंग्लंडच्या अंकित असलेल्या मुलुखांतल्या लोकांचें जीवन असह्य होऊं लागलें होतें त्याप्रमाणेंच, झारशाहीला कंटाळलेल्या रशियांतील लोकांचें-हि जिवन असह्य होऊं लागलेलें होतें. इजिप्त, आयर्लंड, हिंदुस्थानप्रभृति देशांत या सुमारास असंतोष धुमसूं लागला त्याप्रमाणेंच रशियांतहि याच सुमारास असंतोषाचा भडका उडूं लागला, ही गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. प्लेग व दुष्काळ हीं अस्मानी संकटें व आर्थिक शोषण हें सुलतानी संकट यांचा मिलाफ होऊन, हिंदु-स्थानांत या सुमारास जी सार्वत्रिक उद्विग्नता पसरलेली होती ती हळुहळू हिंदी वृत्तपत्रां-तून व्यक्त होऊं लागलेली होती. या काळांत एकादा सौम्य प्रकृतीचा व्हाइसरॉय हिंदुस्थानांत धाडण्यांत आला असता तर, गोड शब्दांनीं लोकांची दिशाभूल करण्याचें कार्य साधून, त्यानें हिंदुस्थानांतिल असंतोष आणखी कांहीं काळ प्रकट होऊं दिला नसता; पण, साम्राज्यवादाचा उघडउघड पुरस्कार करणारा कर्झनसारखा चढेल व्हाइ-सरॉय या सुमारास हिंदुस्थानला लाभल्यामुळें, हिंदुस्थानांतल्या असंतोषाच्या ठिणग्या चौफेर पसरूं लागल्या होत्या. कर्झनसारख्या व्हाइसरॉयला दूषण देण्याची रूढ झालेली पद्धत एका अर्थी बरोबर असली तरी, दुसऱ्या एका दृष्टीनें विचार करतांना असेंच म्हणावें लागतें कीं, हा झोटिंग हिंदुस्थानला या वेळीं लाभला हेंच एकंदरींत ठीक झालें ! **Hyndman** यानें या बाबतींत काढलेले पुढील उद्गार यथार्थ आहेत, असेंच म्हणणें प्राप्त आहे:

A bad Viceroy just now is indeed a boon to India. A good Viceroy, like a good slave-driver, serves only to obscure the abominations of the whole system.

(नेमक्या याच वेळीं लॉर्ड कर्झनसारखा खाष्ट व्हाइसरॉय हिंदुस्थानांत धाडण्यांत आला हें खरोखरच भारताला लाभलेलें एक प्रकारचें वरदानच होय. सत्प्रवृत्त व्हाइसरॉय हा एका परीनें गुलामांच्या सत्प्रवृत्त मालकासारखा असतो. राज्यपद्धतींतला तिरस्करणीय भाग दृष्टिआड होण्याला अशा व्हाइसरॉयचा उपयोग होत असतो.)

क्रांतिकारक कल्पनांना जन्म देणाऱ्या व क्रांतिकारक कार्याची सूचना देणाऱ्या काळांत सावरकर हे फर्ग्युसन कॉलेजमध्यें दाखल झाले व अभ्यास करीत राहिले, ही गोष्ट जशी लक्षांत ठेवण्यासारखी आहे, त्याप्रमाणेंच, खुद्द त्यांच्या कॉलेज-संबंधाचीहि एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे. फर्ग्युसन कॉलेज ही संस्था त्यावेळीं सध्यांच्याइतकी अव्वडचव्वड वाढलेली नव्हती. विज्ञानशाखेच्या प्रत्येक विभागासाठीं स्वतंत्र प्रयोगशाळा, स्वतंत्र सभागृह, स्वतंत्र ग्रंथशाळा आणि वसतिगृहांच्या अगणित इमारती हें फर्ग्युसन कॉलेजचें सध्यांचें स्वरूप कित्येकांना मोठें आकर्षक वाटतें. १९०२ सालीं फर्ग्युसन कॉलेजला हें स्वरूप आलेलें नव्हतें. विद्यार्थ्यांच्यासाठीं वसतिगृहाची सोय त्या काळींहि करण्यांत आलेली होती. पण ही सोय अगदींच बेताची होती. वसतिगृहाची अशी एकच इमारत त्या काळीं बांधून झालेली होती. या इमारतींतला एक सोयिस्कर भाग वरच्या वर्गांतल्या नांवाजलेल्या विद्यार्थ्यांसाठीं राखून ठेवण्याची पद्धत त्या काळीं रूढ झालेली होती. कॉलेजमध्यें दाखल झाल्यावर कांहीं दिवसांनीं. सावरकर यांनीं या पद्धतीचा उपहास करण्याला सोडलें नाहीं. या भागांत राहणाऱ्या लोकांचें वर्णन सावरकर हे Aristocracy या शब्दानें करूं लागले; आणि, या लोकांच्यासाठीं राखून ठेवलेल्या खोल्या वसतिगृहाच्या उत्तरेकडच्या दालनांत असल्यामुळें, त्यांनीं या दालनाला व या विद्यार्थ्यांना मिळून The North-wing Aristocracy असें नांव दिलें.*

कॉलेजमधील कांहीं गोष्टी सावरकरांच्या उपहासाला पात्र ठरल्या असल्या तरी, फर्ग्युसन कॉलेजच्या त्या वेळच्या वातावरणांत पुष्कळसा भाग चांगला होता. फक्कड इंग्रजी बोलूं शकणारे प्रोफेसर त्या काळीं बेताचेच होते. कित्येकांना आपला विषय इंग्रजी भाषेतून उकलून सांगतांना फार प्रयास पडत. अशा प्रोफेसरांना खाजगी-रीतीनें गांठून सावरकर व त्यांच्या वृत्तीचे विद्यार्थी खुशाल म्हणत : आतां मराठींतून सांगा सर ! बाह्य ऐश्वर्य किंवा नाटकी वैभव या बाबतींत त्या वेळचें फर्ग्युसन कॉलेज सध्यांच्या फर्ग्युसन कॉलेजच्या पासंगासहि पुरणार नाहीं. पण, ज्या स्वार्थत्यागाच्या तत्त्वावर हें कॉलेज सुरू झालें होतें तें तत्त्व मात्र संस्थेंत त्या काळीं मूर्तिमंत वावरत होतें. सर रघुनाथराव परांजपे हे १९०१ सालच्या अखेरीस इंग्लंडांतून परत आले होते. रँग्लरच्या परीक्षेंत अपूर्व यश मिळविल्यावरहि फर्ग्युसन कॉलेजमध्येंच राहण्याचें त्यांनीं ठरविल्यामुळें, या कॉलेजची त्यागाची पूर्वपरंपरा उज्वल झालेली होती.

---

* The History of the Deccan Education Society (1880—1935) part II ; p. 152

सावरकर फर्ग्युसन कॉलेजमध्यें दाखल झाले त्याच सुमारास कै. ना. गोखले हे वरिष्ठ कायदेमंडळांत नियुक्त झाले होते. या मार्गांनीं होणारी देशसेवा निर्वेधपणानें करतां यावी म्हणून ना. गोखले हे लौकरच कॉलेज सोडणार असा संभव त्या वेळीं दिसूं लागला होता. सभोंवार पसरलेल्या क्रांतिगर्भ वातावरणाचा सावरकरांच्या मनावर परिणाम घडला त्याप्रमाणेंच, ते ज्या कॉलेजमध्यें दाखल झाले त्या कॉलेजांतल्या त्यागमय वातावरणाचाहि त्यांच्या मनावर थोडाफार परिणाम घडला असला पाहिजे.

अशा अनुकूल वातावरणाचा परिणाम सर्वच मनांवर सारखा घडत नाहीं. चाणाक्ष व मंद अशा दोन्ही प्रकारच्या विद्यार्थ्यांना विद्या देण्याचें काम एकच गुरु करीत असले तरी, त्या विद्यादानाचे परिणाम छात्रपरत्वें भिन्नभिन्न होतात हें सांगतांना भवभूतीनें

> भवति च पुनर्भूयान्भेदः फलं प्रति तद्यथा ।
> प्रभवति शुचिर्बिंबोद्ग्राहे मणिर्न मृदां चयः ॥

हे चरण लिहिले आहेत. फर्ग्युसन कॉलेजच्या वातावरणाचा व भोंवतालच्या राजकीय वातावरणाचा सावरकरांच्या मनावर व त्यांच्या भोंवतीं वावरणाऱ्या विद्यार्थ्यांच्या मनावर ज्या प्रकारचा परिणाम झाला त्याच प्रकारचा परिणाम सर्व विद्यार्थ्यांच्या मनावर झाला नाहीं, याचें कारण उघडच आहे. सावरकर फर्ग्युसन कॉलेजांत आले ते आपल्या जीवनाचें ध्येय निश्चित करून आले होते; इतकेंच नव्हे तर, त्या ध्येयप्राप्तीसाठीं अवश्य असणारें कांहीं कार्यहि त्यांनीं केलें होतें. देशस्वातंत्र्य हें जीवनाचें ध्येय व सशस्त्र क्रांति हा त्या ध्येयप्राप्तीचा मार्ग अशी निश्चिति झाल्यावर, सावरकरांनीं आपली व्यायामपद्धति, आपलें वाचन, आपलें काव्यकर्तृत्व, आपलें वक्तृत्व इत्यादि सर्वांना एक विशिष्ट वळण लावलें होतें. समवयस्क तरुणांची संघटना करण्याचा उद्योग यशस्वी केल्यावर ते नाशिक सोडून पुण्यास आले होते. आपली उद्यमशीलता व आपली बुद्धिमत्ता यांच्या जोरावर आपण फर्ग्युसन कॉलेजांत येणाऱ्या महाराष्ट्रांतल्या असंख्य तरुणांची संघटना करूं, त्यांना स्वातंत्र्याचे उपासक बनवूं व त्यांना कार्योन्मुख करूं हा विश्वास बरोबर घेऊन सावरकर पुण्यास आले होते व चार वर्षांच्या काळांत त्यांनीं ज्या गोष्टी साधल्या त्यांचा विचार केला तर असें म्हणावें लागेल कीं, त्यांच्या ठिकाणीं वसत असलेला हा विश्वास गैर नव्हता.

सावरकरांच्या कॉलेजमधील शिक्षणाची आर्थिक व्यवस्था करण्याचें वचन श्री. भाऊसाहेब चिपळूणकर यांनीं दिलें होतें. तें वचन भाऊसाहेब यानीं पूर्णतया पाळल्यामुळें, कॉलेजमधील अध्ययनाच्या काळांत सावरकरांना या बाबतींत कसलीहि विवंचना बाळगण्याचें कारण नव्हतें. ही आर्थिक सोय खात्रीची असल्यामुळें सावरकर यांना कॉलेजच्या वसतिगृहांत राहतां आलें व वसतिगृहाच्या राहणीचा आनंद त्यांना उपभोगतां आला. वसतिगृहांत रहात असतांना सावरकर आपला आयव्यय लिहून

ठेवण्याच्या बाबतींत विशेषसे दक्ष नसावे, असें दिसतें. १९०३ च्या आरंभीं सावर-करांचे नातेवाईक श्री. भाऊराव भट ( सध्यां येवलें येथें असलेले डॉ. वि. म. भट ) हे फर्ग्युसन कॉलेजांत दाखल झाल्यावर, सावरकर व भट हे एकाच खोलींत राहूं लागले. या उभयतांचे नाशिकपासूनचे स्नेही श्री. हरि अनंत थत्ते ( सध्यां दादरला रहात असलेले सॉलिसिटर ) यांना या दोघांनीं एकदां टर्मची फी भरण्यासाठीं ३९ रुपये उसने दिले. दोघांनींहि आपल्या दैनंदिनींत ही गोष्ट लिहिली नाहीं. महिन्याच्या शेवटीं तूट पडूं लागली तेव्हां या दोघांपैकीं प्रत्येकानें १९॥ रुपये सोसण्याचें ठरविलें व हिशेब पुरा करून टाकला! श्री. थत्ते यांनीं पैसे परत आणून दिले तेव्हां दोघांनाहि त्यांची चूक कळली.

सावरकर कॉलेजच्या वसतिगृहांत राहूं लागले तेव्हांपासून त्यांच्याभोंवतीं त्यांचा स्वतंत्र मित्रपरिवार गोळा होऊं लागला व हा परिवार पुढेंपुढें तर चांगलाच वाढला. श्री. भट व थत्ते ही जोडी ' सावरकर-कँप 'मध्यें प्रमुख होती. सध्यां बडोदें येथें अस-लेले प्रसिद्ध वकील व साहित्यिक श्री. दाजी नागेश आपटे, जुन्नरचे वकील श्री. ग. वा. जोगळेकर, सध्यां सोलापूर येथें असलेले ठेकेदार श्री. ग. वि. रानडे व सोला-पूरचे वकील श्री. मोहोळकर प्रभृति मंडळी त्या वेळच्या आठवणी सांगण्याला सुदै-वानें आपल्यामध्यें आहेत. लोकमान्य टिळकांचे दिवंगत चिरंजीव विश्वनाथपंत, प्रो. शि. म. परांजपे यांचे दिवंगत चिरंजीव कृ. शि. परांजपे, मुंबईचे कै. द. द्वा. तर्खडकर वगैरे या कँपांतली कांहीं मंडळी यापूर्वींच इहलोक सोडून गेली आहे ! वऱ्हा-डच्या हिंदुमहासभेचे पुढारी श्रीमंत बाबासाहेब खापर्डे हे या सुमारास पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत शिकत होते. त्यांची व सावरकर कँपमधील मंडळींची ओळख झाल्यावर, सावरकर व खापर्डे यांचीहि ओळख होण्याला फारसा काळ लागला नाहीं.

१९०२ च्या जानेवारी महिन्यांत कॉलेजमध्यें नांव दाखल केल्यावर सावरकर हे वसतिगृहांत राहूं लागले व त्यांनीं आपल्या जेवणाखाण्याची व्यवस्था पहिल्या क्लबचें सदस्यत्व पत्करून लावून टाकिली. १९०२ च्या सप्टेंबरच्या सुमारास या क्लबची व्यवस्था सावरकर यांच्या हातीं असावी, असें दिसतें. या क्लबचें एक हस्तलिखित मासिक चालविण्यांत येत असे. फर्ग्युसन कॉलेजचें त्रैमासिक या वेळीं निघालें नसल्या-मुळें, सावरकर व त्यांच्या बरोबरीचे विद्यार्थी यांना आपले चांगलेचांगले लेख या हस्तलिखित मासिकांतच लिहावे लागत. पहिल्या क्लबची व्यवस्था सावरकरांकडे होती त्या अवधींत सावरकर यांनीं लिहिलेली एक कविता उपलब्ध आहे. गीति छंदांत रचलेल्या २८ ओळींच्या या कवितेंत कवीनें एका ठिकाणीं या हस्तलिखित मासिकाच्या लेखक वर्गाचा उल्लेख केला असून, आपण आपल्या वाचकांची सेवा अढळपणें केली असल्याचें समाधानहि त्यानें व्यक्त केलें आहे. सावरकरांचे त्या वेळचे सह-कारी या ओळी मोठ्या प्रेमभरानें वाचतील, अशी प्रस्तुत लेखकाची कल्पना आहे :-

'गणपति' ला 'श्रीकृष्णा' 'मोहनिराजा'स 'विश्वनाथा'ला।
माझ्या लेखकवृंदा शिव दे मागेन विश्वनाथाला ॥
पुनरपि निर्मलहृदयें वाचकवृंदासि हें असो नमन।
सेवेपासुनि ज्यांच्या सत्यचि ढळलें कदापि हें न मन ॥

या कवितेचा रचनाकाळ २१–९–०२ असा आहे. यानंतर लौकरच सावरकर यांनीं पहिला क्लब सोडला व ते चौथ्या क्लबांत जाऊं लागले. सावरकरांना हें स्थानांतर कां करावें लागलें हें धारवाडचे श्री. व्यंकटराव अलूर यांच्या शब्दांत सांगणें शक्य आहे. श्री. अलूर लिहितात :

Mr. Savarkar had some differences with his Marathi friends. So he approached me as the Superintendent of the fourth club for taking him and his friends into my club. I took them in. Since then, we became intimate friends and we have remained so to this day. *

(सावरकरांचा त्यांच्या महाराष्ट्रीय मित्रांशीं कांहीं बेबनाव झाला. मी चौथ्या क्लबचा सुपरिंटेंडेंट होतों; म्हणून सावरकर मजकडे आले. सावरकरांचें म्हणणें मान्य करून मी त्यांना व त्यांच्या मित्रांना चौथ्या क्लबांत प्रविष्ट करून घेतलें. तेव्हांपासून आम्ही जिवाभावाचे मित्र बनलों व ही मैत्री आजवर कायम राहिली आहे.)

सावरकरांनीं पहिला क्लब सोडला व ते चौथ्या क्लबांत गेले ही घटना १९०२ च्या ऑक्टोबरच्या सुरुवातीस घडली असावी. कारण, चौथ्या क्लबच्या मंडळींच्या आग्रहावरून १०–१०–०२ रोजीं सावरकरांनीं पांच मिनिटांत रचलेल्या पुढील पद्यपंक्ती उपलब्ध आहेत :

अन्यायासहि ये जगीं जय जईं धैर्या धरोनी तदा।
जे न्यायाप्रति रक्षण्यासि धजती सोसोनिही आपदा ॥
ऐशा धन्य नराग्रणींसह घडे आम्हांप्रती संग हा।
झालों धन्य अम्ही सुनन्दयुतही, झाली दिवाळी पहा ॥

महाराष्ट्रीय मंडळींशीं सावरकरांचा बेबनाव झाला असें श्री. अलूर यांनीं म्हटलें आहे तें बरोबर आहे. या बेबनावाची हकीकतहि मोठी मनोरंजक आहे. या वर्षीतल्या विजयादशमीच्या दिवशीं पहिल्या क्लबांतील मंडळींचें भोजन चाललें होतें. यापूर्वी थोडे दिवस क्लबांतलि एक सदस्य श्री. मोहनीराज प्रधान यांनीं एक कविता लिहिली होती. सागरतरणाचें साधन म्हणून श्री. प्रधान यांनीं भोंपळयांचा उल्लेख केला होता. सावरकरांना हें आवडलें नाहीं व 'सागरतरणाचें साधन भोंपळा कीं बाहुबल' असा वाद जेवतांजेवतां जोरावला. वादविवाद होतां होतां सावरकरांच्या

* The Histoty of the Deccan Education Society : Part II : Pages 162--63.

अंगांत अभिनिवेश संचरला व पानावरून उठून, प्रधानांच्या पानासमोर जेठा मारून, त्यांनीं आपलें म्हणणें प्रधानांच्या गळीं उतरविण्याचा प्रयत्न केला. या अतिप्रसंगाची कागाळी प्रि. परांजपे यांच्यापर्यंत पोंचविण्यांत आली. सावरकरांनीं हस्तलिखित मासिकांत लिहिलेला एक जळजळीत लेखहि या निमित्तानें प्रिं. परांजपे यांच्या अवलोकनांत आला. त्यानीं कॉलेजांतले ज्येष्ठ विद्यार्थी या नात्यानें श्री. माधवराव भिडे ( नुक्तेच सेवानिवृत्त झालेले पंजाब हायकोर्टाचे न्यायमूर्ति भिडे ) व श्री. रामभाऊ कानिटकर ( वऱ्हाडमधील बुलढाणा येथील वकील व टिळकपक्षाचे एक निष्ठावंत नेते ) या उभयतांची पंच म्हणून योजना केली. ही चौकशी चालली असतांनाच सावरकर हे पहिला क्लब सोडून चौथ्या क्लबांत गेले, असें दिसतें.

सावरकर–कँप पहिल्यापासूनच चांगला संघटित होता व आपल्या कँपचें संख्याबळ वाढविण्याचे या गटाचे प्रयत्न सतत चालू होते. या कँपचा जीवनक्रम काटेकोर शिस्तींत वागणाऱ्या विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें जरा स्वच्छंदीपणाचाच ठरण्यासारखा होता. ही मंडळी सावरकर–कँपमधल्या कोणातरी सदस्याच्या खोलींत रात्रीं गप्पा मारायला बसली कीं, त्या गप्पांना कांहीं मर्यादाच रहात नसे. किती वेळ बोलत बसावें व किती मोठ्यानें बोलावें याला कांहीं सुमारच राहात नसल्यामुळें, गप्पा मारणाऱ्या या मंडळींना ' अविदितगतयामा रात्रिरेवव्यरंसीत् ' हा अनुभव अनेक वेळां येत असे. या मंडळींचा गलका फारच अनावर झाला म्हणजे श्री. रामभाऊ कानिटकरांसारख्या ज्येष्ठ विद्यार्थ्याला क्वचित् ' घस्त ' घालीत खोलीपर्यंत येणें भाग पडत असे व गप्पा आंवरण्याबद्दलची—निदान, त्या गप्पांतला आवेश आंवरण्याबद्दलची—सौम्य सूचना देण्याचें कर्तव्य त्यांना पार पाडावें लागत असे. गप्पांचा ओघ निर्झराच्या गतीप्रमाणें स्वच्छंदपणें चालला पाहिजे, असा या गप्पीदासांचा कटाक्ष असे. कोणी ओढूनताणून विनोद करीत आहे असें वाटलें अगर कोणी आपल्याच बोलण्याचें चऱ्हाट लांबवीत आहे असें वाटलें कीं, उरलेली मंडळी एकदिलानें त्याची खोडकी जिरविण्याला चुकत नसत !

वसतिगृहांत मित्रपरिवारासह होणाऱ्या या वादविवादांप्रमाणेंच सावरकरांचें वादविवाद करण्याचें आणखीहि एक ठिकाण होतें. तें ठिकाण म्हणजे शनिवारवाड्यासेमार नदीशेजारीं असलेला कोनकरांचा वाडा. ' काळ ' कर्ते प्रो. शि. म. परांजपे हे या काळांत त्या वाड्यात रहात असत. म्हसकरांच्यामुळें सावरकरांची पुण्यांत आल्यावर थोड्याच दिवसांत ' काळ ' कर्त्यांशीं ओळख झाली. ' काळ ' कर्त्यांचे चिरंजीव कै. कृष्णाजीपंत हे जवळजवळ सावरकरांच्याच वयाचे ! कॉलेजमध्यें त्यांचा व सावरकरांचा स्नेह जमला. सावरकरांची उद्योगप्रियता व बुद्धिमत्ता यांचें प्रो० परांजपे यांना कौतुक वाटूं लागलें व सावरकरांच्या कविता मधूनमधून 'काळ' पत्रांत प्रसिद्ध होऊं लागल्या अगर 'काळ'कर्त्यांच्या अवलोकनांत येऊं लागल्या; यामुळें सावरकरांचें परांजपे यांच्याकडे जाणें येणें वाढूं लागलें. त्या वेळीं ' काळ '

पत्रांत स्वातंत्र्यभावनेला चेतना देणारे जे लेख प्रसिद्ध होत असत त्यांच्या मोहनींत गुंगलेले सावरकर व आपल्या ठाकाठिकीच्या व विद्वत्तापूर्ण संभाषणानें सावरकरांच्या क्रांतिप्रवण मनाला उत्तेजित करणारे परांजपे यांचे संवाद प्रसंगीं रात्ररात्रहि चालत असत, अशी ऐकीव माहिती प्रस्तुत लेखकाला परांजपे यांच्या घरांतून मिळालेली आहे. पुण्यांत आल्यावर कांहीं दिवसांनीं सावरकर विंचूरकरांच्या वाड्यांत राहणाऱ्या लोकमान्य टिळकांकडेहि जाऊंयेऊं लागले. पण, परांजपे यांच्या मानानें टिळकांच्या मागें व्याप अधिक ! त्यांतच, ताईमहाराज प्रकरणाचें लफडें टिळकांना या सुमारासच सतावूं लागलें. त्यामुळें, सावरकरांचें टिळक यांच्यापाशीं तासन् तास संभाषण होण्याचा फारसा संभव नव्हता. होतकरू तरुणांचा पाठिराखा म्हणून प्रसिद्ध असलेला पुढारी या नात्यानें सावरकर टिळकांकडे प्रसंगविशेषीं जात असत व तरुणांच्या तांड्यांतला एक तडफदार व तेजस्वी कार्यकर्ता या दृष्टीनें टिळकहि सावरकरांकडे पाहात असत.

अशा प्रासंगिक वादविवादांखेरीज सावरकरांचा वेळ त्यांच्या मंडळींच्या साप्ताहिक बैठकींतहि जात असे. पाऊस असला तर ह्या बैठकी वसतिगृहांतच होत असत. एरवीं या बैठकी बाहेर होत असत. फर्ग्युसन कॉलेजच्या जिमखान्याच्या मागील टेकडींत जी एक भली थोरली घळ आहे त्या घळींत सावरकर—कँपच्या पुष्कळ बैठकी होत असत, अशी माहिती मिळते. कित्येक वेळां पर्वतीच्या मागच्या पठारावरहि या बैठकींचें काम चाले, असें समजतें. डेक्कन कॉलेजच्या वसतिगृहांतहि सावरकरांच्या विचाराचे तरुण रहात होते. तिकडेहि सावरकरांचा संचार केव्हां केव्हां होत असे. कांहीं गुप्त बैठकी डेक्कन कॉलेजांतहि झाल्या असतील, असा संभव आहे. गांवांत होणाऱ्या विशेष प्रसंगांकडेहि सावरकर व त्यांच्या बरोबरचे तरुण यांचें लक्ष असे. ताईमहाराजप्रकरणांत टिळकांवर भरण्यांत आलेला खटला ऐकण्यासाठीं सावरकरप्रभृति तरुण मंडळी एकदां कोर्टात गेली होती. त्या वेळीं घडलेल्या एका प्रसंगाचें वर्णन सावरकर यांचे सहाध्यायी सोलापूरचे श्री. गणेश विष्णु रानडे यांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे :

*कोर्टाचा शिपाई आम्हांस आंत सोडीना. आम्ही व इतर लोक तसेच कोर्टाचे हॉलबाहेर राहिलों. सावरकर यांना हें पसंत पडलें नाहीं. दरवाजांत उभा राहून आम्हांस अडविणाऱ्या शिपायाच्या अंगावरून, त्यास चक्क बाजूस सारून सावरकर आंत गेले. नाझर यांस भेटून, 'आम्ही केवळ खटला ऐकण्यास आलों, आम्ही गडबड करणार नाहीं, आम्हांला आंत सोडलेंच पाहिजे', वगैरे मोठमोठ्यानें बोलून, त्यांनीं नाझरकडून सर्वांना प्रवेश मिळविला.*

कॉलेजमधील साऱ्या घडामोडींत सावरकर पुढाकार घेत असत. ज्या North-wing Aristocracy चा उल्लेख यापूर्वीं करण्यांत आला आहे त्या कंपूविरुद्ध तक्रार करून सावरकर यांनीं ती तक्रार थेट प्रिन्सिपल परांजपे यांच्यापर्यंत पोंचविली होती,

अशी माहिती श्री. रानडे यांनीं लिहून धाडली आहे. कोणत्या तरी तक्रारीचा परिहार करून घेण्याला प्रवृत्त झालेल्या कांहीं विद्यार्थ्यांनीं फर्ग्युसन कॉलेजच्या वसतिगृहांतल्या खुर्च्या व खाटा खालीं चौकांत भिरकावून दिल्या होत्या, अशी आठवण[1] श्री. राम-भाऊ कानिटकर यांनीं नमूद करून ठेविली आहे. या बंडांत सावरकरांचें अंग नसेल, असें म्हणवत नाहीं. कॉलेजच्या जिमखान्याच्या वार्षिक निवडणुकींत वरच्या वर्गांतल्याच विद्यार्थ्यांची वर्णी लागावयाची, असा क्रम ठरलेला होता. हा क्रम बंद व्हावा व खालच्या वर्गांतल्या चांगल्या क्रीडापटूंना जिमखान्याच्या कारभारांतलीं अधिकारपदें मिळावीं, यासाठीं सावरकरानीं खूप खटपट केली व तिला शेवटीं यशहि आलें; अशी माहिती मिळते. सावरकरांच्या फर्ग्युसन कॉलेजमधील चार वर्षांच्या अध्ययन-काळांत जीं वार्षिक संमेलनें झालीं त्यांतल्या दोन संमेलनप्रसंगीं झालेल्या नाट्यप्रयोगांत सावरकरांनीं रंगभूमीवर कामें केलीं, अशीहि माहिती मिळते. १९०२ सालीं जानेवारी महिन्यांत सावरकर कॉलेजांत दाखल झाले. त्यानंतर दोनच महिन्यांनीं ' त्राटिका ' नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. या प्रयोगांत सावरकरांनीं केलेली भूमिका विशेष महत्त्वाची नसावी. हा प्रयोग चांगला वठल्यामुळें, कॉलेज जिमखान्याच्या मदतीसाठीं तो थिएटरांत फिरून करावा असें ठरलें व त्याप्रमाणें दि. १०–४–१९०२ रोजीं आर्यभूषण थिएटरांत हा प्रयोग यशस्वी रीतीनें करून दाखविण्यांत आला. १९०४ सालीं संमेलनप्रसंगीं ' अथेल्लो ' नाटकाची मराठी प्रतिकृति ' झुंझारराव ' ही बसविण्यांत आली होती. या प्रयोगांत सावरकर यांनीं आयागो या खलनायकाचें काम केलें होतें व तें फार चांगलें वठलें, अशी माहिती मिळते.

सावरकर अशा अनेक भानगडींत गढलेले असत हें खरें असलें तरी, कांहीं गोष्टी नियमानें करण्याबद्दल त्यांचा विशेष कटाक्ष होता. तालमींत जाऊन नियमितपणें व्यायाम करण्याचा सावरकरांचा क्रम कधीं ढळला नाहीं. ते दररोज ३०० जोर व ३०० बैठका काढीत असत, अशी माहिती डॉ. वि. म. भट यांनीं पुरविली आहे. पुढेंपुढें ते डंबेल्सहि करीत, असें श्री. गणपतराव जोगळेकर यांचें म्हणणें आहे. मैदानी खेळांपैकीं फूटबॉल हा खेळ त्यांना कांहींसा आवडे व क्वचित् ते या खेळांत सामिल होत. क्रिकेटचा त्यांना फारसा नाद नव्हताच, असें दिसतें. क्रांतिकारकाच्या जविनाला अवश्य म्हणून नाशिकला ज्याप्रमाणें त्यांनीं पोहणें, भिंती चढणें वगैरे गोष्टींचा सराव केला, त्याप्रमाणें, पुणें येथें असतांना, डोंगर चढून जाणें, अव-घड ठिकाणें पाहून तेथून मुद्दाम चढण्याउतरण्याचा सराव करणें इत्यादि गोष्टी त्यांनीं साध्य करून घेतल्या. सावरकरांच्या पायांच्या मानानें त्यांची छाती, दंड वगैरे भर-लेले दिसत, असें श्री. गणपतराव जोगळेकर यांचें म्हणणें आहे. डंबेल्सच्या व्याया-माचा हा परिणाम होय, असें श्री. जोगळेकर यांचें मत आहे.

---

1 The History of the Deccan Education Society: Part II : P. 151.

नाशिक येथील क्रम तसाच पुढें चालू ठेवून सावरकर यांनीं या चार वर्षांत आपल्या शारीरिक विकासाकडे ज्याप्रमाणें लक्ष दिलें त्याप्रमाणेंच या काळांत त्यांनीं स्वतःच्या बौद्धिक विकासाकडेहि चांगलेंच लक्ष पुरविलें. संध्याकाळचे वेळीं इतर मंडळी कांहींशा रिकामटेकडेपणानें फिरावयास जात. पण सावरकरांच्या वेळापत्रकांत ही वेळ अवांतर वाचनासाठीं राखून ठेवलेली असे. आणि, कॉलेजच्या वसतिगृहांत राहणाऱ्या सावरकरांसारख्या गोष्टीवेल्हाळ आणि समाजप्रिय तरुणानें अशा आडवेळांत अवांतर वाचन केलें नाहीं तर, वाचनाच्या द्वारा मनोविकास साधण्याला त्याला फुरसतच मिळावयाची नाहीं ही गोष्ट वसतिगृहांतल्या जीवनाची ओळख असणाऱ्या कोणाहि गृहस्थाला कबूल करावी लागेल. या अवांतर वाचनांत वृत्तपत्रीय वाचनाला स्थान मिळत असे हें उघडच आहे. पण, याशिवाय कित्येक भारदस्त ग्रंथांचें वाचनहि सावरकर यांनीं या काळांतच केलें. दाभोळकर यांच्या मालेंत प्रसिद्ध झालेले पुष्कळसे भाषांतरित ग्रंथ त्यांनीं या काळांत वाचून काढले. रावसाहेब सरदेसाई यांच्या भारतीय इतिहासावरील रियासती या सुमारासच प्रसिद्ध होऊं लागलेल्या होत्या. त्यांचाहि अभ्यास सावरकरांनीं करून टाकला. कांहीं इंग्लिश व संस्कृत महाकाव्यांचें अध्ययनहि सावरकर यांनीं या चार वर्षांत केलें असलें पाहिजे; कारण ' रामायण व ईलियड ' हा सावरकर यांनीं लिहिलेला निबंध कै. प्रो. वासुदेवराव पटवर्धन यांच्या अवलोकनांत आला होता व त्यांनीं तो निबंध लिहिणाऱ्या सावरकरांची मुक्तकंठानें स्तुति केली होती, अशी माहिती डॉ. वि. म. भट यांनीं प्रस्तुत लेखकाला पुरविली आहे. मेकॉलेचे निबंध व इतिहास यांचेंहि अध्ययन सावरकरांनीं या काळांत केलें. सावरकर यांनीं चालविलेल्या या मनमुराद अवांतर वाचनाची छाप त्यांच्या वक्तृत्वावर पडल्यावाचून राहत नसे. इटलीच्या इतिहासावर सावरकर यांनीं कॉलेजच्या वादसभेंत एक व्याख्यान दिलें. या प्रसंगीं प्रि. बैजनाथ काशिनाथ राजवाडे हे अध्यक्ष होते. व्याख्यानांतील माहिती ऐकून त्यांना कौतुकच वाटलें. पण, व्याख्यानाच्या विषयाचा प्रचलित देशी राजकारणाशीं जोडण्यांत आलेला संबंध त्यांना रुचला नाहीं. यापुढें कॉलेजच्या आवारांत अशीं व्याख्यानें झालेलीं मला खपणार नाहींत असें त्यांनीं या प्रसंगीं बजावलें, अशी माहिती नागपूरच्या 'महाराष्ट्र'चे संपादक श्री. गोपाळराव ओगले यांनीं प्रस्तुत लेखकाला सांगितली. अवांतर वाचनाच्या योगानें सावरकरांचे या वेळचे विचार किती भारदस्त बनले होते व त्यांची भाषा कशी प्रौढ बनली होती हें आणखीहि एका उदाहरणावरून दिसून येतें. भोपटकरबंधूंनीं १९०५ सालीं 'भाला' पत्र सुरू केल्यावर त्यांत ' राष्ट्रीय सप्तपदी ' या नांवाचा एक लेख आला होता. हा लेख प्रसिद्ध होण्यापूर्वीं कांहीं दिवस, सावरकर यांनीं फर्ग्युसन कॉलेजमध्यें नेमकें याच विषयावर अतिशय बोधप्रद व स्फूर्तिदायक व्याख्यान दिलें होतें. 'भाला' पत्रांतील लेख व सावरकरांचें व्याख्यान यांच्यामधील साम्य केवळ काकतालीय न्यायानेंच जुळलें असेल, हेंहि शक्य आहे. हें मान्य केल्यावरहि असें म्हणणें प्राप्त

ठरतें कीं एका भारदस्त वृत्तपत्राच्या संपादकाला शोभेल इतकें भाषावैभव, विचार-वैभव व कल्पनावैभव सावरकर यांनीं या काळांत संपादिलें होतें.

इतके विविध प्रकारचे खटाटोप करणाऱ्या सावरकरांना कॉलेजांतल्या मामुली अभ्यासाकडे वेळापत्रकी पद्धतीनें लक्ष देतां येत नसे, हें सांगण्याचेंहि कारण नाहीं. त्या वेळच्या सर्वसामान्य विद्यार्थ्यांच्या अभ्यासांत व्यत्यय आणणाऱ्या प्लेगनेंहि या अवधींत पुण्याला चांगलाच प्रसाद दिल्यामुळें, सावरकरांचें वर्गातील अभ्यासाकडे विशेषच दुर्लक्ष होई. सप्टेंबर महिन्यांत प्लेगचा प्रारंभ व्हावा आणि फेब्रुवारीपर्यंत त्याची लांबण लागावी हा त्या काळीं पुण्याच्या जीवनांतील सामान्य शिरस्ताच होऊन गेला होता. फेब्रुवारी महिन्यांत कॉलेज सुरू झालें कीं मार्चच्या अखेरीस होणाऱ्या वार्षिक संमेलनाची गडबड सुरू होई; आणि त्याची निरवानिरव झाली कीं, उन्हाळ्याच्या सुट्टीचा वेध लागे. पहिली सहामाही अशा रीतीनें निंघून गेल्यावर, परीक्षेच्या अभ्यासासाठीं खरोखर उरणारा वेळ म्हणजे जुलै ते सप्टेंबर एवढाच! त्या काळीं मुंबई विद्यापीठाच्या परीक्षा सध्यांप्रमाणें उन्हाळ्यांत होत नसत. ऑक्टोबर-नोव्हेंबरच्या सुमारास परीक्षा व्हावयाच्या आणि डिसेंबरमध्यें परीक्षेचे निकाल लागावयाचे ही आरोग्यप्रद पद्धत त्या काळीं रूढ होती. सध्यां कॉलेजमधील विद्यार्थ्यांना विद्यापीठाच्या परीक्षेस बसण्यापूर्वीं उपान्त्य परीक्षेला तोंड द्यावें लागत नाहीं. त्या काळीं कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्यामागें उपान्त्य परीक्षेचा लकडा असे! उपान्त्य परीक्षेपर्यंत त्या परीक्षेंत अडकून न पडण्याइतकी तयारी करावयाची व पुढील महिनाभरांत खूप अभ्यास करून विद्यापीठाच्या परीक्षेंतहि उत्तीर्ण व्हावयाचें हें व्रत सावरकरांनीं चारहि वर्षें पुरें केलें. इंटरची परीक्षा पास झाल्यानंतर त्यांनीं पुण्यांत फर्स्ट एल्‌एल्. बी. च्या टर्म्स भरल्या व १९०४ सालच्या अखेरीस ते या परीक्षेंतहि 'पास' झाले.

बाकीचे सर्व उद्योग साधून परीक्षेपुरता अभ्यासहि पुरा करावयाचा हें व्रत सांभाळतांना सावरकर व त्यांच्यासारखे इतर विद्यार्थी यांची किती त्रेधा उडत असे याचें डॉ. वि. म. भट यांनीं केलेलें वर्णन फारच बहारीचें असल्यामुळें, तें जसेंच्या तसेंच उद्‌धृत करणें श्रेयस्कर ठरणार आहे. डॉ. भट लिहितात :

*कॉलेजमध्यें पहिली टर्म बहुतेक गॅदरिंग, नाटक, सभासंमेलनें, गप्पासप्पा आणि उरलीसुरली प्लेगचा ससेमिरा यांतच खलास होत असे. दुसऱ्या टर्मला मग अभ्यासाचा विचार! पण, मग त्या तीनचार महिन्यांत दुप्पट वेळ अभ्यासाला द्यावा लागे... सर्व अभ्यास उरकावयास जे वर्षांतले हजार-अकराशें तास लागावयाचे ते सर्व मग दुसऱ्या टर्मच्या ३–४ महिन्यांत कोंबावयाचे! मग काय विचारतां! रोज बारा ते चौदा तासहि बैठक मारून अभ्यास पुरा करावा लागे. अर्थात् इतके तास अभ्यास करावयाचा म्हणजे कॉलेजच्या कांहीं तासांना गचांडी द्यावी लागे. आणि तें अपरिहार्यहि होतें. कारण, पहिल्या टर्ममध्यें झालेल्या अभ्यासाचे पुढें अध्यापक जाणार व आम्ही तर पहिल्या*

*पासूनच सुरवात करणार ! या ससा-कांसवांची गांठ प्रिलिमिनरीच्या वेळीं पडली म्हणजे भाग्य !*

*वर्गातल्या हजेरीची ही टाळाटाळी पुष्कळ वेळां प्राध्यापकांच्या ध्यानांत येई आणि आमच्यासारख्या चुकारतट्टूंना हुडकण्यास ते अचानक रेसिडेन्सीमध्यें अवतरत. मग कांहींतरी सबबी सांगून वेळ मारून न्यावी लागे. यावर युक्ति म्हणून कित्येक वेळां आम्ही खोलींत कोंडून घेत असूं व कोणाला तरी बाहेरून कुलूप लावावयास सांगून निवांत अभ्यास करीत असूं. कांहींवेळां कोणीतरी चुगली करी आणि तेंहि कपट उघडकीस येई ! आमचे त्या वेळचे प्रिन्सिपल सर अप्पासाहेब परांजपे यांनीं आम्हांला ३–४ वेळां तरी या चुकारतट्टूपणाबद्दल पकडलेलें मला आठवतें !*

१९०४ सालीं डिसेंबर महिन्याच्या उत्तरार्धात लागलेल्या फर्स्ट एल्एल्. बी. च्या निकालांत एकंदर १४६ विद्यार्थी उत्तीर्ण झाले. त्यांतला अवघा एकच विद्यार्थी पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाला. उरलेल्या १४५ विद्यार्थ्यांच्या मालिकेंत सावरकरांचें नांव आढळतें. परीक्षेला बसलेल्या २५४ विद्यार्थ्यांतले १४६ विद्यार्थी पास झाले ही गोष्ट लक्षांत ठेविली म्हणजे असें म्हणावें लागतें कीं, इतर अनेक भानगडींत गर्क झालेल्या सावरकरांनीं इतर परीक्षांच्या अभ्यासाप्रमाणेंच याहि परीक्षेचा अभ्यास इतपत सांभाळला, हेंहि त्यांना भूषणावहच आहे. फर्स्ट एल्एल्. बी. च्या टर्म्स त्या वेळीं पुण्यांत भरतां येत असत. त्या योजनेचा विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें उपयोग फारसा नव्हताच. संध्याकाळीं डेक्कन कॉलेजपर्यंत जाण्यायेण्याला लागणारा वेळ व्यर्थ घालविणें इतकाच त्या योजनेचा सामान्यतः अर्थ होता. सरकारी वकील श्री. व्यंकटराव हे व्याख्यान देत त्या वेळीं वर्गात काय चाले याचें डॉ. भट यांनीं केलेलें वर्णन पुढीलप्रमाणें आहे :

*बिचारे व्यंकटराव ! विद्यार्थी टवाळी करीत गप्पा मारीत बसतात हें त्यांना दिसत होतें. तरीहि, प्राप्त कर्तव्य म्हणून ते तोंडाची वटवट चालूच ठेवीत. विद्यार्थ्यांच्या या हूड वृत्तीवर त्यांनीं काढलेला तोडगा म्हणजे* **Roman Law** *आणि* **Jurisprudence** *या विषयांवर त्यांनीं काढलेल्या छापील टिप्पणी ! त्या ते दरवर्षी वाटीत आणि त्या घेतल्या म्हणजे व्यंकटरावांचीं भाषणें न ऐकलीं तरी चालत असे ! वर्षअखेर उपान्त्य परीक्षेचा फार्स होई. त्या वेळीं, हवीं तशीं चित्रें, रेघोट्या, कविता—काय हवा तो टारगटपणा विद्यार्थी पेपरवर करीत. तरीहि सर्व विद्यार्थी 'पास' समजून, व्यंकटराव सर्वांना फॉर्म देत !*

त्या वेळीं फर्ग्युसन कॉलेजांत जी प्राध्यापक मंडळी होती त्यांत रँग्लर परांजपे यांची योग्यता सर्वच दृष्टींनीं अद्वितीय होती. स्वार्थत्याग, बुद्धिमत्ता, खिलाडूपणा,

इत्यादि गुणसमुच्चयामुळें ते कॉलेजमधील छात्रवर्गाला प्रिय व आदरणीय वाटत. सावरकर-कँपमधील तरुणांपैकीं कित्येकांना अप्पासाहेबांच्या गणित या विषयाबद्दल जेमतेमच प्रेम असल्यामुळें, त्यांचा अप्पासाहेबांशीं विशेष निकट संबंध येत नसे. हें खरें असलें तरी, अप्पासाहेबांच्या मनाचा ओढा राजकारणांत नेमस्तपणाकडे आहे हें माहीत असूनहि, या मंडळींच्या मनांत त्यांच्याविषयीं आदरभाव वसत असे. गोखले यांच्या राजकीय विचारसरणीवर कडक हल्ले चढविण्याची सावरकरांची प्रवृत्ति वसतिगृहांतल्या कित्येक ज्येष्ठ विद्यार्थ्यांना आवडत नसे व त्यामुळें कित्येक वादप्रसंग चांगलेच गाजत असत. कै० वासुदेवराव पटवर्धन हे त्या वेळीं प्राध्यापक वर्गांत दाखल झालेले होते; पण, वासुदेवरावांनीं पुढेंपुढें इंग्रजी वाङ्मयाचे अध्यापक या नात्यानें जी लोकप्रियता संपादन केली ती या वेळीं त्यांच्या वांट्यास आलेली नव्हती. प्रि. वैजनाथ काशिनाथ राजवाडे यांच्या इंग्रजी विषयाच्या अध्यापनाचा, कै. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांच्या संस्कृत विषयाच्या अध्यापनाचा व कै. प्रो. भानू यांच्या इतिहास विषयावरील प्रेमाचा सावरकरांना बराच उपयोग झाला.

मुळांतच खूप लांब असलेल्या कॉलेजच्या सुट्या प्लेगमुळें अधिकच लांबल्या म्हणजे सावरकर भगूर--नाशिकला जात असत व मधूनमधून जव्हारलाहि जात असत. सावरकर कॉलेजमध्यें गेले त्यापूर्वींच त्यांच्या नाशिकच्या बिऱ्हाडाला राजकारणी अड्डयाचें स्वरूप आलेलें होतें. ते कॉलेजमध्यें गेल्यावर तर त्यांच्या बिऱ्हाडाचें हें स्वरूप चांगलेंच ठळक झालें. विशेषतः सावरकर सुट्टींत घरीं आले म्हणजे त्यांच्या घरांत मंडळींची जी दाटी होत असे ती लक्षांत घेऊन, लोक त्यांच्या घराला 'देशभक्तांची धर्मशाळा' म्हणून संबोधीत. १९०३ सालच्या मे महिन्यांत घरांत खूप मंडळी जमली होती व कांहीं घरगुती धार्मिक समारंभ ठरविण्यांत आलेला होता. या समारंभानिमित्त करावयाच्या खर्चाची योजना म्हणून बाबांनीं कांहीं पैसे उसनवार आणले होते. 'तात्याच्या दैवांत सर्व गोष्टी भाग्याच्या असल्यामुळें, या प्रसंगीं वाटणारी पैशांची नड कशी तरी निभेल' असा विश्वास त्यांना वाटत होता. समारंभासाठीं ठरविलेला दिवस अगदीं जवळ येऊन भिडला. बाबा उसन्या द्रव्यावर कशी तरी वेळ मारून नेत होते. इतक्यांत, कांहीं कल्पनाहि नसतां, वडिलांच्या मृत्यूपासून सरकारांत अडकून पडलेले वर्षासनाच्या नेमणुकीचे पांच वर्षांचे १४५ रुपये अचानक हातीं आले व समारंभानिमित्त व्हावयाच्या सर्व गोष्टी यथास्थित पार पडल्या. वर्षासनाचे पैसे आपल्याला मिळावे अशी खटपट बाबांनीं केलेली नव्हती. सरकारी कचेरींत असलेल्या सावरकरांच्या कोणा हितचिंतकानें ही खटपट परभारा केली व ती खटपट यशस्वी झाल्यामुळें, एका महत्त्वाच्या प्रसंगीं अवश्य तें द्रव्यसाहाय्य अचानकपणें मिळालें !

सुट्टींत सावरकर जव्हारला जात तेव्हां त्यांना मोठ्या थाटांत व वैभवांत ठेवण्याची दक्षता श्रीमंत भाऊराव चिपळूणकर घेत असत. सावरकरांच्या सासुबाई मनु-

ताई यांचाहि आपल्या या होतकरू जांवयावर मोठा लोभ होता. भाऊराव व मनुताई हीं उभयतां असेंच समजत कीं, आपल्या चार मुलांप्रमाणेंच तात्या हे आपले पांचवे चिरंजीवच आहेत. १९०५ च्या आरंभीं जव्हारचे राजे पतंगशहा मृत्यु पावले. त्यांचे चिरंजीव राजे कृष्णशहा यांना १९०५ च्या एप्रिल महिन्यांत अधिकारप्राप्ति झाली. त्या वेळीं जव्हार येथें जो समारंभ झाला त्याला सावरकर, त्यांची कुटुंबीय मंडळी व कांहीं मित्रमंडळी उपस्थित होती. जव्हारच्या मुक्कामांत सावरकर यांनीं केव्हां तरी अश्वारोहणाची विद्या हस्तगत करून घेण्याचा प्रयत्न केला असावा, असें त्यांच्या अप्रकाशित आत्मचरित्रावरून दिसतें. जव्हारच्या राजेसाहेबांना उद्देशून सावरकर यांनीं लिहिलेली एक कविता उपलब्ध आहे. साप्ताहिक 'काळ' पत्राच्या दि. ३–३–१९०५ च्या अंकांत 'विनायक' कवीची 'वृषोक्ति' ही कविता प्रसिद्ध झालेली आहे. घाट चढतांना दमून गेलेल्या बैलाकडे पाहून सुचलेले या कवितेंतले विचार सावरकरांना जव्हारला जातांना केव्हां तरी सुचले, एवढेंच या ठिकाणीं सांगून ठेवणें पुरेसें आहे.

कॉलेजमधील अध्ययनाच्या काळांत सावरकरांनीं काव्यरचना पुष्कळच केली. त्यांतली कांहीं कविता तात्कालिक प्रसिद्धीच्या अभावीं आज उपलब्ध होऊं शकत नाहीं व कांहीं कविता पुढें सरकारी रोषाला बळी पडल्यामुळें आज व्हावी तशी उपलब्ध होऊं शकत नाहीं. बोअर लोकांचे पुढारी क्रूगर हे दि. १४–४–१९०४ रोजीं मृत्यु पावल्यावर, सावरकर यांनीं त्यांच्यावर एक कविता पृथ्वी वृत्तांत रचिली होती. ही कविता फार सुंदर होती, असें डॉ. वि. म. भट यांनीं लिहून कळविलें आहे. क्लबच्या हस्तलिखित मासिकांतहि सावरकरांनीं पुष्कळच कविता लिहिल्या असल्या पाहिजेत. अशा कवितांपैकीं एका कवितेचा उल्लेख याच प्रकरणांत यापूर्वीं करण्यांत आलेला आहे. सावरकर फर्ग्युसन कॉलेजच्या ज्या क्लबांत होते त्या क्लबांत छत्रपति श्रीशिवाजी महाराज यांचें छायाचित्र लाविलेलें असे. दर शुक्रवारीं या प्रतिमेचें पूजन झाल्यावर, सामुदायिक रीत्या आरती म्हणण्याचा या क्लबांत दंडक पडला होता. ही आरती सावरकर–रचितच आहे :

**आर्यांच्या देशावरि म्लेंछांचा घाला । आला आला सावध हो शिवभूपाला ॥**
**सद्गदिता भूमाता दे तुज हांकेला । करुणारव भेदुनि तव हृदय न कां गेला? ॥**
**जयदेव जयदेव जयजय शिवराया । या या अनन्यशरणा आर्यां ताराया ॥**

२

**श्रीजगदंबा जीस्तव शुंभादिक भक्षी। दशमुख मर्दुनि जी श्रीरघुविर संरक्षी ॥**
**ती पूता भूमाता म्लेंछांहीं छळितां। तुजविण तिज शिवराया कोण दुजा त्राता॥**
**जयदेव जयदेव० ॥**

३

त्रस्त अम्ही दीन अम्ही शरण तुला आलों। परवशतेच्या पायीं मरणोन्मुख झालों
साधुपरित्राणा या दुष्कृतिनाशा या। भगवन् भगवद्गीता सार्थ कराया या ॥
जयदेव जयदेव० ॥

४

ऐकुनियां आर्यांचा धांवा महिवरला। करुणोक्तें स्वर्गी श्रीशिवनृप गहिंवरला॥
देशास्तव शिवनेरीं घेई जन्माला। देशास्तव रायगडीं ठेवी देहाला ॥
देशस्वातंत्र्याचा दाता जो झाला। बोला तत् श्रीमत् शिवनृपकी जय बोला ॥
जयदेव जयदेव० ॥

कॉलेजच्या क्लबांत म्हटली जाणारी ही श्रीशिवरायाची आरती १९०२ सालीं फेब्रुवारी-मार्च महिन्यांतच रचली गेली असावी. याच सालीं जुलै महिन्यांत सावरकर यांनीं लिहिलेली, 'विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें?' ही कविता साप्ताहिक 'काळ'च्या दि. १८ जुलै १९०२ च्या अंकांत 'पत्रव्यवहार' या सदरांत प्रसिद्ध झालेली आढळते. या कवितेचे एकंदर सहा श्लोक असून, त्या प्रत्येकाच्या शेवटीं 'विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें?' हा सूचक प्रश्न विचारण्यांत आला आहे. पारसीकांचें साम्राज्य, शिकंदराचें साम्राज्य, रोमचें साम्राज्य वगैरे साम्राज्यें उत्कर्षाच्या परमोच्च बिंदूपर्यंत पोहोंचून शेवटीं लयाला गेलीं हें ऐतिहासिक सत्य उदाहरणांसह सांगण्यासाठीं कवीनें या कवितेचे तीन श्लोक लिहिले आहेत. उत्कर्ष आणि अपकर्ष हा सृष्टीचा अबाधित नियमच आहे, हें सांगण्यासाठीं कवीनें पुढील श्लोक लिहिला आहे:

हा उन्नती-अवनतीस समुद्र जातो।
भास्वान् रवीहि उदयास्त अखंड घेतो ॥
उत्कर्ष आणि अपकर्ष समान केले।
विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें? ॥

या कवितेंतल्या शेवटच्या श्लोकांतल्या शब्दयोजनेंत कोणाहि व्यक्तीच्या नांवाचा उल्लेख नसला तरी, तत्कालीन परिस्थिति नजरेसमोर ठेवून तो श्लोक वाचणाराला असें वाटणें स्वाभाविक आहे कीं, ब्रिटिश साम्राज्याच्या सामर्थ्याच्या आणि ऐश्वर्याच्या जाणिवेमुळें उन्मत्त बनलेल्या कर्झनसारख्या दर्पांधाला या कवितेंत टोमणा मारलेला असून, अशा दर्पांधांच्या दडपशाहीमुळें लोकांनीं हताश होण्याचें कारण नाहीं असें आश्वासनहि कवीनें दिलें असावें. हा शेवटचा श्लोक पुढीलप्रमाणें आहे:

जे मत्त फाराचि बलान्वित गर्ववाही।
उद्विग्न-मानस निराशहि जे तयांहीं ॥

हें पाहिजे स्वमनिं चिंतन नित्य केलें ।
विश्वांत आजवरि शाश्वत काय झालें ?

सावरकर यांनीं १९०२ सालींच लिहिलेली दुसरी एक कविता त्या काळींच प्रसिद्ध झाल्यामुळें चांगल्या स्थितींत उपलब्ध आहे. ही कविता आर्यावृत्तांत लिहिलेली असून, तिच्या एकूण ओळी २०४ आहेत. मुंबईचे नामदार सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांनीं हिंदु युनियन क्लबाच्या हेमंत व्याख्यान कमिटीमार्फत एक बक्षिस लाविलें होतें. 'विधवांचीं दुःखें' या विषयावर लिहिलेल्या नवीन मराठी कवितांमध्यें जी कविता सर्वोत्तम ठरेल तिला रु. २० बक्षिस देण्यांत येतील असें जाहीर झाल्यामुळें, सावरकर ही कविता लिहिण्याला प्रवृत्त झाले. कमिटीकडे परीक्षणासाठीं १६ कविता आल्या. त्यांपैकीं, दापोलीचे श्री. श्रीपाद नारायण मुजुमदार, बी. ए. व सावरकर यांच्या कविता गुणदृष्ट्या समान आहेत असें परीक्षक-मंडळानें ठरविलें. मूळचें रु. २० चें बक्षिस या दोघांना विभागून देणें बरोबर दिसणार नाहीं असें समितीला वाटल्यावरून, समितीनें बक्षिसांच्या रकमेंत रु. १० ची भर घातली व श्री. मुजुमदार व सावरकर यांना प्रत्येकीं रु. १५ बक्षिस दिले. कोल्हापूरचे श्री. मुकुंद गणेश मिरजकर यांना कविता-लेखनाबद्दल बक्षीस देण्यांत आलें नाहीं हें खरें असलें तरी, समितीला त्यांचीहि कविता चांगली वाटली. 'विविधज्ञानविस्तार' या मुंबई येथील प्रसिद्ध मासिकाच्या १९०४ सालच्या पुस्तक ३४ मध्यें पृष्ठ ८२ ते ९४ वर या तीनहि कविता अनुक्रमानें प्रसिद्ध झाल्या आहेत. या कविता १९०४ सालीं प्रसिद्ध झाल्या असल्या तरी, त्यांचा लेखनकाल १९०२ च ठरतो; कारण, या बक्षिसांचा निकाल दि. ३-२-१९०३ च्या 'केसरी' ते जाहीर झालेला आढळतो.

'विधवांचीं दुःखें' या विषयावर कविता लिहितांना सावरकर यांनीं देशावर ओढवलेल्या प्लेगच्या आपत्तीपासून प्रारंभ केला आहे. मुंबईत पदार्पण केल्यापासून वर्षाभराच्या आंत प्लेगनें सगळा देश कसा पादाक्रांत केला हें सांगण्यासाठीं सावरकर यांनीं पुढील आर्या लिहिली आहे :

बहु काय वदों ? केलें एक्या अब्दांत देशपर्यटना ।
पवनाहुनि जवन, न दमला हा कीं विचित्र विधि-घटना ॥

प्लेगमध्यें पत्नी निवर्तल्यामुळें हताश झालेल्या तिच्या पतीचा आक्रोश, प्लेगनें आई-बापांना ओढून नेल्यामुळें पोरक्या बनलेल्या मुलांचें रोदन, इत्यादींचें वर्णन केल्यावर सावरकर यांनीं प्लेगांत पती निवर्तल्यामुळें असहाय बनलेल्या बालविधवेच्या दुःस्थितीच्या वर्णनाला आरंभ केला आहे. आपल्या आर्त हांकेला कोणी तरी 'ओ' द्यावी यासाठीं आतुर बनलेल्या या बालविधवेच्या भावनांना शब्दस्वरूप देतांना सावरकरांनीं पुढील ओळी लिहिल्या आहेत :

देतें का कोणी ओ अबलेच्या या मदीय हांकेला ।
बोला हो ! बोला हो ! धीराचा एक शब्द तरि बोला ॥

बालविधवेचा पदोपदीं होणारा अपमान, स्वकीय-परकीय अशा सगळ्यांकडून केला जाणारा तिचा तिरस्कार, वारंवार ऐकाव्या लागणाऱ्या कठोर शब्दांमुळें तिच्या मनावर होणारे आघात, इत्यादींचें वर्णन केल्यावर सावरकरांनीं दोनच ओळींत या अभागी बालविधवेच्या मूर्तीचें वर्णन केलें आहे, तें चांगलें उतरलें आहे :

नेत्र जलें डवडवले, कोमल मृदु गाल जाहले ओले; ।
गेले खोल कपोलहि, क्षयसूचक पांडुरत्व बहु आलें ।।

वयोज्येष्ठ विधुर व बालविधवा यांच्याकडे पाहण्याची समाजाची दृष्टि किती पंक्ति-प्रपंचाची व अन्यायाची आहे हें सुचविणाऱ्या पुढील ओळी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत :

साठीच्या जरठांनो ! विधुरांनो ! नववधू खुशाल वरा ! ।
लग्नाच्या अष्टदिनीं विधवा परि अन्य ना वरो नवरा ! ॥
हा न्याय कोण ? कां हो विधवा--विधुरांत भेद हा असला ? ।
कसल्या अपराधाचा अबलांना क्रूर दंड हा बसला ? ॥

हिंदु समाजांतल्या बालविधवांची दुःस्थिति पाहून अन्य समाजांना करुणा वाटते; पण, हिंदु समाजाला त्यांच्याबद्दल कांहीं वाटत नाहीं, ही स्थिति लज्जास्पद आहे; इतरांच्या बाबतींत सदय असणारीं शास्त्रें व रूढि यांनीं या अबलांच्या बाबतींत कायमचा कठोरपणा पत्करला आहे, इत्यादि मुद्दे मांडल्यावर कवीनें बालविधवांच्या वतीनें धर्मगुरूंना पुढील विनंति केली आहे.

ज्या दीन बालविधवा, द्या त्यांसि पुनर्विवाह-संमतिला ।
व्हा सदय-हृदय सकृप जें होइल मान्य सत्य सत्तातिला ॥

या बालविधवांच्या शिक्षणाची तरी व्यवस्था समाजानें आपलेपणानें केली पाहिजे असें कवीनें या कवितेच्या शेवटीं म्हटलें आहे.

राजकीय बाबतींत क्रांतिवादी असणारे सावरकर सामाजिक प्रश्नांचा विचारहि त्याच पद्धतीनें करीत असत. अन्याय म्हटला कीं त्याच्यावर तुटून पडावयाचें—मग तो अन्याय राजकीय असो वा सामाजिक असो—ही त्यांची वृत्ति होती, हें या कवितेवरून स्पष्ट होत आहे.

'स्वतंत्रतेचें स्तोत्र' ही कविता सावरकरांनीं १९०३ सालीं रचिली. या कवितेच्या ध्रुपदाचे दोन्ही चरण संस्कृत आहेत :

जयोऽस्तु ते श्रीमहन्मंगले ! शिवास्पदे शुभदे ।
स्वतंत्रते भगवति त्वामहं यशोयुतां वंदे ॥

या ध्रुपदाला अनुरूप असेंच स्वतंत्रतामाहात्म्य या कवितेच्या पूर्वार्धात वर्णिलेलें आहे :

मोक्ष--मुक्ति हीं तुझींच रूपें तुलाच वेदांतीं ।
स्वतंत्रते भगवती योगिजन परब्रह्म वदाति ॥
जें जें उत्तम उदात्त उन्नत महन्मधुर तें तें ।
स्वतंत्रते भगवती सर्व तव सहचारी होतें ॥

श्रीस्वतंत्रतादेवी अधम-रक्त-रंजित आहे, सुजनपूजित आहे वगैरे गोष्टी सांगून झाल्यावर कवीनें पुढील चरण लिहिले आहेत :

तुजसाठिं मरण तें जनन ।
तुजवीण जनन तें मरण ॥
तुज सकल चराचर शरण ।
भरतभूमिला दृढालिंगना कधिं देशिल वरदे !
स्वतंत्रते भगवति त्वामहं यशोयुतां वंदे ॥

आमची भारतमाता सर्वैश्वर्यसंपन्न असूनहि, तिला सोडून स्वतंत्रतादेवी इतरत्र कां गेली असा प्रश्न विचारणारा कवि लिहितो :

ही सकलश्रीसंयुता । आमुची माता । भारती असतां ।
कां तुवां ढकलुनी दिधली ।
पूर्वीची ममता सरली ।
परक्यांची दासी झाली ।
जीव तळमळे कां तूं त्यजिलें उत्तर याचें दे ।
स्वतंत्रते भगवति त्वामहं यशोयुतां वंदे ॥

‘ सिंहगडचा पोवाडा ’ व ‘ श्री बाजीप्रभु देशपांडे यांचा पोवाडा ’ हे दोन्ही पोवाडे सावरकरांनीं याच काळांत लिहिलेले असून एके काळीं ते अनेक तरुणांच्या तोंडीं खेळत असत. १९०४ सालीं सावरकर व त्यांचे कॉलेजमधील निकटवर्ती मित्र सिंहगडला गेले होते. सिंहगडावरील मुक्कामांत सावरकरांचें एक तेजस्वी भाषण झालें. ही मंडळी सिंहगडाहून परत आल्यावर त्यांनीं आपलें छायाचित्र काढून घेतलें तें सुदैवानें उपलब्ध आहे. ‘ सिंहगडचा पोवाडा ’ या सुमारासच केव्हां तरी रचला गेला असावा. १९०५ सालच्या मे महिन्यांत भगूर व नाशिक येथील श्रीशिवजयंत्युत्सवांत हा पोवाडा म्हटला गेला होता.[१] ‘ श्रीबाजीप्रभु देशपांडे यांचा पोवाडा ’ सिंहगडच्या पोवाड्यानंतर वर्षाभरानें लिहिला गेला असावा. १९०६ सालच्या मे

---

१ केसरी : २३-५-१९०५.

महिन्याच्या सुमारास हे दोन्ही पोवाडे अभिनव भारतमालेचीं क्रमांक १ व २ चीं पुष्पें म्हणून श्री. बाबा सावरकर यांनीं प्रसिद्ध केलीं.

सिंहगड व तानाजी हीं नांवें महाराष्ट्राच्या इतिहासांत जोडीनें अजरामर होऊन राहिलीं आहेत. कै. हरी नारायण आपटे यांनीं हीं अजरामर नांवें आपल्या 'गड आला, पण सिंह गेला' या कादंबरींत गोंवून टाकिलीं आहेत. तानाजीची योग्यता एका अर्थी श्रीशिवरायांच्या योग्यतेइतकीच थोर आहे असें सुचविण्यासाठीं कै. राम गणेश गडकरी यांनीं आपल्या 'महाराष्ट्र-गीतां'त

**रायरिचा तो करी रायगड जिजाउचा तान्हा ।**
**कोंढाण्याचा करी सिंहगड मालुसरा ताना ॥**

हे चरण लिहिले आहेत. 'धन्य शिवाजी तो रणगाजी, धन्यचि तानाजी' या ठसकेबाज चरणानें आरंभ होणाऱ्या पोवाडयांत सावरकरांनीं तानाजीचा पराक्रम व स्वार्थत्याग यांचें उद्दीपक वर्णन केलें आहे. पारतंत्र्याचा नाश करणारे छत्रपति शिवाजी महाराज व तानाजी यांचें नातें सूर्य व किरण यांच्या नात्यासारखें आहे हें सांगतांना या पोवाडयाच्या पहिल्या चौकाच्या शेवटीं कवीनें पुढील ओळी लिहिल्या आहेत :

**मग आर्यदेशतारणा । अधममारणा । कराया रणा ।**
**परदास्यराविनाशाला ।**
**शिवनेरीं श्रीमान् आला ।**
**स्वातंत्र्यसूर्य उदयाला ।**
**त्या सूर्याचा किरण रणांगणिं तळपे तानाजी ।**
**प्रेमें आजी सिंहगडाचा पोवाडा गा जी ॥**

आपल्या पराक्रमी पुत्रानें अनेक गड सर केले; पण, आतां त्याच्या पराक्रमाला जरा ढिलाई आलेली दिसते, कोंढाणा सर झालेला नसतांनाच ही ढिलाई येणें बरोबर नाहीं—हें ओळखून जिजामातेनें '**गड सर केल्याविण वरणें ना अन्न, शपथ तुजला**' अशी शिवबांना शपथ घातली. ह्याबद्दल जिजामातेला धन्यवाद देतांना कवि म्हणतो :

**धन्या, माता जिजा, तिलाची शिवबा सुत साजे ।**
**स्वतंत्र झाल्यावीण सुताला अन्नहि दे ना जे ॥**

तानाजीचा मुलगा रायाजी याच्या लग्नांत अगदीं 'सावधान' म्हणण्याचा समय प्राप्त झाला असतांना शिवरायाचा दूत मंडपांत आला. त्याबरोबर लग्नाच्या सर्व गोष्टी जागच्या जागीं थबकल्या :

**शिवराज-दूत पातले । हें लग्न राहुं द्या भलें । देशार्थ जनन आपुलें ।**
**लहानमोठा निघे मराठा पुढती तानाजी ।**
**प्रेमें आजी सिंहगडाचा पोवाडा गा जी ॥**

शिवराय-तानाजी भेटीचें वर्णन करणारा सहावा चौक पुढीलप्रमाणें आहे :

**परमात्म्याशीं जीवात्म्याची तन्मयता झाली ।**
**वायुकुमर कीं रघुविरचरणीं मिठी पुन्हां घाली ॥१॥**
**अरुणाचि कीं श्रीजगन्मित्रवर सूर्या आलिंगी ।**
**आलिंगी कीं तानाजी श्रीशिवरायालागीं ॥ २ ॥**
**भेट जाहली मसलत बसली राया धाडि मला ।**
**प्राणहि देइन, घेइन गड परि, तानाजी वदला ॥ ३ ॥**
**हें पर्व स्वातंत्र्याचें । शत्रुरुधिराचें । स्नान मज साचें**
**घडुं द्यावें हो शिवराया ॥**
**देशार्थ पडों द्या काया ।**
**जाईल ना तरी वांया ॥**
**अखेर निसटे शिवहस्तांतुनि तीराचि तानाजी । प्रेमें आजी० ॥**

मध्यरात्रीची वेळ साधून, सूर्याजीवर सगळी व्यवस्था सोंपवून, शत्रूकडून दुर्लक्षित असें एक स्थळ हेरून, तानाजी आपल्या तुकडीसह दरडीवरून चढून गेला व युद्धाची धुमश्चक्री सुरू झाली हें वर्णन १० व ११ या दोन चौकांत पुढीलप्रमाणें केलेलें आहे !

**दरड उभट बहु चढणें मुष्किल घोरपडीलाही ।**
**म्हणुनि पहारा जिथें गडावर मुळिं नव्हता कांहीं ॥ १ ॥**
**साधुनि संधी ही तानाजी तिथें नीट आला ।**
**सज्ज चढाया—नव्हे हवेमधिं उडण्याला झाला ॥ २ ॥**
**कुणि गुणगुणला पाय घसरतां अहा काय होई ।**
**वदे शूर देशार्थ मरोनि स्वर्गा तरि जाई !!! ॥ ३ ॥**
**यशवंती सरसर चढतां । हर्ष हो चित्ता । सोल घे हातां ॥**
**तानाजि चढूं लागले ।**
**सद्भाग्य चढूं लागलें ।**
**स्वातंत्र्य चढूं लागलें ।**
**सांभाळी रे म्लेंछा आला, आला तानाजी । प्रेमें आजी० ॥**

एकामागुनि एक मराठा सरसर वरि आला ।
दहा हजारावरि रिपु असुनिहि चढविति ते हल्ला ।। १ ।।
कोण कोठुनी किती आणती कसे कुठें लढती ।
न कळे अंधारीं रिपु अपसांमाधिं झुंजुनि पडती ।। २ ।।
खालीं वरतीं मागें पुढतीं आजूबाजूंनीं ।
सैरावैरा पळतां पाडिति भाला भोंसकुनी ।। ३ ।।
तो सर्व मराठा गडी । शत्रुचीं मढीं । हजारों पाडी ।
तुडवीत चिखल मांसाचा ।
पोहुनी पूर रक्ताचा
घेमार करित ये सांचा ।
कल्याणाचें दार कडाडे । झाली रे बाजी ।। प्रेमें आजी० ।।

तानाजी लढतां लढतां धारातीर्थीं पडला हें पाहतांच मराठ्यांचा धीर सुटला व ते रणांगणांतून पळ काढण्याचा बेत करूं लागले. त्याबरोबर, चवताळलेल्या सूर्याजीनें त्यांची निर्भर्त्सना केली. तो प्रसंग १३ व्या चौकांत पुढीलप्रमाणें वर्णिला आहे :

पडतां ताना आणि मराठे बघूनि हटतांना ।
सूर्याजीची सिंहगर्जना भय देते कर्णा ।। १ ।।
अरे चाललां कोठें सांगा सर्व मराठे हो ।
भाला ठेवा भरा बांगड्या मग पुढती जा हो ।। २ ।।
बाप मरोनि पडला तेथें तुमचा लढतांना ।
पळत जाउनी अवश्य नरकीं ढकलां पितरांना ।। ३ ।।
जाउं इच्छितां काय धरोनी आल्या दोराला ।
अहो पंढ तो दोर मघांची तुटोनियां गेला ।। ४ ।।
धिःकार शब्द ऊठले । पुन्हां उलटले । मराठी भाले ।
घनघोर युद्ध चाललें ।
वीरासि वीर तो भिडे ।
देशार्थ मराठा लढे ।
त्यांना घुटके वीररसाचे स्वतंत्रता पाजी ।। प्रेमें आजी० ।।

विश्वासघातकी उदयभानू आधींच मरून पडला होता म्हणून विजयी मराठ्यांनीं

त्याच्या रक्तीं भिजवुनि फडकें केला झेंडा तो ।
स्वातंत्र्याचा विजयध्वज तो अजुनि तिथें डुलतो ।।

मराठ्यांचा पक्ष विजयी झालेला पाहून तानाजीनें क्षीण स्वरांत हरहर केला व मग त्यानें आपले प्राण सोडले असें सांगितल्यावर, कवीनें शेवटचा चौक पुढील प्रमाणें लिहिला आहे :

मग त्या गडची भूमी ठेवी तानाजिसि उदरीं ।
तेव्हांपासुनि रत्नाकर बहु तीचा द्वेष करी ॥ १ ॥
स्वतंत्रतेच्या रणांत लढतां स्वतंत्रतेसाठीं ।
त्या पक्षाचा कैवारी श्रीमुरहर जगजेठी ॥ २ ॥
देशाला हो धर्माला हो स्वातंत्र्याला हो ।
बा तानाजी बा सूर्याजी शिवबा आला हो ॥ ३ ॥
धन्य मराठे पुनीत झाले अरिरुधिरस्नानें ।
आणि विनायक त्यांच्या निर्मल यशस्सुधापानें ॥ ४ ॥
असो समाप्ती छत्रपतींच्या सरस्वतीमाजी ।
'गड आला, परि सिंह्चालला अमुचा तानाजी' ॥ ५ ॥
प्रेमें आजी सिंहगडाचा पोवाडा गा जी

श्रीबाजीप्रभू देशपांडे यांच्यावरील पोवाड्याचे एकूण १९ चौक उपलब्ध असून या पोवाड्याच्या आरंभीं " स्वतंत्रता देवीचें स्तोत्र " या कवितेंतले संस्कृत चरण उद्धृत करण्यांत आले आहेत. स्वातंत्र्ययुद्धांत मरण पावल्यामुळे चिरंजीव झालेल्या चितुरगडच्या रजपूत स्त्रिया, राणा-प्रताप, तानाजी, संताजी, धनाजी, पानिपतचे रणझुंझार भाऊसाहेब पेशवे इत्यादींना या पोवाड्याच्या पहिल्या चौकांत आवाहन केलेलें आहे. छत्रपती शिवरायाचें स्वातंत्र्यकार्य करण्याला सगळे मावळे सिद्ध झालेले दिसले; पण, त्यांत बाजीप्रभू आढळले नाहींत, म्हणून शिवरायांनीं चौकशी चालविली. बाजीप्रभू प्रतिपक्षाच्या सेवेंत गुंतण्याच्या विचारांत आहेत असें कळतांच शिवरायाला उद्वेग वाटला व त्यानें आपले दूत बाजीप्रभूचें मन वळविण्यासाठीं रवाना केले. या दूतांनीं बाजीप्रभूचें मन वळवितांना जो कोटिक्रम मांडला तो पुढील चौकांत ग्रथित करण्यांत आलेला आहे :

बाजीराया म्लेंछ सबळ हा दोष न काळाचा ।
ना देवाचा, ना धर्माचा किंवा नशिबाचा ॥
देशद्रोही चांडाळांचा भरला बाजार ।
गुलामगिरि जे देती त्यांना निष्ठा विकणार ॥
तुम्हींच ना स्वातंत्र्य चिरियलें या पोटासाठीं ।
तुम्हींच ना रे भूमातेच्या नख दिधलें कंठीं ॥
हो सावध बाजीराया । दास्यिं कां काया । झिजाविशी वांया ।

तुज भगवान् श्रीशिवराजा ।
स्वातंत्र्यप्राप्तिच्या काजा ।
बोलावी तिकडे जा जा ।
देशभक्तिची सुधा पिउनि घे प्रायश्चित्ताला ।
चला घालुं स्वातंत्र्यसंगरीं रिपूवरी घाला ॥

हा कोटिक्रम ऐकून पश्चात्तप्त झालेल्या बाजीप्रभूंचें मन पालटलें व त्यांनीं दूतां हातीं पुढील निरोप श्रीशिवरायाकडे धाडला :

जा सांगा शिवभूपाला । अशा अधमाला । राजानिष्ठेला ।
त्वां आधीं शतशा चिरणें ।
तुजकरवीं घडतां मरणें ।
पावेन शुद्धि मग मानें ।
तुझ्या करींच्या तरवारीच्या घेइन जन्माला । चला घालुं० ॥

राजनिष्ठा, नोकरींतलें इमान इत्यादि कल्पना पार पालटल्यामुळें, बाजीप्रभूंनीं कोणते उद्‌गार काढले व त्यांचें तेज कसें तळपूं लागलें हें पुढील चरणांत वर्णिलें आहे :

मद्देशचि माझा राजा ।
तो प्राण देव तो माझा ।
मी शरण शिवा सांगा जा ।
राख उडाली प्रदीप्त बाजी वैश्वानर ठेला । चला घालुं ० ॥

अफझुलखानाच्या वधाचा सूड उगविण्यासाठीं त्याचा मुलगा फाझलखान हा शिवाजीवर चाल करून आला, शिवाजीला जिवंत धरण्याची प्रतिज्ञा करून तो निघाला, पन्हाळगडच्या वेढयांत त्यानें शिवाजीला कोंडलें इत्यादि हकीकत सांगितल्यावर, शिवाजी व बाजीप्रभू यांच्या संगनमतानें शत्रूला गुंगारा देण्याचें कारस्थान ठरलें, ही हकीकत सातव्या चौकांत सांगितलेली आहे. शत्रूकडे धाडण्यांत आलेल्या एका मावळ्यानें शत्रूला काय निरोप सांगितला व त्या निरोपानें शत्रूची दिशाभूल कशी केली यासंबंधींचें वर्णन पुढीलप्रमाणें आहे :

शिवाजि राजा जिवंत येतो तुमच्या गोटाला ।
उद्यां सकाळीं करुं गड खालीं कळवी तुम्हाला
ऐकुनी सिद्दि बहु फुगला ।
रिपूजन भुलला ।
परस्पर वदला ।
आजि खान खान खानाजी । हुए शिकस्त मराठे आजी ।
फिर लढ्ते क्योंकर आजी । चले शराब उडाये ताजी ॥

आप लेओजी, आप लेओजी । आप गाजि आप तो रणगाजी ।
झिंगाविला अरिसर्प फुंकुनी पुंगी गुंगाविला । चला घालुं० ॥

कृष्णपक्षांतल्या काळोखाचा पुरा फायदा घेऊन शिवबा व त्यांचे सहकारी यांनीं सिद्दीच्या हातावर तुरी दिल्या हें रास्तच झालें—यांत दूषणावह असें कांहींच झालें नाहीं—हें ठांसून सांगतांना कवीनें नवव्या चौकांत पुढील ओळी लिहिल्या आहेत :—

अब्रह्मण्यं यांत काय रे दोष कोणता तो ।
आला ठक ठकवाया उलटा भला ठकवि त्या तो ॥
साप विखारी देशजनानिचा ये घ्याया चावा ।
अवचित गांठुनि ठकवुनि भुलवुनि कसाहि ठेंचावा ॥

शिवरायांनीं आतां तडक सुरक्षित असलेल्या रांगण्यावर जावें असें सांगतांना बाजीप्रभूनीं कोणता कोटिक्रम लढविला व शिवरायांनीं त्यावर कोणतें उत्तर दिलें यांचें वर्णन करणारा दहावा चौक संस्मरणीय आहे :

पाया पडतो, हात जोडितो बाजि तुला राया ।
गड अवघड रांगणा तिथें तुम्हि जाणें या समया ।
राष्ट्रदेविचा हस्त कुशल तूं तरि लाखों भाले ॥
अम्हांसारखे भिळतिल चिरतिल चरचर रिपु सारे ।
[illegible] काय मी बाजि मृत्युमुखिं ढकलुनि तुम्हांला ॥
[illegible] वा जातिचा मराठा मृत्यूला भ्याला ?
[illegible] गड तुम्ही यशोदायिनी तोफा पांच करा ॥
[illegible] रि लढवूं गनीम अडवूं खिड करूं निकरा ।
[illegible] तूच शिवराया । कंस कपटा या । करुनियां वांया ।
स्वातंत्र्यकृष्णचिन्मूर्ती ।
[illegible] घेउनि अपुल्या हातीं ।
गडगोकुळांत नांदो ती ।
[illegible] शिव तों खिंडित दीन शब्द उठला । चला घालुं० ॥

बाजीप्रभूं [illegible] नूर संवगड्यानीं शत्रूच्या पहिल्या हल्ल्याला निकरानें तोंड दिलें व शत्रूल[illegible] डें. बाजीप्रभूंनीं रांगण्याकडे दृष्टि वळविली तेव्हां त्या गडाच्या वाटे[illegible] शिवरायांची मूर्ति त्यांना दिसली. शत्रूचा दुसरा हल्ला सुरू झाला. [illegible] किंचित् कच खातात असा भास झाला. बाजीप्रभूंनीं त्यांना चेतावणी [illegible] नें शत्रूवर तुटून पडले. त्यांनीं शत्रूला फिरून मागें पिटाळलें; पण [illegible] पुष्कळसे मराठे कामीं आले. शत्रूच्या तिसऱ्या हल्ल्याच्या वेळीं एक गोळ[illegible] आली व ती बाजीला मर्मीं लागली. तरी तो वीर कचरला नाहीं.

श्रीबाजी विव्हल पडला ।
मागुतीं तत्क्षणीं उठला ।
बेहोष वीरवर वदला ।
तोफेआधीं मरे न बाजी सांगा मृत्यूला । चला घालुं० ॥

माझ्या जखमेकडे लक्ष देऊं नका, शिवबांच्या तोफांचे आवाज ऐकूं येईपर्यंत निकरानें लढत रहा असा आदेश सैनिकांना देणाऱ्या बाजीप्रभूंचे प्राण कानांत गोळा झाले होते तरी, लढा चालू ठेवण्याची त्यांची तळमळ लवमात्र मंदावली नव्हती. बाजीप्रभूंच्या या स्थितीचें वर्णन करणारा पुढील चौक फार सुंदर आहे :

" काय वाजलें ? " "बाजीराया ! बार न गाडें झाला ।
शिळा कोसळे, पान, सळसळे, पक्षी ओरडला " ॥
लढा तरी मग चला वीरहो रणांत घुसलों भीं ।
रक्तें मढवूं, लढवुं खिंडीची तसूतसू भूमी ॥
शपथ तुम्हांला वृक्ष-पाक्षि-जल-शिला-तेज-वारे ।
आम्ही पडतां तोफेपूर्वी लढा तुम्ही सारे ॥
तों बार धडाधड झाले । प्राण परतले । हास्यमुख केलें ।
हा पहिला बार शिवबाचा ।
हा दुसरा निजधर्माचा ॥
हा तिसरा निजदेशाचा ।
हा चवथा कर्तव्याचा ।
बार पांचवा धडाडला हर बोला जय झाला । चला घालुं ॥

कृतकार्य झालेल्या बाजीप्रभूंना आपल्या रथांत घालून स्वतंत्रता भगवती निघाली तेव्हांचा देखावा कवीनें पुढीलप्रमाणें वर्णिला आहे :

गंधर्व तनन थैं करिती ।
दुंदुभी नभीं दुमदुमती ।
श्रीबाजी स्वर्गा जाती ।
करी चराचर विश्व बाजिच्या जयजयकाराला । चला घालुं० ॥

बाजी प्रभूंच्या रक्ताच्या अभिषेकानें पावनखिंड पावन झाली म्हणूनच पुढें रायगडावर स्वातंत्र्यवृक्षाची जोपासना शक्य झाली असें सांगून व अशा स्वातंत्र्य-प्रेमी व पराक्रमी पूर्वजांच्या परंपरेला साजेल असें वर्तन सद्यःकालीं करण्याविषयीं सुचवून सावरकरांनीं हा पोवाडा पुरा केला आहे.

दि. ३–३–१९०५ च्या 'काळ' पत्रांत प्रसिद्ध झालेली 'वृषोक्ति' ही कविता चाळीस ओळींची आहे. चढाला लागलेली गाडी कशी तरी कष्टानें ओढणाऱ्या बैलाला पाहून एका हिंदूनें पुढील उद्गार काढले :

हा धिक्! रे वृष, मान वांकवुनियां तूं दाससा राबसी।
मोठें जूं जड हें, असह्य भर हा, विश्रांतिही ना तशी॥
तोंडीं ये बहु फेंस, शक्ति तुरली, मारी धनी हा तरी।
वाटे पापचि मूर्तिमंत वृष रे! त्वज्जन्म हा अंतरीं॥

हिंदूचे हे शब्द ऐकून तो बैल रागावला नाहीं—त्याला मोठी मौज वाटली! हिंदूनें स्वतःच्या स्थितीचा नीट विचार करावा या हेतूनें या बैलानें जे शब्द उच्चारले त्यांतले पुढील शब्द मासला म्हणून लक्षांत ठेवण्याजोगे आहेत:

त्वां तें राज्य अफाट आर्यजननी तैसी जया अर्पिली।
दोहायास सुवर्णभू सतत तूं हस्तें जयाला दिली॥
लोखंडी असतांहि कांचनमया केलीस यद्भू अरे।
तो देई तुज काय वेतन तुझा स्वामी कथीं वा खरें॥

"तुझा धनी तुझे 'आभार' मानतो, तुला 'जे.पी.,' 'नामदार' 'सी.एस्.आय.' वगर पोकळ पदव्या देतो, माझा धनी तसें कांहींहि करीत नाहीं हें खरें; पण तो मला हिरवें गवत खायला देतो, स्वच्छ पाणी पाजतो आणि तो माझ्या मिठावर कर घेत नाहीं" असें हिंदूला सांगून, या बैलानें 'जास्त सुखी कोण' या प्रश्नाचें उत्तर देण्याचें काम त्या हिंदूवरच सोंपविलें. माझ्या मानेवरलि जोखडापेक्षां तुझ्या मानेवरील पारतंत्र्याचें जोखड किती तरी पटीनें जास्त जड आहे, मी तुझ्यासारखा सर्वस्वीं निःशस्त्र बनलों नाहीं इत्यादि गोष्टींची जाणीव बैलानें हिंदूला ज्या श्लोकांत करून दिली आहे ते या कवितेंतले शेवटचे दोन्ही श्लोक चांगले आहेत:

नक्षत्रांहुनि ही असंख्य वसती अन्याय ज्या अंतरीं।
जाळी जें ज्वलनाहुनी, यमपुरी ज्याहून आहे बरी,।
नाशाचा जबडाच जो, अवदशा माहेर ज्या मानिते।
देती ज्याप्रति पारतंत्र्य अभिधा, जूं वाहसी हाय तें॥
तूं निःशस्त्र परंतु मी न अजुनी निःशृंग झालों तरी।
या शृंगें तुज फाडिलेंचि असतें, सोडोनि देतों परी॥
गर्वा सोडुनि देशभार हरण्या यत्नांसि आधीं करीं।
होई ईशपदीं सुलीन, पुरवी सद्हेतु तो श्रीहरी॥

कॉलेजमधील अध्ययनाच्या काळांत सावरकरांनीं गद्यहि पुष्कळ लिहिलें असेल, यांत संशय नाहीं. पण, त्यांतलें सध्यां उपलब्ध होऊं शकणारें गद्य फार थोडें आहे. 'ऐतिहासिक पुरुषांचे उत्सव कां करावे?' या विषयावरील निबंध सावरकरांनीं १९०२ मध्येंच केव्हां तरी लिहिला असावा. नाना फडणीस–उत्सव समितीनें या निबंधाला बक्षीस दिलें अशी नोंद ३१–३–१९०३ च्या 'केसरी'त सांपडते. पुण्याच्या 'काळ' पत्राच्या दि. १९–९–१९०२ च्या अंकांत 'विनायक' या

नांवाच्या लेखकानें लिहिलेला 'दुर्लभं भारते जन्म मानुष्यं तत्र दुर्लभम्' हा निबंध आढळतो. हा निबंध सावरकरांचाच आहे. या निबंधाच्या शेवटींशेवटीं पुढील परिच्छेद लिहिण्यांत आलेला आहे :

*अशा प्रकारचे अनेक विचार मनांत आले व अखेर माझी खातरी झाली कीं, हिंदुस्थानचे दारिद्र्यास व सर्व प्रकारचे अनास्थेस कारण हिंदु लोक होत. परंतु जर कधीं त्यांना वैभवाचे दिवस हवे असतील तर त्यांनीं हिंदूच राहिलें पाहिजे. आपण केलेल्या दुष्कृत्याचें खापर हिंदुस्थानचे दुर्दैवावर फोडून जर ते इंग्लंडच्या पोटीं जाऊं इच्छितील तर "लोह परीसा रुसलें, सोनेपणासी मुकलें" अशी त्यांची अशरण स्थिति होईल !*

सावरकर यांनीं कॉलेजमधील अध्ययनाला प्रारंभ केला त्या सुमारास ईजिप्त, चीन वगैरे पौर्वात्य राष्ट्रांत नवें चैतन्य कसें निर्माण होऊं लागलें होतें याचें दिग्दर्शन या प्रकरणाच्या प्रारंभींच करण्यांत आलेलें आहे. ते कॉलेजमध्यें शिकत होते त्याच काळांत सुरू झालेल्या रूसो-जपानी–युद्धामुळें पौर्वात्य राष्ट्रांत निर्माण झालेल्या या नवचैतन्यांत भरच पडली. रूसो-जपानी–युद्ध सुरू झाल्यावर जपानच्या विजयाच्या वार्ता भराभर येऊं लागल्यामुळें तर, सगळीं पौर्वात्य राष्ट्रें एका नव्या तरतरीनें जगाकडे पाहूं लागलीं. रशियाच्या अवाढव्य सत्तेला जपाननें चीत केलें तें केवळ स्वतःच्या सामर्थ्यावर केलें नाहीं, रशियाचा पराभव होण्यांत ज्यांचा स्वार्थ सांठविलेला होता अशा राष्ट्रांनीं जपानला, प्रच्छन्नपणें किंवा उघडपणें, शस्त्रास्त्रांची मदत केल्यामुळेंच जपान यशस्वी झाला आहे ही कोणाहि डोळस माणसाला कळणारी गोष्ट सावरकरांनाहि कळत होती. त्यांनीं बोअर-युद्धाच्या हकीकती वाचल्या होत्या व त्यांवरूनहि त्यांनीं असेंच ओळखलें होतें कीं, इंग्लंडच्या शत्रूंनीं बोअर लोकांना शस्त्रास्त्रांची मदत केल्यामुळें, बोअर लोकांना कांहीं वर्षेपर्यंत इंग्रजांविरुद्ध लढा चालवितां आला. जगांत घडणाऱ्या या घडामोडींचा सावरकर नव्या व व्यापक दृष्टीनें विचार करूं लागल्यामुळें, नाशिकपासून त्यांच्या मनांत सशस्त्र क्रांतीची जी कल्पना खेळत होती ती दृढहि झाली आणि व्यापकहि झाली. सशस्त्र क्रांति घडवून देशस्वातंत्र्य सिद्ध करूं पाहणाऱ्या भारतासारख्या निःशस्त्र देशानें आंतरराष्ट्रीय राजकारणाकडे पाहतांना कोणत्या दृष्टीचा अवलंब केला पाहिजे यासंबंधींचे सावरकरांचे विचार या काळांत अधिकाधिक स्पष्ट होऊं लागले. 'मित्रमेळया'च्या ज्या अनेक शाखा महाराष्ट्रांत फैलावल्या होत्या त्यांचें एकसूत्रीकरण करण्याची आवश्यकता वाटूं लागल्यामुळें, १९०४ सालच्या मे महिन्यांत सावरकरांनीं महाराष्ट्रांतील आपल्या समवयस्क सहकाऱ्यांना नाशिक येथें बोलावून घेतलें होतें. या मंडळींशीं पुष्कळ चर्चा केल्यावर 'मित्रमेळा' या संस्थेचें नामांतर करून 'अभिनव-भारत' हें नवें नांव त्या संस्थेला पुढें देण्यांत आलें. नाशिक येथें ज्या भागवतांच्या वाड्यांत या संस्थेची प्राणप्रतिष्ठा

झाली, त्या वाड्यांत या संस्थेचें स्मरण म्हणून कांहीं तरी राहावें अशी इच्छा सावरकरांच्या मनांत अद्यापहि घोळत असते.

सावरकरप्रभृति तरुणांचे विचार अशा मार्गानें फोंफावत होते त्याच अवधींत हिंदुस्थानचे तत्कालीन व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन हे सुशिक्षित भारतीयांचा पदोपदीं पाणउतारा करीत होते. मुद्रणस्वातंत्र्यावर घाला घालून, विद्यापीठांचें स्वातंत्र्य खच्ची करून, राज्यकारभारांतून सुशिक्षित भारतीयांना हुसकून लावून—अशा विविध मार्गांनीं कर्झनसाहेब आपलें श्रेष्ठत्व भारतीयांसमोर प्रस्थापित करीत होते आणि भारतीयांना खिजवितां येईल तितके खिजवीत होते. वंग-भंग करण्याचें ठरवून त्यांनीं आपल्या या अरेरावी धोरणावर कळसच चढविला. वंग-भंगामुळें बंगालसारख्या महत्त्वाच्या प्रांतांतील सुशिक्षितांनीं जें आंदोलन सुरू केलें त्याचा पाठपुरावा करण्याचें धोरण महाराष्ट्रांतल्या टिळक—परांजपे—भोपटकरप्रभृति नेत्यांनीं ठरविलें. विद्यार्थ्यांचे पुढारी म्हणून सावरकरहि या आंदोलनांत सामील झाले. यापूर्वींहि ते सुटींत शिवजयंत्युत्सवाच्या वगैरे कार्यक्रमांत जाहीर व्याख्यानें देत असत, हें खरें; पण, वंगभंगाची चळवळ सुरू होतांच, आणि त्या चळवळीला स्वदेशीची व ब्रिटिश मालावरील बहिष्काराची जोड मिळतांच, सावरकर यांनीं उघडपणें व सातत्यानें चळवळींत भाग घेण्यास प्रारंभ केला.

१९०५ सालच्या सप्टेंबर महिन्यांत जो गणेशोत्सव झाला, त्या गणेशोत्सवानिमित्त 'काळ'कर्ते प्रो. परांजपे यांना नाशिकला नेण्याचें 'अभिनव-भारता'च्या मंडळींनीं ठरविलें. 'काळ' पत्रांतील स्वातंत्र्यवादी व क्रांतिकारक लेखनामुळें शिवरामपंत परांजपे हे या सुमारास विलक्षण लोकप्रिय झाले होते. लेखणीप्रमाणें त्यांची वाणीहि मोठी मोहक व स्फूर्तिदायक असल्यामुळें, त्यावेळचा समाज त्यांना एक सव्यसाची नेता म्हणून फार मानूं लागला होता. या सहज मिळालेल्या मान्यतेचा कांहीं लोकांनीं असा अर्थ बसविला कीं, 'काळ'कर्ते परांजपे हे लोकप्रियतेच्या व नेतृत्वाच्या बाबतींत लोकमान्य टिळकांशीं स्पर्धा करूं पहात आहेत. ही भलतीच समजूत उराशीं बाळगून बसलेल्या कांहीं फाजील उत्साही मंडळींनीं परांजपे यांचा एकदां पाणउतारा केला होता. ते यापूर्वीं कर्नाटकांत गेले' तेव्हां ही दुर्दैवी घटना घडून आली होती. हें स्मरण ताजें असल्यामुळें, नाशिकचें निमंत्रण स्वीकारावें कीं नाहीं याविषयीं परांजपे यांचें मन प्रथम साशंकच होतें. सावरकर यांनीं नाशिकच्या परिस्थितीविषयीं खुलासा केल्यावर तिकडे येण्याला परांजपे यांनीं मान्यता दिली.

या गणेशोत्सवांत परांजपे यांचा मुक्काम नाशिक येथें फक्त दोनच दिवस होता; पण, या दोन दिवसांत प्रवचनें व व्याख्यानें मिळून त्यांचे सहा कार्यक्रम झाले. प्रत्येक कार्यक्रम '**प्रतिपच्चंद्रलेखेव वर्धिष्णु**' असाच झाला व परांजपे यांची नाशिकच्या तरुणांवर पुरी छाप बसली. परांजपे यांचा या मुक्कामांत 'अभिनव-भारता'च्या गणेशोत्सवातर्फे त्यांना मानपत्र अर्पण करण्यांत आलें. या मानपत्रसमर्पणप्रसंगीं कवि गोविंद यांचीं पदें म्हणण्यांत आलीं. याप्रसंगीं मुख्य भाषण सावरकरांचें झालें

व प्रो. परांजपे यांना मानपत्र अर्पण करण्याचें कामहि सावरकर यांचेवरच सोंपविण्यांत आलें. नाशिकचा हा समारंभ उरकून सावरकर कोटुरें येथें गेले होते. तेथील जाहीर सभेंत सावरकर व त्यांचे सहकारी श्री. बर्वे यांचीं भाषणें झालीं. वंग-भंगाला संघटित विरोध करणाऱ्या बंगाली बंधूंचे या सभेंत अभिनंदन करण्यांत आलें व सर्वांनीं देशी कापड वापरावें असा ठराव या सभेंत संमत करण्यांत आला.

सावरकर नाशिकहून पुण्यास परत आले त्या सुमारास वंग--भंगाच्या चळवळीनें पुण्यांत चांगलेंच ठाण मांडलें होतें. या चळवळीला पुण्यांतील विद्यार्थ्यांची सहानुभूति आहे हें जाहीर करण्यासाठीं, दि. १–१०–१९०५ रोजीं सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखालीं जी सभा झाली त्यांत विद्यार्थ्यांचें म्हणणें चारपांच विद्यार्थ्यांनीं मांडलें. या विद्यार्थ्यांत सावरकर होते. विदेशी मालावरील बहिष्काराला ठसठशीत स्वरूप यावें म्हणून विदेशी कापडाची होळी करण्यांत यावी ही कल्पना सावरकर यांनीं या वेळच्या आपल्या भाषणांत लोकांपुढें मांडली. 'काळ'कर्ते प्रो. परांजपे हे या सभेला उपस्थित होते. त्यांनीं आपल्या भाषणांत विद्यार्थ्यांचें अभिनंदन केलें व विलायती कापडाची होळी करण्याच्या कल्पनेचा त्यांनीं पुरस्कार केला. सभा संपल्यावर सभाध्यक्ष श्री. केळकर यांनीं सावरकरप्रभृति विद्यार्थ्यांना बाजूला बोलावून घेतलें. परदेशी कपडयांची होळी करून ते फुकट घालविण्यापेक्षां, ते गोळा करून अंध, पंगु, रोगग्रस्त अशा बांधवांना ते वाटून टाकणें श्रेयस्कर होय, असा विचार त्यांनीं या तरुणांपुढें मांडला.

ही सभा झाली त्या दिवशीं टिळक पुण्यांत नव्हते. ते परत आल्यावर सावरकरप्रभृति विद्यार्थ्यांनीं त्यांची भेट घेतली व विदेशी कपडयांची होळी करण्याची आपली कल्पना त्यांनीं टिळकांना कळविली. सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत सभा झाली त्या दिवशीं अश्विन शुद्ध तृतीया होती. सावरकरप्रभृति विद्यार्थ्यांचें व टिळकांचें या होळीसंबंधीं बोलणें झालें तेव्हां सीमोल्लंघनाचा प्रसंग अगदीं नजीक येऊन ठेपला होता. टिळकांनीं या तरुणांचें मनोगत ओळखलें; पण अशी होळी झाल्यामुळें काय परिणाम होतील हाहि विचार त्यांच्या मनांत आला. विद्यार्थ्यांना त्यांनीं नकार दिला नाहीं; पण त्यांचें कर्तृत्व व तळमळ यांची पारख करण्यासाठीं ते म्हणाले : होळीच करावयाची तर ती पोरकट दिसतां कामा नये. गाडीअर्धी गाडीभर तरी विदेशी कपडे गोळा कराल तर होळी करण्यांत कांहीं अर्थ आहे. सावरकरप्रभृति विद्यार्थ्यांनीं ही 'पडत्या फळाची आज्ञा' मान्य केली आणि विदेशी कपडे गोळा करण्याचा उद्योग त्यांनीं जोरानें सुरू केला. त्या काळीं पुण्यांत 'महाराष्ट्र विद्यालय' नांवाची भोपटकरबंधूंनीं चालविलेली राष्ट्रीय बाण्याची एक शिक्षणसंस्था होती. या संस्थेंतील विद्यार्थ्यांनीं या कामीं सावरकरांना मदत केली. कपडे गोळा करण्याच्या या मोहिमेचा एक भाग म्हणून सावरकर यांनीं एक व्याख्यानहि दिलें. दसऱ्याचा दिवस उजाडला तों टिळकांच्या मागणीप्रमाणें भरपूर कपडे गोळा झालेले होते.

सायंकाळच्या सुमारास हे सर्व कपडे एका गाडयावर रचण्यांत आले. या कपड्यांचें बलिदान व्हावयाचें असल्यानें, त्यांच्या ढिगावर खूपसा गुलाल टाकण्यांत आला. ही कपडयांची गाडी, तिच्याबरोबर वाद्यें, आगेमागें नागरिकांचा प्रचंड घोळका, अशा थाटांत ही मिरवणूक मंडईपासून निघाली. प्रो. शि. म. परांजपे व भालाकार भोपटकर हे मिरवणुकींत प्रथमपासूनच सामील झालेले होते. मिरवणूक जसजशी लकडी पुलाजवळ जात चालली, तसतशी लोकांची गर्दीहि वाढूं लागली. मिरवणूक 'चित्रशाळे'च्या आसपास असतांना, टिळकहि तिच्यांत सामील झाले. लकडी पुलाच्या पलीकडे गेल्यानंतर मिरवणूक थांबली; आणि गाडीवरील कपडे एका शेतांत रचण्यांत आले. या ठिकाणीं फक्त होळी करण्यांत यावी, व्याख्यानें करावयाचींच असतील तर तीं दुसरीकडे करावीं, असें टिळकांनीं सुचविलें. पण, सावरकरांना ती गोष्ट पसंत पडली नाहीं. धगधगणाऱ्या होळीला रसरसणाऱ्या वक्तृत्वाची सांथ मिळाली तर विदेशी वस्तूंबद्दलचा द्वेष लोकांच्या मनांत पक्केपणीं रुजेल असा मुद्दा सावरकर यांनीं मांडला. होळीशेजारीं व्याख्यानें करावयाचीं नाहींत तर, मंडईपाशीं व्याख्यानें देऊन लकडी पुलापलीकडे होळी केल्यानेंहि काम भागलें असतें असा कोटिक्रम त्यांनीं आग्रहानें मांडला. तरुणांच्या योग्य भावनांना जोपासणाऱ्या टिळकांनीं शेवटीं सावरकरांचें म्हणणें मान्य केलें.

लोकमान्य टिळकांचें या प्रसंगींचें व्याख्यान फार तेजस्वी झालें; पण, 'काळ' कर्ते परांजपे यांनीं या प्रसंगीं बहारच करून सोडली. कपडयांच्या जळत्या ढिगांतला न पेटलेला एक कोट काढून त्यांनीं तो लोकांपुढें धरला; आणि त्या कोटाच्या खिशांची झडती घेण्याच्या भरांत, व्यापाराच्या मिषानें खिसे भरभरून हिंदुस्थानची संपत्ति लुटून नेणाऱ्या इंग्रजांची त्यांनीं हजेरी घेतली ! असा हा पातकी कोट मी अग्निसमर्पण करतों असें म्हणून त्यांनीं तो कोट धगधगलेल्या होळींत फेंकला ! टिळकांचें व्याख्यान, परांजपे यांचें व्याख्यान वगैरे सर्व कार्यक्रम आटोपून मंडळी परत फिरली तों रात्रींचे नऊ वाजण्याचा सुमार झाला होता.

पुण्यांतल्या या होळीचा प्रकाश किती दूरवर पसरेल आणि या होळीच्या निमित्तानें सरकार कोणकोणतीं कुभांडें रचील, याची टिळकांना चांगलीच कल्पना होती. पुण्यांतल्या या होळीमुळें हिंदुस्थानांतले अँग्लो-इंडियन पत्रकार चिडून गेले इतकेंच नव्हे तर, त्या वेळीं दक्षिण आफ्रिकेंत असणारे बॅरिस्टर गांधी हेहि पुण्यांत घडलेल्या या प्रकारानें रुष्ट झाले. Indian Opinion या त्या वेळच्या आपल्या पत्रांत गांधीजींनीं या प्रकाराबद्दलचीं आपली नापसंती व्यक्त केली होती, असें लोक सांगतात; आणि, बहिष्काराबद्दलचीं गांधीजींचीं सर्वसामान्य मतें पाहातां, ही ऐकीव माहिती खरी असेलसें वाटतें. बंगालमधील प्रमुख वृत्तपत्रांचेंहि डोळे या होळीमुळें दिपून गेले. त्या वेळीं फर्ग्युसन कॉलेजकडे जाणाऱ्या रस्त्यालगत, डेक्कन जिमखान्याच्या समोरच्या भागांत, गवताच्या पुष्कळशा गंजी रचलेल्या असत. पोलिस किंवा त्यांचे

हस्तक या गंजींना हेतुपुरस्सर आग लावून देतील आणि होळी पेटविणाऱ्या लोकांवर कुभांड रचण्याला ते कमी करणार नाहींत, हें टिळकांनीं ओळखलें होतें. म्हणून, सभा विसर्जन झाल्यावर, घरीं परत येतांना त्यांनीं सावरकरप्रभृति तरुणांना एक इषारा दिला होता. तुमच्यापैकीं कोणी तरी जबाबदार इसमानें होळी पार विझून जाईपर्यंत या ठिकाणीं पहारा करीत बसलें पाहिजे, असें टिळकांनीं बजावलें होतें. भट व थत्ते या आपल्या सहकाऱ्यांची या कामावर योजना करून सावरकर कॉलेजच्या वसतिगृहांत परत गेले, तों अकरा वाजून गेलेले होते. विदेशी कपडयांची होळी करण्याची कल्पना मनांत येतांच, सावरकर यांनीं नाशिक येथील आपल्या सहकाऱ्यांना ती कल्पना कळविली असली पाहिजे; कारण, विजयादशमीच्याच दिवशीं तेथें श्री. दाजीसाहेब केतकर यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर सभा होऊन दातार--गोसावी प्रभृतींचीं भाषणें झाल्यावर, विलायती कपडयांची होळी करण्यांत आली असा उल्लेख त्या वेळच्या 'केसरीं'त सांपडतो.

कॉलेजच्या वसतिगृहांत राहणाऱ्या सावरकरांनीं विदेशी कपडयांच्या होळीची चळवळ केली ही गोष्ट फर्ग्युसन कॉलेजच्या त्या वेळच्या अधिकाऱ्यांना पटण्यासारखी नव्हती. या होळीची हकीकत कानीं येतांच अधिकारीवर्गाची सभा झाली; आणि, त्या सभेंत सावरकरांना दोन प्रकारची शिक्षा करण्याचें ठरलें. असल्या जहाल राजकारणांत भाग घेतल्याबद्दल त्यांना दहा रुपये दंड करण्याचें ठरलें; आणि विद्यार्थ्यांना बिघडविणाऱ्या सावरकरांनीं वसतिगृह सोडून तत्काळ बाहेर पडावें, असाहि हुकूम काढण्यांत आला. हा हुकूम कळल्याबरोबर सावरकर हे वसतिगृहांतील त्यांचें स्नेही श्री. जोगळेकर यांच्या खोलींत गेले. जुन्नरहून नुकतीच मनीऑर्डर आलेली असल्यामुळें, जोगळेकर, यांनीं दंडाचे पैसे देऊं केले; पण, हे पैसे स्वीकारण्याचें सावरकरांना कारणच पडलें नाहीं. त्यांचा दंड भरण्यासाठीं विद्यार्थ्यांनीं स्वयंस्फूर्तीनें निधि गोळा केला. दंड भरण्याला अवश्य असणारे पैसे सावरकरांनीं या निधींतून घेतले. वस्तुतः ही बाब दहा रुपयांचीच असल्यामुळें, तेवढयासाठीं त्यांना जमलेल्या निधीचा उपयोग करणेंही आवश्यक नव्हतें. पण, निधीचा अव्हेर करणें म्हणजे लोकांच्या सद्‌भावनांचा उपमर्द करण्यासारखें ठरलें असतें; म्हणून, त्यांनीं निधींतून दहा रुपये घेतले व उरलेले पैसे पैसाफंडाला देऊन टाकले. कॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं सावरकरांवर शस्त्र उगारलें हें टिळकांना अर्थातच खपलें नाहीं. दि. १७-१०-१९०५ व दि. २४-१०-१९०५ या दिनांकांच्या 'केसरीं'त 'हे आमचे गुरूच नव्हत' हे झणझणीत अग्रलेख लिहून टिळकांनीं फर्ग्युसन कॉलेजच्या अधिकाऱ्यांची खूप निर्भर्त्सना केली. दि. १६-१०-१९०५ रोजीं सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत प्रो. शि. म. परांजपे यांच्या अध्यक्षतेखालीं पुण्यांतील विद्यार्थ्यांची चवथी जाहीर सभा झाली. या सभेंत घमंडेबुवा, भालाकार भोपटकर प्रभृतींचीं भाषणें झाल्यावर, हरेंद्रनाथ मित्र या बंगाली गृहस्थाचेंही भाषण झालें.

निधि गोळा करून विद्यार्थिवर्गानें सावरकरांचा दंड भरला याबद्दल या सभेंत पुण्यांतील विद्यार्थ्यांचें अभिनंदन करण्यांत आलें.

कॉलेज अधिकाऱ्यांच्या अवकृपेमुळें सावरकरांना वसतिगृह सोडावें लागलें त्यापूर्वीच ते बी. ए. च्या उपान्त्य परीक्षेंत उत्तीर्ण झाले होते. विद्यापीठाची बी.ए. ची परीक्षा महिनादीड महिन्यावर आलेली होती. या शेवटच्या दिवसांतच विशेष अभ्यास करून परीक्षेंत उत्तीर्ण होण्याचा सावरकरांचा क्रम असे. अभ्यासाच्या ऐन गर्दीच्या वेळीं वसतिगृह सोडून बाहेर पडावें लागल्यामुळें, त्यांना परीक्षेंतील यशाबद्दल चिंता वाटूं लागली. आपण परीक्षेंत उत्तीर्ण झालों नाहीं तर श्री. भाऊराव चिपळूणकरप्रभृति आप्तांचा व हितचिंतकांचा हिरमोड होईल, या विचारामुळें सावरकरांचें मन अस्वस्थ होत होतेंच; पण, त्यांच्या अस्वस्थतेचें खरें कारण याहून अधिक महत्त्वाचें होतें. क्रीडा-क्षेत्रांत रंगणारे विद्यार्थी परीक्षेंत फार मोठ्या प्रमाणांत अपेशी होत असल्यामुळें, 'क्रीडापटू म्हणजे उनाडटप्पू' असें समीकरण लोकांच्या मनांत स्थिर होतें, हें त्यांना माहीत होतें. देशभक्तीच्या खेळांत रंगलेला आपल्यासारखा विद्यार्थी परीक्षेंत अपेशी झाला तर, राजकारणाभिमुख विद्यार्थ्यांवर प्रतिकूल टीका करणाऱ्या लोकांची बाजू बळकट होईल, ही चिंता सावरकरांना विशेष अस्वस्थ करीत होती. म्हणून वसतिगृह सोडून बाहेर राहूं लागल्यावर, त्यांनीं खूप जोरानें अभ्यास केला. दि. २१-१२-१९०५ रोजीं बी. ए. परीक्षेचा निकाल जाहीर झाला. ह्या परीक्षेंत उत्तीर्ण होऊन सावरकरांनीं स्वतःची व राजकारणांत पडणाऱ्या विद्यार्थ्यांची बाजू खंबीर बनविली. सावरकर पास झाल्याबद्दल त्यांचें अनेकांकडून अभिनंदन करण्यांत आलें याचें कारण हें कीं, सावरकरांचें यशापयश ही बाब वैयक्तिक उरली नसून, तिला एक प्रकारें सार्वजनिक महत्त्व प्राप्त झालें होतें.

या अवधींत सावरकरांच्या कौटुंबिक परिस्थितींतहि कांहींसें परिवर्तन झालेलें होतें. त्यांचा धाकटा भाऊ बाळ हा मित्रमेळ्याच्या कार्यक्रमानिमित्त पुण्यासारख्या अनेक ठिकाणीं जाऊन आल्यामुळें, तो चांगलाच सभाधीट बनला होता व त्याचा शाळेंतील अभ्यासहि व्यवस्थितपणें चाललेला होता. बाबा नोकरीचाकरी करीत नव्हते; पण गृहप्रपंच व देशसेवा या कामांत ते तल्लीन झाले होते. सौभाग्यवती येसू वहिनींना १९०३-०४ च्या सुमारास एक मूल झालें व गेलें ! या बाळंतपणांत वहिनींच्या प्रकृतीची पुष्कळच आबाळ झाली व त्यामुळें या धैर्यशाली व कर्तृत्ववान् स्त्रीच्या भावी जीवनावर फार प्रतिकूल परिणाम झाला. १९०५ सालीं सावरकरांचा पहिला मुलगा प्रभाकर याचा जन्म झाला होता. सावरकरांची बहीण माई यांनाहि या सुमारास वसंत नांवाचा मुलगा झालेला होता.[1] सावरकर बी. ए. झाले त्या

१ सावरकरांचे भाचे डॉ. वसंतराव काळे हे त्र्यंबकेश्वर येथें राहतात. १९-१२-०५ हा त्यांचा जन्मदिन आहे. सावरकरांचा पहिला मुलगा प्रभाकर हा वसंतराव काळे यांच्याहून सुमारें वर्षानें मोठा. प्रभाकरचा जन्म १९०५ च्या जानेवारी-फेब्रुवारींतला असावा.

हस्तक या गंजींना हेतुपुरस्सर आग लावून देतील आणि होळी पेटविणाऱ्या लोकांवर कुभांड रचण्याला ते कमी करणार नाहींत, हें टिळकांनीं ओळखलें होतें. म्हणून, सभाविसर्जन झाल्यावर, घरीं परत येतांना त्यांनीं सावरकरप्रभृति तरुणांना एक इषारा दिला होता. तुमच्यापैकीं कोणी तरी जबाबदार इसमानें होळी पार विझून जाईपर्यंत या ठिकाणीं पहारा करीत बसलें पाहिजे, असें टिळकांनीं बजावलें होतें. भट व थत्ते या आपल्या सहकाऱ्यांची या कामावर योजना करून सावरकर कॉलेजच्या वसतिगृहांत परत गेले, तों अकरा वाजून गेलेले होते. विदेशी कपडयांची होळी करण्याची कल्पना मनांत येतांच, सावरकर यांनीं नाशिक येथील आपल्या सहकाऱ्यांना ती कल्पना कळविली असली पाहिजे; कारण, विजयादशमीच्याच दिवशीं तेथें श्री. दाजीसाहेब केतकर यांच्या अध्यक्षतेखालीं जाहीर सभा होऊन दातार-गोसावी प्रभृतींचीं भाषणें झाल्यावर, विलायती कपडयांची होळी करण्यांत आली असा उल्लेख त्या वेळच्या 'केसरीं'त सांपडतो.

कॉलेजच्या वसतिगृहांत राहणाऱ्या सावरकरांनीं विदेशी कपडयांच्या होळीची चळवळ केली ही गोष्ट फर्ग्युसन कॉलेजच्या त्या वेळच्या अधिकाऱ्यांना पटण्यासारखी नव्हती. या होळीची हकीकत कानीं येतांच अधिकारीवर्गाची सभा झाली; आणि, त्या सभेंत सावरकरांना दोन प्रकारची शिक्षा करण्याचें ठरलें. असल्या जहाल राजकारणांत भाग घेतल्याबद्दल त्यांना दहा रुपये दंड करण्याचें ठरलें; आणि विद्यार्थ्यांना बिघडविणाऱ्या सावरकरांनीं वसतिगृह सोडून तत्काळ बाहेर पडावें, असाहि हुकूम काढण्यांत आला. हा हुकूम कळल्याबरोबर सावरकर हे वसतिगृहांतील त्यांचें स्नेही श्री. जोगळेकर यांच्या खोलींत गेले. जुन्नरहून नुकतीच मनीऑर्डर आलेली असल्यामुळें, जोगळेकर, यांनीं दंडाचे पैसे देऊं केले; पण, हे पैसे स्वीकारण्याचें सावरकरांना कारणच पडलें नाहीं. त्यांचा दंड भरण्यासाठीं विद्यार्थ्यांनीं स्वयंस्फूर्तीनें निधि गोळा केला. दंड भरण्याला अवश्य असणारे पैसे सावरकरांनीं या निधींतून घेतले. वस्तुतः ही बाब दहा रुपयांचीच असल्यामुळें, तेवढयासाठीं त्यांना जमलेल्या निधीचा उपयोग करणेंही आवश्यक नव्हतें. पण, निधीचा अव्हेर करणें म्हणजे लोकांच्या सद्भावनांचा उपमर्द करण्यासारखें ठरलें असतें; म्हणून, त्यांनीं निधींतून दहा रुपये घेतले व उरलेले पैसे पैसाफंडाला देऊन टाकले. कॉलेजच्या अधिकाऱ्यांनीं सावरकरांवर शस्त्र उगारलें हें टिळकांना अर्थातच खपलें नाहीं. दि. १७-१०-१९०५ व दि. २४-१०-१९०५ या दिनांकांच्या 'केसरीं'त 'हे आमचे गुरूच नव्हत' हे झणझणीत अग्रलेख लिहून टिळकांनीं फर्ग्युसन कॉलेजच्या अधिकाऱ्यांची खूप निर्भर्त्सना केली. दि. १६-१०-१९०५ रोजीं सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत प्रो. शि. म. परांजपे यांच्या अध्यक्षतेखालीं पुण्यांतील विद्यार्थ्यांची चवथी जाहीर सभा झाली. या सभेंत घमंडेबुवा, भालाकार भोपटकर प्रभृतींचीं भाषणें झाल्यावर, हरेंद्रनाथ मित्र या बंगाली गृहस्थाचेंही भाषण झालें

निधि गोळा करून विद्यार्थिवर्गानें सावरकरांचा दंड भरला याबद्दल या सभेंत पुण्यांतील विद्यार्थ्यांचें अभिनंदन करण्यांत आलें.

कॉलेज अधिकाऱ्यांच्या अवकृपेमुळें सावरकरांना वसतिगृह सोडावें लागलें त्यापूर्वींच ते बी. ए. च्या उपान्त्य परीक्षेंत उत्तीर्ण झाले होते. विद्यापीठाची बी.ए. ची परीक्षा महिनादीड महिन्यावर आलेली होती. या शेवटच्या दिवसांतच विशेष अभ्यास करून परीक्षेंत उत्तीर्ण होण्याचा सावरकरांचा क्रम असे. अभ्यासाच्या ऐन गर्दीच्या वेळीं वसतिगृह सोडून बाहेर पडावें लागल्यामुळें, त्यांना परीक्षेंतील यशाबद्दल चिंता वाटूं लागली. आपण परीक्षेंत उत्तीर्ण झालों नाहीं तर श्री. भाऊराव चिपळूणकरप्रभृति आप्तांचा व हितचिंतकांचा हिरमोड होईल, या विचारामुळें सावरकरांचें मन अस्वस्थ होत होतेंच; पण, त्यांच्या अस्वस्थतेचें खरें कारण याहून अधिक महत्त्वाचें होतें. क्रीडा-क्षेत्रांत रंगणारे विद्यार्थी परीक्षेंत फार मोठ्या प्रमाणांत अपेशी होत असल्यामुळें, 'क्रीडापटू म्हणजे उनाडटप्पू' असें समीकरण लोकांच्या मनांत स्थिर होतें, हें त्यांना माहीत होतें. देशभक्तीच्या खेळांत रंगलेला आपल्यासारखा विद्यार्थी परीक्षेंत अपेशी झाला तर, राजकारणाभिमुख विद्यार्थ्यांवर प्रतिकूल टीका करणाऱ्या लोकांची बाजू बळकट होईल, ही चिंता सावरकरांना विशेष अस्वस्थ करीत होती. म्हणून वसतिगृह सोडून बाहेर राहूं लागल्यावर, त्यांनीं खूप जोरानें अभ्यास केला. दि. २१-१२-१९०५ रोजीं बी. ए. परीक्षेचा निकाल जाहीर झाला. ह्या परीक्षेंत उत्तीर्ण होऊन सावरकरांनीं स्वतःची व राजकारणांत पडणाऱ्या विद्यार्थ्यांची बाजू खंबीर बनविली. सावरकर पास झाल्याबद्दल त्यांचें अनेकांकडून अभिनंदन करण्यांत आलें याचें कारण हें कीं, सावरकरांचें यशापयश ही बाब वैयक्तिक उरली नसून, तिला एक प्रकारें सार्वजनिक महत्त्व प्राप्त झालें होतें.

या अवधींत सावरकरांच्या कौटुंबिक परिस्थितींतहि कांहींसें परिवर्तन झालेलें होतें. त्यांचा धाकटा भाऊ बाळ हा मित्रमेळ्याच्या कार्यक्रमानिमित्त पुण्यासारख्या अनेक ठिकाणीं जाऊन आल्यामुळें, तो चांगलाच सभाधीट बनला होता व त्याचा शाळेंतील अभ्यासहि व्यवस्थितपणें चाललेला होता. बाबा नोकरीचाकरी करीत नव्हते; पण गृहप्रपंच व देशसेवा या कामांत ते तल्लीन झाले होते. सौभाग्यवती येसू वहिनींना १९०३-०४ च्या सुमारास एक मूल झालें व गेलें ! या बाळंतपणांत वहिनींच्या प्रकृतीची पुष्कळच आबाळ झाली व त्यामुळें या धैर्यशाली व कर्तृत्ववान् स्त्रीच्या भावी जीवनावर फार प्रतिकूल परिणाम झाला. १९०५ सालीं सावरकरांचा पहिला मुलगा प्रभाकर याचा जन्म झाला होता. सावरकरांची बहीण माई यांनाहि या सुमारास वसंत नांवाचा मुलगा झालेला होता.[1] सावरकर बी. ए. झाले त्या

१ सावरकरांचे भाचे डॉ. वसंतराव काळे हे त्र्यंबकेश्वर येथें राहतात. १९-१२-०५ हा त्यांचा जन्मदिन आहे. सावरकरांचा पहिला मुलगा प्रभाकर हा वसंतराव काळे यांच्याहून सुमारें वर्षानें मोठा. प्रभाकरचा जन्म १९०५ च्या जानेवारी-फेब्रुवारींतला असावा.

सुमाराचा विचार केला तर असें म्हणतां येईल कीं, मोठ्याशा सुखांत नांदण्याची सावरकर कुटुंबाची त्या वेळीं परिस्थिति नसली तरी, सामान्य समाधान मानण्याजोगी त्यांची त्या वेळची परिस्थिति होती.

सावरकर बी. ए. ची परीक्षा उत्तीर्ण झाले त्यापूर्वी महाराष्ट्रांतल्या तरुण वर्गाला त्यांचें नांव परिचित झालें असल्यामुळें, या सुमारास त्यांना ठिकठिकाणचीं व्याख्यानांचीं निमंत्रणें येऊं लागलीं. यापुढील चारपांच महिन्यांच्या अवधींत सावरकर यांनीं अहमदनगर, नाशिक, भिवंडी, पुणेंप्रभृति ठिकाणीं व्याख्यानें देऊन, स्वदेशी व बहिष्कार या कार्यक्रमाचा प्रचार केला. १९०६ च्या जानेवारींत ते एल्‌एल्. बी. च्या दुसऱ्या परीक्षेच्या अभ्यासासाठीं मुंबईस जाऊन राहिले. त्यांचे मित्र श्री. वि. म. भट हे त्या वेळीं सायन्सच्या परीक्षेच्या अभ्यासासाठीं विल्सन कॉलेजांत दाखल झालेले होते. हे दोघे मित्र त्या वेळीं गिरगांव ट्रॅम टर्मिनस जवळच्या ' सुखनिवास ' नांवाच्या ' लॉज 'मध्यें रहात असत. नाशिक व पुणें येथील वास्तव्यांत सावरकरांनीं जें तरुणांच्या संघटनेचें काम केलें होतें तेंच कार्य त्यांनीं मुंबईतहि पुढें चालविलें. पुढें प्रसिद्धीस आलेल्या व्यक्तींपैकीं आचार्य दत्तो-पंत कालेलकर हे फर्ग्युसन कॉलेजमध्येंच सावरकरांच्या कक्षेंत आले होते. सावर-करांच्या मुंबई येथील अल्पकालीन वास्तव्यांत श्री. बा. गं. अर्थात् बाळासाहेब खेर व कै. डॉ. पां. दा. गुणे हे त्यांच्या कक्षेंत आले, अशी माहिती प्रस्तुत लेख-काला मिळाली आहे.

मुंबईतल्या या वास्तव्यांतच सावरकरांचा ' विहारी ' साप्ताहिकाशीं संबंध जडला. हें पत्र श्री. फाटक नांवाच्या एका देशप्रेमी गृहस्थाच्या मालकीचें होतें. या गृहस्थांनीं सावरकर यांचा लौकिक ऐकलेला होता. त्यांनीं सावरकरांना 'विहारीं'त लिहिण्याची विनंति केली व सावरकरांनीं ती मोठ्या तत्परतेनें मान्य केली. आपले स्वतंत्र विचार मांडण्याला अनायासेंच साधन मिळालें असें वाटून सावरकर ' विहारी 'च्या प्रत्येक अंकांत लेख लिहूं लागले. सावरकरांच्या लेखांस 'विहारीं'त हळूहळू इतकें प्राधान्य मिळूं लागलें कीं, कांहीं महिने सावरकरच ' विहारी ' चे वस्तुतः संपादक होते असें विधान एकाद्यानें केलें तर तें खरें ठरेल. या सुमारास बंगालमध्यें निघणाऱ्या ' युगांतर ', ' संध्या ' वगैरे साप्ताहिकांतील स्वातंत्र्यवादी व क्रांतिवादी लेखांमुळें त्या पत्रांची लोकप्रियता जशी कमालीची वाढली होती त्या-प्रमाणेंच सावरकरांच्या लेखांमुळें ' विहारी ' साप्ताहिकाची लोकप्रियताहि खूप वाढली. सावरकरांच्या ' विहारी ' मधील लेखनाबद्दल डॉ. वि. म. भट यांनीं पुढील मजकूर स्मरणपूर्वक लिहून पाठविला आहे :

त्या वेळच्या ' विहारी ' च्या फायली असतील तर त्यांत तात्यांची काव्य-गंगा राज्यक्रांतीच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें दुथडी भरून वाहत चाललेली आढळेल. एक मोठा लेख तर सुंदर कविकल्पनांनीं इतका रसरसलेला होता कीं, त्याला 'विहारी'चे

स्तंभेहि अपुरे पडूं लागले होते. ' त्यांतला कांहीं भाग कमी करा ' म्हणून चालकांनीं विनंति केल्यावरून, तीनचार स्तंभांचा मजकूर तात्यांनीं फाडून टाकलेला मला आठवतो. इतका सुंदर लेख फाडल्याबद्दल मी रागावलोंहि ! पण, तात्या म्हणाले : अरे ! हाच काय ? असे शेंकडों लेख लिहून देईन. इतका त्यांचा ( स्वतःच्या ) काव्यप्रतिभेबद्दल आत्मविश्वास होता.

डॉ. भट यांनीं ज्या लेखाचा उल्लेख केला आहे तो लेख ' विहारी 'च्या चैत्र शु. ॥ २ शके १८२८ च्या अंकांतील ' वंदे मातरम् ' हा संपादकीय लेखच असावा. या लेखानें ' विहारी ' चे पुरे सहा स्तंभ व्यापिलेले आहेत आणि लेख वाचीत शेवटपर्यंत गेल्यावर असें स्पष्टपणें भासतें कीं, जागा अपुरी पडल्यामुळें लेखाचा शेवटचा भाग एकदम गाळून टाकण्यांत आलेला आहे. हा सबंध लेख या चरित्रांत उद्धृत करणें शक्य नसलें तरी, सावरकरांची या वेळची भाषा—शैली, कांहीं महत्त्वाच्या मुद्यांवरील सावरकरांचे या वेळचे विचार आणि सावरकरांच्या कल्पनेचा मनोहर विलास इत्यादींचें दिग्दर्शन व्हावें या हेतूनें या लेखांतलि कांहीं अवतरणें उद्धृत करण्यासारखीं आहेत. भारतमातेच्या हिंदुसंततीच्या संतोषाखातर कांहीं अहिंदूंना भारतांत स्थान मिळालें असलें तर तें औदार्य होय, अहिंदूंना तें स्थान हक्कानें मिळालेलें नाहीं, असें पुढील उताऱ्यांत स्पष्टपणें म्हटलेलें आहे :

*तीस कोटी लेंकरांनीं ( भारतमाता ) पुत्रवती आहे. इतर स्त्रियांचीं लेंकरें आमच्याशीं खेळण्यासाठीं म्हणून आलीं असतांना, केवळ आम्हा लडिवाळ पोरांचा आग्रह पाहून या आर्यमातेनें त्या परकीयांच्या लेंकरांना उदार व सहृदय अंतःकरणानें जरी कांहीं वेळ तिच्या अंकावर आम्हांबरोबर बसूं दिलें असलें तरी, तें केवळ औदार्यानें होय, हक्क म्हणून नव्हे*

हिमालयपर्वताच्या सौंदर्याचें वर्णन करतांना कालिदासापासूनच्या कवींनीं आपल्या कल्पनेंतले उत्तमउत्तम अलंकार वैशिष्ट्यानुसार खर्चीं घातले आहेत. सावरकरांनीं भारताचें वर्णन करण्याच्या ओघांत हिमालयाच्या वैभवाचें जें वर्णन केलें आहे तेंहि वैशिष्ट्यपूर्ण आहे. हिमालय व भारतांतलि इतर पर्वत यांच्या थोरवीचें वर्णन करतांना सावरकर लिहितात :

*सर्व जगतीतलावर पसरलेल्या हजारों भूभागांमध्यें आर्यभूसारखी रमणीय भूमि दुसरी कोणती आहे, हें पहाण्यासाठीं हिमालय पर्वत उठून उभा राहूं लागला. त्यानें आपलें डोकें सर्व विश्वांतील प्रदेश दिसतील इतकें उंच केलें. तरी त्याला इतकी रमणीयता अन्यत्र कोठेंच आढळेना ! भूलोकावर जिच्या-इतकी रमणीयता नाहीं तिच्या समान स्वर्गलोकांत तरी कांहीं आहे कीं नाहीं म्हणून, जयानें उत्साह पावलेला तो हिमालय स्वर्गाचीं कपाटें उघडून आंत घुसला. परंतु, तेथें, हे आर्यभू, तुझ्याइतकी मनोरम वस्तु सांपडण्याच्या ऐवजीं कांहीं निराळाच प्रकार झाला ! हिमालयाचीं तीं हिमधवल सौधशिखरें*

*पाहून इंद्राच्या अमरावतींतील अप्सरांची एकच त्रेधा उडाली ! त्या सर्वजणी हिमालयाच्या गळ्यांत मिठ्या मारूं लागल्या. अमरावतीचा त्याग करून तेव्हांपासून त्या हिमालयावर स्वच्छंदानें विहार करीत असतात.... अशा त्या हिमालयानें, हे आर्यभूमि, तूं संपन्न आहेस. ... सर्व जगाचें जहाज केलें असतां तें गच्च भरून जाईल इतकें सोनें व इतकीं रत्नें हे आर्यमाते, तूं शेंकडों भुयारांतून आमच्यासाठीं जतन करून ठेवलीं आहेस. शिवाय, कोहिनुरांनीं भरलेली पेटी गोवळकोंड्याकडे आहे ती वेगळीच ! अपरिमित सुवर्णांनीं सुशोभित असलेल्या 'सुवर्णभू'ला व अनंत कोहिनुरांनीं तेजोमय झालेल्या आर्यवसुंधरेला आमची प्रणति असो !*

भारतमातेच्या निसर्गसंपन्नतेचें व भारतमातेच्या पुत्रांच्या कर्तृत्वाचें वर्णन करण्यासाठीं लिहिलेल्या प्रस्तुत लेखाच्या उत्तरार्धातला पुढील भाग संस्मरणीय आहे :

*जीमध्यें भूमि सदासर्वकाळ सस्यशालिनी आहे, जीमधील शेतें नेहमीं धान्याच्या मुठी भरलेले आपले हात उंच करून डुलतडुलत सर्व मनुष्य जातीचा योगक्षेम चालविण्यास आपण समर्थ आहोंत असें यथार्थ स्वाभिमानानें दर्शवीत असतात,... जीमधील जलाशय फुल्लारविंद असे असतात, जीमधील अश्वांच्या पाठी परमात्म्याच्या हातच्या खराऱ्यांनीं पूत झालेल्या आहेत, जीमधील गायी नेहेमीं दुभत्या असतात—अशा त्या सुधान्या व सुभगा भूदेवीला आमचें वंदन असो ! ....*

*परमेश्वरानें सर्व स्वाभाविक चारुता या आर्यभारतीला अर्पण केली असली तरी, तिच्या सद्गुणाची व थोरवीची खरी कसोटी ही तिच्या स्वतःचे कर्तबगारीवरूनच पहावयास पाहिजे. उत्तम नदी ती कीं, जी अत्यंत गोड व विमल पाणी देते; उत्तम शेत तें कीं, जें धान्याच्या कणसांनीं सदैव आंदोलन घेत असतें व उत्तम वृक्ष तोच कीं, ज्यांचीं फळें अत्यंत मधुर व रसाळ असतात; त्याचप्रमाणें, उत्तम देश तो होय कीं, ज्याच्या पुत्रांचे अंगीं कांहीं तरी असामान्यता असते. देशभूमीची खरी चारुता तिच्या स्वतःच्या महत्त्वामें जितकी प्राप्त होते तिच्या शतपट अधिक रीतीनें त्या देशभूमीच्या पुत्रांच्या कृतीवरून ठरत असते...सर्व जगाला अजून वंद्य असणाऱ्या कपिलमहामुनींनीं जिला 'आई' म्हणून वंदन करावें अशी भूमि या जगावर किंवा, चंद्र-मंगल-बुधादि ग्रहहो, तुमच्या तिकडे तरी एकादी आहे काय ? भास्कराचार्यांनीं, आर्यभट्टांनीं व वराहमिहिरांनीं भूगोलाचे, ज्योतिषशास्त्राचे व गणितशास्त्राचे शोध या भूमींतील अन्नसेवनानें आलेल्या तीव्रतेनें लाविले. दशांशांचा शोध या भूमीचा आहे, गुरुत्वाकर्षणाचा शोध या भूमीचा आहे, भूमिती या भूमींत*

*जन्माला आली...सप्तसुरांचा उदय या भूमीच्या कोमल कंठांतून झाला...*
*जगताला व्याकरणशास्त्राची देणगी या भूमीनें दिली.*

'विहारी' मधील या लेखांत सावरकरांच्या लेखणीची उदात्तता, सामर्थ्य व आत्मप्रतीति हे तीन अपूर्व गुण उत्कटत्वानें प्रत्ययास येतात असें शिफारसपत्र लिहिल्यावर, नागपूरचे श्री. बाळशास्त्री हरदास यांनीं असें म्हटलें आहे[1] कीं, प्रत्यक्ष सावरकरांच्या लेखणींतून निघालेल्या वाङ्मयांतहि या लेखाचें स्थान अनन्यलभ्य आहे.

मुंबई येथील कामाकडे सावरकरांचें लक्ष वळत आहे तोंच त्यांना पुण्याचें तांतडीचें निमंत्रण आलें. दि. १७-२-०६ रोजीं अगम्य गुरु नांवाचे एक बुवा पुण्यांत आले. हे बुवाजी पूर्वी एकदां इंग्लंडची वारी करून आलेले असल्यामुळें व त्यांच्या बोलण्यांत देशभक्तीची छटा असल्यामुळें, त्यांची नि टिळकांची ओळख यापूर्वीच झालेली होती. पुण्याच्या विद्यार्थ्यांमधील जागृतीची जाणीव या बुवाजींपर्यंत पोंचली होती, असें दिसतें. या जागृतीचा ओघ आपल्याकडे वळवावा अशी इच्छा बुवाजींच्या मनांत उद्भवली व पुण्यांतल्या विद्यार्थ्यांनीं दरडोई कांहीं वर्गणी देऊन निधि गोळा करावा, असेंहि त्यांनीं सुचविलें. पुढें काय करावयाचें हें मी तुमच्या वेंचक प्रतिनिधींपाशीं बोलेन, असें बुवाजी म्हणाले. त्यांमुळें, विद्यार्थ्यांच्या प्रतिनिधींचा पुढाकार घेऊन सावरकरांनीं बुवांना भेटावें, असें सुचविण्यांत आलें. सावरकरांकडे तार धाडण्यांत आली तेव्हां ते तांतडीनें पुण्यास निघून आले. विद्यार्थ्यांनीं ठरविलेंच होतें म्हणून सावरकर बुवांना भेटले. पण, बुवांनीं सांगावें व सावरकरांनीं ऐकावें असें विशेषसें कांहीं बुवांजवळ नव्हतेंच ! पुण्यांतल्या सावरकरांच्या अनुयायांनासुद्धां बुवांचें महत्त्वमापन करतां आलें असतें, नाहीं असें नाहीं ! पण, अंगाला विभूति चोपडलेला, कमरेचें वस्त्र उणेंपुरें सोडून हिंडायला सवकलेला किंवा भगवीं पांघरणारा असा लोकविलक्षण म्हणजेच विक्षिप्त माणूस दिसला कीं, विवेकबुद्धि गवसणींत अडकविण्याची संवयच हिंदुमनाला जडलेली असल्याकारणानें, पुण्यांतल्या तत्कालीन विद्यार्थ्यांना सावरकरांना तार धाडावी लागली व या 'अगम्य' गुरूंत विशेष कांहीं नाहीं, हें पटवून घ्यावें लागलें !

सावरकर व 'अगम्य' गुरु यांच्या भेटीची हकीकत अशा प्रकारची आहे. एका सरकारी इतिवृत्तांत या भेटीचा [illegible] करण्यांत आला नसता तर या भेटीला कोणीहि फारसें महत्त्व दिलें नसतें. '१९०५ सालच्या प्रारंभीं महात्मा अगम्य गुरूंनीं सुरू केलेल्या आंदोलनांत विनायक सावरकर सापडला' अशा आशयाचें Sedition Committee Report मधील वाक्य[2] [illegible] निराधर आहे, हें सावरकरांच्या चरित्राची

---

१ भाई परमानंद यांचें जीवनचरि[illegible] ६०-६१.

2 Before [illegible]ing India, Vi[illegible]kar had been d[illegible] into a movement i[illegible]ed early in 1905 [illegible] styling himself [illegible]ma Sri Agamya Guru paramhansa, who [illegible] India delivering le[illegible] and speaking fearlessly against Gove[illegible]lling his audience [illegible] to fear Government. —Sedi[illegible]ttee Report : p [illegible]

जी रूपरेषा येथवर देण्यांत आली आहे तिच्यावरून कोणाच्याहि लक्षांत येऊं शकले सावरकर इंग्लंडांत असतांना 'महात्मा अगम्य गुरू परमहंस' हेहि इंग्लंडमध्यें होते. सावरकरांचा व त्यांचा या काळांत कांहीं संबंध आल्याचें आढळत नाहीं. या परमहंस गुरूंच्या लीलांची दिशा कांहीं वेगळीच असावी असें सुचविणार स्वतंत्र पुरावा मात्र उपलब्ध आहे. टिळकांना मंडालेस धाडण्यांत आल्यानंतर, त्यांच्या शिक्षेविरुद्ध प्रीव्हि कौन्सिलकडे दाद मागण्यासाठीं श्री. दादासाहेब खापर्डे व सातारचे सुप्रसिद्ध वकील श्री. दादासाहेब करंदीकर असे उभयतां इंग्लंडला गेले. श्री. दादासाहेब करंदीकर यांनीं आपल्या प्रवासांत व इंग्लंडमधील वास्तव्यांत आप्तेष्टांना व सातारच्या मित्र-मंडळींना जीं विस्तृत पत्रें धाडिलीं तीं १९३५ सालीं Letters from England: 1908 या नांवानें ग्रंथरूपानें प्रसिद्ध झालीं आहेत. या पत्रांपैकीं क्रमांक पंचेचाळीस या पत्रांत अगम्य गुरूंचा उल्लेख[1] करण्यांत आला आहे. हा उल्लेख गुरूंना फारसा भूषणावह नाहीं, हें कोणाच्याहि सहज लक्षांत येईल. मंगळवार दि. २७-१०-१९०८ रोजीं लिहिलेल्या या पत्रांत श्री. दादासाहेब करंदीकर म्हणतात :

> *हे कारस्थानी गृहस्थ असावेत असा पोलिसांस संशय आला. त्यांच्या बोलण्यांतहि इंग्रजी राज्याविषयीं विरुद्ध मजकूर फार येऊं लागला. अशा संधीस यांचे घरीं कोणीं मोलकरीण होती तिजवर यांनीं हात टाकला अशी त्या मोलकरणीनें फिर्याद केली; व, इकडील बॅरिस्टर लोकांचे सल्ल्याप्रमाणें अगम्य गुरूंनी जबाब दिला. त्यासरशीं त्यांस चार महिन्यांची सजा झाली. नुकतेच, म्हणजे सरासरी १५ दिवस झाले, ते सुटून आले. पहिल्या अंकाची इतिश्री झाली! आतां त्यांचे पुढील क्रम ठरणार!*

अगम्य गुरूंना भेटून सावरकर पुण्याहून मुंबईस परत आले त्यानंतर थोड-क्याच दिवसांनीं त्यांच्या हातीं पंडित शामजी कृष्णवर्मा यांच्या इंडियन सोशिऑलॉ-जिस्ट पत्राचा एक अंक पडला. सावरकर पुण्यास कॉलेजांत होते तेव्हांच पंडित शामजी कृष्णवर्मा यांचें नांव त्यांनीं ऐकिलें होतें. १९०५ सालच्या जुलै महिन्यांत केसरींत पंडित शामजी कृष्णवर्मा यांच्या अनेकविध चळवळी व त्यांनीं लंडन येथें सुरू केलेलें 'इंडिया हाउस' यांच्यासंबंधींचा संपादकीय लेख आला होता. त्यावरून-हि सावरकरांना पंडितजींच्या कार्याबद्दलची कांहीं कल्पना करतां आली असेल, यांत संशय नाहीं. पंडितजींच्या पत्राच्या ताज्या अंकांत एका नव्या कल्पनेची रूपरेषा मांड-ण्यांत आली होती. होतकरू व देशाभिमानी तरुणांना स्वतंत्र देशांत राहून राजकीय तत्त्वज्ञानाचा व व्यवहाराचा अभ्यास करतां यावा यासाठीं, कांहीं निवडक तरुणांना शिष्यवृत्त्या देण्याचा आपला विचार असल्याचें पंडितजींनीं जाहीर केलें होतें. हा मजकूर वाचल्यावर, चालून आलेल्या या संधीचा फायदा घेण्याचा विचार साव-र-

---

१ पृ. २०७

करांच्या मनांत घोळूं लागला. पण, शिष्यवृत्ति म्हणून पंडितजींकडून मिळणारी रक्कम इंग्लंडमधील खर्चिक राहणीच्या मानानें अपुरी ठरणार होती. अशा अपुऱ्या मदतीच्या आश्वासनावर परक्या देशांत जाणें दूरदर्शीपणाचें नाहीं हें ओळखून, सावरकरांनीं आपल्या श्वशुरांची भेट घेतली. इंग्लंडमधील अभ्यासाच्या काळांत पुरवणीदाखल जी मदत लागेल ती देण्याचें आश्वासन श्री. भाऊराव चिपळूणकर यांनीं दिल्यावर, सावरकरांनीं पंडित शामजी कृष्णवर्मा यांजकडे अर्ज पाठविण्याचें ठरविलें! या योजना जुळवून आणण्यांत बराच वेळ गेला असला पाहिजे; कारण, सावरकर यांनीं दि. ९-३-१९०६ रोजीं मुंबई येथून पंडित शामजी कृष्णवर्मा यांजकडे जो अर्ज धाडला, तो अगदीं अखेरच्या तारखेस, विलायतच्या डाकेची घटका भरत आली म्हणून पेन्सिलीनेंच खरडून धाडला, असें डॉ. वि. म. भट यांनीं स्मरणपूर्वक लिहिलें आहे. भाऊराव चिपळूणकर यांनीं एकूण दोन हजार रुपयांच्या मदतीचें आश्वासन सावरकरांना दिलें होतें, ही गोष्ट त्यांच्या अर्जातच नमूद करण्यांत आली आहे. भाऊराव चिपळूणकर हे ही रक्कम सर्वस्वीं स्वतःच्या जबाबदारीवर देणार होते कीं यांतला कांहीं अंश देण्याचें आश्वासन जव्हारच्या अधिपतींकडून मिळालें होतें, ही त्या संस्थानच्या अंतर्गत कारभारांतली नाजूक बाब असल्यामुळें, तिचा उलगडा आतां तरी होणें शक्य नाहीं! जव्हारचे अधिपति राजे कृष्णशहा यांची व सावरकरांची भेट या सुमारास केव्हां तरी झाली होती, हें मात्र सावरकर यांनीं १९०६ सालीं रचलेल्या एका कवितेवरून स्पष्ट दिसत आहे. या कवितेचे एकंदर १८ श्लोक आहेत. पहिला श्लोक तर शुद्ध संस्कृतांतच रचला आहे. कवितेच्या पूर्वार्धांत जे नऊ श्लोक आहेत, त्यांत विशेष असें कांहीं नाहीं. राजे कृष्णशहा, त्यांच्या कुटुंबांतील मंडळी, त्यांचा परिवार, त्यांचे गुण, त्यांचें वैभव इत्यादींच्या वर्णनांत हे श्लोक खर्ची पडलेले आहेत. ज्या प्रभुरामचंद्राच्या कृपेमुळें इतर राजांप्रमाणेंच आपणहि जगदीश झालांत, त्या रामचंद्राच्या चारित्राचें रहस्य आपण अहर्निश मनांत चिंतीत असावें असें सुचविण्यासाठीं या कवितेच्या उत्तरार्धांत जे आठ श्लोक लिहिले आहेत, ते मात्र सूचक आहेत. राघवाचें चरित्र उद्बोधक, उत्तेजक व सांकेतिक आहे असें म्हणून सावरकरांनीं या चरित्राचें रहस्य पुढील श्लोकांत गायिलें आहे :

सिंधूमधें राक्षसबेट लंका। दे रावणा जन्म जगत्कलंका ॥
गांजी बळें आर्य वसुंधरा ही। माता नृपा आपुलि सुंदरा ही ॥
भूक्रंदनें राघवचापपाणी। सलज्ज आणी नयनांस पाणी ॥
म्हणे स्वदेशासि गुलाम केला। धिःकार माझ्या तरि जीविताला ॥
बटीक आई असतांहि हाय। राजा मला मी म्हणवीत काय! ॥
छातीवरी रावण हाणि लाथा। घालूं तरी कीं मुकुटासि माथा? ॥

शत्रूवरी श्रीरघुनाथ घाला । घालावयाला चिर सज्ज झाला ।।
छाटी अरीच्या दशकंदरांही । करी स्वयें मुक्त वसुंधरा ही ।।

राघवाच्या चरित्राचें रहस्य सूचित केल्यावर सावरकरांनीं राजे कृष्णशहा यांचेजवळ एक मागणें मागितलें आहे. राजे कृष्णशहा यांनीं आपलें कांहींहि कमी पडूं दिलेलें नाहीं अशी कबुली कृतज्ञतापूर्वक दिल्यावर, आपली निःस्वार्थीपणाची मागणी पुढें ठेवतांना सावरकर लिहितात :

म्हणोनि एक्या करिं मागणीतें ।
स्वार्थार्थ कांहीं न लगे मला तें ।
कमी तुम्ही तें मज काय केलें ।
व्हावें तरी मन्मन हें भुकेलें ? ।
परंतु कीं आर्य वसुंधरा ही ।
माता नृपा आपुलि सुंदरा ही ।
गेलें तिचें तें तिज द्यावयातें ।
झटेन ह्या दे वचनासि मातें ।।

सावरकर यांनीं दि. ९-३-१९०६ रोजीं पंडित शामजी कृष्णवर्मा यांचेकडे जो अर्ज धाडला, त्या अर्जाच्या पूर्वार्धात त्यांनीं आपली विशेष लायकी म्हणून अनेक गोष्टींचें वर्णन केलेलें आहे. त्यांत त्यांनीं स्वदेशी आंदोलनांतल्या आपल्या कार्याचा प्रामुख्यानें उल्लेख केला आहे. या कार्यामुळें कॉलेजच्या अधिकाऱ्यांची आपल्यावर अवकृपा झाली तेव्हां 'केसरी' व 'काळ' पत्रांच्या संपादकांनीं आपल्याबद्दल सहानुभूति व्यक्त केली होती या गोष्टींचाहि उल्लेख सावरकरांनीं केला आहे. 'काळ'कर्ते परांजपे यांच्या अध्यक्षतेखालीं झालेल्या एका जाहीर सभेंत 'भालाकार' भोपटकर यांनीं आपल्याविषयीं सहानुभूति व्यक्त केली असें लिहिल्यावर, राजद्रोहाच्या गुन्ह्याबद्दल भालाकार सध्यां कारावास सोशीत आहेत, या गोष्टीचा सावरकरांनीं स्मरणपूर्वक उल्लेख केला आहे. आजवरच्या आपल्या जीवनांत देशस्वातंत्र्याचा विचार आपण किती तळमळीनें केला आहे हें पंडित शामजी कृष्णवर्मा यांना पटावें म्हणून सावरकरांनीं या पत्रांत पुढील वाक्यें[1] लिहिलीं आहेत :

(Independence and liberty) I look upon as the very pulse and breath of a nation. From my boyhood, dear sir, upto this moment of my youth, the loss of Independence of my country and the possibility of regaining it form the only theme of which I dreamt by night and on which I mused by day.

(स्वातंत्र्य ही राष्ट्राची नाडी आहे, तें राष्ट्राचें निश्वसित आहे, असें मी समजत आलों आहे. बालवयापासून माझ्या तारुण्यांतील या क्षणापर्यंत मी जर झोंपेंत

1 Mahratta : 23-5-1941.

कशाचीं स्वप्नें पाहिलीं असतील आणि जागृतावस्थेंत कशाचा विचार केला असेल तर तो एकाच विषयाचा केला आहे. देशाच्या स्वातंत्र्याची झालेली हानि आणि तें स्वातंत्र्य परत मिळविण्याची शक्यता हा एकच माझ्या चिंतनाचा विषय झाला आहे.)

ह्या अर्जाचा पश्चाल्लेख म्हणून सावरकरांनीं जो मजकूर लिहिला आहे त्यावरून असें दिसतें कीं, 'विहारी' पत्राच्या संपादकमंडळांतील श्री. चिपळूणकर हेहि या वेळीं एकादी शिष्यवृत्ति मिळवून इंग्लंडला जाण्याचा विचार करीत असावे. सावरकरांनीं हा अर्ज केला त्या वेळीं दे. भ. लाला लजपतराय यांनासुद्धां सावरकरांचें नांव माहीत झालेलें होतें, असेंहि या पश्चाल्लेखावरून दिसतें.

सावरकरांनीं अर्ज घाईघाईनें पाठवून दिला व अवश्य तीं प्रशस्तिपत्रें पाठविण्याची व्यवस्था त्यांनीं मागाहून केली, असें दिसतें. 'काळ'कर्ते परांजपे व लोकमान्य टिळक या दोघाहि देशभक्तांनीं सावरकरांना प्रशस्तिपत्रें दिलीं होतीं. टिळकांनीं आपलें प्रशस्तिपत्र लिहिलें त्या वेळीं त्यांना अशी माहिती मिळाली होती कीं, आपल्याला शिष्यवृत्ति मिळावी म्हणून पंडितजींकडे अर्ज धाडणारांची संख्या दीडशेंच्या आसपास गेलेली आहे. सावरकरांची शिफारस करणारें पत्र टिळकांनीं पुण्याहून दि. १६–३–१९०६ रोजीं लिहिलें. या पत्रांतील पुढील भाग[1] उद्धृत करण्याजोगा आहे :—

When there is a rush like that, it is no use to recommend any one particularly to your notice. But, still, I may state that, among the applicants there is one Mr. Sawarkar from Bombay who graduated last year and whom I know to be a spirited young man, very enthusiastic in the Swadeshi cause, so much so that he had to incur the displeasure of the Fergusson College authorities last year. He has no mind to take up Government service at any time and his moral character is very good.

(अर्जदारांची अशी गर्दी असल्यामुळें, कोणा एखाद्या विशिष्ट अर्जदाराबद्दल विशेष कांहीं लिहून त्यांच्याकडे तुमचें लक्ष वेधावें हें मोठेंसें उपयुक्त ठरण्यासारखें नाहीं. असें असलें तरी, मी एका गोष्टीचा उल्लेख करूं इच्छितों. या अर्जदारांमध्यें मुंबईचा सावरकर या नांवाचा एक तरुण आहे. हा तरुण गेल्या सालीं पदवी-परीक्षेंत उत्तीर्ण झाला. हा तरुण मोठा तडफदार आहे आणि स्वदेशीच्या कार्यांतील त्याचा उत्साह इतका विलक्षण आहे कीं, त्याच्या निर्भीड वक्तृत्वामुळें गेल्या सालीं त्यानें फर्ग्युसन कॉलेजच्या अधिकारीवर्गाचा रोष स्वतःवर ओढवून घेतला होता. सरकारी नोकरी कधींच करावयाची नाहीं हा या तरुणाचा बाणा आहे. त्याचें शील वाखाणण्यासारखें आहे.) सावरकरांचा अर्ज रवाना झाल्यावर व टिळक-परांजपे या जोडीचीं शिफारसपत्रें मार्गस्थ झाल्यावर सावरकरांच्या मनांत एक संशय उभा राहिला. आपण सरकारी नोकरी करणार नाहीं असें लेखी आश्वासन त्यांनीं यापूर्वींच पंडितजींकडे पाठविलें होतें. पण कायद्याचा अभ्यास करून वकील

1 Mahratta : 26-7-1936,

अगर बॅरिस्टरी करण्याच्या मार्गाला लागणें हेंहि सरकारला मदत करण्यासारखेंच आहे अशी विक्षिप्तपणाची शंका कोणी तरी काढल्यामुळें, या बाबतींतलें आपलें म्हणणें पंडितजींना खुलासेवार कळविणें सावरकरांना अवश्य वाटलें. हा खुलासा करण्यासाठीं, सावरकर यांनीं दि. १-५-१९०६ रोजीं पंडित शामजी कृष्णवर्मा यांना एक पत्र लिहिलें.

सावरकरांच्या अर्जाला टिळक-परांजपे, या देशभक्तांचा पाठिंबा असल्यामुळें अशा खुलाशाची वस्तुतः कांहींच जरुरी नव्हती. ज्या शिष्यवृत्त्या देण्याचें पंडितजींनीं जाहीर केलें होतें त्यांतली शिवाजी शिष्यवृत्ति सावरकरांना देण्यांत आल्याचें वृत्त मे महिन्याच्या आरंभींच हिंदुस्थानांत येऊन पोहोंचलें असलें पाहिजे. सावरकरांना दर सहा महिन्यांना ४०० रुपये या दरानें पांच हप्त्यांत मिळून २००० रुपये या शिष्यवृत्तिच्या द्वारा मिळावयाचे होते. शिष्यवृत्ति स्वीकारण्याचे वेळीं प्रत्येक अर्जदारानें पंडितजींच्या नांवें एक करार करून द्यावयाचा असे. दि. २०-५-१९०६ रोजीं सावरकर यांनीं या करारावर पुणें येथें स्वाक्षरी केली. श्री. दाजी नागेश आपटे व श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर यांनीं साक्षीदार म्हणून या करारनाम्यावर आपल्या स्वाक्षऱ्या केलेल्या आढळतात. सावरकर व पंडितजी यांच्या दरम्यान कांहीं बेबनाव झाला तर बेबनावाचें सर्व प्रकरण त्रयस्थ या नात्यानें टिळकांकडे सोंपविण्यांत यावें असेंहि एक कलम या करारांत आढळतें. सावरकरांनीं हा करार पुरा केल्यावर, टिळकांनीं दि. २५-५-१९०६ रोजीं पंडित शामजी कृष्णवर्मा यांना पुढील पत्र लिहिलें :

According to your instructions, I have paid Rs. 400 ( the cheque ) to Mr. Savarkar who leaves by to-morrow's mail steamer. I enclose herewith the agreement on stamped paper signed by him as per your draft.

The other gentleman, Mr. M. Ahamed, has not come here nor informed me of his whereabouts, I have written a letter to him inquiring what he intends to do. I hope to get his reply soon.

( आपल्या सूचनांप्रमाणें मी चारशें रुपयांचा चक सावरकरांना दिला आहे. उद्यांच्या टपाल बोटीनें ते मुंबईहून निघत आहेत. तुम्ही धाडिलेल्या मसुद्याबरहुकूम स्टॅंपावर लिहिलेल्या करारावर सावरकरांची सही झाली आहे. तो कागद मी या पत्रासोबत धाडीत आहें. मि. अहंमद हे दुसरे तरुण इकडे आलेले नाहींत व त्यांनीं स्वतःबद्दल कांहींच मला कळविलें नाहीं. त्यांचा विचार तरी काय आहे हें कळावें यासाठीं मी त्यांना पत्र धाडलें आहे. लौकरच त्याचें उत्तर येईल, असें वाटतें ).

दि. २६-५-१९०६ रोजीं सावरकर मुंबईहून निघतील असें टिळकांनीं लिहिलें खरें; पण, सावरकर त्या दिवशीं निघणाऱ्या "मॅसिडोनिया" बोटीनें निघू शकले नाहींत. ते नाशिकहून निघाले तेव्हां त्यांना निरोप देण्यासाठीं भद्रकालीचे



उभे डावीकडून —(१) विष्णु महादेव भट, (२) सावरकर, (३) हरि अनंत थत्ते, (४) गणेश विष्णु रानडे, (५) गणेश हरि ओक, (६) गणेश वासुदेव जोगळेकर. बसलेले—(१) वासुदेव नारायण मोहोळकर, (२)एस्. व्ही. गोखले, (३) कृष्णाजीपंत संत, (४) बाळकृष्णपंत गोडबोले. (५) वैद्य. जमिनीवर— गणपतराव फडके.

एअरगन वापरण्याचा सराव करीत असलेले



इंग्लंडमधील सावरकर

देवळांत श्री. हरिशास्त्री गर्गे यांच्या अध्यक्षतेखालीं मोठी थाटाची जाहीर सभा भरविण्यांत आली. ते निघणार त्या सुमारास त्यांचीं भावंडें, त्यांच्या वहिनी, त्यांची पत्नी, भाऊराव चिपळूणकरांच्या घरांतली सर्व मंडळी, अनेक इष्टमित्र वगैरे किती तरी मंडळी मुंबईस आली होती. प्रयाणापूर्वी कित्येक वेळां सावरकर आपल्या श्वशुरांबरोबर सरदारगृहांतच उतरत असत. आपल्या या तेजस्वी जामातांची बडदास्त उत्तम प्रकारें ठेवण्यांत भाऊराव चिपळूणकर यांना एक प्रकारचा अभिमानच वाटत असे. आपले जामात तीनचार वर्षांनीं बॅरिस्टर होऊन परत येतील; मग कदाचित् ते आपल्या जव्हार संस्थानांतच एकाद्या उच्चपदीं विराजमान होतील अगर स्वतंत्रपणें बॅरिस्टरी करून वैभव व कीर्ति हस्तगत करतील, अशीं सुखस्वप्नें या वेळीं भाऊराव चिपळूणकर यांच्या दृष्टीसमोर तरंगत असतील ! सावरकर यांच्या दृष्टीसमोर या वेळीं बहुधा वेगळींच स्वप्नें खेळत असतील ! फर्ग्युसन कॉलेजमध्यें शिक्षण घेतांघेतां आपण साऱ्या महाराष्ट्रांतल्या तरुणांचीं मनें स्वातंत्र्याभिमुख व क्रांतिप्रवण बनविलीं ! इंग्लंडमधल्या वास्तव्यकाळांत आपल्याला साऱ्या हिंदुस्थानांतून इंग्लंडला जाणाऱ्या निवडक तरुणांच्या गांठीभेटी घेतां येतील–त्यांचेंहि मानसिक परिवर्तन आपण घडवूं शकलों तर आपल्या ध्येयसिद्धीच्या दृष्टीनें ती गोष्ट फार उपयुक्त ठरेल, अशा विचारांच्या तंद्रींत सावरकरांचें मन या वेळीं बहुधा दंग झालें असेल ! आपल्या आप्तेष्टाचा निरोप घेऊन ते दि. ९-६-०६ रोजीं 'पर्शिया' बोटीवर चढले–आपल्या प्रिय मातृभूमीपासून कांहीं काळपर्यंत दूर राहण्यासाठीं त्यांनीं या बोटीवर पाय ठेवला. त्या वेळीं भविष्यकाळासंबंधींच्या किती तरी अस्फुट कल्पना त्यांच्या मनांत वावरत असतील !

———

# प्रकरण ४ थें

# पं. शामजी कृष्णवर्मा नि सावरकर

तेजोद्वयस्य युगपद् व्यसनोदयाभ्याम् ।
लोको नियम्यत इवात्मदशांतरेषु ॥ —कालिदास.

सावरकर ज्या बोटीनें इंग्लंडला निघाले त्या बोटींतूनच इंग्लंडला निघालेल्या हिंदी प्रवाशांची जी नामावळी त्या वेळच्या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाली आहे त्यांत प्रसिद्ध हिंदी देशभक्त श्री. रमेशचंद्र दत्त यांचें नांव आढळतें. सरकारी सेवेंतून निवृत्त झालेला हा गाढा पंडित व सरकारी सेवेंत शिरावयाचें नाहीं असा निर्धार करूनच तारुण्यांच्या उंबरठ्यावर प्रवेश करणारे सावरकर यांची या बोटीवर प्रथम ओळख झाली. यापुढील दोनतीन वर्षांच्या अवधींत या दोन देशभक्तांच्या इंग्लंडमध्यें अनेकवार भेटी होण्याचा योग या प्रवासांतच ठरून गेल्यासारखा झाला. श्री. हरनामसिंग या नांवाचे एक पंजाबी तरुण या बोटीवरील एक उतारू म्हणून सावरकरांच्या परिचयाचे झाले. घर सोडून प्रवासासाठीं बाहेर पडण्याचा अनुभवच या तरुणाला नसल्यामुळें, अर्ध्या वाटेंतूनच हिंदुस्थानास परत जावें असा मोह त्याला होऊं लागला होता. सावरकरांनीं समजुतीच्या अनेक गोष्टी सांगून हरनामसिंगजींचें मन खंबीर बनविलें व परत फिरण्याच्या त्यांच्या संकल्पापासून त्यांना परावृत्त केलें.[1] प्रवासांत जमलेला या दोघा भारतीय तरुणांचा स्नेह यापुढील अनेक अवस्थांतरांतून निभावून जाऊन अद्याप कायम टिकलेला आहे हें सावरकरांनीं नुक्ताच काश्मीरांत दौरा काढला होता त्या वेळीं सिद्ध झालें.

---

1 Life of Barrister Savarkar by Chitra Gupta या पुस्तकांत पृ ३४–३५ वर सावरकरांचे शब्द जसेच्या तसे वर्णून सांगण्याचा प्रयत्न केलेला आहे. सावरकर श्री. हरनामसिंग यांना उद्देशून म्हणाले :

Look here, friend, how unmanly our race is daily growing. Not a couple of centuries have yet passed when Maratha women not only sailed the waters of Bombay but even commanded flotillas······We, young men, tremble to sail even amidst these luxurious conveniences······No! No! you must not go back. You say your mother is rich and cares not a jot fora Barrister's practice. But, friend, the Mother of our mothers—our Motherland-is not so rich, She wants her sons to go to foreign lands for a while that they may learn what the world is like, what the strength of their foes and what the weaknesses of themselves. She wants them to grow strong, manly and daring.

( मित्रा दिवसेंदिवस आपला हा वंश किती पौरुषहीन बनत चालला आहे पहा! महा-

[पुढील पृष्ठावर चालू]

या प्रवासांत ' पर्शिया ' आगबोट सुवेजच्या कालव्यांत शिरल्यावर, वर तारांकित नभांगण व खालीं शांत जलाशय असें दृश्य सावरकरांना दिसलें. तें मनोहर दृश्य पहातांच त्यांची खेळकर कल्पकता ( Fancy ) जागृत झाली. या जागृतीमुळें त्यांना जी कविता स्फुरली ती अतिशय रम्य आहे. ' शेले ' च्या ' स्कायलार्क ' मध्यें किंवा दत्त कवींच्या ' विश्वामित्रीच्या कांठीं ' या कवितेमध्यें कल्पकतेचा जो स्वच्छंदविलास आढळतो तशाच प्रकारचा कल्पकतेचा विलास सावरकरांच्या या कवितेंत आढळतो. प्रवासांत स्फुरलेली ही कविता सावरकरांनीं १९०८ सालच्या फेब्रुवारीअखेरीस लिहून काढली असली पाहिजे आणि ती आपले धाकटे बंधु नारायणराव यांच्याकडे धाडिली असली पाहिजे. ' विहारी ' साप्ताहिकाच्या दि. १०–२–१९०८ च्या अंकांत ' पहिला जोहार ' हा संपादकीय लेख प्रसिद्ध झाला. तो नारायणराव सावरकर यांनीं लिहिलेला आहे. या लेखाचें कात्रण नारायणरावांनीं लंडनला धाडिलें. तें वाचल्यावर सावरकरांना आश्चर्य वाटलें; कारण, या लेखांतील एक कल्पना व सावरकरांनीं प्रवासांत रचिलेल्या कवितेंतील एक कल्पना यांमध्यें विलक्षण साम्य आहे. चितोडच्या पतिव्रतांनीं केलेल्या जोहाराचें वर्णन करतांकरतां नारायणराव सावरकर यांनीं पुढील कल्पना खेळविली होती :

*इतक्यांत अलाउद्दिनानें तेथें येऊन सति पद्मिनीचा शोध चालविला तोंच चितेंतून रक्ताची एक चिळकांडी अतिशय उंच उडाली व लगेच एक तारका रक्तवर्णा दिसूं लागली. तेव्हां सर्व म्हणाले कीं, हा चिळकांडी त्या महाभाग पद्मिनीच्या रक्ताची आहे. तें रक्त मंगल आहे. तें या तारकेवर उडालें म्हणून लोक तेव्हांपासून त्या तारकेला मंगलाची तारका असें नामाभिधान देतात.*

सावरकरांना प्रवासांत स्फुरलेली कविता पुढीलप्रमाणें आहे. या कवितेच्या पांच टप्प्यांपैकीं चौथ्या टप्प्यांत सावरकरांनीं जी कल्पना खेळविली आहे तिचें वरील अवतरणांत व्यक्त झालेल्या कल्पनेशीं साम्य आहे, हें कोणाच्याहि सहज लक्षांत येईल :

---

राष्ट्रांतल्या महिला मुंबईच्या आसपास समुद्रांतून नावा चालवीत इतकेंच नव्हे तर त्या नौसमूहाचें आधिपत्यहि करीत ! या घटनेला अजून दोन शतकेंहि पुरीं झालीं नाहींत ! ... अशा आरामशीर सोई असूनहि जलप्रवास करण्याला आपण तरुण आज घाबरतों ! ...छे ! तूं परत जातां कामा नये ! ' माझ्या मातोश्री सधन आहेत, बॅरिस्टरी करून मी मिळविलेल्या पैशांची त्यांना काडीमात्र किंमत नाहीं' असें तूं म्हणतोस; पण, मित्रा, तुझ्या–माझ्या सगळ्यांच्या मातांची माता अशी जी आपली राष्ट्रमाता ती सधन नाहीं ना ! कांहीं काळपर्यंत आपल्या लेंकरांनीं परदेशांत रहावें, तेथील वास्तव्यांत त्यांनीं जग कसें आहे हें पाहून घ्यावें, शत्रूचें बळ कशांत आहे, आपलें दौर्बल्य कशांत आहे हें शिकून घ्यावें, अशी आपल्या मायभूची इच्छा आहे. आपल्या लेंकरांनीं सबळ व्हावें, पौरुषसंपन्न व्हावें, धाडसी व्हावें अशी आपल्या मायभूची अपेक्षा आहे.)

## ज्योतिषी भलेभले चकले !

आकाशींचे तारे सागरिं प्रतिबिंबित होती ।
किंवा आकाशीं हे चमकति सागरिंचे मोती ।
पळवुनि जानकि दशाननानें नभःपथें नेली ।
अश्रुबिंदु जे देवी टपटप ढाळित त्या काळीं ।
तेच राहिलां असा चकाकत जाणों दिव्य बळें ।
तुम्हांस तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले ! ॥ १ ॥

पाहुनिया अप्सरोगणांनीं वसुधेवर खालीं ।
चमेलि, जाई, जुई, मोतिया, मोगरि बहु फुलली ।
अपुल्या नंदनवनीं असावीं ऐशीं काम्य फुलें ।
पेरुनियां तें दिलें नभीं मग मधुर हास्य अपुलें ।
सुरसुंदरिहास्यास ऋतुंत त्या आलीं दिव्य फुलें ।
तयांसि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले ॥ २ ॥

सुवर्णगौरा गौरिसि श्रीहर सुरतमग्न झाले ।
थाप पडे तों द्वारीं श्रीहरि भेटाया आले ।
नग्ना गिरिजा लगबग धांवे सांवरुं शालूला ।
हिसका बसला, हार गळ्यांतिल तट्कन् तो तुटला ।
तेव्हां त्यांतिल मोती सैरावैरा ओघळले ।
तयांसि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले ॥ ३ ॥

नरकपतीचा हल्ला आला चितोडनगराला ।
देवांनाहि स्वर्गिं जलदिनें वर्दी द्यायाला ।
सिद्धाग्नींतुनि फक्कन् ज्वाळालोळ नभीं उठती ।
चितोडगडवासिनी देवि तों त्यावरि आरुढती ।
ज्वालारूढा देवि दुरुनि त्या चमकाति तेजोबळें ।
तयांसि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले ॥ ४ ॥

आकाशाच्या ग्रंथसंग्रहालयासि अर्पियला ।
कालें ग्रंथ प्रचंड विश्वें इतिहास जो लिहिला ।
रौप्यमुद्रिकांकित तद्भागा अनुक्रमें खचिलें ।
तयांसि तारे म्हणुनि ज्योतिषी भलेभले चकले ॥ ५ ॥

जुलैच्या प्रारंभीं सावरकर लंडनला पोंचले व 'इंडिया हाउस' मध्यें आपलें वास्तव्य थाटून त्यांनीं आपल्या लंडनमधल्या दिनक्रमाला व कार्यक्रमाला प्रारंभ केला. या कार्यक्रमाची कल्पना यथार्थत्वानें करतां यावी म्हणून 'इंडिया हाउस'

हीं संस्था, त्या संस्थेचे संस्थापक पं० शामजी कृष्णवर्मा व पंडितजींच्या प्रभावळींतली व सहवासांतली कांहीं ठळकठळक मंडळी या सर्वांचें थोडकेंसें वर्णन या ठिकाणींच करून ठेवणें अवश्य आहे. दि. ४-१०-१८५७ रोजीं मांडवी [काठेवाड] येथें भनसाळी समाजांत शामजी कृष्णवर्मा यांचा जन्म झाला. ते दहा वर्षांचे झाले तत्पूर्वींच त्यांचे वडील व मातुश्री हीं मृत्यु पावलीं होतीं. यानंतर थोडक्याच दिवसांत शामजी हे इंग्रजी शिक्षणासाठीं मुंबईस आले व प्रथमतः कांहीं दिवस विल्सन हायस्कुलांत गेल्यावर ते पुढें एल्फिन्स्टन हायस्कुलांत जाऊं लागले. इंग्रजी शिक्षण चालू असतांनाच शामजींचें संस्कृत अध्ययनहि चालू होतें व संस्कृत पाठशाळेंत जाऊन शामजींनीं जुन्या वळणाचें संस्कृत पांडित्य पदरांत पाडून घेण्याचा नेटाचा प्रयत्न केला. परलोकवासी शेठ छबिलदास लल्लूभाई यांचे चिरंजीव शेठ रामदास हे श्यामजींचे एल्फिन्स्टन हायस्कुलांतील परिचित. या परिचयाचें पुढें आप्तपणांत रूपांतर झालें. शेठ छबिलदास लल्लूभाई यांची मुलगी भानुमती व शामजी कृष्णवर्मा यांचा १८७५ सालीं विवाह झाला.

१८७६ सालीं शामजी कृष्णवर्मा हे मॅट्रिक परीक्षेला बसावयाचे; पण, डोळे बिघडल्यामुळें त्यांना परीक्षेला बसतां आलें नाहीं. या सुमारास प्रो. मॉनियर वुइल्यम्स हा संस्कृतभाषाभिज्ञ इंग्रज हिंदुस्थानांत आला होता. जुन्या पद्धतीनें संस्कृतचें अध्ययन केलेल्या एका नवशिक्षिताच्या मदतीची मॉनियर वुइल्यम्सला गरज आहे असें कळल्यावर, शामजींनीं त्या दिशेनें यत्न चालविले. आपल्याला व आपल्या पांडित्याला समाजांत कांहीं मान्यता आहे ही गोष्ट मॉनियर वुइल्यम्सला पटवून देण्याचा एक मार्ग म्हणून शामजींनीं आर्यसमाजाच्या मतप्रचारकाची भूमिका पत्करून, १८७७ सालीं हिंदुस्थानभर दौरा काढला. या दौऱ्यांत शामजींनीं नाशिक, पुणें, अहमदाबाद, बनारस, लाहोर वगैरे ठिकाणीं संस्कृत भाषेंत व्याख्यानें दिलीं. कै० गोपाळराव हरि देशमूख अर्थात लोकहितवादी यांच्याशीं शामजी कृष्णवर्मा यांचा परिचय यापूर्वींच झालेला होता.

पैशांची जमवाजमव करून शामजी १८७९ सालीं मार्च महिन्यांत इंग्लंडला गेले. ज्या मॉनियर वुइल्यम्सच्या आशेवर ते गेले होते, त्यानें त्यांना मोठासा आधार दिला नाहीं; पण, त्यामुळें शामजी निराश झाले नाहींत. १८७९ सालीं एप्रिलच्या शेवटीं त्यांनीं ऑक्सफर्ड येथील बेलियल कॉलेजमध्यें नांव दाखल केलें. व १८८३ सालीं ते ऑक्सफर्डचे बी. ए. झाले. मध्यंतरींच्या काळांत मॉनियर वुइल्यम्सला शामजींच्या संस्कृत पांडित्याची किंमत कळूं लागली होती. मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर सर रिचर्ड टेंपल यांना मॉनियर वुइल्यम्सनें पत्र लिहिलें व टेंपलसाहेबांनीं रदबदली करून कच्छ संस्थानची वार्षिक १०० पौंडांची शिष्यवृत्ति शामजींना मिळवून दिली. शामजींच्या पांडित्याची प्रभा यापूर्वींच युरोपियन पांडित्याच्या क्षेत्रांत झळकूं लागली होती. १८८१ सालीं लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसा-

यटीपुढें पंडितजींनीं 'भारतांत लेखनकलेचा उदय' या विषयावर निबंध वाचला. १८८१ सालीं बार्लिन येथें झालेल्या व १८८३ सालीं लंडन येथें झालेल्या प्राच्यविद्याविशारदांच्या परिषदेला भारताचे प्रतिनिधि म्हणून भारतमंत्र्यानें पंडितजींना पाठविलें. १८८४ च्या अखेरीस पंडितजी बॅरिस्टर झाले व १८८५ च्या प्रारंभी ते हिंदुस्थानांत आले. कै० गोपाळराव हरि देशमुख यांनीं शामजींसाठीं खटपट केल्यामुळें, १८८५ सालीं फेब्रुवारी महिन्यांत शामजींची रतलाम संस्थानचे दिवाण म्हणून नेमणूक झाली.

यापुढील १०-११ वर्षांचा काळ पंडितजींनीं संस्थानी नोकरींत घालविला. रतलाममधलि नोकरी त्यांनीं १८८८ सालीं सोडली; पण, तेथील संस्थानिकाचा शामजींवर पूर्ण विश्वास असल्यामुळें, नोकरी सोडून चाललेल्या शामजींना त्यानें ३२ हजार रुपये रोकड दिले. यापुढील दोनतीन वर्षांचा अवधी पंडितजींनीं अजमीर येथें वकिली करण्यांत घालविला व या धंद्यांतहि त्यांनीं दाबून पैसा मिळविला. जवळचा पैसा कापडाच्या गिरण्यांच्या धंद्यांत गुंतवून शामजींनीं या काळांत स्थायी उत्पन्नाची चांगली सोय करून ठेवली. १८९२ च्या अखेरीपासून १८९५ च्या प्रारंभापर्यंत पं. शामजी हे उदेपूर संस्थानांत सल्लागार म्हणून होते; आणि येथेंहि त्यांनीं आपलें बस्तान चांगलेंच बसाविलें होतें. १८९५ सालीं फेब्रुवारी महिन्यांत शामजींनीं जुनागड संस्थानची दिवाणगिरी स्वीकारली. ही नोकरी करीत असतांना त्यांना ब्रिटिश सिव्हिल सर्व्हंटांच्या क्षुद्र व उद्दाम मनोवृत्तीचा भरपूर अनुभव आला. या लोकांची अरेरावी व जुनागड संस्थानांतल्या नागर समाजाच्या पुढाऱ्यांच्या उलाढाली यांचा संयुक्त परिणाम म्हणून १८९६ च्या सप्टेंबर महिन्यांत शामजींना नोकरीवरून दूर करण्यांत आलें.

पं० शामजी कृष्णवर्मा व टिळक यांचा १८९६ च्या सुमारास चांगलाच परिचय झालेला होता, हें टिळक यांनीं पं० शामजींना लिहिलेल्या दि. १०-१-१८९६ च्या एका पत्रावरून स्पष्ट होत आहे. पुण्याचा एक ब्राह्मण तरुण एकाद्या संस्थानिकाचा शरीररक्षक या नात्यानें काम करूं इच्छितो; अशी नोकरी मिळालीच नाहीं तर हा तरुण एखाद्या संस्थानांत लष्करी नोकरीहि पत्करील, असें टिळकांनीं आपल्या पत्रांत शामजींना लिहिलें आहे. हा तरुण वृत्तीनें कारकुनी पेशा पत्करण्याला अयोग्य असून, तो लष्करी पेशालाच सर्वथा योग्य आहे असें टिळकांनीं या तरुणाविषयीं लिहिलें आहे. त्यावरून एक शंका अशी येते कीं, ही शिफारस चाफेकरबंधूंपैकीं एखाद्याची असावी. शामजींना स्थानभ्रष्ट करण्याच्या कामीं मेकानकीसाहेब व हिंदुस्थान सरकारचें 'पोलिटिकल' खातें यांच्या कायकाय कारवाया चाललेल्या आहेत हेंहि टिळकांना अवगत असावें; कारण, मुंबई कौन्सिलचे सभासद म्हणून टिळक मुंबईस गेले असतांना, त्यांची व पंडितजींची एकदां तरी समक्ष भेट झाली असली पाहिजे, असें सुचविणारें टिळकांच्या हातचें एक पत्र उपलब्ध आहे.

संस्थानी नोकरींतून निवृत्त झालेल्या पंडितजींना आपल्या कळपांत ओढण्याचा प्रयत्न त्या वेळच्या थिऑसफिस्ट मंडळींनींहि केला, असें दिसतें. ज्या वैदिक परंपरेचें पुनरुज्जीवन करण्यासाठीं स्वामी दयानंदजी झटले ती परंपरा खरोखरच रूढ झाली व आर्यसमाजाचे अनुयायी ' स्वाराज्य व साम्राज्य ' या वैदिक कल्पनांनीं उत्स्फूर्त झाले तर, हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश वर्चस्वाला ती गोष्ट बाधक ठरेल हें मादाम ब्लॅव्हॅट्स्की, कर्नल अल्काटप्रभृति थिऑसफिस्ट धुरीणांना दिसत होतें. एकदां आर्यसमाजाचे प्रभावी प्रचारक म्हणून गाजलेले पं. शामजी मध्यंतरीं इंग्लंडचें पाणी पिऊन आले असल्यामुळें, ते थिऑसफीसारख्या नवोदित मतपंथाकडे झुकण्याचा संभव आहे हें हेरून, या मतपंथाच्या प्रमुखांनीं खडा टाकून पाहिला. पण, त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पंडितजी आर्यसमाजाकडे उत्साहानें वळले नाहींत. थिऑसफिस्ट लोकांच्या म्हणण्याची त्यांनीं विशेषशी पर्वाहि केली नाहीं. त्यांचीं मतें जहाल राजकारणाकडे वळूं लागलीं होतीं. रँड-आयर्स्टच्या खुनानंतर पुण्यांत जी धरपकड झाली व सरकारनें टिळकांना जी शिक्षा ठोठावली तिच्यावरून पंडितजींनीं बराच बोध घेतला. जहाल राजकीय मतांचा प्रचार करण्याच्या दृष्टीनें हिंदुस्थानांत जी सुरक्षितता आहे तिच्यापेक्षां इंग्लंडांत अधिक सुरक्षितता आहे हें ओळखून, १८९७ च्या मध्याच्या सुमारास पंडितजी स्वदेशाला रामराम ठोकून इंग्लंडला गेले!

दयानंद व टिळक यांच्या विचारसरणीच्या परिचयामुळें श्यामजींचें मन भारताच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नांकडे वळूं लागलें त्याप्रमाणेंच, हर्बर्ट स्पेन्सरच्या ग्रंथांच्या वाचनानेंहि शामजी स्वातंत्र्यवादाचा पुरस्कार करूं लागले. एकोणिसाव्या शतकाच्या तिसऱ्या व चौथ्या चरणांतल्या एकंदर विचारावरच डार्विन, मिल, स्पेन्सर प्रभृतींच्या विचाराची छाप प्रामुख्यानें पडलेली आढळते. आगरकरांच्या विचारावर ही छाप पडल्यामुळें, सामाजिक, आर्थिक, राजकीय अशा प्रत्येक बाबतींत मूलगामी सुधारणा झाली पाहिजे या मताचें प्रतिपादन आगरकर कसें करूं लागले, आगरकरांच्या राजकिय मतांतला पुरोगामीपणा ज्यांना मानवणारा नव्हता अशा पुष्कळशा सुधारकब्रुवांनीं ' सामाजिक सुधारणा झाल्याविना राजकीय सुधारणा व राजकीय स्वातंत्र्य अशक्य ' असा टाहो फोडून लोकांची दिशाभूल कशी केली, इत्यादि मुद्दे या चरित्र-ग्रंथाच्या दृष्टीनें प्रस्तुत नसले तरी, मिल, स्पेन्सरप्रभृति आंग्ल तत्त्वज्ञानाच्या मतांचा मागोवा घेण्याची प्रवृत्ति या वेळच्या सुशिक्षितांमध्यें किती प्रबळ होती हें सूचित होण्याच्या दृष्टीनें या मुद्यांचा निर्देश टाळतां येत नाहीं. Resistance to aggression is not simply justifiable but imperative ( आक्रमणाचा प्रतिकार करणें हें नुसतें क्षम्य नसून, अवश्यहि आहे ) इत्यादि सूत्रमय वाक्यें स्पेन्सरच्या ग्रंथांतून जशींच्या तशीं उदधृत करून पंडितजी पुढें आपल्या लेखांत भारदस्तपणा व जहालपणा हे गुण कसे आणूं लागले व हर्बर्ट स्पेन्सरच्या मृत्युसमयीं त्याच्या स्मरणार्थ एक हजार पौंडांची देणगी जाहीर करून पंडितजींनीं ब्रिटिश पंडितांना कसें

चकित करून टाकलें हें लक्षांत आलें म्हणजे पं. शामजी कृष्णवर्मा यांचा स्पेन्सर-च्या ग्रंथांचा सूक्ष्म अभ्यास व स्पेन्सरवर असलेली त्यांची श्रद्धा यांची ओळख पटते.

१८८४च्या सुमारास ब्रिटननें ट्रान्सव्हालमधील बोअर लोकांना अंतर्गत कार-भाराबाबत पूर्ण स्वायत्तता दिलेली होती; पण, या मुलखांत सोन्याच्या खाणी सांपडूं लागल्याबरोबर, ब्रिटिश लोकांच्या तोंडाला पाणी सुटलें व ते बोअर लोकांच्या मर्या-दित स्वातंत्र्याचाहि अपहार करूं लागले. यामुळें, १८९९ च्या सुमारास बोअर युद्ध सुरू झालें. यापूर्वींच पं. शामजी कृष्णवर्मा हे इंग्लडांत येऊन राहिले होते. बोअर युद्ध सुरू होण्यापूर्वींच, त्या वेळचे बॅरिस्टर मोहनदासजी गांधी हे दक्षिण आफ्रिकेंत जाऊन राहिले होते. बोअर युद्धांत आपली वैयक्तिक सहानुभूति बोअर लोकांच्या बाजूची होती, असें गांधींनींच लिहून ठेविलें आहे; त्यामुळें त्याच्यावर विश्वास ठेविला पाहिजे. पण, वैयक्तिक सहानुभूति बोअर लोकांच्या बाजूकडे असतांना गांधी व त्यांचे सहकारी यांनीं या युद्धांत साम्राज्यसरकारला मदत केली. या बाबतींतली आपली विचारसरणी काय होती हें गांधीजींनीं पुढील शब्दांत[१] सांगितलें आहे :—

> My loyalty to British rule drove me to participation with the British in that war. I felt that, if I demand rights as a British citizen, it was also my duty, as such, to participate in the defence of the British Empire. I held then that India could achieve her complete emancipation only within and through the British Empire.

(ब्रिटिश राज्याबद्दलची निष्ठा माझ्या मनांत जागृत असल्यामुळें, या युद्धांत ब्रिटिशांच्या बाजूला राहणें मला अवश्य वाटलें. ब्रिटिश नागरिक या नात्यानें मी जर अधिकारांची मागणी करतों तर, त्याच नात्यानें, ब्रिटिश साम्राज्याच्या संरक्षणकार्यांत भाग घेणें हेंहि माझें कर्तव्य आहे, असें मला वाटे. ब्रिटिश साम्राज्यांतच व ब्रिटिश साम्राज्यामुळेंच हिंदुस्थानला आपलें पूर्ण स्वातंत्र्य मिळेल, असें मला तेव्हां वाटत असे.) गांधीजींची ही विचारसरणी पं. शामजी कृष्णवर्मा यांना मुळींच पसंत पडत नसे. गांधीजींची विचारसरणी कूपमंडूक वृत्तीची आहे, गांधीजी व त्यांचे सहकारी बोअर लोकांचे शिव्याशाप भारतीयांवर निष्कारण ओढवून घेत आहेत व स्वातंत्र्य-प्रेमी जगाच्या दृष्टीनें ते भारताला उगीचच हास्यास्पद ठरवीत आहेत अशी टीका आपल्या मित्रमंडळीसमोर करून, पं. शामजी कृष्णवर्मा हे बॅ. गांधींवर आग पाखडीत असत.

कोणत्या ना कोणत्या तरी निमित्तानें शिष्यवृत्त्या देण्याची व्यवस्था करून हिंदी लोकांना युरोपांत येण्याची संधि मिळवून देण्याचा उपक्रम शामजींनीं १९०४ सालापासून सुरू केला. या वर्षी त्यांनीं हर्बर्ट स्पेन्सर ट्रॅव्हलिंग फेलोशिप या शिष्य-वृत्तीची घोषणा केली व यानंतर लौकरच त्यांनीं स्वामी दयानंद सरस्वतींच्या नांवची शिष्यवृत्तीहि उद्घोषित केली. प्रसंग उपस्थित होतांच शिष्यवृत्ती जाहीर करण्याची

१ The Story of My Experiments with Truth : p. 264.

शामजींची ही रीत पुढें १९०९ सालापर्यंत अव्याहत चालली. शामजी इंग्लंडला आले त्याच सुमारास इंग्लंडला बॅरिस्टरीच्या परीक्षेसाठीं आलेल्या, काठेवाडमधील एका सामान्य कुळांतले श्री. सरदारसिंगजी राणा यांनाहि शामजींचें अनुकरण करण्याची बुद्धी झाली. दि. १२ नोव्हेंबर १९०५ रोजीं शामजींना एक पत्र लिहून राणाजींनी असें कळविलें कीं, राणा प्रताप व छत्रपती शिवाजी महाराज या दोघां विभूतींच्या नांवाच्या दोन शिष्यवृत्त्या देण्याची आपली इच्छा आहे. भारतांत होऊन गेलेल्या कोणा तरी विख्यात मुसलमान राज्यकर्त्यांच्या नांवची तिसरीहि एक शिष्यवृत्ति देण्याचा आपला मानस राणाजींनीं व्यक्त केला. या शिष्यवृत्त्यांपैकीं शिवाजी शिष्यवृत्ति मिळाल्यामुळें सावरकर यांनीं इंग्लंडला बॅरिस्टरीच्या अभ्यासासाठीं जाण्याचें ठरविलें, ही गोष्ट यापूर्वीं सांगण्यांत आलीच आहे.

१९०५ सालीं शामजी कृष्णवर्मा यांनीं महत्त्वाचे असे दोनतीन उपक्रम केले. वर्षारंभींच त्यांनीं 'इंडियन सोशिऑलॉजिस्ट' हें इंग्रजी मासिक काढलें. या मासिकाचें मासिक मूल्य केवळ एक पेन्स ठेवण्यांत आलें होतें. दि. १८–२–१९०५ रोजीं शामजीनीं आपल्या घरीं कांहीं हिंदी सद्‌गृहस्थांना पाचारण केलें व 'इंडियन होमरूल सोसायटी' या नांवाची संस्था स्थापिली. शामजींच्या निमंत्रणावरून उपस्थित असलेल्या मंडळींत डॉ. मुथु, श्री. जे. एम्. परेख, डॉ. परेरा, श्री. जे. सी. मुकर्जी व श्री. मुकुंदराव जयकर यांचीं नांवें आढळतात. यापूर्वीं, काँग्रेसची ब्रिटिश कमिटी ही इंग्लंडमधील एकच संस्था हिंदी राजकारणाचा विचार करीत असे. ह्यूम-वेडरबर्नप्रभृति धेंडें या संस्थेमागें होतीं व राणा–परेखप्रभृति लोकहि त्या संस्थेचे सदस्य होते. शामजींचें या संस्थेशीं पटण्यासारखें नव्हतें. त्यांनीं आपली नवी संस्था काढल्याबरोबर 'ब्रिटिश कमिटी'कडे आकृष्ट होणारे हिंदी लोक इंडियन होमरूल सोसायटीकडे वळूं लागले. शिष्यवृत्त्यांच्या कल्पनेंतून स्वाभाविकपणें सुचणारी कल्पना म्हणजे विद्यार्थ्यांच्या वसतिगृहाची! शिष्यवृत्ति घेऊन इंग्लंडला येणाऱ्या हिंदी तरुणांची राहण्याची व्यवस्था व्हावी म्हणून 'इंडिया हाऊस' ही संस्था स्थापण्याचा संकल्प पं. शामजींनीं मे महिन्यांत जाहीर केला व दि. १–७–१९०५ रोजीं 'इंडिया हाऊस' या संस्थेचें उद्‌घाटन झालें.

यापूर्वीं, हिंदुस्थानांतून इंग्लंडला जाणाऱ्या विद्यार्थ्यांचे इंग्लंडांत बरेच हाल होत असत. इंग्रजांच्या मनांतली हिंदी लोकांविषयींची वर्णद्वेषाची भावना, हिंदी विद्यार्थ्यांच्या मार्गांत पसरविण्यांत येत असलेले मोह, इंग्रजी शिष्टाचारांचा बागुलबोवा, इत्यादि प्रकारांमुळें हिंदी विद्यार्थी भांबावून जात व परप्रत्ययनेयबुद्धी बनत. हा प्रकार टळावा यासाठीं 'इंडिया हाऊस' ही संस्था काढण्यांत आली. लंडन शहराच्या 'हायगेट' या विभागांतला एक आरोग्यप्रद भाग पाहून शामजींनीं त्या ठिकाणीं एक इमारत खरेदी केली. या इमारतीच्या आसपास मोकळी जागा भरपूर होती, तिच्या सभोंवार सृष्टिसौंदर्य चांगलें होतें व रेल्वेचीं तीन स्टेशनें, ट्रॅमचें नाकें इत्यादि

सोयीहि इमारतीपासून फार जवळ असल्यामुळें, इमारत सर्व दृष्टींनीं सोयीची होती. इमारत तीन मजली होती. तळमजल्यावर सभागृह, ग्रंथालय, वाचनालय वगैरेंची सोयी करण्यांत आली व उरलेल्या भागांत विद्यार्थ्यांची राहण्याची, जेवण्याची वगैरे सोय करण्याचें ठरलें. प्रारंभीं २५ विद्यार्थ्यांची राहण्याची सोय होईल; पण, हळुहळू ५० विद्यार्थ्यांसाठीं अवश्य ती सर्व व्यवस्था करण्यांत येईल, असें शामजींनीं जाहीर केलें. १९-५-०६ च्या सुमारास इंडिया हाऊसमध्यें सरासरी १३-१४ विद्यार्थी रहात असत व श्री. महेशचरण सिंह हे व्यवस्थापक म्हणून काम पहात असत.

शामजींच्या या योजनांकडे व हालचालींकडे सुशिक्षित हिंदी मुसलमान कोणत्या दृष्टीनें पहात होते व पहात राहिले, याचें दिग्दर्शन करणारा कांहीं अस्सल पुरावा उपलब्ध आहे. जर्मनींतल्या गटिंजेन या गांवाहून झियाउद्दीन अहंमद यांनीं अबदुल्ला सुऱ्हावर्दी यांना लिहिलेलीं दोन पत्रें प्रस्तुत लेखकानें वाचलेलीं आहेत. पहिलें पत्र २४-३-०५ रोजीं लिहिलेलें असून, दुसरें ३-४-०५ रोजीं लिहिलेलें आहे. दुसऱ्या पत्रांतला पुढील भाग महत्त्वाचा आहे :

You know that we have a definite political policy at Aligarh, i. e the policy of Sir Syed··· I understand that Mr. Krishnavarma has founded a society called ' Indian Home Rule Society' and you are also one of its vice-presidents. Do you really believe that the Mahomedans will be profited if Home Rule be granted to India ?······ There is no doubt that this Home Rule is decidedly against the Aligarh policy······What I call the Aligarh policy is really the policy of all the Mahomedans generally— of the Mahomedans of Upper India particularly.

( आम्हा अलीगडवाल्यांचें एक ठाम राजकीय धोरण आहे व तें धोरण सर सय्यद अहंमद यांनीं आंखून दिलें आहे, हें तुला ठाऊक आहेच···श्री. कृष्णवर्मा यांनीं 'इंडियन होमरूल सोसायटी' नांवाची संस्था काढली असून तूं त्या संस्थेचा एक उपाध्यक्ष आहेस, असें समजतें. हिंदुस्थानला होमरूल देण्यांत आलें तर मुसलमानांचें हित होईल, असें तुला खरोखरच वाटतें का ? ··· हें होमरूल अलिगडी धोरणाच्या निश्चितपणें विरुद्ध आहे, यांत शंकाच नाहीं. ··· मी ज्याला अलिगडी धोरण म्हणतों तेंच सर्वसामान्य मुसलमानांचें धोरण आहे—उत्तर हिंदुस्थानांतल्या मुसलमानांचें तरी तेंच धोरण आहे. )

दिल्लीचे बॅ० असफअल्ली हे १९०९ सालीं पं० शामजी कृष्णवर्मा यांच्या कृपेची अपेक्षा करणारे गृहस्थ होते. 'राष्ट्रीय' लोकांशीं मी संबंध ठेविला तर ती गोष्ट माझ्या मुस्लिम मित्रांना खपत नाहीं; तेव्हां, मला आपला माझ्या मार्गानें जाऊं द्या असें सांगणारें, असफअल्लींनीं पं० शामजी कृष्णवर्मा यांना लिहिलेलें पुढील पत्रहि मासलेवाईक आहे. पत्र लंडनहून लिहिलेलें आहे. पत्रावर दि. १४-९-०९ हा दिनांक आहे :

I am staying with some Muslim friends who do not like me to associate with nationalists; and, to save many unpleasant consequences, I do not want to irritate them unnecessarily.

( मी कांहीं मुसलमान मित्रांच्या सहवासांत रहात आहें. मी 'राष्ट्रीय' लोकांशीं संबंध ठेवणें त्यांना खपत नाहीं. अनेक अनिष्ट परिणाम टळावे यासाठीं, मी त्यांना उगीचच रुष्ट करूं इच्छीत नाहीं. )

'इंडियन सोशिऑलॉजिस्ट' मासिकाच्या एप्रिल १९०५ च्या अंकांत एक जुनें प्रासिद्धिक पुनर्मुद्रित करून शामजींनीं ज्या विचाराला चालना दिली तो विचार पुढें अनेकांना महत्त्वाचा वाटला. ज्या घटनेला १८५७ चें बंड अगर 'शिपायांचें बंड' अशी संज्ञा देण्यांत येते ती घटना हिंदी शिपायांनीं मिरत येथील गोऱ्या पलटणींवर हल्ला केला तेथपासून सुरू होते. हा हल्ला १० मे १८५७ रोजीं करण्यांत आला. या बंडाचा मोड झाल्यावर, ब्रिटिश सरकारनें दि. १ मे १८५९ हा दिवस प्रार्थनादिन ( Thanksgiving day ) म्हणून सगळीकडे पाळला. या प्रार्थनादिनाच्या थोडे दिवस अगोदर—म्हणजे १८५९ च्या एप्रिल महिन्यांत—डॉ० रिचर्ड कॉन्ग्रेव्ह या लंडन.येथील विचारवंतानें एक खरमरीत पत्रक प्रसिद्ध केलें. बंडखोर बनलेल्या हिंदी सैन्यावर विजय मिळविल्याबद्दल इंग्रजांनीं मोठी फुशारकी मारावी असें या विजयांत कांहींहि नाहीं, असें बजावून सांगणारें हें पत्रक पुढीलप्रमाणें आहे:

Believing the cause of the British in India to be unjust, that of the Hindus just-as the legitimate effort of a nation to shake off an oppressive foreign yoke-believing, consequently, the English success to be the triuimph of force over right--

Considering, secondly, that even had our cause been just, it has been disgraced at home by fraudulent misrepresentation, by the exhibiting of a ferocious spirit of vengeance and disgraced in India by atrocious cruelties, that we have been demoralised and lowered in the eyes of all nations—

Considering, lastly, that the English victory is but the source of many evils to us as a nation, involving a further pressure on the already overtaxed and suffering industrial poor of this country and the sacrifice of the lives of English soldiers drawn from the same class—

I hereby do all that is in my power as a private Englishman to clear myself and induce others to reflect :

In the name of humanity, I publicly protest against the Thanksgiving Ist of May as an act at variance with the national professions as a free people, repugnant to the spirit of Christianity which the nation yet recognises and an outrage on all higher feelings of mankind.

( गोषवारा : हिंदुस्थानांत ब्रिटिशांचा पक्ष अन्यायाचा आहे; जुलमी, परकी सत्तेचें जोखड झुगारून देण्याचा विधिसंमत राष्ट्रीय प्रयत्न करणाऱ्या हिंदूंचा पक्ष

न्यायाचा आहे, असें मी मानतों. त्यामुळें मला असें वाटतें कीं, इंग्रजांचा जय म्हणजेच आसुरी शक्तीला न्यायावर मिळालेला जय होय.

आमचा पक्ष न्यायाचा असला तरी त्याला लांछन लागलेलें आहे, असेंहि मला वाटतें. लबाडीनें, गैरसमज करण्यांत आल्यामुळें आणि भयंकर खुनशीपणामुळें इंग्लंडचें राजकारण लांछित झालेलें आहे. हिंदुस्थानांत आम्ही बेसुमार क्रूरपणा केल्यामुळें, तेथील राज्यकारभारालाहि लांछन लागलें आहे. यामुळें, आम्हा इंग्रजांचा नैतिक अधःपात झालेला असून, सर्व जगाच्या दृष्टीनें आम्ही हीन ठरलों आहों!

शेवटचा म्हणून आणखीहि एक विचार मनांत येतो. इंग्रजांना मिळालेल्या या विजयामुळें राष्ट्र म्हणून इंग्लंडवर ओढवणाऱ्या अनेक आपत्तींचा प्रारंभ झाला आहे. या देशाच्या औद्योगिक जीवनांत राबणारे गरीब कामाठी विपन्न स्थितींत आहेत—ते करभाराखालीं वांकून गेले आहेत. या विजयामुळें त्यांच्यावरील भार वाढलाच आहे. याच वर्गांतून इंग्लिश सैनिकांची भरती केली जाते. त्याहि दृष्टीनें, या वर्गाला आपलें जीव अधिक प्रमाणांत धोक्यांत टाकावे लागणार आहेत.

या सर्व भानगडींतून स्वतःची मोकळीक व्हावी व इतरांना विचार करण्याला प्रवृत्त करावें म्हणून मी या प्रासिद्धिकाच्या द्वारा शक्य तो वैयक्तिक प्रयत्न करीत आहें. दि. १ मे रोजीं साजरा होणाऱ्या आभारप्रदर्शनदिनाचा मी साऱ्या मानवजातीच्या नांवानें जाहीर निषेध करतों. स्वतंत्र राष्ट्र म्हणून आपण ज्या राष्ट्रीय बढाया मारतों त्यांच्याशीं असा दिन साजरा करणें हें विसंगत आहे. जो खिस्तीधर्म अद्याप या राष्ट्राकडून सन्मानिला जात आहे, त्या धर्माच्या तत्त्वांशीं या कृतीचा विरोध आहे व मानव समाजांत नांदणाऱ्या सगळ्या उच्च भावनांचा या कृतीनें उपमर्द होणार आहे.)

हिंडमनसारख्या इंग्रजांशीं संधान जुळवून शामजी आपल्या मतांचा व आपल्याला इष्ट वाटणाऱ्या मतांचा प्रसार करीत होते. त्या वेळीं न्यू यॉर्क येथून प्रसिद्ध होत असलेल्या Gaelic American या आयरिश रिपब्लिकन पक्षाच्या वृत्तपत्रांतूनहि आपलीं मतें प्रसृत व्हावीं अशी व्यवस्था त्यांनीं केली होती. हवें तें निमित्त काढून हिंदी तरुणांना युरोपला आणावयाचें व त्यांची राजकारणी दृष्टि व्यापक व कणखर बनविण्यासाठीं झटावयाचें हा छंदच पंडितजींना लागला होता. इंग्लंडला आलेल्या तरुणांना आपल्या प्रभावळींत नांदविण्यासाठींहि पंडितजी झटत असत. लोकमान्य टिळकांनीं इंग्लंडला यावें असा अत्याग्रह पंडितजींनीं या सुमारास चालविला होता.

सावरकर हिंदुस्थान सोडून इंग्लंडला जावयास निघाले त्या सुमारास, पंडितजींच्या मार्फत हिंदी राजकारणाच्या मतप्रचाराची इतकी तयारी झालेली होती. बुद्धिमान्, उत्साही, त्यागी अशा तरुणांचें जें मंडळ पंडितजींच्या भोंवतीं हळुहळू गोळा होऊं लागलें होतें त्याचाहि अल्पसा परिचय आपल्याला या ठिकाणीं करून घेतला पाहिजे. कै० विठ्ठलभाई पटेल, भाई परमानंद, श्री० धर्मवीर वगैरे मंडळी १९०६ च्या मे महिन्यांत इंग्लंडमध्यें होती; पण, या मंडळींचा पंडितजींच्या प्रभावळींत अंत-

भाव करणें बरोबर नाहीं. पंजाबमधील कायस्थ समाजांतले एक बुद्धिमान् तरुण लाला हरदयाळ हे[1] यापूर्वीच ऑक्सफर्ड विद्यापीठांत विद्याभ्यासासाठीं आले होते. ते इंग्लंडला सहकुटुंब आले होते. भाई परमानंद हे हरदयाळचे एके काळचे गुरु होते व या गुरूचा आपल्या शिष्याच्या बुद्धिमत्तेवर व उदात्त भावनावशतेवर चांगलाच विश्वास होता. भाईजी, धर्मवीरजी या पंजाबी मंडळींमुळे, लाला हरदयाळ हेहि हळुहळू 'इंडिया हाउस' मध्यें येऊंजाऊं लागले व पंडितजींशीं त्यांचा परिचय वाढूं लागला. मिसेस भिकाजी रस्तुम कामा या नांवाच्या पारशी बाई यापूर्वीच इंग्लंडला आलेल्या होत्या. दादाभाई नौरोजी हे पार्लमेंटात निवडून गेले त्या वेळीं त्यांनीं त्यांच्या वतीनें खूप काम केलें होतें; पण हळुहळू नेमस्त राजकारणाला कंटाळून त्या पं. शामजींनीं स्थापिलेल्या इंडियन होमरूल सोसायटीकडे वळल्या होत्या. मुंबई विद्यापीठाची सर मंगळदास नथुभाई शिष्यवृत्ति मिळवून १९०४ सालीं इंग्लंडला गेलेले महाराष्ट्रीय तरुण श्री. पांडुरंग महादेव बापट यांच्यावर जहाल राजकारणी मतांमुळें शिष्यवृत्ति गमावून बसण्याचा प्रसंग ओढवला होता. प्रत्येक होतकरू तरुण म्हणजे राष्ट्राच्या सुप्त शक्तीचा अंश ही भावना बाळगणाऱ्या लो. टिळकांनीं पंडितजींना श्री. बापटांच्याविषयीं पुढील शिफारस[2] यानंतर कांहीं महिन्यांनीं केली: As for Mr. Bapat, something ought to be done there to enable him to complete his course. He is a promising young man. (श्री. बापट यांचे तेथील शिक्षणक्रम पूर्ण व्हावा यासाठीं कांहींतरी व्यवस्था होणें अवश्य आहे. बापट हे एक होतकरू तरुण आहेत.) अशा परिस्थितींत असलेले श्री. बापटहि या सुमारास इंडिया हाउसमध्यें येऊंजाऊं लागले होते. एडन येथें कांहीं काळ घालविल्यावर इंग्लंडला गेलेले व पर्शियन जाणणारा हिंदु पंडित म्हणून थोडक्याच अवधींत लंडन येथील पर्शियन वकिलातींत घुसलेले जबलपूरचे श्री. ग्यानचंद वर्मा हेहि इंडिया हाउसमध्यें हळुहळू डोकावूं लागले होते.

९ जून १९०६ रोजीं मुंबईहून निघालेले विनायकराव सावरकर २–३ जुलैच्या सुमारास इंग्लंडला जाऊन पोंचले असावे. त्या काळीं प्रवासाला लागणाऱ्या अवधीचा विचार केला तर हीच गोष्ट संभाव्य दिसते. दि. १४–७–१९०६ रोजीं लंडन येथील स्टँडर्ड लाइफ ॲशुअरन्स कंपनीच्या व्यवस्थापक मंडळातर्फे पं० शामजी कृष्णवर्मा यांना धाडण्यांत आलेलें एक पत्र प्रस्तुत लेखकानें पाहिलें आहे. त्यावरून असें दिसतें कीं, दि. १४ जुलैपर्यंत सावरकरांचा विमा उतरला गेला नव्हता, इतकेंच नव्हे तर, सावरकर इंग्लंडला आले असल्याची ठाम माहितीहि कंपनीच्या व्यवस्थापक मंडळाला मिळालेली नव्हती. सावरकर इंग्लंडला पोंचल्यावर त्यांचे पहिले

---

१ हरदयाळ यांच्या वडिलांचें नांव गौरीसहाय असें असून ते दिल्ली प्रांतांत शिरस्तेदार होते, अशी माहिती ७।४।१४ च्या 'केसरी' पत्रांत दिलेली आढळते.

२. १४-१२-१९०६ रोजीं लो. टिळकांनीं शामजींना लिहिलेलें पत्र (अप्रकाशित)

१०-१५ दिवस सर्वसामान्य व्यवस्थेत जाणें अगदीं शक्य असल्यामुळेंच, १४ जुलैपर्यंत त्यांचा विमा उतरण्याचें काम लांबणीवर पडलें असावें. दि. २०-७-१९०६ रोजीं भारतमंत्री लॉर्ड मोर्ले यांनीं पार्लमेंट सभेंत हिंदी अंदाजपत्रकावर भाषण केलें. सावरकर यांनीं 'काळ' पत्राला धाडलेल्या पहिल्याच बातमीपत्रांत या भाषणाचा उल्लेख करण्यांत आलेला आहे. दि. २० जुलैपूर्वी सावरकरांनीं इंग्लंडमधली आपली प्राथमिक व्यवस्था पुरी केली होती व भोंवतालच्या घडामोडींकडे जागरूकपणें पहावयाला ते सिद्ध झाले होते.

बॅरिस्टरीच्या अभ्यासाकडे तांत्रिक लक्ष पुरवून उरलेला वेळ व उरलेली शक्ति राष्ट्रकार्याच्या विविध प्रकारांत खर्च करावयाची हा उद्देश अमलांत आणण्याची सुरुवात सावरकरांनीं इंग्लंडांत आल्याबरोबर केली. पार्लमेंटमध्यें होणाऱ्या हिंदी अंदाजपत्रकावरील चर्चेप्रमाणेंच इतरत्र चालणाऱ्या चर्चांकडे त्यांचें लक्ष वळलें, याचा पुरावाहि पहिल्याच बातमीपत्रांत आढळतो. दि० २२-७-१९०६ रोजीं चंडास हॉलमध्यें सुरू झालेल्या एका व्याख्यानमालेचा उल्लेख या पत्रांत आलेला आहे. परवश राष्ट्रांनीं स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं कोणते उपाय योजणें अवश्य आहे याविषयींची चर्चा त्या काळीं अनेक देशांतून चालली होती. हिंदुस्थानांत बिपिनचंद्र पाल प्रभृति राष्ट्रभक्त Passive Resistance किंवा अप्रत्यक्ष प्रतिकाराच्या मार्गाचा पुरस्कार करीत होते; व, या अप्रत्यक्ष प्रतिकारावर स्वतःचा छाप मारून त्यांतून 'सत्याग्रह' काढण्याचा उद्योग बॅ. गांधी दक्षिण आफ्रिकेंत करीत होते. तिकडे रशियांत गुप्त मंडळ्यांचीं जाळीं विणलीं जात होतीं. या गुप्त मंडळ्यांना कोणतें वळण लागणार हें सुचविणारें एक कृत्य वरील तारखेनंतर ४-६ दिवसांतच—म्हणजे सावरकर हें बातमीपत्र लिहीत होते त्या सुमारासच—घडलें. दि. २८-७-१९०६ रोजीं दहा रशियन क्रांतिकारकांनीं उतारूंच्या एका रेल्वेगाडीवर हल्ला केल्याची वार्ता वॉर्सा येथून प्रसृत झाली. दि. २२-७-१९०६ रोजीं झालेल्या चंडास हॉलमधील सभेंत हार्वे नांवाच्या वक्त्यानें 'सार्वत्रिक निःशस्त्र प्रतिकार' व 'गुप्त मंडळ्यांची स्थापना' या मार्गांचें विवेचन केलें. सावरकर यांच्या लेखणींतून उतरलेलें या विवेचनाचें स्वरूप पुढीलप्रमाणें आहे[1] :

*गुलामगिरींत पडलेल्या राष्ट्राची हा अप्रत्यक्ष प्रतिकार जालीम रीतीनें अमलांत आणण्याइतकी तयारी बहुधा झालेली नसते. कोणीहि सरकारला मदत न करण्याची बुद्धि उत्पन्न होण्यास व त्याप्रमाणें सर्वांकडून वर्तन घडण्यास समाज राजकीय शिक्षणानें फारच सुसंस्कृत केलेला पाहिजे. तें राजकीय शिक्षण परक्यांच्या करड्या सत्तेखालीं स्पष्ट रीतीनें देणें अशक्य झालेलें असतें. म्हणून प्रथम दुसरा उपाय योजिला जातो व तो* Secret Societies *( गुप्त मंडळ्या ) हा होय.*

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ३.

हिंदी राजकारणाशीं संबंध असणाऱ्या अशा बारीकसारीक गोष्टींकडे सावरकर लक्ष देऊं लागलें हें खरें असलें तरी, त्यांच्या अमर्याद उत्साहाचें एवढ्यानें समाधान होण्यासारखें नव्हतें. आपलें मुख्य काम म्हणून निश्चित काळांत पुरा करावयाचा कांहीं तरी उद्योग आंखून घेतल्याशिवाय त्यांना बरें वाटण्याचा संभव नव्हता. म्हणून त्यांनीं इंग्लंडांत येऊन राहिल्यावर थोड्याच दिवसांनीं एक उद्योग स्वतःमागें लावून घेतला. इंग्रजींतलें मॅझिनीवरील वाङ्मय वाचून मॅझिनीचें तत्त्वज्ञान स्वतः समजून घ्यावें व हें तत्त्वज्ञान आपल्या अनुयायांना व इतर शिक्षितांना समजावें या हेतूनें या विषयावर एक पुस्तक लिहावें असें ठरवून त्यांनीं त्या दिशेनें वाचन सुरू केलें. यापूर्वीं मराठींत प्रसिद्ध झालेलें श्री. ल. गो. घाणेकर यांनीं लिहिलेलें मॅझिनीचें चरित्र त्यांच्या वाचनांत आलें होतें. फर्ग्युसन कॉलेजांत शिकत असतांना त्यांचीं मॅझिनीचें चरित्र, इटलीचा इतिहास इत्यादि विषयांवर भाषणेंहि झालीं होतीं; पण, अधिक अभ्यास करून या स्वातंत्र्यमंत्रद्रष्ट्याचें चरित्र गावें, असें त्यांच्या मनानें घेतलें.

मॅझिनी, गॅरिबाल्डी, काव्हूरप्रभृति इटॅलियन देशभक्तांच्या चरित्राची छाप आधुनिक हिंदी सुशिक्षितांच्या मनावर चांगलीच पडली आहे. या इटॅलियन देशभक्तांपैकीं बहुतेकांचीं लहानमोठीं चरित्रें मराठींत प्रसिद्ध झालीं असून, त्यांची लोकप्रियता अद्यापि ओसरून गेलेली नाहीं. ज्या चिमुकल्या देशानें ऑस्ट्रियन साम्राज्याच्या मगरमिठींतून अगदीं अलीकडे आपली सोडवणूक करून घेतली व थोडक्याच काळांत ज्यानें जगांतल्या प्रमुख सत्ताधारी राष्ट्रांच्या मांडीला मांडी लावून बसण्याचा मान मिळविला त्या राष्ट्रांतल्या पुरुषश्रेष्ठांबद्दल स्वातंत्र्येच्छु हिंदी लोकांना आदर व जिव्हाळा वाटला नसता तर तेंच आश्चर्यकारक ठरलें असतें. नवशिक्षित हिंदी देशभक्तांच्या पहिल्यादुसऱ्या पिढीलाहि मॅझिनीच्या चरित्राबद्दल महत्व वाटे; पण, तें ममत्व कांहींसें मर्यादित असे. राजनिष्ठा, ब्रिटिश साम्राज्याचा दरारा इत्यादि विषयांसंबंधींचें जें तत्त्वज्ञान त्या पिढींत रूढ होतें त्या तत्त्वज्ञानाच्या मर्यादांनीं हें ममत्व कसें वेष्टित झालें होतें हें कै० सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं आपल्या आत्मचरित्रात्मक ग्रंथांत पुढील शब्दांत स्पष्ट केलें आहे:[१]

It was Mazzini, the incarnation of the highest moral forces in the political arena, Mazzini, the apostle of Italian unity, the friend of the human race that I presented to the youth of Bengal. Mazzini had taught Italian unity; we wanted Indian unity. Mazzini had worked through the young; I wanted the young men of Bengal to realize their potentialities and to qualify themselves to work for the salvation of their country, but upon lines instinct with the spirit of constitutionalism. I lectured upon Mazzini but took care to tell the young men to abjure his revolutionary ideas and to adopt his spirit of self-sacrifice and devotion in the paths of constitutional developement.

१ A Nation in Making : p. 43.

( मी बंगाली युवकांपुढें मॅझिनीचें जें चित्र रेखाटीत गेलों तें एका विशिष्ट प्रकारचें होतें. राजकारणाच्या क्षेत्रांत अत्युच्च नैतिक प्रेरणांचा प्रभाव किती असतो हें मॅझिनीच्या रूपानें साक्षात् कळूं शकतें. मॅझिनी हा इटलीच्या ऐक्याचा पुरस्कर्ता होता व तो मानव जातीचा मित्र होता. या प्रकारच्या मॅझिनीचा ठसा तरुण मनावर उमटावा यासाठीं मी झटत असें. मॅझिनीनें इटॅलियन ऐक्याची शिकवण दिली होती; आम्हांला भारतीय ऐक्य इष्ट वाटत होतें. तरुणांच्या मदतीनें मॅझिनीनें आपलें कार्य प्रभावी करून दाखविलेलें होतें. बंगालच्या तरुणांना आपल्या सुप्त सामर्थ्याची ओळख पटावी, देशविमोचनाच्या कार्यासाठीं लागणारी पात्रता त्यांच्यांत उत्पन्न व्हावी; पण, हें काम करतांना त्यांनीं घटनात्मक कार्यपद्धतींत अंतर्भूत होणाऱ्या तत्त्वांचा व मार्गांचा आश्रय करावा, अशी माझी इच्छा असे. मी मॅझिनीवर व्याख्यानें देत असें; पण, तीं देतांना मी तरुणांना असें सांगत असें कीं, त्यांनीं क्रांतिकारक ध्येयांचा त्याग करावा व त्यागाची वृत्ति आणि घटनात्मक प्रगतीचे मार्ग यांचा त्यांनीं अवलंब करावा. )

मॅझिनीच्या चरित्राकडे पाहतांना वरील प्रकारच्या कोणत्याच मर्यादा घालण्याची आवश्यकता सावरकरांना वाटली नाहीं. मॅझिनीच्या आत्मचरित्राचें त्रिखंडात्मक विवेचन करण्याच्या निमित्तानें सावरकरांना एक विशिष्ट कार्य साधावयाचें होतें. प्रबल परक्या सत्तेच्या दडपणामुळें अगतिक झालेल्या परतंत्र राष्ट्रानें देशस्वातंत्र्यप्राप्तीच्या कामांत कोणकोणत्या विविध मार्गांचा अवलंब करावा, हें त्यांना आपल्या महाराष्ट्रीय सहकाऱ्यांना व बांधवांना सांगावयाचें असल्यामुळें, सुरेंद्रबाबूंच्या मनांत उद्भवलेले विधिनिषेध त्यांच्या मनाला ग्रस्त करतील, हा संभवच नव्हता. सर्व मार्ग दृष्टीसमोर असावे, त्यांतला जो ज्याला रुचेल वा पचेल त्याचा त्यानें अवलंब करावा, अशी या बाबतींतली त्यांची वृत्ति असावी, असें दिसतें. मूळ आत्मचरित्राचें त्रिखंडात्मक भाषांतर व तरुण इटली या संघटनेची माहिती या दोहोंसाठीं या पुस्तकाचे पहिले चार भाग खर्च पडले असून, खंजिराची उपपत्ति, गनिमी काव्याचे नियम व देशवरि बंडीएरा या तीन विभागांचा मिळून पांचवा भाग करण्यांत आला आहे. मॅझिनीची प्रस्तावना व हे पांच भाग हा जो या ग्रंथाचा गाभा त्यानें मुद्रित २५७ पृष्ठें व्यापिलीं आहेत. या ग्रंथाचे भाषांतरकार सावरकर यांनीं ग्रंथाला जोडलेली प्रस्तावना २६ पृष्ठांची आहे. मूळ ग्रंथ तर त्या वेळीं महाराष्ट्रांतील लोकांना अप्रतिम वाटलाच; पण, ही प्रस्तावना त्या वेळच्या महाराष्ट्रीय वाचकांना अत्यंत स्फूर्तिप्रद वाटली. त्या वेळच्या तरुण महाराष्ट्राला हा ग्रंथ इतका आदरणीय वाटला कीं, एकाद्या धर्मग्रंथाप्रमाणें त्याची मिरवणूक काढण्यांत आली. २६ पृष्ठांची प्रस्तावना तर अनेकांनीं मुखोद्गत केली होती, असें म्हणतात. या प्रस्तावनेच्या शेवटीं २८ सप्टेंबर १९०६ हा दिनांक घातलेला आहे. यावरून हें स्पष्ट दिसतें कीं, सावरकरांनीं सरासरी अडीच महिन्यांत भाषांतराचें व प्रस्तावनालेखनाचें कार्य

पुरें केलें. या पुस्तकाचें हस्तलिखित १९०६ सालीं डिसेंबर महिन्याच्या दिनांक २७ रोजीं पुण्याच्या 'जगद्‌हितेच्छु' छापखान्यांत छापण्यासाठीं देण्यांत आलें.[1] अभिनव भारतमालेच्या थोरल्या विभागांतलें हें पहिलें प्रकाशन मानण्यांत आलें, व तें लोकमान्य टिळक व लोकमान्य 'काळ'कर्ते परांजपे यांना अर्पण करण्यांत आलें. पहिल्या आवृत्तीच्या २ दोन हजार प्रती छापण्यांत आल्या होत्या. पुस्तकाचें मूल्य दीड रुपया ठेवण्यांत आलें होतें. मॅझिनी व त्याचें राजकारणी तत्त्वज्ञान यांचा सावरकर यांच्या मनावर उमटलेला ठसा कशा प्रकारचा होता हें बॅ० असफअल्ली यांनीं लिहून ठेवलेल्या आठवणींमधील पुढील उताऱ्यावरून[2] वाचकांच्या लक्षांत येईल :

His mind was fully saturated with Mazzini's teachinigs before he proceeded to England and the free atmosphere of the British Isles served to nourish and ripen the lessons he had imbibed. Mazzini's life and teachings hourly fed the flame of his soul and seemed to inspire his activity in the minutest details. His speeches at the Sunday meetings at India House were liberally leavened with the revolutionary ethics of the Italian patriot.

( सावरकर हिंदुस्थान सोडून इंग्लंडला निघाले त्यापूर्वींच मॅझिनीची शिकवण त्यांच्या मनांत पूर्णपणें मुरली होती. ब्रिटिश बेटांच्या खुल्या वातावरणामुळें मनांत मुरलेल्या या शिकवणीचें पोषण झालें व ती शिकवण त्यामुळें परिणतहि झाली. मॅझिनीचें जिवन व त्याची शिकवण यांच्यामुळें त्यांच्या अंतर्यामीं तेजाची दीप्ति घटकोघटकीं वाढत होती. त्यांच्या आचारांतल्या बारीकसारीक तपशिलांच्या स्फूर्तीचा उगम या ठिकाणीं असावा, असें वाटूं लागलें होतें. भारत भवनांत दर रविवारीं होणाऱ्या साप्ताहिक सभांतून सावरकरांचीं जीं भाषणें होत तीं या इटॅलियन देशभक्ताच्या क्रांतिकारक तत्त्वप्रणालीनें चांगलींच माखलेलीं असत. )

एकीकडे हें लेखनाचें कार्य सुरू होतें त्याच वेळीं दुसरेंहि एक कार्य सिद्ध करण्याची पूर्व तयारी सावरकर यांनीं चालविलेली होती. लंडनमध्यें 'अभिनव भारत' ही संस्था स्थापण्याचा त्यांचा विचार पक्का झाला होता व या दृष्टीनें वेगवेगळ्या परिचितांची पारख करण्याला त्यांनीं सुरुवात केली होती. दर रविवारीं साप्ताहिक सभा करणें, त्यांत एकाद्या राजनैतिक विषयाची चर्चा करणें, वगैरे कामें लंडनमध्यें येतांच त्यांनीं सुरू केलीं व या निमित्तानें जी तरुण मंडळी एकत्र होऊं लागली त्यांची परीक्षाहि करण्याचा उपक्रम त्यांनीं सुरू केला. नुसत्या लंडनमध्येंच हिंदी विद्यार्थी विद्यार्जन करीत आहेत असें नाहीं, ऑक्सफर्ड—केंब्रिज हीं प्रसिद्ध विद्यापीठें, सायरेन्स्टर येथील शेतकी कॉलेज, एडिंबरो येथिल शिक्षणसंस्था या सर्वांमधून

---

१ नाशिकच्या खटल्यांत झालेली गोंधळेकर यांची साक्ष. दे. भ. गणेशपंत सावरकर यांनीं हें हस्तलिखित लो. टिळक यांना दाखविलें होतें. तें वाचून पाहिल्यावर लो. टिळक यांनीं तें मुद्रित करणें धोक्याचें आहे असें मत दिलें होतें, अशी माहिती मिळते.

2 Life of Savarkar by Chitra Gupta : page 126.

हिंदी विद्यार्थी शिकत आहेत, त्यांच्या ठिकाणींहि राजकीय जागृति झाली पाहिजे, हें ओळखून सावरकर—बापटप्रभृतींनीं त्या दिशेनें जोरांत उद्योग सुरू केले असले पाहिजेत; कारण, दि० २८—९—१९०६ रोजीं—म्हणजे ज्या दिवशीं सावरकरांनीं मॅझिनीची प्रस्तावना लिहिण्याचें काम संपविलें त्याच दिवशीं—प्रसिद्ध झालेल्या 'लंडन टाइम्स' या दैनिकांत M. A, Cantab या टोपण नांवानें कोणी तरी लिहिलेलें एक पत्र प्रसिद्ध झालें असून, ब्रिटनमधील हिंदी विद्यार्थ्यांमध्यें राजकीय असंतोष पसरविण्याचें काम गुप्त मंडळ्यांमार्फत चालतें, अशी तक्रार करण्यांत आलेली आहे. या पत्रांतील पुढील भाग या ठिकाणीं उद्‌धृत करण्यासारखा आहे :

Something should be done to counteract the visits of agitators whose sole object is to inculcate a spirit of opposition to British Government in India......It is the systematic secret propaganda of disloyalty carried on amongst the Indian students to counteract which every effort should be made.

( हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश राज्याला विरोध करण्याची वृत्ति हिंदी विद्यार्थ्यांच्या मनांत बिंबविण्याच्या एकमेव हेतूनें कांहीं चळवळ्ये या विद्यापिठांत वारंवार येत असतात. या चळवळ्यांची ये–जा थांबेल कशी या दृष्टीनें कांहीं तरी प्रयत्न होणें अवश्य आहे....हिंदी विद्यार्थी राजद्रोही बनावे या हेतूनें चालणारा गुप्त प्रचार मोठ्या पद्धतशीरपणें चालतो. तो रोखून धरण्यासाठीं सर्व प्रकारचे प्रयत्न झाले पाहिजेत. )

इंग्लंडमध्यें येऊन राहिलेल्या हिंदी लोकांमध्यें प्रक्षोभ उत्पन्न करण्याचे हे प्रयत्न चालले होते त्या अवधींत, हिंदुस्थानांतल्या क्षोभाला हळुहळू उकळी फुटूं लागली होती. सावरकर इंग्लंडला जावयाला निघाले त्याच्या थोडे दिवस अगोदर नाशिकच्या डि० मॅ० नें सार्वजनिक सभांच्या संबंधींचा एक विचित्र हुकूम काढला. तो मोडून सभा भरविल्याबद्दल गणेशपंत सावरकरांना १० रु. दंडाची शिक्षा सांगण्यांत आली; पण, हें प्रकरण हायकोर्टांत गेल्यावर गणेशपंत निर्दोषी ठरले व त्यांचा दंड परत देण्यांत आला. या निकालामुळें नाशिकच्या कार्यकर्त्यांचा उत्साह वाढला व तेथील अधिकारी मनांतल्या मनांत जळफळूं लागले. त्या वर्षीच्या गणेशोत्सवांत-म्हणजे सप्टेंबर महिन्याच्या प्रारंभीं–लो० टिळकांची स्वारी नाशिक क्षेत्रीं गेल्यावेळीं तेथील तरुण मंडळींची संघटना व देशप्रेम पाहून त्यांना आनंद वाटला. लोकमान्य नाशिक येथें असतांना जे अनेक कार्यक्रम झाले त्यांत अभिनव भारतांतल्या वेंचक मंडळींशीं त्यांची झालेली गुप्त चर्चा हा एक महत्त्वाचा कार्यक्रम होता. या कार्यक्रमाच्या वेळीं लोकमान्यांनीं या तरुणांचें अभिनंदन कोणत्या मर्यादेपर्यंत केलें व त्यांनीं त्यांना इषारा कोणता दिला हें पुढील उताऱ्यावरून[1] समजण्यासारखें आहे. या प्रसंगाचें वर्णन करतांना डॉ. वि. म. भट लिहितात :

---

१ लोकमान्य टिळक : आठवणी व आख्यायिका : खंड १ : पृ. ७४–७५.

*लोकमान्यांनीं आमचें म्हणणें शांतपणें ऐकून घेतलें व सरळ रोकडा प्रश्न विचारला कीं, तुमच्या तत्त्वमंडनांत कांहीं कसूर नाहीं; पण, तयारी किती आहे तें सांगा. हा आमच्या मर्मावरच घाला होता. ...... आमच्याजवळ शब्दसामुग्री जय्यत होती. पण, स्वातंत्र्यप्राप्तीला लागणाऱ्या खऱ्या साधनांचा माल आमच्याजवळ अभावच होता. "किरकोळ तयारीनें कांहीं होणार नाहीं; आम्ही या सर्व गोष्टी करून भागलों आहोंत. अनुभवानें शहाणा होऊन मी तुम्हांस सांगतों कीं, जो मार्ग तुम्ही चोखाळूं पहात आहां त्याची अद्यापि वेळ आलेली नाहीं. म्हणून देश तयार होईपर्यंत तुम्हीं धीर धरा व सावधपणें चाला."*

लोकमान्यांनीं केलेला हा उपदेश त्यांच्या श्रोत्यांपैकीं सर्वांनाच पटला नसला तरी, त्या उपदेशाचें मर्म सरकारला चांगलें समजलें व नाशिकच्या तरुणांची संघटना मोडून काढण्याचे त्यांचे प्रयत्न यानंतर जोरानेंच सुरू झाले. या प्रयत्नांच्या पोटींच नाशिकच्या 'वंदे मातरम्' प्रकरणाचा जन्म झाला. या प्रकरणाची पार्श्वभूमि काय होती हें नाशिकचे वकील श्री. श्री. र. वर्तक यांनीं पुढील शब्दांत वर्णिलें आहे:[1]

*नवरात्रांत श्रीःकालिकेकडे जाण्याची लोक गर्दी करीत असत. त्या बाजूस कांहीं सरकारी अधिकारी रहात असत. या अधिकाऱ्यांना त्रास होईल अशा भीतीनें या भागांत 'वंदे मातरम्' हा घोष मोठ्यानें करण्याला मज्जाव झाला होता. या मनाई हुकुमाला लोकांचा विरोध होता. या विरोधांतून कटकटी निर्माण झाल्या व एका पोलिसाबरोबर लोकांची मारामारी झाली. या मारामारीनंतर श्री. वामनरावजी अर्थात् बाबासाहेब खरे, गणेशपंत सावरकर व नऊ विद्यार्थी अशा अकरा जणांवर सरकारतर्फे खटला भरण्यांत आला. तोच 'वंदे मातरम्' चा प्रसिद्ध खटला होय.*

या खटल्यानंतर नाशिकच्या अधिकारीवर्गानें आपल्या शक्तीचें प्रदर्शन करण्यासाठीं जे उपद्व्याप केले ते फारच हास्यास्पद होते. नाशिक शहरांतल्या ज्या थोड्या लोकांना हत्यारें बाळगण्याचे सरकारी परवाने होते ते रद्द करून टाकण्यांत आले. रात्रींअपरात्रीं लोकांच्या घरांच्या झडत्या होऊं लागल्या. या झडत्यांचें निमित्त काढून सरकारी अधिकारीच निरुपद्रवी नागरिकांच्या घरांत आक्षेपार्ह वस्तू टाकतात, अशा तक्रारी ऐकूं येऊं लागल्या. नाशिकच्या बंडखोरांची रग जिरविण्याची जय्यत तयारी आपण केलेली आहे असें लोकांना पटावें म्हणून, देवळाली येथील लष्करांतल्या गोऱ्या सोजिरांची नाशिकच्या प्रमुख रस्त्यांतून मिरवणूक काढण्यांत आली. या प्रकारामुळें लोक दबून जातील ही सरकारी अधिकाऱ्यांची अटकळ फसली. लोकांची प्रतिकारक्षमता वाढण्याला या प्रकारांची मदत झाली व आधींच उत्पन्न झालेल्या लोकक्षोभांत या प्रकारांमुळें भरच पडली.

---

१ विराम : पृ. ९०

स्वदेशी व वंगभंग या दोन आंदोलनांमुळें बंगाल व महाराष्ट्र यांचे परस्पर-संबंध अगोदरच दृढ झालेले होते. या वर्षी उन्हाळ्यांत श्रीशिवजयंत्युत्सवाचा प्रसंग साधून, लोकमान्य टिळक, दादासाहेब खापर्डेप्रभृति मंडळी कलकत्त्याला गेल्यामुळें हे संबंध अधिकच दृढावले. याचा परिणाम असा झाला कीं, बंगाल्यांतील हरएक क्षोभाचें प्रतिबिंब महाराष्ट्रांत पडूं लागलें व महाराष्ट्र नि बंगाल या दोन्ही प्रांतांतला लोकक्षोभ चांगलाच प्रखर बनूं लागला. बंगालमध्यें 'सोनेरी बंगला' या नांवाची एक गुप्त संघटना असल्याचा संशय सरकारला या सुमारास येऊं लागल्यामुळें, सरकार भांबावल्यासारखें वागूं लागलें. एप्रिल महिन्यांत झालेल्या बारिसाल परिषदेच्या वेळीं ' वंदे मातरम् ' च्या घोषाला मज्जाव करून सर बॅम्फील्ड फुल्लरच्या हस्तकांनीं जें वादळ निर्माण केलें होतें, त्याची गर्जना आतां चांगलीच उठूं लागली होती. ह्या वादळामुळें बंगाली तरुणांचीं मनें बॅम्फील्ड फुल्लरविरुद्ध किती क्षुब्ध झालीं होतीं हें सुरेंद्र-नाथ बानर्जी यांनीं A Nation in Making या आपल्या आत्मचरित्रात्मक ग्रंथांत[1] सांगितलें आहे बनारीपारा येथील लष्करांतल्या कांहीं लोकांनीं स्त्रियांवर अत्याचार केल्याचें वृत्त ऐकल्यामुळें खवळून गेलेले दोन बंगाली तरुण एके दिवशीं सायंकाळीं सुरेंद्रबाबूंच्या भेटीला आले. पूर्वबंगालचा लेफ्टनंट गव्हर्नर या नात्यानें बंगालमधलि सर्व अनिष्ट प्रकारांची जबाबदारी सर बॅम्फील्ड फुल्लरवर पडत असल्यामुळें, त्याच्या-वर पिस्तूल झाडून त्याचा जीव घेण्याचा आपला संकल्प असल्याचें या तरुणांनीं सांगितलें; तेव्हां, " राजीनामा दिल्यामुळें मृतवत् झालेल्या फुल्लरला मारण्यांत काय पुरुषार्थ आहे " असा प्रश्न विचारून, सुरेंद्रबाबूंनीं त्या तरुणांना आपला संकल्प सोडून देण्याचा सल्ला दिला. बारिसाल परिषदेपूर्वीपासूनच सुरेंद्रनाथ बानर्जी यांची लोकप्रियता वाढलेली होती व त्या परिषदेनंतर सरकारनें त्यांच्यावर जे खटले भरले त्यांमुळें तर ते बंगालचे अनभिषिक्त राजेच मानण्यांत येऊं लागले. दि.७-८-१९०६ रोजीं कलकत्ता येथें वीसबावीस हजार लोकांची सभा होऊन, सुरेंद्रबाबूंवरील प्रेम व्यक्त करण्यासाठीं लोकांनीं त्यांच्याप्रीत्यर्थ शांत्यभिषेकसमारंभ केला. या समारंभा-मुळें गांगरून गेलेल्या सरकारी अधिकाऱ्यांनीं घडलेल्या प्रकाराचा विपर्यास केला. बंगाली लोकांनीं सुरेंद्रबाबूंना राज्याभिषेक केला, बंगालमधील ब्रिटिश सत्ता लुप्त झाली, असा कांगावा एकसारखा सुरू झाला.

सुरेंद्रबाबूंच्या या राज्यारोहणाची नवलकथा प्रसिद्ध झाल्याबरोबर इंग्लंड-मधील वृत्तपत्रांचा गोंधळ कसा उडाला हें सावरकर यांनीं ' काळ ' पत्राला धाड-लेल्या एका बातमीपत्रावरून स्पष्ट होत आहे. सावरकर इंग्लंडला गेले त्या सुमारास त्यांच्या मराठी लेखनशैलीवर कै. प्रो. अण्णासाहेब परांजपे यांच्या शैलीची छाप भरपूर प्रमाणांत पडलेली होती, याचा पुरावा म्हणूनहि सदर बातमीपत्रांतला पुढील उतारा[2] लक्षांत ठेवण्याजोगा आहे :

---

१ पृ. २३३-३४. २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ.१२-१३.

*आज सकाळीं हिंदुस्थान आपल्या ताब्यांत होता व एका बारा तासांचे आंत तो एका बंगाली बाबूच्या ताब्यांत गेला हें ऐकून कोणास अन्न रुचेना ! व्यापारी लोक आपल्या व्यापारांचें काय होईल म्हणून चिंतातुर झाले, पेन्शनर लोक आपल्या पेन्शनचें काय होईल म्हणून चिंतातुर झाले, सर हेन्री कॉटन व वेडरबर्न हे आतां हिंदुस्थानचें काय होईल म्हणून चिंतातुर झाले ! परंतु या इंग्लिश लोकांतील चिंतेपेक्षां ब्रिटिश काँग्रेस कमिटींतील इंडियन सभासदांना तर रात्रभर झोंप येईना ... बाबू सुरेंद्रनाथानें स्वतः अभिषिक्त होऊन ईश्वरदत्त इंग्रजी राज्याला झुगारून दिलें ! आतां हें जर ईश्वराच्या कानांवर गेलें तर तो काय म्हणेल ! दुःखांत सुख इतकेंच की, इंग्लिश लोक मूर्तिपूजक नसल्यानें त्यांच्या ईश्वराला कान नाहींत ! नाहीं तर यापूर्वीच त्याला ही गोष्ट ऐकूं गेली असती ! परंतु, सर हेन्री कॉटनला कान आहेत त्याची वाट काय लावावी ? त्यांना ही गोष्ट हिंदुस्थानपासूनच ऐकूं आली असेल. ते हिंदुस्थानच्या हिताकरतांच पण रागावले असतील; व हेन्री कॉटन रागावले असतां ईश्वर रागावला काय व न रागावला काय सारखाच ! तेव्हां सुरेंद्रनाथाचें हें किती घोर पाप आहे !*

ज्या बंडाच्या उपशमाला अद्याप पुरीं पन्नासहि वर्षें झालीं नव्हतीं व काँग्रेससारखी संस्था निघाली म्हणजे ज्या बंडाच्या कल्पनेचा पुरा बीमोड होईल असें ह्यूमप्रभृतींना वाटत होतें तें बंड पुन्हां बोकाळलें कीं काय, अशा भीतीनें इंग्रजी वृत्तपत्रांनीं त्या काळांत जे लेख खरडले त्यांचा मासला म्हणून, सावरकर यांनीं उद्धृत केलेला The Standard या पत्रांतला पुढील उतारा[1] वाचनीय आहे :

It appears that we are on the eve of an erruption which, though it might take a different form, would be hardly less deplorable than the storm that was brewing half a century ago. There is certainly an active and malignant agitation against the Government. Sedition is openly preached and authority defied. To the cry 'India for Indians.' has been added the watchword 'downwith the master-foe.' The coronation of the Babu king cannot be overlooked

( स्फोट होण्याच्या समयाच्या अगदीं नजीक आपण येऊन पोंचलों आहों, असें वाटतें. अर्धशतकापूर्वीं जो स्फोट झाला त्यापेक्षां या वेळच्या स्फोटाचें स्वरूप कदाचित् भिन्न असेल; पण, त्याचे परिणाम पूर्वीच्या स्फोटाच्या परिणामाइतकेच उद्वेगजनक ठरतील. सरकारच्या विरुद्ध चळवळ चालली आहे हें निश्चित असून, ती चळवळ नुसती जोमदारच नसून दुष्टपणाचीहि आहे. राजद्रोहाचा प्रचार उघडपणें केला जात आहे व सरकारी अधिकाऱ्यांना धाब्यावर बसविण्यांत येत आहे. 'भारतीयांसाठीं भरतखंड' हें घोषवाक्य जुनेंच आहे. 'पहिल्या प्रतीच्या शत्रूचा निः-

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १५-१६.

पात होवो' या नव्या घोषवाक्याची त्याला जोड मिळालेली आहे. या बंगाली बाबूला राजा मानून लोकांनी जो राज्याभिषेक केला त्याच्याकडे दुर्लक्ष करतां येणार नाहीं.)

सुरेंद्रबाबूंना करण्यांत आलेल्या शांत्यभिषेकाचें स्वरूप विकृत केलें जात आहे ही गोष्ट श्री. रमेशचंद्र दत्त यांना आवडली नाहीं. या विषयाचें सत्यस्वरूप इंग्लंड-मधील लोकांना कळावें म्हणून त्यांनीं दि. ५-९-१९४६ रोजीं एक पत्र लिहिलें. लंडन टाइम्सच्या दि. ७-९-०६ च्या अंकांत हें पत्र प्रसिद्ध झालें. श्री. दत्त यांनीं याच विषयावर लिहिलेलें दुसरें पत्र टाइम्सच्या पुढच्याच अंकांत प्रसिद्ध झालें. हीं दोन्ही पत्रें खरोखर चांगलीं आहेत. वंगभंगाचे परिणाम पुढील भाषेत वर्णून सांगतांना श्री. दत्त यांनीं चांगलेंच धैर्य दाखविलें आहे :

The partition has caused a real and lamentable estrangement which is deepening and broadening and is likely to deepen and broaden in the future—unless some consideration is shown for the wishes of an awakened people in the administration of our country.

(वंगभंगामुळें लोक व राज्यकर्ते यांचे संबंध खरोखरच दुरावले आहेत, याबद्दल कोणालाहि दुःख वाटेल. हा दुजाभाव आधींच खोलवर जाऊन रुतला आहे व तो चांगला ऐसपैस पसरला आहे. हा प्रकार पुढेंहि असाच वाढेल, असा संभव आहे. हें टाळावयाचें असेल तर, जागृत झालेल्या लोकांच्या इच्छेचा कांहीं तरी मान सरकारनें राखला पाहिजे व मायदेशाचा कारभार कांहीं अंशीं तरी त्यांच्या इच्छेप्रमाणें चालविला पाहिजे.) श्री. दत्त यांनीं दिलेला हा इषारा कोणाहि राष्ट्रीय पुढाऱ्याला शोभण्यासारखा आहे. एका सेवानिवृत्त सिव्हिल सर्व्हंटानें उघडपणें इतका स्पष्टोक्तिपूर्ण इषारा दिला याबद्दल कोणालाहि संतोषच वाटेल; पण, सावरकरांची त्या वेळची मनोवृत्ति अशा प्रकारच्या लेखनाचें कौतुक करणारी नव्हती. पत्राखालीं स्वाक्षरी करतांना श्री. दत्त यांनीं 'सेवानिवृत्त सिव्हिल सर्व्हंट' हे वर्णनात्मक शब्द घातले होते. त्यांची थट्टा करतांना सावरकर यांनीं जीं वाक्यें लिहिलीं आहेत तीं वाचतांना कोणालाहि कै० अण्णासाहेब परांजपे यांच्या कांहीं प्रसंगींच्या कुत्सागर्भ लिखाणाचें स्मरण होईल. सावरकर लिहितात[१] :

*इतकें लिहून R. C. Dutt म्हणून खालीं सही केली आहे. पण पुन्हां शंका आली कीं, आपल्यावर इंग्लिश लोकांचा विश्वास कसा बसेल ? असें काय आपल्या अंगीं आहे ? थोडा वेळ विचार करून उत्तम तोड काढली व वरील नुसत्या सहीखालीं Late Civil Servant 'आपलाच एक बंदा गुलाम' म्हणून असलेल्या थोर पदवीनें राजनिष्ठा नम्रतापूर्वक नमूद केली.*

क्षोभजनक भारतीय घटनांकडे लक्ष देण्याची पद्धत सावरकरांनीं नव्यानें सुरू केली नाहीं. पं. शामजी कृष्णवर्माप्रभृतींनीं ती पद्धत सावरकर इंग्लंडांत येण्यापूर्वीच

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १३.

सुरू केली होती. दि. ४-५-०६ रोजीं पं. शामजींच्या होमरूल सोसायटीची सभा झाली त्या वेळीं, बारिसाल परिषदेच्या वेळीं सरकारी अधिकाऱ्यांनीं अवलंबिलेल्या धोरणाचा निषेध करण्यांत आला होता; व दि. ५-५-०६ रोजीं पॅरिस येथें श्री. बॅंकर यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या तेथील भारतीयांच्या सभेनेंहि सदर धोरणाचा निषेध केला होता. पं. शामजींनीं या सुमारास इजिप्तमधील राष्ट्रवादी कार्यकर्त्यांशीं संधान बांधलें असल्यामुळें, इजिप्तमधील वृत्तपत्रांतूनहि सुरेंद्रबाबूंच्या अभिनंदनाचे व ब्रिटिश राजनीतीच्या निषेधाचे लेख येऊं लागले. The Lewa व El Moayyad या इजिप्तमधील पत्रांतून या विषयाची चर्चा सुरू झाल्यामुळें भयभीत झालेल्या एका लेखकानें लिहिलेलें एक पत्र 'लंडन टाइम्स' च्या दि. ३-१०-०६ च्या अंकांत प्रसिद्ध झालें आहे. हा लेखक मुसलमान असावा व त्या वेळीं बीजावस्थेंत असलेल्या पॅन-इस्लामिझमच्या चळवळीचाहि तो पुरस्कर्ता असावा, असें सदर पत्रांतल्या पुढील उताऱ्यावरून दिसतें :

We cannot pretend to be astonished at the Lewa's rashness; but, we say that it is not wise to praise an agitator and one who has done harm to our Mahomedan brothers in India. The Mahomedans, alarmed at the success of this man's movement, have requested the Viceroy to grant them an audience in order to explain to him the sentiments of the 70 millions Muslims of India.

(लेवा पत्रानें दाखविलेल्या अविचारीपणामुळें आम्हांला आश्चर्य वाटलें असें भासविण्याचें ढोंग आम्ही करूं शकत नाहीं. पण, चळवळ्या माणसाची अशी स्तुति करणें बरें नव्हे, असें मात्र आम्ही म्हणतों. आणि हा चळवळ्या तरी कोण? तर, ज्यानें हिंदुस्थानमधील आमच्या मुसलमान बांधवांची हानि केली असा एक इसम! या सुरेंद्रबाबूंच्या चळवळीला जें यश आलें त्यामुळें भिऊन गेलेल्या मुसलमानांनीं हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयची भेट मिळावी अशी विनंति केली आहे. हिंदुस्थानांतल्या ७ कोटी मुसलमानांच्या भावना काय आहेत, हें या भेटींत व्हाइसरॉयला सांगण्याचा या लोकांचा हेतु आहे.)

इजिप्तमधील राष्ट्रवाद्यांचा पाठिंबा भारतीय राष्ट्रीय चळवळीला मिळावा यासाठीं करण्यांत आलेले हे प्रयत्न इजिप्तपुरतेच मर्यादित नव्हते. आयर्लंडमध्येंहि ब्रिटिशविरोधी भावना धगधगत आहे व तिचाहि उपयोग स्वतःच्या कार्यासाठीं करून घेतला पाहिजे ही गोष्ट पं. शामजी कृष्णवर्माप्रभृति मंडळींच्या लक्षांत आलेली होती. आयर्लंडमधील ब्रिटनविरोधी पक्षानें चालविलेलें Gaelic American हें पत्र या सुमारास न्यूयॉर्कहून प्रसिद्धिलें जात होतें. 'केसरी'च्या दि. १३-११-१९०६ च्या अंकांत या पत्राच्या एका अंकांतला पुढील उतारा उद्धृत करण्यांत आलेला आहे. अमेरिकन जगतांत ब्रिटनविरोधी भावना फैलावण्याच्या दृष्टीनें व भारताचें मनोगत

या नव्या जगांतल्या लोकांना समजावून देण्याच्या दृष्टीनें हें पत्र किती उपयुक्त ठरलें असेल, हें पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होईल :

So far as the influence of the Gaelic American extends, it will be its duty to dissuade Irishmen everywhere from entering the services of the British Government in any capacity in India or from having any part in the robbery and oppression of her people.

( ' गॅलिक अमेरिकन ' पत्राचें जें कांहीं वजन असेल त्याचा उपयोग एकाच दिशेनें केला जाईल. कोठेंहि रहात असलेल्या आयरिश माणसानें कोणत्याहि नात्यानें हिंदुस्थानांत ब्रिटिश सरकारची नोकरी करूं नये अगर त्यानें भारतीय लोकांवर होणारा जुलूम व त्यांची होणारी लूट यांत भाग घेऊं नये, हें मत फैलावण्याचें कर्तव्य 'गॅलिक अमेरिकन' पत्र बजावील. )

' विनायक ' या नांवानें या पत्रांत लेख लिहिण्याला सावरकर यांनीं १९०६ च्या अखेरीच्या सुमारास प्रारंभ केला, असें समजतें.

दक्षिण आफ्रिकेंत असलेले बॅ. गांधी यांचें कांहीं प्रसंगींचें वर्तन पं. शामजी कृष्णवर्मा यांना किती नापसंत असे हें यापूर्वी सांगण्यांत आलें आहे. गांधींचें प्रासंगिक वर्तन नापसंत असलें—किंवा, कांहीं मतें प्रतिपादीत असतांना त्यांच्याकडून जो अतिरेक केला जाई तोहि तत्त्वतः अमान्य असला—तरी गांधीजींच्या नेतृत्वाखालीं दक्षिण आफ्रिकेंत चाललेल्या भारतीयांच्या चळवळीकडे शामजीप्रभृतींचें पूर्ण लक्ष असे. गांधीजी व शामजी यांची यापूर्वीची वैयक्तिक ओळखहि होती. त्यामुळें, या सुमारास गांधीजी जेव्हां इंग्लंडांत आले, तेव्हां ते शामजींकडे येऊं लागले व भारत-भवनांतहि त्यांच्या खेपा होऊं लागल्या. १९०६ सालच्या सप्टेंबर महिन्यांत ट्रान्सव्हाल येथील विधिमंडळांत ' एशियाटिक लॉ अमेंडमेंट ऑर्डिनन्स ' नांवाचा कायदा संमत करण्यांत आला होता. या कायद्यामुळें ट्रान्सवालमधील हिंदी नागरिकांना पराकाष्ठेचा अन्याय करण्यांत आला होता. या अन्यायाविरुद्ध दाद मागण्याचा एक मार्ग म्हणून भारतमंत्री मोर्ले यांच्याकडे एक शिष्टमंडळ धाडण्याचें ट्रान्सवालमधील ब्रिटिश इंडियन असोसिएशननें ठरविलें होतें. गांधीजी हे या शिष्टमंडळाचे एक सदस्य होते. २२–११–१९०६ रोजीं मोर्लेसाहेबांनीं गांधीप्रभृतींच्या शिष्टमंडळाशीं वाटाघाट केली. हें शिष्टमंडळ डिसेंबरच्या प्रारंभीं लंडनहून परत गेलें असें ३० नोव्हेंबरचें गांधीजींचें पत्र 'लंडन टाइम्स 'मध्यें प्रसिद्ध झालें आहे, त्यावरून दिसतें. गांधीजी लंडन येथील वास्तव्याच्या काळांत भारतभवनांत येत असत ही गोष्ट श्री. इंदुलालजी याज्ञिक यांनीं लिहिलेल्या पं. शामजी कृष्णवर्मा यांच्या चरित्रांत नमूद करण्यांत आलेली आहे. दि. २०–७–१९३७ रोजीं शेगांव येथून गांधींनीं श्री. शं. द. देव यांना धाडलेलें एक पत्र दैनिक 'त्रिकाळ 'च्या दि. २९–७–३७ च्या अंकांत प्रसिद्ध झालेलें आहे. बॅ. सावरकर यांची व माझी लंडनमध्यें प्रथम भेट झाली त्या वेळीं आमचे संबंध किती ' मधुर ' होते हें या पत्रांतलें वाक्य १९०६

च्या उत्तरार्धात झालेल्या भेटीसंबंधींचें आहे, हें निश्चित. गांधीजी 'अिंडिया हाऊस' मधील चर्चेच्या वेळीं उपस्थित असत व चर्चेचा परिणाम म्हणून त्यांच्या मताचे लोक क्रमशः कमी होत, अशा आशयाचीं विधानें बॅ. सावरकर यांनीं १९३७ नंतर कित्येक व्याख्यानांतून उघडपणें केलीं आहेत. 'इंडिया हाऊस' मधील चर्चेच्या वेळीं गांधीजी आपल्या सत्याग्रहाच्या 'तत्त्वज्ञाना'चा पुरस्कार करीत असले पाहिजेत; व, या विचार-सरणींतले दोष व या तत्त्वज्ञानाच्या मर्यादा स्पष्ट करून सांगण्याचें काम सावरकर करीत असले पाहिजेत, हें सावरकर यांनीं लंडनहून 'काळ' पत्राला धाडलेल्या बातमीपत्रांचें कालक्रमवार निरीक्षण केल्यास लक्षांत येऊं शकेल.

दि. ४–१–१९०७ च्या साप्ताहिक 'काळ' मध्यें प्रसिद्ध झालेलें लंडनचें बातमीपत्र १९०६ च्या डिसेंबरच्या प्रारंभीं लंडनमध्यें लिहिलें गेलें असलें पाहिजे. 'इंग्लंडांतील स्त्रिया व हिंदुस्थानांतील पुरुष' हें या पत्राचें शीर्षक आहे. इंग्लंडांतील मताभिलाषी स्त्रियांच्या चळवळींचें वर्णन करतांना, विषयाला थोडीशी सूचक कलाटणी देऊन, सावरकर यांनीं पुढील वाक्यें लिहिलीं आहेत[1] :

*या जहाल पक्षांतहि दोन भेद झाले. एक रडक्या प्रतिकाराचे किंवा अप्रत्यक्ष प्रतिकाराचे ( Passive Resistance ) अभिमानी व दुसरे लढाऊ प्रतिकाराचे किंवा प्रत्यक्ष प्रतिकाराचे अभिमानी. प्रतिकार म्हटला कीं तो रडून कधींहि करतां यावयाचा नाहीं. अप्रत्यक्ष प्रतिकाराला प्रत्यक्ष प्रतिकाराचा पाठिंबा असल्याशिवाय नेभळ्या पक्षाहून त्यास जास्त यश कधींहि येणार नाहीं.*

गांधीजी इंग्लंड सोडून गेल्यावरहि त्यांचा सत्याग्रह–म्हणजेच बिपिनचंद्र पालप्रभृतींचा निःशस्त्र प्रतिकार–लंडनच्या हिंदी तरुणांच्या मनात डोकावत राहिला असावा व या तत्त्वज्ञानाचें खंडन करण्यासाठीं सावरकर यांना वारंवार वादविवाद करण्याची आवश्यकता भासली असावी, हें यानंतरच्या दोनतीन बातमीपत्रांत व्यक्त झालेल्या विचारांवरून स्पष्ट दिसतें. आपल्या मनांत घोळत असलेल्या विचारांच्या द्वारा मनुष्य सभोंवारच्या घडामोडींचे उलगडे कसे लावीत जातो हेंहि पुढील उतारे वाचतांना लक्षांत येण्यासारखें आहे; कारण, पहिल्या उताऱ्यांत[2] आलेलें निःशस्त्र प्रतिकारासंबंधींचें विवेचन कांहीं अंशीं तरी प्रस्तुत आहे. दुसरा उतारा ज्या बातमीपत्रांतून घेतला आहे तें सर्व बातमीपत्र निःशस्त्र प्रतिकाराच्या मार्गाचें वैयर्थ्य किंवा मर्यादित सामर्थ्य वाचकांना पटवून देण्याच्याच उद्देशानें लिहिलें आहे कीं काय, असा भास होतो. पहिल्या उताऱ्यांत सावरकर लिहितात :

*या दुःखदायक गुलामगिरीचा पूर्ण वैताग येऊन आयर्लंडला जीवित दुःसह झालेलें आहे. आतां स्वतंत्र होऊं किंवा मरूं; परंतु गुलामगिरींत जिवंत रहावयाचें नाहीं, असा निश्चय तरुण लोक राजरोस रीतीनें करूं लागले आहेत.*

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ३८. २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ४५–४६.

*स्वदेशी चळवळ जोरावत आहे. अप्रत्यक्ष प्रतिकारहि सुरू झाला आहे. लोकांनीं दारू पिऊं नये, सरकारी नोकऱ्या धरूं नयेत, परका माल घेऊं नये इत्यादि निरनिराळ्या रूपानें स्वदेश स्वतंत्र करण्याचे प्रयत्न सुरू झाले आहेत. परंतु, हे सर्व प्रयत्न सुरू केले तरी, राष्ट्रस्वातंत्र्य मिळणें शक्य आहे काय?* Passive Resistance *अप्रत्यक्ष ऊर्फ रडक्या प्रतिकारानें जुलमी मदांधांच्या तावडींतून आपलें आयर्लंड आपणांस मुक्त करतां येणें शक्य आहे काय? "आम्ही कर देत नाहीं जा" "आम्ही अप्रत्यक्ष प्रतिकार करीत आहोंत; खबरदार आमच्या अंगाला हात लावशील तर" अशा नुसत्या दरडावणीला शत्रू भीक घालील काय? वगैरे प्रश्न आपल्या मनाला विचारून, आयर्लंड या वर्षारंभाला कांहीं निराळींच उत्तरें देऊं लागलें आहे. एक आयरिश प्रमुख पत्र म्हणतें: आयर्लंडला स्वतंत्र करण्याचा एकच मार्ग आहे; तो मार्ग म्हणजे इंग्लिशांना हुसकून देणें हा होय. परंतु, इंग्लिशांना हुसकून कसें द्यावयाचें? अर्जांनीं कीं व्याख्यानांनीं कीं विनंत्यांनीं कीं,* Passive Resistance *च्या रडक्या प्रतिकारानीं? तें पत्र म्हणतें:*

That can only be done by physical force; no matter how many little things can be got by other means, there can be no substitute for force to achieve complete freedom,

*( बारीकसारीक व उष्टे तुकडे जरी विनंत्यांनीं, लांगूलचालनांनीं किंवा पोकळ गुरगुरण्यांनीं मिळाले तरी, पूर्ण स्वातंत्र्य हें लढाईशिवाय कधींहि मिळणार नाहीं. )*

दक्षिण फ्रान्समधील दारूचे मळेवाले व फ्रेंच सरकार यांच्यामधील भांडण विकोपास जाण्याचा संभव दिसूं लागला व त्या भांडणांत सत्याग्रह अर्थात् निःशस्त्र प्रतिकार या मार्गाचा उल्लेख करण्यांत येऊं लागला. त्याबरोबर, फ्रान्समधील या भांडणाचें स्वरूप स्थानिक असूनहि, सावरकरांनीं हा विषय फिरून हातीं घेतला व 'अप्रत्यक्ष प्रतिकाराचा जय व पराजय' हें स्वतंत्र व ठसठशीत शीर्षक देऊन त्यांनीं हा महत्त्वाचा विषय फिरून एकदां चांगलाच फुलविला, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. 'लंडनचीं बातमीपत्रें' या पुस्तकाचीं ६७-७३ पृष्ठें या एका बातमीपत्रानें व्यापिलेलीं आहेत. राज्यक्रांतीचें नवें साधन म्हणून अप्रत्यक्ष प्रतिकाराचें तत्त्व सर्वत्र विकलें जात आहे ( पृ. ६८ ) असें या पत्राच्या पूर्व भागांतच सावरकरांनीं सांगितलें आहे. अप्रत्यक्ष प्रतिकाराचे भिन्नभिन्न मार्ग कोणते याची कल्पना देतांना सावरकरांनीं ज्या गोष्टींचा निर्देश केला आहे ( पृ. ६९ ) त्यांत सध्यांच्या भाषेंतील असहकार व करबंदी यांचाहि अंतर्भाव होतो, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. 'राज्ययंत्र बंद पाडण्यासाठीं केलेला सार्वत्रिक संप' असें अप्रत्यक्ष प्रतिकाराचें सुटसुटीत वर्णन केल्यावर सावरकरांनीं पुढील वाक्य[1] लिहिलें आहे:

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ६९

या अप्रत्यक्ष प्रतिकाराचा आश्रय धरून वाटेल त्या सरकारला ताळ्यावर आणतां येईल, अशी हल्लीं बऱ्याच लोकांची कित्येक देशांमध्यें प्रवृत्ति होत चाललेली आहे. अप्रत्यक्ष प्रतिकाराचें हें साधन नवें, अतएव अनुभवसिद्ध नसलेलें; सबब त्याचा प्रभावीपणाहि संशयास्पद, असें सुचवितांना सावरकरांनीं पुढील वाक्य लिहिलें आहे :[1]

*शस्त्र हातीं न घेतां, रक्ताचा एक थेंबहि न सांडतां, फार काय परंतु राजद्रोहाची जोखीम अंगावर न घेतां, राज्यक्रांतीसारखें प्रचंड कृत्य करण्याचें अप्रत्यक्ष प्रतिकार हें एक अभूतपूर्व साधन आपण शोधून काढलें आहे असा या विसाव्या शतकाला यथार्थ गर्व वाटत असे; तथापि या नवीन साधनाचा उपयोग मात्र आजपर्यंत अगदीं बेमालूम रीतीनें कोणीहि केलेला नसल्यानें राज्यक्रांति करण्यास हें साधन किती उपयोगीं पडेल याचा व्यावहारिक निकाल अजून लागलेला नाहीं.*

दक्षिण फ्रान्समध्यें करण्यांत आलेला अप्रत्यक्ष प्रतिकाराचा प्रयोग किती सर्वांगपूर्ण होता हें पुढील वर्णनांत[2] सांगितलें आहे :

*दक्षिण फ्रान्समधल्या शेंकडों शहरीं व खेडेगांवीं अप्रत्यक्ष प्रतिकार सुरू झाला. हजारों कारकुनांनीं नोकऱ्या सोडल्या, मुलांनीं शाळा सोडल्या, शहरांतील म्युनिसिपालिट्या मोकळ्या झाल्या. सर्व दक्षिणेंतील शहराच्या मुख्य मेंबरांनीं त्या ठरलेल्या तासाला राजीनाम्याच्या तारा पॅरिसला धाडल्या व खुद्द पॅरिसच्या लोकसभेंतील दक्षिणेकडचे सभासद सभा सोडून चालते झाले. सरकारी बिल्ले व पट्टे व अधिकारदंड हजारोंनीं व लाखांनीं झुगारून देण्यांत आले व अशा रीतीनें एका तासांत फ्रान्सच्या दक्षिणेकडील विस्तीर्ण प्रांतांत राज्यरचना नामशेष झाली ! पोलिस उरले नाहींत, सैन्यानें गोळ्या घालण्याचें नाकारलें ! अप्रत्यक्ष प्रतिकाराची याहून चांगली अशी रचना करणें, हें अगदीं अशक्य आहे.*

इतका संघटित अप्रत्यक्ष प्रतिकारहि शेवटीं अपेशी कां ठरला हें सांगून सावरकरांनीं पुढें असें म्हटलें आहे कीं, अप्रत्यक्ष प्रतिकाराचें सारें तत्त्वज्ञानच असंभाव्य गोष्टी संभाव्य आहेत या चुकीच्या समजुतीवर आधारलेलें आहे. सावरकर लिहितात :[3]

*लष्करी सामर्थ्याच्या अभावीं अप्रत्यक्ष प्रतिकार कसा लंगडा पडतो हें फ्रान्समध्यें फार चांगल्या रीतीनें सिद्ध झालेलें आहे. अप्रत्यक्ष प्रतिकारानें सर्व काम होईल, असें वाटणाऱ्या पुढाऱ्यांना दुसऱ्या प्रांतांतून आणलेल्या लोकांकडून पकडण्यांत आलें; सर्व दक्षिणेभर शिपायांचा गराडा पडला, लष्करी कायदा सुरू झाला, वक्तृत्व व सभा बंद पडल्या व नुसत्या धाकदपटशानें*

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ६९–७०. २ लंडनचीं बातमीपत्रें: पृ. ७१

३ लंडनची बातमीपत्रें : पृ. ७१–७२

*सरकार गांगरेल ही जी आशा लोकांना होती ती नष्ट झाली. अर्थात् लोकांनींहि शस्त्र उपसलें, आपल्या अप्रत्यक्ष प्रतिकाराचा त्याग करून ते प्रत्यक्ष प्रतिकाराकडे वळले व आतां दोन हात होऊन शेवटचा निकाल काय लागतो हें कळणें हें त्या उभयतांच्या हातांतील जोरावर अवलंबून राहणार! म्हणजे, अप्रत्यक्ष प्रतिकाराच्या मागें लष्करी सामर्थ्य असलें तरच तो विजयी होतो, नाहीं तर त्याचाहि–त्या अप्रत्यक्ष प्रतिकाराचाहि–दुर्बलत्वानें पराजय होतो, हें सप्रयोग सिद्ध केलें गेलें.*

*सरळ विचारपद्धतीनेंहि हेंच सिद्ध होतें. अप्रत्यक्ष प्रतिकारांत एकूण एक मनुष्य अत्यंत उदात्त होईल, असें गृहीत धरलेलें असतें. सर्वजण सरकारी नोकऱ्या सोडतील हा त्याचा मुळारंभ असतो. परंतु, दारिद्र्यानें निष्कांचन झालेल्या लोकांत, इच्छा असली तरीहि, इतकी उच्च स्वार्थ–परावृत्ति तोलून धरण्याची शक्ति नसते. दुसरी गोष्ट अशी कीं, अप्रत्यक्ष प्रतिकारांत विरुद्ध पक्षाहि उदात्त आहे, ठरविलेले कायदे तो कधीं मोडणार नाहीं व नवीन जुलमी कायदे तो कधीं करणार नाहीं असें गृहीत धरून चालण्यास आरंभ होतो. परंतु, ही गोष्ट सर्वस्वीं अशक्य आहे. जो लोकसंमतीच्या विरुद्ध जाण्याइतका नीच असतो तो वेळेवर नवीन कायदे करून वा जुने उकरून काढून ती लोकसंमति व तिचा अप्रत्यक्ष प्रतिकार बळानें दाबून टाकण्याइतका क्रूरहि असतो.*

वरील तात्त्विक विवेचन वाचकांच्या गळीं पुरतेपणीं उतरावें म्हणून एका पौराणिक प्रसंगाचें विवेचन करून सावरकर यांनीं हें पत्र पुरें केलें आहे: [1]

*विश्वामित्र वसिष्ठाची कामधेनू मागूं लागला. वसिष्ठ ऋषींनीं ती न देण्याबद्दल शक्य ते आढेवेढे घेतले. त्यानंतरहि जेव्हां विश्वामित्र ऐकेना तेव्हां मग वासिष्ठानें अप्रत्यक्ष प्रतिकाराच्या तत्त्वाप्रमाणें निदान त्याला साहाय्य तरी करावयाचें नाहीं, असा निश्चय केला. मी तरी माझ्या कामधेनूला जावयाला सांगत नाहीं, मी तिला सोडणार नाहीं, इतकें सांगून तो तपोधन मुनि स्वस्थ उभा राहिला. परंतु विश्वामित्रानें ती कामधेनु सोडण्यासाठीं स्वतःच्या सैनिकांस आज्ञा दिली. त्या वेळीं,*

**दंडें ताडुनि नेतां फोडी ती धेनु फार हंबरडे ।**
**तेव्हां आश्रमवासी द्विज-मृग-खग-देवता कदंब रडे ॥**

*परंतु, या देवतादिकांच्या रडक्या प्रतिकारानें काम भागेना. अखेर ‘धेनुमिषें त्या मुनिची सुतपस्यासिद्धि’ जेव्हां कोपली व त्या कामधेनुच्या अंगांत दबून*

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ७२–७३.

*बसलेल्या हजारा क्षत्रियांनीं जेव्हां तलवारीवर तलवारी आदळल्या तेव्हांच मात्र वासिष्ठांची कामधेनु वासिष्ठांना परत मिळाली !*

विसाव्या शतकाच्या आरंभीं जगांतल्या भिन्न भिन्न देशांमधून जी राजकीय क्रांतीची लाट उसळूं लागली तिच्यामुळें राजकीय क्रांतीचे प्रभावी मार्ग कोणते या संबंधींची चर्चाहि सर्वत्र सुरू झाली. हिंदुस्थानच्या एकंदर परिस्थितीचा विचार करून पुष्कळशा जहाल पुढाऱ्यांनीं Passive Resistance हा मार्ग सार्वत्रिक प्रचाराच्या दृष्टीनें संमत ठरविला. गांधींच्या सत्याग्रह तत्त्वज्ञानाचा चिकित्सक दृष्टीनें ऊहापोह करणारे पं० शामजी कृष्णवर्मा हे क्रांतीची भाषा बोलत; पण, त्यांनाहि या वेळपर्यंत असेंच वाटत होतें कीं, इंग्रज रक्तपातापर्यंत पाळी आणणार नाहींत; हिंदुस्थानांतली अधिकारक्रांति शांतिमय मार्गांनीं घडेल. गांधींनीं दक्षिण आफ्रिकेंतल्या हिंदी नागरिकांचें पुढारीपण स्वीकारून या विचारसरणीला सत्याग्रहाचें स्वरूप दिलें. प्रतिपक्षाला उपद्रव होण्याच्या दृष्टीनें गांधींचा मार्ग निःशस्त्र प्रतिकाराच्या मार्गाइतकाहि प्रभावशाली ठरण्याजोगा नव्हता. सगळ्या नैतिक जबाबदाऱ्या चळवळ करणाऱ्या दलितांवर टाकण्याचें गांधीमार्गातलें वैशिष्ट्य शेवटीं चळवळ करणाऱ्यांनाच खोड्यांत टाकणारें होतें.

सावरकरांनीं भारतभवनांतल्या आपल्या तरुण सहकाऱ्यांसह पं. शामजी कृष्णवर्मा, गांधीजी इत्यादि शांततावाद्यांबरोबर या सुमारास जी चर्चा चालविली होती तीच वरील बातमीपत्रांच्या द्वारा बाहेर पडलेली आहे, असें स्पष्ट दिसतें. या दृष्टीनें पाहिलें तर, सावरकरांनीं लिहिलेलीं 'बातमीपत्रें' बातमीपत्रें ठरत नसून तीं प्रचारपत्रेंच ठरतात.

शामजी कृष्णवर्मा व त्यांच्या भोंवतीं जमा झालेले सावरकरप्रभृति तरुण यांच्या विचारसरणीची छाप आपल्या कांहीं मित्रांच्या व हितचिंतकांच्या मनावर बसत आहे ही गोष्ट ध्यानांत आल्यामुळें, गांधींचें मन या सुमारास अस्वस्थ झालें असावें. भारतभवनांत ते येतजात असत ते तेथील गोष्टी बारकाईनें पहाण्यासाठीं येतजात असत. भारतभवन, शामजी, सावरकर यांचें दर्शन घेतल्यावर गांधींना असें दिसलें कीं, या क्रांतिकारकांच्या मतांच्या आहारीं जात असलेल्या आपल्या ऋणानुबंधी मित्रमंडळींचीं मनें तेथून परावृत्त करण्याला अवश्य असणारीं साधनें आपल्या हातीं आलीं आहेत! अशा विश्वासानें गांधींनीं डॉ. पी. जे. मेथा या त्यांच्या मित्राला दि. ३-१२ १९०६ रोजीं एक पत्र लिहिलें. श्री. इंदुलालजी याज्ञिक यांनीं पं. शामजींच्या चरित्रांत उद्‌धृत केलेलें हें पत्र अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. कोणतीहि गोष्ट अनिष्ट ठरवितांना तिला धर्मविरोधी ठरविण्याची गांधींची खोड आजची नसून ती जुनीच आहे, हें या पत्रावरून स्पष्ट होत आहे. एकाद्यावर टीकेचे कोरडे उडविण्यापूर्वी गांधीजी त्याच्या अंगाला थोडेंफार स्तुतीचें तेल चोपडतात, हा अनेकांना अलीकडे आलेला अनुभव त्या काळांतहि पुष्कळांना येत असावा, असें या पत्रावरून निष्पन्न

होत आहे. एकाद्याला अनाहूत पद्धतीनें उपदेश करण्याचा आव आणावयाचा व हा आव स्वार्थी नाहीं असें भासविण्यासाठीं त्याला कर्तव्यबुद्धीचें अस्तर लावावयाचें, ही गांधीजींची लकबहि पुरातन आहे हें या पत्रावरून सिद्ध होत आहे. अनेक दृष्टींनीं बोधप्रद ठरणाऱ्या या पत्रांतला महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :

I understand that you have been copying Mr. S. K. Varma's teaching. I had long discussions with him and the result is that I recoil with horror from it. That in it which is not new is all right. But it did not need Shyamji to restate the truth That which is new is positively repulsive. The attack on leaders is a part—and an essential Part—of his propaganda This is most demoralising

His methods are based on irreligion and a denial of God or an afterlife It has been said that these things have nothing to do with the goal he places before us Such a thing is impossible. seeing that his goal springs from his view of life. He cannot separate the one from the other. I have watched the practical working of his teaching at the India House and my humble opinion is that the atmosphere around that House is simply reeking with poison. This is strong but none the less true.

My opinion thus expressed does not diminish my esteem for Mr. Shyamji's learning and honesty of purpose. But, neither can serve the country if they lead him and us astray. I think I owe it to you to give. you my views on the matter.

( तुम्ही शामजी कृष्णवर्मा यांच्या शिकवणीचें अनुकरण करीत असतां, असें मला कळलें आहे. मी त्यांच्याशीं दीर्घ काळपर्यंत वादविवाद केले आहेत. मी त्या शिकवणीला भ्यालों नि दचकून मागें सरलों. मी केलेल्या वादविवादांचा परिणाम हा असा झाला. त्या शिकवणुकींतला जो भाग नवीन नाहीं तेवढा भाग ठीक आहे. पण तेवढा सत्यांश पुनरुक्त करण्याला अगदीं शामजीच पाहिजे होते, असें नाहीं. शिकवणुकींतला जो भाग नवा आहे तो निर्विवाद ओंगळ आहे. पुढाऱ्यांवर हल्ले चढविणें हें शामजींच्या प्रचारकार्यांतलें एक अंग आहे—चांगलें महत्त्वाचें अंग आहे. ही प्रवृत्ति अत्यंत हीन प्रकारची आहे.

शामजींचे मार्ग अधर्मावर आधारलेले आहेत; ईश्वराचें अस्तित्व अमान्य करणें, पुनर्जन्म न मानणें या गोष्टी या मार्गांत अगदीं मूलभूत आहेत. शामजी लोकांपुढें जें ध्येय ठेवतात त्या ध्येयाशीं या अमान्यतेचा कांहीं संबंध नाहीं, असें कांहीं लोक म्हणतात. ही गोष्ट अशक्य आहे. कारण, शामजींची जीवनविषयक दृष्टि हीच शामजींच्या ध्येयाच्या मुळाशीं आहे. या दोहोंमध्यें भेद आहे असें त्यांना म्हणतांच येणार नाहीं. शामजींच्या शिकवणीचें व्यावहारिक स्वरूप कसें काय आहे हें मी 'इंडिया हाउस' मध्यें जाऊन पाहिलें आहे. माझें नम्र मत असें आहे कीं, भारतभवनासभोंवतीं जें वातावरण आहे तें विषानें नुसतें फणफणलेलें आहे. हें वर्णन कडक आहे; पण, तें अगदीं खरें आहे. . . . . . . .

मी आपलें मत अशा प्रकारें व्यक्त केलें याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं, शामजींचें पांडित्य व त्यांच्या हेतूंचा प्रामाणिकपणा यांच्याविषयीं मला वाटत असलेला आदर ओसरला आहे. पण, हे गुण जर शामजींना व लोकांना चुकीच्या मार्गाला लावीत असतील तर त्यांचा देशाला उपयोग होणार नाहीं. यासंबंधींचीं माझीं मतें मी तुम्हांला कळवावीं हें कर्तव्यप्राप्तच आहे, असें मी समजतों. )

सावरकरप्रभृति मंडळींच्या मतप्रचाराची लोकप्रियता गांधीजींना इतकी जाणवली कीं, या पंथापासून आपण भिन्न आहों असें जगजाहीर करणें त्यांना अवश्य वाटूं लागलें. आफ्रिकेंत परत गेल्यावर कांहीं महिन्यांनीं गांधीजींनीं ' हिंद-स्वराज्य ' हें पुस्तक प्रसिद्ध करून[1] आपल्या देशोन्नतिविषयक कल्पना काय आहेत व त्या कल्पना सिद्ध करून दाखविण्याचे आपले मार्ग कोणते आहेत हें त्यांनीं लोकांपुढें मांडलें. एवढ्यानेंहि समाधान न झाल्यामुळें गांधीजींनीं या सुमारास 'मारो काटो का पंथ' या नांवाचें एक चोपडें प्रसिद्ध करून क्रांतिकारक पक्षावर हल्ला चढविला, अशीही माहिती मिळते. ज्या सावरकरांच्या मतांबद्दल गांधीजींच्या मनानें इतकी दहशत खाल्ली व ज्या मतांच्या उच्चाटणासाठीं त्यांनीं तत्काळ उद्योग आरंभिला त्या सावरकरांचे व आपले संबंध ' मधुर ' होते ही दंतकथा सत्यप्रेमी गांधींनी १९३७ सालीं प्रसृत करावी हें महदाश्चर्य होय. मुत्सद्यांच्या वाणींतून व लेखणींतून निघणारे शब्द प्रसंगीं किती उलट्या काळजाचे असूं शकतात हें ज्याला पटवून

१. १९३८ सालीं प्रसिद्ध झालेल्या ' हिंद-स्वराज्य ' या पुस्तकाच्या आवृत्तींत या पुस्तकाच्या उत्पत्तीसंबंधींचा गांधींजींनीं १९२१ सालीं लिहिलेला लेख उद्धृत करण्यांत आलेला आहे. या लेखांतला पुढील उतारा वाचण्यासारखा आहे :

It was first published in the columns of 'Indian Opinion' of South Africa It was written in 1908 during my return voyage from London to South Africa in answer to the Indian School of Violence and its prototype in South Africa. I came in contact with every known Indian anarchist in London. Their bravery impressed me but I feel ihat their zeal was misguided. I felt that violence was no remedy for India's ills and that her civilisation required the use of a different and higher weapon for self--protection

[ साऊथ आफ्रिकेंत चालू असलेल्या ' इंडियन ओपिनियन ' पत्रांत हें पुस्तक प्रथम प्रसिद्ध झालें. १९०८ सालीं मीं लंडनहून दक्षिण आफ्रिकेला परत चाललों होतों तेव्हां प्रवासांत हें पुस्तक लिहिलें गेलें. भारतीय हिंसापंथाला व साऊथ आफ्रिकेंतल्या तत्सम पंथाला उत्तर म्हणून मीं हें पुस्तक लिहिलें. लंडनमधील मुक्कामांत माझा प्रख्यात अशा प्रत्येक क्रांतिकारकाशीं संबंध आला. त्यांच्या शौर्याची छाप माझ्या मनावर पडली; पण, त्यांचा उत्साह चुकीच्या मार्गाकडे वळलेला आहे, असें मला वाटतें. भारताच्या आपत्तीवर हिंसा हा तोडगा नव्हे असें मला वाटतें. भारतीय संस्कृतीचें संगोपन होण्यासाठीं हिंसेहून भिन्न व हिंसेहून श्रेष्ठ अशा शस्त्राची जरुरी आहे, असेंही मला वाटलें.

घ्यावयाचें असेल त्यानें या ठिकाणीं वापरण्यांत आलेला 'मधुर' हा शब्द अवश्य लक्षांत ठेवावा !

लंडनमध्यें जाऊन राहिल्यावर सावरकर यांना एकदोन गोष्टी पूर्वीच्यापेक्षां जास्त स्पष्टपणें दिसूं लागल्या. त्यांतली पाहिली गोष्ट म्हणजे ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध चारी दिशांनीं उफाळलेला असंतोष ! या असंतोषाची कल्पना निदान महाराष्ट्रांतील लोकांना तरी नीटपणीं असावी म्हणून त्यांनीं साधेल त्या प्रसंगाचा फायदा घेऊन ' काळ ' नि ' विहारी ' च्या बातमीपत्रांच्या द्वारा या असंतोषाचें रसभरित वर्णन करण्याचा धडाका चालविला. मि. हिंडमन या सोशियालिस्ट नेत्यानें The Rapids of Revolutions या विषयावर एक व्याख्यान दिलें. त्याचें इतिवृत्त लिहिण्याच्या निमित्तानें सावरकर यांनीं लिहिलेलें ' क्रांतीचे प्रवाह ' हें बातमीपत्र या दृष्टीनें वाचण्यासारखें आहे. क्रांति व उत्क्रांति यांतला भेद काय, सध्यांच्या जगांत राज्यक्रांत्या व समाजक्रांत्या अपरिहार्य कां आहेत वगैरे विषयांच्या चर्चेचा[1] हिंडमनच्या व्याख्यानाशीं फार थोडा संबंध आहे, हें लक्षांत ठेवून वाचकांनीं पुढील उतारा वाचावा :

*कालाच्या उतरणीवरून अकल्पनीय जोरानें आपटनआपटत कोसळणाऱ्या प्रपातांना क्रांति म्हणतात व समप्रदेशावर वाहत असणाऱ्या नदीप्रमाणें विश्ववृत्तीचे जे प्रगमनात्मक मंदौघ त्यांना उत्क्रांति म्हणतात....प्रवाह ही विश्वाची निसर्गवृत्तीच असल्यानें लौकर किंवा उशीरा, मूळ रूपानें किंवा रूपांतरानें, पण गतिशून्यांना चलन मिळूं लागतें. ह्या चलनाच्या आरंभाला, निर्बंधाला फोडून बाहेर घुसणाऱ्या ओघाच्या पहिल्या धडकीला, किंवा गतिशून्य मनुष्याच्या व कुजूं पाहणाऱ्या राष्ट्राच्या पायांना बद्ध करणाऱ्या शृंखला प्रगतीच्या घणाखालीं तुटत असतांना ताडकन् होणाऱ्या आवाजाला क्रांति असें म्हणतात व हा प्रतिक्रियेचा विशेष वेग कमी होऊन मूळ व सामान्य गति प्राप्त झाली म्हणजे या गतीनें होणाऱ्या प्रगमनास उत्क्रांति म्हणतात. जगांतील धर्मक्रांति संपून हल्लीं धर्माची उत्क्रांति सुरू आहे. परंतु जगाच्या राजकारणाची उत्क्रांति होण्यास शेंकडों आपमतलबांचे व अन्यायांचे बंधारे अडथळे करीत असल्यामुळें अजून बऱ्याच राज्यक्रांत्या व समाजक्रांत्या अवश्य आहेत.*

एशियांतील क्रांतिप्रवाहांचें हिंडनमनकृत वर्णन सावरकरांच्या लेखणींतून पुढीलप्रमाणें उतरलें आहे :[2]

*एशियांत राज्यक्रांति सुरू झाली आहे. आतां तिला कोणालाहि थांबवितां यावयाचें नाहीं....हें मीं नुसत्या अजमासानें सांगत नाहीं; हें जवानच्या आधारावर सांगत आहें. या भातखाऊ बुटक्या राष्ट्रानें मासखाऊ व अगडबंब राशीयाला चीत केला तो या राज्यक्रांतीच्या जोरावर होय.... जपानांतून निघून*

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १७-१८. २ लंडनचीं बातमीपत्रें: पृ. ३०-३१

*तो प्रवाह आतां चीनमध्यें शिरत आहे—नव्हे शिरला आहे. मला खात्रीनें अस माहीत आहे कीं, चीनमध्यें भयंकर जागृति उत्पन्न झाली आहे.. परंतु राज्य-क्रांतीचा हा एकच प्रवाह आहे असें नाहीं. चीनमध्यें स्वातंत्र्य थोडयाबहुत प्रमाणानें कायम होतें व म्हणून तेथें जागृति व क्रांति करणारा प्रवाह कितीहि जोरानें वाहत असला तथापि तो परतंत्रांना स्वातंत्र्यार्थ चेतना देणाऱ्या प्रवाहा-पेक्षां कमी जोराचाच असला पाहिजे. परंतु सुदैवानें एशियामध्यें परतंत्रांना स्वतंत्र करण्याची शक्ति धारण करणारा असा एक राज्यक्रांतीचा प्रचंड प्रवाह सुरू झाला आहे. हा प्रवाह म्हणजे हिंदुस्थानची जागृति होय.*

कॉन्झर्व्हेटिव अगर लिबरल पक्षाच्या कडेवर बसून हिंदुस्थानला आपली उन्नति साध्य करून घेतां येणार नाहीं; त्याप्रमाणेंच हिंडमनप्रभृति सोशियालिस्टांच्या-हि कडेवर बसून ती साध्य होणार नाहीं, असा इषारा देतांदेतां सावरकर यांनीं लिहिलेल्या या बातमीपत्राचा शेवटचा भाग फारच सुंदर आहे :[1]

*लोकांच्या कडेवर बसून तुला चालतां येण्याचें शिक्षण संपादन करतां येणार नाहीं. हिंडमन असें बोलले म्हणून हुरळून जाऊं नकोस... हिंडमन किंवा कोणीहि महात्मा जर खरी सहानुभूति दाखवीत असेल तर ती साभार स्वीकार. सहानुभूति स्वीकार, पण मागूं नकोस. सन्माननीय आमंत्रण आल्यास जेवा-वयास जा; पण, आगंतुकी मात्र करूं नकोस. स्वतः कर्तबगारी करून अन्न संपादन कर. परमेश्वरानें तुला भरतभूसारखी शेती दिली आहे. या विस्तीर्ण शेतीला गंगा, यमुना, गोदावरी, कावेरी, सिंधु व ब्रह्मपुत्रा हे अखंड कालवे देवानें तयार करून ठेवले आहेत. या दिव्य शेतींत या अखंड कालव्यांच्या पाण्यानें तुझ्या पूर्वजानें धान्यच नव्हे तर प्रत्यक्ष सोनेंच पिकविलें आहे....तूंच ही शेती करशील तर हींत सोनें पिकेल. परंतु, दुसऱ्याचा नांगर हिच्यावर फिरला कीं हींत प्लेग पिकेल, दुष्काळ पिकेल, पारतंत्र्य पिकेल ! मग हा नांगर बाल्फ-रचा असो किंवा मोर्लेचा असो. ही देवाची शर्त तूं पाळलीस कीं, हिंदुस्थाना-पुढच्या हंगामांत तुझ्या या दिव्य शेतींत, पाऊस पडो किंवा न पडो—कोहि-नूर पिकतील, मयूरासनें पिकतील, कालिदास पिकतील, शिवाजी पिकतील !*

मानवी प्रगमन या एकाच हेतूच्या सिद्धीसाठीं सुरू झालेल्या क्रांतिप्रवाहांचें वर्णन, हा सावरकरांनीं पहिल्या सहामाहींत लिहिलेल्या बातमीपत्रांतील एक आवडता विषय आहे. ब्रिटिश साम्राज्याच्या शक्तीचा होत चाललेला क्षय व त्यामुळें ब्रिटन-मधील विचारी माणसांना वाटत असलेली विवंचना, हा याच काळांत लिहिलेल्या बातमीपत्रांतला दुसरा आवडता विषय आहे. ' राष्ट्रीय तरुण सेना ' या विषयावरील बातमीपत्रांत आलेला पुढील उतारा[2] या दृष्टीनें महत्त्वाचा आहे :

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ३२-३३. २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ७-८.

*जो तो आपापल्या परीनें इंग्रजांची अशक्तता दूर करण्यास काय युक्ति योजावी ह्या विचारांत आहे. इंग्लिश लोक आतां अगदीं घाबरले आहेत. त्यांतूनहि आयर्लंडची चळवळ, ईजिप्तमधील चळवळ, हिंदुस्थानांतील चळवळ,.. वगैरे चळवळींनीं लंडनच्या उरांत धडकी भरली आहे. ज्या आरमाराला व सैन्याला पाहतांच आपण हिंदु लोक गर्भगळित होतों त्या आरमाराची व सैन्याची खरी योग्यता इग्लंडच्या पूर्ण ध्यानांत आलेली आहे.*

सभोंवतीं सर्वत्रच अशा प्रक्षोभजनक घटना घडत असल्यामुळें, सर्वांच्याच भाषणांत या काळीं निर्भय वृत्तीचें प्रतिबिंब पडलेलें आढळे. सावरकर इंग्लंडला गेले तत्पूर्वींच ना. गोखले हे इंग्लंडला जाऊन पोंचले होते. 'लंडनचीं बातमीपत्रें' हें पुस्तक ज्यांनीं वाचलें असेल त्यांना, सावरकरांनीं गोखल्यांच्या आशावादीपणाची व नेमस्तपणाची प्रारंभीं प्रारंभीं किती व कशी थट्टा केली आहे हें सहज आठवेल. ऑगस्टअखेरीस गोखल्यांनीं इंग्लंड सोडलें व दि. १४-९-१९०६ रोजीं ते स्वदेशीं परत आले. गोखले इंग्लंडहून निघाले त्याच्या थोडे दिवस अगोदर 'ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटी इंडिया सोसायटी' या संस्थेंत त्यांचें एक व्याख्यान झालें. नेमस्ताग्रणी गोखले देखील प्रसंगीं किती निर्भयपणानें व निर्भीडपणानें बोलत असत हें त्यांनीं या प्रसंगीं केलेल्या भाषणांतील पुढील वाक्यांवरून लक्षांत येण्यासारखें आहे :

If Indians ever had to choose between gratitude for the past and duty to their own people, there could only be one advice in the matter however painful that might be.

(इंग्रजांनीं गतकालांत केलेल्या उपकारांबद्दल कृतज्ञ राहावयाचें कीं स्वदेशबांधवां-विषयींचें आपलें कर्तव्य पार पाडावयाचें असा बिनतोड प्रश्न हिंदी लोकांसमोर उभा राहिला व एकच एक उत्तर देण्यावांचून गत्यंतर उरलें नाहीं तर, या बाबतींत फक्त एकाच प्रकारचा सल्ला देतां येईल. तो सल्ला कोणाला कितीही दुःखद वाटला तरी त्याची फिकीर बाळगण्याचें कारण नाहीं.)

गोखल्यांच्यासारखे नेमस्त जर इतकें स्पष्टोक्तिपूर्ण भाषण करूं लागले होते तर, हिंडमनसारखा इंग्रज हिंदुस्थानच्या आकांक्षांचा पुरस्कार करतांना कोणती मजल मारीत असेल हें काय सांगावयास हवें ? हिंडमनच्या जळजळीत स्पष्टोक्तीची वानगी वाचकांना मिळावी एवढ्यासाठीं पुढील उतारा दिला आहे :

If the Russians are justified, as justified they assuredly are, in taking matters into their own hands, I, as a common Englishman, whose family inherits full share in the subjugation and robbery of Hindustan, declare that Indians are still more justified in any attempt they may make to shake off our infamous and ruinous foreign despotism.

(आपलें भवितव्य ठरविण्याच्या मार्गाचें स्वेच्छेनें संशोधन करण्याला आपण स्वतंत्र आहों ही रशियन लोकांची भावना जर समर्थनीय असेल—आणि ती निःसंशय

समर्थनीय आहे—तर इंग्रजांची परकी, लांछनास्पद, घातकी व जुलमी सत्ता झुगारून देण्यासाठीं भारतीयांनीं कोणतेहि प्रयत्न केले तर ते अधिकच समर्थनीय आहेत, असें मी जाहीर करतों. इतर इंग्रजांसारखा मीहि एक इंग्रज आहें. हिंदुस्थान जिंकण्याच्या कामांत व हिंदुस्थानला लुटण्याच्या कामांत माझ्या कुटुंबानेंहि यथाप्रमाण भाग घेतलेला आहे. या जाणिवेमुळें मी वरील गोष्ट जाहीर करीत आहें. )

अशा विचारांच्या मोहनींत गुंगून गेलेले इंग्लंडमधील हिंदी विद्यार्थी सर हेन्री कॉटनसारख्या हिंदुस्थानच्या 'सहेतुक' मित्राशीं कसे वागूं लागले होते याचें दिग्दर्शन सावरकरांनीं 'राष्ट्रीय सभेच्या शेळ्या' या बातमीपत्रांत केलें[1] आहे. कै० बद्रुद्दिन तय्यबजी यांच्या निधनाबद्दल दुःख व्यक्त करण्यासाठीं लंडन येथें सभा बोलावण्यांत आली व त्या सभेंत सर हेन्री कॉटन यांचें भाषण झालें. समोर बसलेल्या हिंदी तरुणांना उद्देशून सरसाहेब म्हणाले :

*माझ्यापुढें तरुण इंडियन बसले आहेत त्यांना माझें कळकळीचें—हिंदुस्थानच्या कळकळीचें—सांगणें आहे कीं, त्यांनीं या जुन्या महात्म्यांचें अनुकरण करावें. हिंदुस्थानांत हल्लीं अतिरेकी व अघोरपंथी लोक निघाले आहेत त्यांचें ऐकूं नका. ते म्हणतात कीं आम्हांस संपूर्ण स्वातंत्र्य पाहिजे—म्हणजे आमचा इंग्रजी हिंदुस्थानवरचा अंमल नाहींसा करावयाचा ! अरेरे ! असें करूं नका बरें ! राष्ट्रीय सभा मागते आहे तें ठीक आहे. पण, ब्रिटिशांचा अंमल नाहींसा करून पूर्ण स्वतंत्रता मिळवावयाची हें म्हणणें अनर्थाचें आहे. सभेंत आरोळी उठली ! 'नाहीं, नाहीं.' 'नाहीं काय ? तें अनर्थाचें आहेच आहे.'*

हिंडमनसारख्या इंग्रजानें रशियन लोकांचें उदाहरण पुढें ठेविल्याबरोबर इंग्लंडांतल्या हिंदी तरुणांच्या मनांत कोणते विचार—विकार उद्भवले असतील हें समजावें एवढ्याचसाठीं या सुमारास रशियांत घडलेल्या एका क्षोभजनक प्रकाराचा उल्लेख करणें अवश्य आहे. १९०६ च्या जानेवारी महिन्यांत मॉस्को शहरांत जो लोकक्षोभ झाला त्याचें उच्चाटन करण्याची कामागिरी जनरल मिन ( Minn ) या लष्करी अधिकाऱ्यानें मोठ्या मर्दुमकीनें पार पाडली होती. पीटरहॉफ रेल्वे स्टेशनवर या जनरल मिनवर पिस्तुल झाडून एका रशियन तरुणीनें त्याला ठार मारल्याची बातमी १९०६ च्या सप्टेंबरच्या प्रारंभीं इंग्लिश वृत्तपत्रांतून प्रामुख्यानें झळकत होती.

भोंवतालचें वातावरण अशा प्रकारचें असल्यामुळें, १९०६ च्या डिसेंबर महिन्याच्या शेवटीं कलकत्ता येथें होणाऱ्या इंडियन नॅशनल कॉंग्रेसचें अध्यक्षपद टिळकांना मिळूं नये, अशी कॉंग्रेसचीं सूत्रें हस्तगत करून बसलेल्या नेमस्ताग्रणींची मनापासून इच्छा होती. टिळकच अध्यक्ष झाले पाहिजेत असा लोकमताचा आग्रह होता, यांत शंकाच नाहीं. पण, टिळकांना अध्यक्षपद लाभूं दिलें तर कॉंग्रेसची सर-

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १९–२०.

कारदरबारांत असलेली प्रतिष्ठा घटेल या भीतीनें नेमस्ताग्रणींना पछाडलें होतें. नेमस्तांच्या दृष्टीनें 'दादाभाई नौरोजी' हेहि मोठेसे इष्ट ठरण्यासारखे नव्हतेच. पण, 'दगडापेक्षां वीट मऊ' या न्यायानें दादाभाईना पत्करण्याची त्यांनीं तयारी केली. दादाभाईचें मनोगत खरोखरच काय आहे हें टिळकांना चांगलें माहीत होतें. ह्यामुळें दादाभाईचें नांव पुढें येतांच त्यांनीं त्याला आनंदानें मान्यता दिली. कलकत्ता येथील कॉंग्रेसचें काम सुरळीतपणें पार पडलें. अपशकुनी अँग्लो-इंडियन पत्रांचे अंदाज खोटे ठरून कॉंग्रेस दुभंगली नाहीं. दादाभाईनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत 'स्वराज्या' च्या मागणीचा उच्चार केला. अधिवेशनांत स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण इ. विषयांवरील ठराव उभयपक्षांच्या संमतीनें मान्य झाले, इत्यादि गोष्टींबद्दल टिळकांना फार समाधान वाटलें. नेमस्तांनींहि या प्रसंगीं इतका समजूतदारपणा दाखविला याचें एक महत्त्वाचें कारण असें होतें कीं, कॉंग्रेसचें हें अधिवेशन कलकत्ता शहरीं होत होतें. या वेळीं बंगाल्यांतल्या तरुणांचे विचार किती क्षुब्ध झालेले असतील हें स्वागताध्यक्ष डॉ. रासबिहारी घोष यांच्या स्वागतपर भाषणांतल्या कांहीं वाक्यांवरून स्पष्ट होत आहे. हिंदुस्थान म्हणजे दुसरें आयर्लंड आहे अगर दुसरा रशिया आहे असें म्हणण्याची पाळी राज्यकर्त्यांवर येऊं नये. यासाठीं राज्यकर्त्यांनीं शहाणपणानें व उदारपणानें वागलें पाहिजे, असा इषारा दिल्यावर डॉ. घोष म्हणाले : उगीच कांहींतरी धमकी द्यावी एवढ्यासाठीं मी अशी भाषा वापरीत आहें, असें कोणी समजूंनये. बंगाल्यांतिल तरुण पिढीच्या मनांतले विचार मी जाणतों; आणि म्हणूनच मी ही भाषा वापरली आहे.

महर्षि दादाभाई नौरोजी यांचें कलकत्त्यांतील भाषण हें भारतीय राष्ट्रीय जीवनांतलें नवें मन्वंतर सुरू झाल्याचें स्पष्ट लक्षण म्हणून संस्मरणीय आहे. १८९७ सालीं अमरावतीस झालेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनांत गरम राष्ट्रीय विचारप्रणालीचा जन्म झाला हें खरें असलें तरी, त्या विचारप्रणालीला उघडउघड उचलून धरण्याचें श्रेय कलकत्त्याचे अध्यक्ष दादाभाई यांनाच दिलें पाहिजे. १८५३ सालीं सार्वजनिक जीवनांत प्रवेश केल्यापासून इंग्रजांच्या भलेपणावर विश्वास ठेवून वागत आलेल्या या तपोनिधीनें या भाषणांत वैतागानें पुढील शब्द[1] उच्चारले :

Since my early efforts, I must say that I have felt so many disappointments as would be sufficient to break any heart and lead anyone to despair and even, I am afraid, to rebel.

( पूर्ववयांत केलेल्या या प्रयत्नांपासून निराशेचे इतके प्रसंग मजवर ओढवले आहेत कीं, त्यांच्यामुळें कोणाचेंहि अंतःकरण विदीर्ण व्हावें. या प्रसंगांमुळें कोणीहि मनुष्य वैतागेल, यांत नवलच नाहीं. मला वाटतें, या अनुभवामुळें तो बंडालाहि प्रवृत्त होईल. ) देशभर चळवळ करण्याचें महत्त्व किती आहे, या बाबतींत बंगाली बंधूंनीं किती आघाडी मारली आहे, इंग्लंडांतहि चळवळ करणें अवश्य आहे वगैरे गोष्टींचें प्रतिपादन केल्यावर दादाभाईनीं आपल्या भाषणांत स्वराज्याचा मंत्र[2] सांगितला:

---

1 Speeches & Writings : P. 86. · 2 Speeches & Writings : P. 100.

In self-government lies our hope, strength and greatness.

(आपली सारी आशा, आपलें बळ, आपलें महत्त्व या सर्व गोष्टी स्वराज्याधीन आहेत) असें उद्घोषित करून दादाभाईनीं असें जगजाहीर केलें कीं, किरकोळ हक्क, फुटकळ सुधारणा इत्यादींची मागणी करणाऱ्या देशभक्तांचे मार्ग चुकीचे असून, स्वराज्य व स्वातंत्र्य यांच्यावर भर देणाऱ्या तरुणांची विचारसरणीच देश-हिताला पोषक आहे. जाहीर रीतीनें हे शब्द उच्चारणाऱ्या दादाभाईच्या मनांत कोणती खळबळ चाललेली असेल हें कल्पनेनेंहि ओळखतां येण्यासारखें आहे. पण त्या खळबळीचें स्वरूप स्पष्टपणें दिग्दर्शित करणारा उत्तम पुरावाच उपलब्ध असल्या-मुळें, या बाबतींत तरी कल्पनेला शिण देण्याचें कारण नाहीं. १९०७ च्या जाने-वारी महिन्यांत दादाभाई फिरून इंग्लंडला गेले. ते जाणार या निमित्तानें मुंबईस त्यांचा प्रचंड जाहीर सभेंत सत्कारहि करण्यांत आला. याच सुमारास टिळक मुंब-ईस गेले असले पाहिजेत व त्यांनीं दादाभाईच्याजवळ मनमोकळेपणानें चर्चा केली असली पाहिजे. या चर्चेच्या वेळीं दादाभाईनीं आपलें हृद्गत व्यक्त केलें व देशां-तली तरुण मंडळीं ज्या नव्या मार्गाचा अवलंब करूं पहात होती त्या मार्गाचें त्यांनीं समर्थन केलें. पुण्याहून दि. २५–४–१९०७ रोजीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना लिहिलेल्या पत्रांत टिळकांनीं पुढील वाक्यें लिहिलीं आहेत, त्यांचा दुसरा-तिसरा अर्थ होऊं शकतच नाहीं. टिळक लिहितात :

Dadabhai is clearly of opinion that if the British Government withholds the granting of concessions any longer, things will grow worse and the younger generation will and must take recourse to other means of accomplishing their object.

( लोकांना सवलती व अधिकार देण्याच्या कामीं ब्रिटिश सरकार याहीपुढें कंजूषपणा करील तर परिस्थिति अधिकच चिघळेल, असें दादाभाईचें स्पष्ट मत आहे. आपला हेतु सिद्ध व्हावा म्हणून तरुण पिढी अन्य साधनांचा आश्रय करील असा त्यांचा अंदाज आहे आणि त्यांनीं तसा आश्रय करावा, असें त्यांचें मत आहे. )

कलकत्ता कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून दादाभाई निवडले गेले त्या वेळीं शाम-जींनीं त्यांच्यावर टीकेची झोड उठविली होती, हें टिळकांना माहीत होतें. दादा-भाईच्या खऱ्या विचारसरणीची कल्पना शामजींना आलेली असली म्हणजे त्यांच्या मनांत दादाभाईच्याविषयीं योग्य तो आदरभाव स्थिर राहील असें वाटल्यावरून टिळकांनीं वरील मजकूर लिहिला असेल, हें शक्य आहे. सावरकरप्रभृति तरुणां-नाहि दादाभाईचें खरें हृद्गत कळावें व त्यांनीं आपले उद्योग जोरानें चालू ठेवावे हाहि टिळकांच्या मनांतला आणखी एक हेतु नसेलच, असें तरी कोणी सांगावें ?

इंग्लंडांत आल्यावर सावरकर यांनीं पहिल्या तीनचार महिन्यांत काय काय उद्योग केले याची कल्पना यापूर्वी देण्यांत आलीच आहे. ऐषआराम, छानछोकी,

सरकारी अधिकाऱ्यांची खुशामत इत्यादि व्यवसायांत रंगून जाणाऱ्या इंग्लंडमधील हिंदी तरुणांचें मानसिक परिवर्तन घडवून आणण्याचे त्यांचे उद्योग चालू होते त्याचप्रमाणें देशासाठीं सर्वस्व पणाला लावण्याला सिद्ध असलेल्या शेलक्या हिंदी तरुणांचें संशोधन करण्यांतहि ते या काळांत गढून गेलेले होते. असे सहकारी भेटले म्हणजे या तरुणांच्या भारताच्या भवितव्याबद्दल मनमुराद चर्चा होत. हिंदुस्थानांत सुरू केलेला साप्ताहिक बैठकींचा उपक्रम सावरकर यांनीं लंडनमध्येंहि सुरू केला. अभिनव भारताच्या रचनेबद्दलच्या त्यांच्या कल्पना यापूर्वींच सिद्ध झालेल्या होत्या. 'बहिरंग मंडळ' व 'गुप्त मंडळ' असे अभिनव भारताचे दोन कप्पे असले पाहिजेत ही त्यांची कल्पना त्यांच्या बरोबरच्या पुष्कळशा मंडळींना पटली. बहिरंग मंडळामार्फत चालणारें काम उघडपणें चालावयाचें असल्यामुळें, या मंडळाची घटना सिद्ध करण्याच्याहि ते उद्योगाला लागले. या उद्योगांतूनच Free India Society या संस्थेचा हळुहळू जन्म झाला. गुप्त मंडळाची स्थापना करण्याच्या दृष्टीनें सावरकरांनीं पहिला प्रयत्न केला तो १९०६ सालच्या डिसेंबरमध्यें केला, असें कै. ग्यानचंद वर्मा यांच्या टांचणांवरून दिसतें. या प्रसंगीं जी मंडळी गोळा झाली होती त्यांची नांवनिशीवार यादीहि वर्माजींनीं दिली आहे. हरनामसिंग, खान, जयस्वाल, सेन, मदनलाल धिंग्रा, कोरगांवकर, मणिलाल, हरदयाळ, भाई परमानंद, बाबा जोशी, बापट व महेशचरण सिंह इतक्या मंडळींशीं चर्चा करून, १९०६ च्या डिसेंबर महिन्यांत सावरकर यांनीं 'अभिनव भारता' चे स्थापनेचा विचार पक्का केला असावा, असें दिसतें. सावरकर व बापट यांचे संबंध तर पांचचार महिन्यांचे अवधींत चांगलेच आपलेपणाचे झाले होते. अभिनव भारतांतील तरुणांच्या हिंदी संस्थानिकांविषयींच्या अपेक्षा काय आहेत हें त्या वेळीं लंडन येथें असलेले श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांना कळविण्यासाठीं बापटप्रभृति मंडळींचें एक शिष्टमंडळ या सुमारास नियुक्त झालें होतें, या माहितीला सेनापति बापट यांच्या श्लोकबद्ध आत्मचरित्रांत पुढील आधार[1] सांपडतो:

> तेथें राजा एक होता आलेला भटकावया।
> त्यासि भेटूनि कथिलें, नवभारत-आशया ॥
> "नकोत आम्हांसि राजे, पाहिजे लोकशासन"
> "मलाहि वाटतें तैसें, भेटा भारतिं आपण ॥"

'लंडनचीं बातमीपत्रें' या पत्रमालेंत क्रमांक दोनचें पत्र लंडनला दि. ५-९-१९०६ रोजीं लिहिलेलें आहे व क्रमांक १० चें 'वर्षारंभ' हें पत्र १९०७ च्या जानेवारी महिन्यांतलें आहे. या दोन्ही पत्रांत नेमबाजीच्या शिक्षणाचें महत्त्व वर्णिलेलें आहे. १९०६ च्या शेवटापूर्वीं 'इंडिया हाउस' मधील तरुण स्वतःजवळ पिस्तुलें बाळगूं लागले असावे. ती वापरण्याची विद्या त्यांनीं हस्तगत केली असावी,

१ सेनापति बापट वाङ्मय : समग्र ग्रंथ : पृ. ११.

असें सेनापती बापट यांच्या आत्मचरित्रांतलि पुढील उल्लेखावरून[१] अनुमानितां येतें:

प्रबंध दुसरा होता पूर्वग्रामीय[२] वांछित ।
"भारतीय स्थिति पुढें वर्षें झाल्यावरी शत" ॥
प्रबंधीं या स्पष्टतेनें मार्ग जो का सनातन ।
स्वातंत्र्याचा तयाचें मी केलें होतें निरूपण ॥
प्रबंधांतीं प्रश्नकालीं मेजावरति ठेविलें ।
गोलिकायंत्र भरलें[३] अध्यक्ष गरमावले ॥
"न्यायमंदिरिं जाण्याचें पडेल..." बहु बोलले ।
पुढें पोष्टाचे मार्गानें यंत्र तें मज पावलें ॥

मॅझिनीच्या चरित्राचें लेखनकार्य आटोपतांच विनायकराव सावरकर यांनीं १८५७ च्या क्रांतियुद्धासंबंधींचा स्वतंत्र विवेचनपर ग्रंथ लिहिण्याचें ठरवून त्यासाठीं वाचनाला सुरुवात केली होती, हें दिग्दर्शित करण्याला अवश्य असणाऱ्या खुणाहि 'लंडनचीं बातमीपत्रें' या पत्रमालेंत सांपडतात. पहिल्या पांच पत्रांत १८५७ च्या घडामोडीचा उल्लेख मुळींच आढळत नाहीं; पण, दि. २-११-१९०६ रोजीं लिहिलेल्या 'याचा अर्थ काय?' या पत्रांतल्या पुढील वाक्यांत[४] हा उल्लेख स्पष्ट शब्दांत केलेला आहे :

*इंग्रजी पार्लमेंटचें लक्ष आतां हिंदुस्थानकडे पाहिल्यानेंच लागत आहे अशी दुसरी एक वेडगळ कल्पना आपणांत प्रचलित आहे. पण, आज आहे याहून लाखोपटीनें जास्त लक्ष हिंदुस्थानानें एकदां आकर्षिलें होतें. १८५७ च्या वणव्याचा भयंकर चटका लागतांच इंग्लंडच्या पार्लमेंटमध्येंच काय, तर इंग्लंडच्या प्रत्येक झोंपडींतसुद्धां हिंदुस्थानाबद्दल प्रश्नोत्तरें झालेलीं आहेत.*

'वर्षारंभ' या क्रमांक नऊच्या पत्रांतहि या घटनेचा उल्लेख पुढीलप्रमाणें[५] केलेला आढळतो :

*इंग्लंडचें मत अनुकूल करून घेण्यास एकच उपाय आहे व तो हाच कीं, इंग्लंडच्या मताची कवडीचीहि पर्वा न करणें ! १८५७ सालीं इंग्लंडमध्यें कोणी डेप्युटेशनें धाडलीं होतीं किंवा कोणीं व्याख्यानें दिलीं होतीं ? परंतु ५७ सालीं इंग्लंडचें जितकें लक्ष हिंदुस्थानाकडे वेधलें होतें त्याच्या शतांशहि लक्ष गोखल्यांच्या हजारों व्याख्यानांनींहि वेधलें नाहीं. आपण कृति करूं लागलों कीं, इंग्लंडचें लक्ष आपण नको नको म्हटलें तरी आपणामागें धावत सुटेल.*

सेनापती बापट यांनीं एडिंबरो येथील मित्रमंडळींपुढें '२००७ मधील हिंदुस्थान' या विषयावर प्रबंध वाचला असें सूचित करणाऱ्या पद्यपंक्ति यापूर्वींच उद्धृत

---

१ सेनापति बापट वाङ्मय : समग्र ग्रंथ : पृ. १२, २ एडिंबरोची मित्रमंडळी. ३ भरलेलें पिस्तुल. ४ लंडनचीं बातमीपत्रें पृ. २६-२७. ५ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ४४

करण्यांत आल्या आहेत. हा प्रबंध वाचण्याला एडिंबरोपर्यंत स्वतः जाण्याची सेनापतींची इच्छा नव्हती; पण, बापटांचे एक मित्र डॉ. बत्रा यांचें पत्र आलें कीं, तुम्ही स्वतःच आलें पाहिजे. इथें कांहीं रशियन मंडळी आहेत. त्यांचा नि तुमचा मी परिचय करून देऊं इच्छितों.[1] डॉ. बत्रा यांचें पत्र वाचल्याबरोबर सेनापति एडिंबरोला जावयास सिद्ध झाले. रशियन मंडळींकडून बाँब बनविण्याची विद्या हस्तगत करण्याच्या बाबतींत बापटप्रभृति हिंदी तरुण त्या सुमारास किती उत्सुक झाले होते हें कळण्याच्या दृष्टीनें ही हकीकत उपयुक्त आहे. एडिंबरोला गेल्यावर बापटांची एका रशियन कुमारिकेशीं ओळख झाली. ही ओळख क्रांतिकार्याच्या प्रसाराच्या कामांत पुढें कशी उपयोगी ठरली हें सेनापति बापट यांनीं आपल्या आत्मचरित्रांत पुढील शब्दांत[2] वर्णिलें आहे:

त्या दिनीं ओळखी झाली एका रूसी कुमारिची ।
विद्यार्थिनी वैद्यकाची होती, धन्य असे तिची ।।
मिळालें हस्तलिखित पुढें रूसी मुनीकडे ।
त्याचें हिच्या श्रमें झालें आंग्लभाषेंत चोपडें ।।
परीक्षा जवळी होती वर्जी ती या श्रमार्थ ती ।
सहामाही बुडविली सेवाधर्मार्थ धन्य ती ।।

इंडियन नॅशनल काँग्रेसच्या कलकत्ता येथील अधिवेशनांत विशेष काय घडलें याचें दिग्दर्शन यापूर्वीच झालेलें आहे. दादाभाई नौरोजी यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत स्वराज्यमंत्राचा उच्चार केला. दांतांच्या कण्या केल्यानें स्वराज्य मिळणार नाहीं असें लोकांना वाटूं लागल्यामुळें, स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण इत्यादि स्वाधीनच्या उपायांचा अवलंब करण्याचें लोकांनीं ठरविलें. या नव्या वृत्तीचा इंग्रजांच्या मनावर विलक्षण परिणाम झाला. ब्रिटिश साम्राज्यांतून फुटून निघण्याची कल्पना हिंदी देशभक्तांच्या मनांत येत असली तरी, आम्ही हिंदुस्थान सुखासुखी सोडणार नाहीं असें बजावण्याला त्यांनीं सुरुवात केली. इंग्रजांच्या या विचारसरणीचें प्रतिबिंब ‘ लंडन टाइम्स ’नें दिनांक २–१–१९०७ रोजीं लिहिलेल्या संपादकीय लेखांत पुढील शब्दांत पडलें :

We have won India by the sword and in the last resort we hold it by the sword; and it is well for the small and highly educated classes which are alone represented at the Congress, that the British sword stands between them and their native enemies.

( आम्ही तलवारीच्या जोरावर हिंदुस्थान जिंकून घेतला आहे; आणि निर्वाणीच्या प्रसंगीं आम्हांला तलवारीच्या जोरावरच तो हातीं ठेवावा लागेल. काँग्रेसचे प्रतिनिधी म्हणून जे अल्पसंख्य व सुशिक्षित लोक उपस्थित राहतात त्यांच्या दृष्टीनें पाहिल्यास असें निष्पन्न होतें कीं, हे अल्पसंख्य लोक व त्यांचे स्वदेशी शत्रू यांच्या

---

१ आमचे सेनापति : पृ.५२. २ सेनापति बापट वाङ्मय : समग्र ग्रंथ : पृ.१२.

दरम्यान ब्रिटिश तलवार उभी आहे, हेंच त्यांच्या हिताचें आहे.) ज्या नव्या पक्षाच्या उदयामुळें 'लंडन टाइम्स' ला जळफळून वरील शब्द उच्चारावे लागले त्या पक्षाबद्दल पं. शामजी कृष्णवर्मा यांना स्वाभाविकपणेंच अभिमान वाटला. दि. २३ २–१९०७ रोजीं लंडन येथें त्यांच्या इंडियन होमरूल सोसायटीची सभा झाली. या सभेंत पंडितजींनीं दहा हजार रुपयांची एक देणगी जाहीर केली. हिंदुस्थानांत राजकारणी महंतांची संघटना निर्माण करण्यासाठीं ही देणगी जाहीर केली जात आहे, असें पंडितजींनीं सांगितलें. आपल्या योजनेचा तपशील ठरविण्यापूर्वीं आपण टिळक, बिपिनचंद्र पाल, लजपतराय, खापर्डे प्रभृति पुढाऱ्यांचा विचार घेणार आहों, असेंहि पंडितजींनीं सांगितलें. या सभेनंतर लौकरच पंडितजींनीं या पुढाऱ्यांशीं पत्रव्यवहार सुरू केला. दि. ४–४–१९०७ रोजीं सिंहगड येथून लिहिलेल्या पत्रांत टिळकांनीं या योजनेवरील आपला अभिप्राय व्यक्त केला.

१९०७ हें वर्ष उजाडल्याबरोबर इंग्रजांच्या मनांत एक नवीनच धास्ती उत्पन्न झाली. १८५७ चें 'बंड' झालें त्या गोष्टीला या वर्षीं अर्धशतक पुरें होत होतें. याच सुमारास हिंदुस्थानच्या कांहीं भागांतून असंतोषाच्या ठिणग्या उडूं लागलेल्या होत्या. खरें पाहिलें तर ब्रिटिशांच्या लष्करी शक्तीच्या मानानें हा असंतोष क्षुद्रच होता. १८५७ नंतर इंग्रजांनीं मोठ्या धोरणीपणानें हिंदी लोकांना निःशस्त्र बनविलें होतें. युरोपांत शास्त्रीय ज्ञानाची जी वाढ झपाट्यानें होत चालली होती तिच्यामुळें सैनिक शास्त्रांत मोठी क्रांति घडूं पहात होती. या क्रांतींत इंग्लंड अग्रभागीं नसलें तरीहि, हिंदुस्थानच्या निःशस्त्र प्रजेच्या मानानें इंग्रज भारीच होते. हें लक्षांत ठेवून, इंग्रजांनीं हिंदुस्थानांत उडणाऱ्या असंतोषाच्या ठिणग्यांचा 'पराचा कावळा' केला नसता तरी चालण्यासारखें होतें. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, उगीचच भयग्रस्त बनून गेलेल्या इंग्रजांनीं दोरीला साप समजण्याची चूक केली नसती तर, पुढें घडलेल्या अनिष्ट प्रकारांपैकीं बरेचसे प्रकार टळलेहि असते. पण, १९०७ हें वर्ष आपल्याला अपशकुनी ठरणार असें मानून, हिंदुस्थानांतील इंग्रज अधिकारी साशंकपणानें व अरेरावीनें वागूं लागले, यांत शंका नाहीं. लाहोरच्या 'पंजाबी' पत्राचे प्रकाशक लाला जसवंतराय व संपादक श्री. काशिनाथ कृष्ण आठवले यांजवर १९०७ च्या आरंभींच भरण्यांत आलेला खटला व १९०७ च्या फेब्रुवारी महिन्यांत मुंबईच्या 'विहारी' पत्रामागें लावण्यांत आलेलें जामिनकीचें शुक्लकाष्ठ या दोन गोष्टी हिंदुस्थान सरकारच्या भीतिग्रस्त मनोवृत्तीच्या निदर्शक म्हणून निर्दिष्ट करण्यासारख्या आहेत.

अफझलखानाच्या वधाच्या प्रसंगीं श्रीशिवाजी महाराजांनीं वापरलेलीं वाघनखें 'लंडन टॉवर'मध्यें ठेविलेलीं आहेत हा समज खरा कीं खोटा हें ठरवून घेण्यासाठीं सावरकरांनीं १९०७ च्या प्रारंभीं केव्हां तरी लंडन टॉवर पाहिलें असावें, असें दिसतें. या ठिकाणीं त्यांना टिपूची तलवार आढळली, छत्रपतींचीं वाघनखें आढ-

ळली नाहींत ! जीं वाघनखें आढळलीं त्यांचा छत्रपतीशीं कांहींहि संबंध नव्हता. शिवाजी महाराजांनीं वापरलेल्या वाघनखांसारखीं वाघनखें म्हैसूर प्रांतांतले चोर-दरवडेखोर वापरीत असावे व त्यांतलीं कांहीं वाघनखें लंडन टॉवरमध्यें ठेवलेलीं असावीं, असें 'विहारी' पत्राच्या मि. चैत्र शु. ९ शके १८२९ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या बातमीपत्रांतल्या मजकुरावरून दिसतें. लंडन टॉवरमध्यें न दिसलेल्या या वाघनखांसंबंधींचे सावरकरांचे विचारतरंग नमूद करून ठेवण्यासारखे आहेत :

*हिंदूंच्या पारतंत्र्याचीं आंतडीं ज्या वाघनखांनीं उपसून बाहेर काढलीं व जीं श्रीशिवछत्रपतींच्या करस्पर्शानें पवित्र झाली तीं मराठी वाघाचीं वाघनखें लंडन टॉवरमध्यें पडलेलीं पाहण्यास मी उत्सुक झालों असेन असें आपल्या वाचकांना वाटत असेल; परंतु, मला ती उत्सुकता मुळींच वाटेना ! श्रीकृष्णाच्या विश्वरूपाला पाहण्यास अर्जुनाला दिव्य चक्षु दिलेले होते तरी देखील त्याच्याच्यानें त्या विश्वरूपाला पाहवेना. मग, त्या वाघनखांकडे दृष्टि फेंकण्यास माझ्या ह्या गुलामगिरीच्या डोळ्यांची कशी छाती होणार ?... अशा धास्तींत मी गर्क झालों असतांनाच मला त्या वाघनखांचे ऐवजीं टिपूची तरवार दिसली. त्या तलवारीच्या दर्शनाबरोबर एक विलक्षण संचार अंगांत संचरूं लागला व ह्या गुलामगिरींत जगण्यापेक्षां श्रीछत्रपति शिवाजीमहाराजांच्या वाघनखांनीं मेलेलेंच फार बरें असा माझा ग्रह होऊं लागला ........ त्या पवित्र वस्तूच्या दर्शनास जाण्यापूर्वी कांहीं तरी नजराणा न्यावा असें मला वाटूं लागलें; परंतु त्यांना जो एकच नजराणा पाहिजे आहे तो मला कुठें मिळेल ? पारतंत्र्याचें रक्त त्यांना नजराण्यादाखल देण्यासाठीं मी टिपूच्या तलवारीची करुणा भाकूं लागलों; परंतु, तिनें मला एकच जबाब दिला कीं, टिपूची तरवार सज्ज आहे; पण, टिपूचा हात कोठें आहे ?.... छत्रपतींचीं वाघनखें लंडनच्या टॉवरमध्यें बंदींत पडण्यापेक्षां तीं मला न दिसतील तरी कांहीं वाईट नाहीं. तीं मला दिसण्यासाठीं लंडनला येण्यापेक्षां माझ्या आर्यभूला दिसण्यासाठीं हिंदुस्थानांतच असलेलीं बरीं ! वाघनखें प्रदर्शनासाठीं नसतात ! वाघनखें हीं नेहमीं दिसण्यासाठीं नसतात ! त्यांना पारतंत्र्याचीं पोटें फाडण्याकरितांच काय तें बाहेर काढणें इष्ट आहे.*

बंडाला अर्धशतक होत आहे त्याअर्थीं चालू सालीं विशेष कांहीं तरी घडेल या भीतीमुळें मनांतल्या मनांत गांगरून गेलेले इंग्रज बाहेरून मोठा धीराचा आव आणीत होते. २३ जून १७५७ रोजीं क्लाइव्हनें प्लासीची लढाई जिंकली व ब्रिटिश साम्राज्याचा पाया घातला, या गोष्टीचा गौरव म्हणून क्लाइव्हचें स्मरण करण्यांत यावें ही कल्पनाहि ते खेळवूं लागले होते. १९०७ च्या सुरुवातीलाच पंडित शामजी कृष्णवर्मा यांनीं एक नवीनच विषय चर्चेसाठीं हातीं घेतल्यामुळें; इंग्रजांनाहि त्यां

विषयाकडे हळुहळू लक्ष पुरवावें लागलें. हिंदुस्थानांत उदयाला येणारा जहाल पक्ष व देशी संस्थानें यांचें सहकार्य कसें शक्य आहे, हा विषय चर्चिण्याला पंडितजींनीं सुरुवात केली; त्याबरोबर कित्येक इंग्रजांच्या मनांत कशी धास्ती निर्माण झाली हें 'लंडन टाइम्स'मध्यें १९०७ च्या जुलै महिन्यांत प्रसिद्ध झालेल्या पुढील उताऱ्यावरून लक्षांत येण्यासारखें आहे :

Satisfactory as our existing relations with the Princes of India may be and fully as they may recognise the justice of our rule, it is hard to believe that, if at any time of crisis in our fortune, they should see a reasonable chance of throwing off our yoke and of establishing an independent federation of native states, devotion to the British Crown would cause them to stand by us instead.

(हिंदी संस्थानिकांशीं आमचे संबंध सध्यां समाधानकारक आहेत हें खरें. आमची राज्यपद्धति न्यायाची आहे हेंहि ते पूर्णपणें मान्य करीत असतील. असें असलें तरी, आम्ही कधीं काळीं गोत्यांत आलों आणि आमचें जोखड झुगारून देण्याची शक्यता त्यांना दिसूं लागली तर, संस्थानिक हे ब्रिटिश सम्राटावरील निष्ठेमुळें आपलाच पक्ष घेतील—देशी संस्थानांचें स्वतंत्र संघराज्य स्थापण्याच्या उद्योगाला ते लागणारच नाहींत—असा विश्वास बाळगणें सोपें नाहीं.)

१९०७ सालीं हिंदुस्थानांत कांहींतरी बंडाळी होईल, त्या वेळीं देशी संस्थानिक सुद्धां राजनिष्ठ राहतीलच असें नाहीं, वगैरे विचारांच्या आहारीं गेलेल्या इंग्रज अधिकाऱ्यांनीं हिंदुस्थानांतील असंतोषाचीं पाळेंमुळें खणून काढण्यासाठीं नानातऱ्हेच्या युक्त्याप्रयुक्त्या उपयोगांत आणण्याला सुरुवात केली. बंगालमध्यें—विशेषतः बंगाली हिंदूंमध्यें—तीव्र असंतोष पसरलेला होता. त्याचा नायनाट करण्यासाठीं प्रतिष्ठित मुसलमानांना हाताशीं धरण्याचा उपक्रम त्यांनीं सुरू केला. बंगालमधील डाक्का येथील नबाब हे मुसलमानी समाजांत मान्यता पावलेले गृहस्थ! त्यांना चेतवून हिंदूंचा छळ करण्याची लीला बंगालमधील नोकरशाहीनें सुरू केली. या नबाबसाहेबांनीं चारदोनशें गुंडहस्तकांनिशीं कोमिल्ला शहरांत शिरून धुडगूस आरंभिला. या नबाबसाहेबांचे चिटणीस कोणी पारशी गृहस्थ होते. आपली जीभ बरीच सैल सोडून ते म्हणाले, "बंगाली लोक म्हणजे डुकराचीं पिलें आहेत!" अगोदरच चिडून गेलेल्या कोमिल्ला येथील हिंदूंना त्या पारशाचे हे शब्द फार झोंबले. त्यांनीं त्या पारशाचा खरपूस समाचार घेतला. हा प्रकार झाला त्याच्या दुसऱ्याच दिवशीं एका बंगाली तरुणानें नबाबसाहेबांच्या एका अनुयायावर गोळी झाडली व त्याचा बळी घेतला. बंगाली समाजांत पसरलेला असंतोष व अन्यायाचा प्रतिकार करण्याची या समाजांत जागृत झालेली इच्छा यांना याच सुमारास एक वेगळें वळण लागूं लागलें होतें. १९०७ सालच्या मार्च महिन्याच्या शेवटींशेवटीं कांहीं बंगाली तरुणांनीं कलकत्ता येथील शस्त्रागारांतून कांहीं काडतुसें व दारूगोळा या वस्तू चोरून नेल्या.

१९०७ च्या पहिल्या दोनतीन महिन्यांत हिंदुस्थानांतील दोनच प्रांतांत असंतोष फैलावलेला दिसत होता. हे दोन प्रांत म्हणजे बंगाल व महाराष्ट्र हे होत. पंजाब प्रांत अद्यापपावेतों तरी या असंतोषांत प्रामुख्यानें सामील झालेला नव्हता. पण, दि. १६–४–१९०७ रोजीं 'पंजाबी' पत्राचे संपादक व प्रकाशक यांच्यावरील खटल्यांचें अपील लाहोरच्या चीफ कोर्टात निकालांत निघालें व त्या निमित्तानें पंजाब प्रांत या असंतोषांत सामील झाला. चीफ कोर्टानें या दोघांची सक्तमजुरीची शिक्षा बदलली होती व त्यांनीं साधी शिक्षा भोगावी, असें फर्माविलें होतें. तरीहि, लाहोर-मधील लोकांच्या दृष्टीनें या दोघा आरोपींना अन्याय झालेला असल्यामुळें, त्यांची तुरुंगाकडे पाठवणी होत असतांना लाहोर शहरांत बरीच गडबड झाली. ज्या गाडींतून कैद्यांना तुरुंगाकडे धाडण्यांत येत होतें ती गाडी वाटेंत थांबवून लोकसमूहानें या दोघा कैद्यांना पुष्पहार अर्पण केले; रस्त्यांत सांपडलेला चिखल त्यांनीं पोलिसांच्या अंगावर फेंकला; ज्या बाजूला इंग्लिश लोकांचे बंगले होते त्या बाजूला मिरवत जाऊन, वाटेंत आढळणाऱ्या एकट्यादुकट्या इंग्रजावर या जमावानें हल्ला केला! शेवटीं पोलिस मध्यें पडले तेव्हां या जमावाची पांगापांग झाली.

वास्तविक या प्रकारामुळें अधिकाऱ्यांनीं विशेष भेदरून जाण्याचें कांहींच कारण नव्हतें. लोकप्रिय पुढाऱ्यांबद्दलचा आदर व्यक्त करण्याच्या उत्साहाच्या भरांत लोकसमूहानें कोठवर जावें यालाहि कांहीं मर्यादा असाव्या हें खरें असलें तरी, या मर्यादेचा अतिक्रम झाला कीं लागलीच लोक बंडखोर बनले असें मानणेंहि गैर आहे. पण, बंड होण्याचा संभव आहे या भयानें अगोदरच ग्रस्त झालेल्या अधिकाऱ्यांनीं लाहोर शहरांत घडलेल्या या प्रकारांत बंडाचें बीज पाहिलें! आजवर बंगाल व महा-राष्ट्र यांच्यापुरतीच मर्यादित राहिलेली चावटळ आतां पंजाबसारख्या नाक्याच्या प्रांतां-तहि फैलावूं लागली असा समज त्यांनीं करून घेतला. ब्रिटिश अधिकारी वर्गानें या बाबतींत कोणता समज करून घेतला होता हें 'लंडन टाइम्स' च्या दि. २०–४–१९०७ च्या संपादकीय लेखांतील पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे:

Such an explosion of anti-British feeling in a great Indian centre has hardly occurred since the days of the mutiny and its gravity is increased by the fact that the Punjab has only quite recently been invaded by the agitation which has been chiefly centred hitherto in Bengal and in certain districts of the Bombay Presidency.

(हिंदुस्थानांतील एका प्रमुख केंद्रांत ब्रिटिशविरोधी भावनेचा झालेला हा स्फोट बंडानंतरच्या काळांत बहुधा पहिलाच असेल. या स्फोटाचें गांभीर्य एका गोष्टीमुळें विशेषच वाढतें. ही चळवळ आजवर मुख्यतः बंगालमध्यें व मुंबई इला-ख्याच्या कांहीं जिल्ह्यांमध्यें केंद्रित झालेली होती; तिच्या कक्षेंत पंजाब प्रांत नुकताच आलेला आहे.)

लंडनमधील हिंदी तरुण हिंदुस्थानांत घडणाऱ्या या घटनांकडे किती उत्सुकतेनें पहात असतील हें ' लंडनचीं बातमीपत्रें ' या पत्रमालेंतील बाराव्या पत्रांतल्या पुढील उताऱ्यावरून[1] स्पष्ट होत आहे :

*' पंजाबी ' पत्राच्या संपादकांस झालेली क्रूर व राक्षसी शिक्षा ऐकतांच तरुणांच्या रोषास पारावर नाहींसा झाला. त्यांना आपल्या हतबलत्वाची लाज वाटूं लागली व मनगटाच्या ढिलेपणानें आलेलें हतबलत्व मनगटें जोरदार केल्यास अजूनहि निघून जाईल, ही त्यांची खात्री पटूं लागली. जोंपर्यंत कायदे करणें व त्या कायद्यांच्या अंमलबजावणीसाठीं तरवार लटकत ठेवणें हें फिरंग्यांच्या स्वाधीन आहे तोंपर्यंत नेमस्तपणा काय, किंवा* Passive Resistance *चा अप्रत्यक्ष किंवा रडका प्रतिकार काय, सारखेच विफल होत, असे उद्गार बहुतेकांच्या तोंडून निघूं लागले आहेत व खरा मार्ग, यशदायी मार्ग, इतिहाससूचित मार्ग कसा स्वीकारावा याचा हिंदी अंतःकरणांत ऊहापोह होत आहे. मध्यंतरीं येथून ' पंजाबी ' ला सहानुभूति व आनंदप्रदर्शक तारा पाठविण्यांत आल्या. आनंद अशासाठीं कीं, आपल्यावर असले उघड जुलूम करण्याची बुद्धि अखेर मानभावी सत्तेस होऊं लागली. इंडिया हाऊस, केंब्रिज, व सायरेन्स्टर येथून तारा गेल्या होत्या. नंतर ' पंजाबी ' साठीं एक फंडहि काढण्यांत आला.... या सहानुभूतीच्या तारा किंवा फंड यांच्यामध्यें आतां वेळ न दवडतां कांहींतरी शेवटचा सोक्षमोक्ष केला पाहिजे, अशी उत्कंठा सर्वांस लागली आहे.*

१९०७ च्या पूर्वार्धापासूनच इंग्लंडांतील हिंदी तरुणांमध्यें ही जी राजकीय जागृति दृग्गोचर होऊं लागली होती तिचें श्रेय पं. शामजी कृष्णवर्मा, सावरकर, बापट, हरदयाळ इत्यादि सर्वांना दिलें पाहिजे. हिंदी तरुणांना लाभलेल्या या नव्या दृष्टिचें वर्णन सावरकर यांनीं पुढीलप्रमाणें[2] केलें आहे :

*ह्या जागृतीचीं प्रत्यंतरें येथें दर क्षणीं घडत आहेत. हिंदुस्थानसारखा भाग्यवान्, निसर्गसुंदर व रमणीय देश व हिंदु लोकांसारखे वेदप्राचीन, नीतिसंपन्न, प्रेमळ व वीररसभाजन आर्यलोक अशी जोडी लाभणें हें महद्भाग्याचें फल होय, असें आतां हिंदु तरुणांस कळूं लागलें आहे.... स्वदेशाभिमानाची ज्योत जी मालवली गेली होती ती एकदां कां पेटली कीं, त्या प्रकाशानें आजपर्यंत आपणांस अडखळून पाडण्यासाठींच ज्या वस्तू उत्पन्न झाल्या आहेत असें स्वकीय परशत्रु आपल्यास सांगत आले त्याच गोष्टींच मनोरमत्व व पुण्यपावनत्व पाहून जग तोंडांत बोट घालील, हें तरुण पिढीस कळूं लागलें आहे व इंग्लंडमध्यें येणें*

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ६०-६१. २ लंडनचीं बातमीपत्रें: पृ. ५९-६०.

*म्हणजे स्वदेशाशीं कृतघ्नपणा व इंग्लंडच्या साम्राज्याशीं राजनिष्ठा धरणें नव्हे, हेंहि त्यांना हळुहळू समजून येत आहे.*

१८५७ सालच्या भारतीय उत्थानांत ज्या इंग्रजांनीं विशेष मर्दुमकी केली होती त्यांचा गौरव करावा, १० मे रोजीं या उत्थानांतला एकादा प्रसंग नाट्य-प्रयोगाच्या रूपानें इंग्लिश जनतेपुढें मांडावा वगैरे कल्पना १९०७ च्या मार्च महिन्या-पासून बोलल्या जात होत्या. दिल्लीच्या काश्मीर दरवाज्यावर १८५७ सालीं कर-ण्यांत आलेला हल्ला नाट्यप्रयोगासाठीं निवडण्यांत आला असल्याची वार्ताहि ऐकूं येऊं लागली. त्याबरोबर, पं. शामजी कृष्णवर्मा यांनीं इंग्रजांच्या या उत्साहावर उतारा म्हणून एक खरमरीत पत्र प्रसिद्ध केलें. आयरिश नॅशनल कॉन्फेडरेशनचे उपाध्यक्ष ह्यू ओ डोनेल यांनीं लिहिलेलें हें पत्र इंग्लंडांतून हिंदुस्थानांतहि धाडण्यांत आलें होतें. श्री. बिपिनचंद्र पाल यांच्या 'वंदे मातरम्' पत्राच्या दि. २३–४–१९०७ च्या अंकांत तें मुद्रित झालें आहे. १८५७ सालीं इंग्रजांनीं हिंदुस्थानांत जे अत्याचार केले त्यांची निष्कृति म्हणून तीन ठिकाणीं प्रार्थना करण्यांत याव्या, असें सुचवितांना या पत्रांत पुढील मजकूर लिहिलेला आढळतो :

The scene of the first service of reparation should naturally be those arsenals at Dum-dum where low caste men were employed to manufacture polluted cartridges that were to dishonour and degrade hundreds and thousands of brave and gallant soldiers.

The second service should naturally be held at Meerut—the site of the cantonments of the splendid third cavalry who were forced into insurrection by the sight of their bravest comrades being led away chained and fettered to penal servitude for no cause except the just defence of nationality and religion.

I would suggest that a third service of reparation could not be better held than at Delhi on the scene of the murders of the young princes of the Imperial House who, though prisoners of war, were butchered in cold blood by the ruffian Hodson of Hodson's Horse.

( १८५७ च्या दुष्कृतींच्या पापनिष्कृतीसाठीं करावयाच्या प्रार्थनेचें पहिलें स्थान डमडम येथील दारूगोळ्यांचीं कोठारें हें स्वाभाविकपणें असावें. हीन दर्जाच्या माणसांचा उपयोग करून भ्रष्ट काडतुसें बनविण्यांत आलीं तीं याच ठिकाणीं ! याच काड-तुसांमुळें शतावधि नि सहस्रावधि शूर उमदे सैनिक अवमानित झाले व पदभ्रष्ट झाले.

अशा प्रार्थनेचें दुसरें स्वाभाविक स्थान म्हणजे मीरत ! याच ठिकाणीं घोड-दळाच्या तिसऱ्या पलटणींतल्या वैभवशाली सैनिकांचा लष्करी तळ होता. शौर्याचे मूर्तिमंत पुतळे असे आपले सहकारी शृंखलाबद्ध होऊन, शिक्षा व दास्य यांचा अनु-भव घेण्यासाठीं बलात्कारानें नेले जात आहेत हें पाहून त्यांना स्वस्थ बसवेना ! म्हणून त्यांनीं बंडाचा झेंडा उभारला. स्वराष्ट्र व स्वधर्म यांचें न्याय्य संरक्षण करावें इतकाच हें बंड करतांना त्यांचा हेतु होता.

अशा प्रार्थनेसाठीं तिसरें ठिकाण निवडावयाचें तर दिल्लीइतकें समर्पक ठिकाण निवडतां येणार नाहीं, असें मला सुचवावयाचें आहे. बादशाही वंशांतल्या बालराजपुत्रांचा ज्या ठिकाणीं खून करण्यांत आला त्या ठिकाणीं ही प्रार्थना करण्यांत यावी. हे राजपुत्र युद्धकैदी होते. तरीहि 'हॉडसन्स हॉर्स' या घोडदळाच्या पलटणीचा प्रमुख, क्रूरकर्मा हॉडसन यानें त्यांचा अत्यंत अमानुषपणानें खून केला!)

१८५७ च्या राष्ट्रीय आंदोलनाची स्मृति जागृत करण्याचे प्रयत्न दोन्ही बाजूंनीं सुरू झाल्यामुळें, हिंदुस्थानांतला सरकारी पक्ष व लोकपक्ष यांच्यामधील तेढहि १९०७ च्या मे महिन्याच्या सुमारास चांगलीच वाढली. देशभर पसरत चाललेल्या असंतोषाची ठिणगी मद्राससारख्या विस्तृत प्रांतांतहि पडावी म्हणून श्री. बिपिनचंद्र पाल हे १९०७ सालच्या एप्रिल महिन्याच्या शेवटीं त्या भागांत शिरले.[1] राजमहेंद्री येथें त्यांचें व्याख्यान झालें व त्यामागोमाग तेथील सरकारी कॉलेजांतल्या विद्यार्थ्यांनीं संप पुकारला. मे महिन्याच्या सुरुवातीला खुद्द मद्रास शहरांत त्यांचीं दोन व्याख्यानें झालीं. दुसऱ्या व्याख्यानाच्या शेवटीं विदेशी टोप्यांची होळी पेटविण्यांत आली. सरकारी अधिकाऱ्यांच्या प्रोत्साहनामुळें शेफारून गेलेले मैमनसिंग जिल्ह्यांतले बंगाली मुसलमान या सुमारास मूर्तिभंग करण्यांत व हिंदु स्त्रियांवर अत्याचार करण्यांत रंगून गेले होते व त्यामुळें बंगाली तरुणांत अगोदरच निर्माण झालेला क्षोभ तीव्रतर होत होता. विद्यार्थिवर्गाची राजकीय उपासमार केली कीं, चौफेर पसरत चाललेला असंतोषाचा वणवा आपोआप विझेल असें वरिष्ठ सरकारी अधिकाऱ्यांना वाटूं लागल्यामुळें, त्यांनीं याच सुमारास 'रिस्ले सर्क्युलर' हें कुप्रसिद्ध फर्मान काढलें.

'पंजाबी' पत्राचे प्रकाशक व संपादक यांना झालेल्या शिक्षेमुळें पंजाब प्रांतांत उद्भवलेला क्षोभ दिवसदिवस वाढूंच लागला. मे महिन्याच्या अगदीं सुरुवातीसच रावळपिंडी येथें घडलेल्या एका घटनेवरून या क्षोभांतली शक्ति किती जाज्वल्य होती, हें समजूं शकतें. लाला हंसराज यांच्या अध्यक्षतेखालीं एक सभा होण्याचें जाहीर झालें. सरदार अजितसिंग, लाला अमोलकरामप्रभृति तरुण पुढारी या सभेंत भाषणें करणार होते. सरदार अजितसिंग यांच्यावर भाषणबंदीचा हुकूम बजावण्यांत आला व त्या हुकुमाची अम्मलबजावणी व्हावी म्हणून सभास्थानीं ३०० पोलिस ठेवण्यांत आले! हुकुमाचा भंग करून सरदारजी भाषण करूं लागले; पण, त्यांना अटक करण्याची पोलिसांना हिम्मत झाली नाहीं! या प्रकारानंतर लाला हंसराज यांना कोर्टांत हजर राहण्याची आज्ञा देण्यांत आली. लालाजी कोर्टांत गेले. क्षुब्ध लोकांनीं कोर्टांत इतकी गर्दी केली कीं, लालाजींवरील आरोपांची चौकशी स्थगित करावी लागली. कोर्टांतून परत फिरलेल्या लोकसमूहानें वाटेंत लागलेल्या

---

[1] Sedition Committee Report. : P. 162.

युरोपियनांच्या दुकानांची लुटालूट केली. यानंतर लौकरच लाहोर येथील स्टूडंटस् असोसिएशनतर्फे भरविण्यांत आलेल्या एका जाहीर सभेच्या वेळीं अधिकाऱ्यांनीं काढलेल्या एका हुकुमाची बरीच विटंबना झाली. सभेला आलेल्या लोकांनीं परत जातांना युरोपियनांच्या बंगल्यांच्या दिशेनें जाऊं नये असा हुकूम निघाला असूनहि नागरिकांनीं तो मानला नाहीं. त्यामुळें पोलिसांनीं लोकांवर लाठी चालविली.

पंजाबमधलि या लोकक्षोभामुळें सरकारी अधिकारी किता धास्तावून गेले होते याची कबूली Sedition Committee Report या सरकारी इतिवृत्तांतच[1] देण्यांत आलेली आहे. त्या वेळचे पंजाबचे लेफ्टनंट गव्हर्नर सर डेन्झिल इबट्सन यांनीं या सुमारास तयार केलेल्या एका खलित्यांत अमृतसर, फिरोजपूर, लाहोर, रावळपिंडी, सियालकोट व ल्यालपूर इत्यादि शहरांतून चळवळ कशी फोफावली याचें वर्णन केलेलें असून, या चळवळीचें उद्दिष्ट काय याचेंहि स्पष्टीकरण केलेलें आहे. सरसाहेब लिहितात :

Some of the leaders look to driving the British out of the country, or at any rate from power, either by force or by the passive resistance of the people as a whole; and the method by which they have set themselves to bring the Government machine to a stand still is by endeavouring to stir up a strong feeling of racial hatred.

( शक्तीच्या बळावर अगर लोकांच्या सार्वत्रिक अप्रत्यक्ष प्रतिकाराच्या जोरावर ब्रिटिशांना देशाबाहेर हुसकून लावावें, निदान त्यांना अधिकारच्युत करावें, अशी कांहीं पुढाऱ्यांची मनीषा आहे. राज्ययंत्र बंद पाडण्याचा उपाय म्हणून त्यांची कशावर भिस्त असेल तर ती जातीय द्वेषाची प्रबळ भावना जागृत करण्याचा प्रयत्न करण्यावर आहे. )

प्रांताच्या प्रमुख शास्त्यानें लोकक्षोभाचें हें निदान ठरविण्यापूर्वी अनेक गोष्टींचा विचार करावयाला पाहिजे होता. १८५७ सालच्या आंदोलनाच्या वेळीं सगळ्या उत्तर हिंदुस्थानभर असंतोषाचा वणवा पसरत असतांना जो पंजाब प्रांत ब्रिटननिष्ठ राहिला—व ज्यामुळें ब्रिटिशांचें हिंदुस्थानांतील राज्य त्यावेळींच विलयाला गेलें नाहीं— तो पंजाब प्रांत आज इतका असंतुष्ट कां झाला याची या गव्हर्नरनें शांत वृत्तीनें मीमांसा करावयास पाहिजे होती. पण, बंड होणार या भीतीमुळें गांगरून गेलेल्या या अधिकाऱ्याला ही सद्बुद्धि सुचली नाहीं. बंडाला सुरुवात होण्यापूर्वी पंजाबमधलि सैन्य सर्व दृष्टींनीं सुसज्ज ठेविलें पाहिजे हें ओळखून, सरकारी अधिकारी त्या तयारीला लागले. यापूर्वी थोडे दिवस झेलम येथील तोफखान्यावर असलेले पठाण असंतुष्ट झाले होते. आपल्या तक्रारींचा परिहार होत नाहीं असें पाहून त्यांनीं संप पुकारला होता. प्रांतांत बंड होणार असें दिसूं लागतांच, सर सेनापति लॉर्ड किचनेर हे स्वतः पंजाबांत आले. त्यांनीं या पठाणांची समजूत घातली, हा संप मोडला, तेव्हां

---

१ पृ. ४१-४२.

स्वस्थ मनानें ते परत दिल्लीकडे वळले. पंजाब सरकारनें रावळपिंडी शहरांत जवळ-जवळ लष्करी अंमल सुरू केला. रावळपिंडी शहरावर तोफा रोखून ठेवण्यांत आल्या. लाला हंसराज, लाला गुरुदास, लाला अमोलकरामप्रभृतींना कैद करण्यांत आले व लाला लजपतराय यांच्यावर भाषणबंदीचा हुकूम बजावण्यांत आला.

हिंदुस्थानांतील असंतोष या थराला जाऊन पोंचला त्या सुमारास लंडनमध्यें असलेल्या सावरकरप्रभृति तरुणांनीं १० मे हा दिवस आपल्या पद्धतीनें साजरा करण्याचें ठरविलें होतें. अॅक्टन येथें राहणारे शामजी कृष्णवर्मांचे मेहुणे श्री. नीतिसेन द्वारका-दास यांचें वसतिस्थान ' टिळक हाऊस ' या नांवानें ओळखलें जात असे. या ठिकाणीं गौरीशंकर भाटनगर, दीपचंद जव्हेरी, डॉ. एरूळकरप्रभृति १५–२० मंडळी एकत्र जमली व त्यांनीं हा दिवस साजरा केला. या छोट्या सभेचें अध्यक्षस्थान सावरकर यांनीं स्वीकारलें होतें व श्री. ग्यानचंद वर्मा यांनीं या प्रसंगीं मुख्य वक्ते म्हणून भाषण केलें. यानंतर एक वर्षानें साजरा झालेला १० मेचा समारंभ जसा गाजला तसा हा समारंभ गाजला नाहीं व त्यामुळें रौलेट रिपोर्टांत या समारंभाचा उल्लेख करण्यांत आलेला नाहीं. हें खरें असलें तरी हा समारंभ घडून आला ही गोष्ट निश्चित आहे. श्री. इंदुलालजी याज्ञिक यांनीं लिहून ठेवलेल्या शामजी कृष्णवर्मांच्या चरित्रांत या समारंभाबद्दलची पुढील नोंद सांपडते :

The 10th of May, however, did not pass unnoticed in London. Vinayak Savarkar had not spent a year at the India House in vain. He had already carried an intensive propaganda among a wide circle of Indians in London, just as he had carrried on thorough-going research in the events of the great war with the help of classical works on the subject. Fully equipped with historical material on the subject, Savarkar held a private celebration of the fiftieth anniversary which was attended by a small but determined group of young enthusiasts at the India House.

( १९०७ सालचा १० मे हा दिवस लंडन शहरांत दुर्लक्षित मात्र राहिला नाहीं. विनायकराव सावरकर यांनीं भारत भवनांत एक वर्ष घालाविलें होतें, तें कांहीं उगीच घालाविलें नव्हतें. लंडन शहरीं राहणाऱ्या भारतीयांच्या विस्तृत गटांतून त्यांनीं या पूर्वींच जोराचा प्रचार केलेला होता. त्या प्रमाणेंच, १८५७ च्या महान् क्रांतियुद्धांतल्या घटनांचें प्रमाणभूत ग्रंथाच्या आधारें मूलग्राही संशोधनहि त्यांनीं केलें होतें. या विषयावरील ऐतिहासिक माहितीनें सुसज्ज झालेले सावरकर हा दिवस साजरा करण्याला पुढें आले व खासगी रीतीनें त्यांनीं तो साजरा केला. या समारंभाला भारतभवनांतले थोडकेसे पण करारी व उत्साही तरुण उपस्थित होते.)

हा समारंभ साजरा करण्यांत आल्याबद्दलचा उल्लेख सावरकरांनीं 'विहारी' साप्ताहिकाला धाडिलेल्या एका बातमीपत्रांत करण्यांत आलेला आढळतो. मिति वैशाख वद्य ३० शके १८२९ रोजीं प्रसिद्ध झालेल्या ' विहारी ' पत्रांत लंडनच्या बातमीपत्राच्या शेवटीं पुढील वाक्यें आढळतात :

*कानपूरचें स्मरण फक्त इंग्रजांनाच होतें आहे, असें नाहीं. तें लंडनमधील हिंदी लोकांनाहि होत आहे. गेल्या मे ११ ला येथील हिंदी लोकांची सभा या सत्तावनच्या स्वातंत्र्यसंग्रामाची सोनेरी ज्युबिली करण्यासाठीं भरलेली होती व तींत या संग्रामांत पडलेल्या देशवीरांचें भजनपूजन करण्यांत आलें.*

ही तरुण मंडळी हा समारंभ साजरा करून मोकळी होत आहे तोंच, हिंदुस्थानांत घडलेल्या एका महत्त्वाच्या घटनेचें वृत्त लंडनमध्यें येऊन थडकलें. पंजाब सरकारनें दि. ९ मे १९०७ रोजीं रात्रीं आकस्मिक रीतीनें लाला लजपतराय यांना लाहोरमधून उचललें; व ब्रह्मदेशच्या थिबा राजाला हिंदुस्थानांत आणून ठेवल्याची भरपाई करण्यासाठीं कीं काय, त्यांना ब्रह्मदेशांत मंडाले येथें नेऊन स्थानबद्ध करून ठेवलें! हिंदुस्थानांत जो नवा पक्ष उदयाला येत होता त्या पक्षाच्या पुढाऱ्यांपैकीं एका श्रेष्ठ व आदरणीय पुढाऱ्याला सरकारनें चौकशीशिवाय हद्दपार केलें हें पाहून सर्वांनाच महदाश्चर्य वाटलें. भारतभवनांत राहणाऱ्या तरुणांवर या घटनेचा कोणता परिणाम झाला हें सेनापति बापट यांनीं आपल्या आत्मचरित्रांत पुढील शब्दांत[1] वर्णिलें आहे :

> लाला उचलिलें झाला हलकल्लोळ गोंधळ।
> विचार करण्या बैसे विचारी जनमंडळ ॥
> सूचना मांडिल्या कोणी, कोणी त्या उपसूचना।
> म्हटलें मी मला कांहीं यांतील पटतेंच ना ॥
> करा तुम्ही सभा सर्व हिंदींची आंग्लभूगत।
> नसे तिचा विरोधी मी ऐका माझें मनोगत ॥
> व्यर्थ भाषाविषा रोषें ओकणें टाकणें भलें।
> भाषा सौम्य; म्हणा लाला विमासांत करा खुलें ॥
> जरी खुले न ते झाले खुल्या मंत्रिवरावरी।
> यंत्र माझें चालवीन यशायश हरी-करीं ॥
> 'नको हें' ठरलें त्यांचें माझेंही ठरलें तदा।
> 'नको भाषा; मधुपुरीं जातों, मज करा बिदा' ॥

लंडन येथील 'अभिनव भारता' च्या सदस्यांनीं दि. ११ मे १९०७ रोजीं भरविलेल्या सभेनंतर, बापट हे लौकरच पॅरिसला जाण्याच्या तयारीला लागले. पॅरिस येथें जाऊन बॉंब तयार करण्याची विद्या कोणीतरी हस्तगत करावी असा विचार या सभेंत पुढें आला; आणि पुढें बापटांनीं ही विद्या प्रथम पॅरिस येथें हस्तगत केली.

---

१ सेनापति बापट वाङ्मय : समग्र ग्रंथ : पृ. १३.

श्री. हेमचंद्र दास व मिर्झा अब्बास या दोन मित्रांसमवेत ही विद्या हस्तगत करीत असतांना बापट यांना कोणते अनुभव आले हें त्यांच्याच शब्दांत[1] सांगणें श्रेयस्कर ठरेलः

तीन रूसी विश्वसेवा-ध्येयपूजक भटले ।
वृत्त त्यांचें पाहुनीयां आश्चर्य बहु वाटलें ।।
रूसी वीर क्रांतिकारी कशीं घडिति मंडळें ।
तें वृत्त कथिलें त्यांनीं जशी श्रद्धा तशीं फळें ॥
रूसी क्रांतिमंडळाच्या घडणीची कथा मियां ।
टिपिली ती पुढें आली छापुनी निजदेशिं या ।।

* * *

रूसी ते वीर अज्ञात प्रकारें तेथ राहती ।
आम्हांसी सांगण्या गोष्टी अपुल्या गृहिं बाहती ।।
एक आचार्य त्यांतील संस्कृतज्ञ तया घरीं ।
जमूं आम्ही विचारार्थ योजुनी योग्य चातुरी ।।
संहारी रिपुचा वैरी प्रतिसंहारकारक ।
मंडळाचा मुख्य तेथें भेटला सत्त्वधारक ।।

* * *

शिंपी आचार्य तिसरा प्रतिसंहारकाग्रणी ।
रूसी हे तीन बसले खोल जाउनियां मनीं ।।
खोल यांहूनिही बसे एक रूसी महामुनी ।
जो सूचिपटु आम्हांतें प्रेमें भेटावि आणुनी ॥
ठेंगणा रुंद बांध्यानें, दाढी स्वच्छ रुळे उरीं ।
वृद्ध तो युवकाऐसा उत्साहें करि चाकरी ।।

* * *

तेणें आम्हांसि दिधली गोलकक्रांति-पुस्तिका ।
रूसी ती हस्तलिखिता सुटया तद्गत पत्रिका ।।

'अभिनव भारतां' तील मंडळींच्या विचारानेंच बापट या उद्योगाकडे वळले. लंडनच्या मंडळींनाहि या पुढील कार्य निश्चित ठरविणें भाग होतें. दि. ११ मे १९०७ रोजीं भरलेल्या सभेंत प्रतिमासीं क्रांतिकारक पत्रकें लिहून, तीं मुद्रित करून, चौफेर प्रसृत करण्याचा निश्चय करण्यांत आला. 'फ्री इंडिया सोसायटी' या नांवाचीं संस्था स्थापन करून, साप्ताहिक सभा करण्याचा व क्रांतिकारक पक्षाच्या दृष्टीनें

---

१ सेनापति बापट वाङ्मय : समग्र ग्रंथ : पृ. १४-१५.

प्रचलित राजकारणाचा ऊहापोह करण्याचा निश्चयहि या सभेंत करण्यांत आला. ' फ्री इंडिया सोसायटी ' च्या प्रत्येक सदस्याचें वाचन कांहीं एका किमान मर्यादे-पर्यंत झालेंच पाहिजे, त्याशिवाय राजकीय मतें बनविण्याची पात्रता त्याच्या ठिकाणीं निर्माण होणार नाहीं, असाहि अभिप्राय या सभेंत व्यक्त करण्यांत आला. श्री.ग्यान-चंद वर्मा यांची ' फ्री इंडिया सोसायटी ' चे चिटणीस म्हणून योजना करण्यांत आली.

लजपतराय यांना हद्दपार केल्याबरोबर लंडनमध्यें घडलेल्या या घडामोडींच्या हकीगतबिरोबरच आणखीहि एका घडामोडीचें वृत्त या ठिकाणींच सांगून टाकण्या-सारखें आहे. लजपतराय यांच्या हद्दपारीचा निषेध करण्यासाठीं एक मोठी जाहीर सभा भरविण्याचें यानंतर लौकरच ठरलें. सोशिऑलॉजिस्ट डेमोक्रॅटिक पार्टीचे अध्यक्ष मि. हिंडमन यांचें या सभेंत मुख्य वक्ते म्हणून भाषण व्हावयाचें होतें. सभेच्या दिवशीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना सभेच्या व्यवस्थेच्या कामाकडे स्वतः लक्ष पुर-वितां आलें नाहीं. त्यांनीं हें काम श्री. ग्यानचंद वर्मा यांच्यावर सोंपविलें. या प्रसंगीं श्री. वर्माजींची मि. हिंडमन यांच्याशीं जी ओळख झाली तिचा वर्माजींनीं चांगलाच उपयोग करून घेतला. रशियांतून हद्दपार झालेले प्रिन्स क्रोपॉट्किन् हे या वेळीं लंडन येथेंच रहात असत. वर्माजींनीं हिंड्मन साहेबांच्या मार्फत प्रिन्स क्रोपॉट्किन्ची भेट घेतली. या भेटीनंतर अव्वल दर्जाचें रशियन क्रांतिकारक वाङ्मय 'इंडिया हाउस'मध्यें येऊं लागलें. प्रिन्स क्रोपॉट्किन् यांनीं पॅरिसमध्यें अस-लेल्या कांहीं रशियन मित्रांना देण्यासाठीं परिचयपत्रेंहि तयार केलीं व तीं वर्माजीं-च्या हातीं दिलीं. पॅरिसला गेलेले बापट यांच्या पुढील उद्योगांत वर्माजींनीं पाठ-विलेल्या या परिचयपत्रांचा उपयोग झालाच नसेल, असें म्हणवत नाहीं.

लालाजींच्या हद्दपारीमुळें शामजींच्या लेखनाची तार जास्तच वर चढली. जून महिन्यांत शामजींनीं 'लंडन टाइम्स'ला लिहिलेलें एक पत्र या दृष्टीनें मोठें वाच-नीय आहे. दि. १९–६–१९०७ रोजीं प्रसिद्ध झालेल्या 'लंडन टाइम्स' मधून या पत्रांतील पुढील भाग घेतलेला आहे :

We are not aware of having advocated armed rebellion in any number of this journal...but, at the same time, we may say that we are not opposed on principle to an armed rebellion like some who denounce all revolutions, wrought by force of arms, holding as we do that resistance to aggression is not simply justified but imperative...Each case must be judged on its own merits; and, we think that Indians need not resort to arms in order to throw off alien yoke.

(इंडियन सोशिऑलॉजिस्ट या आमच्या मासिकांत आम्ही केव्हां सशस्त्र बंडा-चा पुरस्कार केला असेल तर ती गोष्ट आम्हांला माहीत नाहीं......पण, त्याबरो-बरच आम्हीं असें म्हणूं शकतों कीं, शस्त्रसामर्थ्यानें घडवून आणलेल्या क्रांतीचा निषेध करणाऱ्या इतर कांहीं मंडळींप्रमाणें आम्ही कांहीं सशस्त्र बंडाला तत्त्वतः विरुद्ध नाहीं; कारण, आमचें मत असें आहे कीं, आक्रमणाचा प्रतिकार हा नुसता

क्षम्यच नव्हे तर आवश्यकहि आहे......अशा बाबतींत विचारांत घ्यावयाचा प्रत्येक प्रश्न परिस्थितीप्रमाणें स्वतंत्रपणेंच विचारांत घेतला पाहिजे; आणि, परकी सत्तेचें जूं झुगारून देण्यासाठीं हिंदी लोकांनीं शस्त्रांचा आश्रय करण्याची आवश्यकता नाहीं, असें आमचें मत आहे.)

शामजींप्रमाणेंच सरदारसिंगजी राणा हेहि या सुमारास कोणत्या प्रकारच्या जहाल विचारांत खेळत होते हें समजण्याचें एक साधन उपलब्ध आहे. राणाजींनीं या सुमारास फ्रेंच भाषेंत एक लेख लिहिला. M. F. Deville या फ्रेंच आरमारी अधिकाऱ्याच्या एका लेखांतील एक उतारा राणाजींनीं या लेखांत मान्यतापूर्वक उद्धृत केलेला आहे. या उताऱ्याचें इंग्रजी भाषांतर पुढीलप्रमाणें केलेलें आढळतें:

Are the people (Hindus) happy and free ? I ask you, false philanthropists, who are they that grind them down and enslave them? O, you Englishmen, who wish to do away with slavery all over the globe! Ah! If the Indian could make himself heard! If he could only unveil to the world your perfidy and the deplorable state to which you have reduced him, how eloquent would be that sight to the eyes of nations who still believe in your fallacious policy! But, bent under the yoke, Indians, whom you have loaded with chains, keep a gloomy silence. Fear lest they awake and break their irons! When the day comes, what will be your fate in the bosom of this same Asia, which is the witness of your cruelties and upon which depends your unjust prosperity.

(हिंदी लोक सुखी व स्वतंत्र आहेत काय? लटक्या भूतदयेच्या कच्छपी लागलेल्या लोकांनो, हिंदूंना भरडून कोण काढीत आहे आणि गुलाम म्हणून त्यांना कोण राबवीत आहे, असा माझा तुम्हांला सवाल आहे. भूतलावरील गुलामगिरी नाहींशी करण्याची इच्छा बाळगणाऱ्या इंग्रजांनो, थोडा विचार करा. भारतीयांच्या भावना शब्दस्वरूपांत प्रकट होऊन सर्वांच्या कानांवर आदळत नाहींत म्हणूनच तुमचा हा सारा बकवा सहन केला जातो! तुम्हीं केलेले विश्वासघात आणि तुम्हीं भारतीयांना ज्या दुःसह अवस्थेप्रत नेऊन पोंचविलें आहे ती अवस्था यांचें आविष्करण भारतीयांना करतां तरी येऊं द्या; तुमच्या भ्रामक धोरणावर अद्यापहि विश्वास ठेवणाऱ्या राष्ट्रांचे डोळे त्या देखाव्यानें एकदम स्तिमित होतील! भारतीयांच्या पायांत तुम्ही ज्या शृंखला अडकविल्या आहेत, त्यांच्या मानेवर तुम्ही जें जोखड लादलें आहे त्यामुळें भारावून गेलेले भारतीय लोक निमूटपणें दुःख सोसतात! ते जागृत झाले व आपले पाश तोडूं लागले कीं तुमचें मरण ओढवलेंच, हें ओळखून रहा. आज आशिया खंड तुमच्या क्रूर कृत्यांकडे मुकाट्यानें पहात आहे. या आशिया खंडावरच तुमची अन्याय्य भरभराट अवलंबून आहे. भारतीयांच्या जागृतीचा दिवस उजाडेल तेव्हां आशियांत सांपडलेल्या तुमची काय गत होईल, याचा विचार करा!)

लालाजींना हद्दपार केलें आणि पंजाबांतलि प्रमुख शहरीं लष्करी अंमल सुरू करून सभा वगैरेंना बंदी करून टाकली म्हणजे पंजाबमधील बंडखोर प्रवृत्ति नाहींशी

होईल हा हिंदुस्थान सरकारचा अंदाज साफ चुकला. लालाजींना हद्दपार करण्यांत आलें ही गोष्ट सौम्य प्रकृतीच्या पुढाऱ्यांनाहि मान्य झाली नाहीं. ना. गोखले यांनीं या प्रकरणीं 'टाइम्स ऑफ इंडिया' ला एक पत्र लिहिलें. लालाजींसारख्या थोर देशभक्ताला चौकशीशिवाय हद्दपार करण्यांत आलें ही गोष्ट इंग्लंडमधील उदारमतवादी मंत्रिमंडळाला शोभणारी नाहीं असा अभिप्राय व्यक्त केल्यावर, सरकारनें दोहोंपैकीं एक तरी गोष्ट केली पाहिजे अशी मागणी गोखले यांनीं केली. एक तर, लालाजींची उघड चौकशी झाली पाहिजे; अगर, त्यांनीं राज्य-क्रांति करण्याच्या खटपटी केल्याबद्दलचा जो पुरावा सरकारपाशीं असेल तो तरी सरकारनें लोकांपुढें मांडला पाहिजे, असें निर्भीड मत गोखले यांनीं व्यक्त केलें. कॉटन-वेडरबर्न प्रभृतींच्या तंत्रानें चालणाऱ्या ब्रिटिश कॉंग्रेस कमिटीनेंहि हिंदुस्थान सरकारच्या या कृत्याचा निषेध केला. एडिंबरो, ग्लासगो वगैरे शहरींहि या प्रकरणांत निषेधसभा भरविण्यांत आल्या.

सरकार-विरुद्ध बोलण्याला सहसा प्रवृत्त न होणारे लोकहि सरकारला दूषणें देऊं लागल्याबरोबर राष्ट्रीय चळवळ करणाऱ्या लोकांना एक प्रकारें स्फुरणच चढलें. लालाजींप्रमाणेंच सरदार अजितसिंग यांना हद्दपार करण्याचा सरकारचा संकल्प होता. पण, सरदारजी फरारी झाल्यामुळें त्यांना पकडावें कसें याच विवंचनेंत पंजाब सरकारला १५।२० दिवस घालवावे लागले. सरदार अजितसिंगांच्या साहसाच्या खऱ्याखोट्या गोष्टी रोज नव्या नव्यानें पंजाबभर पसरत होत्या. दि. २ जून १९०७ रोजीं सरदारजी शेवटीं अमृतसर येथें पकडले गेले. तोंपर्यंत या नवलकथांनीं साऱ्या पंजाबचें वातावरण प्रक्षुब्ध झालेलें होतें. डाक्का येथील नबाबानें केलेल्या अत्याचारांना तोंड देण्याची सिद्धता बंगाल्यांत चाललेली होती. मे महिन्याच्या मध्याच्या सुमारास त्या प्रांतांत राष्ट्रीय स्वयंसैनिकांची संस्था अस्तित्वांत आलेली होती. आपल्याला हुकमी मदत करणाऱ्या नबाबाला कर्जमुक्त करण्यासाठीं लाखों रुपये खर्च करण्याचा निर्लज्जपणा सरकारी अधिकारी करीत होते. नबाबाच्या उच्छृंखलपणामागें सरकारी अधिकारीच आहेत अशा आशयाचें पत्र उघडपणें प्रसृत करण्यांत बंगालमधील थोरथोर पुढारी गुंतलेले होते. 'रिस्ले सर्क्युलर' मुळें विद्यार्थी भिऊन जातील ही सरकारची अपेक्षा फोल ठरली होती. कलकत्ता शहरांत हजारों विद्यार्थ्यांच्या सभांमधून या सर्क्युलरचा उपमर्द करण्यांत येत होता. सभोंवारचा क्षोभ शमत नाहीं हें पाहून गांगरून गेलेलें सरकार वृत्तपत्रांच्या मागें हात धुऊन लागलें होतें. पंजाबमध्यें निघणाऱ्या 'इंडिया' नांवाच्या उर्दू पत्राचे संपादक लाला पिंडीदास यांच्यावर खटला भरण्यांत आला. बंगालमध्येंहि 'युगांतर', 'संध्या', 'नवशक्ति', 'वंदे मातरम्', या पत्रांना सरकार सतावूं लागलें. बिपिन चंद्र पाल यांनीं मद्रास प्रांतांत केलेल्या जागृतीचाहि परिणाम प्रतीत होऊं लागला. कोकोनाडा येथील कांहीं विद्यार्थ्यांनीं 'वंदे मातरम्' चा घोष केल्यामुळें तेथील सिव्हिल

सर्जननें विद्यार्थ्यांना मारहाण केली होती. यामुळें चिडून गेलेल्या विद्यार्थ्यांना तेथील युरोपियन क्लबावर हल्ला चढविला होता व तेथें असलेल्या कलेक्टरच्या डोक्यावर सोडावॉटरची बाटली मारली होती !

लालाजींच्या उचलबांगडीनंतरहि हिंदुस्थानांतील क्षोभ शमत नाहीं हें पाहून ब्रिटिश लोक किती चिडले हें दि. १८--६--१९०७ रोजीं पार्लमेंट सभेंत प्रश्नोत्तरें झालीं त्या वेळीं चांगलेंच प्रतीत झालें. लजपतराय यांच्या हद्दपारीबद्दल अनेक सभासदांनीं मोर्ले साहेबांना प्रश्न विचारले व त्या प्रश्नांचीं उत्तरें देतांदेतां उदारमतवादी मोर्लेसाहेबांच्या तोंडाला चांगलाच फेंस आला. मोर्लेसाहेबांची ही फजीति व्हिन्सेंट नांवाच्या एका 'सरा'ला अगदीं असह्य वाटली. प्रश्न विचारणारांचा निषेध म्हणून व लजपतरायवरील रोष व्यक्त करण्याचा एक मार्ग म्हणून हे सरसाहेब पार्लमेंट सभेंत मोठयानें ओरडले : 'Why not shoot him ?' (गोळी घालून निकाल कां लावीत नाहीं त्याचा ? ) मोर्लेसाहेबांना वारंवार असे गैरसोयीचे प्रश्न विचारण्यांत येतात हें पाहून होरेस रम्बोल्ड या इंग्रजाचें अंतःकरण द्रवलें व त्यानें लंडन टाइम्सच्या दि. १५–७–१९०७ च्या अंकांत एक पत्र प्रसिद्ध केलें. १९०७ हें वर्ष बंडाच्या अर्धशतसांवत्सरिक स्मृतीचें वर्ष आहे आणि या वर्षी प्लासीच्या प्रसंगाला दीडशें वर्षें पुरीं होत आहेत. अशा या अशुभसूचक वर्षी पार्लमेंटच्या सभासदांनीं भारतमंत्र्यांना गैरसोयीचे प्रश्न विचारण्याला प्रवृत्त व्हावें याबद्दलची नापसंति रम्बोल्डसाहेबांनीं व्यक्त केली.

लालाजींच्या हद्दपारीचा पं. शामजींच्या मनावर खोल परिणाम झाला. १८९७ सालीं टिळकांवर खटला भरण्यांत आला त्या वेळीं पंडितजींनीं कांहीं एक विचार मनाशीं केला व हिंदुस्थानांत राहणें अतःपर सुरक्षित नाहीं असें ओळखून ते इंग्लंडला आले. त्यानंतर बरोबर दहा वर्षांनीं लंडन सोडण्याची ऊर्मि त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. हिंदुस्थानपेक्षां इंग्लंड सुरक्षित हें १८९७ सालच्या आपल्या विचारसरणीच्या दृष्टीनें बरोबर असलें तरी,सध्यांची आपली विचारसरणी इंग्लंडमध्येंहि मान्य होणार नाहीं हें त्यांनीं हेरलें; आणि म्हणून, पॅरिस येथें जाऊन तेथेंच कायमची वस्ती करण्याचें शामजींनीं ठरविलें. सुरक्षिततेच्या दृष्टीनें पॅरिस शहर श्रेयस्कर होय एवढा एकच विचार मनांत ठेवून पंडितजी लंडन सोडून निघाले असें मात्र म्हणवत नाहीं. केवळ याच विचारानें पंडितजी लंडन सोडून गेले असें मानणाऱ्या हरदयाळप्रभृति तरुणांनीं, या मुद्यावर भर देऊन, पंडितजींवर पुढें हल्ले चढविले ही गोष्ट खरी आहे. पण, पॅरिसला जाण्याचा पंडितजींनीं विचार ठरविला तो आणखीहि कांहीं कारणांमुळें ठरविला असावा, असें मानण्याला जागा आहे. पंडितजी पॅरिसला गेले त्या वेळीं सावरकरप्रभृति तरुणांच्या क्रांतिकारक कल्पना व कार्यपद्धति यांचा परिचय त्यांना झालेला होता. या तरुणांच्या गतीनें आपल्याला चालतां येणार नाहीं हें पंडितजींनीं ओळखलें असलें तर त्यांत नवल कांहींच नाहीं. पण, केवळ एवढयामुळेंच

आपली स्थावर मिळकत लंडनमध्यें सोडून पंडितजी निघून गेले असतील हें, त्यांच्या स्वभावाचा विचार केला असतां, संभवनीय दिसत नाहीं.

'इंडिया हाऊस' मध्यें सावरकर येऊन राहिले त्या गोष्टीला आतां जवळ-जवळ वर्ष झालें होतें. कुशाग्र बुद्धिमत्ता, सतत उद्योग करण्याची वृत्ति, भोंवतालीं हिंदी तरुण गोळा करण्याची हातोटी इत्यादि गुणांमुळें सावरकरांनीं त्यांचा विश्वास संपादन केला होता. या अवधींत पंडितजींनीं सावरकरांवर बारीक लक्ष ठेविलें होतें. सावरकर 'इंडिया हाउस' मध्यें येऊन राहिल्यावर कांहीं महिन्यांनीं एक इंग्लिश तरुणी त्यांच्याकडे वारंवार येऊं लागली. त्यामुळें कित्येकांच्या मनांत संशय उत्पन्न होऊं लागले. वास्तविक यांत विशेष असें कांहींच नव्हतें; अनेक माणसें येत त्यांतच ही तरुणी येत असे; पण, होतां होतां ही गोष्ट शामजींच्या कानापर्यंत गेली. शामजींचा स्वभावहि चांगलाच संशयखोर होता. त्यांनीं श्री. ग्यानचंद वर्मा यांना या प्रकाराकडे लक्ष पुरविण्यास सांगितलें. वर्माजींनीं ती गोष्ट पतकरली व त्यांच्या स्वभावानुसार ते या प्रकरणाचा पिच्छा पुरवूं लागले. ही इंग्लिश तरुणी एका इंग्रज गृहस्थावर प्रेम करते असा शोध वर्माजींनीं लावला; इतकेंच नव्हे तर, ही तरुणी व तिचा प्रियकर यांच्या दरम्यान झालेला कांहीं पत्रव्यवहार हस्तगत करून तोच त्यांनीं पंडितजींपुढें आदळला. सावरकरांवर अशी बारीक नजर ठेवून पंडितजींनीं त्यांच्या विषयींची खात्री पटवून घेतलेली होती. लंडन सोडून आपण पॅरिसला गेलों तरी, सावरकरांच्या नेतृत्वाखालीं 'इंडिया हाउस' नीटपणीं चालेल, असा विश्वास पंडितजींना वाटूं लागला होता.

पं. शामजी कृष्णवर्मा लंडन सोडून पॅरिसला कां गेले असावे, यासंबंधींचा सर व्हॅलेन्टाइन चिरोल यांचा तर्कहि लक्षांत ठेवण्यासारखा आहे. 'Indian unrest' या पुस्तकांत चिरोल साहेब लिहितात [१] :

> In Paris, Krishna Varma has set up since he migrated to the other side of the channel, an organisation for waylaying and indoctrinating young Indians on their way to England so as to induce them to hold aloof from those, who would wish to be their friends when they arrive in London.

( इंग्लिश खाडी ओलांडून पॅरिसमध्यें गेल्यापासून कृष्णवर्मा यांनीं तेथें एक संस्था काढली आहे. इंग्लंडला जाणाऱ्या तरुण हिंदी विद्यार्थ्यांना वाटेंतच पकडावें आणि आपलीं मतें त्यांच्यावर बिंबवावीं, असा ही संस्था काढण्यांत कृष्णवर्मा यांचा उद्देश आहे. लंडनला पोंचल्यावर कांहीं इंग्रज तुमच्याशीं मित्रत्वानें वागतील, तुम्ही त्यांच्यापासून चार पावलें दूर रहावें, अशी प्रवृत्ति या विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं निर्माण व्हावी, हा या संस्थेचा हेतु आहे.)

---

१. P. 152

लंडन सोडून पं. शामजी कृष्णवर्मा पॅरिसला कां गेले असावे या प्रश्नाचा उलगडा करणारीं कांहीं सूचक वाक्यें चित्रगुप्त–लिखित सावरकर–चरित्र या ग्रंथांत आढळतात. पंडितजी इंग्लंडांत आल्यावर त्यांनीं जी Indian Home Rule Society काढली होती ती त्यांनीं आपल्या त्या काळांतल्या राजकीय विचारसरणीचें प्रतिबिंब म्हणूनच काढली होती. आयर्लंडमधील होमरूल चळवळीच्या पद्धतीची चळवळ करणें हा तिचा उद्देश होता. आयर्लंड, ईजिप्तप्रभृति देशांतल्या राष्ट्रवादी देशभक्तांशीं पंडितजींचा परिचय वाढत गेला व ते हळुहळू क्रांतिकारक विचार-सरणीचा पुरस्कार करूं लागले. पण, त्यांचा विश्वास असा असे कीं, निःशस्त्र प्रतिकार, अडवणुकीच्या मार्गांचा अवलंब, इत्यादि साधनांनीं क्रांति यशस्वी होईल— सशस्त्र मार्गांचा अगर रक्तपाताचा अवलंब करण्याला इंग्रज भारतीयांना भाग पाडणार नाहींत. सावरकर 'इंडिया हाऊस' मध्यें येऊन राहिल्यावर तेथील तरुणांच्या क्रांतिमार्गा-विषयींच्या ज्या चर्चा होत त्यांत पंडितजीहि मोकळ्या मनानें भाग घेत असत. या चर्चांमुळें पंडितजींचा निःशस्त्र मार्गांनीं घडणाऱ्या क्रांतीवरील विश्वास डळमळूं लागला. लालाजी व सरदार अजितसिंग यांना उचलून हिंदुस्थान सरकारनें हद्दपार केलें या घटनेचा आघात पंडितजींच्या मनावर होतांच, ते जोरानें विचार करूं लागले. आपल्या विचारांपेक्षां या तरुणांचा विचारच अधिक बरोबर आहे हें त्यांना मनोमन पटूं लागलें. हे तरुण ज्या मार्गांचा पुरस्कार करीत आहेत ते मार्ग कृतिदृष्ट्या आपल्याला व्यक्तिशः पेलण्यासारखे नसले तर, आपण दूर राहून त्यांना विचारदृष्ट्या प्रोत्साहन द्यावें— निदान त्यांच्या आड तरी आपण येऊं नये–असा पोक्त विचार करून पंडितजींनीं 'इंडिया हाउस' ची व्यवस्था सावरकर यांच्यावर सोंपाविली व ते स्वतः पॅरिसला जाण्याला सिद्ध झाले. अभिनवभारताची शपथ घेतल्यावर कांहीं दिवसांनीं, १९०७ च्या मे महिन्याच्या १५–२० दिनांकाच्या सुमारास पंडितजींनीं प्रत्यक्षपणें स्थानां-तर केलें.

Peaceful Evolution has a meaning and a sense, peaceful Revolution has neither.

( शांततामय उत्क्रांति या शब्दप्रयोगाला कांहीं अर्थ आहे, त्यांत कांहीं स्वारस्य आहे; शांततामय क्रांति या शब्दप्रयोगांत अर्थहि नाहीं नि स्वारस्यहि नाहीं ) या सावरकरांच्या वाक्यांत[1] तथ्य आहे हें पटल्यामुळें, 'इंडियन होमरूल सोसायटी' चें विसर्जन करून, पंडितजी पॅरिसला गेले. आपल्याहून अधिक तेजस्वी कार्य करूं शकणारी मंडळी दिसतांच, किंचित् मागें राहून या तडफदार मंडळींना मदत कर-ण्याचें पंडितजींनीं ठरविलें.

---

१ Life of Barrister Savarkar by Chitra Gupta ; p. 36.

———

## प्रकरण ५ वें

# सावरकर नि त्यांची प्रभावळ

लोक बहुत शोधावे । त्यांचे अधिकार जाणावे ॥
जाणजाणोन धरावे । जवळी दुरी ॥

*　　　*　　　*

अधिकार पाहोन कार्य सांगणें ॥ साक्षेप पाहोन विश्वास धरणें ॥
आपला मगज राखणें । कांहींतरी ॥

— दासबोध : द. ११, स. १०

पं. शामजी कृष्णवर्मा लंडन सोडून पॅरिस येथें जाऊन राहिले आणि सावरकरांच्या हातीं 'इंडिया हाउस'चीं सूत्रें आलीं त्यानंतरचा कांहीं काळ सावरकरांनीं खात्रीचीं माणसें पारखून कार्याच्या दिशेनें पुढें पाऊल कसें टाकावयाचें या विचारांत घालविला असला पाहिजे. अर्थात्, हें काम चालू असतांना, १८५७ च्या प्रसंगावरील ग्रंथाच्या लेखनासाठीं माहितीगोळा करणें, साप्ताहिक सभांतून व्याख्यानें देणें, मधूनमधून ऑक्सफर्ड, सायरेन्स्टरप्रभृति विद्यार्जन–केंद्रांना भेट देऊन तेथील हिंदी विद्यार्थ्यांना संघटित करणें वगैरे कामेंहि ते करीतच होते. पं. शामजी कृष्णवर्मा लंडन सोडून गेले त्यापूर्वीच, लंडन व पॅरिस येथील हिंदी क्रांतिकारकांचें लक्ष ऑगस्टमध्यें जर्मनींत होणाऱ्या एका महत्त्वाच्या परिषदेकडे लागलें होतें. या परिषदेंत राणाजींबरोबर श्रीमती कामाबाई यांनींहि महत्त्वाचा भाग घेतला. नेमस्त राजकारणापासून सुरुवात करणाऱ्या या बाईंच्या मतांत अलीकडे विलक्षण पालट झाला होता. १९०६ सालीं त्या अमेरिकेची सफर करून आल्या. त्यांची व सावरकरांची भेट झाल्यावर सावरकरांच्या सशस्त्र क्रांतिवादाची छाप त्यांच्या मनावर बसूं लागली. लालाजी व सरदार अजितसिंग यांना हिंदुस्थान सरकारनें हद्दपार केल्याची बातमी ऐकल्यावर या बाईंचें मन फार प्रक्षुब्ध झालें. या प्रक्षोभाचा पगडा मनावर बसला असतांना या बाईनीं हिंदी लोकांना उद्देशून एक प्रकट पत्र लिहिलें. हें पत्र दि. २४–५–१९०७ रोजीं पॅरिसहून लिहिलेलें आहे. या बाईचा मनःक्षोभ व त्यांच्या मतांतला जहालपणा यांची ओळख पटण्याच्या दृष्टीनें या पत्रांतले कांहीं उतारे वाचनीय आहेत. या पत्रांत कामाबाई लिहितातः

**If we all speak bravely like Lajpat Rai, how many forts and prisons must the Government build before it can deport us all ?**

**( आपण सर्वांनीं जर लजपतराय यांच्याप्रमाणेंच शूरपणाची भाषा वापरण्याला आरंभ केला तर, आपल्याला हद्दपार करण्यासाठीं आणि अटकेंत ठेवण्यासाठीं सर-**

कारला किती किल्ले बांधावे लागतील आणि तुरुंग निर्माण करावे लागतील, याचा विचार करा. ) कामाबाईनीं या स्पष्टोक्तिपूर्ण पत्रांत रजपूत, शीख, पठाण, गुरखे, मराठे, बंगाली, पारशी, जैन इत्यादि सर्वांना चेतना देण्याचा प्रयत्न केला आहे व भारताच्या स्वातंत्र्यासाठीं झगडण्याची विनंति केली आहे. He, who loses his liberty, loses virtue ( ज्याचें स्वातंत्र्य गेलें, त्याचे सद्गुणहि लोपले ) ही जुनी म्हण कामाबाईनीं आपल्या पत्रांत उद्धृत केली आहे. लजपतरायांना मंडाले येथें डांबून टाकण्यांत आलें हा अन्याय आपल्याला किती असह्य वाटतो हें सांगतांना कामाबाईनीं या पत्रांत पुढील उद्गार काढले आहेत :

we are burning with rage at this gross injustice and I wonder how anyone in his senses can expect us to take it lying down I wish I could break open the very prison-doors and bring out Lajpat Rai.

( या घोर अन्यायामुळें आम्हांला जो राग आला आहे त्यातुळें आमच्या अंगाची लाहीलाही होत आहे. आम्हीं हा अपमान निमूटपणें गिळावा अशी अपेक्षा भानावर असलेला कोणी मनुष्य कशी करूं शकेल, हेंच मला कळत नाहीं. तुरुंगाचे दरवाजेसुद्धां फोडून लजपतरायांना बाहेर आणतां आलें असते तर किती नामी झालें असतें, हा विचार वारंवार माझ्या मनांत येतो. ) परक्या राज्यकर्त्यांनीं दिलेलीं वचनें किती कवडीमोल असतात हें आपल्या देशबांधवांना पटावें म्हणून, या बाईनीं आपल्या या पत्रांत पुढील वाक्यें लिहिलीं आहेत :

Do not depend upon the promises of foreign rulers, because they are in India not for the purpose of aiding you but they are there for fleecing you.

( परकी राज्यकर्त्यांच्या वचनांवर विसंबून राहूं नका; कारण, हे राज्यकर्ते तुम्हांला मदत करण्यासाठीं हिंदुस्थानांत आलेले नाहींत; ते तुम्हांला लुबाडण्यासाठीं आलेले आहेत. )

जर्मनींत होणाऱ्या आंतरराष्ट्रीय सोशॅलिस्ट काँग्रेसमध्यें हिंदुस्थानसंबंधींचा ठराव कोणत्या भाषेत मांडला जावा हें निश्चित करण्याची कामगिरी पंडितजींवर सोंपविण्यांत आली. सरदारसिंगजी राणा व कामाबाई या उभयतांनीं या काँग्रेसला हजर रहावें असें हिंदी क्रांतिकारकांच्या गोटांत ठरल्यावर, मि. हिंडमन यांच्याबरोबर हीं दोघेंजणें स्टूटगार्ट येथील काँग्रेसला गेलीं. सोशॅलिस्ट काँग्रेसला जाण्यापूर्वींच, राणाजी व कामाबाई या दोघांनीं ' अभिनव भारता'ची शपथ घेतली होती. त्या वेळच्या ' लंडन टाइम्स ' पत्रांत या काँग्रेसचें जें वर्णन आलेलें आहे त्याच्या आधारें व ' इंडियन सोशिऑलॉजिस्ट ' पत्रांतील माहितीच्या आधारें या काँग्रेससंबंधीं जी कल्पना करतां येते ती पुढीलप्रमाणें आहे :

दि. १८ ते २० ऑगस्ट हे तीन दिवस या काँग्रेसचें काम स्टूटगार्ड ( Struttgart ) येथें चाललें. या काँग्रेसच्या अध्यक्षस्थानीं जर्मन सोशॅलिस्ट पुढारी

हेर सिंगर हे होते. जगांतल्या सर्व देशांतले मिळून एक हजार प्रतिनिधी या काँग्रेसला आलेले होते. इंग्लंडमधल्या मजूरपक्षाचे पुढारी म्हणून मि. हिंडमन, मि. रॅम्से मॅक्डोनल्ड, मि. पेटे क्यूरन् प्रभृति लोक या काँग्रेसला उपस्थित होते. फ्रान्समधून जॉरिस व व्हॅलंट हे दोघे समाजसत्तावादी पुढारी परिषदेला धाडण्यांत आलेले होते. जॉरिस, हिंडमनप्रभृतींच्या सहानुभूतीचा फायदा घेण्याचें ठरवून, हिंदी क्रांतिकारक पक्षानें या काँग्रेसला भारताचे प्रतिनिधी धाडण्याचा निश्चय केला होता.

या काँग्रेसमध्यें घडलेल्या कांहीं गोष्टी मोठ्या सूचक आहेत. फ्रेंच प्रतिनिधी जॉरिस यानें खुल्या मैदानांत दिलेल्या एका व्याख्यानाला चाळीसपन्नास हजार श्रोते उपस्थित होते. फ्रान्समधील साम्यवादी पुढारी हार्वे यांनीं शस्त्रसंन्यासाचा पुरस्कार केला तेव्हां दुसऱ्या एका पुढाऱ्याशीं त्यांचा चांगलाच खटका उडाला! या काँग्रेसच्या शेवटच्या दिवशीं जर्मन सोशॅलिस्ट पुढारी हेर फॉन व्हॉल्कर यानें निःसंदिग्ध शब्दांत असें सांगितलें कीं, जर्मन म्हणून आमचीं जीं कर्तव्यें आहेत तीं आम्हीं प्रथम बजावूं आणि मग जमल्यास सर्व मानव जातीवर प्रेम करूं. सार्वत्रिक संप घडवून आणल्यानें युद्धाचा नायनाट होईल ही कल्पना मूर्खपणाची आहे, असेंहि व्हॉल्कर यानें स्पष्ट शब्दांत सांगितलें.

युरोपांतल्या भिन्न भिन्न देशांतले सोशॅलिस्ट पुढारी सोशॅलिस्ट तत्त्वज्ञानाकडे यावेळीं कसेकसे पहात असत याची अंधुक कल्पना या काँग्रेसच्या त्रोटक वर्णनावरून करतां येते. या काँग्रेसमध्यें हिंदुस्थानचा प्रश्न मांडण्याचा प्रसंग आला तेव्हां रॅम्से मॅक्डोनल्ड प्रभृति लोकांनीं त्याला विरोधच केला; पण, हिंडमन, जॉरिस प्रभृति लोकांचा हिंदी प्रतिनिधींना भरपूर पाठिंबा मिळाल्यामुळें, या आंतरराष्ट्रीय काँग्रेसमध्यें हिंदुस्थानसंबंधींचा एक महत्त्वाचा ठराव संमत झाला. हा ठराव काँग्रेसपुढें मांडण्यापूर्वीं कामाबाईनीं हिंदुस्थानचा राष्ट्रध्वज या ठिकाणीं फडकाविला. या राष्ट्रध्वजावर 'वंदे मातरम्' हीं अक्षरें स्पष्टपणें लिहिलेलीं होतीं हें कामाबाईच्या चित्रावरून सर्वांच्या लक्षांत येईलच. या ध्वजावर जीं आठ कमळें आहेत तीं हिंदुस्थानच्या आठ प्रांतांचीं निदर्शक आहेत. या ध्वजावर सूर्य-चंद्राच्या आकृती काढलेल्या आहेत. या ध्वजावर हिरवा, केशरी व तांबडा अशा तीन रंगांचे जे पट्टे काढलेले होते ते जातींचे निदर्शक नव्हते, गुणांचे निदर्शक होते. तांबडा वर्ण शक्तीचा निदर्शक आहे, केशरी रंग विजयाचा निदर्शक आहे आणि हिरवा रंग धैर्योत्साहाचा निदर्शक आहे. हा ध्वज हातांत घेऊन कामाबाई काँग्रेसमध्यें उभ्या राहिल्या तेव्हां, जमलेल्या सर्व प्रतिनिधींना असें वाटलें कीं, ही कोणी तरी राजघराण्यांतील तरुणी असली पाहिजे. डौलानें हा ध्वज फडकविल्यानंतर कामाबाईनीं पुढील ठराव काँग्रेसपुढें मांडला :

The continuance of British Rule in India is positively disastrous and extremely injurious to the best interests of Indians; and lovers of freedom all over the world ought to co-operate in freeing from slavery the fifth of the whole human race inhabiting that oppressed country, since

the perfect social state demands that no people should be subject to any despotic or tyrannical form of Government.

( हिंदुस्थानांत ब्रिटिशांची सत्ता चालू राहणें ही गोष्ट भारतीयांच्या हिताच्या दृष्टीनें निर्विवाद घातक आणि अत्यंत अपकारक आहे. त्या दलित देशांत वास्तव्य करणारे लोक हे जगांतल्या मानव समाजाच्या एक पंचमांश इतके आहेत. पण या लोकांना दास्यमुक्त करण्याच्या कामीं जगांतल्या सर्व स्वातंत्र्यप्रेमी लोकांनीं सह-कार्य केलें पाहिजे; कारण, जगाची सामाजिक घडी निर्दोष स्थितीप्रत पोंचवायची असेल तर एक गोष्ट अत्यंत अवश्य आहे. कोणताहि लोकसमाज जुलमी व अनि-यंत्रित राज्यव्यवस्थेच्या अंकित असतां कामा नये, हीच ती गोष्ट होय. )

या ठरावावर कामाबाईनीं जें भाषण केलें तेंहि चांगलेंच खणखणीत होतें. हिंदुस्थानांतलें द्रव्य लुटून प्रतिवर्षी अब्जावधि पौंड इंग्लंडमध्यें येतात व त्यामुळें हिंदुस्थान दारिद्र्याच्या परमावधीला जाऊन पोंचलेला आहे ही गोष्ट विस्तारानें मांडल्यानंतर, कामाबाईनीं कॉंग्रेसला आलेल्या प्रतिनिधींना उद्देशून पुढील रोखठोक प्रश्न विचारले : You are discussing colonies all the time, but what about dependencies? (उठल्यासुटल्या तुम्ही लोक वसाहतींबद्दलची चर्चा करतां; पण, हिंदुस्थानसारख्या परायत्त देशाची वाट काय?) सोशॅलिस्ट लोकांनीं हिंदुस्थानच्या प्रश्नाकडे सतत लक्ष दिलें पाहिजे अशी विनंति करतांना कामाबाई म्हणाल्या : Take up the cause of justice and make it a point to bring India to the front at every socialist congress ( तुम्ही न्यायाचा पक्ष घ्या आणि प्रत्येक सोशॅलिस्ट कॉंग्रेसच्या वेळीं हिंदुस्थानचा प्रश्न प्रामुख्यानें पुढें मांडावयाचाच, असा निर्धार करा. )

१९०७ च्या ऑगस्ट महिन्याच्या शेवटीं भारतमंत्री मि. मोर्ले यांनीं 'इंडिया कौन्सिल' वर दोघा हिंदी सभासदांची नेमणूक केली. हिंदु सभासद म्हणून श्री. गुप्त यांची व मुसलमान म्हणून श्री. बिलग्राणी यांची नेमणूक झाली. कौन्सिलांची सुधा-रणा करण्याबद्दलची मोर्लेसाहेबांची योजना व या दोघा हिंदी सभासदांची 'इंडिया कौन्सिल' वर करण्यांत आलेली नेमणूक यांविषयींचा आपला अभिप्राय सावरकर यांनीं 'विहारी' पत्रांतल्या [१] बातमीपत्राच्या द्वारा पुढें व्यक्त केला. या बातमीपत्रांत सावरकर लिहितात :

*इंग्लिश लोक स्वतःकरतां जीं तत्त्वें अमलांत आणतात, तींच ते दुसऱ्या-करतां उपयोगांत आणतील, अशी आशा करीत बसणें व्यर्थ आहे. हे समान-त्वाचे, स्वतंत्रतेचे, सुराज्याचे वगैरे जे हक्क आहेत ते जिवावर उदार होऊनच मिळवावे लागतात.....हल्लीं कौन्सिलांच्या सुधारणा करण्यासाठीं खटपटी*

---

१ सावरकरांनीं लिहिलेलें बातमीपत्र 'विहारी' पत्राच्या दि. २५-१०-१९०७ च्या अंकांत प्रसिद्ध झालें.

*चालल्या आहेत. पण, त्यांत हिंदुस्थानला खरा लाभ कांहीं एक होणार नाहीं असें मि. ओडोनेल यांचें मत आहे. ओडोनेलसाहेब म्हणतात कीं, कर्झन-साहेबांच्या कारकीर्दींत कळसाला जाऊन पोंचलेल्या अरेरावी अंमलाबद्दल हिंदुस्थानांत अनेक रूपानें जेव्हां ओरड सुरू झाली तेव्हां, मोर्लेसाहेबांनीं ही 'रिफॉर्म्स'ची युक्ति पुढें आणली आहे.... पण, मि. गुप्त आणि बिलग्राणी यांना इंडिया कौन्सिलमध्यें नेमण्याचें आमिष दाखवून, इंडियन लोकांच्या महत्त्वाकांक्षा थांबविण्याचा हा जो उपाय करण्यांत येत आहे तो मुळींच फलप्रद होणार नाहीं, असें मि. ओडोनेल यांचें मत आहे....*

*(हे) सभासद नेमतांना हिंदु आणि मुसलमान हा जातिभेद मि. मोर्ले-साहेबांनीं जागृत केला आहे हीहि ओडोनेलसाहेबांच्या मतानें अतिशय मोठी चूक आहे. हिंदुस्थानांतील खरी वस्तुस्थिति दाखवितांना ओडोनेलसाहेब म्हणतात कीं, हिंदु आणि मुसलमान यांच्यामध्यें वास्तविक राजकीय बाब-तींत मुळींच भिन्नभाव नाहीं +++अशी स्थिति असतां, मोर्लेसाहेब मुसल-मानांचें स्तोम माजवीत आहेत म्हणजे आपण होऊनच ते दारूनें भरलेल्या कोठारावर उभे राहात आहेत, असें मि. ओडोनेल यांचें मत आहे.*

रशियन क्रांतिकारकांशीं संधान जुळवून बॉंब बनविण्याची विद्या हस्तगत करण्याच्या कामीं श्री. बापट यांनीं या अवधींत यश संपादन केलें होतें. ते या उद्यो-गांत असतांना, त्यांना एकदां बर्लिनलाहि जावें लागलें होतें. ही विद्या हातीं लाग-तांच तिचा प्रसार करण्याच्या योजनांचा खल लंडन येथील क्रांतिकारकांच्या गोटांत सुरू झाला. मूळ रशियन भाषेंतल्या चोपड्याचें इंग्रजींत भाषांतर करण्यांत आलेलें होतें. त्याच्या कांहीं प्रती तयार करून त्या विश्वासू माणसांबरोबर हिंदुस्थानांत धाडाव्या व अशा मार्गानें ही नवी विद्या स्वदेशांत रुजवावी, असा विचार ठरला. अशा रीतीनें हा 'बॉंब-फॉर्म्युला' बरोबर घेऊन दोन माणसें हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलीं, हें सेनापति बापट यांच्या श्लोकबद्ध आत्म-चरित्रांतल्या पुढील[1] श्लोकांवरून स्पष्ट होत आहे :

> **भाषांतराच्या वेगानें प्रति कांहीं करूनियां ।**
> **पाठवील्या मित्रहस्तें येथें तेथें स्वदेशीयां ।।**
> **मित्रां दोघां पाठविलें भारतीं पुस्तिकांसह ।**
> **राहिलों मी एकटाचि कराया ज्ञानसंग्रह ॥**

या पुस्तिका घेऊन हिंदुस्थानाकडे निघालेले दोघे गृहस्थ म्हणजे श्री. हेम-चंद्र दास व श्री. होतीलाल वर्मा हे होत. यांतले श्री. हेमचंद्रदास हे १९०७ च्या

---

१ सेनापति बापट वाङमय : समग्र ग्रंथ : पृ. १६.

अखेरीस सुरत येथें झालेल्या कॉंग्रेसच्या अधिवेशनापूर्वीच हिंदुस्थानांत येऊन दाखल झाले होते. श्री. होतिलाल वर्मा हे युरोप सोडून निघाले ते सरळ हिंदुस्थानाकडे आले नाहींत. १९०८ च्या सप्टेंबर महिन्यांत प्रयाग येथें श्री. होतीलाल वर्मा यांच्यावरील खटल्याचें काम चालू असतांना, हॉंगकॉंग येथील एका सुभेदार मेजरची साक्ष झाली. आपल्या साक्षींत या सुभेदार मेजरनें असें सांगितलें कीं, आरोपी होतिलाल वर्मा यांनीं कांहीं आठवडेपर्यंत हॉंगकॉंग येथें मुक्काम ठेविला होता व त्या अवधींत ते पलटणींतल्या शिपायांमध्यें पत्रकांचा प्रसार करून राजद्रोह फैलावीत असत. सेनापति बापट १९०८च्या पूर्वार्धांत हिंदुस्थानांत परत आल्यावर त्यांची व लोकमान्य टिळकांची गायकवाडवाड्यांत जी पहिली भेट झाली तिचें वर्णन 'आमचे सेनापति'[१] या पुस्तकांत करण्यांत आलेलें आहे. 'होतिलाल वर्मा' यांच्याबरोबर पाठविलेलें बॉंबगोळ्यासंबंधींचें पुस्तक आपल्याला मिळालें का ? ' या सेनापतींच्या प्रश्नाला लोकमान्यांनीं होकारार्थी उत्तर दिल्याचें नमूद करण्यांत आलेलें आहे. श्री. होतीलाल वर्मा हे अमेरिका, जपान, चीन या मार्गानें हिंदुस्थानकडे आले व १९०८ च्या फेब्रुवारीच्या सुमारास ते लोकमान्यांना भेटले. यावरून असें निष्पन्न होतें कीं, बापटांनीं दिलेली पुस्तिका बरोबर घेऊन श्री. वर्माजींनीं १९०७ सालच्या ऑगस्ट–सप्टेंबरच्या सुमारास युरोप सोडलें असावें.

बॉंबची विद्या हस्तगत होऊन तिचा हिंदुस्थानांत फैलाव करण्याचें अशा रीतीनें ठरलें एवढ्यानें लंडनमधील क्रांतिकारकांचें समाधान झालें नाहीं. मिळालेली माहिती बरोबर आहे कीं नाहीं हें अनुभवानें व प्रयोगानें पारखून पाहण्याचा उद्योग त्यांनीं सुरू केला. ' इंडिया हाउस ' च्या इमारतींत सावरकरांच्या खोलीजवळील अगदीं वरच्या माळ्यावर हे प्रयोग चालत. या प्रयोगांची वेळ निश्चित अशी ठरलेली नसे. कित्येक वेळां तर, हे प्रयोग घाईघाईनें आटोपून पिक्रिक ॲसिडनें पिवळे झालेले हात न धुतांच सावरकर झट्कन् ' Free India Society ' च्या बौद्धिक वर्गाच्या बैठकींत येऊन दाखल होत आणि व्याख्यानाला सुरुवात करीत. या प्रयोगांत पिक्रिक ॲसिड बनविणें हा भाग अत्यंत महत्त्वाचा होता. हें ॲसिड बनवितांना त्याचा कांहीं अंश कागदांना लागत असे व हे कागद नाहींसे करण्याची दक्षता पुष्कळ वेळां सावरकरांना स्वतःलाच घ्यावी लागत असे. ही दक्षता घेतल्यावरहि अशा कागदांचे कांहीं तुकडे इकडेतिकडे पडून रहात असत. एकदां बापटांनीं ' इंडिया हाउस ' मधील शेकोटीपाशीं बसून अजाणतेपणीं असले ज्वालाग्राही कागद सहज शेकोटींत टाकले. त्याबरोबर बराच मोठा आवाज झाला नि जाळहि झाला. ' इंडिया हाउस ' च्या त्या माळ्याला उघडें धुराडें असल्यामुळें, त्यांतून हा जाळ बाहेर निघून गेला. ' इंडिया हाउस ' मधील नोकरचाकर नि शेजारीपाजारीहि दचकून गोळा झाले; पण, सावरकरांनीं या गोष्टीचा बभ्रा होऊं नये म्हणून बेमालूम बतावणी केली. हे

---

१ पृ. ६६

पिक्रिक ॲसिडचे प्रयोग करण्याच्या वेळीं अगदीं शेलकी मंडळीच हजर असत. अशा मंडळींपैकीं श्री. मदनलाल धिंग्रा यांनीं एका प्रसंगीं किती कल्पनातीत सोशिकपणा दाखविला याचें वर्णन यापुढील एका प्रकरणांत करण्यांत येईलच.

बॉंब बनविण्याची विद्या हस्तगत झाली असें दिसूं लागल्यामुळें, श्री. बापट हे किती अधीर बनले होते हें त्यांच्या आत्मचरित्रांत वर्णन करण्यांत आलेलें आहे. यापूर्वीं त्यांनीं भारतमंत्री मि. मोर्ले यांच्यावर पिस्तुल झाडण्याचा विचार आपल्या सहकाऱ्यांपुढें मांडला होता. आतां हें नवें अस्त्र हातीं लागल्यामुळें, पार्लमेंटच्या सभागृहावर त्याचा प्रयोग करावा हा धाडसी विचार त्यांच्या मनांत खेळूं लागला. हा विचार त्यांनीं सावरकरांना सांगितल्यावर सावरकर काय म्हणाले—सावरकरांची या वेळची एकंदर योजना काय होती—हें पुढील[1] पद्यपंक्तींवरून स्पष्ट होत आहे :

" आंग्ललोकसभास्थानीं टाकावा रसगोलक।
वाटे, पटे जरि तुम्हां तुम्हीं कीं मुख्य चालक "।
" नको; जसा तुटे तारा चमके; पुढती तम;
तसें होईल हें कर्म व्यर्थ हें; हा नको श्रम ॥
जा तुम्ही भारता आतां माथें शांत करा अति।
ठरल्या रीतिनें चाला, नको व्यर्थ चमत्कृति ॥
ज्ञानप्रसार करणें तसा गोलक-संग्रह ।
जागजागीं भारतांत पुढें येतील सु-ग्रह "

या ओळींत सूचित झाल्याप्रमाणें सेनापति बापट हे युरोप सोडून हिंदुस्थानला यावयाला कधीं निघाले हें निश्चित रीतीनें सांगतां येत नाहीं. 'आमचे सेनापति' या पुस्तकांत[2] १९०८ सालच्या मार्च महिन्याच्या अखेरीस सेनापति मुंबईस आले, पॅरिसहून निघतांना त्यांनीं आपलें नांव बदललें होतें, वगैरे माहिती दिलेली आढळते. 'विहारी' साप्ताहिकाच्या दि. ९–३–१९०८ च्या अंकांत सावरकर यांनीं लंडनहून दि. २१–२–१९०८ रोजीं धाडलेलें बातमीपत्र प्रसिद्ध झालेलें आहे. या बातमीपत्राच्या शेवटच्या परिच्छेदांत पुढील वाक्य आहे :

" गेल्या रविवारीं येथील 'फ्री इंडिया सोसायटी' या संस्थेनें आतां लवकरच हिंदुस्थानांत परत येणाऱ्या दे. बापट व पंजाबचे दे. परमानंद या दोन देशसेवक पुढाऱ्यांस मेजवानी दिली." या उल्लेखावरून असें दिसतें कीं, बापट हे १९०८ च्या फेब्रुवारी महिन्याच्या मध्याच्या सुमारास लंडन सोडून निघाले व कांहीं दिवस पॅरिस येथें वास्तव्य केल्यावर, एका इटालियन बोटींतून ते मुंबईस येऊन पोंचले. बापटांनीं

---

१ सेनापति बापट वाङ्मय : समग्र ग्रंथ : पृ. १६. २ पृ. ६०.

स्वतःबरोबर कोणती संपत्ति आणली होती हें त्यांनींच लिहिलेल्या पुढील[1] श्लोकांत वर्णिलेलें आहे :

नामांतरें पातलों मी देशीं मुंबापुरीं तदा ।
यंत्रे दोन तशा पोथ्या होती जवळि संपदा ॥

श्री. हेमचंद्र दास, श्री. होतीलाल वर्मा, श्री. बापटप्रभृति क्रांतिकारकांनीं भारताच्या भिन्नभिन्न भागांत क्रांतिकारक मंडळींची संघटना करावी, स्फोटकांच्या नि शस्त्रास्त्रनिर्मितीच्या विद्येचा प्रसार करावा, शक्य त्या मार्गांनीं शस्त्रास्त्रांचा गुप्त संग्रह करावा व क्रांतिकारक प्रवृत्तीच्या तरुणांची गुप्त संघटना करून योग्य वेळेची मार्गप्रतीक्षा करीत रहावें, असा बेत ठरून ही सर्व मंडळी हिंदुस्थानकडे धाडण्यांत आलेली होती. शिष्यवृत्ति वगैरे झुगारून देऊन क्रांतिकारकांच्या गोटांत यापूर्वीच सामील झालेल्या लाला हरदयाळजींना या सर्व गोष्टी माहीत होत्या. पंजाबांतहि अशा प्रकारची संघटना करणें अत्यंत अवश्य आहे, असा विचार त्यांच्या मनांत घोळूं लागला होता. दि. ९-११-१९०७रोजीं श्री. राणा यांना धाडलेल्या पत्रांत लाला हरदयाळ यांनीं पं. शामजींच्या ' होमरूल सोसायटी ' बद्दल निराशेचे उद्गार काढले आहेत व जहाल पक्षाच्या संघटनेची आवश्यकता प्रतिपादिली आहे. या पत्रांतील पुढील वाक्य लालाजींच्या या वेळच्या मनःस्थितीवर लख्ख प्रकाश पाडणारें आहे :

I do not know how matters stand in Maharashtra and Bengal, but I can say that organization is absolutely necessary for the Upper Indian people.

( महाराष्ट्र व बंगाल या प्रांतांत वस्तुस्थिति काय आहे हें मला माहीत नाहीं. पण, उत्तर भारतांतील लोकांसाठीं संघटना निर्माण करणें अत्यंत जरुरीचें आहे, एवढें मात्र मी म्हणूं शकतों. ) हें पत्र लिहिल्यानंतर थोडक्याच दिवसांत लाला हरदयाळ हे आपल्या आजारी पत्नीला हिंदुस्थानांत पोंचविण्याच्या निमित्तानें इंग्लंड सोडून निघाले असले पाहिजेत. दि. १४-२-१९०८ रोजीं लो. टिळकांनीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना लिहिलेलें एक पत्र उपलब्ध आहे. हें पत्र लिहिण्यापूर्वी टिळक व हरदयाळ यांची भेट झालेली होती, हें या पत्रांतल्या पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे :

I saw Mr. Har Dayal and have given him my views regarding the work to be done in Punjab. He agreed with me generally and means to commence work as soon as possible. I think he will soon develop into a nationalist leader in the Punjab and will prove a tower of strength to the Nationalist party generally.

(माझी व हरदयाळ यांची भेट झाली. पंजाबांत करावयाच्या कार्यासंबंधींचे माझे विचार मी त्यांना सांगितले. माझें म्हणणें त्यांना सर्वसामान्य रीतीनें मानवलें. शक्य तितक्या लौकर कार्य सुरू करण्याचा त्यांचा मानस आहे. लाला हरदयाळ हे

---

१ सेनापति बापट वाङ्मय : समग्र ग्रंथ : पृ. १६-१७.

लौकरच पंजाबचे राष्ट्रीय पुढारी म्हणून पुढें येतील; इतकेंच नव्हे तर सामान्यतः राष्ट्रीय पक्षाचा एक भक्कम आधार म्हणून ते मान्यता पावतील, असें मला वाटतें.)

१९०६ सालच्या अखेरीपासून अगर १९०७ सालच्या प्रारंभापासून इंग्लंडांत विद्यार्जनासाठीं येऊन राहिलेल्या हिंदी विद्यार्थ्यांच्या वृत्तींत व वर्तनांत जो फरक पडत चालला होता तो इंग्लंडमधील अधिकारिवर्गाच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं. यापूर्वी इंग्लंडांत विद्यार्जनासाठीं येणारे हिंदी विद्यार्थी इंग्लंडच्या संस्कृतीला श्रेष्ठ मानीत, इंग्लिश चालीरीतींचें अनुकरण करण्यांत सारा पुरुषार्थ सांठविलेला आहे असें त्यांच्या वर्तनावरून दिसे आणि इंग्लिश माणसाशीं वागतांना अदबीनें व आदरानें वागणें हें आपलें कर्तव्य आहे, या भावनेचा पगडा त्यांच्या मनावर बसलेला आढळे. अलीकडे हिंदी विद्यार्थ्यांच्या या भावना पार बदलून गेल्या आहेत, त्यांच्यामध्यें एक विलक्षण प्रकारचा स्वाभिमान जागृत झाल्याचीं लक्षणें दिसत आहेत, इंग्लिश स्त्री-पुरुषांशीं तुसडेपणानें व अरेरावीनें वागण्याची वृत्ति त्यांच्यांत बळावत आहे, वगैरे गोष्टी इंग्लिश अधिकाऱ्यांच्या लक्षांत आल्यामुळें, 'उच्छृंखल' बनूं पाहणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांना 'माणसाळविण्यासाठीं' कांहीं तरी योजना आंखली पाहिजे, असें त्यांच्या मनानें घेतलें. ही योजना आंखण्यासाठीं भारतमंत्री मि. मोर्ले यांनीं जी समिति नेमली त्या समितींत 'इंडिया कौन्सिल'चे इंग्लिश सभासद सर वुइल्यम ली वॉर्नर आणि मि. थिओडर मॉरिसन हे होते. मोर्लेसाहेबांचे राजकारणी सल्लागार सर कर्झन वायली यांचीहि या समितीवर योजना करण्यांत आलेली होती. तीनचार महिने विचारविनिमय केल्यावर या समितीनें सन १९०७ च्या शेवटीं शेवटीं आपलें प्रतिवृत्त मोर्लेसाहेबांना सादर केलें.[1]

हस्तगत झालेली बॉंब बनविण्याची विद्या स्वदेशांत रुजावी या हेतूनें ही तरुण मंडळी युरोप सोडून हिंदुस्थानला परत निघाली त्या सुमारास इंग्लंडांत येऊन दाखल झालेले एक गृहस्थ यापुढील काळांत सावरकरांचे साहाय्यक म्हणून व एकनिष्ठ क्रांतिवीर म्हणून फार महत्त्वाला चढले. या गृहस्थांचें लोकप्रसिद्ध नांव व्ही. व्ही. एस्. अय्यर हें आहे. या व्यक्तीचें खरें नांव व्यंकट सुब्रह्मण्य अय्यर. वकिलीच्या परीक्षेंत उत्तीर्ण झाल्यावर श्री. अय्यर यांनीं चार-पांच वर्षे त्रिचनापल्ली येथें वकिली केली. श्री. पशुपति अय्यर नांवाच्या रंगून येथील आप्तानें तिकडे बोलाविल्यामुळें, श्री. अय्यर हे १९०७ सालीं वकिली करण्यासाठीं रंगूनला गेले. तेथें कांहीं महिने वकिली केल्यावर बॅरिस्टर होण्याची इच्छा त्यांच्या मनांत डोकावूं लागली. १९०७ सालीं ऑक्टोबर महिन्याच्या शेवटीं श्री. अय्यर हे रंगूनहून लंडनकडे रवाना झाले. १९०७ च्या डिसेंबर महिन्यांत श्री. अय्यर हे 'इंडिया हाउस' मध्यें सावरकरांना भेटले. बॅरिस्टर होण्यासाठीं इंग्लंडांत गेलेल्या गांधी-

---

१ लंडन टाइम्स : दि. १-९-१९०८.

जींना ज्याप्रमाणें आरंभीं नृत्य, इंग्रजी पद्धतीचें गायन इत्यादि विषयांचे पाठ घेणें शिष्टाचारपालनाच्या दृष्टीनें अवश्य वाटलें[1] त्याप्रमाणेंच, श्री. अय्यर यांनाहि आरंभीं या गोष्टी अवश्य वाटत असत. ' हिंदु म्हणवून घेण्यांत श्री. अय्यर यांना कमीपणा वाटत असे. आपण इंग्रजी शिक्षण घेतलें असल्यामुळें, सामान्य हिंदी माणसांपेक्षां आपण श्रेष्ठ आहों, आपण ख्रिस्ती झालों आहों ' अशा कल्पना श्री. अय्यर यांच्या मनांत घोळत असत, असें श्री. एम्. पी. टी. आचार्य यांनी लिहिलें आहे;[2] पण, श्री. अय्यर यांचे चरित्रकार श्रीस्वामी शुद्धानंद भारतियार यांनीं लिहून धाडिलेल्या आठवणी विचारांत घेतल्या तर, श्री. आचार्य यांचें विधान अतिरंजित ठरतें. लंडनला पोंचल्यावर श्री. अय्यर यांच्या कानांवर सावरकरांचें नांव प्रथम गेलें तेव्हां ते त्यांना Firebrand ( ज्वलज्जहाल ) समजूं लागले व सावरकरांची भेट घेण्याला श्री. अय्यर प्रथम फारसे उत्सुक नव्हते, हें श्री. आचार्य यांचें विधान मात्र बरोबर असावें !

सावरकर व अय्यर यांच्या पहिल्या भेटीच्या वेळीं जो प्रकार घडला त्याचें वर्णन चित्रगुप्तलिखित सावरकर-चरित्रांत सावरकरांच्या लेखाच्या आधारें करण्यांत आलें आहे.[3] हें वर्णन व स्वामी शुद्धानंद भारतियार यांनीं लिहिलेलें या प्रसंगाचें वर्णन यांमध्यें विलक्षण साम्य आहे. नृत्यगायन वगैरे शिकण्याचा माझा विचार आहे हे श्री. अय्यर यांचे शब्द ऐकल्यावर सावरकर आवेशानें म्हणाले :

Youthful energy must not be wasted now in such paltry things we have more important things to do.

( तरुणांची कार्यशक्ति आतां अशा क्षुद्र प्रकारांत वांया जातां कामा नये; आतां आपल्याला जास्त महत्त्वाच्या गोष्टी करावयाच्या आहेत. ) श्री. अय्यर यांना सावरकरांचें म्हणणें तावडतोब पटलें नाहीं; पण, सावरकरांच्या विषयींचा अनुकूल ग्रह बरोबर घेऊन ते ' इंडिया हाउस ' मधून बाहेर पडले. ते ' इंडिया हाउस ' मधील व्याख्यानांना वारंवार जाऊं लागले. Are we obliged to British Rule? (ब्रिटिश राज्यपद्धतीनें आपल्यावर उपकार केले आहेत काय?) हें सावरकरांचें व्याख्यान ऐकल्यावर त्यांचें पूर्ण मतपरिवर्तन झालें व तेव्हांपासून ते सावरकरपंथांत कायमचे सामील झाले, अशी माहिती मिळते. थोडक्याच दिवसांत श्री. अय्यर हे 'इंडिया हाउस' मध्यें रहावयाला आले. श्री. अय्यर हे 'इंडिया हाउस'मधून चाललेल्या भानगडींत सावरकरांचे उजवे हात होते असें Sedition Committee Report मध्यें सांगण्यांत आलें आहे.[4] पुढें अलीपूर कटाच्या खटल्यांत प्रसिद्धीस आलेले व अंदमानमधील वास्तव्याच्या अवधींत सावरकरांचे चाहते बनलेले श्री. उल्हासकर दत्त यांचे बंधु श्री. सुखसागर दत्त, श्री.

---

1. The Story of My Experiments with Truth : pp. 70—71.
2 Reminiscences of a Revolutionary : Mahratta, 27—8—37.
3 P. 120. 4, p. 164.

बिपिनचंद्र पाल यांचे चिरंजीव श्री. निरंजन पाल, नाभा संस्थानांतले एक बॅरिस्टर म्हणून पुढें लोकांना माहीत झालेले मि. खान, केरळ प्रांतांतले श्री. गोविन्द मेनन व मद्रासच्या काँग्रेस मंत्रिमंडळांतले एक मंत्री डॉ. राजन् इत्यादि मंडळीहि या सुमारास सावरकरांच्या निस्सीम अनुयायांत नि सहकाऱ्यांत गणली जाऊं लागली.

वंगभंगापासून बंगाल्यांत जें एक नवें चैतन्य उत्पन्न झालें होतें त्याचा या काळांत उत्कर्ष होत होता. बंगाली वृत्तपत्रांतून या सुमारास कोणत्या प्रकारचे लेख प्रसिद्ध होत असत याचा मासला म्हणून Sedition Committee Report मध्यें 'युगांतर' पत्राच्या दि. १२-८-१९०७ च्या अंकांतील पुढील उतारा[1] देण्यांत आला आहे.

There is another very good means of acquiring strength of arms. Many people have observed in the Russian Revolution that there are many partisans of Revolutionaries among the Czar's troops. These troops will Join the revolutionists with various arms. This method succeeded well during the French Revolution. The revolutionists have additional advantages where the ruling power is a foreign power, because the latter has to recruit most of its troops from among the subject people. Much work can be done by the revolutionists very cautiously spreading the gospel of independence among these native troops. When the time arrives for a practical collision with the ruling power, the revolutionists not only get these troops among their ranks but also the arms with which the ruling power supplied them. Besides, all the enthusiasm and courage of the ruling power can be destroyed by exciting a serious alarm in its mind.

( शस्त्रशक्ति संपादण्याचें आणखी एक चांगलें साधन आहे. रशियन क्रांतीचें निरीक्षण करणाऱ्या पुष्कळांच्या हें ध्यानांत आलें आहे कीं, झारच्या सैन्यांत क्रांतिकारकांचे पक्षपाती लोक पुष्कळ आहेत. विविध शस्त्रें घेऊन हे सैनिक क्रांतिकारकांना मिळतील. फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं ही पद्धत फार यशस्वी ठरली. ज्या ठिकाणीं राजसत्ता परकी असते तेथें तर अधिकच गोष्टी क्रांतिकारकांच्या बाजूच्या असतात; कारण, परकीय सत्तेला सैन्यभरती करतांना गुलामगिरींत नांदणाऱ्या स्थानिक लोकांवरच अवलंबून रहावें लागतें. देशी सैन्यांत स्वातंत्र्याचें वारें जपून पसरविल्यानें, क्रांतिकारकांना फार मोठें काम करतां येईल. राजसत्तेशीं प्रत्यक्ष संघर्ष घडण्याचा प्रसंग येईल तेव्हां हें सैन्य क्रांतिकारकांच्या बाजूला वळतें इतकेंच नव्हे तर, राजसत्तेनें पुरविलेलीं शस्त्रास्त्रेंहि क्रांतिकारकांच्या हातीं लागतात. राजसत्तेच्या मनांत विलक्षण भीति निर्माण करून तिचा उत्साह व धैर्य नष्ट करतां येतें, हाहि फायदा लक्षांत घेण्यासारखा आहे. )

'युगांतर'पत्रासारख्या वृत्तपत्रांतून रशियन क्रांतीच्या व क्रांतिकारकांच्या उद्योगांचे दाखले कसे दिले जात असत हें वरील अवतरणावरून वाचकांच्या लक्षांत येईलच. लंडनमध्यें असलेले सावरकरहि या सुमारास रशियांतलि घडामोडींकडे विशेष लक्ष

1. P. 22.

पुरवीत होते व त्या घडामोडींपासून योग्य तो बोध घेण्याची सूचना ते आपल्या देश-बांधवांना देत होते हें ' विहारी ' साप्ताहिकाच्या दि. २२-११-१९०७ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या लंडनच्या बातमीपत्रावरून उघड होत आहे. हें बातमीपत्र वाचीत असतांना क्षणभर असा भास होतो कीं, सावरकरांनीं 'इंडिया हाउस'मध्यें निवडक मंडळींसमोर दिलेल्या एकाद्या व्याख्यानाचा गोषवारा या बातमीपत्रांच्या रूपानें प्रसिद्ध करण्यांत आला असावा. Black Hundred ऊर्फ 'कौटिल्यशतक' असें या बातमी-पत्राचें शीर्षक आहे. सर्व जुलमी सत्ताधाऱ्यांकडून ' भेदा आणि नांदा ' या तत्त्वाचा अवलंब कसा केला जातो या मुद्याचें विशदीकरण झाल्यावर, या बातमीपत्रात स्वराज्य-युक्त राष्ट्रें, स्वतंत्र राष्ट्रें व परतंत्र राष्ट्रें असे जगांतल्या राष्ट्रांचे तीन प्रकार कल्पि-ण्यांत आले आहेत. इंग्लंड, अमेरिका, रशियाप्रभृति राष्ट्रें स्वतंत्र राष्ट्रें होत; कॅनडा—ऑस्ट्रेलियाप्रभृति राष्ट्रें स्वराज्ययुक्त राष्ट्रें होत असें सांगितल्यावर, या बातमीपत्रांत पुढील विचार व्यक्त करण्यांत आलेले आहेत :

*आयर्लंड, हिंदुस्थान, ईजिप्त या दुर्भागी देशांत स्वराज्यहि नाहीं व स्वातंत्र्यहि नाहीं; या देशांना गुलामागिरी बहाल करण्यांत आलेली आहे..... परकी सुराज्यापेक्षां स्वदेशी जुलमी स्वराज्यहि चांगलें असें नामांकित राज-कीय वैद्य सांगत आलेले आहेत. या बाबतींत रशियन राष्ट्र आपणांपेक्षां भाग्यवान् आहे; कारण, त्यांना जुलमाचें का होईना पण स्वराज्य आहे.*

अशा जुलमी स्वराज्यांत नांदणारी रशियन जनता जागृत होऊं लागल्या-बरोबर, तिचा पाडाव करण्यासाठीं रशियांतल्या राज्यसत्तेनें कोणते प्रयत्न चालविले आहेत याचें वर्णन या बातमीपत्रांत पुढीलप्रमाणें करण्यांत आलेलें आहे :

*स्वातंत्र्योन्मुख रशियन जनतेचा पाडाव करण्यासाठीं झारच्या अधिका-ऱ्यांनीं जातीजातींत, वर्णावर्णांत, धर्माधर्मांत दुही माजवून दिली आहे.... रशियांत सध्यां घडूं लागलेल्या क्रांतीच्या चळवळीपूर्वी 'रशियन ऐक्यसमाज' या नांवाची संस्था मवाळपणें काम करीत असे..... आपल्याकडे स्वदेशी आणि बहिष्कार यांची लाट उसळतांच ' नोटेबल्स ' आणि ' मवाळ ' यांची सरकारला गरज भासूं लागली....या संस्थेमार्फत स्पृहणीय, महनीय, पवित्र आणि उदात्त महत्त्वाकांक्षा दाबून टाकण्याचे प्रयत्न करण्यांत येऊं लागले. देशभक्तांचे गळे कापण्याचें खाटकाचें काम ही संस्था चालवूं लागली.... या तिच्या क्रूर स्वरूपानेंच तिला ' Black Hundred ' हें यथार्थ नांव लोकांकडून मिळालें आहे....या पूतनेची राष्ट्राचे पुरस्कर्ते, राष्ट्राचे मेंदे—नव्हे राष्ट्राचें चैतन्य—जे तरुण त्या तरुणांवर फार क्रूर दृष्टि आहे. एकाद्या तरुणाचा यदाकदाचित् त्यांना नुसता संशय आला कीं पुरे, हे भयंकर लोक त्यांना जलसमाधि देतात, त्यांचे खून पाडतात आणि त्यांच्या सरसहा कत्तली*

*करतात.... अशी स्थिति आहे तरी पण, रशियाला रशियाचे तरुण आत्मयज्ञ करून पुढें नेत आहेत. रशिया स्वातंत्र्यमकरंदानें परिप्लुत असलेल्या कमलवनाच्या अगदीं कांठावर उभा राहिला आहे; आणि तो केव्हां त्या कमलवनांत स्वातंत्र्यमकरंदाची माधुरी चाखण्यांत गुंग होईल याचा नेम नाहीं. पण हिंदुस्थाना! दुर्दैवी हिंदुस्थाना! तुझ्याकडे* 'Black Hundred' *ला न जुमानणारे लोक आहेत का?*

वृत्तपत्रांतून प्रसिद्ध होणाऱ्या अशा लेखांना आळा घालण्याचा प्रयत्न सरकारी अधिकाऱ्यांनीं खूप जोरानें सुरू केलेला होता. १९०७ च्या जुलै महिन्याच्या शेवटीं बंगालमधील 'युगांतर' पत्राच्या संपादकाला एक वर्ष कारावासाची शिक्षा सांगण्यांत आली. 'युगांतर' पत्राचा छापखाना जप्त केल्यावरहि तें पत्र बंद पडलें नाहीं, हें पाहून चिडून गेलेल्या सरकारी अधिकाऱ्यांनीं या पत्राच्या संपादकांमागें खटल्यांचा ससेमिरा लाविला. 'वंदे-मातरम्' पत्रांतल्या कांहीं लेखांबद्दल ऑगष्ट महिन्यांत बाबू अरविंद घोष यांना अटक करण्यांत आली. या सुमारासच यवतमाळ येथें प्रसिद्ध होणाऱ्या 'हरिकिशोर' पत्रावर खटला भरण्यांत आला. सावरकर ज्या 'विहारी' पत्रासाठीं लेख व बातमीपत्रें पाठवीत असत त्या 'विहारी' पत्रांत प्रसिद्ध झालेल्या 'वॉलेसचें ध्येय' वगैरे लेखांबद्दल संपादक श्री. भास्कर विष्णु फडके यांना ऑक्टोबर महिन्यांत पकडण्यांत आलें. श्री. फडके यांच्यावरील खटल्याचें काम महिना सव्वा महिना चालल्यावर, नोव्हेंबर महिन्याच्या शेवटीं त्यांना दोन वर्षें कैदेची शिक्षा सांगण्यांत आली.

देशांतील असंतोष अनेक तऱ्हांनीं व्यक्त होत असल्यामुळें आणि हा असंतोष दडपून टाकण्याचें खंबीरपणाचें धोरण सरकारनें निर्धारपूर्वक चालू ठेविल्यामुळें, या वर्षी नाताळांत होणाऱ्या कॉंग्रेसकडे सर्वांचेंच लक्ष लागून राहिलें होतें. ही कॉंग्रेस नागपुरास भरावयाची असें पूर्वीपासून ठरलेलें होतें; पण, कॉंग्रेसचें अधिवेशन नागपुरास झालें तर तेथें तिला अनिष्ट वळण लागेल अशा भीतीच्या आहारीं गेलेल्या मेथाप्रभृति कॉंग्रेसधुरीणांनीं आपल्या अधिकारांत कॉंग्रेस अधिवेशनाची जागा बदलण्याचें ठरविलें. या स्थलांतराविरुद्ध देशांतील तरुणवर्गानें व या वर्गाच्या पुढाऱ्यांनीं खूप ओरड केली; पण तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. कॉंग्रेसच्या स्थलांतराचा हा वाद चालू असतांना नोव्हेंबर महिन्याच्या प्रारंभींच सरकारनें लाला लजपतराय व सरदार अजितसिंग यांना मंडाले येथून बंधमुक्त केलें. हे दोघें देशभक्त सुटून आल्यावरोबर देशांतल्या जहाल लोकमताला फिरून एक नवी भरती येऊं लागली व सुरतेच्या कॉंग्रेसचें अध्यक्षपद लाला लजपतराय यांना द्यावें, अशी जोराची मागणी टिळकपक्षाकडून केली जाऊं लागली. मेथाप्रभृति अरेरावांनीं या राष्ट्रीय मागणीला वाटाण्याच्या अक्षता लावल्यामुळें, सुरतेच्या कॉंग्रेसमध्यें नेमस्त व जहाल पक्षांमध्यें खडाजंगी उडणार, हें ठरून गेल्यासारखें झालें.

सुरतेच्या कॉंग्रेसमध्यें घडलेल्या सर्व गोष्टी सांगत बसणें अगर त्या गोष्टींची गुणदोषदृष्ट्या चर्चा करणें हें प्रस्तुत पुस्तकाच्या कक्षेबाहेरचें आहे. सुरतेच्या कॉंग्रेसची फलश्रुति म्हणून असें सांगतां येईल कीं, देशांत उदय पावूं पाहणारा नवा पक्ष कॉंग्रेसमधील जुन्या पक्षाशीं निदान तुल्यबल तरी आहे, हें सुरतेस घडलेल्या प्रकारांवरून सिद्ध झालें. सुरतेच्या कॉंग्रेसमध्यें जो पुणेरी जोडा प्रसिद्ध झाला त्याचें मर्म असें होतें कीं, 'भिक्षांदेहि' करून देश स्वतंत्र करूं पाहणाऱ्या पक्षाला जोराचा आघात करणारें लोकमत प्रभावशाली झालेलें होतें. या नव्या पक्षाच्या संसर्गामुळें आपलें सरकारांतील वजन घटतें व सरकार आपल्यावरहि विश्वास ठेवण्याला तयार होत नाहीं, असें मानणाऱ्या नेमस्ताग्रणींनीं सुरतेस—म्हणजे फिरोजशहा मेथांच्या बालेकिल्ल्यांत—कॉंग्रेस नेली तेव्हां क्षणभर असा भास झाला कीं, सुरत येथें नवा पक्ष अगदीं निष्प्रभ ठरेल! पण असें कांहीं न घडतां, या पक्षाचा प्रभाव सुरत येथील प्रकारांमुळें त्रिखंडांत गाजला.

सुरत येथील कॉंग्रेसला जी तरुण मंडळी गेली होती. त्यांत 'अभिनव भारतां-' तील पुष्कळच मंडळी होती. खुद्द नाशिकहून पुष्कळच मंडळी गेली होती व त्यावेळीं बडोदें येथें जी 'अभिनव भारतां'तली मंडळी होती तीहि मोठ्या जमावानें सुरतेस गेली होती. सुरत येथें जे जाहीर कार्यक्रम झाले ते प्रस्तुत विषयाच्या दृष्टीनें गैरलागू आहेत. पण, या ठिकाणीं ठिकठिकाणच्या क्रांतिकारकांची जी गुप्त बैठक झाली, त्या बैठकींतल्या चर्चेचें वर्णन करणें मात्र अवश्य आहे. १९०८ सालच्या एप्रिल-मे महिन्यापासून बंगाल्यांत जी धरपकड सुरू झाली तिच्यानंतर कांहीं बंगाली देशभक्तांनीं लिहिलेल्या वृत्तान्तांमधून या गुप्त बैठकीचा निर्देश करण्यांत आला आहे. महाराष्ट्रांतील क्रांतिकारक तरुणांनीं सुरत येथील चर्चेच्या वेळीं महाराष्ट्रांतील तयारीसंबंधीं अतिशयोक्तिपूर्ण कल्पना करून दिली व त्या कल्पनेवर विसंबून राहिल्यामुळें आमची फसगत झाली, अशा आशयाचें हें लिखाण आहे.[1] यश पदरीं पडलें म्हणजे प्रत्येकजण तें यश आपल्या करामतीमुळें लाभलें, असें प्रतिपादूं लागतो; त्याप्रमाणेंच, अपेश पदरीं पडल्यानंतर दुसऱ्या कोणाच्या तरी चुकीमुळें प्रयत्न अपेशी झाला, असें म्हणण्यास मन प्रवृत्त होतें. हें मनुष्यस्वभावाला धरूनच आहे. महाराष्ट्रीय क्रांतिकारकांनीं मारलेल्या बढायांना बंगाली देशभक्तांनीं पुढें जीं दूषणें दिलीं तीं अशा अर्थानें सहज असलीं तरी, त्या दूषणांत सत्याचा अंश फारसा नाहीं, हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे. बंगाली क्रांतिकारकांनीं कांहींशा घाईनें जीं कृत्यें केलीं तीं कोणत्या कारणास्तव केलीं हें स्पष्ट करणारा पुरावाच उपलब्ध आहे. १९०८ च्या मार्च महिन्यांत सेनापति बापट युरोपांतून हिंदुस्थानांत परत आले, ही गोष्ट यापूर्वीच सांगून झाली आहे. परत आल्यावर थोड्याच दिवसांनीं सेनापतींची स्वारी कलकत्त्यास गेली. पूर्वयोजना सोडून आपले सहकारी भलत्याच मार्गाला लागले आहेत

१ राजनैतिक कारस्थान : प्रथम खंड : पृ. २२.

हें पाहिल्याबरोबर सेनापति विस्मित झाले. बंगाली क्रांतिकारक व सेनापति बापट यांचा या प्रसंगीं जो संवाद झाला तो सेनापतींनीं पुढील[1] पद्यपंक्तींत नमूद करून ठेविला आहे :

भेटलों तेथ मित्रांसी पाहिलीं गुप्तमंडळें ।
मग कालिपुरा गेलों पाहण्या काय चाललें ।।
तेथ माझ्या पूर्वमित्रें पूर्वनिश्चित योजना ।
टाकुनी चालवीलीशी दिसली अन्य कल्पना ।।
बहु मित्र दुजे तेथें मित्राचे मज भेटले ।
त्या सर्वांचेंचि दिसलें कांहीं निश्चित घाटलें ।।
" हें कसें ? " मी पुसें मित्रा "बरें हें न दिसे मला"
" करावें काय ? ' तो बोले " दाविणें पडतें कला " ।।
" कला घेउनि आलां ती दाखवा कांहिंशी अम्हां ।
अन्यथा साह्य ना मागा आम्हांसीहि करा क्षमा " ।।
" ऐसें म्हणति दातार साह्याचे; साह्य संपतां ।
न चालेल कला कांहीं म्हणुनी मार्ग हा अतां" ।।

कलकत्याच्या 'युगांतर' पत्रावर एका पाठोपाठ करण्यांत येत असलेले खटले, ' युगांतर ' पत्राप्रमाणेंच लोकप्रिय झालेल्या ' संध्या ' पत्राचे संपादक ब्रह्मबांधव उपाध्याय यांना तुरुंगांत आलेला मृत्यु इत्यादि घटनांमुळें सुरतेस होणाऱ्या कॉंग्रेस अधिवेशनापूर्वी लोकांचीं मनें प्रक्षुब्ध झालीं होतीं. पण, या प्रक्षोभावर वीरनवाली प्रकरणानें कळसच चढविला होता. ज्या गतगोष्टीचा केवळ इतिहास म्हणून शांत मनानें विचार करणाऱ्या हिंदी माणसाला आजहि चीड यावी आणि इंग्लिश माणसाला आजहि शरम वाटावी, असें हें वीरनवाली प्रकरण होतें. वीरनवाली ही सुमारें १७-१८ वर्षांची एक हिंदु अबला होती. सासरच्या मंडळींशीं कांहीं बेबनाव झाल्यामुळें, ती एकटीच सासरच्या घराहून निघाली आणि मध्यरात्रींच्या सुमारास रावळपिंडी स्टेशनवर उतरली. या स्टेशनचा अँग्लो-इंडियन स्टेशनमास्तर मि. मूर व त्याच्या हाताखालचा एक मुसलमान नोकर या दोघांनीं या बाईवर पशुवत् बलात्कार केला. हें प्रकरण कोर्टांत गेलें तेव्हां मूर यानें स्वतःच्या बचावासाठीं जी जबानी दिली ती त्याच्या पाशवी वृत्तीवर पांघरूण घालणारी असली तरी, सगळ्या हिंदु स्त्रियांच्या पावित्र्यसंपन्नतेला काळिमा लावणारी होती. चार दोन आण्यांचे पैसे दिसतांच ही बाई आपली इच्छा पूर्ण करण्याला संमति देण्याइतकी अधोगत झालेली होती, असें भर कोर्टांत सांगण्याला मूरला शरम वाटली नाहीं.

यापेक्षां आश्चर्याची गोष्ट अशी कीं, मूरच्या या निरर्गल उद्‌गारांवर विश्वास ठेवणाऱ्या न्यायमूर्तींनीं त्याला निर्दोषी म्हणून सोडून दिलें ! बिचाऱ्या वीरनवालीला

---

[1] सेनापति बापट वाङ्मय : समग्र ग्रंथ : पृ. १७

शीलभ्रष्टतेचा कलंक लागलेलाच होता. पण, त्या शीलभ्रष्टतेला आपली संमति होती असें एका नीच माणसानें जाहीरपणानें म्हणावें, न्यायालयानें त्या गोष्टीवर विश्वास ठेवावा आणि आपल्या शीलावर असे शिंतोडे उडविणाऱ्या इसमाचें पारिपत्य करण्याचें कसलेंहि साधन उपलब्ध असूं नये, या गोष्टीची वीरनवालीच्या मानी मनाला फार चीड आली. सन १९०७ च्या नोव्हेंबर महिन्याच्या सुमारास या स्वाभिमानी स्त्रीनें आपल्यावर झालेल्या अन्यायाची दाद मागण्यासाठीं ईश्वराकडे जाण्याचें ठरविलें व आत्महत्या केली. या बाईचें धैर्य, मूरचा हलकटपणा व ब्रिटिशांच्या न्यायपद्धतींतला पक्षपातीपणा या गोष्टींची चर्चा वृत्तपत्रांतून एकसारखी चालल्यामुळें या सुमारास राजकीय कारणामुळें प्रक्षुब्ध झालेलें लोकमत फारच संतप्त झालेलें होतें.

युरोपांत रशियामध्यें जी क्रांतिकारक प्रवृत्ति उफाळत होती तिचें प्रतिबिंब मधून मधून युरोपांतील इतर देशांतहि पडत होतें. १९०७ च्या ऑगस्ट महिन्याच्या शेवटीं बेलफास्ट येथें घडलेल्या एका प्रकारावरून आयर्लंडमध्यें क्रांतिकारक मनोवृत्ति किती फैलावली आहे, हें उघड झालें. वरिष्ठांनीं कांहींहि हुकूम दिले तरी आम्ही आमच्या देशबांधवांच्या अंगाला हात लावणार नाहीं, असें बेलफास्ट येथील आयरिश पोलिसांनीं स्पष्टपणें सांगितल्यामुळें, शहरांतील शांततेच्या रक्षणासाठीं तेथील सरकारला लष्कर बोलवावें लागलें होतें. आयर्लंडमध्यें घडलेल्या या घटनेचा उल्लेख सावरकर यांनीं 'काळ' अगर 'विहारी' या पत्रांना धाडिलेल्या बातमीपत्रांतून आढळत नाहीं; पण, १९०८ च्या जानेवारी महिन्याच्या शेवटीं पोर्तुगालमध्यें घडलेल्या एका क्षोभजनक क्रांतिकारक घटनेचा ऊहापोह सावरकरांनीं केलेला आढळतो. दि. ३१–१–१९०८ रोजीं लिस्बन शहराच्या भर रस्त्यांत पोर्तुगालचा राजा व राजपुत्र यांच्यावर बाँब फेंकण्यांत आल्यामुळें, ते दोघे जागच्याजागीं गतप्राण झाले. 'विहारी' पत्राच्या दि. १०-२-१९०८ च्या अंकांत या घटनेचा ऊहापोह केलेला आहे. वरवर वाचणाराला सकृद्दर्शनीं असेंहि वाटण्याचा संभव आहे कीं, या प्रकरणावरील तिन्ही स्फुटें सावरकर यांनीं लिहिलेलीं असावींत. सावरकर यांची विचारपद्धति व या स्फुटांची विचारपद्धति यांमध्यें विलक्षण साम्य असलें तरी, हीं स्फुटें सावरकरांचीं नाहींत, हें निःसंशय खरें आहे. त्या वेळीं विलायतचीं पत्रें एअरमेलनें येऊं शकत नसत. १० फेब्रुवारीच्या अंकांत वरील घटनेसंबंधींचा मजकूर प्रसिद्ध झाला, तो सावरकरांनीं लंडनहून लिहून पाठवून नंतर प्रसिद्ध झाला असेल ही गोष्ट शक्यच नाहीं. 'काळ' पत्राच्या दि. २८–२–१९०८ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या 'प्रकाश आणि काळोख' या बातमीपत्रांत सावरकरांनीं पोर्तुगालमधील या क्षोभजनक घटनेचा विस्तारानें ऊहापोह केला आहे. पोर्तुगालच्या राजानें लोकांचे अधिकार मर्यादित करून फ्रँको नांवाच्या प्रधानाच्या हातीं एकतंत्री सत्ता सोंपविली ही गोष्ट लोकांना न रुचल्यामुळें, त्यांच्यापैकीं एकानें राजाचा व राजपुत्राचा वध केला अशी या घटनेची मीमांसा सावरकरांनीं

लाविली आहे. 'पोर्तुगालमध्यें जी गोष्ट घडून आली तिच्या मुळाशीं लोक व लोकशत्रू यांच्या चिरकालीन द्वंद्वाचा संबंध आहे, असें आम्हांस वाटतें,' हें[१] सूचक वाक्य या मीमांसेच्या ओघांत लिहिलें आहे. या विवेचनाच्या भरांत सावरकरांनीं लोकसत्तात्मक राज्यपद्धतीसंबंधीचे विचार व्यक्त केले आहेत, ते लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. या मुद्यासंबंधानें लिहितांना सावरकर म्हणतात :[२]

*लोकसत्तात्मक पद्धति म्हणजे अगदीं निर्दोष अशी सामान्य जनांची समजूत असते. असा सिद्धांत वाटला तर तो चुकीचा होईल. लोकांना—बहुजनसमाजाला—पूर्णपणें कळतें कीं, लोकसत्तापद्धतींतहि दोष आहेत. कारण, निर्दोष पद्धति या दोषमिश्र मानवी स्वभावाच्या व्यवहारांत मिळावयाची नाहीं, हेंहि लोकांना माहीत आहे. असें असल्यानें, अनेक शासनपद्धतींत सगळ्यांत कमी दोषयुक्त पद्धति आजमितीला कोणती आहे हें ठरवून तिचा पुरस्कार करावयाचा, असें सामान्य जनांचें मत त्यांना नेहमीं सांगत असतें.*

बॉंब तयार करण्याची विद्या हस्तगत करून श्री. हेमचंद्रदास बंगाल्यांत परत आल्यावर लवकरच या विद्येचे प्रयोग करण्याचा प्रारंभ झाला, असें Sedition Committee Report[3]मध्यें दिलेल्या माहितीवरून दिसतें. १९०७ च्या ऑक्टोबर महिन्यांत बंगालच्या गव्हर्नरची गाडी रुळावरून पाडण्याचे दोन अयशस्वी प्रयत्न करण्यांत आले. दि. ६-१२-१९०७ रोजीं मिदनापूरजवळ बॉंबचा उपयोग करण्यांत आला व त्यामुळें ले. गव्हर्नरची गाडी रुळावरून पडली. या बॉंबच्या स्फोटामुळें जमिनींत पांच फूट रुंदीचा व पांच फूट खोलीचा खड्डा पडला. दि. २३-१२-१९०७ रोजीं, पूर्वीं डाक्का येथें डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट असलेले मि. ॲलन यांच्यावर डाक्का आणि कलकत्ता यांच्या दरम्यान पिस्तुल झाडण्यांत आलें. पाठीला जखम होऊन मि. ॲलन हे या प्रसंगांतून निभावले. पूर्वीं कलकत्ता येथें चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट असलेले मि. किंग्जफर्ड यांची बिहारमध्यें मुझफरपूर येथें बदली करण्यांत आल्यापासून बंगाली क्रांतिकारकांचा त्यांच्यावर डोळा होता. एका पुस्तकाच्या आंतल्याबाजूला पोकळी बनवून, त्यांत बॉंब ठेवून, तें पार्सल मि. किंग्जफर्ड यांच्याकडे पाठवण्याचा उद्योग बंगाली क्रांतिकारकांनीं १९०८ सालच्या फेब्रुवारी-मार्च महिन्याच्या सुमारास केला असावा. मि. किंग्जफर्ड यांनीं हें पुस्तकांचें पार्सल योग्य वेळीं उघडलेंच नाहीं व त्यामुळें पार्सलांतील वस्तूमुळें होणाऱ्या अपायांतून त्यांची मुक्तता झाली.[४]

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ७५-७६. २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ७५.

3 Pp. 31-32.

4 Sedition Committee Report : p. 32.

बंगालमधील जहाल तरुणांच्या आचाराला हें वळण लागत होतें त्या काळांत मद्रासमधील जहाल तरुणांच्या विचारांचा कडवटपणा व्याख्यानांच्या रूपानें व्यक्त होऊं लागला होता.[१] श्री. सुब्रह्मण्य शिव व श्री. चिदंबरम् पिल्ले यांनीं १९०८ सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या शेवटीं व मार्च महिन्याच्या आरंभीं तुतिकोरीन व तिनेवेल्ली येथें जीं भाषणें केलीं, त्यांच्याबद्दल त्यांच्यावर पुढें खटले भरण्यांत आले व त्यांना शिक्षा देण्यांत आल्या. श्री. सुब्रह्मण्य शिव व श्री. चिदंबरम् पिल्ले हे आपल्या भाषणांतून विदेशी मालावरील बहिष्काराचा व निर्भेळ स्वातंत्र्याचा पुरस्कार करीत असत. दि. १२-३-१९०८ रोजीं या दोघा जहाल पुढाऱ्यांना अटक करण्यांत आल्यावर दुसऱ्या दिवशीं तिनेवेल्ली येथें फार मोठा दंगा झाला. दंगेखोरांनीं सरकारी मालमत्तेचा सर्रास विध्वंस केला, सरकारी इमारतींवर हल्ला केला व त्या इमारतींतील सामानसुमानाची जाळपोळ केली. त्यांनीं कांहीं सरकारी इमारतींना आगहि लावली. १७-३-१९०८ रोजीं कोईमतूर जिल्ह्यांत कारूर येथें श्री. कृष्णस्वामी यांनीं एक भाषण केलें. तिनेवेल्ली येथें घडलेल्या गोष्टींचा प्रशंसापूर्वक उल्लेख करून त्यांनीं आपल्या श्रोत्यांना तसें करण्यास सांगितलें. कारूर येथें एक लहानशी पलटण होती. या पलटणींतील लोकांनीं इंग्रजांना मारून मातृभूमीची सेवा कां करूं नये, असा प्रश्न विचारण्यापर्यंतची मजल श्री. कृष्णस्वामी यांनीं मारली. या गृहस्थांनाहि श्री. चिदंबरम् पिल्ले व श्री. सुब्रह्मण्य शिव यांच्याप्रमाणेंच पुढें शिक्षा सांगण्यांत आली. ब्रह्मबांधव उपाध्याय यांचा मृत्यु, श्री. चिदंबरम् पिल्ले यांचें प्रकरण वगैरे घटनांकडे सावरकर स्वाभिमान वृत्तीनें पहात होते 'हें लंडनचीं बातमीपत्रें' या पुस्तकांतील कांहीं वाक्यांवरून[२] उघड होत आहे.

१९०८ च्या मार्च-एप्रिलच्या सुमारास सावरकरांचें ग्रंथलेखनाचें कार्य पूर्ण झालें असावें. १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाचा साधार इतिहास लिहिण्याचा उद्योग त्यांनीं १९०६ सालच्या सप्टेंबर-ऑक्टोबरपासून सुरू केला होता. या ग्रंथाच्या लेखनासाठीं अवश्य असणाऱ्या ग्रंथांचें परिशीलन करण्याच्या कामीं व या ग्रंथांतून मिळालेल्या महत्त्वाच्या माहितीचीं टांचणें-टिपणें करण्याच्या कामीं सावरकर यांनीं नऊदहा महिने तरी सहज घालविले असले पाहिजेत. इतका काळ अध्ययनांत घालविल्यावर या ग्रंथाचें प्रत्यक्ष लेखन त्यांनीं सुरू केलें असलें पाहिजे. हा ग्रंथ मराठींत लिहिण्याचें काम सावरकर करीत होते त्याच अवधींत, त्यांच्या भोंवतालची कांहीं मंडळी, सावरकरांनीं जमविलेल्या माहितीच्या आधारें आपले लहानलहान ग्रंथ सजवीत होती, असें दिसतें. डॉ. राजन् यांनीं तामीळ भाषेंत 'राणी लक्ष्मीबाईचें चरित्र' लिहिलें[३] तें या कालांतच लिहिलें गेलें असावें.

---

१ Sedition Committee Report : P. 163 २ पृ. ८७.

३ व्ही. व्ही. एस्. अय्यर यांचे चरित्रलेखक स्वामी शुद्धानंद भारतियार यांनीं धाडलेली माहिती.

बंगालमधील क्रांतिकारकांनीं बाँबचा उपयोग करण्याचे जे उद्योग चालविले होते ते यापूर्वी प्रत्यक्षतः प्राणघातक ठरले नव्हते. दि. ११-४-१९०८ रोजीं चंद्र-नगरच्या मेयरच्या घरांत फेंकण्यात आलेला बाँब देखील प्राणघातक ठरूं शकला नव्हता. पण, मुझफरपूर येथें गुरुवार दि. ३०-४-१९०८ रोजीं फेंकण्यांत आलेला बाँब अखेरीस प्राणघातक ठरला; व त्यामुळें, स्वातंत्र्यप्राप्तीचें साधन म्हणून उपयोगांत येत असलेल्या या नव्या साधनाकडे व तें साधन वापरणाऱ्या हिंदी क्रांतिकारकांकडे सारें जग टवकारून पाहूं लागलें. मुझफरपूर येथें पडलेला बाँब तेथील डिस्ट्रिक्ट मॅजिस्टेट मि. किंग्जफर्ड यांच्यावर म्हणून फेंकण्यांत आलेला होता. तो रात्रीं साडेआठ वाजण्याच्या सुमारास फेंकण्यांत आला. मिसेस केनेडी व त्यांची मुलगी अशा दोघीजणी क्लबमधून घरीं परत जात असतांना त्यांची गाडी मि. किंग्जफर्ड यांच्या बंगल्यासमोर आली, त्या वेळीं हा बाँब फेंकण्यांत आला. या गाडीचें मि. किंग्जफर्ड यांच्या गाडीशीं विलक्षण साम्य असल्यामुळें, बाँबचा तडाखा मि. किंग्जफर्ड यांना न बसतां तो या दोन स्त्रियांना बसला. मिसेस केनेडी या जागच्या जागीं गतप्राण झाल्या व त्यांची मुलगी कांहीं वेळानंतर मरण पावली. बाँबचा स्फोट झाल्यानंतर त्याचा आवाज तीन मैलपर्यंत ऐकूं गेला !

मुझफरपूर येथें घडलेल्या या प्रकारानंतर मुझफरपूरपासून २४ मैल अंतरावर असलेल्या एका रेल्वे स्टेशनवर खुदीराम बसू या बंगाली तरुणाला अटक करण्यांत आली. या तरुणाचें वय १८-१९ वर्षांचें होतें. आपण व आपला मित्र दिनेशचंद्र[1] यांनीं मुझफरपूर येथील प्रकार केला, असें खुदीरामनें कबूल केलें. बाँब फेंकल्यावर खुदीराम व दिनेशचंद्र हे वेगवेगळ्या दिशेनें पळत सुटले. हा प्रकार केल्यावर खुदीराम रातोरात चोवीस मैल अंतर तोडून गेला ! दिनेशचंद्र याला पकडण्यांत आल्यावर तो पोलिसच्या हातांतून निसटला व जवळचें पिस्तुल स्वतःवर झाडून घेऊन त्यानें आत्महत्या केली. या प्रकारामुळें घाबरून गेलेल्या किंग्जफर्ड साहेबांना मुझफरपूर येथें राहणेंहि धोक्याचें वाटूं लागलें. त्यामुळें ते तत्काळ मसुरी येथें हवा पालटण्यासाठीं निघून गेले !

मुझफरपूर येथें झालेल्या या प्रकारानंतर पोलिसतपासाचें चक्र सुरू झालें. दि. २-५-१९०८ रोजीं त्यांनीं कलकत्ता येथील माणिकतोळा बागेंतल्या चौतीस तरुणांना पकडलें. या तरुणांत बारींद्रकुमार घोष, उपेंद्रनाथ बानर्जी, हेमचंद्र दास, इंदुभूषण राय चौधरी, विभूतिभूषण सरकारप्रभृति मंडळी होती. पोलिसांनीं माणिकतोळा येथील बागेंत कसून झडती घेतली तेव्हां त्यांना तेथें एक ग्रंथालय आढळलें. ज्वालाग्राही पदार्थ तयार करण्याच्या कृतींचीं अनेक पुस्तकें या ग्रंथालयांत ठेवलेलीं होतीं. लिस्बन येथें जानेवारीच्या अखेरीस राजाचा व राजपुत्राचा खून झाला तेव्हां जे बाँब-

---

१ प्रफुल्लचंद्र चाकी हें या तरुणाचें खरें नांव.

गोळे वापरण्यांत आले होते त्यांचीं वर्णनें व चित्रें असलेले वर्तमानपत्रांचे अंकहि या ग्रंथालयांत सांपडले. श्री. अरविंद घोष यांनाहि अटक करण्यांत आली.

हिंदुस्थानांत या घटना घडत होत्या त्या वेळीं 'इंडिया हाउस' मधील सावरकरप्रभृति तरुण १० मेचा दिवस मोठ्या थाटानें साजरा करण्याची तयारी करण्यांत गुंतले होते. मेच्या पहिल्या आठवड्यांत या मंडळींनीं लंडन येथें पहिला श्रीशिवोत्सव साजरा केला. 'फ्री इंडिया सोसायटी' तर्फे साजरा करण्यांत आलेला हा शिवोत्सव[1] शनिवार दि. २-५-१९०८ रोजीं साजरा झाला असावा. या उत्सवांत भाग घेणाऱ्या मंडळींत श्री. येरुळकर हे यहुदी गृहस्थ, श्री. मास्टर हे पारशी गृहस्थ वगैरे भिन्नधर्मी मंडळी होती. या उत्सवाची खटपट करणाऱ्या मंडळींत नागपुरचे श्री. देशमुख व मद्रासचे श्री. रत्नभू हे प्रमुख होते.[2] या प्रसंगीं श्री. व्ही. व्ही. एस. अय्यर यांचें मुख्य वक्ते म्हणून भाषण झालें, श्री. अय्यर यांनीं या प्रसंगीं व्यक्त केलेल्या विचारांचा गोषवारा 'लंडनचीं बातमीपत्रें' या पुस्तकांत पुढीलप्रमाणें देण्यांत आलेला आहे.[3]

*शिवाजीसारख्या विभूतींचे जन्म म्हणजे आमची आर्यजाति अजून वेद कालाइतकीच व जरूर तर त्याहूनहि जास्त चैतन्यानें युक्त आहे असें प्रथित करणारी गर्जना होय. जो शिवाजी त्या वेळेस मुसलमानांविरुद्ध लढला तोच शिवाजी न्यायी मुसलमानांच्या वतीनें लढला असता. कारण, शिवाजीचें लढणें हें विशिष्ट जाती विरुद्ध नसून तें अन्यायाविरुद्ध आहे, तें दास्याविरुद्ध आहे, तें गुलामगिरीविरुद्ध आहे. ज्या मराठी भात्यांतून हा बाण निघाला त्याच मराठी भात्यांतून आणखी असले बाण कधीं निघतील म्हणून आम्ही सर्व हिंदुस्थानवासी शिवाजीच्या महाराष्ट्रभूमीकडे अपेक्षाविव्हलतेनें पहात आहों.*

सावरकर हे या सभेचे अध्यक्ष होते. शिवचरित्राच्या रम्य कथा व त्याचा बोध यांचें श्रोतृसमाजास तल्लीन करणारें कथन त्यांनीं केल्यानंतर शिवजयघोषांत व स्वातंत्र्यलक्ष्मीच्या जयनादांत ही सभा बरखास्त झाली.[4]

दि. १०-५-१९०८ रोजीं सत्तावनच्या स्वातंत्र्ययुद्धाचा वाढदिवस साजरा करण्याची कल्पना सावरकर यांच्या मनांत एप्रिल महिन्यांतच केव्हां तरी निश्चित ठरली असली पाहिजे. लंडन येथील श्रीशिवोत्सव दि. २ मे रोजीं साजरा झाला असला पाहिजे हें वर सांगण्यांत आलेंच आहे. या शिवोत्सवाची हकीकत लिहून ती सावरकरांनीं 'काळ' पत्राकडे व 'विहारी' कडे धाडली. 'काळ' पत्रांत ही हकी-

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ७८. २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ७९.
३ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ७९. ४ विहारी : २५ मे १९०८.

कत दि. २९-५-१९०८ रोजीं प्रसिद्ध झाली व ‘ विहारीं ’त ती दि. २५-५-१९०८ रोजीं प्रसिद्ध झाली. १० मे चा उत्सव टोलेजंग होणार असल्याची बातमी या दोन्ही पत्रांतून आगाऊच देण्यांत आलेली होती. तीन अगर चार मे रोजीं लिहिण्यांत आलेल्या ‘ काळ ’ च्या बातमीपत्रांत सदर उत्सवाची छापील आमंत्रणपत्रिका व कार्यक्रमपत्रिकाहि दिलेली आहे. यावरून असें दिसतें कीं, एप्रिल अखेरीलाच ही आमंत्रणपत्रिका व कार्यक्रमपत्रिका छापून तयार झालेली होती व ती ब्रिटनमध्ये भिन्न-भिन्न विद्यार्जनकेंद्रांत रहाणाऱ्या विद्यार्थ्यांकडे रवाना करण्यांत आलेली होती. ही आमंत्रणपत्रिका व कार्यक्रमपत्रिका पुढीलप्रमाणें आहे :

*BANDE MATARAM.

To commemorate
The Anniversary of the

**INDIAN NATIONAL RISING OF**
1857

A
Meeting of Indians in England will be held
at India House, 65 Cromwell Avenue, Highgate N.
ON
Sunday, the 10 th, of May, 1908,
at 4 p.m. precisely.
You and all your friends are cordially invited to be present.

**Programme**

1 National Song, 2. National prayer, 3. Tributes to the sacred memory of Emperor Bahadur Shaha, Shrimant Nana Saheb, Rani Lakshmibai, Maulavi Ahmad Shah, Raja Kuvar Sing and other Martyrs, 4. Declaration of Self-denial, 5. president's speech, 6 Distribution of prasad, 7. National songs.

---

* वंदे मातरम् ।

१८५७ च्या भारतीय राष्टीय उत्थानाचा
वर्षदिन साजरा करण्यासाठीं

रविवार दि. १० मे १९०८ रोजीं दुपारीं बरोबर ४ वाजतां
‘इंडिया हाऊस’ ६५ क्रॉमवेल एव्हेन्यू हायगेट नॉर्थ या ठिकाणीं
इंग्लडमधील भारतीयांची सभा होईल.
आपण आपल्या भारतीय मित्रांसह या प्रसगीं उपस्थित
रहावें, अशी हार्दिक विनंति आहे.

**कार्यक्रम**

(१) राष्ट्रगीत; (२) राष्ट्रीय प्रार्थना; (३) बादशहा बहादूरशहा, श्रीमंत नाना-साहेब, राणी लक्ष्मीबाई, मौलवी अहमदशहा, राजा कुंवरसिंग इत्यादि हुतात्म्यांच्या पावन स्मृतीला वंदन; (४) तपस्येची घोषणा; (५) अध्यक्षीय भाषण; (६) प्रसाद, (७) राष्ट्रगीतें.

सावरकर व त्यांच्या प्रभावळींतील मंडळी यांनीं हा समारंभ अशा प्रमाणावर साजरा करण्याचें ठरविलें याचें कारण 'लंडनचीं बातमीपत्रें' या पुस्तकांत सांगण्यांत आलेलें आहे.[१] या सुमारास इंग्लंडच्या रंगभूमीवर 'बंडाचें नाटक' या नांवाचा एक प्रयोग करण्यांत येत असे. या प्रयोगांत आरंभीं बंडवाल्यांच्या गुप्त सभा दाखविल्या जात असत. 'फिरंग्यांना हिंदुस्थानांतून हुसकून द्या' या उपदेशानें बंडाचा प्रारंभ झाल्याचें व बंडवाल्यांनीं बहादुरशहाच्या मस्तकावर मुकुट ठेविल्याचें दृश्यहि या प्रयोगांत दाखविलें जात असे. कानपुरची कत्तल, बंडवाल्यानीं फिरंग्यांचा केलेला पाठलाग व नाश, स्वतंत्र हिंदुस्थानच्या निशाणासह बंडवाल्यांनीं काढलेल्या मिरवणुकी, इत्यादि दृश्येंहि रंगभूमिवर दाखविण्यांत येत असत. हीं दृश्यें दिसतांच संतापाच्या आरोळया ठोकूं लागणारे इंग्रज प्रेक्षक प्रयोगाच्या शेवटीं आनंदानें टाळ्यांचा गजर करीत असत; कारण, अनेक लढाया होऊन बंडवाले पाडाव झाल्याचें व त्यांना तोफेच्या तोंडीं दिल्याचें दृश्य प्रयोगाच्या शेवटीं रंगभूमीवर दिसत असे. इंग्लिश जनतेच्या मनावर अशा प्रयोगामुळें घडणाऱ्या परिणामाला कांहीं तरी उतारा मिळणें अवश्य आहे, अशा कल्पनेनें सावरकरप्रभृति हिंदी तरुणांनीं खुद्द लंडन शहरांतच हा समारंभ भव्य प्रमाणावर साजरा करण्याचें ठरविलें. समारंभ साजरा होण्याचा दिवस उगवण्याच्या सुमारास हिंदुस्थानांत रामहर्षण घटना घडल्याचें वृत्त ऐकूं आलें; त्यामुळें हा समारंभ साजरा करणाऱ्या तरुणांचा मूळचा उत्साह वृद्धिंगत झाला असेल, हें अगदीं शक्य आहे. या समारंभाचें अध्यक्षस्थान दे. भ. राणा, यांना देण्यांत आलें होतें, व राणाजी या कार्यासाठीं मुद्दाम पॅरिसहून लंडनला आले होते. कामाबाई या प्रसंगीं पॅरिसहून येऊं शकल्या नाहींत; पण, त्यांनीं राणाजींबरोबर लेखी संदेश धाडिला होता. हा संदेश समारंभाच्या वेळीं जाहीरपणें वाचण्यांत आला. कामाबाईनीं धाडिलेला हा संदेश पुढीलप्रमाणें[२] होता.

Youths of India, you stand between the past and the future. Work up the cause for the principles though it may be our destiny not to reach the promised land, but only to hail it in, dying and from afar off. Remember, freedom is a conquest and never a bequest. Open your eyes! I beseech you to open your eyes! Listen the cry of millions eager to advance! Glory be to those patriotic men who are suffering martyrdom in the motherland. We cannot help feeling for these brave men who have put their all in all, their very life, on the altar of Mother.

(भारतीय तरुणांनो, भूत व भविष्यें यांच्या संधिकालापाशीं तुम्ही उभे आहां. तत्त्वप्रेमानें प्रेरित होऊन तुम्ही भारतीय स्वातंत्र्यपक्षाच्या उत्कर्षासाठीं झटा. ध्येय हस्तगत झालेलें पाहीपर्यंत जगण्याचें भाग्य कदाचित् आपल्याला लाभणार नाहीं; दुरून दिसणारें ध्येय मरतांमरतां पहावें आणि त्याचें स्वागत करावें एवढेंच कदाचित् आपल्या भाग्यांत लिहिलेलें असेल! स्वातंत्र्य शक्तीनें मिळवावें लागतें; तें देणगी म्हणून मिळत

१ पृ. ७९-८०. २ विहारी : ८ जून १९०८.

रसतें, हें लक्षांत ठेवा. डोळे उघडा, डोळे उघडा अशी माझी तुम्हांला विनंति आहे. ध्येयाच्या दिशेनें प्रगति करण्यासाठीं उत्सुक झालेल्या लक्षावधि लोकांचा शब्द ऐका!' स्वदेशांत ज्या देशभक्तांनीं हौतात्म्य पतकरलें आहे ते धन्य होत! मातृभूमीच्या स्थंडिलावर या शूर बांधवांनीं आपल्या सर्वस्वाचें—आपल्या प्राणांचें—बलिदान केलेलें आहे. त्यांच्याविषयीं तळमळ वाटल्याशिवाय आपल्याला कसें रहावेल ? )

या समारंभासाठीं इंग्लंडांत असलेले शेंकडों हिंदी विद्यार्थी व इतर नागरिक गोळा झाले होते. या समारंभाची जागा कोणत्या पद्धतीनें शृंगारण्यांत आली होती याचें सावरकरांनीं केलेलें वर्णन[१] पुढीलप्रमाणें आहे :

*'इंडिया हाऊस'चा हॉल या कार्याकरितां फारच सुंदर रीतीनें शृंगारलेला होता. श्रोतृसमाजाच्या समोरील बाजूला एक भव्य रक्तवस्त्र लावलेलें असून त्यावर पुष्पमालांच्या पंक्ती गुंफिलेल्या होत्या व त्या नानाविध रंगांच्या पुष्पमंडपांत, अर्धा फूट जाडीच्या अक्षरांनीं सोनेरी, हिरव्या, श्वेत व गुलाबी रंगांत राजा बहादूरशहा, श्रीमंत नानासाहेब, राणी लक्ष्मीबाई, मौलवी अहमदशहा, राजा कुंवरसिंग व १८५७ सालीं झुंजलेले आणखी कांहीं योद्धे या सर्वांचीं नांवें अभिनंदनार्थ स्मरण म्हणून कोरून लिहिण्यांत आलेलीं होतीं. या भव्य स्मृतिपटाचे भोंवतीं निरनिराळ्या देशभक्तांच्या तसबिरीहि लावलेल्या असून, त्या हॉलमध्यें मनोहर पुष्पांच्या लहान झाडांच्या कुंड्या सर्वत्र खुल्या ठेवलेल्या होत्या. उदबत्त्यांच्या सुवासाचा एकच दाट परिमळ येऊन, पेटीच्या सुस्वर स्वरांनीं व दे. भ. वर्मा यांच्या राष्ट्रगीतगायनानें सर्वत्र उदात्त स्फूर्तीचा संचार झाला होता.*

१० मे च्या ८-१० दिवस पूर्वींपासून लंडनमध्यें मोहल्यामोहल्यांतून हिंदी लोकांच्या लहानलहान सभा भरून व 'सत्तावन' च्या क्रांतियुद्धाचें स्वरूप लोकांना समजावून देऊन, हिंदी तरुणांनीं या उत्सवाची पूर्वतयारी चांगल्या प्रकारें केली होती. त्यामुळें, उत्सवाच्या दिवशीं 'इंडिया हाउस' मध्यें हिंदी स्त्री-पुरुषांचा फार मोठा जमाव गोळा झाला होता. लंडन, ऑक्स्फर्ड, केंब्रिज, सायरेन्स्टर, रीडिंग वगैरे सर्व ठिकाणीं राहणारे हिंदी विद्यार्थी या प्रसंगीं गोळा झाले होते. गर्दीमुळें सभास्थान अपुरें पडलें व लोकांना रस्त्यांवरहि उभें राहावें लागलें. आरंभीं श्री. अय्यर यांनीं राष्ट्रीय प्रार्थना म्हटली. सावरकर यांनीं बहादूरशहा व नानासाहेब पेशवे, यांच्या स्मृतिगौरवार्थ भाषण केलें व 'सत्तावन'च्या घटनांचें सत्य स्वरूप त्यांनीं लोकांना विशद करून सांगितलें. या वेळीं सर्व समाज उभा राहिला व 'सत्तावन'च्या त्या शहीदांच्या गौरवास्तव लोकांनीं त्रिवार कृतज्ञतापूर्वक जयघोष केला; दे. भ. खान, यांनीं राजा कुंवरसिंग यांच्या स्मृतीचा गौरव केला; दे. भ. दास, यांनीं राणी लक्ष्मीबाईचा

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ८२

स्मृतिगौरव केला; दे. भ. मास्टर, दे. भ. येरुळकर, व दे. भ. रायपेन (ख्रिश्चन) इत्यादि वक्त्यांनीं 'सत्तावन'च्या क्रांतियुद्धांतील इतर देशवीरांच्या स्मृतीचा गौरव केला. दे. भ. राणा, यांनीं कामाबाईचा संदेश वाचून दाखविला व समारोपाचें भाषण केलें. कामाबाईनीं राणाजींच्या बरोबर पंचाहत्तर रुपये धाडिले होते. 'सत्तावन'च्या युद्धांतील देशवीरांच्या स्मृतीसाठीं निघणाऱ्या निधीसाठीं म्हणून त्यांनीं ही रक्कम पाठविली होती, कामाबाईची ही देणगी जाहीर केल्यावर राणाजींनीं आपलें मे महिन्याचें सर्व उत्पन्न या निधीला अर्पण केल्याचें सांगितलें. यानंतर १० मे ते १० जूनपर्यंत पाळण्यांत यावयाच्या तपस्यामासांतील शपथा घेण्यांत आल्या. कोणी महिनाभर उपास करण्याचें जाहीर केलें, कोणी मद्यपान सोडण्याचें जाहीर केलें, कोणी धूम्रपान सोडण्याचें जाहीर केलें आणि कोणी नाटक—सिनेमा न पाहण्याचें जाहीर केलें! अशा रीतीनें वांचलेला सर्व पैसा या निधीसाठीं देण्याच्या शपथा लोकांनीं घेतल्या. सभास्थानीं जमलेल्या सर्व लोकांनीं, या प्रसंगीं मुद्दाम काढण्यांत आलेल्या वीरस्मृतिमुद्रा धारण केल्या होत्या. या मुद्रा तपस्यामासांत सतत पोषाखावर धारण करावयाच्या असा संकेत या सभेंत ठरला. या शपथविधीनंतर मिसेस दत्त या विदुषीनें राष्ट्रगीतें गाइलीं. १८५७ च्या क्रांतियुद्धांत क्रांतीचा गूढ संदेश देशाच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत पोंचविण्याचें कार्य चपात्यांनीं केलें होतें. या गोष्टीचें स्मरण म्हणून, या प्रसंगीं प्रसादादाखल चपात्या वांटण्यांत आल्या.[१] या प्रसंगासाठीं मुद्दाम लिहिण्यांत आलेलें व छापून घेण्यांत आलेलें Oh Martyrs! (हे हुतात्म्यांनो) हें पत्रक या प्रसंगीं वांटण्यांत आलें. हें पत्रक व Grave Warning[२] या नांवाचें दुसरें पत्रक हीं 'इंडिया हाउस' मध्यें येणाऱ्या लोकांना यानंतर मोफत देण्यांत येत असत असें विधान Sedition committee Report[३] मध्यें करण्यांत आलेलें आहे. OH Martyrs हें पत्रक पुढीलप्रमाणें आहे :

---

1 Indian War of Independence by Savarkar · part I pp. 86—7: आगामी क्रांतीचा संदेश पसरविण्यासाठीं चपात्यांचा उपयोग करण्याचा पद्धत १८५७ पूर्वीं वेलोरच्या बंडाच्या वेळीं उपयोगांत आणण्यांत आलेली होती. १८५७ सालीं कांहीं इंग्रजांना इतस्ततः पसरणाऱ्या या चपात्यांचा संशय आला. कांहीं इंग्रजानीं या चपात्यांचा भुगा केला! त्यांनीं आपलें डोकें खूप खाजवलें; पण, चपात्यांचा अर्थ त्यांना उलगडला नाहीं. खेडयांत आलेल्या चपात्या प्रसाद म्हणून गावभर वाटावयाच्या; हा प्रसाद भक्षण करणाऱ्यांनीं मनोमन क्रांतीची शपथ घ्यावयची व आल्या तितक्या नव्या चपात्या बनवून त्या पुढील गांवाच्या चौकीदाराकडे पाठवावयाच्या, असा संकेत १८५७ सालीं पाळण्यांत आला होता.

२ व्यापाराच्या क्षेत्रांत जर्मनी हा इंग्लंडचा जबरदस्त प्रतिस्पर्धी असल्यामुळें इंग्लंडची पत कमी होत चालली आहे हें 'गंभीर इषारा' या पत्रकांत दिग्दर्शित करण्यांत आलें होतें. हिंदी लोकांनीं आपले पैसे व सोनेंनाणें इंग्रजांच्या बँकांतून ठेविले तर त्यांच्या हातीं अखेरीस कागदाच्या चिठोऱ्याशिवाय कांहीं राहणार नाहीं असा इषारा या पत्रकाच्या द्वारा देण्यांत आला होता.

३ Page 8

OH MARTYRS !!

The battle of freedom once begun
And handed down from sire to son
Though often lost is ever won !!

*Today is the 10th of may ! It was on this day, that in the ever memorable year of 1857, the first campaign of the war of Independence was opened by you, oh Martyrs, on the battlefields of India. The Mother-land, awakened to the sense of her degrading slavery, unsheathed her sword burst forth the shackles and struck the first blow for her liberty and for her honour. It was on this day that the war-cry 'Maro Firungee Ko !' was raised by the throats of thousands. It was on this day that the sepoys of Meerut having risen in a terrible uprising, marched down to Delhi, saw the waters of the Jumna glittering in the sunshine caught one of those historical moments which close past epoch to introduce a new one, and " had found, in a moment, a leader, a flag, and a cause, and converted the mutiny into a national and a religious war "1

All honour be to you, oh Martyrs; for it was for the preservation of the honour of the race that you performed the fiery ordeal of a revolution when the religions of the land were threatened with a forcible and sinister conversion, when the hypocrite threw off his friendly garb and stood up into the naked heinousness of a perfidious foe breaking treaties, smashing crowns, forging chains and mocking all the while our merciful moth-

* गोषवारा

आज १०मे हा दिनांक आहे. हुतात्म्यांनो ! भारताच्या रणांगणावर तुम्ही स्वातंत्र्य संग्रामांतील पहिली मोहीम सुरू केली तीं १८५७ या नित्यस्मरणीय वर्षी याच दिवशीं सुरू केली. आपल्या या मातृभूमीला ज्या दास्यामुळें अवकळा आलेली होती त्या दास्याची जाणीव निर्माण झाल्यामुळें, मायदेशानें त्या दिवशीं आपलें खड्ग म्यानांतून बाहेर काढलें, त्यानें आपल्या शृंखला ताडकन् तोडून टाकल्या आणि स्वातंत्र्य व स्वाभिमान यांच्या प्रीत्यर्थ त्यानें पहिला घाव घातला. सहस्रावधि लोकांच्या कंठांतून "मारो फिरंगी को" हा रणनाद निघाला तो याच दिवशीं निघाला. मीरत येथील सैनिक उठावणी करून, भीषण उत्थानाच्या उत्साहानें दिल्लीकडे निघाले. सूर्यप्रकाशांत चमकणारें यमुनाजल त्यांनीं पाहिलें. जुना मनु व नवा मनु यांच्या संधिकालावर उभा असलेला ऐतिहासिक क्षण नेमका हेरून एका क्षणांत त्यांनीं आपला नेता, आपला ध्वज व आपला पक्ष यांची निश्चिति केली आणि त्यांनीं बंडाला राष्ट्रसंग्रामाचें व धर्मसंग्रामाचें स्वरूप प्राप्त करून दिलें—तें सर्व याच दिवशीं घडलें.

हुतात्म्यांनो ! तुम्हांला सर्व प्रकारें धन्यवाद आहेत. क्रांतीच्या जळत्या दिव्यांतून जाण्याला तुम्ही सिद्ध झालांत ते आपल्या वंशाचा स्वाभिमान टिकावा म्हणून झालांत. सत्तेनें व दुष्टाव्यानें चाललेल्या धर्मांतरांच्या संकटांत आपल्या या देशांतील धर्म सांपडले होते. ढोंगी परस्थांनीं मैत्रीचा बुरखा फेकून दिला होता. विश्वासघातकी शत्रूच्या नीच स्वरूपांत उघडउघड पुढें सरून या परस्थ लोकांनीं तहनामे मोडण्याची, राज-

1 Justice Mc Carthy, " History of Our Own Times " Vol. III

er for the very honesty with which she believed the pretensions of the white liar, then you, oh martyrs of 1857 awoke the mother, inspired the mother, and for the Honour of the mother, rushed to the battlefield terrible and tremendous with the warcry "Maro Firungee Ko" on your lips, and with the sacred mantra God and Hindustan on your banner! Well did you do in rising! For otherwise, although your blood might have been spared, yet the stigma of servility would have been the deeper, one more link would have been added to the cursed chain of demoralising patience, and the world would have again contemptuously pointed to our nation saying "She deserves slavery, she is happy in slavery! 'For, even in 1857, she did not raise even a finger to protect her interest and her honour!'

This day, therefore, we dedicate, oh Martyrs, to your inspiring memory! It was on this day that you raised a new flag to be upheld, you uttered a mission to be fulfilled, you saw a vision to be realized, you proclaimed a nation to be born!

We take up your cry, we revere your flag, we are determined to continue that fiery mission of "away with the foreigner!" which you uttered, amidst the prophetic thunderings of the Revolutionary war-

---

मुकुटांचा भंग करण्याची, परदास्याच्या शृंखला जखडविण्याची आणि आपल्या या कृपाळू मायदेशाला खिजविण्याची सुरवात केली होती. आणि हें खिजविणें कशासाठीं चाललें होतें? असत्यभाषी गोऱ्या लोकांच्या गप्पांवर प्रामाणिकपणे विश्वास ठेवला यासाठीं तें चाललें होतें. १८५७ च्या हुतात्म्यांनो! अशा समयीं तुम्हीं देशमातेला जागृत केलेंत, तिला उत्स्फूर्त केलेंत आणि तिच्या स्वाभिमान रक्षणार्थ तुम्ही समरांगण गांठलेंत. 'मारो फिरंगी को' हा रणनाद उच्चारीत आणि 'भगवान् आणि भारतवर्ष ह्या ब्रीदवाक्यानें अंकित असलेला ध्वज हातीं धरीत तुम्ही रणावेशानें निघालांत तेव्हां तुम्ही शत्रूला कसे भयंकर आणि प्रचंड दिसले असाल! तुम्हीं अशा रीतीनें उठलांत हें फार चांगलें झालें! तुम्हीं असें केलें नसतें तर तुमचा जीव बचावला असता हें खरें; पण त्यामुळें दास्याचें लांछन मात्र जास्त वज्रलेप झालें असतें, मनाची उभारी नाहींशी करणाऱ्या सहनशीलपणामुळें शृंखलेचा एक पाश मात्र अधिक घट्ट झाला असता आणि जगानें आपल्या देशाकडे तुच्छतेनें बोट दाखवून म्हटलें असतें, "दास्यांत राहण्याच्या लायकीचाच हा देश आहे, गुलामगिरींत तो सुख मानीत आहे; आपल्या हिताच्या रक्षणासाठीं व मानाच्या रक्षणासाठीं या देशानें १८५७ सालीं सुद्धां काडीचीहि हालचाल केली नाहीं."

हुतात्म्यांनो! याच कारणांसाठीं आजचा हा दिवस तुमच्या स्फूर्तिदायक स्मृतीचा दिवस म्हणून आम्हीं साजरा करीत आहोंत. जो सतत फडकत रहावा, असा ध्वज तुम्ही या दिवशीं उभारलात; ज्याच्या पूर्तींत धन्यता वाटावी अशा ध्येयाचा उच्चार तुम्हीं या दिवशीं केलांत; जें स्वप्न सत्यसृष्टींत उतरण्यांत धन्यता वाटावी असें स्वप्न तुम्हीं या दिवशीं पाहिलेंत; राष्ट्र म्हणून आपण अवतीर्ण होत आहों हें सत्य तुम्हीं या दिवशीं उद्घोषित केलेंत.

तुम्हीं केलेल्या घोषणेचा आम्हीं स्वीकार करतों; तुम्हीं उभारलेल्या ध्वजाचा आम्हीं सन्मान करतों. क्रांतियुद्धाच्या धुमश्चक्रींत तुम्हीं 'मारो फिरंगी को' हे प्रेषिताला

Revolutionary, yes, it was a Revolutionary war. For the war of 1857 shall not cease till the revolution arrives, striking slavery into dust, elevating liberty to the throne. Whenever a people rises for its freedom, whenever that seed of liberty gets germinated in the blood of its fathers, whenever that seed of liberty gets germinated in the blood of its martyrs, and whenever there remains at least one true son to avenge that blood of his fathers, there never can be an end to such a war as this. No, a Revolutionary ward knows no truce, save liberty or death! We, inspired by your memory determine to continue the struggle you began in 1857, we refuse to acknowledge the armistice as a truce; we look upon the battles you fought as the battles of the first campaign—the defeat of which cannot be the defeat of the war. What ? Shall the world say that India has accepted the defeat as the final one ? That the blood of 1857 was shed in vain ? That the sons of Ind betray their fathers' vows ? No, by Hindustan No! The historical continuity of the Indian nation is not cut off. The war began on the 10th May of 1857 is not over on the 10th of May 1908 nor shall it ever cease till a 10th of May to come sees the destiny accomplished, sees the beautiful Ind crowned, either with the lustre of victory or with the halo of martyrdom!

---

शोभतील असे शब्द उच्चारून जें दाहक कार्य निश्चित केलेंत तें पुढें चालविण्याचा आमचा निर्धार आहे. तुम्हीं केलेल्या युद्धाला क्रांतियुद्ध म्हटलें तें अगदीं बरोबर आहे. तो १८५७ चा संग्राम ! क्रांतीच्या आगमनापर्यंत तो थांबणार नाहीं. क्रांतीचा समय आला कीं गुलामगिरी धुळीस मिळेल आणि स्वातंत्र्य सिंहासनाधिष्ठित होईल. जेव्हां जेव्हां राष्ट्र स्वातंत्र्यार्थ उठतें, जेव्हां जेव्हां स्वातंत्र्यकल्पनेचें बीज त्या राष्ट्रांतल्या व्यक्तींच्या रोमरोमांत भिनतें, जेव्हां जेव्हां हें बीज त्या राष्ट्रांतील हुतात्म्यांच्या रक्तांत रुजतें आणि जेव्हां जेव्हां पूर्वजांवर झालेल्या अन्यायाचा सूड घेण्यासाठीं तळमळणारा एक तरी सुपुत्र त्या राष्ट्रांत शिल्लक असतो, तेव्हां तेव्हां स्वातंत्र्ययुद्धाचें सातत्य टिकलेलेंच असतें. क्रांतियुद्ध सुरू झालें कीं, स्वातंत्र्य अगर मृत्यू यांच्या द्वारा तें विराम पावतें. तुमच्या स्फूर्तीनें उत्फूर्त झालेले आम्हीं, १८५७ सालीं तुम्हीं चालू केलेला संग्राम पुढें चालू ठेवण्याचा निश्चय करतों. सध्यां लढाई थांबलेली असली तरी, तह होत आहे या गोष्टीला आम्ही मान्यता देत नाहीं. तुम्हीं ज्या लढाया खेळलांत त्या आपल्या स्वातंत्र्यसंग्रामांतल्या पहिल्या मोहिमेंतल्या लढाया होत्या, असें आम्हीं समजतों. त्या लढायांतील पराभव म्हणजे या संग्रामांतील अखेरचा पराभव नव्हे. भारतवर्ष कायमचा पराभूत झाला असें जगानें म्हणावें कीं काय ? १८५७ सालीं सांडलेलें रक्त व्यर्थ सांडलें असें जगानें मानावयाचें कीं काय? पूर्वजांनीं केलेल्या प्रतिज्ञांना भारतपुत्रांनीं हरताळ फासला असा ग्रह जगानें करावयाचा कीं काय ? छे ! भारतालाः साक्षी ठेवून आम्ही म्हणतों, छे ! भारतीय राष्ट्राचें ऐतिहासिक सातत्य त्रुटित झालेलें नाहीं. १० मे १८५७ रोजीं सुरू झालेला संग्राम १० मे १९०८ रोजीं संपलेला नाहीं. कोणच्या तरी सालीं १० मे हा दिवस असा उजाडेल कीं त्या दिवशीं भारताचें भाग्य निश्चित झालेलें दिसेल--एक तर सौंदर्यसंपन्न भारताच्या डोक्यावर विजयाचा देदीप्य-

But, O glorious Martyrs, in this pious struggle of your sons, help O help us by your inspiring presence! Torn in innumerable petty selves, we cannot realize the grand unity of the Mother. Whisper, then, unto us by what magic you caught the secret of Union. How the Firungee rule was shattered to pieces and the Swadeshi thrones were set up by the common consent of Hindus and Mahomedans. How, in the higher love of the Mother united the difference of castes and creeds, how the venerated and venerable Bahadur Shah prohibited the killing of cows throughout India, how Shrimant Nana Saheb, after the first salute of thundering cannon to the Emperor of Delhi, reserved for himself the second one! How you staggered the whole world by uniting under the banner of Mother and forced your enemies to say "Among the many lessons the Indian mutiny conveys to the historian and administrator, none is of greater importance than the warning that it is possible to have a Revolution in which Brahmins and Shudras, Mahomedan and Hiud were united against us and that it is not safe to suppose that the peace and stability of our dominion in any great measure depends on the continent being inhabited by different races with different

---

मान मुकुट तरी दिसेल अगर हौतात्म्याचें तेजोवलय तरी दिसेल—तोंपर्यंत हा लढा थांबणार नाहीं.

पण हे थोर हुतात्म्यांनो! या पवित्र झगड्यांत तुम्हीं तुमच्या या संततीला सहाय्य करा: तुमच्या स्फूर्तिप्रद सहवासानें आम्हांला साहाय्य करा. क्षुद्र स्वार्थांचे असंख्य कप्पेकप्पे निर्माण झाल्यामुळें मातृभूमीच्या ऐक्याची विशाल कल्पना आम्हांला आकलनच करतां येत नाहीं. ही ऐक्यभावना तुम्हीं कोणच्या गूढ मंत्रानें निर्माण केली हें आम्हांला हळूच सांगा. फिरंग्यांची राजसत्ता शीर्ण कशी झाली आणि हिन्दु-मुसलमानांच्या संमतीनें देशी राज्यें कशीं निर्माण करण्यांत आलीं हें आम्हांला सांगा. मातृभूमीवरील प्रेमाच्या उच्च भावनेनें भिन्न जाती व भिन्न पंथ एक कसे झाले, पूज्य बहादुरशहानें सगळ्या भारतवर्षभर गोवधाला बंदी कशी केली, तोफांची सलामी देण्यायेण्याचा प्रसंग उपस्थित होतांच, श्रीमंत नानासाहेब पेशवे यांनीं पहिली सलामी दिल्लीच्या बादशहाला कशी दिली व स्वतःचा क्रम त्यानंतर कसा ठरविला, हें तुम्हीं आम्हांला सांगा. या प्रसंगीं तुम्हीं आपल्या शत्रूच्या तोंडून पुढील शब्द वदविलेत: ब्राह्मण व शूद्र, मुसलमान व हिन्दु यांनीं एकत्र येऊन इंग्रजांविरुद्ध क्रांतियुद्ध सुरू करणें ही गोष्ट शक्य आहे हा इषारा या बंडानें आपणाला दिला आहे. इतिहासकार व मुत्सद्दी यांनीं या बंडापासून अनेक गोष्टी शिकण्यासारख्या आहेत. अशा सर्व गोष्टींत भारतीयांची ही एकी अत्यंत बोधप्रद आहे. भरतखंडांत भिन्नभिन्न वंश नांदत आहेत आणि भिन्नभिन्न धार्मिक पंथांमुळें त्यांची विभागणी झालेली आहे. भारतांतील आपल्या अधिराज्याचें स्थैर्य व आपल्या राज्यांतील शांतता या गोष्टी या भेदभावांवर पुष्कळ अंशीं अवलंबून आहेत असें आपण आजवर मानीत आलों; यापुढें तसें मानणें बरोबर नाहीं. कारण, हे लोक परस्परांचें हृद्गत जाणतात, परस्परांविषयीं आदर बाळगतात आणि परस्परांच्या जीवनक्रमाशीं सहकार्य करतात. शत्रूला ही कबुली द्यावयाला लावून आणि राष्ट्रध्वजाखालीं सर्वांना संघटित करून तुम्हीं साऱ्या जगाला धक्का कसा दिलात

religious systems, for they mutually understand each other and respect and take part in each other's modes and ways and doings. * Whisper unto us the nobility of such an alliance of Religion and Patriotism, the true religion which ever is on the side of patriotism, the true Patriotism which secures the freedom of religion!

And give us the marvellous energy, daring and secrecy with which you organised the mighty volcano; show us the volcanic magma that underlie the green thin crust, on which the foe is to be kept lulled into a false security; tell us how the Chapati—that fiery Cross of India flew from village to village and from valley to valley, setting the whole intellect of the nation on fire by the very vagueness of its message and then let us hear the roaring thunder with which the volcano at last burst forth, with an all-shattering force, rushing, smashing, burning and consuming into one continuous fiery flow of redhot lava-flood! within a month regiment after regiment, prince after prince, city after city, sepoys police, zemindars, Pundits, moulvis, the multiple—headed Revolution sounded its tocsin and temples and mosques resounded with the cry "Maro Firungee Ko!" Away with the foreigners! Meerut rose, Delhi rose, rose Benares, Agra, Patna, Lucknow, Allahabad, Jadagaspoor, Jhansi, Banda, Indore—from Peshawar to Calcutta and from the Narbada to

---

हें आम्हांला सांगा. खरें धर्मप्रेम देशप्रेमाच्या बाजूचें असतें आणि खरें देशप्रेम धर्मस्वातंत्र्याची शाश्वति निर्माण करतें हें तत्त्व ओळखून, तुम्हीं देशप्रेम व धर्मप्रेम यांचा उमदा मिलाफ कसा घडवून आणलात हेंहि तुम्हीं हळूच आम्हांला सांगा.

एकाद्या प्रचंड ज्वालामुखीशीं ज्याचें सादृश्य कल्पितां येईल अशी ही ज्वालाग्राही घटना तुम्हांला ज्या अद्वितीय उत्साहामुळें, ज्या साहसामुळें व ज्या गुप्ततेमुळें घडवितां आली तो उत्साह, तो साहसीपणा व तो गुप्तपणा हे गुण तुम्हीं आम्हांला द्या. वरपांगीं हिरवळीनें आच्छादलेल्या भूपृष्ठाच्या आंत दडलेल्या, तप्तरसाच्छादित दगडांची घडण घडवून तुम्हीं शत्रूला सुरक्षिततेच्या खोट्या कल्पनेनें कसें गुंगविलें, तें तुम्ही आम्हांला सांगा. भारतीय स्वातंत्र्याचें दाहक चिन्ह असें ज्या चपात्यांचें वर्णन करतां येईल त्या चपात्यांचा प्रसार खेड्यापाड्यांतून व दऱ्याखोऱ्यांतून कसा झाला आणि या चपात्यांनीं आपल्या अस्फुट संदेशानेंच राष्ट्राची सारी बुद्धिमत्ता कशी भडकवून दिली हेंहि तुम्हीं आम्हांला स्पष्ट करून सांगा. शेवटीं, हा ज्वालामुखी कसा भडकला आणि त्याची गर्जना कशी घुमूं लागली, या ज्वालामुखीच्या धडाक्यापुढें सगळ्या गोष्टींचा चक्काचूर कसा झाला, या ज्वालामुखीचा वेग कसा वाढत गेला, त्यानें साऱ्या वस्तू कशा जमीनदोस्त केल्या, आपल्या तप्त रसाच्या दाहक प्रवाहांत त्यानें सर्व वस्तूंचा संहार कसा केला, हेंहि तुम्हीं आम्हांला सांगा. एका महिन्यांत पलटणीमागून पलटणी, संस्थानिकामागून संस्थानिक, नगरामागून नगर, शिपाई, पोलिस, जमीनदार, पंडित, मौलवी या सर्वांवर या घटनेचा प्रभाव कसा पडला, आणि या सहस्रशीर्ष क्रांतीच्या घटना घुमूं लागतांच त्यांचा पडसाद मंदिरांतून व मशिदींतून उमटूं लागल्यामुळें, ठिकाणाठिकाणांतून 'मारो फिरंगी को' हा ध्वनि कसा उमटूं लागला हेंहि तुम्हीं आम्हांला सांगा. मीरत शहरांत उठावणी झाली, दिल्ली शहर उठलें, बनारसमध्यें चढाई झाली, आग्रा, पाटणा, लखनौ, अलाहाबाद, जगदीशपूर, झांशी, बांदा, इंदूर,

* Forrest G. W.: 'State Papers,' Vol. II.

the Himalayas, the volcano burst forth into a sudden, simultaneous and all-consuming conflagration ! !

And then, oh Martyrs, tell us the little as well as the great defects which you found out in our people in that great experiment of yours. But above all, point out that most ruinous, nay the only material drawback in the body of the nation which rendered all your efforts futile—the mean selfish blindness which refuses to see its way to join the Nation's cause Say, that the only cause of the defeat of Hindustan was Hindustan herself; that shaking away the slumber of centuries the Mother rose to hit the foe, but while her right hand was striking the Firingee dead, her left hand struck, alas, not the enemy but her own forehead! So she staggered and fell back into the inevitable swoon of 50 years !

50 years are past, but oh restless spirits of 1857, we promise you with our hearts' blood, that your Diamond Jubilee shall not pass without seeing your wishes fulfilled !! We have heard your voice and we gather courage from it. With limited means you sustained a war, not against tyranny alone but against tyranny and treachery together. The Duab and Ayodya, making a united stand, waged a war not only against the whole of the British power but against the rest of India too; and yet you fought

---

पेशावरपासून कलकत्त्यापर्यंत आणि नर्मदेपासून हिमालयापर्यंत या ज्वालामुखीचे लोळ एकदम अनपेक्षित रीतीनें भडकूं लागले व त्या दाहांत सर्वांचा संहार होऊं लागला.

आणि हे हुतात्म्यांनो ! तुम्हीं हा जो प्रयोग केलात तो करीत असतांना तुम्हांला आपल्या लोकांच्या अंगीं असलेले जे लहानमोठे दोष आढळले तेहि तुम्हीं आम्हांला सांगा. अन्य दोषांपेक्षां तुम्हीं एकाच प्रमुख दोषाचें स्पष्टीकरण करा. हा दोष राष्ट्राच्या घटनेंत अत्यंत महत्त्वाचा असून तो राष्ट्राला अत्यंत हानिकारक ठरणारा आहे. ज्या स्वार्थी आंधळेपणामुळें कित्येक लोकानीं तुमच्या अंगीकृत राष्ट्रकार्यांत तुमच्याशीं सहकार्य केलें नाहीं, त्यामुळेंच तुमचे सारे प्रयत्न विफल ठरले कीं काय, हें तुम्हीं आम्हाला सांगा. हिंदुस्थानच्या पराभवाचें कारण हिंदुस्थानच होय, हें खरें ना ? या प्रश्नाचें उत्तर आम्हांला द्या. आपली ही मातृभूमि शतकानुशतकांच्या निद्रेंतून जागी झाली होती व ती शत्रूवर आघात करूं लागली होती; पण, तिचा उजवा हात फिरंग्याला मरेतों मारीत होता त्याच वेळीं तिचा डावा हात शत्रूवर आघात करण्याऐवजीं स्वतःच्या मस्तकावरच आघात करण्यांत दुर्दैवानें गुंतला होता. यामुळें आपला हा मायदेश कोलमडून पडला आणि त्याला पन्नास वर्षांची अपरिहार्य मूर्च्छा आली.

१८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामांत पुढाकार घेणाऱ्या हुतात्म्यांच्या दुर्दम्य आत्म्यांनो तुम्हीं केलेल्या प्रयत्नाला पन्नास वर्षांचा काळ होऊन गेलेला आहे. असें असलें तरी, आम्हीं स्वतःच्या रक्ताला साक्ष ठेवून तुम्हांला असें अभिवचन देतों कीं, तुमच्या प्रयत्नाच्या हीरकमहोत्सवाची वेळ येईल तेव्हां तरी तुमच्या इच्छा तृप्त झालेल्या असतील. तुमची हाक ऐकून आम्हाला धैर्य आलें आहे. तुम्हीं संग्राम केला त्या वेळीं तुमची साधन-सामग्री मर्यादित होती. असें असूनहि तुम्ही जुलूम आणि विश्वासघात यांच्या युतीविरुद्ध झगडा केलात. दुआब आणि अयोध्या या प्रांतांनीं आपली एकजूट घडवून आणली. त्यांनीं जो संग्राम केला तो नुसत्या ब्रिटिश सत्तेविरुद्ध नसुन उरलेल्या

for three years and yet you had well-nigh snatched away the crown of Hindustan and smashed the hollow existence of the alien rule. What an encouragement this! What the Duab and Ayodya could do in a month, the simultanous sudden and determined rising of the whole of Hindustan can do in a day! This hope illumines our hearts and assures us of success. And so we avow that your Diamond Jubilee the year of 1917 shall not pass without seeing the resurging Ind making a triumphant entry into the world!

For, the bones of Bahadur Shah are crying vengeance from their grave! For, the blood of the dauntless Laxmi is boiliog with indignation! For, the shahid Peer Ali of Patna when he was going to the gallows for having refused to divulge the secrets of the conspiracy whispered defiance to the Firungee said in prophetic words " You may hang me today, you may hang such as me every day but thousands will still rise in my place-your object will never be gained"

Indians these words must be fulfilled! Your blood oh Martyrs shall be avenged! **Bande Mataram!**

सावरकरप्रभृति तरुण हा समारंभ साजरा करण्यांत गुंतले होते त्याच दिवशीं ना. गोखले योगायोगानें इंग्लंडमध्यें येऊन पोंचले. गोखल्यांच्या स्वागतासाठीं स्टेशनवर फक्त दोघेच हिंदी लोक हजर होते. हें पाहिल्यावर गोखल्यांनीं सर्व गोष्टींची

---

सगळ्या भरतखंडाविरुद्धहि होता: असें असूनहि हे हुतात्म्यांनो तुम्हीं तीन वर्षें पर्यंत संग्राम चालविलात आणि तुम्हीं हिंदुस्थानचा राजमुगुट जवळ जवळ हस्तगत केला होतात आणि परकीय सत्तेचें पोकळ अस्तित्व तुम्हीं जवळ जवळ उच्छिन्न केलें होतेंत. तुमच्या या कर्तृत्वाचें स्मरण किती उत्साहदायक आहे बरें! दुआब आणि अयोध्या यांनीं एक महिन्यात जें केलें तें सगळा हिंदुस्थान एकदम, आकस्मिकपणें व निर्धारानें उठेल तर एक दिवसांत साध्य होईल. आमचीं अंत:करणें या आशेनें प्रज्वलित झालीं आहेत आणि या आशेमुळेंच आम्हांला विजयाची खात्री वाटत आहे. आणि म्हणून, आम्ही असें प्रतिज्ञापूर्वक सांगतों कीं, १९१७ सालीं तुमचा हीरकमहोत्सव होईल तेव्हां, पुनरुज्जीवित भारतवर्ष जगात डौलानें प्रवेश केल्याशिवाय रहाणार नाहीं. कारण थडग्यांत पडून असलेलीं बहादुरशाहाचीं हाडें 'सूड, सूड' म्हणून ओरडत आहेत; निर्भय लक्ष्मीबाईचें रक्त रागानें उकळत आहे; पाटण्याचा शहीद पीरअल्ली यानें कटांतील गूढ फोडण्याला नकार दिला व त्यामुळे त्याला फांशीची शिक्षा सांगण्यांत आली. त्याला फांशी देण्यासाठीं नेण्यांत येत असतांना त्यानें फिरंग्यांचा धिक्कार केला आणि एखाद्या भविष्यवाद्याला शोभेल अशा तऱ्हेनें त्यानें पुढील शब्द उच्चारले : तुम्हीं मला आज फांसावर लटकावूं शकाल; कदाचित् माझ्यासारख्यांना तुम्हीं प्रत्यहीं देखील फांसावर चढवूं शकाल; पण माझी जागा भरून काढण्यासाठीं सहस्रावधि लोक पुढें सरसावतील; तुमचा हेतु कधींच सफल होणार नाहीं!

भारतीयांनो! हे शब्द खरे ठरले पाहिजेत. हुतात्म्यांनो! तुमच्या रक्ताचा बदला घेतला जाईल.

—वंदे मातरम्—

चौकशी केली. व सावरकरप्रभृति तरुणांच्या प्रवृत्तीची त्यांनीं ओळख करून घेतली. ही ओळख पटल्यामुळें गोखले मनांत किती अस्वस्थ झाले होते हें दादासाहेब करंदीकर यांनीं ( Letters form England ) या आपल्या पुस्तकांत[१] सहजगत्या वर्णिलें आहे. दि. १८--१०-१९०८ रोजीं गोखले व दादासाहेब करंदीकर यांची लंडनमध्यें भेट झाली त्या वेळीं या दोघांचें जें संभाषण झालें त्याच्या आधारें दादासाहेब करंदीकर यांनीं पुढील मजकूर लिहिला आहे :

*गोपाळराव हे या खेपेस मुलांच्यासंबंधानें फार उद्विग्न झाले आहेत. येथें बऱ्याच शिकणाऱ्या मुलांनीं '१८५७ साल' ची ज्युबिली केली, त्यास आज चार महिने झाले तरी 'लंडन टाइम्स' पत्रकार अद्यापि हांका मारीतच आहेत. त्या कार्यास १०० विद्यार्थी हजर होते. ता. १० मे. रोजीं गोपाळराव आले त्याच दिवशीं इकडे समारंभ चालला होता. त्यांच्या आगमनार्थ स्टेशनावर या वेळीं दोनच एतद्देशीय व खरे अँग्लो इंडियन (?) हजर होते. त्याच्या मागील खेपेस चाळीसवर लोक होते. असो. या व अनेक कारणांनीं त्यांच्या मनानें असें घेतलें आहे कीं, हीं मुलें फार उलाढालीं आहेत !*

मुझफरपूरला खुदीराम बसूनें जो गोळा फेंकला त्याचा आवाज त्या वेळीं तीन मैलपर्यंत ऐकूं गेला, हें मागें सांगितलेंच आहे. पुढें तर त्या गोळयाचा आवाज हजारों मैल अंतरावर ऐकूं येऊं लागला! सहा हजार कोसांवरून भारतांतल्या कोट्यवधि मेंढयांना हांकण्याचें काम करणाऱ्या मेंढपाळांच्या गोटांत या गोळयामुळें काय परिणाम झाला, हें पाहण्यासारखें आहे. 'लंडन टाइम्स'नें दि. ४--५--१९०८ रोजीं लिहिलेल्या संपादकीय लेखांत मुझफरपूरच्या स्फोटानंतर कलकत्त्यांत बॉंब तयार करण्याचे गुप्त कारखाने सांपडले, याबद्दल भीति व्यक्त केली आहे. १८९७ सालीं पुण्यांत रँड—आयर्स्टचा वध झाला त्यापेक्षां सभ्यांचें प्रकरण जास्त चिंताजनक आहे असें कबूल केल्यावर, 'टाइम्स'नें मोठ्या गुर्मीत पुढील वाक्यें लिहिलीं आहेत :

Bombs will not terrify the government into unwise concessions. Even though war may rage at the gates and apostls of anarchy may plot within, the great work of governing and developing India must be doggedly prosecuted.

( बॉंब गोळे उडतात यामुळें भिऊन जाऊन सरकार भलत्याच सवलती व भलतेच अधिकार देणार नाहीं. सरहद्दीपाशीं शत्रु येऊन भिडला आणि अराजक माजवूं पहाणाऱ्यांनीं देशांत कट केले तरी हिंदुस्थानवर राज्य करण्याचें व हिंदुस्थानचा विकास करण्याचें महत्कार्य नेटानें पुढें चालविलें पाहिजे. )

बॉंबचे प्रत्यक्ष स्फोट बंगाल्यांत होत असले तरी इंग्रजांच्या तीक्ष्ण घ्राणेंद्रियाला त्या स्फोटांचा उगम महाराष्ट्रांत कुठें तरी असावा, असा वास येत होता. इंग्रजांच्या मनांतला हा संशय पुढील वाक्यांतून[२] व्यक्त झाला आहे :

---

१ Page 158 २ London Times : 7-5-1908.

If Bengal has been chiefly conspicuous in its resort to destructive methods, the cunning brains that conceived and fostered the movement are probably to be found for the most part in Western India......An equally grave question is raised by the announcement that persons charged in the present conspiracy include men who have had the advantage of education in Europe.

( विध्वंसक मार्गांचा अवलंब केल्यामुळें बंगाल प्रामुख्यानें लोकांच्या नजरे-समोर आला आहे, हें खरें. पण, ज्या लबाड लोकांच्या डोक्यांत या चळवळीची कल्पना प्रथम उद्भवली व ज्यांनीं या चळवळीचें संगोपन केलें ते लोक मुख्यतः पश्चिम भारतांतले आहेत...सध्यांच्या कटांत ज्यांच्यावर आरोप ठेवण्यांत आले आहेत त्यांतले कित्येक लोक युरोपांत जाऊन शिक्षणसंपन्न होऊन आले आहेत असें प्रसिद्ध झालें आहे. या माहितींतूनहि एक गंभीर प्रश्न उत्पन्न होतो. )

पॅरिस येथील 'Le Temps'या पत्रानें दि. ७-५-१९०८ रोजीं आपल्या संपादकीय लेखांत या प्रकरणाचा उल्लेख केला. अल्जीरिया, ट्यूनिस वगैरे फ्रेंच-शासित भूभागांत अशा भानगडी उत्पन्न झाल्या; त्याबरोबर फ्रेंच सरकारनें औदार्य दाखवून त्यांचा निकाल लाविला अशी प्रस्तावना केल्यावर, या लेखांत इंग्रज मुत्स-द्यांना पुढील उपदेश करण्यांत आलेला आहे :

We do not presume to give advice to a friendly government. We confine ourselves to recalling what experience has taught us. The arbitrary system of colonial administration, which in days gone by was necessary and fruitful, would seem to have served its time.

( इंग्लंडचे व आमचे संबंध स्नेहभावाचे आहेत. अशा स्नेही राष्ट्राच्या सरकारला उपदेश करण्याची ऐट आणण्याची आमची इच्छा नाहीं. आम्ही अनु-भवानें शाहणे झालों असल्यामुळें, त्या अनुभवाचें स्मरण करून देणें इतकाच आमचा हेतु आहे. वसाहतींचा राज्यकारभार अनियंत्रित पद्धतीनें चालविणें हें पूर्वीं अवश्यहि होतें व फायदेशीरहि होतें. आतां मात्र त्या पद्धतींत बदल करणें अवश्य झालें आहे.)

मौलवी लियाकत हुसेन, चिदंबरम् पिल्ले, 'विहारी 'चे फडके इत्यादींना शिक्षा ठोठावून चळवळ दडपून टाकण्याचा प्रयत्न पूर्वीं झालाच होता. त्याच धोर-णाला फिरून चालना मिळाली ! ठाणें येथील 'अरुणोदय' पत्राचे संपादक श्री. धोंडोपंत फडके व 'विहारी , चे नवे संपादक श्री. रामभाऊ मंडलीक यांना दि. १५-'२-१९०८ रोजीं अटक करण्यांत आली ! तुफान दर्यांतून सरसरत चाललेल्या होडक्याला जो अनुभव येतो तोच अनुभव भारतांतल्या राष्ट्रवादाला येऊं लागला! प्रबळतम अशा एका साम्राज्याची सत्ता भारतीय राष्ट्रवादाचें होडकें गाडून, गडप करून टाकण्यासाठीं झटूं-झुंजूं लागली ! कालियाच्या डोहांतच उडी भिरकावून कृष्णानें कालिया-मर्दन केलें ! ब्रिटिश साम्राज्यांच्या मुख्य केंद्रांतच प्रतिकारसाधनांची जुळवाजुळव करून, भारतीय तरुणांनीं ब्रिटिश साम्राज्यसत्तेच्या उन्मादाचें मर्दन करण्याचा प्रयत्न चालविला !

---

# प्रकरण ६ वें

# लंडनमधील रहस्यागार

करणें असेल अपाये । तरी बोलोन दाखवूं नये ।।
परस्परें चि प्रत्ययें । प्राचेतीस आणावा ।।

× × ×

राजकारण बहुत करावें । परंतु कळोंच नेदावें ।।

—दासबोध, द. ११, स. ५.

मे महिन्याच्या १० व्या तारखेस सावरकर व त्यांचे सहकारी यांनीं 'भारत भवनां'त साजरा केलेला उत्सव पुढें बरेच दिवसपर्यंत गाजत राहिला. या प्रसंगीं वाटण्यांत आलेलें ' हे हुतात्म्यांनो ' हें पत्रक जसजसें चौफेर प्रसृत होऊं लागलें, तसतसें तें पत्रक इंग्रजांच्या टीकेला कारणीभूत होऊं लागलें. या प्रसंगीं तयार करण्यांत आलेल्या वीरस्मृति मुद्रा-पोषाखावर धारण करून हिंदी तरुण समाजांत वावरूं लागले त्याबरोबर, त्या मुद्रांचा अर्थ इंग्रजांच्या लक्षांत येऊं लागला व त्या मुद्रांवरील त्यांचा राग अनेक प्रकारांनीं व्यक्त होऊं लागला. या मुद्रा धारण करून हिंदी विद्यार्थी आगगाड्यांतून वगैरे हिंडत; तेव्हां त्यांच्या दर्शनामुळें खवळून गेलेल्या इंग्रजांशीं बाचाबाची करण्याचा प्रसंग त्यांच्यावर ओढवे. इंग्लंडमधील कांहीं कॉलेजच्या अधिकाऱ्यांना या मुद्रांचें दर्शन असह्य वाटलें. सायरेन्स्टर येथील शेतकी कॉलेजच्या प्रमुखाध्यापकानें ही मुद्रा पाहून श्रीमंत नानासाहेब पेशवे व झांशीच्या राणीसाहेब यांना गालिप्रदान केलें. हें सहन न झाल्यामुळें, त्या कॉलेजांत शिकत असलेले श्री. हरनामसिंगजी व मि. आर. एम्. खान, या दोघा तरुणांनीं त्या कॉलेजला रामराम ठोकला! या तरुणांच्या बाणेदारपणाचा गौरव करण्यासाठीं लंडन येथील हिंदी लोकांनीं एक जंगी मेजवानी दिली.[1] धनदेवी नांवाच्या पंजाबी महिलेच्या अध्यक्षतेखालीं हा समारंभ साजरा झाला. प्रो. गोकुळचंद नारंग यांनीं या प्रसंगीं फार उत्तम भाषण केलें. या प्रसंगीं लंडनच्या हिंदी मंडळींनीं या उभयतां तरुणांना ' यार–ए–हिंद ' ही पदवी अर्पण केली. वीरस्मृतिमुद्रा धारण करून श्री. मदनलालजी धिंग्रा हे कॉलेजमध्यें गेले असतांना, त्यांच्या एका स्नेह्यानें चेष्टेनें ती मुद्रा दूर फेंकून दिली. त्याबरोबर धिंग्राजी इतके चवताळले कीं, एक सुरा घेऊन ते त्या मित्राच्या अंगावर तुटून पडले.

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ८५. २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १३५.

' हे हुतात्म्यांनो ' या पत्रकाचा प्रसार सुरू झाल्यावर व १० मे च्या समारंभाची हकीकत प्रसिद्ध झाल्यावर, इंग्लंडच्या सरकारी गोटांत जी भावना उत्पन्न झाली ती 'लंडन टाइम्स' च्या दि. २३-५-१९०८ च्या अंकांत व्यक्त झाली. या लेखांत पं. शामजी कृष्णवर्मा यांचा उल्लेख करण्यांत आल्यामुळें, पंडितजींनीं पॅरिस येथून दि.२८-५-१९०८रोजीं 'लंडन टाइम्स' कडे एक पत्र धाडलें. पंडितजींनीं या पत्रांत समारंभ साजरा करणाऱ्या हिंदी लोकांचें समर्थन केलें असून, त्या समर्थनाला आधार म्हणून त्यांनीं डॉ.रिचर्ड कॉन्ग्रेव्ह यांच्या पत्रकांतील[1] उतारे उद्धृत केले आहेत. 'हे हुतात्म्यांनो' या पत्रकाच्या प्रती समारंभानंतर लौकरच हिंदुस्थानांत रवाना करण्यांत आल्या होत्या. या प्रती पोंचल्याबरोबर हिंदुस्थान सरकारच्या गोटांत जी खळबळ उडाली ती ' लंडन टाइम्स ' च्या दि. २३-६-१९०८ च्या अंकांत प्रसिद्ध झालेल्या सिमला येथील वृत्ताच्या रूपानें व्यक्त झाली आहे. या पत्रकाची भाषा ओजस्वी ( Glowing ) आहे, असें प्रशस्तिपत्रक 'लंडन टाइम्स' च्या सिमल्याच्या वार्ताहरानें दिलें आहे. ' काळ ', ' विहारी ' वगैरे पत्रांतून १० मे च्या समारंभाचीं वर्णनें प्रसिद्ध झालीं या गोष्टीचा उल्लेखहि या वार्ताहरानें केला आहे. अशा पत्रकांचा प्रसार थांबविण्याची योजना आंखली पाहिजे असें सरकारला वाटत आहे, ही माहिती देखील या वार्ताहरानें पुरविली आहे. या वार्ताहरानेंहि 'हे हुतात्म्यांनो' या पत्रकाचा संबंध पं. शामजी कृष्णवर्मा यांच्याशीं नेऊन भिडविल्यामुळें, पंडितजींनीं 'लंडन टाइम्स' ला फिरून एक पत्र धाडलें. हें पत्रक लिहिल्याचा आपल्यावरील आरोप निराधार आहे, आपण कोणताहि मजकूर निनांवी अगर टोपण नांवानें लिहीत नाहीं, वगैरे मुद्दे स्पष्ट केल्यावर, पंडितजींनीं या पत्रांत[2] पुढील वाक्य लिहिलें आहे :

This does not prevent me from frankly admitting that I am in full sympathy with the chief objects of the leaflet.

( या पत्रकाच्या प्रमुख हेतूंबद्दल मला पूर्ण सहानुभूति वाटते; हें मोकळेपणानें कबूल करण्याला मला कसलीहि हरकत वाटत नाहीं ). शेतकी कॉलेजमधील विद्यार्थी हरनामसिंग व खान यांच्या प्रकरणाचा प्रतिध्वनि दि. २५-६-१९०८रोजी ब्रिटिश पार्लमेंटमध्यें उमटला. Rees ( रीस ) या सभासदाच्या प्रश्नाला उत्तर देतांना, दुय्यम भारतमंत्रि मि. बुकानन यांनीं असें सांगितलें कीं, 'वीरस्मृतिमुद्रा धारण केलेले विद्यार्थी बंगाली नव्हते व त्यांना सरकारी शिष्यवृत्तीहि मिळत नव्हती' या विद्यार्थ्यांच्या बाबतींत कॉलेजच्या मुख्याधिकाऱ्यानें जें वर्तन केलें तें शिस्तपालनाच्या दृष्टीनें अवश्य होतें, अशी समर्थनपर पुरवणीहि सरकारतर्फे जोडण्यांत आली.

दि. १० मे रोजीं झालेल्या समारंभाच्या वेळीं तपस्यामास पाळण्याचा निश्चयहि जाहीर करण्यांत आलेला होता. हा निश्चय अमलांत आणण्याची योजना

---

१ यापूर्वी पृ. १३४ वर पत्रक दिलें आहे. २ लंडन टाइम्स : दि. २९-६-१९०८.

तत्काळ आंखण्यांत आली. या तपस्यामासांत स्वत:ची वर्गणी म्हणून सावरकर व अय्यर हे दर आठवड्याला २५ शिलिंग देत असत.[1] भिन्नभिन्न ठिकाणीं हिंडून वर्गणी गोळा करण्याचें काम वेगवेगळ्या तरुणांकडे सोंपविण्यांत आलेलें होतें. हे तरुण ज्या पेट्या घेऊन हिंडत त्या पेट्यांवर '१८५७ च्या हुतात्म्यांसाठीं' अशा अर्थाचे इंग्रजी शब्द लिहिलेले असत. लंडनमध्यें असलेल्या प्रतिष्ठित हिंदी लोकांना भेटण्याचें काम सावरकर, अय्यर व डॉ. राजन् या त्रयीकडे होतें. ही त्रयी श्री. रमेशचंद्र दत्त व ना. गोखले यांना भेटली होती.[1]

हे तरुण श्री. रमेशचंद्र दत्त यांना भेटले त्या वेळीं १८५७ च्या प्रसंगाच्या स्वरूपाबद्दलची चर्चा प्रामुख्यानें झाली. या प्रसंगाचें स्वरूप राष्ट्रीय नव्हतें असें म्हणणाऱ्या श्री. रमेशचंद्र दत्त यांना सावरकर यांनीं 'अमुक प्रांत या उत्थानांत सामील झाला होता ना?' असें एकामागून एक विचारण्याला सुरुवात केली. श्री. रमेशचंद्र दत्त यांना भारतीय इतिहासाकडे स्वत्वनिष्ठ दृष्टीनें पहाण्याची यापूर्वी पाळीच आलेली नसल्यामुळें, या उत्थानाच्या खऱ्या स्वरूपाविषयीं त्यांचे समज बरोबर नव्हते; पण, त्यांचें भारतीय इतिहासाचें अध्ययन चांगलें झालेलें असल्या-मुळें, सावरकरांचें म्हणणें पटण्याला त्यांना फारसे प्रयास पडले नाहींत. ज्या उत्था-नांत हिंदुस्थानांतले कोट्यवधी लोक समरस झालेले होते व ज्या उत्थानांत जवळ जवळ सारा मध्य भारत, उत्तर भारत, पूर्व भारत सामील झालेला होता त्या उत्था-नाला राष्ट्रीय स्वरूप निश्चित आहे, असें श्री. दत्त यांनीं शेवटीं कबूल केलें.

ही त्रयी ना. गोखले, यांच्या निवासस्थानीं गेली तेव्हां गोखले, यांनीं प्राथ-मिक स्वरूपाचें बोलणें तिघांशीं नेहमींच्या बैठकींत बसून केलें; पण, आतां राज-कारणी बोलणें सुरू होणार असें दिसतांच, गोखले यांनीं सावरकर व अय्यर या दोघांनाच वरच्या मजल्यावर बोलावून नेलें. फर्ग्युसन कॉलेजचे पूर्वीचे विद्यार्थी म्हणून, एक होतकरू महाराष्ट्रीय तरुण म्हणून आणि लंडनमधील हिंदी तरुणांचे पुढारी म्हणून गोखले यांनीं या प्रसंगीं मुख्यत: सावरकरांशीं चर्चा केली. १८५७ च्या प्रसंगाविषयीं वाद सुरू झाला तेव्हा गोखले यांनीं 'मी इतिहास शिकविला आहे' असें म्हटलें. तेव्हां सावरकरांनीं स्वत्वनिष्ठ दृष्टीनें इतिहास वाचण्याचें, लिहि-ण्याचें व शिकविण्याचें महत्त्व काय आहे, हें गोखले यांना सांगितलें. या विषयाच्या चर्चेवरून गोखले झटकन् प्रचलित राजकारणाकडे वळले. सध्यांच्या परिस्थितींत हिंदी राजकारणांत स्वातंत्र्याची मागणी करणें अशक्य आहे व तुम्ही ज्या साध-नांचा व मार्गांचा पुरस्कार करतां तीं साधनें व ते मार्ग अव्यवहार्य आहेत, असें गोखले यांनीं सांगितलें. तेव्हां सावरकर यांनीं गोखले यांच्या मार्गांचेंहि वैयर्थ्य त्यांना पटवून दिलें. उभयतांचेहि मार्ग व साधनें हीं सद्य:परिस्थितींत अव्यवहार्य आहेत असें मानलें तर, आपणा उभयतांनाहि एकच गोष्ट करणें प्राप्त आहे, असें

1 स्वामी शुद्धानंद भारतियार यांनीं पाठविलेली माहिती.

सावरकर म्हणाले. लोकांच्या विचारासाठीं योग्य ध्येय त्यांच्यापुढें ठेवणें व त्या ध्येयाच्या प्राप्तीचे इतिहाससिद्ध मार्ग कोणते हें लोकांना पटवून देणें हेंच सध्यांच्या पिढींतील विचारवंतांचें काम आहे असें सावरकरांनीं सांगितल्यावर, इटलीच्या इतिहासाच्या आधारें या उभयतांमध्यें कांहीं चर्चा झाली. गोखले यांनीं निधीसाठीं कांहीं दिलें नाहीं, पण एवढया थोर पुढाऱ्याशीं चर्चा करून आपलीं मतें त्याच्या पुढें मांडतां आलीं ही गोष्ट प्रचारकार्याच्या दृष्टीनें फार महत्त्वाची झाली असें समाधान मानून, सावरकर व अय्यर गोखले यांचा निरोप घेऊन निघाले.

तपस्यामासाचें कार्य अशा रीतीनें चालू होतें त्या सुमारासच, सावरकर ' हे हुतात्म्यांनो ' हीं पत्रकें टपालानें हिंदुस्थानांत वेगवेगळ्या ठिकाणीं धाडण्यांत गुंतले होते. १९०८ च्या मे-जूनच्या सुमारास चतुर्भुज या नांवाचा एक गुजराथी इसम ' इंडिया हाऊस ' मध्यें आचारी म्हणून काम करीत होता. सावरकरांनीं हळुहळू त्याला विश्वासांत ओढलें व थोडक्याच दिवसांत त्यांनीं त्याला ' अभिनव भारता ' ची शपथ दिली. शपथदानाचा विधि कसा झाला हें चतुर्भुज यानें पुढें आपल्या जबाबांत सांगितलें [१] ' इंडिया हाउस ' मधील सावरकरांच्या खोलींत शिवरायांची तसवीर होती. या तसबिरीपुढें नीरांजन जळत ठेवण्यांत येत असे. सावरकरांनीं सांगितलेली शपथ चतुर्भुजनें या तसबिरीसमोर उच्चारली व या उच्चारणानंतर सावरकरांनीं 'तूं गुप्त कटाचा सभासद झालास, कट पृथ्वीच्या चारी खंडांत आहे व मी त्याचा पुढारी आहें ' असें चतुर्भुजला सांगितलें.[२] ' हे हुतात्म्यांनो ' या पत्रकाच्या घड्या करून तें टपालमार्गें धाडण्याला सिद्ध करण्याचा उद्योग रात्रीं चाले. या पत्रकावर पत्ते लिहिण्याचें काम सावरकर स्वतः करीत नसत. एकदां चतुर्भुजनें त्यांना या बाबतींत प्रश्न विचारला; तेव्हां सावरकरांनीं असें सांगितलें कीं, हिंदुस्थानांतील प्रमुख सरकारी अधिकाऱ्यांना माझें हस्ताक्षर माहीत असल्यामुळें, या पुडक्यांवर मी पत्ते न लिहिणें हें श्रेयस्कर आहे. हीं पत्रकें पोस्टांत टाकतांना देखील बरीच दक्षता घेण्यांत येत असे. ' इंडिया हाऊस ' लंडनच्या हायगेट विभागांत असल्यामुळें, हायगेट पोस्ट ऑफिसमध्यें हीं पत्रकें टाकणें श्रेयस्कर नाहीं हें ओळखून, सावरकरांनीं चतुर्भुजला अशी सूचना दिली होती कीं, हायगेट पोस्ट ऑफिस सोडून इतर ठिकाणच्या पोस्ट ऑफिसांत हीं पत्रकें टाकण्यांत यावीत. सर्व पत्रकें एकाच पोस्ट ऑफिसांत टाकण्यांत येऊं नयेत, तीं थोडथोडीं अनेक पोस्ट ऑफिसांतून रवाना व्हावीं, असाहि इषारा सावरकरांनीं दिलेला होता.

लंडनमधील तपस्यामासानंतर सावरकर हे एकवार पॅरिसला जाऊन आले, अशी माहिती श्री. इंदुलाल याज्ञिक यांनीं पं. शामजी कृष्णवर्मा यांच्या चरित्रांत लिहून ठेविली आहे. श्री. याज्ञिक यांनीं लिहून ठेविलेलीं वाक्यें पुढीलप्रमाणें आहेत :

---

१ दि. ५-५-१० रोजीं चतुर्भजनें मॅजिस्ट्रेटपुढें दिलेला जबाब.

२ नाशिक कट शोधून काढणाऱ्या पोलिसांनीं चतुर्भुज वगैरे लोकांकडून जे जाबजबाब घेतले त्या जाबजबाबांत सत्य व कल्पना यांचें मिश्रण झालेलें आहे, हें वाचकांनीं लक्षांत ठेवावें.

He even went to Paris, and—incredible as it might seem and all that Shamji wrote on the subject notwithstanding—scored such a personal triumph, that he actually persuaded hard-headed Indian businessmen to take solemn vow in the service of his new society. He further secured the manuscript of a Bomb-Manual that Hemachandra Das had secured with the help of some Russian Revolutionaries.

( सावरकर पॅरिसलाहि गेले. शामजींनीं पुढें याविषयीं कांहींहि लिहिलेलें असो आणि सावरकरांनीं केलेल्या गोष्टी सकृद्दर्शनीं कितीहि अविश्वसनीय वाटोत, उद्योग-धंद्यांत गढून गेलेल्या व्यवहारकठोर अशा पॅरिस येथील हिंदी लोकांना 'अभिनव भारता'ची शपथ घेण्याला सावरकरांनीं प्रवृत्त केलें हें सत्य आहे. व्यक्तिशः सावरकरांच्या दृष्टीनें हा मोठा विजय होता. श्री. हेमचंद्र दास यांनीं कांहीं रशियन क्रांतिकारकांच्या मदतीनें मिळविलेल्या बॉंबच्या चोपड्याची सुधारलेली हस्तलिखित प्रत सावरकरांनीं पॅरिसमधील या मुक्कामांत हस्तगत केली.) सावरकर पॅरिसहून परत आल्यावर त्यांनीं ह्या 'बॉंब मॅन्युअल'च्या प्रती सायक्लोस्टाइलवर छापून घेतल्या. सायक्लोस्टाइलवर छापलेल्या भिन्नभिन्न कागदांचें एकेक पुस्तक बनविण्यांत आलें. हें पुस्तक वीस पानांचें होतें. सावरकरांच्या खोलींत अगर त्या खोलीशेजारच्या माळ्यांत या पत्रकांची छपाई वगैरेचें काम चाले. त्या वेळीं तेथें चतुर्भुजशिवाय अमर दत्त या नांवाचे एक गृहस्थ असत. हीं पत्रकें सायक्लोस्टाइलवर छापून घेण्याचें काम सावरकरांनीं तीन रात्रींत पुरें केलें. हीं पत्रकें तयार झाल्यावर त्यांची टपालमार्गानें पाठवणी करण्याची सिद्धता करण्यांत आली.[1] चतुर्भुजनें 'हे हुतात्म्यांनो' या पत्रकाच्या बाबतींत जी दक्षता घेतली होती तीच दक्षता याहि पुस्तकांच्या बाबतींत चतुर्भुजकडून घेण्यांत आली.

मुझफरपूर येथील बॉम्बच्या स्फोटानंतर बंगालमध्यें 'माणिकतोळा' बागेतील कट उघडकीस आला. या कटाच्या शोधांत असलेल्या पोलिसांनीं अनेक बंगाली तरुणांना पकडलें व बंगाल्यांत पकडापकड व झडत्या यांचा धुमाकूळ सुरू झाला. पण, यामुळें बंगाल्यांत होणारे बॉम्बस्फोट कांहीं थांबले नाहींत. दि. १५–५–१९०८ रोजीं कलकत्ता शहरांत ग्रे स्ट्रीट भागांत बॉम्बचा स्फोट झाला; या स्फोटामुळें चार माणसें जखमी झालीं; १९०८ सालच्या जूनपासून डिसेंबरपर्यंतच्या काळात कलकत्त्याच्या आसपास रेल्वेमध्यें बॉम्ब टाकण्याचे चार प्रसंग घडून आले-वगैरे माहिती Sedition Committee Report मध्येंच[2] देण्यांत आलेली आहे. या प्रकारांना आळा घालण्याच्या हेतूनें हिंदुस्थान सरकारनें दि. ८ जून १९०८ रोजीं दोन नवे कायदे पास केले. बॉम्बगोळे बनविण्याला उपयुक्त अशी सामुग्री जवळ बाळगणाऱ्या इसमाला जन्मठेपेची शिक्षा देण्यांत येईल, असा एका कायद्याचा आशय होता. खुनासारख्या गुन्ह्यांना प्रोत्साहन देणाऱ्या लेखांबद्दल वृत्तपत्रकारांना जबर शिक्षा सांगण्यांत येईल, असें बजावणारा दुसरा कायदा होता.

---

1 चतुर्भुज याचा जबाब. 2. page 33.

मुझफरपूरच्या बॉम्ब प्रकरणावर लिहिलेल्या लेखांबद्दल मुंबई सरकारनें 'काळ' कर्ते प्रो. परांजपे यांना दि. ११ जून १९०८ रोजीं अटक केली. 'काळ' कर्त्यांवरील खटला मुंबईस सुमारें तीन आठवडे चालून, दि. ६ जुलै १९०८ रोजीं प्रो. परांजपे यांना १९ महिने सक्तमजुरीची शिक्षा सांगण्यांत आली. 'काळ' कर्त्यांना अटक होऊन त्यांच्यावरील खटल्याचें काम चालू असतांना लो. टिळक मुंबईस गेले. दि. २३ जून १९०८ रोजीं त्यांनाहि पकडण्यांत आलें. टिळकांच्या खटल्याचें काम महिनाभर चालून त्यांना दि. २३ जुलै १९०८ रोजीं सहा वर्षें काळया पाण्याची शिक्षा सांगण्यांत आली. या सुमारास महाराष्ट्रीय वृत्तपत्रांच्या मागें सरकार हात धुऊनच लागलें होतें. मुंबईचें 'विहारी' पत्र व ठाण्याचें 'अरुणोदय' पत्र यांच्या संपादकांना अटक करण्यांत आल्याची माहिती यापूर्वीं देण्यांत आलेली आहे. 'विहारी'चे संपादक, श्री.रा.ना.मंडलीक, व 'अरुणोदय'चे संपादक, श्री. धोंडोपंत फडके, यांना जबर शिक्षा सांगण्यांत आल्या. सोलापूर येथें त्या काळीं 'स्वराज्य' नांवाचें पत्र निघत असे. त्या पत्राचे संपादक, श्री. बलवंत शंकर लिमये यांना जून महिन्यांत अटक करण्यांत आली. नागपूरच्या 'देशसेवक'पत्राचे संपादक, श्री.अच्युतराव कोल्हटकर, व 'हिंदी-केसरी' या पत्राचे संपादक, श्री. माधवराव सप्रे, यांनाहि सतावण्याला सरकारनें कमी केलें नाहीं.

बॉम्बची विद्या हस्तगत करून युरोपांतून हिंदुस्थानांत आलेल्या मंडळींपैकीं श्री. हेमचंद्र दास यांना माणिकतोळा कटाच्या खटल्यांत अटक झाली होती. श्री. होतीलाल वर्मा यांना जून महिन्यांत अटक करण्यांत आली. माणिकतोळा कटाच्या खटल्यांत ज्या मंडळींना पकडण्यांत आलें होतें, त्या मंडळींपैकीं नरेंद्र गोस्वामी हा माफीचा साक्षीदार बनला व त्यानें इतर अनेक नांवांबरोबर सेनापति बापट यांचें नांवहि गोंवून दिलें. सेनापतींनीं गोस्वामीकथित वृत्त वृत्तपत्रांत वाचलें व त्याचा पुढें परिणाम काय होईल हें अचूक हेरून, त्यांनीं जून महिन्याच्या शेवटीं मोठ्या शिताफीनें पुणें शहर सोडलें. यापुढील कित्येक वर्षांचा काळ सेनापतींनीं हालअपेष्टांत व अज्ञातवासांत काढला. लाला हरदयाळ हे सेनापतींच्या पूर्वींच हिंदुस्थानांत आले होते. जुलै-ऑगस्टच्या सुमारास त्यांच्याहि मागें पोलिसांचा ससेमिरा लागला.[1] यानंतर थोड्याच दिवसांनीं लाला हरदयाळ यांनीं हिंदुस्थान सोडलें व ते युरोपांत गेले.

जून महिन्यापासून 'अभिनव भारता'च्या लंडन येथील केंद्रांतील मंडळी नेमबाजीचें शिक्षण घेण्याचा विचार करूं लागली, असें दिसतें. हें शिक्षण घेतां यावें म्हणून डॉ. राजन् यांनीं एका क्लबांत प्रवेश मिळविला. डॉ. राजन् यांनीं थोडे दिवस या क्लबांत शिक्षण घेतलें. पण, 'तुम्ही हिंदी गृहस्थ असल्यामुळें तुम्हांला हें शिक्षण दिलें जाणार नाहीं.' असें त्यांना सांगण्यांत आल्यामुळें, त्यांना या क्लबाला

1 केसरी : दि. 11-8-1908.

रामराम ठोकावा लागला.[२] १९०८ च्या जुलै महिन्यांत 'अभिनव भारता'च्या लंडन येथील केंद्रांतल्या अंतर्गत मंडळाचा एक सभा झाली. या वेळीं श्री. ग्यानचंद वर्मा हे वॉरिक स्ट्रीटमध्यें रहात होते. त्यांच्या निवासस्थानीं ही सभा झाली. श्री. वर्मा यांनीं हातांत रिव्हॉल्व्हर घेऊन शपथेचे शब्द म्हटले व इतर सभासदांनीं या शपथेचा उच्चार केला. या प्रसंगीं उपस्थित असलेल्या सभासदांच्या मालिकेंत मदनलाल धिंग्रा, कोरेगांवकर, सावरकर, बाबा जोशी, सेन, हरनामसिंग, खान, जयस्वाल-प्रभृति मंडळींचीं नांवें आढळतात. सावरकर यांची प्रमुख म्हणून या सभेंत फिरून निवड करण्यांत आली.

'काळ' कर्ते परांजपे व लो. टिळक, यांच्यावरील खटले चालू असतांना घडलेल्या कांहीं गोष्टी या ठिकाणीं सांगणें प्रस्तुत ठरणार आहे. परांजपे यांच्यावरील खटला चालू असतांना, बाबाराव सावरकर हे मुंबईस येऊन राहिले होते. नाशिकच्या प्रमुख मंडळींवर सरकारचें अलीकडे चांगलेंच लक्ष असे. १९०७ सालाच्या उत्तरार्धांत व १९०८ सालच्या पहिल्या तीन चार महिन्यांत मिळून नाशिकचे श्री. बाबासाहेब खरे यांना तेथील कलेक्टर जॅक्सन यांनीं दोन तीन वेळ पाचारिलें होतें व राजद्रोही भाषणें न करण्याबद्दल त्यांना इषारा दिला होता. बाबाराव सावरकर हे या वेळीं मुंबईस आले आहेत हें पाहून, त्यांना गोत्यांत आणण्याला कांहीं अधिकारी टपूनच बसले होते. रस्त्यांतील गर्दींत बाबाराव सामील झाले असतांना कांहीं पोलिस अधिकाऱ्यांनीं गर्दी हटविण्याच्या निमित्तानें अतिप्रसंग केला. या प्रसंगीं बाबाराव व पोलिस अधिकारी यांच्यामध्यें जी बाचाबाची झाली तिचा फायदा घेऊन पोलिस अधिकाऱ्यांनीं बाबाराव सावरकर यांच्यावर खटला भरला. या खटल्यांत बाबाराव सावरकर यांना एक महिना सक्त मजुरीची शिक्षा सांगण्यांत आली.

लो. टिळक यांच्यावरील खटला चालू असतांना, सरकारला लोकपक्षाची फार भीति वाटत होती. यामुळें हा खटला चालू असतांना हिंदुस्थान सरकार व विलायत सरकार यांच्यामध्यें महत्त्वाच्या संदेशांची देवाणघेवाण चाललेली असे. मुंबईस असलेल्या 'अभिनव भारतां'तल्या कित्येक मंडळींनीं या संदेशांवर टेहळणी ठेवण्याचें ठरविलें. हें संदेशवाहनाचें काम अपरात्रीं चालत असे व या कामावर खास अँग्लो इंडियनांची योजना करण्याची दक्षता घेतली जात असे. सरकारचा इतका कडक बंदोबस्त असूनहि 'अभिनव भारतां'तल्या कांहीं मंडळींनीं या सरकारी योजनेंतला भेद काढण्याच्या कामीं यश मिळविलें. ना. गोखले व भारतमंत्रि मि. मोर्ले यांच्या दरम्यान झालेल्या एका संभाषणाचे द्वारा विलायत सरकारला जी माहिती मिळाली होती ती हिंदुस्थान सरकारला कळविण्यासाठीं एक संदेश धाडण्यांत आला होता. बापट व सावरकर यांचा टिळकांशीं विशेष संबंध असल्याचें गोखल्यांनीं सांगितलें, अशा आश-

---

२ केसरी : दि. ७-७-१९०८.

याचा हा संदेश होता. हिंदुस्थान सरकारला ही माहिती मिळाल्यावर थोड्याच दिवसांनीं सावरकरांच्या नाशिक येथील घराभोंवतीं पोलिसपहारा बसला. विलायतेहून आलेल्या संदेशाची आगाऊ माहिती मिळालेली असल्यामुळें,या पोलिसपहाऱ्याचें कोणाला कांहीं वाटलें नाहीं.

दि. २३ जुलै १९०८ रोजीं टिळकांना सहा वर्षें काळ्या पाण्याची शिक्षा सांगण्यांत आल्यावर, हिंदुस्थानभर जो लोकक्षोभ व्यक्त झाला त्याचा विलायतच्या वर्तमानपत्रांत उमटलेला ध्वनि सावरकरांनीं धाडलेल्या एका बातमीपत्रांत स्पष्टपणें उमटलेला आढळतो. दि. २१-९-१९०८ रोजीं प्रसिद्ध झालेल्या 'काळ' पत्रांतल्या बातमीपत्राच्या[1] प्रारंभींच सावरकर लिहितात :

*महाराष्ट्राच्या विभूषणाला, आर्यधर्माच्या अभिमानाला, नीतिमत्तेच्या निपुणतेला व स्वदेशप्रीतिच्या उद्भवाला—त्या बाल गंगाधर तिलकाला—काळ्या पाण्यावर धाडण्याची शिक्षा झाल्यापासून ज्याच्या हृदयांत त्वेष आलेला नाहीं व ज्याच्या मस्तकांत भयंकर खळबळाट झालेला नाहीं असा स्वच्छ अंतःकरणाचा एकहि हिंदु आढळणें दुर्मिळ आहे. व्यापाऱ्यांनीं आपलीं दुकानें बंद ठेवलीं, गिरणीवाल्यांनीं गिरण्या बंद ठेवल्या, विद्यार्थ्यांनी शाळा सोडल्या, नागरिकांनीं उपवास केले, देशाच्या रंध्ररंध्रांतून सहानुभूतीचाच नव्हे तर अकृत्रिम कृतज्ञतेचा संचार सुरू झाला. मुंबईसारख्या बकाल वस्तीच्या शहरांत व राजकारणांत अनाभिज्ञ असणाऱ्या लोकांनीं संप केले, त्यांचीं मनें क्षुब्ध झालीं, ते रागानें वेडे होऊन व जिवाची पर्वा सोडून युरोपियनांवर हल्ले करूं लागले व गोळ्यांच्या पहिल्या फैरीसरशीच आपल्या निःशस्त्रतेनें आलेल्या दौर्बल्यासह घराचा रस्ता न सुधारतां, सतत आठ दिवस बंदुकांच्या प्राणघातक गोळ्यांशीं दगडांचा सामना करूं लागले ! या सर्व प्रकारच्या प्रक्षोभाचे वृत्तान्त रोज तारेनें येत असल्यानें, येथील समाजाला स्तिमितता आल्यासारखी झालेली होती.*

लो. टिळकांना देण्यांत आलेल्या शिक्षेचा निषेध करण्यासाठीं लंडनमधील हिंदी लोकांची सभा कॅक्स्टन हॉलमध्यें श्री. परेख यांच्या अध्यक्षतेखालीं बोलाविण्यात आली होती. ना. गोखले यांनीं या सभेचें अध्यक्षपद स्वीकारावें, निदान त्यांनी या सभेंत बोलावें, किमानपक्ष म्हणून त्यांनीं सभेला उपस्थित राहावें अशी विनंति करण्यांत आल्यावरहि, गोखले यांनीं ती अमान्य केली. या गोष्टीचा परिणाम वर्णन करून सांगतांना सावरकर लिहितात :

*दे. भ. गोपाळराव गोखल्यांसंबंधीं अजूनपर्यंत जी कांहीं पज्यबुद्धि लोकांत आहे, तिच्या योगानें लोक त्यांच्या हजेरी-गैरहजेरीस महत्त्व देत असतात. परंतु, सर्व राष्ट्राच्या स्वयंस्फूर्त विचाराला व मनोवृत्तीला टिळकांच्या हद्दपारी-*

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ९१-९२. २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ९३-९४.

*सारख्या अत्यंत कोमल प्रसंगीं असा निरर्थक अडथळा करून, त्यांनीं काय महत्त्वाची देशसेवा बजावली तें गोपाळरावांचें गोपाळरावांना माहीत ! बाकी सर्वांना त्यांच्या त्या संदिग्ध व अप्रस्तुत वर्तनाचा वीट येऊन त्याच कॅक्स्टन हॉलांत भरलेल्या सभेंत गोखल्यांच्या या कर्तव्यपराङ्मुखतेचा निषेध करण्याचा ठराव पास करण्यांत आला.*

टिळकांना झालेल्या शिक्षेचा निषेध देशभर होत होता; पण, त्यामुळें सरकारच्या वृत्तींत कांहींहि बदल झाला नाहीं. खुदीराम बसू यांना सांगण्यांत आलेल्या देहांताच्या शिक्षेविरुद्ध मागण्यांत आलेली दाद निरुपयोगी ठरली व शेवटीं हा बंगाली तरुण दि. ११-८-१९०८ रोजीं धैर्यानें फांसावर चढला. खुदिराम बसूंच्या पाठोपाठ ज्या बंगाली तरुणांना माणिकतोळा बागेच्या कटाच्या प्रकरणांत अटक करण्यांत आलेली होती, ते तरुण या सुमारास अलीपूर तुरुंगांत होते. या तरुणांपैकीं नरेंद्र गोस्वामीनें आपल्या सहकाऱ्यांविषयींची सर्व माहिती सरकारला दिल्यामुळें, इतर बंगाली तरुण त्याच्यावर रुष्ट झाले होते. या तरुणांपैकीं श्री. कन्हय्यालाल दत्त व सत्येंद्रनाथ बोस या दोघांनीं नरेंद्राला फसविण्याचें ठरविलें. नरेंद्र गोस्वामी आपल्या भुलावणीला पुरा फसला ही खात्री पटल्यावर, या दोघा तरुणांनीं, चोरून तुरुंगांत आणलेल्या रिव्हॉल्व्हरांचा उपयोग करून, दि. ३१-८-१९०८रोजीं नरेंद्र गोस्वामीचा खून केला. हा खून व त्या खुनानंतर कन्हय्यालाल दत्त व सत्येंद्रनाथ बसू यांना देण्यांत आलेली फांशीची शिक्षा या गोष्टींमुळें भारतीय वातावरण कांहीं काळ अत्यंत प्रक्षुब्ध झालें. टिळकांना झालेल्या शिक्षेविरुद्ध प्रीव्ही कौन्सिलकडे दाद मागण्यासाठीं श्री. दादासाहेब खापर्डे व दादासाहेब करंदीकर प्रभृति मंडळींनीं इंग्लंडला जावें असें ठरलें. त्याप्रमाणें श्री. दादासाहेब खापर्डे हे दि. १५-८-१९०८ रोजीं मुंबईहून इंग्लंडला जावयास निघाले. श्री. दादासाहेब करंदीकर त्यांच्यामागून महिनाभरानें मुंबईहून निघाले. नरेंद्र गोस्वामीच्या खुनाची बातमी लंडन शहरीं पोंचली, त्या दिवशी श्री. दादासाहेब खापर्डे लंडनला पोंचले.[1] दादासाहेबांच्या आगमनाची बातमी लंडन येथील हिंदी तरुणांना त्यांच्या आगमनापूर्वी फक्त तीन तासच मिळाली होती. इतका अल्प अवधि असतांहि शेंकडों हिंदी तरुण दादासाहेबांचे स्वागतासाठीं स्टेशनवर उपस्थित होते व त्यांनीं दादासाहेबांचें स्वागत अत्यंत उत्साहानें केलें. या स्वागतासंबंधीं सावरकर यांनीं पुढील उद्गार काढले आहेत:[2]

*ज्या दिवशीं गोखले स्टेशनवर आले त्या दिवशीं तीनचार हिंदी लोक व बाकी अँग्लो इंडियन सामोरे गेले व ज्या दिवशीं खापर्डे आले त्या दिवशीं सर्व हिंदी समाज दाटी करूं लागला. त्यांत एकहि अँग्लो-इंडियन दिसला नाहीं. लंडनचा हिंदी समाज कोणत्या ध्येयाच्या भजनीं आहे, याचें हें आणखी एक प्रत्यंतर !*

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ९७  २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ९८

इंग्लंडांतील हिंदी विद्यार्थी बिथरत चालल्याचा सुगावा लागल्यामुळें भारत-मंत्र्यांनीं या विद्यार्थ्यांना माणसाळविण्यासाठीं योजना आंखली व या कार्यासाठीं त्यांनीं ली वॉर्नर यांच्या अध्यक्षतेखालीं एक समिति नेमली, हें यापूर्वींच्या प्रकरणांत सांगून झालेंच आहे. या समितीचा अहवाल व त्या संबंधींचा सरकारी अभिप्राय दि. १–९–१९०८ च्या ' लंडन टाइम्स ' मध्यें प्रसिद्ध झाला. इंग्लंडांत आलेले हिंदी विद्यार्थी अभ्यास सोडून राजकारणी वादविवाद करण्यांत आपल्या उत्साहाचा अपव्यय करतात आणि या वादविवादाच्या प्रसंगीं ते हिंदुस्थानला करण्यांत आलेल्या काल्पनिक अन्यायांवर भर देतात, असें या अभिप्रायांत म्हटलेलें आहे. हिंदी विद्यार्थ्यांच्या वृत्तीला लागलेलें हें अनिष्ट वळण बदलावें, यासाठीं ज्या संस्थांनीं प्रयत्न चालविले त्या 'नॅशनल इंडियन असोसिएशन' व ' नॉर्थब्रुक सोसायटी ' या संस्थांना या अभिप्रायांत धन्यवाद दिलेले आहेत. असे प्रयत्न चालले असूनहि, त्यांचा पुरेसा उपयोग होत नाहीं अशी कबुली दिल्यावर, ' लंडन टाइम्स ' मधील या लेखांत असें म्हटलें आहे कीं, वर्णद्वेषाची भावना हिंदी विद्यार्थ्यांच्या मनांत बिंबविण्याचे व हिंसेच्या मार्गाचा अवलंब करावा लागला तरी तो करूनहि ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याविषयीं शिकवण देण्याचे उद्योग फार नेटानें चाललेले आहेत. एडिंबरो, ऑक्स्फर्ड, केंब्रिज, बर्मिंगहॅम, मँचेस्टर, सायरेन्स्टर इत्यादि सर्व ठिकाणीं मिळून सुमारें चारपांचशें हिंदी विद्यार्थी भिन्नभिन्न प्रकारचें शिक्षण घेत आहेत, लंडनमधील हिंदी विद्यार्थ्यांपैकीं फार मोठा वर्ग बॅरिस्टरीच्या अभ्यासांत गुंतलेला आहे वगैरे माहिती नमूद केल्यावर, ' लंडन टाइम्स 'नें दि. १० मे च्या समारंभाचें स्मरण केलें आहे व या प्रसंगीं ठिकठिकाणचे हिंदी विद्यार्थी मोठ्या प्रमाणांत गोळा झाले याबद्दलची भीतीहि व्यक्त केली आहे. ' लंडन टाइम्स 'मध्यें हा लेख प्रसिद्ध झाल्याबरोबर सावरकरांनीं 'काळ' साठीं जें बातमीपत्र लिहिलें तें 'काळ' पत्राच्या दि. २५–९–१९०८ च्या अंकांत प्रसिद्ध झालें.[1] 'लंडन टाइम्स'नें हिंदी विद्यार्थ्यांबाबत केलेल्या सूचनांचा निष्कर्ष काढतांना व त्या सूचनांचा समाचार घेतांना सावरकरांनीं या बातमीपत्रांत पुढील विचार व्यक्त केले आहेत:[2]

*' टाइम्स 'नें इतर पुष्कळ मुद्यांचें विवरण केलें आहे व शेवटी सर्व हिंदी विद्यार्थ्यांना एका कोंडवाड्यांत कोंडून त्यावर इंग्लिशांची सक्त देखरेख ऊर्फ पहारा ठेवावा अशी सूचना दिलेली आहे. लौकरच सुटी संपतांच इंडियन विद्यार्थ्यांना या राजनिष्ठेच्या कोंडवाड्यांत कोंडण्यांत येईल, हें निश्चित आहे. जें निश्चित नाहीं तें हें कीं, अशा कोंडवाड्यांनीं कधीं अंतःकरणें वळतील काय?*

इंग्लंडमधील अधिकारीवर्ग इंग्लंडमधील हिंदी विद्यार्थ्यांचा बंदोबस्त करण्याच्या योजना आंखण्यांत गढून गेला होता त्याच सुमारास पं. शामजी कृष्णवर्मा हे या तरुणांना उत्तेजित करण्यांत मग्न झाले होते. १९०८ सालच्या सप्टेंबर महिन्यांत प्रसिद्ध

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ९७ २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ९४-९८.

झालेल्या ‘ इंडियन सोशिऑलॉजिस्ट ’ च्या अंकांत त्यांनीं The Ethics of Dynamite and British Despotism in India ( डायनमाइटचें नैतिक समर्थन व भारतांतील ब्रिटिश जुलूम ) हा लेख प्रसिद्ध केला. हिंदुस्थानचा राज्यकारभार चालविणाऱ्या ब्रिटिश लोकांच्या प्रतिनिधींना उद्देशून पंडितजींनीं या लेखांत The most organised gang of robbers and murders of the Indian people(हिंदी लोकांना लुबाडणारी व त्यांचे प्राण हरण करणारी अत्यंत सुसंघटित टोळी) हा शब्दप्रयोग वापरला आहे. अशा लोकांशीं वागतांना हिंदी लोकांनीं कोणत्या कमाल मर्यादेपर्यंत जावयाला हरकत नाहीं या प्रश्नाचें उत्तर देतांना पंडितजींनीं इंडियन पीनल कोडांतील आत्मसंरक्षणाच्या कायद्याचें विवरण केलें आहे. एका आयरिश राष्ट्रवाद्याचे पुढील उद्गार पंडितजींनीं या लेखांत उद्धृत केले आहेत :

We cannot be fastidious as to the methods by which our cause may be promoted We will not say : you should alone use dynamite or the knife or the rifle or parliamentary agitation. We hold no Indian true who will not use all and each method, as the opportunity presents itself.

( आमच्या पक्षाची प्रगति होण्यासाठीं आम्ही कोणतीं साधनें वापरावीं या बाबतींत चोखंदळपणा करून आमचें चालणार नाहीं. तुम्ही मात्र डायनमाइट किंवा सुरा किंवा रायफल किंवा पार्लमेंटरी चळवळ चालवावी, असें आम्ही म्हणणार नाहीं. संधीची अनुकूलता पाहून जो सगळ्या किंवा एकेकट्या साधनाचा उपयोग करणार नाहीं, तो खरा भारतीयच नव्हे, असें आम्ही समजतों. )

नेपाळचे त्या वेळचे प्रधान महाराज चंद्रसमशेर जंगबहादूर हे १९०८ च्या मे महिन्याच्या आरंभीं लंडनला गेले होते. सावरकरप्रभृति हिंदी तरुण भारताच्या भवितव्यासंबंधीं आपापसांत चर्चा करीत त्या वेळीं, नेपाळच्या स्वतंत्र हिंदु राज्याचें महत्त्व त्यांच्या लक्षांत आल्यावांचून रहात नसे. नेपाळच्या प्रधानांच्या लंडनमधील मुक्कामांत त्यांच्या निवासस्थानावर फडकत असलेला एकमात्र हिंदुध्वज पाहून ‘अभिनव भारतां’ तल्या तरुणांना धन्यता वाटत असे. नेपाळविषयक चर्चा चालतां चालतां या तरुणांनीं नेपाळच्या प्रधानांना एक पत्र धाडण्याचें ठरविलें. हें पत्र[1] पुढील आशयाचें होतें :

*हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यसंगरांत आपण प्रकट पुढाकार घ्याल तर हा भारतीय साम्राज्याचा देदीप्यमान मुकुट नेपालाधिपतीचे मस्तकावर विराजूं लागले; आपण हिंदुस्थानचे व्हिक्टर इमॅन्युअल व्हाल ! साहस तेवढें करा !*

या पत्रकावर क्रांतिकारकांनीं स्वाक्षऱ्या कशा कराव्या असा प्रश्न निघाला. ह्या स्वाक्षऱ्या रक्तानें केलेल्या असाव्या असें ठरतांच, मदनलाल धिंग्रा यांनीं आपल्या

१ नेपाळी आंदोलनाचा उपक्रम : प्रस्तावना पृ. ४.

घाटावर आघात करून घेतला. मदनलालजींच्या रक्ताच्या शाईनें क्रांतिकारकांच्या स्वाक्षऱ्या करण्यांत आलेलें हें पत्र नेपाळच्या प्रधानांच्या निवासस्थानीं नेऊन देण्यांत आलें. हें पत्र घेऊन जाण्याचें कामहि मदनलालजींनींच केलें होतें. या पत्राचें उत्तर मागण्यासाठीं धाडण्यांत आलेल्या गृहस्थास नेपाळच्या प्रधानांच्या पाहारेकऱ्यानें दुसऱ्या दिवशीं पुढील उत्तर दिलें : पत्र पोंचलें; ईश्वर करील तें खरें ![1] नेपाळच्या प्रधानांना धाडण्यांत आलेल्या या पत्राचा निश्चित काळ ठरविणें शक्य नसलें तरी, हें पत्र १९०८ सालीं ऑगष्ट सप्टेंबरच्या सुमारास धाडण्यांत आलें असावें, असें समजण्यांत मोठीशी चूक होईल, असें वाटत नाहीं.

टिळकांच्या शिक्षेविरुद्ध प्रीव्ही कौन्सिलकडे दाद मागण्यासाठीं श्री दादासाहेब खापर्डे व श्री. दादासाहेब करंदीकर हे लंडनला पोंचले त्याच सुमारास श्री. बिपिनचंद्र पाल, श्री. रामभुजदत्त चौधरी प्रभृति राष्ट्रीय वृत्तीचे पुढारीहि लंडनमध्यें दाखल झाले होते. सावरकरप्रभृति तरुण या मंडळींच्या गांठी-भेटी वारंवार घेऊं लागले व या मंडळींपैकीं कांहीं मंडळी 'इंडिया हाउस'मध्यें जाऊन तेथील तरुणांचें हृद्गत समजावून घेऊं लागली. या मंडळींपैकीं श्री. दादासाहेब करंदीकर यांनीं आपल्या साताऱ्च्या मित्रांना त्या वेळीं जीं पत्रें धाडलीं तीं प्रकाशित झालेलीं आहेत. त्या वेळीं लंडनमध्यें बॅरिस्टरीचा अभ्यास करीत असलेले [ सध्यां दक्षिण आफ्रिकेंत बॅरिस्टरी करीत असलेले ] श्री. वामनराव फडके हे श्री. दादासाहेब करंदीकर यांचे आप्त असल्यामुळें, दादासाहेब करंदीकर 'इंडिया हाउस'मध्यें वारंवार जात असत. स्वतः दादासाहेब हे चिकित्सक सनातनी प्रवृत्तीचे असल्यामुळें, लंडनमधील हिंदी तरुणांच्या आचरणांतील कित्येक गोष्टी त्यांना फारच चमत्कारिक वाटत ! श्री. दादासाहेब करंदीकर हे दि. १२-१०-१९०८ रोजीं 'इंडिया हाउस' मध्यें गेले असतांना, भोजनप्रसंगीं सावरकरांनीं त्यांना अंडें खाण्याबद्दल सुचविलें. चातुर्मासांत स्वतःसमोर कांदा फोडण्यांत आला त्यामुळें गोंधळून गेलेल्या दादासाहेबांनीं त्या प्रसंगाचें जें वर्णन केलें आहे, तें वाचलें म्हणजे सावरकरांनीं केलेली अंड्याबद्दलची सूचना ऐकून दादासाहेबांना काय वाटलें असेल, हें सहज समजतें. दादासाहेबांनीं केलेलें कांद्याचें वर्णन, विनोदी वर्णन या दृष्टीनेंहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे. दि. १८-१०-१९०८ रोजीं 'इंडिया हाउस' मध्यें गेल्या वेळीं घडलेल्या हकीकतीचें वर्णन लिहितांना दादासाहेब म्हणतात :[2]

*इतकी देवाण घेवाण करण्यांत आम्हांस नाक मुठींत धरून, चातुर्मास संपण्यापूर्वीच उभा कापला तर शंख, आडवा कापला तर चक्र याची ओळख जवळून तरी घ्यावी लागली. पण, तेवढ्यावरच निभलें म्हणावयाचें !*

अशा कांहीं गोष्टी असंमत असल्या तरी, दादासाहेब करंदीकर 'इंडिया

१ नेपाळी आंदोलनाचा उपक्रम : प्रस्तावना, पृ. ५.

2 Letters from England : p. 161

हाउस' मधील तरुणांच्या भावनांशीं तात्पुरते तरी तदाकार होत असत, हें पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे.[1]

*इतक्यांत 'इंडिया हाऊस' मधील मॅनेजर वामनराव फडके हे मला व माधवराव यांस जेवावयास बोलावण्यास आले. तेथें भोजनास जाणें म्हणजे मला व कदाचित् बोलावणारासहि संकट! परंतु गेल्यावांचून, त्या मुलांत मिसळल्यावांचून, त्यांचें हृद्गत समजण्याचें नाहीं! .... त्यांस आमच्या पद्धतीविषयीं माहिती झालेलीच होती. संसारांतील जबाबदारी अंगावर न पडलेलीं, तरुण, होतकरू, विद्यामंदिरांत यथेच्छ संचार करून त्यांतील आशयानें भांबावून गेलेलीं, परिस्थितीसंबंधानें तीव्रता जागृत झालेलीं, मुमुक्षत्व (देश) व्रताचा अंगिकार केलेलीं किंवा करण्याविषयीं लालसा असलेलीं एकमेकांशीं केवळ कोणत्याहि प्रकारचा आडपडदा न ठेवतां देशाविषयीं बोलतांना ऐकून तदाकारवृत्ति होऊन मला देखील मी त्यांचेइतकाच तरुण बनलों आहे कीं काय, असा भ्रम पडे.*

हिंदुस्थानांत बॉम्ब पडूं लागल्यामुळें, विलायतेंतले व्यापारी किती भयचकित झाले होते याचेंहि वर्णन दादासाहेबांनीं पत्रलेखनाच्या ओघांत एके ठिकाणीं केलें आहे. दादासाहेब व त्यांचे स्नेही माधवराव हे एका इंग्रज फोटोग्राफरच्या दुकानीं गेले असतां हे हिंदी गृहस्थ व तो इंग्रज यांच्यामध्यें जो संवाद झाला तो वर्णन करतांना[2] दादासाहेब लिहितात :

*त्या फोटोग्राफरला माधवरावांनीं विचारलें : तुम्ही मुंबईस जाऊन धंदा कां करीत नाहीं? त्या युरोपियनानें उत्तर दिलें : कोठें इतकें लांब जाऊं? व शिवाय आतांसे बॉम्ब उडतात; तेव्हां कोणी आपला जीव धोक्यांत घालावा? बॉंबचें भूत या लोकांपावेतों येऊन पोंचलें म्हणावयाचें!*

ही हिंदी पुढारी मंडळी लंडनमध्यें येऊन राहिल्यामुळें, 'फ्री इंडिया सोसायटी' तर्फे भरणाऱ्या जाहीर सभांना विशेष तेज चढूं लागलें. दि. १६-१०-१९०८ रोजीं कॅक्स्टन हॉलमध्यें लाला लजपतराय यांच्या अध्यक्षतेखालीं 'वंगभंग-दिन' साजरा करण्यांत आला. वंगभंगाच्या निमित्तानें राष्ट्रीयत्वाची भावना जन्म पावली असल्यामुळें, हा दिवस म्हणजे राष्ट्रीयत्वाचा वाढदिवस होय असें लालाजींनीं आपल्या भाषणांत सांगितलें. या सभेंत डॉ. कुमारस्वामी, श्री. दादासाहेब करंदीकर, श्री. दादासाहेब खापर्डे इ. मंडळींचींहि भाषणें झालीं. या भाषणानंतर श्री. नीतिसेन द्वारकादास यांनीं 'रक्षाबंधना'चा विधि केला. या वेळीं सभेंत जे शब्द गीताप्रमाणें म्हणण्यांत आले ते पुढीलप्रमाणें[3] होते :

---

1 Letters from England : p. 160.
2 „ „ „ : p 102
3 „ „ „ : pp 149-50.

येन बद्धो बळी राजा दानवेंद्रो महाबळी
तेन त्वाम् प्रतिबध्नामि रक्ष मा चर मा चर ॥

*　　*　　*

एक देश एक भगवान्
एक जाति एक मनःप्राण ।

भाइ भाइ एक ठायि
भेद नाहीं भेद नाहीं ॥

रक्षाबंधनाच्या कार्यक्रमानंतर श्री. बिपिनचंद्र पाल यांचें वक्तृत्वपूर्ण भाषण झालें. त्याचा आशय सावरकर यांनीं पुढीलप्रमाणें[1] दिला आहे :

*बिपिनबाबूंनीं सांगितलें कीं, मी गेल्या वर्षी या वेळेस तुरुंगांत होतों व आज वनवासांत आहें. परंतु, माझें सर्व अंतःकरण तिथें तुरुंगामध्यें अरविंद घोष बसलेले आहेत तिथें राहिलेलें आहे, जेथें बाल गंगाधर आहे तिथें-त्या देशतिलकापाशीं-गुंतलेलें आहे. अरविंद व तिलक या दोन नांवांचें उच्चारण होण्यास तीस-चाळीस मिनिटें लागलीं. कारण, प्रत्येक नांवासाठीं टाळ्यांचा कडकडाट व वंदे मातरम्‌चा गजर पंधरा मिनिटांवर सतत चालला होता! नंतर बिपिनबाबूंनीं ज्या तरुणांनीं राष्ट्रासाठीं अमर्याद यातना सोसून देहाच्या ममतेला ठार मारलें, त्यांचें स्मरण केलें आणि पुन्हां सर्व हॉलभर टाळ्यांच्याशिवाय कांहीं ऐकूं येत नाहींसें झालें त्या प्रचंड कडकडाटांतून वंदे मातरम् हा ध्वनि मात्र सर्वांहून वर चढत जातांना ऐकूं येई. सभेला युरोपियन रिपोर्टर्स व इतर इंग्रजहि आलेले होते. त्यांच्या मुखावर बिपिनबाबूंच्या वक्तृत्वाची छाप हुबेहूब पडलेली होती.*

याच दिवशीं कॅक्स्टन हॉलमध्येंच दक्षिण आफ्रिकेंतल्या हिंदी जनतेविषयीं सहानुभूति व्यक्त करण्यासाठीं, हिंदी लोकांची एक सभा भरविण्यांत आली होती. दादाभाई नौरोजी यांच्या मागून पार्लमेंटमध्यें गेलेले सर मंचरजी भावनगरी हे या सभेचे अध्यक्ष होते. या सभेंत लाला लजपतराय, सावरकर, सकलातवाला बिपिन चंद्र पाल, खापर्डे प्रभृतींचीं भाषणें झालीं.

लंडनमधील हिंदी तरुण व हिंदी राष्ट्रीय पुढारी यांची युति घडल्यामुळें, लंडनमधील हिंदी लोकांच्या चळवळीला जें तेज चढलें तें दि.३-११-१९०८रोजीं झालेल्या एका सार्वजनिक सभेच्या वेळीं चांगलेंच प्रकट झालें. ही सभा 'ईस्ट-इंडिया असोसिएशन' तर्फे कॅक्स्टन हॉलमध्यें भरविण्यांत आली होती. मुंबईचे माजी गव्हर्नर लॉर्ड लॅमिंग्टन हे या सभेच्या अध्यक्षस्थानीं होते. हिंदी विद्यार्थ्यांना एका केंद्रांत आणणें व त्यांच्याच हितासाठीं त्यांच्या चळवळीला दाबांत ठेवणें किती

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १०७.

अवश्य आहे याचें विवरण करणारा निबंध डॉ.पोलन या गृहस्थांनीं या सभेंत वाचला. या सभेंत कांहीं चर्चा झाल्यावर बिपिनचंद्र पाल हे बोलावयास उभे राहिले. त्याबरोबर सभास्थानीं उपस्थित असलेल्या हिंदी विद्यार्थ्यांच्या उत्साहाला भरतें आलें. पालबाबूंच्या भाषणानंतर मुंबईचे वेलिणकर वकील हे राजनिष्ठेच्या भावना बोलून दाखवूं लागले. पोलन साहेबाच्या निबंधवाचनाच्या वेळीं हिंदी तरुणांनीं गडबड केली होतीच. श्री.वेलिणकर बोलत असतांना ही गडबड आणखीच वाढली. या सर्व प्रकाराचें वर्णन त्या वेळच्या 'डेली क्रॉनिकल' पत्रांत प्रसिद्ध झालें असून त्यांतील कांहीं भाग सावरकर यांनीं एका बातमीपत्रांत उद्‌धृत केला आहे. तो भाग पुढीलप्रमाणें आहे :[1]

A demonstration of disloyalty on the part of the Indian students was witnessed yesterday. Lord Lamington referred to the King's Proclamation and said that the Proclamation—that very great Document, which was promulgated yesterday (Loud hissing and derisive laughter) stated our feelings towards them. We do wish them well (Booing and laughter by the students and cheers by the Britishers.) When an Indian student affirmed that there must be awakening in the indian Students first and foremost of a sense of loyalty to the English throne and to the person of the King, the hissing and the derisive laughter were tremendous and the chairman had to call for order

[ हिंदी विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं वसत असलेल्या राजनिष्ठेच्या अभावाचें प्रदर्शन काल रोजीं झालें. लॉर्ड लॅमिंग्टन यांनीं राजेसाहेबांच्या जाहीरनाम्याचा उल्लेख केला व ते म्हणाले : काल रोजीं जो राजेसाहेबांचा जाहीरनामा प्रसिद्ध झाला आहे, त्याचें महत्त्व फार आहे. ( हुश् ! हुश् ! व निंदाव्यंजक हास्य ) हिंदी लोकांविषयीं आमच्या भावना काय आहेत हें त्या जाहीरनाम्यांत स्पष्ट करण्यांत आलेलें आहे. आमच्या मनांत हिंदी लोकांविषयीं सद्‌भावना आहेत. ( हिंदी विद्यार्थ्यांकडून उपहासगर्भ आरोळ्या व हंशा व इंग्रजांकडून टाळ्या !)एक हिंदी विद्यार्थी(मुंबईचे श्री. वेलिणकर ) उभा राहिला. 'हिंदी विद्यार्थ्यांमध्यें इंग्लंडच्या राजसिंहासनाबद्दल व राजेसाहेबांबद्दल निष्ठेची भावना प्रथम जागृत झाली पाहिजे' असें तो जोरजोरानें प्रतिपादूं लागला. ( त्या वेळीं सभेंत हुश् ! हुश् ! असे आवाज आणि उपहासगर्भ हंशा यांची पराकाष्ठा झाली आणि सभाध्यक्षांना सभेंत शांतता प्रस्थापित करावी लागली.)

वरील अवतरणांत राजेसाहेबांचा जाहीरनामा म्हणून ज्याचा उल्लेख आला आहे तो जाहीरनामा दि. २-११-१९०८ रोजीं प्रसिद्ध करण्यांत आला होता. कंपनी सरकारकडे असलेली हिंदुस्थानची राज्यव्यवस्था इंग्लंडच्या राजानें स्वतःकडे घेतली या गोष्टीला पन्नास वर्षें झालीं, या प्रसंगाच्या स्मरणार्थ हा जाहीरनामा काढण्यांत आलेला होता. हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो यांनीं जोधपूर येथें बडा दरबार भरवून हा जाहीरनामा भारतीय प्रजेला कळविला. या जाहीरनाम्याला - क्रांतिकारक

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १०९-११०.

पक्षाकडून तत्काळ उत्तर देण्यांत आलें. १८५८ सालीं राणीचा जाहीरनामा प्रसिद्ध झाल्याबरोबर अयोध्येच्या बेगमनें त्या जाहीरनाम्याला उत्तर म्हणून एक विस्तृत जाहीरनामा अयोध्येच्या प्रजाजनांना उद्देशून काढला होता. क्रांतिकारक पक्षानें अयोध्येच्या बेगमचा हा जुना जाहीरनामा या वेळीं छापून काढला. १८५७ च्या क्रांतियुद्धावरील सावरकरांचें मराठी पुस्तक हिंदुस्थानांत छापणें अशक्य आहे असें ठरल्यामुळें, त्या पुस्तकाची हस्तलिखित प्रत लंडनला परत आलेली होती. दि. १३-१०-१९०८ रोजीं श्री. वामनराव फडके हे बॅरिस्टरीच्या परीक्षेच्या कामांतून मोकळे झाल्यामुळें ते व श्री. कोरेगांवकर यांनीं मिळून या पुस्तकाचें इंग्रजी भाषांतर करण्याला या सुमारास सुरुवात केलेली होती. अयोध्येच्या बेगमचा हा जाहीरनामा 'Indian War of Independence' या सावरकरांच्या पुस्तकांत समाविष्ट झालेला आहे.[1]

खुदीराम बसू, कन्हय्यालाल दत्त, सत्येंद्रनाथ बोस प्रभृतींना फांशीच्या शिक्षा देण्यांत आल्या व माणिकतोळा बाग कटाच्या खटल्यांतील तरुण आरोपींना जबरदस्त शिक्षा ठोठावण्यांत येणार ही खात्री दिसूं लागली तरी, बंगालमधील तरुणांचें क्रांतिकारक धोरण बदललें नाहीं. रॉय चौधरी नांवाच्या तरुणानें दि. ७-११-१९०८ रोजीं बंगालचे ले. गव्हर्नर सर अँड्र्यू फरेझर यांच्यावर गोळी झाडली. पण नेम चुकल्यामुळें सर अँड्र्यू फरेझर यांचा जीव बचावला. खुदीराम बसू यांना पकडणारे गुप्त पोलिस खात्यांतील सब इन्स्पेक्टर श्री. नंदलाल बॅनर्जी हे दि. ९ नोव्हेंबर रोजीं एका क्रांतिकारकाच्या गोळीला बळी पडले. बंगालमध्यें घडत चाललेल्या या घटनांचा पंडित शामजी कृष्णवर्मा यांच्या मनावर कोणता परिणाम झाला व लंडनमध्यें असलेल्या प्रौढ भारतीयांवर या प्रकारांचा कोणता परिणाम झाला हें श्री. दादासाहेब करंदीकर यांनीं दिनांक २९-११-१९०८ रोजीं लिहिलेल्या पत्रांतल्या एका उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे. या दिवशीं श्री. दादासाहेब करंदीकर व ना. गोखले यांची बॅ. पारेख यांच्या घरीं भेट झाली. त्या ठिकाणीं या दोघां महाराष्ट्रीयांचें जें संभाषण झालें त्याचा सारांश या पत्रांत[2] देण्यांत आलेला आहे. त्या दिवशींच्या 'डेली मेल' मध्यें प्रसिद्ध झालेल्या एका महत्त्वाच्या पत्राचा ना. गोखले यांनीं या संभाषणांत उल्लेख केला. बंगालमधील तरुणांचें कार्य सतत स्मरणांत राहील अशीं कृत्यें करण्यासाठीं ज्यांनीं आपलें जीवन वाहिलें आहे, अशा तरुणांचें आश्रयस्थान म्हणून 'इंडिया हाउस' हें ठिकाण यापुढें चालू राहील, अशा आशयाच्या पंडितजींच्या लेखाचा उल्लेखहि गोखले यांनीं केला. लंडनमधील हिंदी तरुण उन्मार्गगामी बनूं नयेत या हेतूनें सरकार कांहींतरी बंदोबस्त करण्याच्या विचारांत आहे, असेंहि गोखले यांनीं या संभाषणप्रसंगीं सूचित केलें.

या सुमारास पं. शामजी कृष्णवर्मा यांच्या मनांत जे विचार घोळत होते ते 'इंडियन सोशिऑलॉजिस्ट' पत्राच्या १९०८ सालच्या डिसेंबरच्या अंकांत व्यक्त

---

1 Part II : pp. 132 135
2 Letters from England : pp. 338-39.

झाले. खुदीराम बसू, प्रफुल्ल चाकी, कन्हय्यालाल दत्त व सत्येंद्रनाथ बोस या चार तरुणांचा वर्तनक्रम निर्मळ निःस्वार्थीपणाचा होता, असें पंडितजींनीं या लेखांत म्हटलें होतें. या चार तरुणांचें स्मारक होणें अवश्य आहे, असें प्रतिपादन करण्याच्या ओघांत पंडितजींनीं पुढील वाक्यें[1] लिहिलीं होतीं :

Their deeds which the enemies of India have called crime must be regarded as patriotism and virtue by all Indians, who really love their country.

( भारताच्या शत्रूंनीं या तरुणांच्या कृत्यांचें ' गुन्हा ' या शब्दानें वर्णन केलें आहे. भारतावर खरें प्रेम करणाऱ्या सर्व भारतीयांनीं त्यांच्या कृत्याला उद्देशून देश-प्रेम व सद्‌गुण हे शब्द लाविले पाहिजेत. )

या विवेचनानंतर पंडितजींनीं या तरुणांच्या स्मारकासाठीं म्हणून आपण पांच हजार रुपये देत असल्याचें जाहीर केलें. या रकमेपैकीं कांहीं भाग खुदीराम बसूंच्या आईबापांना देण्यांत यावा, उरलेल्या रकमेंतून या चौघां तरुणांच्या नांवें शिष्यवृत्त्या देण्यांत याव्या, व या चौघांचीं नांवें 'इंडिया हाउस' मधील एका स्मरणशिलेवर ( Tablet ) नोंदविण्यांत यावीं, अशी योजना पंडितजींनीं या लेखाच्या द्वारा जाहीर केली.

या सालच्या डिसेंबर महिन्याच्या उत्तरार्धांत लंडनमधील हिंदी तरुणांनीं सभापरिषदांचे पुष्कळच कार्यक्रम पार पाडले. शुक्रवार दि. १८ डिसेंबरपासून या कार्यक्रमांना प्रारंभ झाला. दि. १८ व १९ रोजीं कॅक्स्टन हॉलमध्यें दे. भ. बिपिन-चंद्र पाल यांचीं व्याख्यानें झालीं. या व्याख्यानांना माणशीं अडीच रुपये दराचीं तिकिटें ठेवण्यांत आलीं होतीं. तरी देखील व्याख्यानांना हिंदी व इंग्रज श्रोत्यांच्या झुंडीच्या झुंडी लोटूं लागल्या. पालबाबूंच्या व्याख्यानांबरोबर कामाबाईंचेंहि एक व्याख्यान झालें. त्यांनीं आपला आवडता राष्ट्रध्वज सभास्थानीं फडकावला; त्या-बरोबर सर्व सभासद उभे राहिले व 'वंदे मातरम्'च्या गर्जनांचा वर्षाव सुरू झाला. ही व्याख्यानमाला चालू असतांनाच, दि. २० डिसेंबर रोजीं इंग्लंडमधील हिंदी लोकांची राष्ट्रीय परिषद लंडन येथें भरविण्यांत आली. या बैठकीला कामाबाईप्रमाणेंच बॅ. राणा हेहि उपस्थित होते. या परिषदेचें अध्यक्षस्थान श्री. दादासाहेब खापर्डे यांना देण्यांत आलेलें होतें. या परिषदेंत अध्यक्षांच्या प्रास्ताविक भाषणा-नंतर, डॉ. कुमारस्वामी यांनीं 'स्वराज्या'चा ठराव मांडला व सावरकर यांनीं त्या ठरावाला पाठिंबा दिला. आपल्या भाषणांत सावरकर म्हणाले :[2]

*स्वराज्याचा सत्य अर्थ पूर्ण स्वातंत्र्य हाच असून इतक्या स्पष्ट उच्चारानें या साध्याला तुम्ही संमति देत आहां.परंतु ती संमति देण्यापूर्वी त्या शब्दांचा खरा अर्थ लक्षांत बाळगा. या अंतिम साध्याला संमति देण्यापूर्वीं तुरुंगाच्या*

---

१ दि. १३-२-१९०९ च्या ' लंडन टाइम्स ' मधील उताऱ्यावरून.

२ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ११३.

*भिंती व अंधाराच्या गुहा इत्यादिकांचीं चित्रें डोळ्यांपुढें आणा; त्या चित्राच्या भयानक देखाव्यांत तुम्हांला आकर्षण करणारें मनोहरत्व दिसतें आहे कीं नाहीं, तें पहा. बिस्तराच्या निखाऱ्यावर पाय ठेवून, तो मृदु गादीवर टेविल्याप्रमाणें अचंचल पडत आहे कीं नाहीं, हें निश्चित करा व मग ह्या यज्ञांत आनंदानें बलिदान करण्याची प्रकट इच्छा होत आहे; असें जर तुम्हांला वाटत असेल तरच या ठरावास आज संमति द्या; नाहीं तर घाई करण्यांत कांहीं हंशील नाहीं. स्वराज्य हें दिव्य आहे व दिव्य अंतःकरणांतच तें वृद्धिंगत होऊं शकतें.*

या परिषदेंत 'बॉयकॉट' च्या ठरावावर कामाबाईचें भाषण झालें व श्री. ग्यानचंद्र वर्मा यांनीं त्या ठरावाला पाठिंबा दिला. तुर्कस्थानच्या लोकांनीं आपली राज्यपद्धति लोकसत्तेच्या तत्त्वावर नेल्याबद्दल एका ठरावानें त्यांचें अभिनंदन करण्यांत आलें. या ठरावावर श्री. व्ही. व्ही.एस्.अय्यर यांनीं भाषण केलें व आगाखान महाशयांनीं या ठरावाला पाठिंबा दिला. दि. २० डिसेंबर रोजीं झालेल्या या परिषदेंत लाला हरदयाळ यांनीं बहिष्काराच्या ठरावावर बोलावें असें सुचविण्यांत आलें होतें. लालाजींनीं ही सूचना झिडकारली. दि. २१ रोजीं श्री. बिपिनचंद्र पाल यांचें ईजिप्तविषयक व्याख्यान झालें. त्या वेळीं डॉ. कुमारस्वामी यांचें नांव अध्यक्षपदासाठीं सुचविण्यांत आलें. ही सूचना मांडण्यांत आल्याबरोबर सभास्थानीं उपस्थित असलेले हरदयाळजी अकस्मात् सभात्याग करून निघून गेले. लागोपाठ दोन दिवस घडलेल्या आपल्या वर्तनक्रमाचा खुलासा करणार हरदयाळजींचें दि. २२-१२-१९०८ चें पत्र प्रस्तुत लेखकानें पाहिलें आहे. लालाजींच्या स्वभावाची ओळख पटण्याच्या दृष्टीनें या पत्रांतलि पुढील वाक्यें सर्वांनाच बोधप्रद वाटतील.

I at once refused to appear on the same platform with a person who was a Hindu, but who has been converted to Christianity since his arrival in England, under circumstances which are known to all... The list of speakers at this meeting included men who have married English women and Mohamedans who are so patriotic as to eat beef...Dr. Coomar Swami is an Eurasian has married an English woman although he possesses an Indian name and wears a turban.

( जन्मतः हिंदु असलेल्या पण इंग्लंडांत आल्यावर सर्वांना माहीत झालेल्या परिस्थितींत ख्रिश्चन धर्माचा स्वीकार केलेल्या इसमाच्या खांद्याला खांदा भिडवून, व्यासपीठावर उभें राहून व्याख्यान देण्याला मी तत्काळ नकार दिला...या सभेंत भाषण करणाऱ्या वक्त्यांची यादी मी पाहिली. इंग्लिश स्त्रियांशीं विवाहबद्ध झालेले लोक व ज्यांच्या देशभक्तीची मजल गोमांस खाण्यापर्यंत गेल्ली आहे असे मुसलमान यांचीं नांवें मला या यादींत आढळलीं...डॉ. कुमारस्वामी हे युरेशियन आहेत, ते हिंदी नांव लावतात व डोक्याला पागोटें घालतात हें खरें असलें तरी, त्यांनीं एका इंग्रज बाईशीं लग्न केलें आहे. )

या वर्षी डिसेंबरच्या २९ तारखेस कॅक्स्टन हॉलमध्यें श्री गुरु गोविंदसिंहांच्या जन्मातिथीचा उत्सव भव्य प्रमाणावर साजरा करण्यांत आला. या समारंभाचें अध्यक्षस्थान श्री. बिपिनचंद्र पाल यांना देण्यांत आलें होतें. समारंभाच्या प्रारंभीं 'आमार देश' व 'प्रियकर हिंदुस्थान' हीं अनुक्रमें बंगाली व मराठी गीतें गाण्यांत आलीं. गुरु नानकांच्या ग्रंथांतील धार्मिक प्रार्थना म्हणण्यांत आल्यावर, प्रो.गोकुळचंद नारंग यांनीं गुरु गोविंदसिंहांच्या चारित्रासंबंधींचा आपला निबंध वाचून दाखविला. लाला लजपतराय व सभाध्यक्ष श्री.बिपिनचंद्र पाल यांच्या भाषणानंतर सावरकर हे श्रोत्यांच्या आग्रहावरून बोलावयास उठले ते म्हणाले.

*निशाणाच्या वरतीं लिहिलेले तीन शब्द देग, तेग, फत्ते यांचा अर्थ पुष्कळांना कळणार नाहीं. शीख धर्माची व गुरु गोविंदसिंहांच्या चरित्राची ही तीन शब्दांची फुली आहे व ती श्री गुरु गोविंदसिंहांनींच उच्चारली आहे. देग म्हणजे तत्त्व होय. तेग म्हणजे तलवार होय व फत्ते म्हणजे विजय होय. तलवारीवांचून तत्त्वहि पंगू पडतें असें पाहून, गोविंदसिंहांनीं तलवार उपसली आणि हिंदु पक्ष शेवटीं विजयी झाला.*

या प्रसंगीं सावरकरांनीं जें व्याख्यान दिलें त्याहून अधिक परिणामकारक व्याख्यान एकाद्या शिखालाहि देतां आलें नसतें, असें प्रशस्तिपत्रक श्री.एम्.पी.टी. आचार्य यांनीं दिलें आहे.[2] सावरकरांचें या प्रसंगींचें भाषण इतकें परिणामकारक वठलें याचें कारण असे कीं, सावरकरांनीं या सुमारास शीख पंथांतील धर्मग्रंथांचा अभ्यास बारकाईनें चालविला होता. हिंदी सैन्यांतील शीख सैनिकांना चेतविणें हें क्रांतिकारक पक्षाच्या कार्यक्रमाचें एक महत्त्वाचें अंग आहे हें लक्षांत आल्यामुळें, सावरकर यांनीं १९०८ सालच्या सुरुवातीच्या सुमारासच गुरुमुखी भाषेच्या अभ्यासाला आरंभ केला होता. ही भाषा हस्तगत झाली असें वाटूं लागल्याबरोबर, सावरकरांनीं आदि ग्रंथ, पंथप्रकाश, सूर्यप्रकाश, विचित्र नाटक वगैरे शीख पंथांतील ग्रंथ वाचून काढले व गुरुमुखी भाषेंत थोडेंफार लिहिण्याइतपत तयारी केली. सावरकरांनीं शीख सैनिकांना उद्देशून लिहिलेलीं हजारों पत्रकें विलायतेंतून रवाना होऊं लागलीं, तीं पंजाबमधील पलटणींतून वाटलीं जाऊं लागलीं आणि वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं पकडल्यावरहि तीं पत्रकें सैनिकांकडून वाचलींहि जाऊं लागलीं.[3]

दि. २९-१२-१९०८ रोजीं झालेल्या श्री गुरु गोविंदसिंहांच्या जन्मोत्सव प्रसंगीं 'प्रियकर हिंदुस्थान' हें मराठी पद्य म्हणण्यांत आलें तें सावरकरांनींच रचलेलें असावें. इंग्लंडमधील मुक्कामांत १९०८ सालीं सावरकरांनीं दोन कविता रचल्या, असा शोध लागतो. यांपैकीं एका कवितेचें नांव 'हिंद सुंदरा ती' हें असून

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ११७. 2 Mahratta : 27-8-1937

३ नेपाळी आंदोलनाचा उपक्रम : प्रस्तावना पृ. ४.

दुसरीचें नांव ' सुंदर हिंदुस्थान ' असें आहे. ' विहारी ' मधील ' वंदे मातरम् ' या लेखाचा उल्लेख यापूर्वीच्या एका प्रकरणांत करण्यांत आलेला आहे. या लेखांतील काव्यमय कल्पना या दोन कवितांमध्यें ग्रथित करण्यांत आलेल्या आहेत. यांपैकीं एकादी कविता दि. १० मे च्या उत्संवाप्रीत्यर्थ रचण्यांत आली होती कीं काय व दुसरी कविता दि. २०-१२-१९०८ रोजीं झालेल्या राष्ट्रीय परिषदेच्या निमित्तानें रचली होती कीं काय, असा प्रश्न एकाद्याच्या मनांत सहज उद्‌भवण्यासारखा आहे. 'सकल जगामधिं छान। अमुचें प्रियकर हिंदुस्थान' या चरणांनीं 'सुंदर हिंदुस्थान' या कवितेची सुरुवात झालेली आहे. कवितेंत, ' पुण्यभूमि तूं । पितृभूमिहि तूं । तूं अमुचा अभिमान । ' हे चरण आलेले आहेत, ही गोष्ट लक्षांत बाळगण्या-सारखी आहे.

पॅरिसमध्यें खरेदी करण्यांत आलेलीं वरीचशीं ब्राऊनिंग रिव्हाल्व्हर्स,काडतुसांच्या कांहीं पेट्या वगैरे जिन्नस सावरकरांच्या हातीं नेमके केव्हां पडले हें सांगणें अवघड असलें तरी, १९०८ च्या डिसेंबर महिन्यांत अगर १९०९ च्या जानेवारी महिन्याच्या प्रारंभीं हे जिन्नस ' इंडिया हाउस ' मध्यें आले असले पाहिजेत, असें अनुमानानें सिद्ध होतें. चतुर्भुजबरोबर सावरकरांनीं धाडलेलीं रिव्हॉल्व्हर्स पॅरिस-मध्यें खरेदी करण्यांत आलेलीं होतीं व तीं सावरकरांनीं स्वतः खरेदी केलेलीं नव्हतीं असें इंग्लंडच्या गुप्त पोलीस खात्यांतले अधिकारी मि. पार्कर यांनीं नाशिक कटाच्या खटल्यांत झालेल्या त्यांच्या साक्षींत पुढें सांगितलें. हीं रिव्हॉल्व्हर्स पॅरिसमध्यें कोणीं, केव्हां व कोणत्या दुकानीं खरेदी केलीं व खरेदी करण्यांत आलेल्या सर्व रिव्हॉल्व्ह-र्सचे क्रमांक कोणकोणते ही माहिती इंग्लिश पोलीस खात्याला आहे, असेंहि मि. पार्कर यांनीं सांगितलें; पण, ही माहिती खटल्यांत पुढें आली नाहीं. रविवार दि. ७-३-१९०९ रोजीं चतुर्भुज एका इटालियन बोटीनें मुंबईस येऊन पोंचला. दि. १५-२-१९०९ रोजीं तो इंग्लंड सोडून निघाला होता व त्यानें हिंदुस्थानला जाण्यासाठीं बोटींत पाय ठेवला तो जिनोवा येथें ठेवला. या सर्व गोष्टी चतुर्भुजनें स्वतःच पुढें सांगितल्या.[1] चतुर्भुज दि. १५-२-१९०९ रोजीं इंग्लंडहून निघाला त्यापूर्वी कांहीं दिवस रिव्हॉ-ल्व्हर्स घेऊन जाण्याला त्यानें तयार व्हावें म्हणून सावरकर त्याचें मन वळवीत होते. ही कामगिरी शिरावर घेतल्याबद्दलचें बक्षिस म्हणून सावरकरांनीं चतुर्भुजला पांच पौंड दिले. सावरकर व अय्यर यांनीं मिळून, मुद्दाम बनविलेल्या पेटींत पिस्तुलें वगैरे सर्व वस्तु नीट व्यवस्थित रीतीनें भरल्या. ही सर्व तयारी होऊन चतुर्भुज दि. १५-२-१९०९रोजीं इंग्लंड सोडून निघाला त्या अर्थीं, पॅरिस येथें खरेदी करण्यांत आलेलीं रिव्हॉल्व्हर्स डिसेंबर महिन्याच्या शेवटीं अगर जानेवारी महिन्याच्या सुरुवातीला सावरकरांच्या हातीं पडलीं असलीं पाहिजेत, हेंच युक्तिसंमत दिसतें. सावरकरांनीं चतुर्भुजजवळ एक पाकीट दिलें होतें व त्या पाकिटावर मुंबईचे दोन पत्ते दिलेले

१ दि. ५-५-१९१० रोजीं मि. मॅंटगॉमरी यांच्यासमोर झालेला जबाब.

होते. हरि अनंत थत्ते, १२० मिंट रोड, हा या पत्त्यांपैकीं एक पत्ता होता व विष्णु महादेव भट, माधवाश्रम, हा दुसरा पत्ता होता. चतुर्भुज मुंबईस येऊन पोंचल्यावर त्याची तपासणी झाली हें खरें; पण ज्या पेटींत या वस्तु भरलेल्या होत्या ती पेटी बेमालूम रीतीनें बनविण्यांत आलेली असल्यामुळें, चतुर्भुज या सर्व वस्तू घेऊन मुंबई येथें सरदारगृहांत जाऊन उतरला. सावरकरांच्याकडून रिव्हॉल्व्हर्स घेऊन कोणी तरी निघाला आहे ही माहिती पोलीस खात्यामार्फत मुंबईस येऊन पोंचली असली पाहिजे. सावरकरांनीं धाडलेलीं हीं रिव्हॉल्व्हर्स बाबा सावरकर यांच्याकडे रवाना होतील, असा पक्का संशय मुंबईच्या पोलिसांना आल्यामुळें, रिव्हॉल्व्हर्स मुंबईला येऊन पोंचण्यापूर्वींच बाबा सावरकर यांना अटक करण्याची तत्परता मुंबई सरकारकडून दाखविण्यांत आली असली पाहिजे. दि. २८-२-१९०९ रोजीं बाबा सावरकर यांना नाशिकच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटच्या वॉरंटच्या आधारें मुंबई येथें माधवाश्रमांत अटक करण्यांत आली. ही अटक होण्याच्या सुमारें पंधरा दिवस आधीं, सावरकरांचा मुलगा प्रभाकर हा नाशिक येथें देवीनें मरण पावला होता. कुटुंबावर हा दुःखाचा प्रसंग ओढवला असूनहि, बाबा सावरकर तांतडीनें मुंबईस आले याचें कारण असें दिसतें कीं, चतुर्भुजच्या आगमनाची व त्याच्याबरोबर येत असलेल्या सामानाची त्यांना कल्पना होती व तें सामान हस्तगत करून त्याची विल्हेवाट लावण्याला आपण वेळेवर हजर असलें पाहिजे या गोष्टीची जाणीव त्यांना झालेली होती.

बाबा सावरकर यांना मुंबईस अटक झाल्यावर त्यांना नाशिक येथें नेण्यांत आलें त्या वेळीं विष्णु महादेव भट हेहि त्यांच्याबरोबर नाशिकला गेले होते. प्रवासांत बरोबर असलेल्या पोलिसांचें विशेषसें लक्ष नाहीं असें पाहून, भट यांनीं बाबा सावरकरांना कांहीं प्रश्न विचारले, सरकारच्या दृष्टीनें आक्षेपार्ह ठरणाऱ्या कांहीं वस्तू कोठें असतील तर त्यांची माहिती बाबांनीं आपल्याला सांगावी अशी भट यांची इच्छा होती. पण, बाबा सावरकर यांनीं या प्रसंगीं विशेष अशी कांहींच माहिती सांगितली नाहीं. एक-दोन दिवस नाशिक येथें राहिल्यावर भट मुंबईस परत आले. दि. ७-३-१९०९ रोजीं चतुर्भुज मुंबईस येऊन पोंचल्यावर त्यानें प्रथम थत्ते यांची भेट घेण्याचा प्रयत्न केला. थत्ते भेटले नाहींत म्हणून चतुर्भुजनें आपला मोर्चा माधवाश्रमाकडे वळविला. तेथें त्याची व भट यांची भेट झाली. चतुर्भुज याच्याबरोबर आलेल्या वस्तू गोपाळराव पाटणकर यांच्या स्वाधीन करण्यांत याव्या असें ठरल्यावर, चतुर्भुज पाटणकर यांच्या बिऱ्हाडीं गेला. पाटणकर व चतुर्भुज या दोघांवरहि पोलिसांची टेहळणी होती. असें असूनहि गोपाळराव पाटणकर यांनीं चतुर्भुजनें आणलेल्या जोखमीच्या वस्तु पोलिसांना हुलकावणी देऊन आपल्या बिऱ्हाडीं आणल्याच! थोड्याच दिवसांनीं त्यांनीं त्या वस्तू पेणला पाठवून दिल्या. चतुर्भुजबरोबर लहानमोठीं मिळून एकंदर २१ रिव्हॉल्व्हर्स आलीं होतीं. त्यांतलें एक रिव्हॉल्व्हर चतुर्भुजनें स्वतःसाठीं ठेवून घेतलें आणि उरलेलीं रिव्हॉल्व्हर्स व इतर सामान त्यानें गोपाळराव पाटणकरांच्या स्वाधीन केलें.

बाबा सावरकर यांना पकडून मुंबईहून नाशिकला नेलें तेव्हां श्री. गणपतराव जोगळेकर हे मुंबईस होते. ते त्या वेळीं एलएल्. बी. चा अभ्यास करीत होत. आपल्या गैरहजेरींत आपल्या एका मित्रानें लॉ क्लासमध्यें आपली हजेरी मांडावी अशी व्यवस्था केल्यावर, उभ्याउभ्या नाशिकला जाऊन येण्याच्या इराद्यानें जोगळेकर मुंबईहून निघाले. नाशिकला पोंचतांच त्यांनीं येसूवहिनींची भेट घेतली. कोठुरें येथील बर्वे यांच्या घरीं कांहीं बॉम्ब तयार करून ठेवण्यांत आलेले आहेत, पोलिसांची झांप पडण्यापूर्वी बर्वे यांना इषारा दिला पाहिजे, नाशिकच्या खात्रीच्या माणसांपैकीं कोणाला कोठुऱ्यास धाडलें तर त्या परिचित माणसाचा पोलिस सावलीप्रमाणें पाठलाग करतील नाशिकबाहेरच्या माणसामार्फत कोठुरें येथें निरोप धाडला पाहिजे — अशा विचारांत वहिनी गढून गेल्या आहेत तोंच गणपतराव जोगळेकर हे त्यांच्यापुढें येऊन उभे राहिले. कोठुऱ्यास जाण्याची कामगिरी वहिनींनीं जोगळेकरांना सांगितली. जोगळेकर हे नाशिक प्रांताशीं अपरिचित असल्यामुळें, त्यांना सोबत म्हणून एक अल्पशिक्षित तरुण देण्यांत आला. त्या मुलाला घेऊन श्री. जोगळेकर कोठुऱ्यास गेले व तेथील सर्व कामगिरी बजावून ते परत मुंबईस गेले. पुढें नाशिक कटाचा तपास लावण्यासाठीं पोलिसांचे प्रयत्न सुरू झाले तेंव्हां पुण्याच्या पोलिसांनीं श्री. जोगळेकर यांचा पिच्छा पुरविला. 'अमुक दिवशीं तुम्हीं कोठुऱ्यास गेलां होतां कीं नाहीं,' असा प्रश्न पोलिसांनीं विचारला, तेव्हां जोगळेकर यांनीं त्या दिवशीं लॉ-क्लासमध्यें लागलेली स्वतःची हजेरी पुरावा म्हणून पुढें आणली आणि त्यामुळें जोगळेकर या प्रकरणांतून शीरसलामत बाहेर पडले.

बाबा सावरकर यांच्यावरील खटल्याचें काम चालून त्यांनीं 'अभिनव भारत' मालेंत प्रसिद्ध केलेल्या कविता आक्षेपार्ह ठरविण्यांत आल्या. या कविता प्रसिद्ध करून बाबा सावरकरांनीं राजाशीं युद्ध करण्याचा प्रयत्न केला असा आरोप सिद्ध करून त्यांना पुढें दि.८-६-१९०९रोजीं काळ्या पाण्याची शिक्षा देण्यांत आली. बाबा सावरकर कच्चया कैदेंत होते, त्या काळांत त्यांचे बंधू नारायणराव हे त्यांच्यासाठीं अन्न वगैरे घेऊन जात असत. एकदां नारायणराव बाबांना भेटावयास आले असतां,स्वतःजवळ असलेल्या तांब्यावर कांहीं तरी लिहून,बाबांनीं तें नारायणरावांना दाखविण्याचा प्रयत्न केला, असा पोलिसांना संशय आला. या कैद्याच्या मनांत कांहीं तरी गुप्त गोष्टी डांचत आहेत, असा संशय आल्याबरोबर, पोलिसांनीं आपलें जाळें पसरण्याला सुरुवात केली. नारायणराव सावरकर बाबांना फिरून एक वेळ भेटले त्या वेळीं, आसपास, पोलिस नाहींत असें समजून, बाबा सूचक भाषेंत नारायणरावांशीं बोलूं लागले. 'घरांत कौलाराखालीं अमुक ठिकाणीं पांच रुपयांची नोट ठेवलेली आहे व भिंतीच्या वळचणीला अमुक ठिकाणीं अमुक औषधें ठेवलेलीं आहेत.' हें या बंधूंचें संभाषण पोलिसांनीं चोरून ऐकलें ! त्यांनीं तत्काळ घराची झडती घेण्याचा हुकूम मिळविला. नारायणराव सावरकर घरीं जाऊन पोंचले न

पोंचले तोंच, पोलिसांची धाड घरावर जाऊन पडली. नेमकीं ठिकाणें त्यांना माहीत झालेलींच होतीं. तेथें जाऊन त्यांनीं हात घातला. या झडतींत 'बॉम्ब मॅन्युअल' च्या सायक्लो-स्टाइलवर छापलेल्या कित्येक प्रती, सावरकरांच्या 'मॅझिनी' च्या दीडशें प्रती आणि 'अभिनव भारत' संस्थेच्या भिन्न भिन्न शाखांतील सभासदांची नांवनिशीवार यादी या वस्तू पोलिसांच्या हातीं लागल्या. नाशिक कटाच्या खटल्यांत जे लोक पकडले गेले त्यांतले पुष्कळसे लोक जॅक्सन-खुनानंतर पकडले गेले हें खरें असलें तरी या झडतींत पोलिसांच्या हातीं लागलेली माहिती पोलिसांना फार उपयोगी पडली असली पाहिजे. यांत शंका नाहीं.

पॅरिसमधून मिळणारी क्रांतिकारक विचारांची सूचना, क्रांतिकारक कृत्यांसाठीं अवश्य असणाऱ्या साधनांचा लंडनमधून होणारा पुरवठा व हिंदुस्थानांत घडणारीं क्रांतिकारक कृत्यें यांची सांधेजोड पाहून भांबावून गेलेल्या इंग्लंडमधील सरकारी अधिकाऱ्यांना युरोपमधल्या क्रांतिकारकांच्या कांहीं हालचालींमुळें अधिकच भय वाटावें, अशी परिस्थिति या सुमारास निर्माण झालेली होती. लंडनमधील सावरकर-प्रभृति तरुण आयरिश राष्ट्रवाद्यांशीं संधान जुळविण्याच्या कामांत पुष्कळच यशस्वी झालेले होते. बेल्जममध्यें पिस्तुलें फार चांगलीं तयार होतात; कोणा तरी हिंदी तरुणाला तेथें पाठवून ही विद्या हस्तगत करून घ्यावी, असा विचार लंडनमधील मंडळींच्या मनांत या काळांत घोळत होता. पॅरिसमध्यें जाऊन राहिलेले शामजी कृष्णवर्माप्रभृति हिंदी चळवळये इजिप्तमधील राष्ट्रवाद्यांशीं संधानें जुळविण्याच्या उद्योगांत नेहमीं गढून गेलेले असतात, ही गोष्ट ब्रिटिश सरकारला माहीत होती जर्मन मालाच्या आक्रमणामुळें व हिंदुस्थानांतील बहिष्काराच्या वृत्तीमुळें ब्रिटिश व्यापार ओहोटीला लागल्याचीं, स्पष्ट लक्षणें ब्रिटिश सरकारला १९०८ च्या आरंभीं दिसूं लागलीं. त्यामुळें त्यांनीं या बाबतींत खोल चौकशी चालविली. तेव्हां त्यांना असें आढळून आलें कीं, बर्लिन येथील 'जर्मन कमर्शिअल ब्यूरो' नें दोघां हिंदी तरुणांना नोकरीला ठेवलें आहे. हिंदी लोकांच्या आवडीनिवडीप्रमाणें कोणता माल कसा बनवावा याबद्दलच्या सूचना जर्मन कारखानदार या तरुणांपासून मिळवीत असतात, असेंहि या चौकशींत निष्पन्न झालें.[१] अशा मिषानें जर्मनींत घुसलेले हिंदी तरुण कोणकोणत्या उद्योगांत गढलेले असतात, हिंदी क्रांतिकारकांच्या ब्रिटनविरोधी भावना व प्रत्येक बाबतींत ब्रिटनपेक्षां श्रेष्ठ ठरणाऱ्या जर्मनीची महत्त्वाकांक्षा यांचा मिलाफ कोठें होतो कीं काय, वगैरे गोष्टींची टेहळणी करीत राहण्याचा एक नवाच उद्योग ब्रिटिश हेरखात्याला या काळांत हातीं घ्यावा लागला. तुर्कस्थानांतल्या क्रांतिकारकांची एक गुप्त बैठक १९०८ च्या प्रारंभीं पॅरिसमध्यें झाली होती. या निमित्तानें पॅरिसला जमलेल्या तुर्की क्रांतिकारकांशीं तेथील हिंदी क्रांतिकारकांनीं कांहीं गुजगोष्टी केल्या नसतीलच, असें म्हणतां येणार नाहीं. 'गॅलिक अमेरिकन' पत्रामार्फत अमेरिकेंत सुरू करण्यांत आलेला प्रचार व लंडनच्या अभिनव

---

१ लंडन टाइम्स : दि. २७-३-१९०८.

भारतीय केंद्रांतून हिंदी लष्करांत प्रसृत केलीं जाणारीं पत्रकें यांचा परिणाम या काळांत हळुहळू होऊं लागलेला होता. अमेरिकेच्या प्रशांत सागराच्या बाजूच्या विभागांत हिंदी लोकांची राजद्रोही चळवळ चालू आहे, अशा आशयाचें वृत्त 'लंडन टाइम्स'च्या व्हॅन्कूव्हर येथील वार्ताहरानें दि. २० मे १९०८ रोजीं धाडिलें तें 'लंडन टाइम्स'च्या दि. २५ मे १९०८ च्या अंकांत प्रसिद्ध झालेलें आढळतें. अमेरिकेंतल्या न्यू वेस्टमिन्स्टर या महत्त्वाच्या शहरानजीक असलेल्या मिल्साइड या गांवांतून या चळवळीचीं सूत्रें हलविलीं जातात, शीखांना इंग्रजी शिकविण्यासाठीं म्हणून चालविण्यांत येणारी एक शाळा प्रत्यक्षपणें क्रांतिकारक कल्पनांचा फैलाव करीत असते, एक पंजाबी गृहस्थ व दोघे बंगाली गृहस्थ अशा तिघां हिंदी गृहस्थांच्या हातीं या शाळेचीं सारीं सूत्रें आहेत, अशा आशयाचें हें वृत्त आहे. दि. २३-११-१९०८ रोजीं व्हॅन्कूव्हर येथेंच प्रो. ताजासिंग नांवाच्या एका शिखानें एक व्याख्यान दिलें असें वृत्त 'लंडन टाइम्स' च्या दि. २४-११-१९०८ च्या अंकांत प्रसिद्ध झालें आहे. प्रो. ताजासिंगजींच्या भाषणाचा आशय म्हणून 'लंडन टाइम्स' च्या वार्ताहरानें पुढील मजकूर धाडलेला आढळतो :

If, he said, the just rights of the people of India were not granted, a leader would arise to direct the cause in open warfare...The Sikhs were getting their eyes opened and all India demanded justice.

(आपल्या व्याख्यानांत प्रो. ताजासिंगजी म्हणाले : भारतांतील लोकांचे न्याय्य हक्क मान्य करण्यांत आले नाहींत तर भारताची बाजू उघड युद्धाच्या मार्गानें प्रस्थापित करणारा पुढारी उदयाला आल्याशिवाय राहणार नाहीं......शीखांचे डोळे उघडूं लागले आहेत. उभा हिंदुस्थान न्यायाची मागणी करीत आहे.)

या सुमारास ज्या मोर्ले-मिंटो सुधारणांचा गाजा-वाजा केला जात होता त्या सुधारणा इंग्रजांच्या सद्भावनेमुळें मिळालेल्या नाहींत, बॉम्बचा उपयोग करण्याचें धाडस कांहीं हिंदी तरुणांनीं दाखविलें नसतें तर, इंग्रजांनीं या सुधारणाहि दिल्या नसत्या अशी त्या वेळीं लोकांची दृढ भावना झालेली होती, हें सर व्हॅलेंटाईन चिरोल यांनीं मुंबईहून 'लंडन टाइम्स' ला दि. ८-१-१९०९ रोजीं धाडलेल्या पत्रांतलि पुढील उताऱ्यावरून[1] स्पष्ट होत आहे :

I detect a very general tendency to ascribe these lavish gifts to the vigorous actions of the extremists. 'If it had not been for the bombs, we should not have had these boons', was a remark which roughly summed up the popular opinion in this aspect of the subject,

(मोर्ले-मिंटो सुधारणांच्या रूपानें ब्रिटननें हिंदुस्थानला ज्या देणग्या उधळेपणानें दिल्या आहेत त्या जहालांच्या प्रभावी कृतीमुळें मिळाल्या आहेत, असें मानण्याची प्रवृत्ति सर्वत्र असल्याचें मला आढळतें. 'अहो, बॉम्ब पडले नसते तर यांतलें कांहींच आमच्या हातीं लागलें नसतें,' ही भाषा यासंबंधींचें लोकमत सामान्यतः व्यक्त करण्याला पुरेशी आहे..)

---

१ लंडन टाइम्स : दि. २५-१-१९०९

हिंदी लोकांचा बॉंबसारख्या साधनांवरील विश्वास वाढत चालला आहे हें सुलक्षण नाहीं हें लक्षांत आल्याबरोबर, हिंदुस्थान सरकारनें जी उपाययोजना सुरू केली, तिचा एक भाग म्हणून १९०८ सालीं डिसेंबरच्या मध्याच्या सुमारास वरिष्ठ कायदे-मंडळांत पास झालेल्या 'समरी जस्टिस बिला'चा निर्देश करणें अवश्य आहे. पण, ही उपाययोजना खऱ्या अर्थानें उपयुक्त व्हावयाची तर हिंदुस्थान सरकार-प्रमाणेंच विलायत सरकारनेंहि इंग्लंडांत जाऊन राहिलेल्या हिंदी लोकांचा बंदोबस्त केला पाहिजे, अशी मागणी हळू हळू सुरू झाली. 'लंडन टाइम्स' च्या कलकत्ता येथील खास प्रतिनिधीनें त्या पत्राला धाडलेलें बातमीपत्र त्या पत्राच्या दि१२-२-०९ च्या अंकांत प्रसिद्ध झालें आहे. हें बातमीपत्र व याच अंकांत 'लंडन टाइम्स'नें या विषयावर लिहिलेला संपादकीय लेख यांचा सूर लक्षांत घेण्यासारखा आहे. भारतीय क्रांतिकारकांचे पुढारी हळू हळू लंडन–पॅरिस इत्यादि ठिकाणीं आश्रयाला जाऊन राहण्याची पद्धत रूढ करतील असें भविष्य वर्तविल्यावर, हिंदी क्रांतिकारकांविरुद्ध सुरू करण्यांत आलेल्या मोहिमेंतली आपली जबाबदारी विलायत सरकारनेंहि उच-लली पाहिजे, असें 'लंडन टाइम्स' च्या वार्ताहरानें सुचविलें आहे. 'लंडन टाइम्स' च्या संपादकानें आपल्या वार्ताहराच्या मताला पाठिंबा देतांना पुढील विचार व्यक्त केले आहेत :

They should be taught that the English Police can detect and the English Courts can punish treason and conspiracy to murder, with effect...... We are face to face with a conspiracy which may be limited in extent and power, but which is unquestionably fraught with very serious danger.

( इंग्लिश पोलिसांना गुन्ह्यांचा तपास लावतां येतो व राजद्रोह आणि खून करण्याचे कट करणारांना इंग्लिश न्यायालयें भरपूर शिक्षा देऊं शकतात, हें या लोकांना समजलें पाहिजे......कटांना तोंड देण्याचा प्रसंग आपणांवर आलेला आहे. या कटांचा व्याप व सामर्थ्य हीं कदाचित् मर्यादित असतील; तरीहि, या कटांचे परिणाम फार भयंकर आहेत, यांत संशय नाहीं. ) 'लंडन टाइम्स' नें फिरून दि. २६–२–१९०९ रोजीं याच विषयावर एक संपादकीय लेख लिहिला आणि इंग्लंडमध्यें असलेल्या हिंदी विद्यार्थ्यांची गुप्त चळवळीकडे प्रवृत्ति कशी वाढत चाल-लेली आहे, याचें दिग्दर्शन केलें.

'इंडिया हाउस' हें अनेक भानगडींचें उगमस्थान आहे,असा संशय इंग्लंड-मधील गुप्त हेरखात्याला यापूर्वींपासूनच येऊं लागला होता. १९०८ च्या नोव्हेंबर महिन्याच्या आरंभीं प्रसिद्ध झालेल्या जाहीरनाम्याला उत्तर म्हणून सावरकर प्रभृति मंडळींनीं अयोध्येच्या बेगमेचा१८५८सालचा जाहीर-नामा प्रसिद्ध केला व हे दोन जाहीरनामे मिळून त्यांनीं 'Two Historic Documents' या नांवाचें पत्रक तयार केलें. या पत्रकाच्या शेंकडों प्रती हिंदुस्थानात जाऊन पोंचल्याचा बोभाटा

लंडनमधील 'स्टँडर्ड' नांवाच्या पत्रानें १९०९ च्या फेब्रुवारी महिन्यांत केला. अशा राजद्रोही पत्रकांचा बंदोबस्त करण्याचा हिंदुस्थान सरकारचा प्रयत्न निष्फळ ठरला आहे असा शेरा मारल्यावर, या पत्रानें आपल्या मनांतील जळफळाट पुढील शब्दांत[1] व्यक्त केला :

It is beyond question that a few of the highly intelligent Indians in our Universities and reading for the Bar are striving their utmost by such means, particularly to accustom the minds of the young rising generation to the idea of an armed revolt.

( इंग्लिश विद्यापिठांतून शिकत असलेल्या व बॅरिस्टरीचा अभ्यास करणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांपैकीं कांहीं जण अत्यंत कुशाग्र बुद्धीचे आहेत. अशा साधनांचा उपयोग करून तरुणांचीं मनें सशस्त्र क्रांतीच्या कल्पनेशीं परिचित व्हावीं यासाठीं त्यांचे विशेष व पराकाष्ठेचे प्रयत्न चाललेले आहेत, यांत शंका नाहीं.) या सुमारासच सर व्हॅलेंटाईन चिरोल यांनीं 'लंडन टाइम्स' ला धाडलेलें, महाराष्ट्रांतील गुप्त चळवळीचें वर्णन करणारें, एक पत्र प्रसिद्ध झालें. बंगाली क्रांतिकारकांपेक्षां महाराष्ट्रीय क्रांतिकारक हे जास्त अबोल व जास्त खोल असल्याची तक्रार केल्यावर सर व्हॅलेंटाइन चिरोल यांनीं या पत्रांत 'The Deccan is honeycombed with secret societies' ( महाराष्ट्रांत गुप्त संस्थांचा बुजबुजाट झालेला आहे, ) असें गाऱ्हाणें मांडलें आहे. चिरोल साहेबांनीं नाशिक व सोलापूर हे दोन जिल्हे या कामीं अग्रगण्य असल्याचें कबूल केलें आहे.

लंडनमधून चालणाऱ्या प्रचाराविरुद्ध अशी एकसारखी ओरड सुरू झाल्यामुळें, 'इंडिया हाउस' व सावरकर यांच्या मागें असलेला गुप्त पोलिसांचा ससेमिरा स्वाभाविकपणेंच वाढूं लागला. सावरकर व त्यांचे सहकारी यांच्या गुप्त पोलिसांशीं झालेल्या झटापटींचें सविस्तर वर्णन करणें शक्य नसलें तरी, या संबंधींच्या कांहीं गोष्टी या ठिकाणीं सांगणें अवश्य आहे. सावरकरप्रभृति तरुणांच्या पाळतीवर असलेले गुप्त पोलिस खात्यांतले लोक सावलीप्रमाणें त्यांचा पाठलाग करीत तेव्हां या हेरांना हुलकावणी देण्याचा एक मार्ग या तरुणांनीं ठरवून ठेविला होता. रस्त्यानें बोलत बोलत कांहीं अंतर जावयाचें, एकटीशी भाड्याची टॅक्सी रस्त्यांत उभी आहे असें दिसतांच चपळाईनें टॅक्सींत बसून रस्त्याला लागावयाचें व दुसरी टॅक्सी नसल्यामुळें, बरोबर आलेल्या गुप्त पोलिसाची मति गुंग करून टाकावयाची, हा या तरुणांचा एक अगदीं साधा उपाय असे. 'इंडिया हाउस' मध्यें खुद्द सावरकरांच्या खोलींत गुप्त पोलिस खात्यांतील लोकांची ये-जा सुरू झाली; तेव्हां सावरकर आपली खोली अगदीं लख्ख करून ठेवूं लागले. या खोलींतल्या एखाद्या खुर्चीच्या कापडांत मात्र प्रसंगीं एकादा बॉम्ब ठेवलेला असे. चौकस बुद्धीचें समाधान करण्यासाठीं खोलींत शिरलेल्या इसमाच्या वांट्याला ही खुर्ची आली व क्वचित् स्फोट झाला तर फाजील

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ १२०.

चौकस बुद्धीचा प्रसाद त्याला परभारा मिळावा, अशी ही योजना असे. कित्येक वेळां गुप्त पोलिस खात्यांतले लोक वार्ताहराच्या वेषानें सावरकरांच्या भेटीस येत. 'तुमच्या संवादकानें मला पत्र लिहावें, म्हणजे मी त्यांना काय तें लेखी उत्तर धाडीन' असें म्हणून सावरकर छद्मवेषधारी वार्ताहरांची पुष्कळ वेळां बोळवण करीत असत.

गुप्त हेरखात्याचें हें शुक्लकाष्ठ फार वाढलें तेव्हां, 'इंडिया हाउस' मधील प्रमुख मंडळींनीं इंग्लंडच्या गुप्त हेरखात्यांत आपलीं माणसें घुसडण्याची खटपट केली व कांहीं काळपर्यंत तरी त्यांचा हा प्रयत्न अत्यंत यशस्वी रीतीनें चालला. श्री. एम्. पी. टी. आचार्य हे १९०८ सालच्या शेवटीं लंडनला आले. श्री व्ही. व्ही. एस्. अय्यर यांचा त्यांच्याशीं परिचय होता. कांहीं दिवस 'इंडिया हाउस' मधील कामें करून त्यांनीं स्वतःच्या खर्चाची व्यवस्था केली. यानंतर, श्री. अय्यर यांच्या सूचनेवरून इंग्लंडच्या गुप्त पोलिसखात्याच्या प्रमुखाची त्यांनीं गांठ घेतली. 'इंडिया हाउस' मध्यें काय भानगडी चालतात याची बित्तंबातमी कळविण्याचें श्री. आचार्य यांनीं या अधिकाऱ्याला आश्वासन दिलें व आचार्य यांना दरमहा पांच पौंड वेतन मिळूं लागलें. गुप्त हेरखात्याच्या प्रमुखाला आचार्य यांच्यातर्फे जीं टांचणें पुरविलीं जात तीं अय्यर यांच्या तपासणीनंतर, त्यांच्या संमतीनेंच सादर केलीं जात ! आचार्यजींचा हा क्रम १९०९ च्या जुलै महिन्यापर्यंत अव्याहत चालला होता.

'इंडिया हाउस' मधील तरुण इंग्लंडमधील गुप्त हेरखात्यावर मात करण्याच्या उद्योगांत गढले होते त्याच सुमारास कीर्तिकर या नांवाचे मुंबईचे एक गृहस्थ 'इंडिया हाउस' मधील भेद काढण्यासाठीं मुंबई सरकारच्या प्रेरणेनें खुद्द 'इंडिया हाउस' मध्येंच तळ देऊन राहिले होते. या गृहस्थांनीं मुंबई हायकोर्टांत भाषांतरकाराचें काम केलें होतें. या गृहस्थांना सहा भिन्नभिन्न भाषा येत असत. हे गृहस्थ दंतवैद्यक शिकण्याचा बहाणा करून इंग्लंडला आले होते. महाराष्ट्रीय या नात्यानें त्यांनीं सावरकरांवर छाप पाडण्याचा प्रयत्न केला. 'इंडिया हाउस' मधील व्याख्यानेंहि ते मोठया तन्मयतेनें ऐकत. या गृहस्थांच्या वर्तनावर डॉ. राजन् व श्री. अय्यर हे बारकाईनें नजर ठेवूं लागले. हे गृहस्थ अपरात्रीपर्यंत बाहेर भटकत रहात असत. ते खोलींत नाहींत असें पाहून अय्यर व डॉ. राजन् हे एकदां त्यांच्या खोलींत शिरले. कीर्तिकरांच्या खोलींत कांहीं कागद सांपडले. 'इंडिया हाउस' मधील घडामोडींचा अत्यंत विपर्यस्त अहवाल त्या कागदांत लिहून ठेवलेला होता. श्री अय्यर यांनीं ते कागद सावरकरांना दाखविले. दुसऱ्या दिवशीं मध्यरात्रीच्या सुमारास, कीर्तिकर खोलींत झोंपले आहेत असें पाहून, श्री. अय्यर यांनीं खोलीचें दार ठोठावण्याला सुरुवात केली. सावरकर सौम्यपणानें बोलूं लागले, कीर्तिकर आपला अपमान झाल्याचा बहाणा करूं लागले. तेव्हां 'हा सूर्य आणि हा जयद्रथ' असा प्रकार करणें — सावरकरांना भाग पडलें आदल्या दिवशीं हस्तगत झालेले कागद सावरकरांनीं समोर धरतांच, कीर्तिकर गर्भगळीत झाले. अय्यर खोलींत आले होते ते पिस्तूल

बरोबर घेऊनच आले होते! अय्यर यांनीं पिस्तूल रोखतांच, मांत्रिकासमोर भूत बोलूं लागतें त्याप्रमाणें, कीर्तिकर सर्व गोष्टी कबूल करूं लागले. कीर्तिकरांची ही शोभा झाल्यावर, अय्यर व सावरकर यांनीं दूरदर्शीपणानें विचार केला. ही ब्याद येथून काढली तर दुसरी ब्याद मागें लागेल; त्यापेक्षां तावडींत सांपडलेल्या कीर्तिकरांसच राबवून घेणें श्रेयस्कर ठरेल, असा विचार या दोघांनीं पक्का केला. यापुढें कांहीं दिवसपर्यंत कीर्तिकर 'इंडिया हाउस' मध्येंच होते. कीर्तिकरांतर्फे सरकारी अधिकाऱ्यांकडे जाणारा प्रत्येक कागद अय्यर यांच्या नजरेखालून गेलाच पाहिजे असा संकेत या वेळीं ठरला.

'इंडिया हाउस' मधून चालणारा राजद्रोही प्रचार व लंडनमधील हिंदी विद्यार्थ्यांच्या मागें लागणारें गुप्त पोलिसांचें लफडें याविषयीं पार्लमेंटांत प्रश्नोत्तरें होण्यापर्यंत मजल पोंचली. दि. २-३-१९०९ रोजीं ओ ग्रेडी नांवाच्या सभासदानें गृहखात्याच्या अधिकाऱ्यांना एक प्रश्न विचारला. लंडनमधील हिंदी विद्यार्थ्यांच्या मागें गुप्त पोलिसांचा ससेमिरा लागल्यामुळें त्यांना आपलीं निवासस्थानें सोडावीं लागतात, स्थलांतर करावें लागल्यामुळें या तरुणांचे फार हाल होतात, तेव्हां गुप्त पोलिसांचा ससेमिरा विद्यार्थ्यांच्या मागें लावतांना विवेक करण्यांत यावा, असें ओ ग्रेडी यांनीं आपल्या प्रश्नांत सुचविलें होतें. यावर सरकारतर्फे जें उत्तर देण्यांत आलें त्यांत, पोलिस कमिशनरचें पूर्णपणें समर्थन करण्यांत आलेलें होतें. लंडनमध्यें बसून आक्षेपार्ह मतप्रचार करणाऱ्या लोकांचा बंदोबस्त करण्यासाठीं अवश्य असणारी सर्व खबरदारी पोलीस कमिशनर घेत आहेतच, ही खबरदारी घेतांना ते योग्य तो विवेक दाखवीत आहेत, असा सरकारी उत्तराचा आशय होता. मि. हे नांवाच्या सभासदानें दिनांक १२-३-१९०९ रोजीं विचारलेल्या प्रश्नांत 'इंडिया हाउस' मधून प्रसृत केल्या जाणाऱ्या राजद्रोही पत्रांचा स्पष्टपणें उल्लेख करण्यांत आलेला होता. 'इंडिया हाउस' मध्यें जाणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांच्या मागें गुप्त पोलिस लावण्यांत आले ते कोणत्या अहवालांच्या आधारें लावण्यांत आले, असाहि प्रश्न मि. हे यांनीं विचारिला. 'इंडिया हाउस' मधून ज्या पत्रकांचा प्रसार होतो, त्यांच्याकडे सरकारचें लक्ष आहे असें या प्रश्नाच्या एका भागाला उत्तर देण्यांत आलें. पोलिसांमार्फत जी उपाययोजना करण्यांत येत आहे, तिची वाच्यता करणें श्रेयस्कर नाहीं असेंहि सरकारतर्फे सांगण्यांत आलें. हिंदी विद्यार्थी लॉर्ड मोर्ले यांना कांहीं अपाय करतील अशी भीति वाटूं लागल्यामुळें, मोर्ले साहेबांच्या भोंवतीं गुप्तपोलिसांचें वलय असतें कीं काय, असा पुरवणी प्रश्न मि. हे यांनीं विचारिला. पण, हा पुरवणी-प्रश्न गैरलागू आहे असा निर्णय अध्यक्षांनीं दिल्याकारणानें या प्रश्नाचें उत्तर देण्यांत आलें नाहीं. लंडनमधील हिंदी विद्यार्थ्यांवर देखरेख करण्याची सरकारी योजना १९०९ च्या मार्च महिन्याच्या शेवटींशेवटीं सिद्ध झाली व लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजमधील ॲरेबिकचे प्रोफेसर थॉमस अर्नाल्ड यांची या कामावर नेमणूक करण्यांत

आली. सावरकरांनीं दि. १९-३-०९रोजीं लिहिलेलें एक बातमीपत्र ' काळ ' पत्राच्या दि. ९-४-१९०९ च्या अंकांत प्रसिद्ध झालें आहे.[1] 'इंडिया हाऊस' वर रात्रंदिवस गुप्त पोलिसांचा सक्त पहारा बसला आहे, असें सावरकरांनीं या पत्रांत लिहिलेलें आहे. ' इव्हिनिंग स्टँडर्ड ' या पत्रानें राजद्रोही, बंडखोर वगैरे विशेषणें लावून लंडनमधील हिंदी विद्यार्थ्यांवर हल्ला करण्याला प्रारंभ केला, असें या पत्रांत म्हटलें आहे. ' इव्हिनिंग स्टँडर्ड ' पत्रानें पुढें आडपडदा सोडून खुद्द सावरकरांवरच दोषारोप करण्याचा उद्योग कसा आरंभिला याचेंहि वर्णन सावरकरांनीं या पत्रांत केलें आहे. सावरकरांवरील या आरोपांना त्यांच्या एका मित्रानें झणझणीत उत्तर दिल्यावर या पत्राचा एक प्रतिनिधी ' इंडिया हाऊस ' मध्यें येऊन सावरकरांना भेटून गेला. ' संडे क्रॉनिकल ' पत्राचा प्रतिनिधी कॅपेल ग्रीन हाहि या सुमारास सावरकरांची भेट घेऊन गेला. त्यानें पुढें आपल्या पत्रांत 'इंडिया हाऊस ' व सावरकर यांच्यासंबंधीं जो मजकूर लिहिला त्यांतील कांहीं भाग सावरकरांनीं या पत्रांत उद्धृत केला आहे. त्यांतील महत्त्वाचीं वाक्यें पुढीलप्रमाणें आहेत :

It may be that my eyesight is not good ! It is a house of mystery !··· The shadow of Krishana Verma is on India House. That is to be fair and to say the least···I had an opportunity of a long friendly discussion with Mr. V. D. Savarkar who seems to be not only the spokesman for the students, but the spokesman for Mr. Shamji Krisna Verma.······If I mistake not, Mr. Savarkar will go far—I hope he will go far in the right direction.

( मला कदाचित् दृष्टिभ्रम झाला असेल. ' इंडिया हाउस ' हें एक रहस्यागार आहे. कृष्णवर्मा यांची छाया या स्थानावर पसरलेली आहे. हें वर्णन अगदीं न्यायाचें म्हणून व किमान म्हणून केलेलें आहे······सावरकर हे केवळ विद्यार्थ्यांचे प्रतिनिधि म्हणून वागतात असें नव्हे तर, शामजी कृष्णवर्मांचें मनोगतहि ते स्पष्ट करून सांगतात. मला सावरकरांशीं मित्रत्वाच्या नात्यानें बराच वेळ चर्चा करण्याची संधि मिळाली. त्यामुळें माझा हा ग्रह बनला आहे.... आपल्या मनाप्रमाणें वागण्याच्या भरांत सावरकर कोणत्याहि थरापर्यंत जातील; हा माझा समज चुकण्याचा संभव नाहीं. सावरकर योग्य त्या दिशेनें जातील अशी मला आशा वाटते. ) 'संडे-क्रॉनिकल ' मधील आपल्या लेखांत कॅपेल ग्रीन यांनीं सावरकरांचें मत म्हणून पुढील वाक्य लिहिलें आहे :

India has nothing for what to thank the English, unless it be the denationalisation of the Hindus.

(इंग्रजांनीं हिंदूंना राष्ट्रीयत्वाच्या भावनेपासून भ्रष्ट केलें याबद्दल त्यांचे आभार मानावयाचे असतील, तर गोष्ट वेगळी ! याव्यतिरिक्त अशी एकहि गोष्ट नाहीं कीं तिच्यासाठीं हिंदुस्थानांतील लोकांनीं इंग्रजांचे आभार मानावे.) या मुलाखतीच्या

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १२८-३४.

वेळीं सावरकरांनीं हेरांच्याबद्दल एक द्व्यर्थी विधान केलें. या विधानामधील मर्मभेदक विनोदाची प्रशंसा करीत कँरोल ग्रनि यांनीं तें विधान आपल्या लेखांत उद्धृत केलें आहे. सावरकरांचें हें विधान पुढीलप्रमाणें होतें :

We do not Mind detectives watching outside and following us, if the climate suits them!

( ' इंडिया हाउस ' भोंवतालचें वातावरण इंग्लिश हेरांना मानवत असेल तर त्यांनीं खुशाल आमच्यावर टेहळणी करावी व आमचा पाठलाग करावा; आमची त्याला ना नाहीं. ) सावरकरांनीं उल्लेखिलेला हा ' संडे क्रॉनिकल ' मधील लेख प्रसिद्ध झाला त्याच सुमारास, म्हणजे १४ मार्च १९०९ रोजीं ' संडे डिस्पॅच ' नांवाच्या पत्रांत ' House of Mystery ' ( रहस्यागार ) या नांवाचा एक लांबलचक लेख प्रसिद्ध झाला होता. ' इंडिया हाउस 'चें राजद्रोही वातावरण व सावरकरांची क्रांतिकारक प्रवृत्ति यांच्यावर या लेखांत खूप झोड उठविण्यांत आली होती.

पं. शामजी कृष्णवर्मा यांच्या लेखांबद्दल व मतांबद्दल अलीकडे खूप गवगवा झालेला असल्यामुळें, बॅरिस्टर म्हणून त्यांना जी मान्यता देण्यात आलेली होती ती काढून घेण्याचा विचार ' इनर टेंपल 'च्या अधिकारी वर्गामध्यें सुरू झाला. दि. २३-४-१९०९ रोजीं या अधिकारीवर्गाची सभा झाली. बॅरिस्टरांच्या यादींतून शामजी कृष्णवर्मा यांचें नांव कमी करण्यांत आलें आहे हा निर्णय या मंडळींनीं दि.१-५-१९०९ रोजीं जाहीर केला. यापूर्वींच, म्हणजे मार्च महिन्याच्या आरंभींच ऑक्सफर्ड विद्यापीठानें शामजींनीं दिलेली ' स्पेन्सर लेक्चरशिप ' बाबतची देणगी परत करून टाकण्याचा निर्णय घेतला होता. या वर्षी मे महिन्यांतच ' ग्रेज इन 'च्या अधिकारी वर्गापुढें सावरकर व हरनामसिंग यांना बॅरिस्टर म्हणून मान्यता देण्याचा प्रश्न आला. तूर्त या दोघांनाहि मान्यता देऊं नये, असा या अधिकारी वर्गाचा मानस होता. या प्रकरणीं चौकशी करून मग निर्णय घ्यावा हें इष्ट वाटल्यावरून, त्या अधिकारी वर्गानें जुलैमध्यें या प्रकरणाची चौकशी करण्याचें ठरविलें.

इंग्लिश लोकांनीं उद्दामपणानें केलेल्या अन्यायांकडे व अपमानांकडे शेळपटपणानें कानाडोळा करावयाचा नाहीं, अशा अन्यायांचा व अपमानांचा शक्य त्या व शक्य तितक्या प्रभावी मार्गांनीं प्रतिकार करावयाचा ही वृत्ति हिंदी लोकांच्या मनांत वाढत चालल्याचीं जीं लक्षणें राजकीय क्षेत्रांत दिसत होतीं, त्यांचेंच प्रतिबिंब या सुमारास अन्य रूपानेंहि पडूं लागलें. पॅरिस येथें हिंदी लोकांचा एक राजद्रोही कट आहे, अशी माहिती रंगवून लिहिण्याच्या भरांत इंग्लंडमधील ' मॉर्निंग पोस्ट ' पत्रानें सरदारसिंगजी राणा व त्यांची जर्मन पत्नी यांच्याविषयीं निंदाव्यंजक मजकूर खरडला. त्याबरोबर राणाजींनीं सदर पत्राच्या संपादकाला चांगलीच तंबी दिली. ही तंबी मिळतांच ह्या पत्राच्या शिवराळ संपादकाची पांचावर धारण बसली व राणाद्वयाची सपशेल माफी मागून हे शूर संपादक मोकळे झाले.[1] १९०९ सालीं

[1] लंडनचीं बातमीपत्रें.: पृ. १२०.

फेब्रुवारी महिन्याच्या पहिल्याच तारखेला कुंजविहारी भट्टाचार्य नांवाच्या बंगाली तरुणानें भर दुपारीं एक वाजतां लंडनमधील अ‍ॅथेनियन क्लबाशेजारीं राजरस्त्यावर ली वॉर्नरसारख्या बड्या धेंडाच्या श्रीमुखात लगावली. मोर्ले साहेबांनीं हिंदी पुढाऱ्यांच्या हद्दपारीला मान्यता दिली ती ली वॉर्नरसाहेबांच्या प्रेरणेनें दिली, असा समज त्या वेळीं रूढ झालेला होता. लंडनमध्यें असलेल्या बंगाली तरुणांकडे संशयग्रस्त नजरेनें पाहाण्याची त्या काळीं पुष्कळच इंग्रजांना संवय लागलेली होती. ली वॉर्नरसाहेब व बंगालच्या पोलिस खात्यांत इन्स्पेक्टर जनरलच्या हुद्यापर्यंत चढलेले एक इंग्रज अधिकारी या जोडीनें अशा बंगाली तरुणांना इंग्लंडबाहेर हांकलून देण्याचा सल्ला गृहखात्याच्या सेक्रेटरीला दिला होता, अशीहि माहिती त्या वेळीं बाहेर आलेली होती. अशा कांहीं कारणांमुळें, ली वॉर्नरसाहेब त्या वेळीं लंडनमधील हिंदी तरुणांना फार अप्रिय झालेले होते. हिंदी तरुणांच्या वाटेस जाणें हें आता पूर्वीसारखें सोपें राहिलेलें नाहीं हें इंग्लिश लोकांना पटवून देण्यासाठींच, कुंजविहारी भट्टाचार्य यानें ली वॉर्नरच्या श्रीमुखांत दिली, असा समज त्या वेळीं पुष्कळ हिंदी लोकांच्या मनांत वावरत होता. ज्या ली वॉर्नरनें हिंदुस्थानांत असतांना राजेरजवाड्यांना आपल्या दराऱ्यानें भयभीत करून सोडलें होतें, त्या ली वॉर्नरची अशी शोभा झालेली पाहून इंग्लंडमधील सर्व लोक स्वाभाविकपणेंच स्तिमित झाले !

कुंजविहारी भट्टाचार्य यानें ली वॉर्नरवर हात टाकला; पण तसें करतांना त्यानें जी भूमिका घेतली ती बरीचशी सोज्ज्वळ होती. हा तरुण ली वॉर्नरकडे अर्ज घेऊन गेला व आपण हा अर्ज मोर्ले साहेबांकडे धाडा असें तो आग्रहाआग्रहानें म्हणूं लागला. या तरुणाला झिडकारून ली वॉर्नरसाहेब रस्त्यानें चालूं लागले. तरीहि त्यानें साहेबाचा पिच्छा पुरविला. या निगरगट्टपणामुळें साहेबाचा पित्तप्रकोप झाला व ही जोडी अथेनियन क्लबासमोर रस्त्यावर उभी असतांना, त्यांची बाचाबाची सुरू झाली. ही बाचाबाची चालली असतांना, ली वॉर्नरनें त्या तरुणाला उद्देशून 'चल, हट् जाव निगर' असे शब्द वापरले. त्याबरोबर हा तरुण खवळला, त्यानें ली वॉर्नरचा हात खेंचला व क्रोधायमान होऊन त्यानें ताडकन् ली वॉर्नरच्या श्रीमुखांत लगावली. पोलिस धांवपळ करूं लागले त्यापूर्वींच ली वॉर्नर पांच सहा यार्ड मागें ढकलला जाऊन जमिनीवर कोलमडून पडला होता. पोलिसांनीं भट्टाचार्याचें नांव गांव वगैरे लिहून घेतलें; पण त्याला पकडलें मात्र नाहीं. आपल्याला हें कृत्य करण्याला प्रेरणा कोणापासून मिळाली हें भट्टाचार्यानें कबूल करावें यासाठीं पोलिसांनीं खूप धडपड केली; पण, या धडपडीचा कांहींहि उपयोग झाला नाहीं. भट्टाचार्यावर फिर्याद केली तर आपलीच शोभा होईल म्हणून ली वॉर्नरनें फिर्यादीच्या भानगडींत न पडण्याचें ठरविलें.

एका भट्टाचार्याचें हें प्रकरण कसेंबसें मिटतें न मिटतें तोंच दुसरे एक भट्टा-

---

१ लंडनच्या बातमीपत्रें : पृ. १२१

चार्य पुढें आले. या गृहस्थाचें नांव वासुदेव भट्टाचार्य असें असून ते एके काळीं बंगालमधील 'संध्या', 'युगांतर' प्रभृति पत्रांच्या संपादक मंडळांत होते.[1] कुंज-विहारी भट्टाचार्यांची हकीकत वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाल्यावर ती वाचून या गृह-स्थांना फार राग आला. एका हिंदी इसमाला 'हट जाव निगर' असे उपमर्दकारक शब्द उच्चारल्याबद्दल ली वॉर्नरनें माफी मागितली पाहिजे, अशा आशयांचें एक पत्र या गृहस्थांनीं लिहिलें व तें पत्र ली वॉर्नरला स्वतः नेऊन देण्याचें त्यांनीं ठर-विलें. रस्त्यावर मिळालेलें हें पत्र वाचतांच ली वॉर्नर साहेबाचा पारा चढला व त्यानें वासुदेव भट्टाचार्यजींना ' सूवर का बच्चा ' ही शिवी हांसडली. त्याबरोबर भट्टाचार्यजींनीं त्याला धमकी दिली. ली वॉर्नरनें हातांतल्या छत्रीनें भट्टाचार्यजींना टोंचण्याचा प्रयत्न केला. त्याबरोबर भट्टाचार्यजींनीं हातांतली लाठी गरगर फिर-विण्याला आरंभ केला व जागच्या जागीं ली वॉर्नरला कांहीं रट्टे लगावले.

रस्त्यांत घडलेला हा प्रकार मोर्ले साहेबांना कळतांच त्यांनीं आपल्या हातां-तील सत्तेचा उपयोग करून भट्टाचार्यजींवर सरकारी रीतीनें फिर्याद लावण्याची व्यवस्था केली. दि. १०-२-१९०९ रोजीं या फिर्यादीचा निकाल बो स्ट्रीट पोलिस कोर्टांत सांगण्यांत आला. भट्टाचार्यजींनीं सहा महिनेपर्यंत सद्वर्तन ठेवण्याबद्दल प्रत्येकीं १० पौंड प्रमाणें दोन जामीन द्यावे अगर एक महिना कारावास भोगावा अशी शिक्षा सांगण्यांत आली. कामाबाई, चौधरी, रॉय प्रभृति मंडळी भट्टाचार्य-जींना जामीन राहावयास तयार असूनहि, भट्टाचार्यजींनीं तुरुंगवास पतकरला. भट्टा-चार्य प्रकरणामुळें, बसलेला धक्का ज्याच्या तुलनेनें कांहींच नव्हे असें एक प्रक-रण हिंदी तरुणांनीं या सुमारास शिजविलें. पाताळयंत्रीपणानें व शितापीनें आपले उद्योग चालू ठेवण्याची करामत या तरुणांच्या ठिकाणीं होती म्हणूनच तें प्रकरण शिजूं शकलें.

---

[1] लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १२३.

# प्रकरण ७ वें

# मदनलाल धिंग्रा नि सावरकर

एकेक अलौकिक मूर्ति
करि कर्तव्याची पूर्ति
मिळवी शाश्वत जी कीर्ति
त्या नर-रत्नांचा दाता-एक काळ ऐसा होता ॥

—कै. दु. आ. तिवारी

इंग्लंडांत जाऊन राहिलेल्या हिंदी विद्यार्थ्यांना माणसाळविण्याचे किंवा राजनिष्ठ बनविण्याचे सरकारी प्रयत्न नेटानें चालले असूनहि, भट्टाचार्य प्रकरणासारखीं प्रकरणें ब्रिटिश साम्राज्याच्या राजधानींतच घडतात व ली वॉर्नरसारख्या इंग्रज शिष्टाची राजरस्त्यांत अप्रतिष्ठा होते, हें पाहून गोंधळांत पडलेल्या इंग्रजांना चांगलाच जबरदस्त धक्का देणारें एक प्रकरण या सुमारासच घडलें. जगभर गाजलेल्या या प्रकरणांतील सूत्रधार मदनलाल धिंग्रा यांनीं आपल्या वर्तनानें साऱ्या जाणत्या जगताला हिंदुस्थानच्या आकांक्षांकडे पाहावयास लाविलें. या प्रकरणाची हकीकत नीटपणीं समजण्यासाठीं मदनलाल धिंग्रा यांची पूर्वपीठिका या ठिकाणीं देणें अवश्य आहे.

धिंग्रा हें हिंदु क्षत्रिय घराणें मूळ पंजाबांतलें. मदनलालजींचे वडील संपन्न स्थितींत होते. ते डी. एस्. पी. असल्यामुळें[1] सरकारदरबारांतहि त्यांना मोठा मान असे. हिंदुस्थानांतल्या अनेक बड्या इंग्रज अधिकाऱ्यांची ओळख करून घेण्याची संधि त्यांना लाभत असे. मदनलालजींचे थोरले व धाकटे असे दोघेहि बंधु विद्यार्जनासाठीं स्वतःच्या खर्चानें इंग्लंडांत गेले होते. मदनलालजींचे थोरले बंधु हिंदुस्थानांतच डॉक्टरीचा अभ्यास पुरा करून, पुढील अध्ययनासाठीं कांहीं दिवस इंग्लंडांत जाऊन राहिले होते. दि. २६-५-१९०६ रोजीं मुंबईहून निघण्याचा विनायकराव सावरकरांचा बेत अचानक बदलला नसता तर, 'मॅसिडोनिया' बोटीवरील एक हिंदु प्रवासी म्हणून डॉ. धिंग्रा त्यांच्या परिचयाचे झाले असते. जवळजवळ दोन वर्षें इंग्लंडांत काढून व परत येण्यापूर्वीं शरीरविज्ञान (Physiology) या विषयावरील एक प्रबंध प्रसिद्ध करून, डॉक्टरमहाशय १९०९ च्या प्रारंभींच परत स्वदेशीं पोंचले होते. मदनलालजींच्याहून लहान भाऊ १९०९ सालीं इंग्लंडमध्येंच

---

१ मदनलालचे वडील अमृतसर येथें सिव्हिल सर्जन होते : राजनैतिक नौसरबाज, पृ. १५.

विद्यार्जन करीत होता. डॉ. धिंग्रा इंग्लंडांत पोंचल्यावर थोड्याच दिवसांनीं मदन-लालजीहि इंग्लंडला जाऊन पोंचले.

मदनलालजींनीं स्वदेश सोडलां तेव्हां त्यांचें वय सरासरी २१–२२ वर्षांचें होतें. ते यापूर्वीच संसारी बनले होते. ते इंग्लंडला गेले तत्पूर्वी त्यांना एक मुलगा झाला होता. हूडपणाबद्दल किंवा उच्छृंखलपणाबद्दल मदनलालजी बालवयांत बरेच प्रसिद्ध असल्यामुळें, त्यांना इंग्लंडला धाडण्याला त्यांचे वडील सिद्ध नव्हते. पण, हुड व हट्टी हिंदु तरुणांतल्या कांहीं जणांत जो करारीपणा असतो, तोहि मदनलालजींच्या वृत्तीत होता. वडिलांच्या संमतीची वाट न पाहतां व वडिलांच्या आर्थिक सहाय्याची अपेक्षा न बाळगतां त्यांनीं आपले बेत स्वतःच सिद्धीस नेण्याची खटपट चालविली. इंग्लंडला जाणाऱ्या एका बोटीवर आगवाल्याच्या मदतनिसाचें काम पत्करून ही स्वारी १९०६ च्या ऑक्टोबर-नोव्हेंबरच्या सुमारास इंग्लंडांत जाऊन दाखल झाली! इंग्लंडांत गेल्यावर थोड्याच दिवसांत मदनलालजींनीं इंजिनिअर होण्याच्या उद्देशानें लंडन येथील युनिव्हर्सिटी कॉलेज या संस्थेंत आपलें नांव नोंदविलें. इतर अनेक भानगडी करणाऱ्या धिंग्रांचें अभ्यासाकडे दुर्लक्ष होत नसावें, कारण त्यांच्या शेवटच्या वर्षाच्या अभ्यासविषयक प्रगतीबद्दल लिहितांना, सावरकर यांनीं पुढील उद्‍गार त्याच काळांत काढलेले आढळतात : मदनलाल डिंगरा याचा कॉलेजांतला अभ्यासक्रम फारच उत्तम होता व तो परिक्षेंत पहिला आलेला होता.[1]

सावरकर व त्यांच्या प्रभावळींतले हिंदी विद्यार्थी यांच्याशीं धिंग्रांचा निकट संबंध नेमका केव्हांपासून येऊं लागला हें इतक्या वर्षांच्या अवधीनंतर ठरविणें जवळ जवळ अशक्य आहे. तथापि, यासंबंधाचा काळ स्थूल मानानें ठरविणें मात्र अशक्य नाहीं. भारतभवनांत १९०७ च्या उत्तरार्धापासून जें नवें वारें खेळूं लागलें त्याचा प्रभाव मदनलालसारख्या उत्साही व भावनाप्रधान तरुणावर झाल्याशिवाय राहिला नाहीं. १९०८ च्या मे महिन्यांत भारतभवनांत जो उत्सव दिनांक १० रोजीं भव्य प्रमाणावर साजरा करण्यांत आला, त्यांत मदनलालनेंहि आत्मीयतेनें भाग घेतला होता. या उत्सवाच्या गाम्यांतील रहस्याशीं मदनलालजींची किती एकाग्रता झालेली होती हें सावरकर यांनीं लिहून ठेवलेल्या पुढील वाक्यावरून[2] स्पष्ट होत आहे : गेल्या सालीं यांनींहि इतरांप्रमाणें आपल्या कोटावर १८५७ ची वीरस्मृतिमुद्रा धारण केलेली होती. परंतु, कॉलेजमध्यें कोणी एका स्नेह्यानें चेष्टेनें मुद्रा दूर फेंकली. हें पाहतांच हा तरुण इतका चवताळला कीं, तो एक सुरा घेऊन त्याचे अंगावर तुटून पडला. लाला हरदयाळ यांच्याप्रमाणेंच धिंग्राजींच्या वृत्तींतहि जाज्वल्य हिंदुत्वाभिमान नांदत असल्याचें सावरकरांच्या दृष्टोत्पत्तीस आलेलें होतें. या दोघा पंजाबी तरुणांत या बाबतींत भेद असला तर तो इतकाच होता कीं मुसलमानांच्या विषयींचा संशय व्यक्त करतांना हरदयाळजी पुष्कळच प्रौढ व भारदस्त शब्द वापरीत असत.

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १५१. २ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १३५.

मदनलालजी आपले संशय प्रकट करतांना जी भाषा वापरीत ती अगदीं रांगडी, रोखठोकपणाची असे. 'अभिनव भारता'च्या लंडन येथील केंद्राच्या अंतर्गत मंडळांत सावरकरांनीं कांहीं अहिंदूंना समाविष्ट केलें ही गोष्ट मदनलालजींनीं केव्हांच मनापासून मान्य केली नाहीं. 'अरे यार,' या आपल्या आवडत्या संबोधनशब्दांनीं भाषणाला सुरुवात करून ते सावरकरांना वारंवार असें बजावीत कीं, हे लोक— विशेषतः यांतले मुसलमान— केव्हां दगा देतील, याचा नेम नाहीं.

सावरकरप्रभृति तरुणांनीं स्थापन केलेल्या 'फ्री इंडिया' सोसायटीच्या व्याख्यानांच्या वगैरे कार्यक्रमाना धिंग्राजी मधून मधून उपस्थित असत हें खरें असलें तरी, सर्वसामान्य दृष्टीनें असें म्हणावयास प्रत्यवाय नाहीं कीं, व्याख्यानें, चर्चा वगैरे गोष्टींचा मदनलालजींना कंटाळाच असे. भारत भवनांत होणाऱ्या साप्ताहिक बैठकींना तर मदनलालजी फारसे उपस्थित नसतच. सावरकरांवर निरतिशय श्रद्धा असल्यामुळें, मदनलालजी त्यांच्या व्याख्यानांना अगदीं नेमानें उपस्थित असत व त्यांचें व्याख्यान ते एकाग्रपणानें ऐकूनहि घेत असत. पण बैठकीत व्याख्यानें देणारे इतर पुष्कळसे लोक केवळ बडबड्येच आहेत, अशी त्यांची समजूत झालेली असल्यामुळें, या व्याख्यानांकडे त्यांचें दुर्लक्ष असे व या बैठकींची थट्टा करण्यालाहि ते चुकत नसत. अशा कार्यकर्त्यांची टर उडविणारा मदनलाल कित्येक प्रसंगीं किती कणखरपणानें वागतो हें सावरकरांच्या लक्षांत आलेलें होतें. जपानी लोकांच्या शौर्याबद्दलच्या गोष्टी बोलल्या जात असतांना, कोणी तरी इसमानें हिंदु राष्ट्राबद्दल अधिक्षेपाचे उद्‌गार काढल्याबरोबर धिंग्रा चवताळून उठला होता, हा प्रसंग सावरकरांच्या ध्यानांत होता. "माझें हिंदु राष्ट्रहि तितकेंच शूर व साहसी आहे व लवकरच आमच्याही धाडसाची लोक कीर्ति गाऊं लागतील" हे शब्द धिंग्रानें त्या प्रसंगीं उच्चारले होते ते शब्द ऐकून इतर हिंदी तरुण म्हणाले होते : हा पोकळ डौल आहे, शरीरकष्ट व देशवीरत्व यांत आमचे लोक अढळ राहात नाहींत. शेवटीं हा वाद पैजेवर येऊन हिंदु लोकांच्या साहसाची चुणूक पाहण्याचें ठरलें; व एक टांचणी घेऊन डिंगराच्या हातावर टोंचण्यास आरंभ झाला. डिंगरानें तो हात जसाच्या तसा अढळ ठेविला होता. टांचणी सर्व आंत रोवली गेली व रक्त बाहेर उसळलें, तरीहि डिंगरानें हात हलविला नव्हता.[1] भारतभवनाच्या तिसऱ्या मजल्यावर असलेल्या एका माळ्यासारख्या खोलींत बॉंब तयार करणें, बॉंबसाठीं लागणारीं रसायनद्रव्यें बनविणें, इत्यादि कामें गुप्तपणें चालत. एकदां अपरात्रीं हें काम चाललें असतांना सावरकरांच्या असें लक्षांत आलें कीं, तापत चाललेलें कांचेचें भांडें आगीवरून खालीं उतरून घेण्याची तर वेळ झाली आहे व तें उतरण्याचा चिमटा तर आपण जवळ घेतलेला नाहीं. उष्णतेची आंच अधिक लागली तर भांडें फुटेल व रासायनिक द्रव्यांचा एकदम स्फोट होऊन सर्वच बिंग बाहेर येईल, अशी भीति होती. हा प्रसंग

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १३५.

टाळण्यासाठीं काय युक्ति योजावी हा प्रश्न सावरकरांच्या मनांत घोळत आहे तोंच मदनलालनें बेडरपणानें हात पुढें केला व भांडें घट्ट धरून त्यानें तें चटकन खालीं उतरून ठेवलें. तळहाताची कातडी पोळून निघाली तरी मदनलालचें त्याकडे काडी-मात्र लक्ष नव्हतें. या प्रसंगाचें स्मरण सावरकरांना चांगलेंच होतें; म्हणून, मदनलाल पुष्कळ वेळां जो हूडपणा व हेकटपणा करी तिकडे ते प्रायः दुर्लक्ष करीत असत.

१९०८ च्या अखेरच्या काळांतल्या एका रविवारीं मदनलालनें शर्थच केली! भारतभवनाच्या आंतल्या बाजूच्या खोलींत साप्ताहिक बैठकींतलीं व्याख्यानें चालू असतांना, या बहाद्दरानें सडकेलगत असलेल्या खोलींत ग्रामोफोनच्या तबकड्या लावण्याचा धडाका चालविला. सडकेकडील खिडकीबाहेर अल्लड पोरींचा घोळका जमलेला, खिडकीपाशीं उभे असलेले मदनलालजी तबकड्या लावण्यांत रंगून गेलेले व प्रेयसीला उद्देशून म्हटलेल्या एका गाण्याच्या ध्वनिमुद्रेतून निघणारे प्रेमालाप घोळघोळून पुनरुक्त होत असलेले–अशा त्या हुच्चपणाच्या व हास्यविनोदाच्या रंगढंगांमुळें आंतल्या व्याख्यानांचे चांगलेच तीन तेरा वाजले! व्याख्यानें ऐकत असलेल्या सावरकरांना हें कळेना कीं हा त्रास कोण देत आहे! ते बाहेर आले नि पहातात तों मदनलाल! तेव्हां मदनलालजींना उद्देशून ते म्हणाले : हें रे काय! कृतीच्या आणि हौतात्म्याच्या गोष्टी बोलतोस आणि त्या गोष्टी श्रेष्ठ म्हणून बैठकी नि चर्चा टाळतोस! या पोरींचा घोळका नि या गाण्यांच्या ललकाऱ्या हीं काय कृतीचीं नि हौतात्म्याचीं लक्षणें? तुला बैठकीला येणें पटत नसलें तर येऊं नको; पण, निदान इतरांना त्रास होईल असें तरी कांहीं करीत जाऊं नको. सावरकरांचे हे शब्द ऐकून मदनलालजी फारच खजिल झाले. ग्रामोफोन वगैरे पसारा एकदम आवरून ते जे तेथून अदृश्य झाले ते तीन चार दिवसपर्यंत भारतभवनाकडे नुसते फिरकले देखील नाहींत! सावरकरांनीं उच्चारलेले वरील शब्द ऐकून दुसरा कोणी अहंमन्य कसा वागला असता याची कल्पना करणें अवघड नाहीं. सावरकरांनीं आपला चारचौघांदेखत अपमान केला या तक्रारीचीं वाणें वाटीत तो भटकत बसला असता. पहिल्या प्रासंगिक ऊर्मीनंतर पुष्कळांच्या मनांतून हे शब्द पार नाहींसेहि झाले असते. सावरकर हे एक महाशिष्ट आहेत असें समजून, त्यांच्याकडे जाणें-येणें टाळण्यापलीकडे त्याच्या हातून विशेष कांहीं झालें नसतें. 'अतृणे पतितो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति' असा प्रकार घडून, हे शब्द तिथल्या तिथेंच संपुष्टांत आले असते!

पण, मदनलालजींच्या मनांत हे शब्द सारखे घोळत राहिले. आपण हौता-त्म्याच्या गोष्टी बोललों–सतत बोलतों–त्यांत कांहीं अर्थ होता कीं नाहीं, असा प्रश्न ते स्वतःला विचारूं लागले. स्वतःच्या जिवावर उदार होऊन कांहीं कृति करावयाची म्हटली तरी, ती आंधळेपणानें हवी तशी करणें युक्त ठरेल कीं तिलाहि 'देशे काले च पात्रे च' अशा कांहीं मर्यादा घालणें श्रेयस्कर ठरेल, या प्रश्नांच्या

ध्यासानें त्यांचें मन अस्वस्थ होऊन गेलें. मरणमारणाचे प्रश्न मनांत घोळूं लागले कीं, मनाची जी कालवाकालव होऊन जाते तिचा अनुभव मदनलालजींना येऊं लागला.

कळा ज्या लागल्या जीवा। मला कीं ईश्वरा ठाव्या॥
कुणाला काय हो त्यांचें। कुणाला काय सांगाव्या ?॥

हे कविश्रेष्ठ कै. तांबे यांचे चरण मदनलालजींना सुचणें शक्य नसलें तरी, त्या चरणांत सूचित केलेल्या अवस्थेंत त्यांनीं तीन चार अहोरात्र मोठ्या कष्टानें काढले. सावरकरांनाच भेटून आपल्या शंकांची निवृत्ति करून घ्यावी असें त्यांच्या मनाला वारंवार वाटे. पण, त्यांना आपलें तोंड कसें दाखवावें असें वाटून, ते आपल्याशींच विचार करीत, तीन चार दिवस, स्वस्थपणाच्या अस्वस्थतेचा अनुभव घेत राहिले. इतका काळ गेल्यावर, सावरकरांना बाजूला गांठून आपल्या शंकांचें निवारण करून घ्यावयाचें असा निश्चय करून, मदनलालजींची स्वारी भारतभवनाकडे वळली!

सावरकरांना अगदीं एकीकडे गांठावयाचें असा विचार मनांत असल्यामुळें, मदनलालजींना भारतभवनाच्या एका कटेच्या विभागांत कांहीं वेळ वाट पाहावी लागली. संध्याकाळीं जेवणा-आधीं मुख मार्जन करून, सावरकर आपल्या खोलीकडे जाण्यासाठीं निघणार तोंच, त्या एकान्त मार्गीं मदनलाल त्यांच्या पुढें उभे राहिले. पूर्वीच्या भेटीचा प्रसंग व त्या वेळीं आपण केलेला हूडपणा यांचें स्मरण अद्याप बुजलें नसल्यामुळें, मदनलाल कांहीं क्षण खालीं मान घालूनच उभे होते. त्या प्रसंगामुळें सावरकरांचा आपल्यावरील लोभ उणावलेला नाहीं अशी खात्री पटतांच, मदनलालजी सावरकरांशीं मोकळ्या मनानें बोलूं लागले! Do you think the time for martyrdom has really come ? ( हौतात्म्य गाजविण्याची वेळ खरोखरच प्राप्त झाली आहे, असें वाटतें का तुम्हांला?) या मदनलालजींच्या प्रश्नाला, If a martyr is determined and ready, that fact by itself generally implies that the time for martyrdom must have come. ( हुतात्मा मनानें खंबीर व सिद्ध झालेला असेल तर, त्यांत हेंहि प्रायः गर्भित असतें कीं, हौतात्म्य गाजविण्याची वेळ प्राप्त झालेली आहे ) हें उत्तर सावरकरांनीं दिलें. आपण दृढनिश्चय केला आहे असें मदनलालजींनीं सावरकरांना कळविल्यावर, दोघेहि सावरकरांच्या खोलींत गेले व तेथें त्यांच कांहीं वेळ संभाषण झालें. यानंतर कांहीं दिवसपर्यंत धिंग्रा सावरकरांच्या खोलीवर बरेच वेळां येत असत. या दोघांच्या संभाषणाच्या वेळीं श्री. कोरेगांवकरहि हजर असत. कोरेगांवकर हेहि इंजिनिअरिंगचाच अभ्यास करीत असल्यामुळें, त्यांची व मदनलालजींची चांगली ओळख होती. या त्रिवर्गांनीं इंडिया हाउसमध्यें काय चर्चा केली असेल ती असो! इतकें मात्र खरें कीं, या चर्चेनंतर मदनलालजींच्या वर्तनाला एक नवेंच वळण लागूं लागलें!

या नव्या वळणाची दिशा निश्चित करण्याला आवश्यक तेवढी माहिती उपलब्ध होऊं शकत नाहीं, हें दुर्दैव आहे. पुढें न्यायालयांतून जे जाबजबाब व साक्षी-पुरावे झाले त्यांतून प्रकट झालेल्या माहितीची गुंफण करूनच या दिशेचा अंदाज बसवावा लागतो, या गोष्टीला नाइलाज आहे. पण, हा अंदाज फारसा चुकीचा ठरूं नये इतकी माहिती या मार्गानें बाहेर आलेली आहे, हें सुद्धां सद्भाग्यच समजलें पाहिजे. सावरकर व कोरेगांवकर यांच्याशीं चर्चा केल्यानंतर थोड्याच दिवसांनीं धिंग्रांनीं रिव्हॉल्व्हरचा परवाना आपल्या नांवें मिळावा अशी खटपट केली व हा परवाना मिळतांच, दि. २७–१–१९०९ रोजीं गमेज (Gamage) कंपनीच्या दुकानांतून त्यांनीं एक सहा बारी कोल्ट रिव्हॉल्व्हर, तीन पौंड पांच शिलिंग किंमत देऊन, विकत घेतलें. हें रिव्हॉल्व्हर हातीं आल्यावर, तें वापरण्याच्या विद्येंत प्रावीण्य संपादण्याच्या उद्योगाला धिंग्रांनीं सुरुवात केली. हें शिक्षण राजरोसपणें घ्यावयाचें असें ठरवून त्यांनीं चौकशी करण्याला सुरुवात केली. जॉन स्टँटन मोर्ले या नांवाचे गृहस्थ टॉटेनहॅम कोर्ट यार्ड या ठिकाणीं नेमबाजीचें शिक्षण देतात असें कळल्यावर, धिंग्रांनीं फेब्रुवारी–मार्चच्या सुमारास या शिक्षणाला रीतसर सुरुवात केली. आठवड्यांतून दोन वेळां या पाठशाळेंत जावयाचें व वेगवेगळ्या अंतरावरील लक्ष्यांवर मिळून दर वेळां १२–१५ गोळ्या झाडावयाच्या-कांहीं गोळ्या थोडाफार वेळ मध्यंतरीं घालवून झाडावयाच्या, तर कांहीं गोळ्या ताड्ताड् एकापाठोपाठ एक अशा पद्धतीनें झाडावयाच्या असा रिवाज धिंग्रांनीं पाडला. बारा गोळ्या वापरण्याबद्दल, त्यांना या ठिकाणीं सहा पेन्स द्यावे लागत असत.

पूर्वींचा इंजिनिअरिंगचा अभ्यासक्रम तसाच चालू ठेवून, धिंग्रांनीं या नव्या अभ्यासाला प्रारंभ केला. पण, एवढ्यानेंहि आपली कार्यसिद्धि पूर्णांशानें होणार नाहीं असें वाटल्यावरून, त्यांनीं आपल्या उद्योगांना आणखी एक दिशा दाखविली. बडीबडी मंडळी ज्या ठिकाणीं सहज जमतात अशा ठिकाणीं आपणांला सहज प्रवेश मिळवितां यावा म्हणून काय केलें पाहिजे याविषयींचे विचार चालू असतांना धिंग्रांना 'नॅशनल इंडियन असोसिएशन' या संस्थेचें स्मरण झालें. मिस एमा जोसेफिन बेक या बाई या संस्थेच्या चिटणीसाचें काम पहात असत. त्यांच्याशीं धिंग्रांनीं मार्च महिन्यात परिचय करून घेतला. या संस्थेंत वारंवार कोण लोक येतात, या संस्थेच्या सभासदांचे वर्ग किती, वेगवेगळ्या वर्गांतल्या सभासदांचे अधिकार काय, इत्यादि बारीकसारीक गोष्टींची माहिती मिळवून एप्रिल महिन्याच्या सुमारास धिंग्रा हे या संस्थेचे Associate Member झाले. हिंदी विद्यार्थ्यांना माणसाळविण्याची मोहीम सुरू झाल्यावर कांहीं कल्पक इंग्रजांनीं हिंदी विद्यार्थ्यांसाठीं म्हणून हा सभासदत्वाचा प्रकार बुद्ध्याच सुरू केला होता. वार्षिक पांच शिलिंग ही सवलतीची वर्गणी देणाऱ्या हिंदी विद्यार्थ्यांना या वर्गांत प्रवेश मिळत असे व नेहमींच्या सभासदांचे बहुतेक अधिकार त्यांना उपभोगावयास सांपडत असत.

बड्याबड्या इंग्रजांचा विश्वास संपादन करण्याच्या कामीं यश मिळावें म्हणून धिंग्राजींनीं त्यांच्या वतीनें हिंदी विद्यार्थ्यांच्या गोटांतील बातम्या काढण्याचें कामहि पत्करलें. कर्झन वायलींनीं धिंग्राजींना लिहिलेल्या दि.१३–४–०९च्या एका पत्राचा उल्लेख पुढें खटल्याच्या कामांत करण्यांत आला. मदनलालजींचे ज्येष्ठ बंधु डॉ. धिंग्रा यांनीं कर्झन वायलींना लिहिलेल्या एका पत्राचा दिनांक निश्चित करतां येत नसला तरी तें पत्र एप्रिल महिन्याच्या शेवटीं अगर मेच्या प्रारंभीं लिहिलें असावें, असें दिसतें. या पत्रावरून असा निष्कर्ष निघण्यासारखा आहे कीं, मदन-लालजी ज्या हेतूनें वागत होते तो हेतु हळुहळू सफळ होत चालला होता व कर्झन वायलींसारख्या बड्या धेंडाला मदनलालजींबद्दलचें ममत्व वाटूं लागलें होतें. एप्रिल महिन्यांत मदनलालजी हे आपलें पूर्वीचें निवासस्थान सोडून देऊन, मिसेस मेरी हॅरिस या बाईच्या घरीं राहावयास गेले. त्या वेळेपासून तर भारतभवनांतले पुष्कळसे विद्यार्थी त्यांच्याविषयीं जास्तजास्तच संशयग्रस्त बनूं लागले होते. मदन-लालजींचें भारतभवनांतलें येणेंजाणेंही पूर्वीपेक्षां पुष्कळच कमी झालें होतें. दि. ३ एप्रिल रोजीं सावरकरांनीं ' इंडिया हाऊस ' मधील आपलें वास्तव्य संपविलें व विपिनचंद्र पाल यांच्या निवासस्थानीं चालणाऱ्या विद्यार्थ्यांच्या वसतिगृहांत ते जाऊन राहिले. मे महिन्याच्या शेवटीं अगर जूनच्या प्रारंभीं ' फ्री इंडिया सोसायटी ' च्या कांहीं सदस्यांकडून मदनलालजींविरुद्ध ठराव मांडण्यांत आला; तेव्हां सावरकरांनीं मदनलालजींच्या वतीनें रदबदली केली. ' मदनलाल फिरला मदनलाल फितूर झाला, सबब त्याला आपल्या संस्थेच्या सभासदांच्या यादींतून कमी करावें ' असा ठराव कांहीं सभासदांनीं मांडला. तेव्हां सावरकरांची मोठी पंचाईत झाली. मदनलालविरुद्ध असा ठराव यावा व तो आपणांसमक्ष मंजूर व्हावा हें त्यांना मुळींच इष्ट वाटत नव्हतें. बरें, त्या ठरावाच्या बाजूनें जीं कारणें मांडण्यांत आलीं होतीं त्यांचें निराकरण करणेंहि त्यांना या वेळीं शक्य नव्हतें. म्हणून त्यांनीं मध्यम मार्ग स्वीकारला व वेळ मारून नेली. " इतके दिवस आपणांबरोबर वागलेल्या मदनलाल-सारख्या सहकाऱ्याविरुद्ध एकदम असा ठराव करणें बरें नव्हे; आपण आणखी कांहीं दिवस थांबूं व काय घडतें तें पाहूं; मीहि त्याच्यावर बारीक नजर ठेवतों; त्याच्या वर्तनांत फरक होत नाहीं असें दिसलें तर या अवधीनंतर आपण काय तें करूं, " असें आपल्या सहकाऱ्यांना सांगून त्यांनीं प्रसंग निभावून नेला.

दि. ७–१०–१९०९ रोजीं वेस्ट मिन्स्टर पोलिस कोर्टांत मदनलालजी धिंग्रा यांजवरील खटल्याचें काम चाललें असतांना एका साक्षीदारानें असे उद्‌गार काढले कीं, दि. १ जुलै रोजीं मदनलालजींनीं कर्झन वायलीचा प्रत्यक्ष वध केला तत्पूर्वी कांहीं दिवस त्यांचें मन विचारमग्न झालेलें दिसत होतें व कांहींतरी भयंकर कृत्य करण्याचा विचार त्यांच्या मनांत एकसारखा घोळत असल्याचें त्यांच्या वर्तनावरून दिसत होतें. या साक्षीदाराचे हे उद्‌गार केवळ कल्पना अगर तर्क यांच्यावर आधारलेले नसावे.

हिंदी क्रांतिकारकांच्या हालचाली व बेत यांचा सुगावा काढणें हें एक नवें व महत्त्वाचें काम लंडनच्या गुप्त पोलिस खात्याच्या मागें हात धुऊन लागलें होतें, हें यापूर्वी दिलेल्या कांहीं घटनांवरून स्पष्ट झालेलेंच आहे. या खात्यामार्फत लंडनमधील कांहीं बड्या अधिकाऱ्यांना कोणता इषारा देण्यांत आला होता व हिंदी क्रांतिकारक आपल्या कारस्थानांचें जाळें किती सूक्ष्मपणानें व व्यापकपणानें विणीत चालले होते हें सांगणारा 'लंडन टाइम्स'च्या संपादकीय लेखांतला[1] पुढील उतारा लक्षांत ठेवण्यासारखा आहे :

More than a year ago, some public men of great prominence were privately warned that the question of removing them was under the consideration of Indian anarchists. It is understood that certain continental anarchists, approached with a view to securing their co-operation, declined to give any aid on the ground that such action might prejudice the asylum they now obtain in England…In the course of the Bhattacharya affair, Mr. Muskett, prosecuting solicitor stated that there was more in the matter than appeared on the surface.

(हिंदी क्रांतिकारकांच्या मनांतून तुमचा कांटा काढावयाचा आहे असा इषारा कांहीं उच्चपदस्थ पुढाऱ्यांना सुमारें वर्षापूर्वी देण्यांत आलेला होता. युरोपांतल्या कांहीं क्रांतिकारकांचें या कामांत सहकार्य मिळावें म्हणून प्रयत्न करण्यांत आला, असेंहि समजतें. आपण अशा कामीं सहकारिता केली तर, सध्यां इंग्लंडमध्यें मिळत असलेल्या आश्रयाला आपण मुकूं हें कारण सांगून, या क्रांतिकारकांनीं कसल्याहि प्रकारची मदत देण्याला नकार दिला...भट्टाचार्य–प्रकरण चालू असतांना, फिर्यादीतर्फे काम पाहणारे सॉलिसिटर मि. मस्केट यांनीं असे उद्‌गार काढले होते कीं, हें प्रकरण वरपांगीं दिसतें तितकें तें साधें नाहीं; त्यांत बराच गूढार्थ भरलेला आहे.) या लेखांतला गर्भितार्थ व जून महिन्याच्या प्रारंभापासून मदनलाल धिंग्रांच्या वृत्तींत दिसूं लागलेला पालट यांचा मेळ घातला म्हणजे असा एक तर्क संभवनीय वाटूं लागतो कीं, दि. ८-६-१९०९ रोजीं लॉर्ड कर्झन यांच्या अध्यक्षतेखालीं 'रॉयल कलोनियल इन्स्टिटयूट' च्या वतीनें सर बॅम्फील्ड फुल्लर यांनीं Indian Aspirations ' या विषयावर व्याख्यान दिलें त्या वेळीं, कर्झन अगर फुल्लर यांच्यावर रिव्हॉल्व्हर झाडण्याच्या उद्देशानें धिंग्रानीं कांहीं तरी उद्योग चालविला असावा. गणेशपंत सावरकर यांना जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा झाली ती दिनांक ८-६-०९ रोजींच ! तारखांचा हा मेळ पाहातां असें वाटूं लागतें कीं, या कठोर शिक्षेचा प्रतिशोध म्हणून तत्काळ कांहीं तरी करण्याचा प्रयत्न धिंग्रांनीं केला असावा. दिनांक १ जुलै रोजीं धिंग्रांनीं सर कर्झन वायली यांना ठार केलें; त्या दिवशीं धिंग्रा हे समारंभाच्या सुरुवातीलाच सभेच्या ठिकाणीं उपस्थित झाले होते. यावरून असा निष्कर्ष काढतां येतो कीं, ८ जून रोजीं कर्झन व फुल्लर हे सभास्थानीं पोंचतांच सभास्थानाचे दरवाजे धाडकन् बंद झाल्यां-

[1] London Times : 3-7-09.

मुळें धिंग्रांना बाहेरच ताटकळत रहावें लागलें,व त्यांची त्या दिवशीं निराशा झाली ! अशी निराशा फिरून पदरांत पडूं नये म्हणून, १ जुलै रोजीं धिंग्रांनीं किती खबरदारी घेतली होती, हें पुढें समजेलच.

डॉ. धिंग्रा यांनीं ले.कर्नल सर विल्यम कर्झन वायली यांना एक पत्र लिहिल्याचा उल्लेख वर करण्यांत आलाच आहे या पत्रांत डॉ. धिंग्रा यांनीं मदनलालच्या अनावर वर्तनाचा उल्लेख केला होता व मदनलाल वारंवार भारतभवनांत जातो याबद्दलची नापसंतीहि त्यांनीं व्यक्त केली होती. डॉ. धिंग्रांचें हें पत्र मिळाल्यावर कर्झन वायलींनीं मदनलालला एक पत्र धाडलें व इंडिया ऑफिसमध्यें येऊन आपली भेट घेण्याविषयीं सुचविलें. मदनलालजींनीं कर्झन वायलींची भेट इंडिया ऑफिसमध्यें घेतली नसावी; पण, अन्य ठिकाणीं भेटून त्यांनीं वायलीसाहेबांशीं चांगलेंच संधान जुळविलें असावें, असें दिसतें. अलीकडे आपण भारतभवनापासून दूर अंतरावर रहातों व भारतभवनांत जातों तेहि तेथील बातमी काढण्यासाठीं जातों, असें वायलीसाहेबांना भासविण्याच्या प्रयत्नांत मदनलालजींना चांगलेंच यश येत चाललें असावें; कारण, स्वतः सावरकरांच्या तोंडून ऐकलेली बातमी किंवा सावरकरांनीं पूर्वसंकेतानुसार टेबलावर ठेवललें एकादें पत्र मदनलालजी वायलीसाहेबांना सांगूं किंवा दाखवूं शकत होते. भारतभवनाचा भेद काढण्याचें उत्तम साधन आपल्या हातीं आलें अशा आनंदांत सर कर्झन वायलीसाहेबानीं थोडे दिवस घालविले ! इतक्यांत, 'नॅशनल–इंडियन–असासिएशन' या संस्थेचा वार्षिक समारंभ १ जुलै रोजीं रात्रौ 'इंपीरियल इन्स्टिटयूट'च्या जहांगिर हॉलमध्यें साजरा होणार असल्याची घोषणा झाली.

या समारंभाला कोण कोण मंडळी येणार आहेत, निमंत्रित अभ्यागतांचें स्वागत करण्याची कामगिरी कोणावर सोंपविण्यांत आली आहे, निमंत्रितांत हिंदी पाहुणे कोण असतील, हिंदी व इंग्रज निमंत्रितांना पोषाखासंबंधीं कांहीं सूचना देण्यांत आल्या आहेत कीं काय, समारंभ सुरू केव्हां होईल व तो केव्हां संपेल इत्यादि माहिती मदनलालजींनीं मोठ्या जिज्ञासूपणानें मिळविली. त्यांनीं इंपीरियल इन्स्टिटयूटच्या चिटणीस मिस् बेक यांची ओळख पूर्वींच करून घेतली असल्यामुळें, त्यांना ही माहिती मिळविण्याच्या कामीं मोठीशी अडचणहि भासली नाहीं. या समारंभाच्या आदल्या दिवशीं सायंकाळीं मदनलालजींची स्वारी श्री. बिपिनचंद्र पाल यांच्या निवासस्थानीं गेली होती. सावरकरांना भेटणें हा त्यांचा हेतु होता; पण, सावरकर अन्यत्र कोठें तरी गेले असल्यामुळें, या वेळीं त्यांची व सावरकरांची भेट होऊं शकली नाहीं. या प्रसंगीं मदनलालजी कसे दिसले याचें वर्णन त्या वेळीं तेथें उपस्थित असलेल्या एका हिंदी क्रांतिकारकानें लिहून ठेविलें आहे : [१]

---

१ Reminiscences of a Revolutionary: Article V : Marhatta: 3 rd September 1937.

The evening before when he came to look up Savarkar, I found him happy like a bird. He was always of a brooding temperament when he was in India House, but not so that evening. But it is true that he spoke very little, so that one could have no inkling of what was going on in his mind

( आदल्या दिवशीं सायंकाळीं ते सावरकरांना भेटण्यासाठीं आले; तेव्हां त्यांच्या वृत्तींत चंडोलाचा उल्हास दिसत होता. ते भारतभवनांत असत तेव्हां त्यांची सतची वृत्ति चिंतनपर असे. त्या संध्याकाळची त्यांची वृत्ति तशी नव्हती. आपल्या मनांत काय चाललें आहे याचा सुगावा कोणाला लागूं नये यासाठीं ते फारसें कांहीं बोलले नाहींत, हें मात्र खरें. ) ' इंपीरियल इन्स्टिटयूट ' मधील समारंभाला धिंग्रा हजर राहाणार आहेत हें सावरकरांना २९ जूनपूर्वींच माहीत झालेलें दिसतें; कारण, सावरकरांच्या सहकाऱ्यांपैकीं के. ग्यानचंद वर्मा यांनीं तयार केलेल्या कालक्रमवार टिपणांत २९ जून १९०९ या दिवसासंबंधींची पुढील नोंद सांपडते :

Chief Savarkar asked G. C. not to leave London and told to attend function at Imperial Institute.

( ' अभिनव भारता'चे प्रमुख सावरकर यांनीं जी. सी. ( ग्यानचंद वर्मा ) यांना लंडन न सोडण्याची सूचना दिली. इंपीरियल इन्स्टिटयूटमधील समारंभाला हजर राहण्याविषयींचा आदेशहि त्यांनीं वर्मा यांना दिला. )

दि. ३० जून रोजीं सायंकाळीं मदनलाल व सावरकर यांची भेट झाली नाहीं. ती त्या दिवशीं रात्रीं झाली कीं दुसऱ्या दिवशीं सकाळीं झाली कीं मुळींच झाली नाहीं, हें समजणें फार अवघड आहे. दि. १ जुलै रोजीं रात्रौ कर्झन वायलीचा वध झाल्यावर मदनलालजींची झडती घेण्यांत आली त्या वेळीं, हातांतल्या रिव्हाल्व्हरशिवाय आणखी दोन रिव्हॉल्व्हर्स त्यांच्या जवळ असल्याचें आढळलें. ज्या सहा बारी रिव्हॉल्व्हरनें मदनलालजींनीं वायली व लालकाका यांना परलोकचे प्रवासी बनविलें तें रिव्हॉल्व्हर बेल्जममध्यें बनविलेलें होतें. २६ जानेवारी रोजीं खरेदी केलेलें रिव्हाल्व्हर मदनलालजींच्या कोटाच्या उजव्या अंगच्या आंतल्या खिशांत होतें व याशिवाय २२ बोअरचें ब्राउनिंग रिव्हॉल्व्हरहि त्यांच्या कोटाच्या एका खिशांत होतें. पुढें जॅक्सन प्रकरणांत या ब्राउनिंग पिस्तुलांचा खूप बोभाटा झाला व चतुर्भुज या आचाऱ्याबरोबर आलेलीं वीस ब्राउनिंग पिस्तुलें विनायकराव सावरकर यांनींच धाडल्याचें न्यायालयानें सिद्ध मानलें. या गोष्टीकडे ओढ घेणारें मन असें मानण्याला प्रवृत्त होतें कीं, मदनलालजींजवळ जीं तीन रिव्हॉल्व्हर्स सांपडलीं त्यांतलें एखादें सावरकरांनीं त्यांना दिलें असेल ! पण, असें मानण्याला पुरेसा प्रत्यक्ष पुरावा समोर नसल्यामुळें, हा मुद्दा अनिर्णीत म्हणून तसाच सोडून देणें भाग आहे.

दि. ५-७-१९०९ रोजीं सर कर्झन वायली व डॉ. लालकाका यांच्या प्रेतांच्या तपासणीच्या वेळीं ज्या साक्षीदारांच्या जबान्या झाल्या त्यांत मदनलालजींची

घरमालकीण मिसेस मेरी हॅरिस या बाईची जबानी झाली. दि. १०-७-१९०९ रोजीं धिंग्रा यांच्यावरील खटल्याची प्राथमिक चौकशी वेस्ट मिन्स्टर पोलिस कोर्टात झाली त्या वेळीं धिंग्रांना नेमबाजीचें शिक्षण देणारे मोर्लेसाहेब यांची जबानी झाली. या दोन जबान्यांचा एकत्र विचार केला म्हणजे दिनांक १ जुलै रोजीं दुपारनंतर मदनलालजींनीं काय काय केलें याचा नकाशा रेखाटतां येतो. संध्याकाळीं जेवायचें नाहीं असें सांगून व मधल्या वेळचें खाणें नेहमींपेक्षां अगोदर मागवून, दुपारीं दोन वाजण्याच्या सुमारास मदनलालजी आपल्या बिऱ्हाडांतून बाहेर पडले. सहा वाजेपर्यंत ते बाहेरच होते. मधल्या तीनसाडेतीन तासांच्या अवधींत ते मोर्लेसाहेबाच्या नेमबाजीच्या शाळेंत गेले. बारा बार उडवून झाल्यावर मदनलालजींनीं मोर्लेसाहेबांच्या हातावर सहा पेन्स टिकविले; तेव्हां मार्लेसाहेबांनीं म्हटलें : तुम्ही आमचें नेहमींचें गिऱ्हाईक; यापुढें बारा बारांचे सहा पेन्स न घेतां, सवलत म्हणून चार पेन्सच घेत जाऊं तुम्हांपासून ! अशा तऱ्हेचें संभाषण होत असतांना मदनलालजींनीं आपलें रिव्हॉल्व्हर साफसूफ करून मागितलें व रिव्हॉल्व्हरची साफसुफी होऊन तें हातीं आल्यावर, मदनलालजी तेथून बाहेर पडले. सहा वाजण्याच्या सुमारास बिऱ्हाडीं परत आल्यावर ते आपल्या खोलींत गेले. 'इंपीरियल इन्स्टिटयूट' मध्यें समारंभाला उपस्थित राहणाऱ्या हिंदी इसमांनीं एक तर स्वदेशी पद्धतीचा पोषाख करून यावें, अगर इंग्रजी समाजांत रात्रींचा म्हणून जो विशिष्ट पोषाख घालतात तो तरी घालून यावें, असें सुचविण्यांत आलेलें असूनहि, मदनलालजींनीं त्या सूचनेकडे दुर्लक्ष केलें. सोबतच्या छायाचित्रांत मदनलालजींच्या अंगावर ज्या प्रकारचा पोशाख आहे तशाच पद्धतीचा पोशाख त्यांनीं अंगावर चढविला. तिन्ही रिव्हॉल्व्हर्स नीट भरून, तीं खिशांतून जागच्या जागीं ठेवून, नुकताच मिळविलेला खंजीर व बारा इंच लांबीचा सुरा या चिजा म्यानांत घालून व त्याहि योग्य त्या खिशांतून ठेवून, पंचहत्यारी बनून मदनलाल बाहेर पडण्याला सिद्ध झाले तों सायंकाळचे सात वाजून गेले होते. अगदीं निघण्याच्या वेळीं त्यांनीं अस्मानी रंगाची पंजाबी पगडी चढविली व डोळ्यांवर ऐटबाज चष्माहि चढविला.

'नॅशनल इंडियन असोसिएशन'चा यंदाचा वार्षिक समारंभ मोठ्या थाटांत साजरा होणार असें जाहीर झालें असून, शेलक्या दोनशें मंडळींना या समारंभाचीं निमंत्रणें धाडण्यांत आलीं होतीं सर कासवजी जहांगिर, प्रिन्सेस सोफिया धुलीपसिंग, फाझलभाय करीमभाय इब्राहिमप्रभृति हिंदी स्त्री-पुरुष या समारंभाला निमंत्रित म्हणून उपस्थित राहाणार होते. सर चार्लस लायल व त्यांचें कुटुंब अशीं दोघें जणें प्रवेशद्वारापाशीं उभीं राहून अभ्यागतांचें स्वागत करीत होतीं. संस्थेच्या चिटणीस मिस् बेक या आंतील सर्व व्यवस्था पाहाण्यांत व आलेल्या मंडळींशीं आपलेपणानें बोलण्यांत गर्क झालेल्या होत्या. सर कर्झन वायली व त्यांचें कुटुंब यांना फाझलभाय करीमभाय इब्राहिम यांच्याकडील भोजनाचें निमंत्रण असल्यामुळें, सेव्हॉय हॉटेलमधील हा

भोजनसमारंभ उरकून हें जोडपें व स्वतः फाझलभाय हे थोडया उशिरां समारंभाला येतील, असें व्यवस्थापकांना कळविण्यांत आलेलें होतें. मध्यरात्रींपर्यंत समारंभाची गंमत चालेल, अशी सर्वांची अपेक्षा होती.

मदनलालजी धिंग्रा हे समारंभाच्या ठिकाणीं आले तों आठ वाजण्याचा सुमार झालेला होता. समारंभाच्या निमंत्रितांना ज्या प्रवेश–पत्रिका देण्यांत आल्या आहेत त्यांतली प्रवेश–पत्रिका आपल्यापाशीं नाहीं, हें त्यांच्या लक्षांत आलें; या अड-चणीचा परिहार करणें फारसें अवघड काम नाहीं हेंहि त्यांना आठवलें. ज्यांच्या प्रवेश–पत्रिका गहाळ झाल्या असतील अशा लोकांनीं एका नोंदणीबुकांत स्वाक्षरी करावयाची व प्रवेश मिळवावयाचा असा संस्थेचा प्रघात असल्याचें त्यांना माहीत झालेलें होतें. त्याप्रमाणें त्या नोंदणीबुकांत स्वाक्षरी करून, मदनलालजींनीं जहां-गीर हॉलमध्यें प्रवेश मिळण्याची खात्रीची व्यवस्था करून टाकली. ही व्यवस्था होतांच ते आंत शिरले व अनेक लोकांशीं मनमोकळेपणानें गप्पा मारूं लागले. इत-रांना लागूं करण्यांत आलेला पोषाखाच्या बाबतींतला नियम न पाळणारा हा अव-लिया कोण, असा प्रश्न मनांत उद्भवल्यामुळें, पुष्कळसे समारंभाशिष्ट जिज्ञासेनें त्यांच्याकडे पाहाताच होते; व त्यांची जिज्ञासा दबावी म्हणून मदनलालजी आपण होऊनच अनेकांशीं बोलत होते. चिटणीस मिस् बेक या तर त्यांच्या चांगल्याच परिचयाच्या! त्यांच्याशीं बोलण्याची संधि तर मदनलालजींनीं दोन तीन वेळां साधली! ' स्वदेशीं परत केव्हां जाणार, असा प्रश्न या बाईनीं विचारला. तेव्हां मदनलालजींनीं अगदीं सहजपणानें उत्तर दिलें : युनिव्हर्सिटी कॉलेजच्या शेवटच्या परीक्षेंत उत्तीर्ण झालों कीं ऑक्टोबरमध्यें निघणारच !

९–९॥ वाजण्याच्या सुमारास बहुतेक निमंत्रित मंडळी समारंभस्थानीं गोळा झाली. जमलेल्या मंडळींचे रंगी–बेरंगी पोषाख, त्यांच्या चर्येवरील हास्योत्साह व जहांगीर हॉलमधील प्रकाशाच्या स्वैर लीला यांचा मेळ सुंदरच जमल्यामुळें, सर्व मंडळी आनंदांत निमग्न झाली होती. संगीताचे ध्वनि सारखे हवेंत उमटत असल्या-मुळें व त्या ध्वनींत या रंगेल मंडळीच्या गोड गप्पांची गुणगुण मिसळत असल्यामुळें वातावरणाची प्रसन्नता मोठी रमणीय वाटत होती. समोरच्या पदार्थांच्या रुचकर-पणापेक्षां या वातावरणाच्या रम्यपणांतच मनानें तरंगत रहावें, असाच तो देखावा होता. या आनंदाचा उपभोग घेण्यांत मंडळी निमग्न झालेली आहेत तों साडेदहा वाजण्या-चा सुमार झाला. 'बॉंबे मिल ओनर्स असोसिएशन'चे चेअरमन फाझलभाय करीमभाय इब्राहिम व त्यांचे कनिष्ठ बंधु असे उभयतां सर कर्झन वायली व त्यांच्या पत्नी यांच्या समवेत सभास्थानीं येऊन पोंचले. त्याबरोबर सर्वांचें लक्ष या नवागतांकडे लागलें. आपल्या मिष्टास स्वभावाला अनुसरून सर कर्झन, वायली हे उपस्थित मंडळीपैकीं अनेकांशीं संभाषण करण्यांत रंगून गेले.

अकराचे ठोके पडतांच मंडळी हळूहळू पांगूं लागली. कांहीं मंडळी रेंगाळत रेंगाळत हॉलमधून बाहेर पडत होती, कांहीं हॉलच्या दरवाज्याबाहेरच्या जागेंत उभी असून हळूहळू रस्त्याला लागत होती तर कांहीं जिना उतरून खालीं गेली होती. अंगावरचे जड कपडे काढून ठेवण्यासाठीं म्हणून एक सोयिस्कर खोली खालच्या मजल्यावर राखून ठेवलेली होती. त्यांत कर्झन वायलीसाहेबांच्या पत्नीनें आपले कांहीं कपडे ठेविले होते. ते घेण्यासाठीं त्या पुढें सरकल्या व प्रतिहारी म्हणून फाजल-भाय करीमभाय इब्राहीम हे त्यांच्यासमवेत गेले. हॉलमधील कांहीं हिंदी मंडळींशीं बोलण्याची संधि कर्झन वायलीसाहेबांना यापूर्वींच्या गर्दींत साधतां आली नसल्यामुळें ते त्या मंडळींशीं दोन शब्द बोलण्यांत थोडा वेळ घालवीत होते. इतर मंडळी दूर सरकली असें पाहून मदनलालजी पुढें सरकले. कर्झन वायलीसाहेबांचा व मदन-लालजींचा परिचय दढावलेला असल्यामुळें आणि मदनलालजींनीं आपली भेट घ्यावी अशा आशयाचें एक पत्र कर्झन वायलींनीं नुकतेंच धाडलें असल्यामुळें, वायलीसाहेबांना स्वाभाविकपणें असें वाटलें असावें कीं, त्या पत्रांतल्या विषयाबद्दलच कांहीं तरी बोलण्याची मदनलालजींची इच्छा असावी ! वायलीसाहेबांशीं आपल्याला जें बोलावयाचें आहे तें फारच नाजुक स्वरूपाचें आहे असा ग्रह उत्पन्न करणें इष्ट वाटल्यामुळें असो अगर अन्य कांहीं हेतूनें असो, मदनलालजींनीं आपला आवाज आणखीच हलका करून बोलणें चालू ठेविलें ! बोलणें नीट ऐकतां यावें म्हणून कर्झन वायलीसाहेब मदनलालजींच्या चांगलेच जवळ आले ! मदनलालजींच्या तोंडाला कर्झन वायलीसाहेबांचा कान भिडला, असेंहि म्हणावयास हरकत नाहीं !

आपण हेरीत असलेली संधि एकदांची आली, आपलें सावज आतां पुरतेपणीं आपल्या तावडींत सांपडलें, आतां पळाचाहि विलंब न लावता झेंप घातली पाहिजे हें ओळखून, मदनलालजींनीं आपल्या जवळचें बेल्जम रिव्हॉल्व्हर झटकन् बाहेर काढलें व कर्झन वायलींच्या डोळयाचा नेम करून त्यांनीं पहिला बार उडविला. मदनलालजींच्या हातांत रिव्हॉल्व्हर पाहतांच कर्झन वायलीसाहेब पांचचार पावलें मागें सरकले असले पाहिजेत; पण, ही त्यांची हालचाल होत असतांनाच मदनलाल-जींच्या रिव्हॉल्व्हरमधील पहिली गोळी त्यांच्या शरिरांत घुसली होती ! वेग-वेगळ्या अंतरावरून अचूक नेम मारण्यांत तरबेज बनलेल्या मदनलालजींनीं लागोपाठ दुसरी, तिसरी व चौथी गोळी झाडली ! त्याबरोबर वायलीसाहेब गतप्राण होऊन धरणीमातेच्या चरणीं विलीन झाले ! पहिले दोन बार ऐकतांच डॉ. कावस लाल-काका हे त्या जागेकडे धांवून आले. ते समोर येऊन पोंचण्याआधींच, त्या भीमरूपी महारुद्रानें चार गोळया झाडल्या होत्या. हॅम्लेट व त्याचा चुलता यांच्या दरम्यान लुडबूड करणारा पोलोनियस हा निरुपद्रवी जीव जसा हॅम्लेटच्या समशेरीला बळी पडला तसा डॉ. लालकाका मदनलालजींच्या पांचव्या गोळीला बळी पडला ! कुठें शांघाय नि कुठें लंडन ! पण, त्या बिचाऱ्या शांघायच्या पारशी डॉक्टरचें मरण

लंडनमधील या ठिकाणीं लिहिलेलें होतें त्याला तो तरी काय करणार ! रिव्हॉल्व्हर-मधील शेवटची म्हणजे सहावी गोळी स्वत:वर उडवून घेऊन आत्महत्या करण्याच्या इराद्यानें मदनलालजींनीं रिव्हॉल्व्हर आपल्या डोक्याच्या रोखानें धरलें ! रिव्हॉल्व्हर उलटें वापरावें लागल्यामुळें चापावर पुरेसा दाब पडला नाहीं ! नुसता टिक् असा आवाज झाला; गोळी चालली नाहीं; इतक्यांत –

सर लेस्ली प्रोबिन यांनीं मागून त्यांचा उजवा हात पकडला. डाव्या हातानें दुसरें रिव्हॉल्व्हर काढून त्याचा प्रयोग करण्याचा विचार मदनलालजींच्या मनांत आला, व त्यांचा हात खिशाच्या दिशेनें हलूं लागला. प्रोबिन साहेबांच्या बुद्धीला या हालचालीचा अर्थ कळला व त्यांनीं मदनलालजींचा दुसरा हातहि पकडला. मदनलालजी व प्रोबिनसाहेब यांची झटापट सुरू झाली. या झटापटींत या साहेबांचें मनगट पिळवटून निघालें व त्यावर चांगलीच सूज आली. बेभान बनलेल्या मदनलालजींनीं दिलेल्या रट्टयामुळें त्यांच्या दोन बरगडया पिंजून निघाल्या आणि त्यांच्या अंगांतील शर्टचा छातीचा भाग रक्तानें माखून गेला. मदनमोहनसिंह हा हिंदी विद्यार्थी या साहेबांच्या मदतीला धांवून आला नसता तर, मदनलालजींच्या खिशांत उरलेल्या रिव्हॉल्व्हरना आणखी किती लोक बळी पडले असते, हें सांगणें अवघड आहे. सर लेस्ली प्रोबिन व मदनमोहनसिंह या दुकलीपुढें आतां आपला इलाज चालणार नाहीं असें पाहून मदनलालजींनीं प्रतिकार थांबविला. मदनमोहन-सिंहनें त्यांच्या हातचें रिव्हॉल्व्हर काढून घेतलें व त्यांना जमिनीवर उताणें पाडून धरून ठेविलें. अशा स्थितींत असतांना मदनलालजींनीं हंसत हंसत म्हटलें : तेवढा चष्मा घेऊं दे ना मला ! शेजारच्या खुर्चीजवळ पडलेला चष्मा घेऊन मदन-लालजींनीं तो डोळ्यावर चढवून दिला.

रिव्हॉल्व्हरचे पहिले बार उडाले तेव्हां फाझलभाय करीमभाय इब्राहिम व कर्झन वायली यांची बायको अशीं दोघेंजणें वायलीसाहेबांची वाट पाहात तळमजल्या-वर उभीं होतीं. गोळीबाराला कोणी तरी बळी पडला अशी ओझरती खबर त्यांना मिळाली तेव्हां करीमभाय म्हणाले : मी जातों नि काय झालें तें पाहून येतों. ते निघाले नि बाईसाहेबहि त्यांच्या मागोमाग निघाल्याच ! कोणी तरी इंग्रज मरून पडला आहे असें कळतांच त्या म्हणाल्या : गरीब बिचारा ! असा अवसानी मेला हं ! पडलेल्या माणसाचा चेहरा फारच विद्रूप झालेला होता. तरीहि, खालीं वाकून न्याहाळून पाहिल्याबरोबर बाईसाहेबांनीं आपल्या यजमानांना ताबडतोब ओळखिलें. त्यांना जोराचा हुंदका आला व 'मी कशी हो अंतर्वेरी झालें' असा हंबरडा त्यांनीं आर्तस्वरानें फोडला. कर्झन वायलीसाहेबांचे नेहेमीचे डॉक्टर जवळच रहात असत. त्यांना बोलावण्याबद्दलची सूचना करून, बाई आपल्या यजमानांच्या शरीराशेजारीं बसल्या ! अजून कांहीं धुगधुगी आहे कीं काय हें पाहण्याच्या इराद्यानें त्या अभागी स्त्रीनें मोठ्या आशेनें नवऱ्याच्या अंगावरील शर्टचा छातीचा भाग बाजूला सारला.

बाहेर बारा वाजायला अद्याप थोडा अवधी होता; पण कर्झन वायलीच्या शरीरांतल्या चैतन्याचे बारा केव्हांच वाजून गेले होते. 'दोन शब्द तरी बोला ना हो' असें म्हणून बाईनीं आक्रोश सुरू केला, तो पाहून कोणालाहि 'अपि ग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदयम्' या भवभूतीच्या वचनाचें स्मरण झालें असतें! डॉ. जॉन बुकानन व डॉ. थॉमस नेव्हिल या दोन वैद्यराजांनीं कर्झन वायली व लालकाका यांना तपासलें! वायली साहेबांच्यांत तपासाला कांहींच उरलें नव्हतें! लालकाका धुगधुगी धरून होते; म्हणून त्यांना सेंट जॉर्जेस हॉस्पिटलमध्यें धाडण्यांत आलें! पण, हॉस्पिटल दिसण्यापूर्वींच लालकाकांचा आत्मा त्यांच्या नश्वर देहांतून निघून गेला होता! इतक्यांत पोलिसहि आले. पोलिसांनीं ज्याप्रमाणें मदनलालजींजवळच्या प्रत्येक वस्तूचा तपास केला, तसाच डॉक्टरनींहि त्यांच्या नाडीचा तपास केला. हा सर्व प्रकार पाहिल्यामुळें स्वत: डॉक्टरांचीहि नाडी बिथरली होती; पण, या सर्व प्रकाराचे सूत्रधार मदनलालजी यांची नाडी अगदीं शांतपणानें चालली होती, असें स्वत: डॉक्टरांनींच पुढें साक्षींत सांगितलें. पोलिसांनीं मदनलालजींना वॉल्टनस्ट्रीट पोलिस स्टेशनवर नेलें. त्यांच्या जवळचीं हत्यारें जशीं पोलिसांनीं आपल्या स्वाधीन करून घेतलीं तसेच त्यांच्या खिशांत सांपडलेले बारीकसारीक कागदहि त्यांनीं हस्तगत केले. या कागदांत पुष्कळशीं 'व्हिजिटिंग कार्डस्' होतीं आपला संकल्प सिद्ध झाल्यावर न्यायालयांत आपलें म्हणणें म्हणून काय सांगावयाचें हें आगाऊ ठरवून, मदनलालजींनीं तें एका कागदावर लिहून काढलें होतें. तो कागदहि कोटाच्या एका खिशांतून बाहेर आला. पोलिसांनी हा कागद मोठ्या बंदोबस्तानें कुलुपबंद पेटींत ठेवून दिला. पोलिस स्टेशनांत गेल्यावर थोड्याच वेळांत मदनलालजींना सुंदर झोंप लागली! मदनलालचे साहाय्यक म्हणून कोरेगांवकरांची योजना झाली होती व या योजनेप्रमाणें कोरेगांवकर हे 'इंपिरियल इन्स्टिटयूट'मधील समारंभाला 'तयारी' निशीं गेले होते. मदनलालच्या रिव्हॉल्व्हरचे आवाज ऐकल्यावर थोडक्याच वेळांत कोरेगांवकर बिपिनचंद्र पाल यांच्या निवासस्थानीं गेले व जें कांहीं सांगावयाचें तें त्यांनीं सावरकरांना सांगून टाकलें. श्री. ग्यानचंद वर्मा हे कांहीं बिहारी मित्रांसह स्वतंत्रपणें समारंभाला गेले होते. ते दुसऱ्या दिवशीं अगदीं उजाडत सावरकरांना भेटावयास गेले. आपलें प्रतिवृत्त त्यांनींहि आपल्या नेत्याला सांगितलें.

गुरुवारीं मध्यरात्रीनंतर घडलेल्या या भीषण प्रकाराचें दुसऱ्या दिवशीं सकाळच्या लंडनच्या वृत्तपत्रांतून जें वर्णन आलें तें बरेंचसें त्रोटक होतें. याचें एक कारण असें कीं, अगदीं अखेरच्या क्षणापर्यंतची बातमी शक्य त्या विस्तारानें देण्याची दैनिक वृत्तपत्रांची सध्यांची तत्परता त्या काळीं फारशी विकास पावलेली नव्हती. लंडन शहरासाठीं स्वतंत्र मुद्रण करून आपल्या दैनिकाचा अंक काढण्याची पद्धत 'लंडन टाइम्स'नें धिंग्रा प्रकरणाच्या थोडे दिवस अगोदर नुकतीच सुरू केली होती. शुक्रवारीं सकाळीं जी त्रोटक बातमी मिळाली ती वाचून लंडन शहरांत खळबळ माज

खूपच उडून गेली! आदल्या रात्रीच्या समारंभाला जे लोक हजर होते त्यांपैकीं अनेकांना गांठून त्यांनीं दिलेल्या 'चक्षुर्वै सत्यं' हकीकती मिळविण्यासाठीं वार्ताहरांची धांवपळ सुरू झाली. खुद्द लंडन शहरांत असा साहसी प्रकार करणारा हा धिंग्रा आहे तरी कोण, यविषयींची लोकांची जिज्ञासा पुरवितां यावी म्हणून धिंग्राबद्दलचीहि माहिती मिळविण्याचे प्रयत्न सुरू झाले. त्या वेळीं लंडन शहरांत असलेल्या कै. सुरेंद्रनाथ बानर्जींना या वार्ताहरांनीं कसें सतावून सोडलें व सुरेंद्रबाबूंनीं त्यांना कोणतें उत्तर दिलें याचें वर्णन 'A Nation in Making' या सुरेंद्रबाबूंच्या आत्मचरित्रात्मक ग्रंथांत करण्यांत आलेलें आहे. धिंग्रा या नांवावरून हा इसम बंगाली नसावा असें दिसतें, असें अकरणात्मक उत्तर वार्ताहरांना देऊन सुरेंद्रबाबू मोकळे झाले.[1] या दिवशीं दुपारीं मदनलालजींना वेस्ट मिन्स्टर पोलिस कोर्टांत उभें करण्यांत आलें. आरोपीच्या पिंजऱ्यांत उभे राहिलेले मदनलालजी अत्यंत शांत दिसत होते. खिशांत हात कोंबून ऐटींत उभ्या असलेल्या त्यांच्या गंभीर चर्येकडे पाहणाऱ्याला, या इसमानें आदल्या रात्रीं एकाग्राचा वध केला आहे हें विधान विश्वासार्हहि वाटलें नसतें. निकोल्स नांवाच्या कॉन्स्टेबलनें सर्व हकीकत सांगितली व दोघांचा खून केल्याचा या गृहस्थांवर आरोप आहे असें म्हटलें; तेव्हां मदनलालजी नुसते हंसले. कॉन्स्टेबलला कांहीं प्रश्न वगैरे विचारण्याच्या भानगडींत न पडतां ते म्हणाले : डॉ. लालकाका यांचा मी जाणूनबुजून खून केला नाहीं, इतकेंच मला म्हणावयाचें आहे. माझी व डॉक्टरांची ओळखही नव्हती. मला धरण्यासाठीं ते पुढें सरसावले तेव्हां आत्मरक्षणासाठीं मी त्यांच्यावर गोळी झाडली. मदनलालजींना एक आठवडाभर कच्च्या कैदेंत ठेवण्याचा कोर्टानें हुकूम दिला. मदनलालजींना कोर्टांत उभें केलें त्यापूर्वींच डेूपर नांवाच्या हेरखात्यांतल्या इन्स्पेक्टरनें त्यांच्या निवासस्थानाची झडती घेतली होती. मदनलालजींच्या खिशांत जें वक्तव्य सांपडल्याचा उल्लेख पूर्वीं करण्यांत आलेला आहे त्याची एक प्रत या झडतींत डूपर यांना सांपडली. कुलूपबंद पेटींत सांपडलेली ही प्रत त्यांनीं स्वतःजवळ घेतली व पहिलें वक्तव्य जसें बंदोबस्तानें ठेवण्यांत आलें होतें त्याप्रमाणें त्याची ही प्रतहि मोठ्या बंदोबस्तानें ठेवण्यांत आली.

कर्झन वायलीच्या वधाची हकीकत इंग्रज स्त्री-पुरुषांना जसजशी कळत चालली तसतसा त्यांचा हिंदी विद्यार्थ्यांवरील रोष भडकूं लागला. 'इंडिया हाउस' व सावरकर यांचें नांव यापूर्वींच सर्वतोमुखीं झालें असल्यामुळें, कित्येक प्रक्षुब्ध मंडळी सावरकरांचा शोध करीत विपिनचंद्र पाल यांच्या घराभोंवतीं जमा झाली. सावरकर स्वतः बंदोबस्तानें वागतच होते; त्यामुळें प्रक्षोभाच्या प्रदर्शनापलीकडे या प्रसंगीं अधिक कांहींच घडलें नाहीं. पण, या प्रक्षोभाचा एक परिणाम लौकरच दिसून आला. सावरकर हे आपल्या येथें रहात असले तरी त्यांचा व आपला तसा कांहीं संबंध नाहीं पैसे देऊन वसतिगृहांत राहणारे एक विद्यार्थी यापलीकडे त्यांची आपली विशेष ओळखहि नाहीं-असें श्री. बिपिनचंद्र पाल यांनीं जाहीर करून टाकलें.

---

[1] P. 274.

घडलेल्या प्रकाराचा निषेध करणाऱ्या लोकांची आतां धांवपळ सुरू झाली. मदनलालजींच्या वडिलांनीं मिंटोसाहेबांना तार केली व आपल्या चिरंजीवांच्या वर्तनाबद्दलची कडक नापसंति आणि झालेल्या प्राणहानीबद्दलची हळहळ या भावना त्यांनीं व्यक्त केल्या. दिनांक २ जुलै रोजीं इंग्लंडचे पंतप्रधान ॲस्क्विथसाहेब यांना एका सभेंत बोलण्याची संधि मिळाली; त्याबरोबर त्यांनीं धिंग्रा–प्रकरणाचा उल्लेख केला व घडलेल्या प्रकाराचा संबंध एकाद्या कटाशीं असला पाहिजे, असें विधान ठोकून दिलें. दि. ३ रोजीं 'न्यू रिफॉर्म क्लब' मध्यें लंडनमध्यें असलेल्या प्रमुख हिंदी नागरिकांची निषेध–सभा झाली. या सभेच्या अध्यक्षस्थानीं सुरेंद्रबाबूंची योजना करण्यांत आली होती. सभेला विद्यार्थ्यांची खूप गर्दी लोटली होती. सावरकर व त्यांच्या बरोबरीचे विद्यार्थी सभास्थानीं हजर होते, असें सुरेंद्रबाबूंच्या आत्मवृत्तांत लिहिलेलें आहे;[१] पण, स्वतः सावरकर हे या सभेला गेले नव्हते; त्यांनीं आपल्या-बरोबरच्या विद्यार्थ्यांना मात्र धाडून दिलें होतें. सुरेंद्रबाबूंनीं घडलेल्या प्रकाराबद्दलची नापसंति व्यक्त केली; पण, पंतप्रधानांनीं लावलेल्या कटाच्या शोधावर त्यांनीं जोराचा हल्ला केला. या सभेंत कै. बिपिनचंद्र पाल यांचें भाषण झालें. घडलेला प्रकार राजकीय हेतूमुळें घडला कीं काय हा प्रश्न अद्याप अनिर्णीत आहे, त्याबद्दलचें मत तूर्त व्यक्त न करणें बरें, असें सांगितल्यावर ते म्हणाले : अशा गुन्ह्याचा भारतातल्या राष्ट्रीय चळवळीशीं संबंध जोडण्याचा कोणी प्रयत्न केला तर त्याचा कडक निषेध होणें अवश्य आहे.

लोकमान्य टिळकांना झालेल्या शिक्षेविरुद्ध अपील करण्याकरितां हिंदुस्थानांतून आलेल्या मंडळींपैकीं श्री. दादासाहेब खापर्डे यांनीं अद्याप लंडन सोडलें नव्हतें. श्री. पारेख यांनीं मांडलेल्या ठरावाला पुष्टि देतांना दादासाहेबांनीं या सभेंत जें भाषण केलें तें मोठें मासलेवाईक होतें. प्रत्येक शब्द नीट न्याहाळून पाहिला व शब्दांमागील सूचनेकडे लक्ष दिलें तरच त्या भाषणाचें रहस्य कळूं शकेल. दादा-साहेब म्हणाले :

Those who have made a study of natural history know that of the 800 classes of crawling things which bear likeness to snakes, only two are poisonous. The rest are really harmless and innocent Yet, whenever anyone sees a snake, the natural impulse is to beat it and, if possible to kill it. Unfortunately Indians are in a similar position. They would be blamed as a body for the mad act of a bad man. Even the Prime Minister, keen lawyer as he is, has fallen into that error.

(जीवसृष्टीचा अभ्यास करणारांना हें माहीत आहे कीं, सर्पासमान दिसणाऱ्या सरपटणाऱ्या प्राण्यांच्या ८०० जाती असल्या तरी, त्यांतल्या अवघ्या दोनच जाती विषारी आहेत; बाकीच्या जाती वस्तुतः गरीब व निरुपद्रवी आहेत. असें असलें

[१] A Nation in Making : P. 275.

तरी, सरपटणारा प्राणी दिसला कीं, त्याला धोपटण्याला व शक्य तर त्याला जिवें मारण्याला माणसाचें मन प्रवृत्त होतें. दुर्दैवानें भारतीयांची स्थिति अशीच आहे. एका वाईट माणसाच्या वेडगळ कृत्याबद्दल भारतीयांना सामुदायिकरीत्या दूषणें देण्यांत येतील. इंग्लंडचे पंतप्रधान हे मोठे तल्लख बुद्धीचे वकील आहेत; तरीहि त्यांनीं ही चूक केली आहे. )

सोमवार दि. ५-७-०९ रोजीं कर्झन वायली व लालकाका यांच्या प्रेतांची कॉरोनर कोर्टांत तपासणी झाली. कच्च्या कैदेंत असणाऱ्या मदनलालजींना या तपासणीच्या वेळीं कोर्टांत हजर राहातां आलें असतें; पण, त्यांनीं तसें करण्याला नकार दिला. या तपासणीच्या वेळीं ज्या साक्षी झाल्या त्यांतून निष्पन्न झालेला एक मुद्दा नमूद करण्याजोगा आहे. दिनांक २ रोजीं, मदनलालजी वॉल्टन स्ट्रीट पोलिस स्टेशनमध्यें होते तेव्हां, इन्स्पेक्टर चार्लस ग्लास यानें त्यांना एक सूचक प्रश्न विचारला होता. 'तुमच्या कोणा इष्टमित्रांना कांहीं निरोपबिरोप धाडावयाचा आहे का ?' हा प्रश्न ऐकतांच मदनलालजींच्या लक्षांत त्याचें मर्म आलें होतें. सहज कांहीं मित्रांचीं नांवें आपण उच्चारून गेलों तर,पोलिस त्यांतून हवे ते निष्कर्ष काढतील व त्यामुळें आपल्या मित्रांना त्रास होईल हें ओळखून मदनलालजींनीं उत्तर दिलें : आज तरी तसें कांहीं करण्याची मला आवश्यकता दिसत नाहीं; त्यांना हळुहळू सर्व कळेलच. मदनलालजी स्वतःहि कच्चे नाहींत व ते कच्च्या गुरूचे चेले नाहींत हा प्रकाश 'ग्लास' मध्यें पडण्याला हें उत्तर पुरेसें होतें !

याच दिवशीं झालेल्या हाउस ऑफ कॉमन्सच्या बैठकींत प्रश्नोत्तरांच्या वेळीं धिंग्रा प्रकरणाचा प्रतिध्वनि उमटला. कर्झन वायलीच्या खुनासंबंधींची सर्व माहिती न्यायालयांत पुढें येईलच असें सरकारतर्फे सांगण्यांत आल्यानंतरहि, कॅप्टन क्रेग या सभासदानें पंतप्रधानांनीं कांहीं वक्तव्य करावें असें सुचविलें. तेव्हां ॲस्क्विथसाहेब म्हणाले :

The profound horror which this crime has excited has already received universal expression. I cannot at this moment make any further statement.

( या गुन्ह्यामुळें जी गंभीर स्वरूपाच्या भीतीची लाट उसळली आहे ती यापूर्वी सहस्रमुखांनीं व्यक्त झाली आहे; सध्यां मला अधिक कांहीं सांगावयाचें नाहीं.) पं. शामजी कृष्णवर्मा यांच्या 'इंडियन सोशिऑलॉजिस्ट' पत्रांत राजकीय खुनांचा क्षमाबुद्धीनें विचार केला जातो व अशा खुनांना सदर पत्रांत प्रोत्साहन दिलेलें असतें इत्यादि तक्रार करून, सर हेन्री क्रेग या सभासदानें ॲटर्नी जनरल सर रॉब्सन यांना असें सुचविलें कीं, या खटयाळ पत्राचा कांहीं तरी बंदोबस्त होणें जरूरीचें आहे. ॲटर्नी जनरलसाहेबांनीं आपल्या पृच्छकाला अभयदान दिलें. 'इंडियन सोशिऑलॉजिस्ट' पत्रांतल्या ज्या लिखाणामुळें हें वादळ उठलें होतें तें लिखाण

सदर पत्राच्या अगदीं ताज्या अंकांत प्रसिद्ध झालेलें होतें व त्यांतील महत्त्वाचीं वाक्यें पुढीलप्रमाणें होतीं :

At the risk of alienating the sympathies and good opinion of almost all our old friends and acquaintances...... We repeat that political assassination is not crime --- All unprejudiced men treat political assassins not as criminals in any way, but often regard them as benefactors of their race.

( आमचे जुने स्नेही व परिचित इसम यांच्यापैकीं बहुतेकांची सहानुभूति व अनुकूल मत यांना मुकावें लागेल हा धोका दिसत असूनहि,...आम्हीं फिरून म्हणतों कीं, राजकीय खून हा गुन्हा होत नाहीं...निर्विकार बुद्धीचे सर्व लोक राजकीय खून करणारांना कोणत्याहि प्रकारें गुन्हेगार मानीत नाहींत; उलट, पुष्कळ वेळां ते त्यांना आपल्या जातीचे उपकारकर्तेच मानतात ).

याच दिवशीं सायंकाळीं कॅक्स्टन हॉलमध्यें जी निषेधाची सभा भरली ती अनेक दृष्टींनीं संस्मरणीय ठरली. कॅक्स्टन हॉलच्या ज्या भागांत ही सभा करण्याचें मुळांत ठरलें होतें ती जागा अगदींच अपुरी वाटूं लागल्यामुळें, या सभागृहाचें मोठ्यांत मोठें दालन निवडण्यांत आलें. आणि तरीहि लोकांना जागा मिळतां मिळतां पंचाईतच पडली. आगाखान हे या सभेचे अध्यक्ष होते व सभेला आलेल्या बड्या मंडळींत कुचबिहारचे महाराजकुमार, सय्यद हुसेन बिलग्राणी व के. सी. गुप्त हे इंडिया कौन्सिलचे सभासद, सर दिनशा पेटिट, फाजलभाय करीमभाय इब्राहिम, सभेचे निमंत्रक सर मंचरजी भावनगरी, सुरेंद्रनाथ बानर्जी प्रभृति लोक होते. या सभेला जावयाचें सावरकरप्रभृतींनीहि ठरविलें होतें. इतर विद्यार्थीहि खूप मोठ्या जमावानें सभेला आले होते. सावरकर, ग्यानचंद वर्मा व व्ही.व्ही.एस्. अय्यर हे व्यासपीठाच्या समोरच्या भागांत शेजारीं शेजारीं बसले होते व त्यांच्या मागच्या रांगेंत सावरकरांच्या मागील जागेवर श्री. एम्. पी. टी. आचार्य हे बसलेले होते. सभेला आलेले संदेश वाचून दाखविल्यावर भावनगरींनीं पहिला ठराव मांडला. अमीरअल्लींनीं या ठरावाला पाठिंबा दिला. कर्झन वायली व लालकाका यांच्या आप्तांना झालेल्या दुःखांत या सभेचे सभासदहि सहभागी असल्याबद्दलचा हा ठराव होता. या ठरावावर बोलतांना कोणालाहि मदनलालजींवर टीका करण्याचें विशेषसें कारण नव्हतें; पण, भावनगरींना टीका केल्याशिवाय राहवलें नाहीं. टीका करतांनाहि त्यांनीं फार मर्यादातिक्रम केला. अमीरअल्लीहि वाहवले; पण, त्यांनीं भावनगरींच्याइतके तारे तोडले नाहींत. दुसरा म्हणजे मदनलालजींच्या निषेधाचा ठराव अध्यक्ष स्वतःच वाचूं लागले. इतक्यांत, मदनलालजींच्या धाकट्या भावाचा हात धरून 'इंडिया कौन्सिल'चे एक सदस्य थिओडर मॉरिसन हे व्यासपीठावर चमकूं लागले. आपल्या भावानें सर कर्झन वायलींना मारून कुलाला कलंक लाविला आहे, वगैरे पढविलेलीं वाक्यें छोट्या धिंग्रानें उच्चारलीं. हीं वाक्यें स्वतःस्फूर्तीनें उच्चारून त्यानें ज्येष्ठ

बंधूच्या कृत्याचा निषेध केला असता तर श्रोत्यांवर जो परिणाम होणें शक्य होतें त्याहून अगदीं भिन्न परिणाम वरील प्रकारामुळें झाला. सभेंत होणाऱ्या ठरावा-विरुद्ध ज्यांनीं एरव्हीं तक्रार केली नसती अशीं माणसेंहि हा प्रकार पाहून रुष्ट झालीं !

सभेंत निर्माण झालेल्या अस्वस्थतेचा वास अध्यक्षांच्या तीक्ष्ण घ्राणेंद्रियाला आल्यामुळें, वेळ नाहीं या सबबीवर, स्वतःच वाचून दाखविलेला ठराव त्यांनीं मताला टाकला. संमतिदर्शक पुष्कळसे हात हवेंत उभारलेले दिसतांच, ठरावाचें चटश्राद्ध उरकून स्वतःची सुटका करून घेऊं पाहणारे अध्यक्षमहाशय उद्गारले : All ( सर्वानुमतें संमत ) ! त्याबरोबर सावरकर आपल्या स्थानावरून जोरानें म्हणाले, No, not all ! ( सर्वानुमतें नाहीं, विरुद्ध मतेंहि आहेत. ) अशा ठरावाला संमति न देणारा व संमति देत नाहीं असें एवढया मोठया सभेंत छातीठोकपणें म्हणणारा हा महाभाग कोण असा प्रश्न प्रत्येकाच्या मनांत उपस्थित झाला. हा कोण 'संप्रति नवा पुरुषावतार ' या प्रश्नानें अंकित झालेली आपली नजर जो तो सावरकरांकडे वळवूं लागला. ' सावरकर, सावरकर ' अशी कुजबूज उभ्या सभागृहांत ऐकूं येऊं लागली. सावरकर हें नांव यापूर्वीं अनेकांनीं ऐकलेलें असल्यामुळें व आजच्या या सभेंत त्यांनीं जी निर्भय वृत्ति दाखविली तिच्यायोगें त्या नांवांतलें मर्म त्यांच्या अधिकच स्पष्टपणें लक्षांत आल्यामुळें, सावरकर आतां काय करतात इकडे अनेकांचें लक्ष वेधून राहिलें. आपल्या जागेवर सावरकर उभे राहिले होते व ठरावाला आपला विरोध कां आहे हें स्पष्ट करून सांगण्याचा ते प्रयत्न करीत होते.

आपण बोलाविलेल्या सभेंत गोंधळ होणार असें पाहून मंचरजी भावनगरी फार चिडून गेले व प्लॅटफॉर्मवरून खालीं उडी मारून ' धरा, पकडा ' म्हणून किंचाळूं लागले. अध्यक्ष आगाखान यांना भावनगरींचा हा अतिरेक पसंत पडला नाहीं. सभेंत गोंधळ होऊन खुर्च्या उचलल्या जाऊं लागल्या व काठया सरसावण्यांत येऊं लागल्या. सभेंत क्रांतिकारक पक्षाचे हिंदी तरुण उपस्थित आहेत या जाणिवेनें पछाडलेल्या कित्येक आंग्ल स्त्रियांना अशी धास्ती वाटूं लागली कीं, या सभास्थानीं आतां पिस्तुलें झाडण्यांत येऊन कांहीं इंग्रजांचे प्राण जाणार ! या भीतीच्या आहारीं गेलेल्या या स्त्रिया किंचाळूं लागल्या व बाकांखालीं, खुर्चीमागें जेथें जागा सांपडेल तेथें दडून राहूं लागल्या. सांपडेल त्या मार्गानें बाहेर निसटण्याचीहि घाई कित्येक मोठमोठीं माणसें करूं लागलीं. इतक्यांत पामर नांवाचा एक बॅरिस्टर सावरकरांच्या अंगावर धांवून आला. त्यानें सावरकरांच्या डोळ्यांलगत प्रहार केला; तरीहि सावर-करांनीं आपल्या जागेवरून आपलें मत ठरावाविरुद्ध असल्याचें सांगण्याचा सपाटा चालूच ठेविला. सावरकरांच्या डोळ्याला जखम होऊन तिच्यांतून रक्त भळभळा वाहूं लागलें; हें पाहून अनेक मंडळी प्रक्षुब्ध झाली. सावरकरांवर हात टाकण्यांत आला हें पाहून सुरेंद्रनाथ खूप रागावले व निषेध म्हणून ते सभा सोडून गेले. [illegible] करांच्या मागें बसलेले श्री. तिरुमलाचार्य यांनीं आपल्या लाठीचा एक तडाखा

पामराच्या डोक्यावर लगावला. इतक्यांत कोणी एक शीख गृहस्थ आचार्यांचा गळा पकडूं लागला श्री. अय्यर हे तर खिशांतलें पिस्तुल काढून पामराचा परामर्ष घेण्याच्या विचारांत होते; पण, सावरकरांनीं त्यांना डोळ्यांनीं दाबल्यामुळें, त्यांनीं तसें कांहीं केलें नाहीं. डोक्याला मलमपट्टी बांधलेला पामर व्यासपीठावर उभा राहिला व म्हणाला : See How I defended the Empire, with blood from my own head. ( स्वतःच्या डोक्यांतलें रक्त खर्ची घालून मी साम्राज्याचा बचाव कसा केला पहा ! ) या पामराच्या डोक्यांत रक्ताप्रमाणें अक्कलहि असती तर त्याला हें कळलें असतें कीं, ज्या काठीच्या तडाख्यानें त्याचें डोकें रक्तबंबाळ केलें होतें त्या काठीच्या मागें जी प्रतिकारवृत्ति होती तीच साम्राज्याचा नक्षा उतरविण्याला खरोखर कारणीभूत होती. आणि, त्याच्या डोक्यांतल्या चुळकाभर रक्तानें वाहून जाण्याइतकी ती प्रतिकारप्रवृत्ति लेंचीपेंची नव्हती.

हळुहळू पोलिसांनीं सभास्थान आपल्या ताब्यांत घेतलें. सावरकरांनाहि त्यांनीं कांहीं वेळ आपल्या ताब्यांत ठेविलें. मंडळी घरोघर निघून जाऊं लागली. वातावरण जरा शांत झाल्यावर पोलिसांच्या जिवांत जीव आला व सावरकरांशीं सामोपचाराची भाषा बोलून ते आपल्या मार्गाला लागले. सावरकरांच्या स्नेह्यांनीं यांना सभागृहाबाहेर नेलें व घरीं पोंचविलें. श्री. आचार्य यांनीं सभेंत जो पराक्रम केला होता त्यावर चिडून पामर त्यांच्यामागें फिर्यादीचें शुक्लकाष्ठ लावील कीं काय, असा विषय चर्चेच्या ओघांत निघाला. तेव्हां ही फिर्यादी–आर्यादीची कटकट मिटविण्याची एक युक्ति सावरकरांनीं शोधून काढली. आपल्या वर्तनाचें स्पष्टीकरण करणारें पत्र आपणच वृत्तपत्रांकडे प्रसिद्धीसाठीं धाडलें तर फिर्याद करण्याच्या विचारांत असलेला पामर स्वतःच पेंचांत सांपडेल व हा विचार त्याला शेवटीं सोडून द्यावा लागेल असें अनुमान बांधून, सावरकरांनीं त्या रात्रीं पडल्यापडल्या पुढील पत्र लिहिलें व तें ताबडतोब वृत्तपत्रांकडे धाडलें. दिनांक ६–७–०९ रोजीं प्रसिद्ध झालेल्या ' London Times ' प्रभृति पत्रांत हें पत्र पुढीलप्रमाणें छापलेलें आढळतें :

* To the Editor of the Times,

Sir

In fairness to me, will you kindly insert the following lines in the next issue of your valuable paper ?

In reference to the unfortunate incident which happened in the meeting held at Caxton Hall this evening in order to express horror at

---

* संपादक ' टाइम्स ' यांस —

महाशय, आपल्या मूल्यवान् पत्राच्या येत्या अंकांत पुढील मजकुराला कृपा करून स्थान देऊन, आपण मजविषयींची निःपक्षपातबुद्धि व्यक्त कराल का ?

सर कर्झन वायली यांच्या खुनाबद्दलचा तिटकारा व्यक्तविण्यासाठीं आज सायं

the murder of Sir Curzon Wyllie, it is to be feared that my attitude would be open to misinterpretation.

The fact is that, when the president put the resolution before the meeting and asked those in favour of the same to raise their hands, he acknowledged the right, in accordance with the invariable practice in all public meetings of everyone who was present to vote according to his choice. The resolution was explained by those who proposed and seconded it, so as to presume the criminality of the man who is accused of having committed the murder. It seemed to me an encroachment upon and assumption of the authority of the Law Courts to declare a man, who is still under trial, to be a criminal. The man accused of the murder has made no confession So, it seemed to me more just and appropriate to omit the words 'crime' and 'criminals' from the resolution. As the proceedings had advanced too far to effect this, I simply voted against the resolution as it stood and wanted to bring to the notice of the President the fact that the resolution could not be declared as passed unanimously. I was perfectly within my rights as a voter and the only proper way for the president was to count the votes against and for and declare the result, But, some excited spirits forgot themselves so much as to shout 'eject him' etc, and even went so far as

---

काळीं कॅक्स्टन हॉलमध्यें भरलेल्या सभेंत जो शोचनीय प्रकार घडला त्याबद्दल विचार करतां, माझ्या धोरणाचा विपर्यास होणें शक्य आहे, अशी शंका मला येत आहे.

अध्यक्ष महाशयांनीं प्रस्ताव सभेपुढें मांडला व त्याला अनुकूल असलेल्या लोकांनीं हात वर करावे असें सांगितलें. सार्वजनिक सभांना उपस्थित असणाऱ्या प्रत्येक इसमाला स्वतःच्या इच्छेप्रमाणें मत देण्याचा अधिकार आहे ही निरपवाद रूढि त्यांना मान्य असल्यामुळेंच त्यांनीं असें केलें. सदर ठराव ज्यांनीं मांडला व ज्यांनीं त्याला अनुमोदन दिलें त्यांनीं ठरावाचें स्पष्टीकरण अशा प्रकारें केलें कीं, ज्या गृहस्थावर खून केल्याचा आरोप ठेवण्यांत आला आहे त्याची गुन्हेगारी त्या प्रकारांत गृहीत धरलेली होती. ज्याची चौकशी अद्याप चालू आहे असा मनुष्य गुन्हेगार असल्याचें जाहीर विधान करणें म्हणजे न्यायालयाच्या अधिकारावर अतिक्रमण करणें व तो अधिकार स्वतःच्या हातीं घेऊन वागणें होय, असें मला वाटलें. ज्याच्यावर खुनाचा आरोप ठेवण्यांत आला आहे त्यानें कबुलीजबाब दिलेला नाहीं. यामुळें, प्रस्तावांत असलेले 'गुन्हा' 'गुन्हेगार' वगैरे शब्द वगळणें जास्त न्यायाचें व युक्तिवादाचें ठरेल, असें मला वाटलें. प्रस्तावांत हा बदल घडवून आणण्याच्या दृष्टीनें सभेचें काम फार पुढें गेलें होतें; म्हणून, ज्या स्वरूपांत ठराव पुढें आला त्याविरुद्ध मी फक्त मत दिलें. ठराव एकमतानें संमत झाला असें जाहीर करतां येणार नाहीं, ही गोष्ट अध्यक्षांच्या नजरेस आणण्याची माझी इच्छा होती. मतदार म्हणून मला जे अधिकार होते त्यांची कक्षा मी बिलकुल उल्लंघिली नव्हती. ठरावाविरुद्ध व ठरावाला अनुकूल किती मतें आहेत त्यांची मोजदाद करून निकाल जाहीर करणें हा एकच मार्ग अध्यक्षांच्या दृष्टीनें युक्त होता. पण, कांहीं त्रस्तात्म्यांचें देहभान इतकें नष्ट झालें कीं, 'त्याला हाकलून काढा' वगैरे शब्द उच्चारण्यापर्यंत त्यांची मजल पोंचली. इतकेंच नव्हे तर मला मारहाण करण्याची धमकी देण्याचा

to threaten me with physical force. I stood perfectly calm, simply asserting my right and without giving the least provocation. In a minute or two, one man Mr. Palmer by name reached to the place where I was standing and attacked me while I was actually in the act of explaining the meaning of my opposition in clear terms, though they were drowned in the cry of the excited few. The man who committed this unprovoked assault upon one who simply insisted upon either being heard or ejected will soon be brought before the Courts. Meanwhile, I hasten to write this letter to you to explain my conduct at the meeting and to prevent any misunderstanding or misinterpretation. Thanking you in anticipation,

140 Sinclair Road, July 5.

I am
yours faithfully
**V. D. Savarkar**

या पत्राच्या प्रती भराभर तयार करण्यांत आल्या व श्री. ग्यानचंद वर्मा यांनीं त्या प्रती रातोरात व हातोहात टाइम्स, डेलीमेल, डेली पोस्ट, न्यूज, डेली टेलिग्राफ इत्यादि पत्रांच्या संपादकीय कार्यालयांत नेऊन दिल्या. मंगळवार दिनांक ६ रोजीं प्रातःकाळीं बहुतेक सर्व पत्रांतून हें पत्र प्रसिद्ध झालें. त्या दिवशीं सारा दिवसभर वकील-बॅरिस्टरांच्या अड्ड्यांतून या पत्रांतल्या मुद्यांची चर्चा चाललेली होती व पत्रांतल्या बिनतोड कोटिक्रमाचें कौतुक केलें जात होतें. सर मंचरजी भावनगरी, पं. भगवानदिन दुबे इत्यादि मंडळींनीं कॅक्स्टन हॉलमधील सभा बोलावण्यांत पुढाकार घेतला होता; त्यांना अशी धास्ती वाटूं लागली कीं, धिंग्राच्या बाबतींत आपण 'मरणाआधीं सरण' असा प्रकार करून बसलों; याबद्दल धिंग्रानें कोर्टांत तक्रार केली तर हें सारें प्रकरण आपल्यावर शेकल्याशिवाय राहणार नाहीं. धिंग्रानें असें कांहीं करूं नये अशी विनंतीहि या लाचार मंडळींनीं केली.[१] मरणाला

अतिरेकहि त्यांनीं केला ! माझा अधिकार काय आहे इतकेंच ठांसून सांगत, कसल्याहि प्रकारें दुसऱ्याला चीड येऊं नये अशी खबरदारी घेत, मी जागेवर अगदीं शांतपणें उभा होतों. एक दोन क्षणांत पामर या नांवाचा एक माणूस माझ्या जागेजवळ आला. माझ्या विरोधाचें कारण काय हें मी स्पष्ट करून सांगत होतों. प्रक्षुब्ध झालेल्या मूठभर लोकांच्या आरडाओरडींत माझे शब्द अध्यक्षांपर्यंत पोंचत नव्हते. इतक्यांत या पामरानें मजवर हल्ला केला. माझें म्हणणें ऐकून तरी घ्या, नाहीं तर मला बाहेर तरी काढा, असा साधा आग्रह धरणाऱ्या माझ्यावर ज्या इसमानें निष्कारण हल्ला केला—त्याला लौकरच न्यायालयासमोर खेचण्यांत येईल. सभेंतील माझ्या वर्तनाचा खुलासा करणारें हें पत्र तूर्त आपल्याकडे प्रसिद्धयर्थ धाडीत आहें. माझ्या वर्तना-विषयींचा गैरसमज होऊं नये अगर विपर्यास केला जाऊं नये म्हणून हें पत्र धाडिलें आहे. आगाऊच आपले आभार मानणारा,

१४० सिंक्लेअर रोड,
५ जुलै

आपला
**वि. दा. सावरकर**

[१]ग्यानचंद वर्मालिखित राजनैतिक नौसरबाज : पृ १९.

मिठी मारण्यासाठीं उत्सुक झालेला मदनलाल त्या पामराविरुद्ध अगर या पामरां-विरुद्ध अशी कांहीं तक्रार करील असा फारसा संभव नव्हताच; पण, या पत्राच्या प्रसिद्धीमुळें एक चांगली गोष्ट घडून आली. श्री. तिरुमलाचार्यजींवर फिर्याद करण्याची पामराची जल्पना जागच्या जागीं जिरली! व 'भीक नको, पण कुत्रें आवर' असें म्हणण्याची पाळी ब्रिटिश साम्राज्याच्या त्या रक्षकावर आली! सर हेन्री कॉटन प्रभृति मंडळींनीं यानंतर या प्रकरणीं जीं वक्तव्यें केलीं त्यांतून त्यांनीं धिंग्राच्या निषेधाचा शब्दहि काढला नाहीं, हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. गुप्त पोलिसांचे हस्तक म्हणून काम करणाऱ्या श्री. तिरुमलाचार्यांनीं या सभेंत जो पराक्रम गाजविला होता त्यामुळें त्यांचा तो बहाणा यापुढें टिकण्यासारखा नव्हता: इतकेंच नव्हे तर, पोलिसखातें त्यांना आतां सतावून सोडण्याचा प्रयत्न करील, असाहि दृढ संभव होता. हें ओळखून व आचार्यांना फ्रान्सला धाडलें तर त्या रस्त्यावर टेहेळणी करणाऱ्या इंग्लिश पोलिसांच्या ते हातीं लागतील हे समजून, इंग्लंडमधील एका दूरच्या बंदरांतून त्यांना लौकरच जिब्राल्टरकडे धाडून देण्यांत आलें.

धिंग्रांच्या निषेधकांची खुद्द लंडनमध्यें अशी धांवपळ चालली होती त्याच वेळीं हिंदुस्थानांत त्यांचा निषेध केला जात होता. कॅक्स्टन हॉलमधील सभेच्या आदल्याच दिवशीं कै. ना. गोपाळराव गोखले यांनीं पुणें येथें कर्झन वायलीच्या खुनाचा निषेध करून टाकला. डेक्कन सभेंतल्या आपल्या भाषणांत गोखले यांनीं अत्यंत धाष्ट्र्याचीं अशीं दोन विधानें केलीं. स्वातंत्र्याच्या कल्पनांतून अत्याचाराचा जन्म होणें अपरिहार्य असल्यामुळें या कल्पनांचा उच्छेद करण्यासाठीं सरकार कडक उपायांचा आश्रय करणारच, हें गोखले यांचें पहिलें विधान होतें. दुसरें विधान तर याहून विलक्षण होतें. सरकारच्या गुप्त पोलिस खात्याला माहिती पुरविण्याची जबाबदारी स्वतःवर येऊन पडली आहे असें वाटून कीं काय, गोखले यांनीं असें विधान केलें कीं, इंग्लंडांत असलेल्या हिंदी विद्यार्थ्यांपैकीं ४०-५० जणांचें टोळकें क्रांतिकारक मतांच्या प्रभावानें पिसाट बनून गेलें आहे; आणि शक्यतोंवर सर्व प्रकारच्या सार्वजनिक प्रसंगीं हें टोळकें आपला प्रभाव दाखविण्याला चुकत नाहीं. गोखले यांचे हे उद्गार कांहीं अँग्लो-इंडियन पत्रांनाहि रुचले नाहींत. पुष्कळ नेमस्त पत्रांनाहि या उद्गारां-बद्दलची नापसंति व्यक्त करावी लागली. बंधुद्रोह करणाऱ्या बिभीषणाशीं गोखल्यांची तुलना करून कलकत्त्याच्या 'कर्मयोगी' पत्रानें तर त्यांचे वाभाडेच काढले! त्या वेळच्या नेटिव्ह जनरल लायब्ररींत म्हणजे सध्यांच्या नगर-वाचन-मंदिरांत पुण्याच्या नागरिकांची सभा सरदार नौरोजी पदमजी यांच्या अध्यक्षतेखालीं शुक्रवार दि. ९ रोजीं झाली. या सभेंत निषेधाच्या ठरावावर भाषण करून, श्री. न. चिं. केळकर, यांना सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत टिळकांच्या वाढदिवससमारंभाला हजर रहावयाचें होतें. श्री. केळकर, यांनीं त्या वेळच्या परिस्थितींत या सभेंत जें भाषण केलें त्याचा सविस्तर अहवाल 'मराठा' साप्ताहिकाच्या दिनांक

११-७-१९०९ रोजीं प्रसिद्ध झालेल्या अंकांत देण्यांत आला आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :

* Mr President and gentlemen,

It is a disgraceful deed which we have here assembled to condemn and it certainly deserves to be condemned from every Point of view...... Madanlal Dhingra is, I am sorry to say, an Indian; and we, Indians, are, therefore, bound to express, in the strongest manner, our sense of detestation of his crime...The London police have declared that the outrage was the result of a private and imaginary grievance. The crime has thus no political significance and we feel certainly grateful that the good name of Indian politics is not likely to be imperilled thereby.. ...The doctrine of violence, if at all it exists as a doctrine, is confined to stray individuals. But gentlemen, we must unite and uproot it though its dimensions may be howsoever meagre. It is a poison tree which must not be allowed to grow, even in neglected corners.

शनिवार दिनांक, १०-७-०९ रोजीं वेस्टमिन्स्टर पोलिस कोर्टांत मदनलालजी धिंग्रा यांच्यावरील खटल्याची प्राथमिक चौकशी झाली. फिर्यादी पक्षातर्फे साक्षीपुरावा चालू असतां मदनलालजी अगदीं शांतपणानें कोर्टांत बसलेले होते. आपल्या कृत्याचें वर्णन खून या शब्दानें केलें जात आहे असें पाहून, त्यांनीं एकदां त्या शब्दाला हरकत घेतली. मदन मोहन सिंह या हिंदी विद्यार्थ्याची साक्ष वाचून दाखविण्यांत आली तेव्हां मदनलालजी उसळून म्हणाले : This man is a traitor to my country [ हा इसम देशद्रोही आहे ! ] आपल्या खिशांत सांपडलेलें लेखी वक्तव्य पोलिसकडून दाबून टाकलें जात आहे असे पाहून मदनलालजींनीं या दिवशीं कोर्टांत पुढील नवें वक्तव्य केलें : [1]

---

* अध्यक्ष महाराय आणि सभ्य गृहस्थहो :

ज्या कृत्याचा निषेध करण्यासाठीं आपण जमलों आहों तें कृत्य लाजिरवाणें असून कोणत्याहि दृष्टीनें विचार केला तरी तें निःसंशय निषेधार्ह आहे......मदनलाल धिंग्रा हा एक हिंदी इसम आहे असें सांगतांना मला फार दुःख होत आहे. तो हिंदी इसम असल्यामुळे त्याच्या गुन्ह्याबद्दलचा तिटकारा जास्तीत जास्त कडक शब्दांत व्यक्त करणे हें हिंदी लोक म्हणून आपलें कर्तव्यच आहे......वैयक्तिक स्वरूपाच्या व काल्पनिक तक्रारीतून या गुन्ह्याचा जन्म झालेला आहे, असें लंडनच्या पोलिसांनीं जाहीर केलें आहे. याचाच अर्थ असा कीं, या गुन्ह्याला राजकीय स्वरूप नाहीं. या गुन्ह्यामुळें हिंदी राजकारणाचें सोज्ज्वल नांव संकटांत सांपडण्याचा संभव नाहीं. याबद्दल आपणा सर्वांना खात्रीनें समाधान वाटत असलें पाहिजे. हिंसा तत्त्व हें तत्त्व म्हणून अस्तित्वांत असलेंच तर कांहीं भुरट्या माणसांपलीकडे त्याची व्याप्ति नाहीं. पण सद्गृहस्थहो, या तत्त्वाचें प्रमाण कितीहि अल्प असलें तरी आपण सर्वांनीं एकजुटीनें त्याचीं पाळेंमुळें खणून काढलीं पाहिजेत. हा विषवृक्ष आहे: आणि अगदीं दुर्लक्षलेल्या सांधीकोंपऱ्यांतहि या वृक्षाला वाढूं देतां कामा नये.

१ London Times : 11-7-09

*I do not want to say anything in defence of myself but simply to prove the justice of my deed. As for myself, no English Law Court has got any authority to arrest and detain me in prison or pass sentence of death on me. That is the reason I did not have counsel to defend me.

And I maintain that if it is patriotic in an Englishman to fight against the Germans if they were to occupy this country, it is much more justifiable and patriotic in my case to fight against the English I hold the English people responsible for the murder of eighty millions of Indian people in the last 50 years and they are also responsible for taking away £ 100 000,000 every year from India to this country. I also hold them responsible for the hanging and deportation of my patriotic countrymen who did just the same as the English people here are advising their countrymen to do. And the Englishman who goes out to India and gets, say £ 100 a month, that simply means that he passes a sentence of death on a thousand of my poor countrymen, because those thousand people could easily live on this £. 100 which the Englishman spends mostly on his frivolities and pleasures.

Just as the Germans have no right to occupy this country, so the English people have no right to occupy India; and it is perfectly justifiable on our part to kill the Englishman who is Polluting our sacred land

---

* व्यक्तिशः माझ्या बचावासाठीं मला कांहींहि म्हणावयाचें नाहीं. पण माझें कृत्य न्याय्य कसें ठरतें हें सिद्ध करण्यासाठीं मी कांहीं गोष्टी सांगूं इच्छितों, व्यक्तिशः माझ्याविषयीं माझें असें म्हणणें आहे कीं, मला अटक करून कारावासांत ठेवण्याचा किंवा मला देहांताची शिक्षा सांगण्याचा अधिकार कोणत्याहि इंग्लिश न्यायालयाला नाहीं. माझ्या बाजूनें काम करण्यासाठीं मीं कोणी विधिविशारद दिला नाहीं, याचें कारण हेंच होय.

जर्मनांनीं इंग्लंड देश पादाक्रांत केल्यास त्या आक्रमणाविरुद्ध झगडणारा इंग्रज जर देशाभिमानी ठरणार असेल तर मी इंग्रजांविरुद्ध केलेला झगडा अधिकच न्याय्य व देशाभिमानाचा आहे,असें माझें म्हणणें आहे. गेल्या ५० वर्षांत ८ कोटी हिंदी लोकांचे खून झाले; या खुनांचें पाप इंग्रजांच्या डोक्यावर बसतें, असें माझें मत आहे. इंग्रज हिंदुस्थानांतून प्रतिवर्षीं दहा कोटी पौन्ड इंग्लंडला आणतात याबद्दलहि मी इंग्रजांना जबाबदार धरतों. येथें इंग्लिश लोक आपल्या देशबांधवांना जें करावयाला सांगतात तेंच आपल्या देशबांधवांनीं करावें, असें उपदेशिल्याबद्दल माझ्या कित्येक देशाभिमानी. बांधवांना फांसावर लटकविण्यांत आलें व कित्येकांना हद्दपारीची शिक्षा देण्यांत आली. याचीहि जबाबदारी इंग्रजांवर आहे, असें माझें मत आहे.. एक इंग्रज उठतो व इंग्लंड सोडून, हिंदुस्थानांत जाऊन, मासिक १०० पौंड मिळवूं लागतो, याचा साधा अर्थ असा आहे कीं, तो इंग्रज माझ्या हजार गरीब देशबंधूंना मृत्यूची शिक्षा सांगतो. कारण हा इंग्रज ज्या १०० पौंडांची चांदरात उडवितो त्या १०० पौंडांत त्या हजार लोकांचा चरितार्थ सुखानें चालला असता.

जर्मनांना जसा इंग्लंड देश आक्रमून राहण्याचा अधिकार पोंचत नाहीं, त्याप्रमाणेंच इंग्रजांनाहि हिंदुस्थान देश आक्रमून राहण्याचा अधिकार नाहीं. आपल्या

I am surprised at the terrible hypocrisy, the farce and the mockery of the English people. They poes as the champions of oppressed humanity —the peoples of the Congo and the people of Russia—when there is terrible oppression and horrible atrocities committed in India; for example, the killing of two millions of people every year and the outraging of our women. In case this country is occupied by Germans and an Englishman, not bearing to see Germans walking with the insolence of conquerors in the streets of London goes and kills one or two Germans and that Englishman is held as a patriot by the people of this country, then certainly I am prepared to work for the emancipation of my Motherland Whatever else I have to Say is in the paper before the Court. I make this statement not because I wish to plead for mercy or anything of that kind. I wish that English people should sentence me to death, for, in that case the vengeance of my countrymen will be all the more keen I put forward this statement to show the jüstice of my cause to the outside world and especially to our sympathisers in America and Germany.

मदनलालजींनीं हा जवाब दिला त्या दिवशींच्या संध्याकाळच्या वृत्तपत्रांनीं तोच एक विषय प्रामुख्यानें लोकांपुढें मांडला. लंडन शहराच्या भिंतीभिंतींवरून व दुकानादुकानांवरून धिंग्राचें नांव एकसारखें लटकलेलें होतें. " धिंग्राचा विलक्षण जबाब ", " धिंग्रा म्हणतो माझा सूड माझे देशबांधव घेतीलच, " " धिंग्रा स्वसमर्थनांत म्हणतो मी देशभक्त आहें, " " धिंग्रा हिंदुस्थानच्या अभ्युदयासाठीं मरतो "

---

पावन मायभूमीला दूषित करणाऱ्या इंग्रजाला हिंदी लोकांनीं मारणें ही गोष्ट संपूर्णपणें समर्थनीय आहे. इंग्रज लोकांनीं चालविलेलें अमानुष ढोंग, त्यांनीं चालविलेला तमाशा व विडंबन या गोष्टी पाहून मला आश्चर्य वाटतें. कांगोमधील लोक व रशियांतील जनता यांचा कैवार घेऊन बोलणारे हे लोक पददलित मानवसमाजाचे पाठीराखे म्हणून मिरवतात ! पण, त्यांच्या या गप्पा चालू असतांना, हिंदुस्थानांत मात्र भीषण जुलूम चाललेला असतो व भयंकर अत्याचार सुरू असतात. प्रतिवर्षीं होणारी २० लक्ष लोकांची हत्या व हिंदी स्त्रियांवर होणारे अत्याचार यांचा निर्देश उदाहरणादाखल करतां येण्यासारखा आहे. हा इंग्लंड देश जर्मनांनीं पादाक्रांत केला, विजेत्यांच्या दिमाखानें जर्मन लोक लंडनच्या रस्त्यांतून मिरवूं लागले आणि तें दृश्य असह्य वाटूं लागल्यामुळें एकाद्या इंग्रजानें पुढें होऊन एकाददुसऱ्या जर्मनाचा प्राण घेतला तर त्या इंग्रजाला इंग्लिश लोक देशभक्त समजतील. याच न्यायानें मी माझ्या मातृभूमीच्या विमोचनाचें कार्य करण्याला सिद्ध झालों आहें, अशी माझी निश्चिति आहे. याव्यतिरिक्त मला जें कांहीं म्हणावयाचें आहे तें कोर्टापुढील कागदांत म्हणण्यांत आलेलें आहे. मी हें जें सांगितलें तें दयेची याचना करण्याच्या हेतूनें सांगितलें नाहीं. तसा प्रकार मुळींच नाहीं. इंग्रज लोकांनीं मला देहांताची शिक्षा द्यावी, अशीच माझी इच्छा आहे. कारण, तसें घडलें कीं, माझ्या देशबांधवांची सूडबुद्धि तीव्रतर बनेल. मी हें जें म्हणणें कोर्टापुढें मांडलें तें माझा पक्ष न्यायाचा आहे असें बाह्य जगाला—विशेषतः अमेरिकेंत व जर्मनींत आमचे जे हितचिंतक आहेत, त्यांना समजावें म्हणून मांडलें आहे.

वगैरे पत्रकें मोठमोठया टाइपांत छापून भिन्नभिन्न वृत्तपत्रांच्या जाहिरातीसाठीं एकाच रांगेनें सर्व शहरभर–नव्हे सर्व इंग्लंडभर–लटकत होतीं ! धिंग्रांनीं केलेल्या क्रूर खुनानें केली नाहीं इतकी उत्क्षोभक चळवळ त्यांनीं इंग्लंडांत आपल्या कोर्टीतील जबाबानें केली आहे.[१]

धिंग्रा-प्रकरण, कॅक्स्टन हॉलमधील सभा व त्या सभेंतलें सावरकरांचें वर्तन या गोष्टींचा परिणाम सावरकरांविरुद्ध पूर्वीच सुरू करण्यांत आलेल्या एका प्रकरणावर अपरिहार्यपणें झाला. सावरकर बॅरिस्टरीच्या परीक्षेंत उत्तीर्ण झाले असले तरी, त्यांना बॅरिस्टर म्हणून मान्यता द्यावी कीं काय असा प्रश्न 'ग्रेज इन'च्या प्रमुखांनीं यापूर्वीच उपस्थित केला होता. बुधवार दिनांक १४ जुलै रोजीं या प्रश्नाची शहानिशा सुरू झाली. या दिवसापूर्वी हें प्रकरण कसें शिजविण्यांत आलें होतें याची माहिती सावरकरांनीं स्वतःच त्या वेळीं लिहिलेल्या 'लंडनच्या बातमीपत्रां'त[२] सांपडते :

सावरकर दोघां बेंचर्सची शिफारस मागावयास गेले तेव्हां त्यांनीं त्यांना सांगितलें : आम्हीं हिंदी लोकांस जी शिफारस देतों ती यापुढें इंडिया ऑफिसच्या अधिकाऱ्यांनीं परवानगी दिल्याशिवाय देणार नाहीं. तुमच्याबद्दल आज त्या इंडिया ऑफिसकडे तपास करतों व उद्यां तुम्हांला नक्की काय तें कळवितों. ही कोंडी फोडून सावरकरांनीं शिफारसपत्रें मिळविलीं. तेव्हां त्यांच्यावर उघड आरोप करणें ग्रेज इनच्या प्रमुखांना अवश्य वाटलें. "राज्यक्रांति करणें, हिंदुस्थानच्या पूर्ण स्वातंत्र्याची महति गाणें, रक्तपात व युद्ध यांचा अवलंब करण्यास उत्तेजन देणें" वगैरे कायद्यांत सांपडणारे सर्व भयंकर शब्द एकत्र करून, सावरकरांच्यावर आरोप ठेवण्यांत आले व खटल्यानें काम अर्धेमुर्धे झाल्यावरहि पुरवणी म्हणून कांहीं आरोप जोडण्यांत आले. गणेशपंत सावरकर यांजवरील खटल्यांत सरकारनें उपयोगांत आणलेला कांहीं पुरावा व त्याच प्रसंगीं सरकारी अधिकाऱ्यांच्या हातीं आलेले कांहीं कागदपत्र यांचा या चौकशीचे वेळीं उपयोग करण्यांत आला. पुराव्याच्या ग्राह्याग्राह्यतेविषयींचे सगळे नियम या चौकशीचे वेळीं धाब्यावर बसविण्यांत आले ! सावरकरांची कसून तपासणी घेतल्यावरहि निश्चित स्वरूपाचा आरोप ठेवण्याला अवसर मिळेना. तेव्हां कॅक्स्टन हॉलमधल्या सभेंत घडलेल्या प्रकाराचा उपयोग करून घेण्याचा खटाटोप करण्यांत आला. पण सावरकरांनीं टाइम्समधील पत्र तांतडीनें प्रसिद्ध करण्याचा दूरदर्शीपणा दाखविला असल्यामुळें, हा खटाटोपहि व्यर्थ ठरला. दिनांक १४ रोजीं बेंचर्सनीं शेवटीं असें ठरविलें कीं, तूर्त तरी सावरकरांना बॅरिस्टर म्हणून मान्यता देण्यांत येऊं नये. पुढें लॉर्ड बर्कनहेड म्हणून

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १४१–४२.

२ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १४३.

नांवाजलेले—पण, या वेळीं मि. एफ्. ई. स्मिथ या साध्या नांवानें लोकांना माहीत असलेले गृहस्थ या मान्यतेच्या प्रकरणीं सावरकरांच्या विरुद्ध निकरानें झगडले अशी माहिती श्री. ग्यानचंद वर्मा यांनीं 'राजनैतिक नौसरबाज' या आपल्या पुस्तकांत नमूद करून ठेवली आहे. भारतमंत्री मोर्लेसाहेब हेहि एक बेंचर असल्या-मुळें, त्यांचेहि या प्रकरणांत अंग होतच. कॅक्स्टन हॉलमधील सभेच्या वेळीं उप-स्थित नसलेले श्री. चटोपाध्याय यांनी 'टाइम्स' मध्यें स्पष्टोक्तिपूर्ण पत्रें लिहून सावरकरांच्या वर्तनाचें समर्थन केल्यामुळें, त्यांच्यावरहि 'मिड्ल टेंपल'च्या बेंचर्सची अवकृपा झाली. "तुमचे मेंबरशिपचे हक्क काढून घेऊन, तुम्हांला या संस्थेंतून बाहेर कां घालविण्यांत येऊं नये," असा प्रश्न या संस्थेच्या प्रमुखांनीं श्री. वीरेंद्र चटोपाध्याय यांना विचारला; व कांहीं दिवस लोटल्यावर, श्री. चटो-पाध्याय याना या संस्थेच्या सभासदांच्या यादींतून कमी करण्यांतहि आलें.

दि. ५–७–०९ रोजीं पार्लमेंटमधील प्रश्नोत्तरांच्या वेळीं 'इंडियन सोशि-ऑलॉजिस्ट पत्राचा उल्लेख करण्यांत आला होता वगैरे गोष्टी कळतांच पंडित शामजी कृष्णवर्मा यांनीं पॅरिसहून 'लंडन टाइम्स' कडे एक पत्र प्रसिद्धीसाठीं धाडून दिलें. खुनाला प्रोत्साहन देण्याचा पंडितजींवर आरोप करण्यांत आला होता त्याचें त्यांनीं या पत्रांत विस्तारानें खंडन केलें. मदनलाल धिंग्रांनीं जें कृत्य केलें त्याच्याशीं आपला कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं, असेंहि त्यांनी निक्षून सांगि-तलें. पण, शेवटीं या पत्रांत पुढील वाक्य लिहिण्यालाहि पंडितजींनीं कमी केलें नाहीं : I frankly admit I approve of the deed and regard its author as a martyr in the cause of Indian Independence. (हें कृत्य मला मान्य आहे व तें कृत्य करणारा इसम हा भारतीय स्वातंत्र्याच्या कार्यांतला हुतात्मा आहे असें माझें मत आहे, ही गोष्ट मी खुल्या दिलानें कबूल करतों.) दि. १७–७–०९ रोजीं 'लंडन टाइम्स'मध्यें हें पत्र प्रसिद्ध झाल्यावर 'इंडियन सोशिऑलॉजिस्ट'पत्राविरुद्ध इलाज करण्यासंबंधींच्या कारवायांचीं चक्रें जोरांत फिरूं लागलीं. 'इंडियन सोशिऑलॉजिस्ट' पत्राचे मुद्रक मि. आर्थर हॉर्स्ले यांना नुकतीच मे महिन्यांत एकदां ताकीद दिली असूनहि, 'सोशिऑ-लॉजिस्ट'च्या जुलैच्या अंकांतला आक्षेपार्ह मजकूर त्यानीं छापला या मुद्यावर त्यांना दिनांक १७ रोजींच अटक करण्यांत आली. मि. हॉर्स्ले यांच्यावरील खटल्याची तारीख ठरविण्यांत येऊन त्यांना जामिनावर सुटें करण्यांत आलें. दिनांक १९ व २० या दोन दिवशीं ओल्ड बेली या प्रसिद्ध कोर्टांत धिंग्रा–प्रकरण व सोशिऑ-लॉजिस्ट प्रकरण या दोन्ही प्रकरणांची चौकशी होऊन, दिनांक २३ रोजीं या प्रक-रणांतील आरोपींचें काम सेशन्समध्यें चालेल, असें जाहीर करण्यांत आलें.

मदनलालजींना तुरुंगांत ठेवण्यांत आल्यावर पहिले कांहीं दिवस त्यांच्या बरोबरीच्या विद्यार्थीवर्गापैकीं कोणालाच त्यांची भेट घेतां येत नव्हती. पुढें थोड्या

दिवसांनंतर, प्रत्यहीं एकदोघा मित्रांना त्यांना भेटतां येऊं गलें. या भेटीच्या वेळीं बंदोबस्त अर्थातच फार कडक असे. “ आंत जाण्याऱ्याचा प्रथम सक्त झाडा घेण्यांत येत असे; तुरुंगांत धिंग्राबरोबर हिंदी भाषेंत न बोलण्याची ताकीद देण्यांत येत असे व मग इंग्रजी पहारेकऱ्यांचे अगदीं सान्निध धिंग्राबरोबर भाषणाची संधि देण्यांत येत असे, धिंग्राला हस्तस्पर्श करणें वा मिठाई वगैरे कोणतेंहि अन्न देणें हें जरी सक्त रीतीनें बंद करण्यांत आलें होतें, तरी बाकी सर्व गोष्टी करण्यास मुभा होती.[1] दि.५ जुलै रोजीं श्री. ग्यानचंद वर्माजी हे मदनलालजींना भेटावयास गेले असतांना काय प्रकार घडला हें श्री. वर्माजींनीं स्वतःच नमूद करून ठेविलें असल्यामुळें, तो हिंदी उतारा[2] जसाच्या तसा देणेंच इष्ट आहे. वर्माजी लिहितात :

*मैं जब धिंगरा के पास चौथे या पांचवे दिन फिर गया तो धिंगरा ने मुझसे पूछा कि मैं तुम्हारे लिये क्या कर सकता हूँ । मैं घबरा उठा क्यों कि मैंने इस ख्याल किया कि इस शख्स की तो होनेवाली है फांसी व मुझसे पूछता है कि मैं तुम्हारे लिये क्या करूं । मैंने उस बात का कुछ जवाब न दिया और मैंने कहा की आपने मुझको ४।५ दिन के बाद बुलवाया था इस लिये मैं आया हूँ । धिंगरा मुझको जोर जोर से लेक्चर देने लगा और कहा कि मैंने कुर्बानी भारतमाता के लिये की है ।*

‘ लंडनचीं बातमीपत्रें’ या पुस्तकांत सावरकर यांनीं सांगितलेली मदनलालजींच्या विनोदी वृत्तीची हकीकत बहुधा या भेटींतच घडली असावी. “ धिंग्रा इतका निर्भय व उल्हासी होता कीं, त्यानें मागितलेल्या जिनसांमध्यें एक आरसाहि मागितला होता. ‘मला ड्रेस करण्यासाठीं येथें एक आरसा नाहीं,तर एक छानदार आरसाहि धाडून दे ’ म्हणून तो म्हणाला.[3] मदनलालजींना एकवार भेटून त्यांना धन्यवाद देण्याची सावरकरांच्या मनांत बरेच दिवसांची इच्छा होती. त्याप्रमाणें दिनांक २२ जुलै रोजीं ते ब्रिक्स्टन जेलमध्यें जाऊन आपल्या मित्राला भेटले. ज्या कारागृहवासाचा सावरकरांना यापुढील काळांत चांगलाच परिचय व्हावयाचा होता, त्याचा पहिला श्रीगणेशा या भेटींत गिरविला गेला. पोलिसांच्या पहाऱ्यांत भेट होणार असल्याकारणानें, धिंग्राचें उघड अभिनंदन आपल्याला करतां येणार नाहीं हें ओळखून, धिंग्राला आपलें मनोगत कसें कळवावयाचें यविषयींचा विचार मनाशीं ठरवून, सावरकर आलेले होते. मी आपल्या ‘दर्शना’साठीं आलों आहे हे शब्द सावरकरांच्या तोंडून निघतांच मदनलालजींनीं आपल्या गुरूचें मनोगत ओळखिलें. नेहमींचा संबंध विसरून, ‘दर्शन’ हा बहुमानवाचक शब्द सावरकर वापरीत आहेत या अर्थीं तो शब्द आपल्या हौतात्म्याच्या गौरवपर शब्द आहे, हें मदनलालजींनीं ओळखिलें व मग या दोन थोर व्यक्तींचें संभाषण अखंडितपणें चालू झालें.

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १४६ २ राजनैतिक नौसरबाज : पृ. १९

३ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १४०.

उद्यां आपल्याला मृत्यूची शिक्षा सांगण्यांत येणार या गोष्टीची मदनलालजींना जशी खात्री वाटत होती त्याप्रमाणेंच आपली व सावरकरांची इहलोकांतील ही अखेरची भेट आहे, हेंहि ते पुरतेपणीं ओळखून होते. म्हणून आपल्या अखेरच्या इच्छा काय आहेत हें सावरकरांना सांगण्याची संधि त्यांनीं या भेटीच्या प्रसंगीं साधून घेतली. आपली उत्तरक्रिया हिंदु-धर्माप्रमाणें झाली पाहिजे व कोणाहि अहिंदूचा व आपल्या भावाचा स्पर्श आपल्या प्रेताला होऊं नये, ही मदनलालजींची पहिली इच्छा होती. कोणा तरी ब्राह्मणानें आपल्या प्रेताला मंत्राग्नि द्यावा ही त्यांची दुसरी इच्छा होती. आपल्या खोलींत असलेले कपडे, पुस्तकें व इतर सामानसुमान यांचा लिलांव करून जे पैसे येतील ते लंडनमधील हिंदी लोकांनीं चालविलेल्या राष्ट्रीय फंडाला देण्यांत यावेत, ही त्यांची शेवटची इच्छा होती.[1] थिओडर मॉरिसनसारख्या एका परक्या माणसाच्या नादीं लागून आपल्या पाठच्या भावानें कॅक्स्टन हॉलमधील जाहीर सभेंत आपल्या कृत्याचा निषेध केला या गोष्टीची मदनलालजींना इतकी भयंकर चीड आली होती कीं केल्या गोष्टीचा तीव्र पश्चात्ताप झाल्यानंतरहि या भावाची भेट घेण्याला त्यांनीं साफ नकार दिला.[2]

शुक्रवार दि. २३ जुलै रोजीं धिंग्रावरील खटल्याचें काम सुरू झालें. त्या वेळीं कोर्टाबाहेर विद्यार्थी व इतर मिळून शंभरावर हिंदी लोक उभे होते. परंतु, त्यांच्यापैकीं कोणालाहि कोर्टांत येण्याची परवानगी देण्यांत आली नाहीं. धिंग्राला आरोपीच्या पिंजऱ्यांत उभा केला तेव्हां तो अगदीं निष्काळजीपणानें व धिटाईनें वागत होता. आरोप मान्य कीं अमान्य हें आरोपीनें सांगावें यासाठीं आरोपपत्र वाचून दाखविण्याचें तंत्र पार पाडण्यांत आलें; तेव्हां मदनलालजी म्हणाले : या आरोपपत्रकांतले शब्द मला मुळीं लागतच नाहींत, असें मला पहिल्या प्रथम म्हणावयाचें आहे. मी जें कांहीं केलें तें देशभक्तीपायीं केलेलें कृत्य होतें; अतएव तें समर्थनीय होतें. मला जें कांहीं म्हणावयाचें आहे तें माझ्या वक्तव्यांत म्हटलेलें आहे. तें वक्तव्य तुमच्यापाशीं आहे, असें मी समजतों. तूर्त इतर कांहीं न सांगतां, 'आरोप मान्य कीं अमान्य' इतकेंच सांगा असें सुचविण्यांत आल्यावर मदनलालजी म्हणाले: माझ्या विचारसरणीप्रमाणें पाहतां मी निर्दोषी आहें. माझें म्हणणें मी आपल्या वक्तव्यांत नमूद केलें आहे. न्यायमूर्तींनीं धिंग्राला बसण्याविषयीं सूचना दिल्यावर, फिर्यादी पक्षातर्फेची बाजू मांडण्यांत आली. त्यानंतर न्यायमूर्ति व मदनलालजी यांच्या दरम्यान पुढील प्रश्नोत्तरें झालीं :

**न्यायमूर्ति** :—तुम्हांला कांहीं साक्षीपुरावा द्यावयाचा आहे का ? स्वतः तुम्हांला कांहीं सांगायचें आहे का ?

**मदनलाल धिंग्रा** :—मला कांहींहि सांगावयाचें नाहीं. मी हें कृत्य केलें

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १४७.

२ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १४६.

हें मी कबूल करतों. हा सगळा साक्षीपुरावा अगदीं खरा आहे. माझें वक्तव्य वाचून दाखविण्यांत यावें, अशी माझी इच्छा आहे.

**न्यायमूर्ति** :—पोलिस कोर्टांतलें तुमचें वक्तव्य वाचलें जावें अशी तुमची इच्छा आहे, होय ?

**धिंग्रा** :—होय.

( वक्तव्य वाचण्यांत आल्यावर )

**न्यायमूर्ति** :—कांहीं साक्षीपुरावा देण्याची तुमची इच्छा आहे काय ?

**धिंग्रा** :—नाहीं; माझें वक्तव्य वाचलें जावें ही मात्र माझी इच्छा आहे.

**न्यायमूर्ति** :—आणखी कांहीं म्हणायचें आहे ?

**धिंग्रा** :—फूलस्कॅप कागदावर लिहिलेलें आणखी एक वक्तव्य आहे.

**न्यायमूर्ति**:-आणखी कांहीं वक्तव्य असेल तर तें तुम्ही स्वतःच केलें पाहिजे.

**धिंग्रा** :—पण, मला तें आठवत नाहीं ना ?

**न्यायमूर्ति** :—ज्यूरीला कांहीं सांगावयाचें असेल तर तें आतांच सांगा.

**धिंग्रा** :—माझ्या खिशांतल्या इतर कागदपत्रांप्रमाणेंच तें वक्तव्यहि नेण्यांत आलें आहे.

**न्यायमूर्ति** :—तुमच्या खिशांत काय होतें हें पाहण्याचें मला कांहींच कारण नाहीं. तुम्ही पूर्वी काय लिहून ठेविलें होतें हें पाहण्याचें आम्हांला कांहींहि कारण नाहीं. ज्यूरीला उद्देशून तुम्हांला कांहीं सांगावयाचें असेल तर तें आतांच सांगितलें पाहिजे. अधिक कांहीं म्हणावयाचें आहे का तुम्हांला ?

**धिंग्रा** : -नाहीं.

या प्रश्नोत्तरानंतर ज्यूरींतले 'सभ्य गृहस्थ' आरोपी दोषी कीं निर्दोषी हें आपसांत ठरविण्यासाठीं एकीकडे जाऊन बसले. त्यांनीं आरोपी दोषी असल्याबद्दलचा आपला अभिप्राय एकमतानें प्रकट केल्यावर, मदनलालजींनीं पुढील उद्गार काढले :

*या न्यायालयाचा अधिकार मी मानीत नाहीं ही गोष्ट मी वारंवार सांगितली आहे. तुम्हांला हवें असेल तें तुम्ही करूं शकतां. तुम्ही मला देहांताची शिक्षा देऊं शकतों; पण मला त्याची कांहींच पर्वा नाहीं. पण हें मात्र स्मरणांत असूं द्या कीं, एक काळ असाहि येईल कीं, त्यावेळीं आम्ही सर्वश्रेष्ठ सत्ताधारी बनूं; आम्हांला हवें असेल तें त्या वेळीं आम्हीहि करूं. मला याहून जास्त कांहीं सांगावयाचें नाहीं.*

या भाषणाचा विधिसंमत बचाव म्हणून कांहींच उपयोग होणार नसल्यामुळें, देहांताची शिक्षा सांगण्याच्या तयारीची खूण म्हणून न्यायमूर्तींनीं काळी टोपी डोक्यावर चढविली. ते म्हणाले: मदनलाल धिंग्रा, माझ्या कोणत्याहि बोलण्याचा तुझ्यावर यत्किंचितहि परिणाम होणार नाहीं, हें मी जाणून आहें. तुजवर खून केल्याचा आरोप शाबीत झालेला आहे व म्हणून तुला फांशीची शिक्षा देण्यांत येत आहे.

यानंतर धर्माधिकाऱ्यानें रीतीप्रमाणें ' परमेश्वर तुला क्षमा करो ' हा मंत्र म्हटला. इतक्यांत मदनलालजी पिंजऱ्यांत ताडकन् उभे राहिले व हिंदी पद्धतीनें न्यायमूर्तींना प्रणाम करून ते म्हणाले : मी आपला फार आभारी आहें. मृत्यूची मला पर्वा वाटत नाहीं. माझ्या मायदेशासाठीं बलिदान करण्याचा मान मला मिळाला याबद्दल मला अभिमान वाटत आहे. इतकें बोलून, आपल्यावरील तीन पहारेकऱ्यांसह मदनलालजी हंसतहंसत पिंजऱ्यांतून निघून गेले.

मदनलाल धिंग्रा यांच्या वर्तनांतील धीरोदात्तपणाचा कांहीं इंग्रजांवरहि इतका विलक्षण परिणाम झाला कीं, असा निधड्या छातीचा देशभक्त प्राणाला मुकावा हें त्यांना बरें वाटेना. ' रिव्ह्यू ऑफ रिव्ह्यू ' चे संपादक स्टेडसाहेब हे अशा सद्गृहस्थांपैकीं प्रमुख होते. मदनलालजींना देहांताऐवजीं जन्मठेप कारावासाची शिक्षा व्हावी अशी खटपट त्यांनीं सुरू केली. इकडे मदनलालजींच्या मित्रांनीं एक वेगळीच खटपट सुरू केली होती. मदनलालजींच्या खिशांत जो जबाब होता तो दाबून टाकण्याचा पोलिसांनीं कितीहि प्रयत्न केला तरी निदान सर्वश्रेष्ठ न्याय-मंदिरांत दिनांक २३–७–०९ रोजीं तरी तो वाचला जाईल, मग तो जगभर प्रसिद्धहि होईल, अशी त्यांची समजूत होती; पण, मदनलालजींना देहांताची शिक्षा सांगणाऱ्या न्यायमूर्तींनींहि त्यांच्या आग्रहाकडे दुर्लक्ष केलें हें पाहून, या मित्रमंडळींना फार वाईट वाटलें. पोलिसांची ही कारवाई हाणून पाडतां येईल का, सत्याचा खून करून तें सप्तपाताळांत दडपून टाकलें तरी तें शेवटीं आपलें डोकें वर काढून उजळ माथ्यानें वावरूं लागतेंच ( Truth will come to light, muredr cannot be hid long ) हा धडा दुष्ट अधिकाऱ्यांना शिकवावयाचा असेल तर काय केलें पाहिजे, याचा विचार ते करूं लागले.

हा जबाब मदनलालजींनींच लिहिलेला आहे असें भासावें म्हणून खिशांतल्या जबाबाची एक प्रत मदनलालजींच्या खोलींतल्या पेटींतहि ठेवण्यांत आलेली होती. हीहि प्रत हातीं आली तेव्हां पोलिसखात्याचे त्रस्त समंध शांत झाले व दोन्ही प्रती आतां आपल्याजवळ कुलुपबंद असल्यामुळें, आपल्याला आतां या जबाबापुरती तरी ' सुखं च मे शयनं च मे ' अशी प्रार्थना करावयास हरकत नाहीं, असें ते मानूं लागले. पण, त्यांच्या या मनःस्वास्थ्याच्या क्षीरसागरांत दि. १० जुलै रोजीं मिठाचा पहिला खडा पडला. त्या दिवशीं मदनलालजींनीं वेस्ट मिन्स्टर कोर्टांत जें वक्तव्य केलें त्याची भाषासरणी व पोलिसांच्या ताब्यांत असलेल्या वक्तव्याची भाषासरणी यांत मुळांतच महत्त्वाचा फरक असल्यामुळें, पोलिसखात्याला अशी मळमळ वाटूं लागली कीं, आपण मोठ्या ऐटींत असलों तरी, आपल्या हातीं आलेला जबाब हा मूळ लेखी जबाब नसून, जबाबाच्या केवळ प्रतीच आपल्या हातीं आल्या असण्याचा दृढ संभव आहे. असें असेल तर मूळ जबाब कोठें असेल, तो खरोखर कोणी लिहिला असेल असले प्रश्न पोलिस अधिकाऱ्यांच्या डोक्यांत घोळूं लागले.श्री. ग्यानचंद वर्मा यांनीं

करून ठेवलेल्या टांचणांत असें नोंदून ठेवण्यांत आलें आहे कीं, दिनांक २९-७-०९ रोजीं-म्हणजे मदनलालजींना देहांताची शिक्षा सांगण्यांत आल्यावर सहा दिवसांनीं सावरकर ब्रायटनला निघून गेले. पुढें Challenge या नांवानें प्रसिद्धीस आलेल्या मदनलालजींच्या वक्तव्याच्या प्रसिद्धीची योजना करण्यासाठीं त्यांनीं वर्माजींनाहि ब्रायटनला बोलावून घेतलें. पॅरिस येथें जाऊन गुप्तपणें 'चॅलेंज' या पत्र-काच्या प्रती छापून घेण्याचें काम वर्माजींनीं अंगावर घेतलें. स्वीकृत कार्य पार पाडण्याची वर्माजींची हातोटी सावरकरांना पूर्णपणें माहीत असल्यामुळें, वर्माजी पॅरिसला गेले तेव्हां सावरकरांना असा विश्वास वाटूं लागला कीं, हें पत्रक प्रसिद्ध झाल्याशिवाय आतां खात्रीनें राहात नाहीं. या वक्तव्याच्या प्रती करून, त्या अमेरिका, जर्मनी वगैरे देशांतल्या पत्रांतून प्रसिद्ध करण्याची खात्रीची व्यवस्था झाल्यावर, एकच प्रश्न उरला. मदनलालजींना देण्यांत आलेल्या देहांत शिक्षेची अम्मलबजावणी होण्यापूर्वीं-म्हणजे १७ ऑगस्टपूर्वीं-आपलें वक्तव्य प्रसिद्ध झालेलें पाहण्याचें समाधान त्यांना लाभूं शकेल कीं काय, इतकाच प्रश्न आतां अनिर्णीत राहिला होता. पॅरिसमध्यें बसून वर्माजींनीं आपला उद्योग इतक्या कौशल्यानें चालू ठेविला कीं पं. श्यामजी कृष्णवर्माप्रभृति मंडळींनाहि त्याची दाद लागूं शकली नाहीं. इंग्लंडमधील खटपटी जुळतां जुळतां शेवटीं 'Daily News' या दैनिकाच्या एका सहसंपादकाचा उपयोग होईल, असें दिसूं लागलें. या आयरिश सहसंपादकानें मोठें साहस करण्याची सिद्धता दर्शविली. रात्रपाळीचें सहसंपादकाचें कार्य करतांना आपल्या अधिकारांतच हें वक्तव्य छापून मोकळें होण्याचें त्यानें ठरविलें व त्या-प्रमाणें दिनांक १५ रोजीं रात्रीं या साहसी गृहस्थानें—हा साहसी गृहस्थ डेली न्यूजच्या संपादकाचा भाचा होता-मदनलालजींचें हें सुप्रसिद्ध वक्तव्य छापखान्यां-तल्या जुळणिसांच्या स्वाधीन केलें. दिनांक १६ रोजीं सकाळीं-म्हणजे मदनलालजीं-च्या देहांत शिक्षेच्या अम्मलबजावणीच्या सुमारें २८-३० तास आधीं-हें वक्तव्य छापून Daily News पत्राचा अंक लंडन शहरांत विकला जाऊं लागला तेव्हां पोलिसखात्यांतल्या अधिकारी वर्गाला व सामान्य वाचकवर्गाला आश्चर्याचा धक्का बसला असला तर नवल नाहीं. या पत्राच्या संपादकमहाशयांनाहि हें नवल काय व कसें झालें हें न कळल्यामुळें बराच वेळ गोंधळल्यासारखें झालें इतकी खळबळ उडवून देणारें हें वक्तव्य पुढीलप्रमाणें होतें :

## Challenge

I admit, the other day, I attempted to shed English blood as an humble revenge for the inhuman hangings and deportations of patriotic Indian youths. In this attempt I have consulted none but my own conscience; I have conspired with none but my own duty.

I believe that a nation held in bondage with the help of foreign bayonets is in a perpetual state of war. Since open battle is rendered impossible to a disarmed race, I attacked by surprise; since guns were denied to me, I drew forth my pistol and fired.

As a Hindu, I feel that a wrong done to my country is an insult to God. Poor in health and intellect, a son like myself has nothing else to offer to the Mother but his own blood and so I have sacrificed the same on her altar. Her cause is the cause of Shri Ram. Her services are the services of Shri Krishna. This war of independence will continue between India and England so long as the Hindu and the English races last, ( if this present unnatural relation does not cease )

The only lesson required in India at present is to learn how to die and the only way to teach it is by dying ourselves. Therefore I die and glory in my martyrdom. My only prayer to God is : may I be re-born of the same Mother and may I re-die in the same sacred cause till the cause is successful and She stand free for the good of humanity and the glory of God.

-Bande Mataram-

आव्हानः—परवां एका इंग्रजाचें रक्त सांडण्याचा मी प्रयत्न केला ही गोष्ट मला मान्य आहे. देशाभिमानी हिंदी तरुणांना निर्दयपणानें फांसावर लटकविण्यांत आलें व निर्वासित करण्यांत आलें याबद्दलचा अल्पसा सूड म्हणून मी हें कृत्य केलें. हा प्रयत्न करतांना, स्वतःच्या सदसद्विवेकबुद्धीव्यतिरिक्त अन्य कोणाचाहि मी विचार घेतला नाहीं; स्वतःच्या कर्तव्यबुद्धीशिवाय अन्य कोणाला मी या कटांत सामील होऊं दिलें नाहीं.

परकी शस्त्रास्त्रांच्या सहाय्यानें दास्यांत जखडून टाकलेलें राष्ट्र हें निरंतरच युद्ध्यमान राष्ट्र असतें. निःशस्त्र जातीला उघडउघड रणांगणांत उतरून सामना देणें अशक्य होत असल्यामुळें, मी दबा धरून हल्ला चढविला. मला तोफा वापरूं देण्यांत आल्या नाहींत; म्हणून मी माझें पिस्तुल काढलें व तें झाडलें.

हिंदु म्हणून माझी भावना अशी आहे कीं, माझ्या देशाचा अपमान हा परमेश्वराचाच अपमान होय. ज्याची प्रकृति अशीतशीच आहे व ज्याची बुद्धि सामान्यच आहे, अशा मजसारख्या भारतपुत्राजवळ मायदेशाप्रीत्यर्थ देतां येईल असें कांहीं असलेंच तर तें स्वतःचें रक्त होय! तें रक्त मी मातृभूमीच्या स्थंडिलावर अर्पिलें आहे! माझ्या मातृभूमीचा पक्ष हा श्रीरामचंद्रजींचा पक्ष आहे; माझ्या मातृभूमीची सेवा म्हणजे प्रभु कृष्णाची सेवा होय. हिंदु वंश व इंग्लिश वंश हे दोन वंश हयात आहेत तोंवर, भरतखंड व इंग्लंड यांच्या दरम्यान सुरू झालेला हा स्वातंत्र्यसंग्राम चालूच राहील. ( आज या दोन देशांत जे अस्वाभाविक संबंध आहेत ते संपले नि हा संग्राम संपला तर कोणास ठाऊक ? )

आत्मबलिदान कसें करावें ही एकच शिकवण सध्यां हिंदुस्थानांत देण्यायोग्य आहे. ही शिकवण देण्याचा एकच मार्ग म्हणजे स्वतःचें बलिदान करून मोकळें होणें हा! या जाणिवेनें प्रेरित होऊन मी प्राणार्पण करीत आहें व माझ्या हौतात्म्याचा मला अभिमान वाटत आहे. याच भारतभूचें संतान म्हणून मला पुनर्जन्म

प्राप्त होवो व याच पवित्र कार्यांत माझा देह पुन्हां पडो इतकीच ईशचरणीं माझी प्रार्थना आहे. भारतीय स्वातंत्र्याचा पक्ष विजयी होऊन, मानवजातीचें कल्याण व ईश्वराचें वैभव यांचा पुरस्कार करणारा स्वतंत्र भारतवर्ष जगांत आत्मतेजानें तळपूं लागेपर्यंत माझ्या जन्ममृत्यूचें हें चक्र असेंच चालू रहावें, अशी माझी परमेश्वराला प्रार्थना आहे.

**—वंदे मातरम्—**

'डेली न्यूज' पत्रांत धिंग्रांचा हा जबाब प्रसिद्ध झाल्याबरोबर इंग्लंडच्या सरकारी गोटांत कोण धांवपळ सुरू झाली! पोलिसखात्यांतले प्रमुख परस्परांकडे साशंक मुद्रेनें पाहूं लागले! आनंदीबाईनें 'ध' चा 'मा' करून गारद्यांच्या हातीं नारायणरावांच्या वधाविषयींचा हुकूम दिला होता. त्या हुकुमाचा कागद ताइतांत घालून ठेवलेला असूनहि, तो शेवटीं न्यायमूर्ति रामशास्त्री प्रभुणे यांच्या हातीं लागला. हें पाहून गोंधळून गेलेल्या गारद्यांप्रमाणें लंडनचे घाशीराम कोतवाल या जबाबाच्या प्रसिद्धीमुळें गोंधळून कसे गेले इत्यादि गोष्टींची कल्पना वाचकांना नीटपणीं करतां यावी म्हणून 'लंडनचीं बातमीपत्रें' या पुस्तकांतला खुद्द सावरकरांच्या लेखणींतून उतरलेला याविषयींचा उताराच उद्धृत करणें श्रेयस्कर ठरणार आहे. सावरकर लिहितात:[१]

*पोलिसांच्या तिजोरींत दाबून टाकलेल्या एकुलत्या एक दस्तऐवजाची चोरी होऊन कोण्या एका हिंदूनें तो छापून प्रसिद्ध केला—त्याच्या हजारों प्रती रस्त्यांत हातोहात वांटल्या जाऊं लागल्या! पोलिसांना तर तोंड बाहेर काढवेना! त्यांच्या तिजोरींतली प्रत तशीच त्यांचेपाशीं; मग ही दुसरी प्रत कशी पैदा झाली! अनेक शंका! ब्रिटिश तुरुंगातील कोणी गोरा अधिकारी तर हिंदी लोकांना फितूर नाहीं! कोणी म्हणे, डिंगराचें हें कृत्य एका गुप्त कटाचेंच अंगभूत असलें पाहिजे; त्याशिवाय त्याची ही जबानी दुसऱ्यास कशी माहिती असणार? कोणी म्हणाले: कट आधीं नसावा; पण, तुरुंगांत असतांना त्याचे कपड्यांची ने–आण होत असतांना ही प्रत छपवून बाहेर धाडली असावी! एकच गोंधळ चाललेला आहे.*

'डेली न्यूज' नें छापून प्रसिद्धिलेलें धिंग्रांचें आव्हान धिंग्रांचें नव्हे असें पोलिसखात्याचें म्हणणें असेल तर त्यांनीं धिंग्राचें वक्तव्य मूळ स्वरूपांत प्रसिद्ध करावें असें प्रति–आव्हान 'डेली मिरर' पत्रानें दिल्यामुळें तर पोलिसखात्यावर तोंड दाबून बुक्क्यांचा मार खाण्याची चांगलीच पाळी आली. या वक्तव्याच्या प्रसिद्धीमुळें कसा गोंधळ उडाला याचें सावरकर यानीं केलेलें वर्णन वर दिलें आहे. तें जसें वाचनीय

---

१ लंडनचीं बातमीपत्रें: पृ. १५४.

आहे तद्वतच 'लंडन टाइम्स' च्या दि. २०-८-०९ च्या अंकांत प्रसिद्ध झालेलें पुढील वर्णनहि लक्षांत ठेवण्यासारखें आहे :

There is every reason to believe that Dhingra did not compose the statement but that it was composed by those who egged him on to commit murder. The statement found in Dhingra's room was at once taken possession of by the police; it remains in their possession and it has been shown to none outside the official circle. Yet, none the less, copies of the statement have been given to various persons and to one newspaper. These circumstances, it is pointed out, afford proof that the statement found in Dhingra's room was the copy of a document, the original of which is in the hands of others. Moreover, the style of the composition of the statement is entirely unlike the style of Dhingra's statement before the magistrate. Copies of the document, it is stated, have been received by some persons in this country from Paris.

( हें वक्तव्य स्वतः धिंग्रानें लिहिलें नसावें, ज्यांनीं खून करण्याच्या कामीं धिंग्राला घोड्यावर बसविलें त्यांनीं तें लिहिलें असावें, असें मानण्याला जागा आहे. धिंग्राच्या खोलींत सांपडलेलें वक्तव्य पोलिसांनीं तत्काळ ताब्यांत घेतलें, अद्याप तें त्यांच्याच ताब्यांत आहे आणि सरकारी गोटाबाहेर असलेल्या कोणाहि इसमाला तें दाखविण्यांत आलेलें नाहीं. असें असूनहि, या वक्तव्याच्या प्रती कित्येक इसमांना व एका वृत्तपत्राला पुरविण्यांत आल्या आहेत. धिंग्राच्या खोलींत सांपडलेलें वक्तव्य हें मूळ नसून ती नक्कल असावी व ज्यावरून ती नक्कल करण्यात आली तो मूळ कागद दुसऱ्या कोणाच्या तरी हातीं असावा हें या सर्व परिस्थितीवरून सिद्ध होतें, असें सूचित करण्यांत आलें आहे. याशिवायहि एक मुद्दा महत्त्वाचा आहे. धिंग्रानें मॅजिस्ट्रेट कोर्टांत केलेल्या वक्तव्याची भाषासरणी व या वक्तव्याची भाषासरणी यांच्यामध्ये कांहींच साम्य नसून फार भिन्नता आहे. इंग्लंडमधल्या कांहीं लोकांकडे या वक्तव्याच्या प्रती आल्या त्या पॅरिसहून आल्या, असेंहि म्हटलें जात आहे. )

या लेखांत सूचित झालेल्या अनेक मुद्यांचा परामर्श घेण्याचें काम तूर्त दृष्टीआड करून आपल्याला एका पवित्र व महनीय कार्यासाठीं थोडा वेळ पेन्टेनूव्हिली तुरुंगाकडे वळलें पाहिजे. आज मंगळवार दिनांक १७ ऑगस्ट. आज मदनलालजींना झालेली देहान्ताची शिक्षा अंमलांत येणार ! त्यामुळें प्रभात काळींच या तुरुंगांत गडबड उडालेली आहे. आदल्या रात्रीं लागलेल्या गाढ झोंपेंतून जागे झालेले मदनलालजी उत्तम प्रकारचा पोषाख करून, आपल्या परलोकच्या प्रवासासाठीं सिद्ध झालेले आहेत. लौकरच मदनलालजींचा देहान्त होणार म्हणून दुःखित झालेले त्यांचे अनेक देशबंधू तुरुंगाच्या बाहेर घोटाळत आहेत. आपलें शरीर आंत जाऊं शकत नाहीं म्हणून विषण्ण झालेलीं त्यांचीं मनें मदनलालजींचें शेवटचें दर्शन घडावें म्हणून तुरुंगांत घिरट्या घालीत आहेत ! मदनलालजींच्या अलौकिक वर्तनाचा ज्यांच्या मनावर भला-बुरा कांहीं तरी परिणाम झाला, असे दोन-तीनशें इंग्रजहि आतुरतेनें

तुरुंगाबाहेर उभे आहेत. सकाळचा फराळ कैद्यांना देण्यांत आला; त्यांतला फराळ मदनलालजींनीं शांतपणानें घेतला. नऊच्या ठोक्याला घंटेचा घणघण आवाज होऊं लागला. खिस्ती धर्माचे एक उपदेशक मदनलालजींच्या जवळ आले; पण, आपल्या हिंदुत्वाचा अखेरपर्यंत अभिमान धारण करणाऱ्या मदनलालजींनीं त्यांच्या तोंडचा शब्दहि ऐकून घेण्याला नकार दिला! आपल्याला येणारा मृत्यूहि हिंदु पद्धतीनेंच यावा, असा त्यांनीं आग्रह धरिला. पहा, ते वधस्तंभाकडे निघाले! त्यांचा उघडा, उन्नत शीर्षभाग त्यांच्या उदारमनस्कतेची साक्ष देत आहे! खंबीर-पणानें पडणारीं त्यांचीं पावलें त्यांच्या अचल चित्तवृत्तीची ग्वाही देत आहेत! ते पहा, मदनलालजी वधस्तंभावर चढूं लागले. अदृश्य अशा कीर्तिवधूखेरीज इतर कोणाच्याहि हाताची अपेक्षा न धरतां ते चढूनहि गेले! झालें! पाशांत त्यांचा गळा गुंतला! ठोकळा उडाला! मदनलालजी मृत्यूच्या दारांतून मुक्तीच्या साम्राज्यांत प्रविष्टहि झाले!! ज्या नाटकाचा पाया गेल्या जानेवारीपासून भरला जात होता व ज्या नाटकांतला अत्युच्च बिंदु १ जुलै रोजीं मध्यरात्रीच्या सुमारास गांठला गेला होता त्या नाटकाचा शेवटचा पडदा अशा रीतीनें १७ ऑगस्ट रोजीं सकाळीं ९ नऊ वाजतां पडला!

'भाऊबंदकी' नाटकाच्या पहिल्या अंकांतच नारायणराव पेशव्यांचा वध होतो; पण, नारायणरावांचें भूत इतर सगळ्या अंकांवर आपला अधिकार गाजवीत राहतें. त्याप्रमाणेंच, धिंग्रांच्या वधानंतर त्यांची आठवण इंग्रजांना भेडसावीतच राहिली! दिनांक १७ रोजींच अमेरिकेंतल्या प्रमुख पत्रांनीं मदनलालजींचें आव्हान प्रसिद्ध केलें. बड्याबड्या शब्दांची धूळफेक करून जगाची वंचना करणाऱ्या इंग्लंडची अमेरिकेनें फटफजीती केली! त्यांचाच धडा आयरिश वृत्तपत्रांनीं पाठोपाठ गिर-विला. जर्मनी, फ्रान्स वगैरे देशांनींहि हिंदुस्थानांतल्या चळवळीचा पाठपुरावा करून, इंग्लंडची छीः थू करण्याचा सपाटा चालविला. एका इटॅलियन पत्रानें तर एक मोठें सूचक चित्र काढून, इंग्लंडची कशी घाबरगुंडी उडाली आहे हें जग-जाहीर केलें. या चित्रांत एक मोठा कडा काढलेला होता व त्याच्या पायाशीं हिंदु-स्थान, त्यावर ईजिप्त, सोमालीलँड वगैरे विटा, त्यावर वसाहती व त्यावर इंग्लंड बसलेलें आहे असा देखावा दाखविला होता. इतक्यांत स्फोट होतो व 'हिंदु नॅशनॅलिस्ट' बार उडवितो. हिंदुस्थानला खिंडार पडतें. सर्व कडा डळमळूं लागलेला पाहून घाबरलेला जॉन बुल म्हणतो : अरे हा वाडा ढांसळला! याचा पायाच पोंखरला गेला! माझे अंगात कोण कापरें भरलें आहे![1]

धिंग्रा, धिंग्रा–प्रकरण, 'आव्हान' इत्यादिकांविषयीं कित्येक इंग्रज ग्रंथ-कारांनीं, तसेंच मदनलालजींच्या कांहीं सहकाऱ्यांनीं, जे उद्गार काढले आहेत ते मदन-लालजींच्या वर्तनाविषयींचें मत स्वतंत्र वृत्तीनें ठरवूं पाहाणाऱ्या वाचकांना मार्गदर्शक

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ १५६.

ठरणारे आहेत. पण ते उद्‍गार उद्धृत करून हें प्रकरण संपविण्यापूर्वी एक दोन मुद्यांचा परामर्श घेणें अवश्य आहे. 'लंडन टाइम्स' च्या दि. २०-८-०९ च्या अंकांतला जो उतारा वर देण्यांत आलेला आहे त्यांत असें म्हटलेलें आहे कीं कोणीतरी मदनलाल धिंग्राला घोड्यावर बसविला व म्हणून तो खून करण्याला प्रवृत्त झाला ! असें विधान करणाऱ्या लेखकाला मानवी मनाची मुळांतली घडणच समजलेली नाहीं, असें म्हणणें प्राप्त आहे. सुस्थितींत असलेला मदनलाल धिंग्रासारखा हट्टी तरुण मरणमारणाच्या मार्गाकडे वळला तो केवळ कोणी नाकांत काड्या घातल्या म्हणून वळला अगर कोणी घोड्यावर चढविला म्हणून वळला, हें शक्य नाहीं; अशा गोष्टी हातून घडावयाच्या तर त्या करूं पाहणाऱ्या इसमाचें मन स्वयंसिद्धपणेंच निश्चयी व खंबीर असलें पाहिजे. कोणी खून करावयाला प्रोत्साहन दिल्यामुळें खून होत नाहींत व कोणी खुनासारख्या 'हिंसात्मक' मार्गांचा निषेध 'ऊर्ध्वबाहुर्विरोम्येष:' अशा पद्धतीनें करण्याचें कंकण बांधलें तरी जगांतले खून थांबतहि नाहींत ! तेव्हां 'Egged on' हा शब्दप्रयोग करून, सदर लेखकानें मदनलालजींना भाडोत्री अगर परप्रत्ययनेयबुद्धी या सदरांत ढकलण्याचा प्रयत्न केला असला तरी, तो बुद्धिवादाला संमत होण्यासारखा नाहीं असें स्पष्टपणें म्हणणें प्राप्त आहे. 'Challenge' या वक्तव्याच्या भाषासरणीबद्दल सदर लेखकानें जे निष्कर्ष काढले आहेत ते मात्र बव्हंशीं स्वीकारण्याजोगे आहेत. मदनलालजींनीं दि. १०-७-०९ रोजीं वेस्ट मिन्स्टर कोर्टांत जें वक्तव्य केलें तें यापूर्वीं संपूर्णतया देण्यांत आलेलें आहे. त्याची भाषासरणी व विचारसरणी यांची तुलना Challenge या वक्तव्याच्या भाषासरणीशीं व विचारसरणीशीं केली तर कोणालाहि असें दिसून येईल कीं, हीं दोन वक्तव्यें करणाऱ्या व्यक्ती एक नाहींत. फूल्स्कॅप कागदावर लिहिलेलें माझें वक्तव्य पोलिसांनीं दाबून टाकलें आहे अशी तक्रार केल्यावर, मदनलालजींनीं सेशन्स कोर्टांत एकदां 'मला त्यांतील मजकूर आतां आठवत नाहीं' असे उद्‍गार काढल्याविषयींची माहिती यापूर्वीं देण्यांत आलेलीच आहे. या उद्‍गारांवरून असा निष्कर्ष निघण्यासारखा आहे कीं, कोणाजवळून तरी लिहून घेतलेलें वक्तव्य मदनलालजींनीं मुखोद्‍गत केलें असावें व १ जुलैनंतर घडत गेलेल्या गोष्टींच्या गर्दीमुळें त्या वक्तव्यातल्या शब्दांचें त्यांना आयत्या वेळीं विस्मरण झालें असावें.

Challenge हें वक्तव्य मदनलालजींच्या हातचें नाहीं असें गृहीत धरण्याजोगी परिस्थिति निर्माण झाल्यावर एक नवा प्रश्न उपस्थित होतो तो असा कीं, Challenge हें वक्तव्य जर मदनलालजींचें नव्हे तर तें कोणी लिहिलें असावें ! अंतर्गत पुराव्याचा विचार केल्यावर प्रस्तुत लेखकाचें असें मत बनलें आहे कीं, हें वक्तव्य सावरकरांनीं मदनलालजींना लिहून दिलें असावें. या पत्रकाच्या तिसऱ्या परिच्छेदांत श्रीरामचंद्र व श्रीकृष्ण यांचा उल्लेख करण्यांत आलेला आहे. सावरकरांनीं यानंतर कांहीं महिन्यांनीं रचिलेल्या 'पहिला हप्ता' या कवितेंतल्या 'सारथी

जिचा अभिमानी। कृष्णजी अणि राम सेनानी ॥ ' या चरणांतील उल्लेख व हा उल्लेख यांतील साम्य तोलून पाहण्यासारखें आहे. त्याच परिच्छेदांत इंग्लंड व भारतवर्ष यांच्यामधील अखंडित संग्रामाचा निर्देश करण्यांत आलेला आहे. १८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामांतील वीराग्रणींना उद्देशून सावरकरांनीं १९०८ सालच्या मे महिन्यांत ' Oh Martyrs ' या नांवानें जें पत्रक प्रसिद्ध केलें तें यापूर्वी देण्यांत आलें आहे. त्यांतहि या अखंडित संग्रामाची कल्पना स्पष्टपणें येऊन गेलेली आहे. Altar, वेदी, स्थंडिल ही कल्पना या वक्तव्यांतल्याप्रमाणेंच ' माझें मृत्युपत्र ' या ओजस्वी कवितेंतहि आलेली आहे. Challenge हें पत्रक मदनलालजींनीं लिहिलेलें नसावें असें मानण्याला प्रवृत्त झालेली कोणाहि वाचकाची बुद्धि तें पत्रक सावरकरांनीं लिहिलें असावें असें समजण्याला उत्सुक व्हावी इतकीं स्पष्ट गमकें सावरकरांचें या सुमाराचें लिखाण व Challenge यांच्यामध्यें निदान प्रस्तुत लेखकाला तरी आढळतात.

' Indian Unrest ' या प्रसिद्ध ग्रंथाचे लेखक सर व्हॅलेंटाइन चिरोल यांनीं सदर ग्रंथांत[1] ' काळ ' चे बातमीदार श्री. सावरकर यांनीं कर्झन वायली यांना ' सेक्रेटरी ऑफ स्टेट फॉर इंडिया ' चे प्रत्यक्ष नयनच[2] म्हटल्याबद्दल सावरकरांवर टीका केली आहे. ही टीका पुढीलप्रमाणें आहे :

Savarkar, the London correspondent of the Kal, magnified the success of the plot by describing its chief victim as the eye of the Secretary of State. There is some reason to believe that Dhingra expected to find at the reception another Anglo-Indian official whom the extremists were particularly anxious to remove, and, only in his absence, struck at Sir Curzon Wyllie.

( ' काळ ' पत्राचे लंडनचे बातमीदार श्री. सावरकर यांनीं या कटांत बळी पडलेले प्रमुख गृहस्थ सर कर्झन वायली यांचें ' भारतमंत्र्यांचे नयन ' असें वर्णन करून या कटाचें यश फुगवून दाखविलें. दुसऱ्या एका अँग्लो--इंडियन अधिकाऱ्याला उडवावें अशी जहालांची फार इच्छा होती. समारंभाच्या ठिकाणीं हा अधिकारी सांपडेल अशी धिंग्रांची अटकळ होती. तो अधिकारी न आढळल्यामुळें, धिंग्रानें सर कर्झन वायलीवर गोळी झाडली.) धिंग्रा-प्रकरणाची साधार व साद्यंत माहिती येथवर देण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखकानें केला आहे. ही माहिती वाचल्यावर, या प्रकरणामागें एकादा कट होता कीं काय, या प्रश्नाचें काय उत्तर द्यावयाचें तें वाचक स्वतःशीं स्वतंत्रपणें ठरवितीलच. सावरकरांनीं या कटाचें यश फुगवून दाखविलें कीं काय व दुसऱ्या एकाद्या अँग्लो-इंडियन अधिकाऱ्याच्या ऐवजीं सर कर्झन वायलीचा बळी घेतला गेला कीं काय, या प्रश्नांचीं उत्तरें प्रस्तुत लेखकाच्या मतें पुढीलप्रमाणें आहेत : दि. ८ जून १९०९ रोजीं ' कलोनियल इन्स्टिटयूट ' तर्फे लॉर्ड कर्झन यांचे अध्यक्षतेखालीं सर बॅम्फील्ड फुल्लर यांनीं निबंध वाचला. हा प्रसंग साधून या दोघांपैकीं एकाद्याला किंवा दोघांना उडविण्याचा धिंग्रांचा संकल्प असावा, हें यापूर्वी सूचित

1 P. 148.

२ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १३५.

करण्यांत आलेलें आहे. हा प्रयत्न फसल्यामुळें धिंग्रानें पुढें जी तयारी केली तिच्यांत विकल्पाला कांहीं जागाच शिल्लक ठेवण्यांत आली नव्हती, असें पुढें आलेल्या पुराव्यावरून स्पष्ट दिसतें. कोणकोण बडीं माणसें ' इंपीरियल इन्स्टिटयूट ' मधील समारंभाला येणार आहेत वगैरे प्रत्येक बाबीची तपशीलवार माहिती मिळवूनच धिंग्रानें आपला संकल्प सिद्धीस नेला हें स्पष्ट दिसत असल्यामुळें, " दुसऱ्याच कोणाला तरी उडविण्याचा बेत होता; तो फसल्यामुळें सर कर्झन वायलीला मारलें " हें चिरोलचें म्हणणें कोणालाहि पटण्यासारखें नाहीं. सावरकरांनीं सर कर्झन वायलीला ' भारत-मंत्र्यांचे प्रत्यक्ष नेत्र ' असें म्हटलें; त्यावर चिरोलची दुष्ट मल्लिनाथी अशी कीं, आपल्या कटाचें यश फुगवून दाखविण्यासाठीं सावरकरांनीं असें लिहिलें ! कट असलाच तर त्याची उभारणी व अंमलबजावणी अत्यंत बेमालूमपणानें झाली, यांत शंकाच नाहीं. त्याचें यश फुगविण्यासाठीं एकाद्या साहेबाच्या वर्णनांत दोन उणे-आगळे शब्द घालण्याची जरुरी वाटावी, इतकें तें यश फुसकें खास नाहीं. बरें, यश फुगून दिसावें यासाठीं सावरकरांनीं सर कर्झन वायलीला प्रमाणाबाहेर गौरविलें असेंच क्षणभर मानलें तरी त्यांतून काय निष्पन्न होईल ? ' मरणांतानि वैराणि ' या न्यायानें वागण्याचें पिढीजाद वळण सावरकरांच्या हिंदु वृत्तीला लागलेलें असल्या-मुळें, सर कर्झन वायली मेल्याबरोबर त्याच्याविषयींचें वैर विसरून सावरकरांनीं त्याच्याबद्दल गौरवानें लिहिलें ! हा निष्कर्ष सावरकरांना कमीपणा आणणारा नाहीं, थोरवीच देणारा आहे ! पण, कटवाल्यांचें यश कमी प्रतीचें ठरावें म्हणून चिरोल-साहेबांनीं कर्झन वायलीचें महत्त्व कमी लेखण्याला प्रवृत्त व्हावें हा मात्र, स्वतःचें नाक कापून दुसऱ्याला अपशकुन करण्यांतलाच एक प्रकार आहे. कर्झन वायली हे भारतमंत्र्याचे नेत्र नाक व कान असतील ! अलंकारिक भाषेंत केलेल्या या वर्णनाचा अर्थ इतकाच आहे कीं ते भारतमंत्र्याच्या कचेरींतले एक बडे अधिकारी होते. पार्लमेंटरी पद्धतीच्या कारभारांत भारतमंत्री वगैरे लोक प्रत्येक निवडणुकीच्या वेळीं पालटणारे असल्यामुळें, कचेरीच्या धोरणांतलें व कामांतलें सातत्य टिकविण्यासाठीं, अशा स्थिरपद अधिकाऱ्याचें महत्त्व विशेष असतें, ही गोष्ट सर्वमान्य आहे. अनेक भारतीय संस्थानांतून रेसिडेंटचें काम करून स्वदेशीं परत आलेले सर कर्झन वायली हे भारतमंत्र्याचे Political A. D. C होते, असें वर्णन १९०६ साल-पासूनच्या लिखाणांतून सतत आढळतें. इंग्लंडांतील भारतीय विद्यार्थ्यांचा बंदोबस्त करण्याच्या योजना आंखतांना व पार पाडतांना वायलीसाहेबांना जें महत्त्व न चुकतां देण्यांत येत होतें त्याचा अर्थच असा होता कीं, हिंदी परिस्थितीचा दीर्घकालीन परिचय, वरपांगी सहानुभूतीचें धोरण दाखवून साखरपेरणी करण्याची त्यांची कला, इत्यादि गुणांबद्दल त्यांची चांगलीच ख्याति होती. असा एक बडा नि कर्तबगार अधि-कारी आकस्मिक रीतीनें मेला यामुळें तर थेट राजेसाहेबांपासून सर्वांनीं दुःखप्रदर्शन व अश्रुविमोचन केलें ! चिरोल साहेब सुचवितात त्याप्रमाणें कर्झन वायली हे भारत-

मंत्र्याचे कोणीच नसते—ते कोणी तरी एक फालतु इसम असते—तर खुद्द राजेसाहेबांनीं त्यांच्या मृत्यूबद्दल दुःखप्रदर्शन केलें असतें काय ? कोणाहि धोब्याच्या अगर भडभुंजाच्या मृत्यूबद्दल इंग्लंडचे राजेसाहेब सार्वजनिक रीतीनें हळहळत असतात, असें हिंदुस्थानांतल्या लोकांना तरी माहीत नाहीं !

धिंग्राला फांशी दिलें त्या दिवशीं लंडनमधल्या सर्व हिंदी विद्यार्थ्यांनीं कडकडीत उपोषण केलें. धिंग्राचें प्रेत हिंदी विद्यार्थ्यांच्या हवालीं करण्यांत आलें नाहीं त्यामुळें त्याचें और्ध्वदेहिक हिंदु पद्धतीनें करणें शक्य झालें नाहीं; तरीहि, त्याच्या मृत्यूच्या दहाव्या दिवशीं श्री. ग्यानचंद वर्मा यांनीं क्षौर करून धिंग्राचें श्राद्ध केलेंच ! धिंग्राचें गुणगान हा तर हिंदी विद्यार्थ्यांचा एक आवडता विषयच होऊन बसला ! ज्या दिवशीं धिंग्राला फांसावर चढविण्यांत आलें त्याच दिवशीं सकाळीं लंडनमधील हिंदी क्रांतिकारकांनीं धिंग्राविषयींचें पुढील पत्रक काढून प्रसृत केलें होतें :

* This day, the morning of 17 th August 1909, will remain engraved in red letters in the heart of every Indian who loves his Motherland This is the morning that our great patriot, our beloved Dhingra, is swinging to and fro with his sacred neck in the grip of the execution ropes in Pentenville prison. His high soul is rising from his earthly body, giving more spirituality to the cause on whose altar he is sacrificed. This great patriot is no more with us in his earthly body but in spirit he is with us, will remain with us, will guide us in the battle of the freedom of our Motherland and his name, written in the history of India, will go down to posterity. The alien oppression on his Motherland he could not bear and he decided to help the movement, which is engaged in freeing Her by giving his life.

" I told you that the English Court has no authority over me. I do not care for my life. You are all powerful. You can do what you like.

---

* दि. १७ ऑगस्ट १९०९ चा हा दिवस—या दिवसाचा हा प्रातःकाल–मातृभूमीवर प्रेम करणाऱ्या प्रत्येक भारतवासीयाच्या चित्तावर रक्ताक्षरांनीं कोरलेला राहील. या प्रातःकाळीं आमचा थोर देशभक्त, आमचा प्रिय धिंग्रा, पेन्टेन्व्हिली तुरुंगांत फांसावर चढत आहे–त्याची पवित्र मान फांसांत अडकली आहे ! त्याचा उदात्त आत्मा त्याच्या पार्थिव शरीरांतून निघून वर जात आहे व या उत्क्रमणामुळें, ज्या पक्षाच्या वेदीवर त्यानें आपलें बलिदान केलें त्या पक्षाच्या आध्यात्मिकतेंत भर पडत आहे. धिंग्राचें पार्थिव शरीर आतां आमच्या सन्निध नाहीं. पण, त्याचा आत्मा आमच्याभोंवतीं आहे, तो आमच्या भोंवतींच राहील आणि मातृभूविमोचनाच्या संग्रामांत तो आमचें मार्गदर्शन करील. भारताच्या इतिहासांत लिहिलेलें त्याचें नांव उद्यांच्या भारतीय संततीपर्यंत जाऊन पोंचेल. परकीयांनीं चालविलेला मायभूचा छळ धिंग्राला असह्य वाटला; आणि मायभूच्या विमोचनासाठीं चालू झालेल्या चळवळीला सहाय्य म्हणून प्राणार्पण करण्याचा त्यानें निर्धार केला.

" इंग्लिश न्यायालयाचा माझ्यावर कसलाहि अधिकार नाहीं हें मी आपल्याला सांगितलेंच आहे. मला माझ्या प्राणांची पर्वा नाहीं. तुम्ही सर्वशक्तिमान् आहां,मनांत

But remember that one day we shall be powerful and then we shall do what we like."-were his words when the English judge, who must have been feeling demoralized in his inner heart told him that his life would be taken... And now our enemies have killed him. But, let them remember that they will never, never succeed in suppressing or killing the movement.

Moral force, like gentle tides at the touch of storm, sweeps away hills and lands. The act of a patriot comes like storm to the moral waves of human society, and, sweeping away barriers, leads the cause to success.

दि. १०-९-१९०९ रोजीं प्रसिद्ध झालेल्या 'वंदे-मातरम्' पत्राच्या पहिल्याच अंकांत लाला हरदयाळ यांनीं धिंग्राजींना पुढील स्तुतिसुमनें वाहिलीं :

Dhingra, the immortal, has behaved at each stage of his trial like a hero of ancient times He has reminded us of the history of mediaeval Rajputs and Sikhs, who loved death like a bride. England thinks she has killed Dhingra; in reality, he lives forever and has given the deathblow to English sovereignty in India.

In time to come, when the British Empire in India shall have been reduced to dust and ashes, Dhingra's monuments will adorn the squares of our chief towns, recalling to the memory of our children the noble life and nobler death of him who laid down his life in a far-off land for the cause he loved so well.

( न्यायालयांतील चौकशीचें काम चालू असतांना प्रत्येक प्रसंगीं धिंग्राजी—अमर झालेले धिंग्राजी—हे प्राचीन काळच्या एकाद्या शौर्यशाली महापुरुषाप्रमाणें वागले आहेत. मध्ययुगीन इतिहासांत प्रसिद्धि पावलेले रजपूत व शीख हे मृत्यूवर आपल्या प्रेयसीप्रमाणें प्रेम करीत. धिंग्राजींनीं आपल्या वर्तनानें या शूरांचें स्मरण जागृत केलें आहे. इंग्लंडला वाटत आहे कीं, आपण धिंग्राला मारून टाकिलें! वस्तु-

---

येईल तें तुम्ही करूं शकतां! पण, जेव्हां आम्ही शक्तिमान् होऊं असाहि एक काळ येईल हें विसरूं नका त्यावेळीं आम्हीहि हवें तें करूं."—मनांत विरमून गेलेल्या इंग्रज न्यायाधिशानें देहांताची शिक्षा सांगितली तेव्हां धिंग्रानें हे शब्द उच्चारले... आमच्या शत्रूंनीं आतां धिंग्राचे प्राण हिरावून घेतले आहेत; पण, हें केल्यानें त्यांना आमची चळवळ दाबून टाकतां येणार नाहीं अगर मारून टाकतां येणार नाहीं, हें त्यांनीं नीट ध्यानांत धरावें.

सागरावरील भरतीच्या लाटा सामान्यतः सौम्य दिसतात; पण, तुफानी वाऱ्याच्या तांडवाचा स्पर्श होतांच त्यांना असें सामर्थ्य येतें कीं, त्यापुढें टेकड्या व भूभाग धुऊन निघतात. मानवी समाजांत खेळणारें नैतिक बळ हें या लाटांसारखेंच असतें देशभक्ताच्या कृतीचा स्पर्श लाभतांच या सौम्य नैतिक बळांत एका नव्या शक्तीचा संचार होतो. या नव्या शक्तीमुळें साऱ्या अडथळ्यांचा चक्काचूर होतो आणि मग त्या देशभक्ताचा पक्ष यशालाभाप्रत पोंचतो.

स्थिति अशी आहे कीं, धिंग्रा चिरंजीव झाले आहेत व त्यांनीं इंग्रजांच्या भारतीय आधिपत्याला प्राणघातकी तडाका लगाविला आहे.

भविष्य काळीं ज्या वेळीं भारतांतलें ब्रिटिश साम्राज्य मातींत मिळून जाईल, त्या वेळीं, भारतांतल्या प्रमुख नगरांत चौकाचौकांतून धिंग्रांचे पुतळे वैभवांत तळपूं लागतील. हे पुतळे पाहून भारतीय बालकांना धिंग्रांच्या उदात्त जीवनाचें व उदात्ततर मरणाचें स्मरण होईल. आपल्या प्रिय कार्यासाठीं दूरच्या एका देशांत प्राणांची आहुति देणारा महाभाग धिंग्रा तो हाच, ही आठवण काढून भारतीय बालकें या विभूतीपुढें आपला माथा नमवितील.)

Secret History of The English Occupation of Egypt या ग्रंथाचा लेखक W. S. Blunt याच्या आन्हिकी (Diary) चे दोन खंड प्रसिद्ध झालेले आहेत. कै० दादासाहेब खापर्डे यांच्यापाशीं ब्लंटचा धिंग्राविषयीं झालेला संवाद २४-७-१९०९ या दिनांकाच्या आन्हिकींत पुढील शब्दांत[1] नोंदलेला आढळतो :

No Christian martyr ever faced his judges more fearlessly or with greater dignity. I discussed his case with Khaparde who is here for the week-end, his first country-visit in England. He is as full of admiration as I am of Dhingra's courage. We agreed that if India could produce five hundred men as absolutely without fear, she would achieve her freedom. It was recorded in the medical evidence at the trial that, when arrested, Dhingra's pulse beat no quicker than was normal nor from first to last has he shown any sign of weakening.

(ख्रिश्चन धर्मांतल्या तत्त्वांच्या अभिमानानें हौतात्म्य पत्करणाऱ्या लोकांनीं न्यायासनासमोर उभे राहिल्यावर निर्भयपणा व उदात्तपणा हे गुण व्यक्त केले. पण त्यांनीं व्यक्त केलेले हे गुण धिंग्राजींच्या गुणांपेक्षां श्रेष्ठ होते असें म्हणतां येणार नाहीं. या सप्ताहाच्या अखेरीला श्री. खापर्डे येथें आले आहेत. इंग्लंडमध्यें आल्यापासून ग्रामीण वस्तींत ते प्रथमच येऊन राहिले, असें मला वाटतें. त्यांच्याशीं मी धिंग्राप्रकरणाची चर्चा केली. धिंग्राजींच्या धैर्याबद्दल मला जितकें कौतुक वाटत आहे तितकेंच त्यांनाहि वाटत आहे. धिंग्राजींच्या इतक्याच निर्भय बाण्याचीं ५०० माणसें निर्माण होतील तर हिंदुस्थान स्वतंत्र होईल, या मुद्यावर आमचें दोघांचें एकमत झालें. धिंग्राजींच्या चौकशीच्या वेळीं ज्या डॉक्टरांची साक्ष झाली त्यांनीं असें सांगितल्याचें नमूद झालें आहे कीं, धिंग्राजींना अटक झाल्यावर त्यांची नाडी तपासली त्या वेळीं ती नाडी अगदीं नेहमींच्यासारखी संथपणानें चाललेली होती. अथपासून इतिपर्यन्त, दौर्बल्याचें चिन्ह म्हणून त्यांच्या वर्तनांत दिसलें नाहीं.)

ब्लंटचा (Challenge) या वक्तव्यावरील अभिप्रायहि[2] मार्मिक आहेः

---

१ Part II. Pp. 267-68. २ Part II. Pp 274.

No greater fortitude was ever shown by a martyr for any faith. With such men to love her, Mother India must succeed. But the British public is so besotted with its own self-satisfaction that it refuses to acknowledge this martyr's death, endured so calmly, as anything but a murderer's wish for notoriety. The day of reckoning, however, cannot be long delayed.

(धर्मासाठीं आत्मबलिदान करणाऱ्या कोणत्याही हुतात्म्यानें धिंग्राजींहून श्रेष्ठ प्रतीचें धैर्य दाखविलेलें नाहीं. ज्या भारतमातेवर अशा सुपुत्रांचें प्रेम आहे ती भारतमाता यशस्विनी झालीच पाहिजे; पण. अहंकारी समाधानामुळें धुंदावलेल्या ब्रिटिश जनतेला हें कांहीं कळतच नाहीं. धिंग्राजींनीं इतक्या धीरोदात्तपणानें मृत्यूला मिठी मारली यांत कांहीं विशेष आहे हें मान्य करण्याला ब्रिटिश जनत, नकार देते. खुनी मनुष्याची लौकिकाची इच्छा इतकाच त्या कृत्याचा अर्थ होय असें तिला वाटतें. पण, अशा मुर्दाड मनोवृत्तीचा जाब देण्याचा प्रसंग फार दिवस टाळतां येणार नाहीं. )

---

## प्रकरण ८ वें

# अटकेपूर्वीच्या उलाढाली

**इंडिया** हाउस सोडून सावरकर एप्रिलपासून बिपिनचंद्र पाल यांच्या येथें राहूं लागले, ही गोष्ट यापूर्वीच्या प्रकरणांत उल्लेखिण्यांत आलीच आहे. पाल-बाबूंचे चिरंजीव श्री. निरंजन पाल यांचा व सावरकरांचा चांगला स्नेह जमला होता. त्यामुळें व इतउत्तर 'इंडिया हाउस' चालू ठेवणें अवश्य नाहीं असें वाटूं लागल्या-मुळें, ते पालबाबूंच्या आग्रहावरून त्यांचे घरीं—पण रीतसर पैसे देऊन—राहूं लागले. 'इंडिया हाउस' ही संस्था ज्या हेतूनें सुरू करण्यांत आली होती तो हेतु संपूर्णपणें सिद्ध झाला आहे, लंडनमध्यें जेथें जेथें हिंदु विद्यार्थी राहतात त्या प्रत्येक स्थळीं एकेक 'इंडिया हाउस' चालू झालें असल्यामुळें आतां 'इंडिया हाउस' हें नांव धारण कर-णारी एकादी संस्था चालविली पाहिजे असें नाहीं, संस्था चालू ठेविली तर प्रसंगीं पोलिसांच्या तडाक्यांत अनेक माणसें व वस्तू सांपडतील व त्यामुळें कार्याला जास्त धोका येईल वगैरे कोटिक्रमाचीं पत्रें सावरकर पं० शामजी कृष्णवर्मा यांना पाठवीत होते. पण, संस्था स्थापणाऱ्या अनेकांची जी गत होते, तीच शामजींचीहि झाली होती. ज्या हेतूच्या सिद्धीसाठीं संस्था निघाली त्या हेतूचें कार्य झालें हा प्रश्न दृष्टि-आड करून, संस्था चालविणें हाच जणूं प्रधान हेतु होय, असें संस्थाचालकांना वाटूं लागतें. त्यामुळें हेतुसिद्धि बाजूलाच राहून, निर्जीव ठरलेल्या संस्था अडगळी-सारख्या त्रासदायक ठरतात व हळुहळू हास्यास्पद होऊं लागतात. 'इंडिया हाउस' या संस्थेवर असा कांहीं प्रसंग आला नाहीं. पण, एप्रिल महिन्यांत सावरकर बाहेर राहूं लागतांच ही संस्था निर्जीव झाली. पुढें धिंग्रा प्रकरणाचे वादळी वारे वाहूं लागतांच ही संस्था बंद झाली. थोडक्याच दिवसांनीं पं० शामजी कृष्णवर्मा यांनीं संस्थेची इमारतहि विकून टाकली व संस्थेप्रीत्यर्थ खर्च केलेला पैनान् पैसा त्यांनीं वसूल केला. धिंग्रा प्रकरणाची आग भडकेपर्यंत सावरकर पालबाबूंकडे राहूं शकले. पण, धिंग्रा प्रकरण सुरू झाल्यावर, सावरकरप्रभृति क्रांतिकारकांवरील रोष व्यक्त करण्यासाठीं पिसाळलेल्या इंग्रज स्त्री-पुरुषांचे जमाव पालबाबूंच्या निवासस्थानाभोंवती गोळा होऊं लागले; त्याबरोबर पालबाबू विचारांत पडले. त्यांनीं वृत्तपत्रांतून एक पत्र प्रसिद्ध केलें व सावरकर हे आपल्या वसतिगृहांतील एक Paying guest आहेत, या-पलीकडे त्यांचा व आपला अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं, असें जाहीर करून ते मोकळे झाले! पालबाबूंचें घर सोडल्यावर दोन तीन दिवसपर्यंत सावरकरांचे अतिशय हाल झाले. बिऱ्हाडासाठीं म्हणून जागा पहावी व तेथें सामानसुमान घेऊन जावें

तों पोलिसांचा लकडा घरमालकाच्या वा घरमालकिणीच्या मागें लागे, व नाइलाज होऊन, सावरकरांनीं जागा सोडून जावें असें सांगण्याचा त्या बापड्यांवर प्रसंग येत असे. एकदां तर त्यांना ऐन मध्यरात्रीच्या सुमारास एका हॉटेलमधून चंबूगवाळें आंवरून बाहेर पडावें लागलें व 'शय्या भूमितलं दिशोऽपि वसनम्' या पद्धतीनें काळ कंठावा लागला. दोनतीन दिवसपर्यंत असा लपंडाव चालल्यावर, त्यांना एके ठिकाणीं मोठ्या कष्टानें जागा मिळाली!

ज्येष्ठ बंधूंना नुकतीच झालेली जन्मठेपेची शिक्षा, १४ जुलै रोजीं ग्रेज इनमधील चौकशीच्या वेळीं विरुद्ध पुरावा म्हणून सांगण्यांत आलेली हिंदुस्थानमधील घडामोडींची माहिती, धिंग्रा प्रकरण सुरू झाल्यापासून पडत गेलेला कामाचा मनस्वी ताण, कॅक्स्टन हॉलमधील सभेंत झालेला प्रकार व त्यानंतर कित्येक दिवसपर्यंत सोसावा लागलेला मनस्ताप या सर्वांचा सावरकरांच्या प्रकृतीवर फार परिणाम झाला. त्यांतहि, लंडनमध्यें भाड्याची जागासुद्धां मिळणें कठिण झाल्यामुळें, कांहीं दिवस तरी स्थानांतर करणें अवश्य झालें. लंडनपासून विशेष दूर नसलेल्या ब्रायटन या समुद्रकांठच्या रम्य ठिकाणीं विश्रांतीसाठीं जाऊन राहण्याचें सावरकरांनीं ठरविलें व त्याप्रमाणें दि. २९–७–१९०९ रोजीं ते ब्रायटनला गेले. ग्यानचंद वर्मा यांना ब्रायटन येथें बोलावून, धिंग्राच्या Challenge या वक्तव्याच्या प्रकाशनाची व्यवस्था सावरकरांनीं या ठिकाणीं असतांनाच केली. सावरकर या ठिकाणीं एकूण १०–१२ दिवसच होते. त्यांच्या सहवाससुखाचा जास्तींत जास्त लाभ मिळावा म्हणून श्री. निरंजन पाल हे लंडनहून वारंवार तेथें जात असत. हे दोघे मित्र एकदां सायंकाळीं ब्रायटनच्या समुद्रकिनाऱ्यावर हिंडावयास गेले होते. आनंदांत कालक्रमणा करणाऱ्या इंग्रज स्त्रिपुरुषांचे थवेच्या थवे भोंवतालीं हंसतखेळत होते. अशा त्या जनसंमर्दांत हे दोघे समवयस्क तरुण सावरकरांवर ओढवूं पाहणाऱ्या राजकीय आपत्तीविषयीं बोलत होते. बोलतां बोलतां सावरकरांची तंद्री लागली! 'करिशी एकांतीं गर्दी। एकान्ताहि जनसंमर्दीं' हा गडकऱ्यांनीं 'विचार' या कवितेंत वर्णिलेला अनुभव सावरकरांना येऊं लागला व समोर पसरलेल्या सागराशीं त्यांची वृत्ति तादात्म्य पावली! या प्रसंगीं सावरकरांना 'सागरास' ही सुंदर कविता कशी स्फुरली याचें वर्णन[1] करतांना निरंजनबाबू लिहितात :

Presently he commenced to hum a song—he sang as he composed. It was a Marathi song, describing the pitiable serfdom of India. Forgetful of all else, Savarkar went on signing. Presently tears began to roll down hin cheeks. His voice became choked. The song remained unfinished. Savarkar began to weep like a child.

( इतक्यांत सावरकरांनीं एक गाणें गुणगुणावयाला सुरुवात केली — ते एकीकडे गाणें रचीत होते व एकीकडे तें म्हणत होते. गाणें मराठी असून, त्यांत भार-

[1] Marhata : 27-5-1938.

त्यांच्या दीनवाण्या दास्याचें वर्णन होतें. आत्मविस्मृतीच्या पूर्णावस्थेंत जाऊन सावरकरांचें गीतगान चाललें होतें. इतक्यांत त्यांच्या डोळ्यांतून अश्रू घळघळा वाहूं लागले; त्यांचा कंठ स्तंभित झाला, गाणें अपुरेंच राहिलें; एकाद्या निष्पाप लेंकरासारखे सावरकर कंठ मोकळा करून रडूं लागले. )

अशा या परिस्थितींत रचली गेलेली ' सागरा प्राण तळमळला ' ही कविता काव्य या दृष्टीनेंहि किती श्रेष्ठ दर्जाची आहे हें प्रत्येक रसिकानें स्वतःच ठरवावें. सध्यां गांधीजींच्या प्रभावळींत असणारे—व सावरकरांच्या संगतींत फर्ग्युसन कॉलेजांत कांहीं दिवस असलेले—श्री. दत्तोपंत अर्थात आचार्य कालेलकर यांनीं ही कविता ' मराठी भाषेचें लेणें म्हणून मराठीं साहित्यांत कायमचें स्थान मिळवून बसली आहे ' असें प्रशस्तिपत्र दिलें आहे.[1] कै. अप्पाशास्त्री राशिवडेकर यांच्यासारख्या पंडितवराला व रसिकश्रेष्ठालाहि या कवितेनें हलविलें होतें आणि या कवितेला उत्तर म्हणून शास्त्रीबुवांनीं एक संस्कृत कविता रचिली होती, अशी माहिती प्रस्तुत लेखकाला मिळाली आहे.[2] ही सुंदर कविता समग्र देणें अवश्य असल्यामुळें ती यापुढें जशीच्या तशी दिली आहेः

## सागरास

ने मजसी ने परत मातृभूमीला । सागरा प्राण तळमळला ॥ ध्रु० ॥
भूमातेच्या चरणतलां तूं धूतां । मी नित्य पाहिला होता ।
मज वदलासी अन्य देशिं चल जाऊं । सृष्टिची विविधता पाहूं ।
तैं जननीहृद् विरहशंकितहि झालें । परि तुवां वचन तिज दिधलें ।
' मार्गज्ञ स्वयें मीच पृष्ठिं वाहीन । त्वरित या परत आणीन ' ॥
गंभीर त्वदाकृति बघुनी ॥ मी ॥
विश्वसलों या तव वचनीं ॥ मी ॥
' जगदनुभवयोगें बनुनी ॥ मी ॥
तव अधिक शक्त उद्धरणीं ॥ मी ॥
येईन त्वरें ' कथुनि सोडिलें तिजला । सागरा प्राण तळमळला ॥ १ ॥

शुक पंजरिं कीं हरिण शिरावा पाशीं । ही फसगत झाली तैशी ।
भूविरह कसा सतत साहुं यापुढतीं । दशदिशा तमोमय होती ।
गुणसुमनें मीं वेंचियलीं या भावें । कीं तिनें सुगंधा घ्यावें ।
जरि उद्धरणीं व्यय न तिच्या हो साचा । हा व्यर्थ भार विद्येचा ।
ती आम्रवृक्षवत्सलता ॥ रे ॥
नवकुसुमयुता त्या सुलता ॥ रे ॥

---

१ प्रतिभा : १५-१-१९३६
२ नाशिकचे कै. वामनशास्त्री दातार यांच्या तोंडून ही माहिती मिळाली.

तो बालगुलाबहि आतां ॥ रे ॥
फुलबाग मला हाय पारखा झाला । सागरा प्राण तळमळला ॥२॥

नभिं नक्षत्रें बहुत एक परि प्यारा । मज मातृभूमिचा तारा ।
प्रासाद तिथें रम्य परी मज भारी । आईची झोंपडी प्यारी ।
तिजवीण नको राज्य मज प्रिय साचा। वनवास तिच्या जरि वनिंचा।
भुलविणें व्यर्थ हें आतां ॥ रे ॥
बहु जिवलग गमते चित्ता ॥ रे ॥
तुज सरित्पते जी सरिता ॥ रे ॥
तद्विरहाची शपथ घालितों तुजला । सागरा प्राण तळमळला ॥३॥

या फेनमिषें हंससि निर्दया कैसा । कां वचन भंगिसी ऐसा ।
त्वत्स्वामित्वा संप्रति जी मिरवीते । भिउनि त्या आंग्लभूमीतें ।
मन्मातेला अबल म्हणुनि फसवीसी । मज विवासनातें नेसी ॥
जरि आंग्लभूमि-भयभीता ॥ रे ॥
अबला न माझि ही माता ॥ रे ॥
कथिल हें अगस्तिस आतां ॥ रे ॥
जो आचमनीं एक क्षणीं तुज प्याला । सागरा प्राण तळमळला ॥४॥

आपल्या प्रिय मातृभूमीचें दर्शन आपल्याला फिरून होईल कीं नाहीं अशा साशंक वृत्तीचा अंमल मनावर बसलेला असतांना निघालेले हे उद्गार करुणाजनक तर आहेतच; पण, त्या करुणाजनक उद्गारांतहि, मातृभूमीची सेवा करण्याचा कवीचा निर्धार व्यक्त झालेला आहे. अशा मनस्थितींतहि कवीला अगस्तीच्या समुद्रप्राशनाची पौराणिक कथा सहज आठवली हें पाहिलें म्हणजे कवीच्या स्वसंस्कृतिनिष्ठेबद्दल आदर वाटूं लागतो. या कवितेच्या पुष्कळशा चरणांत-विशेषतः कवितेच्या ध्रुपदांत-दीर्घ स्वरांचा भरणा भरपूर आहे. कवीच्या मनाची आर्त अवस्था व्यक्त करण्याला या भरण्याचें साहाय्य चांगलेंच होतें.

सावरकर ब्रायटनहून लंडनला परत आले त्या वेळीं धिंग्रा प्रकरणांतल्या सर्व घटना पुऱ्या झालेल्या नव्हत्या. शिल्लक राहिलेल्या घटनांकडे सावरकरांना पुष्कळच लक्ष द्यावें लागत होतें. पण, या घटनांशिवाय आणखीहि एका गोष्टीकडे लक्ष पुरविणें त्यांना या सुमारास प्राप्त झालें. १८५७ च्या स्वातंत्र्यसंग्रामाविषयींचा ग्रंथ सावरकरांनीं १९०८ मध्यें मराठींत लिहिला होता, हें यापूर्वींच सांगण्यांत आलें आहे. अनेक अडचणींना तोंड देऊन या मराठी पुस्तकाचें इंग्रजी भाषांतर मुद्रित करण्यांत आलें. १० मे १९०८ रोजीं भारतभवनांत जो उत्सव साजरा करण्यांत आला व त्या उत्सवाच्या निमित्तानें मागाहून जो क्षोभ उत्पन्न झाला त्यामुळें सरकारला सावरकरांनीं लिहिलेल्या या पुस्तकाची कुणकुण लागली होती. हें पुस्तक

मुखानें प्रकाशित होऊं द्यावयाचें नाहीं असें सरकारनें ठरविलें होतें. सरकारच्या या संकल्पाला न जुमानतां या पुस्तकाची प्रसिद्धि कशी करावयाची याचा विचार सावरकर व त्यांची मित्रमंडळी यांनींहि ठरविला होता. अशा धांवपळींत चाललेलें या पुस्तकाच्या मुद्रणाचें काम संपत आल्याची वार्ता या सुमारास हिंदुस्थानसरकार-पर्यंत येऊन पोंचली असावी. कारण, या बाबतींत हिंदुस्थान सरकारनें जो एक खास हुकुम काढिला त्याची माहिती ' मराठा ' पत्राच्या दि. १ ऑगस्ट १९०९च्या अंकांत दिलेली आढळते. हा हुकुम ' सी कस्टम्स ॲक्ट ' च्या १९ व्या कलमान्वयें काढण्यांत आलेला असून, त्यांत असें म्हटलें आहे कीं,श्री.वि.दा. सावरकर यांनीं बंडासंबंधीं लिहिलेल्या मराठी पुस्तकाची प्रत किंवा त्याच्या इंग्रजी भाषांतराची प्रत हिंदुस्थानांत आणणें मना करण्यांत आलेलें आहे. १९०९ च्या जुलैअखेर निघालेल्या या सरकारी हुकुमाला उत्तर म्हणून सावरकरांनीं ऑगस्टमध्यें लंडनहून धाडलेलें एक पत्र ' काळ ' पत्रांत १९०९ च्या सप्टेंबर महिन्यांत प्रसिद्ध झालें.[1] या हुकुमांत माझ्या नांवाशीं पुस्तकाचा संबंध जोडलेला असला तरी, या अजात पुस्तकाशीं अगर तशा स्वरूपाच्या कोणत्याहि पुस्तकाशीं माझ्या नांवाचा अर्थाअर्थी कांहींहि संबंध नाहीं, असें सावरकरांनीं या पत्राच्या द्वारा जगजाहीर करून टाकिलें. अप्रकाशित असलेल्या पुस्तकावर राजद्रोहीपणाचा आरोप ठेवणें कितपत न्याय्य आहे, एकाद्या आक्षिप्त पुस्तकाशीं एकाद्या व्यक्तीचें नांव निगडित करण्यापूर्वी, ग्रंथकर्तृत्व खरोखर कोणाचें आहे याची चौकशी करणें सरकारचें कर्तव्य आहे, वगैरे अनेक मुद्दे सावरकरांनीं या पत्रांत उपस्थित केलेले आहेत. हिंदुस्थानसरकारनें काढलेल्या हुकुमांत पुस्तकाचें जें नांव दिलें होतें तें मुद्रित पुस्तकाच्या नांवाहून भिन्न असल्यामुळें, सावरकर यांना सरकारी हुकुमाविरुद्ध हे आक्षेप घेतां आले.

१९०६ च्या अखेरीपूर्वींच सावरकरांनीं लंडन येथें मॅझिनीवरील मराठी पुस्तक लिहून पुरें केलें व त्याचें हस्तलिखित आपल्या थोरल्या बंधूकडे धाडून दिलें. या पुस्तकाच्या कामांतून मोकळे झाल्याबरोबर सावरकर १८५७ च्या स्वातंत्र्य-युद्धासंबंधींच्या ग्रंथाची तयारी जोरानें करूं लागले. इंडिया ऑफिसच्या लायब्ररींत असलेले अनेक महत्त्वाचे ग्रंथ परिश्रमपूर्वक वाचून, टांचणें करून, ग्रंथाची सुसंगत जुळणी करून, तो लिहून काढण्याचें काम बरेंच श्रमाचें होतें व या कामाला वेळहि बराच लागला. १० मे १९०८ रोजीं भारतभवनांत १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्धाचा स्मृतिदिन मोठ्या प्रमाणावर साजरा करण्यांत आला; त्या सुमारास या ग्रंथाचें मराठी हस्तलिखित पुरें झालें असावें. ' मॅझिनी ' प्रमाणेंच हेंहि पुस्तक मराठींत प्रसिद्ध करण्याचा सावरकरांचा मूळचा संकल्प असल्यामुळें, हस्तलिखित तयार झाल्याबरोबर तें श्री. गणेशपंत सावरकर यांजकडे धाडून देण्यांत आलें. त्यांनीं तें छापण्यासाठीं म्हणून सोलापूरच्या एका मुद्रणालयाकडे धाडलें. सरकार या हस्त-

1 लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १५६—५७.

लिखिताच्या शोधांत आहे व मुद्रणालयाची झडती होण्याचा संभव आहे हें ओळखून, मुद्रणालयाच्या व्यवस्थापकांनीं हस्तलिखित परत केलें. हिंदुस्थानांतून हें हस्तलिखित सुरक्षितपणें फिरून विनायकराव सावरकरांच्या हातीं आलें. तेव्हांपासून, हें पुस्तक मुद्रित कसें करावें, हा प्रश्न सावरकरांच्या पुढें होता.

हें पुस्तक इंग्लंडमधल्या एकाद्या मुद्रणालयांत छापून घेण्याची कल्पना सर्वस्वी अव्यवहार्यच होती. फ्रान्स, जर्मनी वगैरे देशांतून मुद्रणाचें काम करून व्यवहाचें तर देवनागरी टाइपाचा अभाव ही फार मोठी अडचण होती. टाइप पाडून घेण्यापासून सगळा खटाटोप करण्याला एकादा मुद्रक तयार झाला तरी, या टाइपांत जुळणी करण्याचें ज्ञानहि त्या देशांत कोणाला नव्हतें ! या सर्व अडचणींचा परिहार म्हणून मूळचें मराठी पुस्तक इंग्रजींत भाषांतरित करण्याचें ठरलें. श्री. वामनराव फडके, व श्री. कोरेगांवकर, या महाराष्ट्रीय तरुणांनीं हें काम अंगावर घेतलें. भाषांतराचें काम सुरू होतांच मुद्रणासाठीं लागणाऱ्या द्रव्याची योजना काय करावी हा प्रश्न सावरकरांच्या पुढें उभा राहिला. हें काम सावरकरांनीं कसें केलें याचें वर्णन श्री. तिरुमलाचार्य यांनीं आपल्या आठवणींत पुढील शब्दांत[1] केलें आहे :

At last Savarkar collected sufficient money to start printing this historical work Many of the students who did not sympathise with his views of independence or even were afraid of associating with him were willing to contribute funds for the publication I do not know if some Government scholars or even high officials did not subscribe for a copy of the book. Savarkar knew to approach them and induce them to subscribe.

( शेवटीं या ऐतिहासिक पुस्तकाच्या मुद्रणाचें काम सुरू करण्याला पुरेसे पैसे सावरकरांनीं गोळा केले. पुष्कळसे हिंदी विद्यार्थी असे होते कीं, ज्यांना सावरकरांच्या स्वातंत्र्यवादाबद्दल सहानुभूति नव्हती अथवा जे सावरकरांच्या साध्या सहवासालाहि भीत असत.पण,असे विद्यार्थीसुद्धां या पुस्तकाच्या प्रकाशनासाठीं पैसे देण्याला तयार झाले. सरकारी शिष्यवृत्ति मिळवीत असलेले कांहीं विद्यार्थी–इतकेंच काय, कांहीं बडे सरकारी नोकर–यांनींहि आगाऊ पैसे देऊन पुस्तकाची प्रत मिळण्याची व्यवस्था केली कीं काय, न कळे ! अशा मंडळींना गांठावें कसें व गटवावें कसें हें शास्त्र सावरकरांना चांगलें माहीत होतें. ) १९०८ सालच्या अखेरीपर्यंत इंग्लंडांत असलेले श्री. दादासाहेब करंदीकर आणि दादासाहेब खापर्डे यांनींहि या पुस्तकाच्या मुद्रणासाठीं कांहीं रक्कम दिली होती. यावरून असा निष्कर्ष निघतो कीं १९०८ च्या शेवटपर्यंत पैसे जमाविण्याचें काम चालू होतें.

मुद्रणासाठीं अवश्य असणाऱ्या द्रव्याची योजना झाली तरी तेवढयानें कांहीं साऱ्या अडचणी मिटण्यासारख्या नव्हत्या. किंबहुना असेंहि म्हणतां येईल कीं, खऱ्या अडचणी यानंतरच यावयाच्या होत्या. असलें पुस्तक मुद्रित करण्याला

1 Marhatta : 3-9-1937

इंग्लंडांतलें एकादें मुद्रणालय सिद्ध होईल ही गोष्ट कल्पनातीतच होती. बाहेर देशांतल्या एखाद्या मुद्रणालयानें हें काम अंगावर घेतलें तरी या बाबतींत करावयाच्या करारावर कोणाची तरी स्वाक्षरी होणें अवश्य होतें. स्वाक्षरीचा प्रश्न निघाला म्हणजे प्रत्येकाला अशी धास्ती वाटे कीं, या प्रकरणीं आपण गुंतलों तर गुप्तपोलिसामार्फत ही गोष्ट सरकारपर्यंत जाऊन पोंचेल व आपल्या परीक्षेचें अगर भावी आयुष्यांतल्या उत्कर्षाचें त्यामुळें मातेरें होईल. शेवटीं हें पुस्तक इंग्लंडबाहेरून कोठून तरी मुद्रित करून आणण्याची तयारी झाली. अशा बाबतींत अडत्याचें काम करणाऱ्या एका जर्मनानें हें काम अंगावर घेतलें. या अडत्यानें पुस्तकाचें हस्तलिखित एका वकिलाला दाखविलें. 'असलीं पुस्तकें छापणारी फर्म असा आमच्या फर्मचा दुर्लौकिक झाला तर आमचा धंदा रसातळाला जाईल' असें सांगत हा अडत्या परत आला. पण, एका अर्थी कुचराई करणाऱ्या या माणसानें एक गोष्ट तरी चांगली केली. हॉलंडमधल्या एका मुद्रणालयाच्या मालकाची व हिंदी क्रांतिकारकांची त्यानें गांठ घालून दिली व अशा रीतीनें या पुस्तकाच्या छपाईचें काम शेवटीं हॉलंडमध्यें सुरू झालें.[1] या छापखान्यांतून येणारीं मुद्रितें तपासण्याचें पुष्कळसें काम श्री. वर्मा व आचार्य यांनीं केलें-पण,या सर्व घालमेलीकडे पोलिखात्याचें चांगलेंच लक्ष असल्यामुळें व हें पुस्तक किती ज्वालाग्राही असेल याची त्यांना उत्तम कल्पना असल्यामुळें, या पुस्तकाचा प्रसार हिंदी लोकांत होऊं नये यासाठीं कडेकोट बंदोबस्त करण्याचा उद्योग त्यांनीं सुरू केला. १९०९ सालीं जुलै महिन्याच्या शेवटींशेवटीं हिंदुस्थानसरकारनें काढलेला विशेष हुकूम हा या बंदोबस्तांतलाच एक भाग होता.

हीं पुस्तकें इंग्लंडमध्यें आलीं तरी सरकार विशेष कांहीं करणार नाहीं अशी वेडी आशा कित्येकांच्या मनांत नांदत होती. पण, १५० प्रतींचा एक गठ्ठा मालकाला मिळण्याच्या ऐन वेळींच पोलिसांनीं हस्तगत केल्यामुळें, ही आशा नष्ट झाली व या पुस्तकाचा प्रसार करावयाचा तर तो अन्य मार्गानें केला पाहिजे असें दिसूं लागलें. या पुस्तकाच्या कित्येक प्रती पुढें पॅरिसमार्गें पॉंदिचरी व तिनेवेल्ली येथें धाडण्यांत आल्या[2] व नंतर या पुस्तकाच्या प्रती हळुहळू बंगाल, पंजाब, आंध्र वगैरे भागांत प्रसरल्या. या पुस्तकाच्या प्रती हिंदुस्थानांत धाडण्याची आणखीहि एक युक्ति शोधून काढण्यांत आली. 'पिक्विक पेपर्स', 'वेव्हर्ले' अशा लोकप्रिय कादंबऱ्या, शेक्सपियरचीं शोकान्त नाटकें इत्यादि पुस्तकांच्या मुद्दाम छापून घेतलेल्या सुंदर

---

१ श्री. आचार्य यांनीं प्रसिद्ध केलेल्या हकीकतीच्या आधारें ही माहिती दिली आहे. श्री. ग्यानचंद वर्मा यांचें स्मरण असें होतें कीं, या पुस्तकाच्या छपाईचें काम स्वित्झर्लंडमध्यें झालें.

२ श्री. स्वामी शुद्धानंद भारतीयार यांनीं धाडिलेल्या व्ही. व्ही. एस्. अय्यर यांच्या आठवणी.

पुढ्यांत हीं पुस्तकें पक्केपणीं वेष्टून तीं हिंदुस्थानांत जाणाऱ्या अनेक लोकांबरोबर धाडून देण्यांत आलीं. अशीं कांहीं पुस्तकें पंजाबचे दिवंगत पंतप्रधान सर शिकंदर हयातखान यांच्या सामानांतूनहि पुढें हिंदुस्थानांत सुरक्षितपणें आलीं, अशी माहिती मिळते.

भारतीय क्रांतिकारक पक्षांतल्या प्रमुखांनीं या पुस्तकाला ' सशस्त्र क्रांतीच्या तत्त्वज्ञानाची गीता ' मानिली आहे. 'गदर' पत्र सुरू करण्याच्या विचारांत असलेल्या लाला हरदयाळजींनीं दि. १४-५-१९१२ रोजीं राणाजींना लिहिलेल्या पत्रांत या पुस्तकाच्या दोन प्रती तरी धाडून देण्याबद्दलचा आग्रह केला आहे याचें कारणच असें कीं, अमेरिकेंत असलेल्या हिंदु-शीख रहिवाश्यांना क्रांतिमंत्राची दीक्षा देण्याला या पुस्तकांतल्या उताऱ्यांचा नामी उपयोग होईल, अशी हरदयाळजींची बालंबाल खात्री होती. हरदयाळजी या पत्रांत लिहितात :

We have formed here a 'Friends of India Association' of American sympathisers with the cause. So kindly ask Mme. Cama to send me as much literature as she can spare and also at least two volumes of Savarkar's book

( भारतमित्र संघ ही संस्था आम्हीं येथें स्थापिली आहे. भारतीय स्वातंत्र्यवादी पक्षाशीं सहानुभूति बाळगणाऱ्या अमेरिकन लोकांचा या संस्थेंत समावेश करण्यांत आलेला आहे. म्हणून, कामाबाईंना माझा एक निरोप सांगण्याची कृपा करा. धाडतां येईल तितकें प्रचारवाङ्मय व सावरकरांच्या ग्रंथाच्या किमान दोन प्रती एवढें त्यांनीं पाठवून द्यावें). या पुस्तकांतला शब्द नि शब्द क्रांतिगर्भ असल्यामुळेंच, अमेरिकेंतल्या हिंदी रहिवाश्यांपैकीं कित्येकांनीं या पुस्तकाची दुर्मिळ प्रत मिळावी म्हणून १००-१५० रुपयेहि खर्च करण्याला मागेंपुढें पाहिलें नाहीं ! या पुस्तकांत असलेलें हें सामर्थ्य समजून आल्यामुळेंच, श्री. भगतसिंगजींनीं १९२७-२८ च्या सुमारास या ग्रंथाचें पुनमुद्रण करून घेतलें. सर व्हॅलेन्टाईन चिरोल यांनीं या पुस्तकाचा अंतर्भाव 'ज्वालाग्राही वाङ्मय' या वर्णनाच्या लेखनांत केला असून, या पुस्तकाला पुढील प्रशस्तिपत्र[१] दिलें आहे :

A very remarkable history of the mutiny combining considerable research with the grossest perversion of facts and great literary power with the most savage hatred.

( बंडाचा इतिहास म्हणून हें पुस्तक चांगलेंच लक्षांत ठेवण्याजोगें आहे. भरपूर संशोधन व वस्तुस्थितीचा कमालीचा विपर्यास यांचा मिलाफ या पुस्तकांत झालेला आहे. त्याप्रमाणेंच, श्रेष्ठ दर्जाची साहित्यिक शक्ति व अगदीं रानटी तऱ्हेचा द्वेषभाव यांचेंहि या पुस्तकांत मिश्रण झालेलें आहे ). श्री. राजगोपाळाचारियर यांच्यासारखा सावरकर-तत्त्वज्ञान-पराङ्मुख असणारा मुत्सद्दीहि असें

---

१ Indian Unrest : P. 149.

उघडपणें सांगतो कीं, आपल्या राजकारणी स्फूर्तीचा उगम या ग्रंथाशीं जाऊन भिडलेला आहे ! दुर्मिळ झालेलें हें पुस्तक सर चार्लस क्लीव्हलंडजवळून मागून घेऊन तें वाचण्याचा मोह मरहूम मौलाना महंमदअल्लींना अनावर झाला, अशी माहिती बॅ. असफअल्ली यांनीं आपल्या आठवणींत नमूद करून ठेविली आहे.[१] जन्मापूर्वीपासूनच प्रतिपक्षाला ज्या पुस्तकांतल्या तेजस्वितेचा दरारा वाटला व आज ३४–३५ वर्षें लोटलीं तरीहि प्रतिपक्षाच्या मनांतली ज्या पुस्तकाविषयींची भीति मावळली नाहीं त्या पुस्तकाचा प्रत्यक्ष परिचय आजच्या समाजाला करून घेतां येत नाहीं, हें दुर्दैव होय.[२]

धिंग्रा प्रकरणापासून लंडनमधील हिंदी विद्यार्थी व हिंदी नागरिक यांच्या उघड सभा किंवा चळवळी दडपल्या गेल्या. ' इंडिया हाउस ' सारखें उघड केंद्रहि बंद झालें. 'अभिनव भारता'च्या गुप्त संस्थेला या बाहेरील उघड चळवळींचा व्याप फारच उपयुक्त वाटे. वास्तव नि सामान्य हिंदी वर्गाला पुन्हां धीर चढावा म्हणून कांहीं ना कांहीं निमित्त काढून कोणत्या तरी प्रसंगीं या लोकांना एकत्र आणणें व त्यांचा उत्साह टिकवून धरणें सावरकरांना अवश्य वाटूं लागलें. स्वरूपतः निरुपद्रवी पण अर्थतः उत्साहदायक असणारा विजयादशमीचा दिवस जवळ येत आहे असें पाहून, सावरकरांनीं तो मोठ्या थाटानें साजरा करण्याचें ठरविलें व आपल्या सहकाऱ्यांसह ते या प्रसंगाच्या तयारीला लागले. या प्रसंगीं क्वीन्सरोड हॉलमध्यें मेजवानी, व्याख्यानें वगैरे कार्यक्रम साजरा झाला. त्याची वर्गणी तीन रुपये ठेवण्यांत आली असूनहि, त्याला शंभरहून जास्त हिंदी स्त्री-पुरुष उपस्थित होते. समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याला बड्या हिंदी मंडळींपैकीं कोणी तयार होईना. बॅ. मोहनदास करमचंद गांधी हे त्या सुमारास दक्षिण आफ्रिकेंतून इंग्लंडांत आलेले होते. त्यांना या बाबतींत विचारून पहावें असें सुचविण्यांत आल्यावर कांहीं मंडळींनीं त्यांची भेट घेतली. या भेटींत धिंग्राप्रकरणाची बरीच चर्चा झाली. सभेचे व्यवस्थापक व गांधी या दोन पक्षांपैकीं कोणत्याहि पक्षानें धिंग्रा प्रकरणीं भलेंबुरें कांहींच बोलूं नये अशी तडजोड ठरल्यावर, गांधीजी या सभेचें अध्यक्षपद स्वीकारावयास तयार झाले.

समारंभाच्या सुरुवातीस गांधींनीं जें भाषण केलें त्यांत ते म्हणाले : समारंभांतलि सर्व कामें प्रोफेसर, डॉक्टर वगैरे दर्जाच्या स्वयंसेवकांनीं केलेलीं पाहून, आमच्या लोकांत वाढत चाललेल्या लोकसेवा-तत्परतेची एक प्रचीतीच मला मिळाली. लंडनमध्यें असला समारंभ होत असेल हें मला यापूर्वीं खरेंहि वाटलें नसतें. हा समारंभ हिंदु असूनहि, मुसलमान, पारशी वगैरे देशबंधूहि येथें प्रेमानें येतात हें ध्यानांत घेण्यासारखें आहे. श्रीरामाचे सद्गुण आपल्या राष्ट्रांत पुन्हां उतरतील तर आपल्या उन्नतीला वेळ लागणार नाहीं. गांधीजींचे सहकारी अल्ली हझीझ यांनींहि या सभेंत

---

१ Life of Savarkar by Chitragupta : P. 180.

२ सदर पुस्तकावरील बंदी सन १९४६ मध्यें सरकारनें परत घेतली आहे.

मातृभूला पुष्पांजलि अर्पण केली. सावरकरांनीं श्रीरामचंद्रास पुष्पांजलि अर्पण करावी व भाषण करावें असें सुचवितांना गांधीजी म्हणाले :

*काहीं मतभिन्नता असली तरी मला दे. सावरकरांसन्निध बसण्याची संधि मिळाली याबद्दल अभिमान वाटत आहे. त्यांच्या स्वार्थत्यागाचीं व देशभक्तीचीं मधुर फळें आपल्या देशाला चिरकाल लाभोत.*

सावरकरांनीं आपल्या भाषणांत भारतभूच्या वैभवकाळाचें वर्णन केलें. ते म्हणाले :

*त्या काळांत कालिदास कविता करीत, गौतम उपदेश देत, विक्रम सिथियनांना व चंद्रगुप्त ग्रीक लोकांना जिंकीत, राम राज्य करीत व वाल्मीकि वीरकाव्य गात.*

श्रीरामचरित्राचें विवेचन करतांना सावरकर म्हणाले :

*जेव्हां रामचंद्र वरवर आपल्या पित्याच्या वचनासाठीं पण मुख्यतः रक्षःक्षयासाठीं राज्य सोडून वनवासांत शिरले तेव्हां त्यांचें तें कृत्य महत् होतें. रामचंद्रांनीं लंकेवर चाल केली व अपरिहार्य व धर्म्य युद्धाला सज्ज होऊन रावणाला मारलें तेव्हां त्यांचें तें कृत्य महत्तर होतें. परंतु, जेव्हां शुद्धीनंतरहि सीतेला 'आराधनाय लोकस्य मुंचतो नास्ति मे व्यथा' असें म्हणून वनांत सोडून दिली, तेव्हां त्यांचें तें अवतारकृत्य महत्तम होतें. रामाचें अवतारकृत्य व श्रीरामाची मूर्ति जोंपर्यंत तुम्ही दृढतेनें हृदयांत धराल तोंपर्यंत हिंदूंनो, तुमची अवनति सहज नष्ट होण्याची आशा आहे. श्रीराम जोंपर्यंत हिंदुस्थानांत आहे तोंपर्यंत हिंदुस्थानची उन्नति सहजलब्ध राहणारी आहे. श्रीरामाचा विसर पडला कीं हिंदुस्थानांतला राम नाहींसा झाला. हिंदु हिंदुस्थानचें हृदय आहे. तथापि, इंद्रधनुष्यांत जसें खरें सौंदर्य रंगांच्या अनेकतेनें न बिघडतां तें अधिकच खुलतें तसेंच मुसलमान, पारशी, यहुदी वगैरे जगांतील सर्व सुधारणांचे उत्तमांश मिसळून घेऊन हिंदुस्थानहि कालाच्या आकाशांत अधिकच खुलेल.*[1]

सावरकरांच्या या उद्दीपक भाषणानंतर गांधीजी समारोपादाखल थोडें बोलले. वध्य रावण आपल्या अंतःकरणांत आहे[2] वगैरे कांहीं मुद्दे त्यांनीं मांडले हें खरें असले तरी, खरें स्फूर्तिदायक वक्तृत्व काय असतें याचा अनुभव आज आपण घेतला, हेंहि त्यांनीं कबूल केलें.

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. १६०–६१.

२ जगांतलीं कोणी माणसें आपलीं शत्रू म्हणून वध्य नसून, आपल्या मनांतील पापवासना वध्य होत, असा गांधीजींच्या म्हणण्याचा आशय असावा.

विजयादशमीचा समारंभ व मेजवानी यांचा हिंदी लोकांचा उत्साह टिकण्याच्या दृष्टीनें योग्य उपयोग झाला. दि. १४-१०-१९०९ रोजीं हा समारंभ झाल्यावर थोडक्याच दिवसांनीं पंजाबी देशभगिनी धनदेवी यांनीं लंडनमधील हिंदी लोकांना मेजवानी देण्याचा संकल्प जाहीर केला. ही मेजवानी शेवटीं दिवाळीच्या सणा-निमित्त देण्यांत आली. मेरीलिबोर्न स्कूल या विद्यालयांत ही मेजवानी देण्याचें ठरून या जागेला लतापल्लवादिकांनीं शोभा आणण्याचें काम सावरकरांच्या प्रभावळी-तल्या तरुणांवर आलें. १८५७ च्या स्मृतिदिनासाठीं ज्या विजयपताका तयार करण्यांत आल्या होत्या त्या या प्रसंगीं लावावयाच्या व विद्यालयाच्या आवारांत असलेलें 'यूनियन जॅक' काढून टाकावयाचें असा आग्रह कित्येक मंडळी धरूं लागली. दुसऱ्याच्या जागेंत आपल्याला समारंभ करावयाचा आहे तर त्यांनीं लाविलेलें 'यूनि-यन जॅक' काढून टाकण्याचा आग्रह धरणें गैर दिसेल; 'यूनियन जॅक' असूं द्या; पण, आपल्या विजयपताका अवश्य लावा, अशी तडजोड सावरकरांनीं सुचविल्यावर ती सर्वमान्य झाली. या तडजोडीनंतर जो समारंभ झाला त्यांत बिपिनचंद्र पाल-प्रभृति वक्त्यांनीं आपल्या भाषणांत या विजयपताकांवर तोंडसुख घेतलेंच! ही तरुण मंडळी १८५७ च्या उत्थापनाचा राष्ट्रीय स्वातंत्र्यार्थ झालेलें युद्ध असा जो अर्थ लावितात तो आपल्याला संमत नसल्याचें पालबाबूंनीं या प्रसंगीं सांगितलें !

इकडे ही मंडळी लंडनमध्यें दिवाळीचा सण अशा रीतीनें साजरा करीत आहे तों तिकडे हिंदुस्थानांत ऐन दिवाळीच्या गर्दींतच एक विलक्षण घटना घडून आली. दडपशाहीनें असंतोषाचा नायनाट करण्याच्या सरकारी धोरणाला यश आलें आहे अशी सरकारी अधिकाऱ्यांची समजूत झाल्याकारणानें त्यांनीं व्हाइसरॉय लॉर्ड मिंटो यांच्या दौऱ्याचा कार्यक्रम आंखला. मुक्काम करण्याच्या दृष्टीनें हिंदी संस्थानें अधिक सुरक्षित असल्यामुळें, व्हाइसरॉयसाहेबांनीं राजपुतान्यांतील संस्थानांत बरेच दिवस काढले. गुजराथमध्यें जहाल राजकारण फारसें रुजलेलें नसल्यामुळें, गुजराथ-मधील प्रमुख नगर अहमदाबाद येथें मुक्काम करून व्हाइसरॉयसाहेबांची स्वारी बडोदा शहरीं गायकवाडांचें आदरातिथ्य स्वीकारण्यास जावयाची होती. खुद्द गुजराथेंत जहाल राजकारण नसलें तरी पुण्यामुंबईकडील उपद्व्यापी मंडळी अहमदा-बादेस येऊन कांहीं करतील अशी धास्ती अधिकाऱ्यांना वाटत होती. बडोद्याची कांहीं मंडळी व पुण्याकडील व नाशिककडील कांहीं मंडळी यांनीं चाल-विलेली 'अभिनव भारता' ची शाखा बडोद्यास असल्यामुळें,सरकारी गोटांत वाटणारी ही भीति यथार्थच होती. बडोद्याच्या गंगनाथ भारतीय विद्यालयाशीं संबंध असलेली पुष्कळ प्रमुख मंडळी अभिनव भारत संस्थेंत सामील झालेली आहे हें सरकारला विदित असल्यामुळें, हा बंदोबस्त करण्यांत आला असावा. व्हाइसरॉय अहमदा-बादेस येण्याआधीं ७-८ दिवस मुंबई-पुण्याकडील गुप्त पोलिसखात्यांतले अधिकारी अहमदाबादेस तळ देऊन बसले होते व त्यांना जीं माणसें उपद्व्यापी वाटत होतीं

त्यांच्यावर त्यांची नजरहि होती. याच दौऱ्यांत व्हॉइसरॉयसाहेब मुंबईस येतलि तेव्हां त्यांच्यासाठीं बॉम्ब तयार करण्याची योजना ब्रह्मगिरीबुवाप्रभृति मंडळी आंखीत होती, अशी हकीकत पुढें नाशिक कटाच्या खटल्यांत बाहेर आली; तिचा विचार केला तर, अहमदाबाद येथील व्हॉइसरॉयसाहेबांच्या मुक्कामांतहि कांहीं अनिष्ट प्रकार घडूं शकेल असें हेरून, अधिकाऱ्यांनीं जी दक्षता दाखविली ती अस्थानीं होती, असें म्हणतां येत नाहीं.

पण, गुप्त पोलिसांनीं इतका बंदोबस्त ठेविला असूनहि, शेवटीं जें व्हावयाचें तें झालेंच ! दि. १३-११-१९०९ रोजीं बडे लाट अहमदाबादच्या राजरस्त्यांतून मिरवत चालले होते त्या वेळीं कांहीं तरी पदार्थ त्यांच्यावर फेकण्यांत आला. पुढें ज्या बॉम्बच्या स्फोटामुळें अहमदाबादचे म्युनिसिपालिटीच्या नोकरींत असलेला एक भंगी जखमी झाला तो बॉम्ब व्हॉइसरॉयवर फेकण्यांत आला होता कीं काय, व्हॉइसरॉयवर खरोखर बॉम्ब फेकला तरी होता कीं नाहीं इत्यादि प्रश्न केव्हांच समाधानकारक रीतीनें सुटले नाहींत हें खरें असलें तरी, घडलेल्या प्रकाराचा फायदा घेऊन पोलिसांनीं धरपकडीला मात्र जोरांत प्रारंभ केला. या वेळीं सावरकर, या नुस्त्या नांवाचीहि सरकारला विशेष धास्ती वाटत असल्यामुळें, विनायकरावांचे धाकटे बंधु नारायणराव यांच्यावर अटकेंत पडण्याचा प्रसंग आला ! या सुमारासच म्हणजे दिनांक २१–११–१९०९ रोजीं गणेशपंत सावरकरांना झालेली जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा हायकोर्टाच्या न्यायाधीशांनीं अपिलांत कायम केली. या सर्व प्रकारांमुळें वहिनींना फारच क्लेश होऊं लागले. अशा असहाय स्थितींत सांपडल्या-मुळें, वहिनींनीं विनायकरावांना जें पत्र लिहिलें त्याचें त्यांच्याकडून गेलेलें ओंवीबद्ध उत्तर प्रसिद्ध आहे. 'सांत्वन' या नांवानें प्रसिद्ध असलेली सावरकरांची ही कविता १९०९ सालच्या डिसेंबरांत लंडन येथें लिहिलेली असावी. वहिनींसारख्या भाविक, अल्पशिक्षित स्त्रीला हें कविताबद्ध पत्र लिहावयाचें असल्यामुळें या पत्रांत स्त्री-परि-चित असा ओवीछंद वापरला आहे, व श्रीधर-महीपति इत्यादि महाराष्ट्रीय संतांच्या लेखनांतून स्त्रियांना परिचित झालेले पौराणिक दाखलेच या कवनांत प्रामुख्यानें दिलेले आहेत; वहिनींच्या अंगीं असलेल्या श्रेष्ठ गुणांचे उत्कटत्वानें केलेले उल्लेख व लेखकाच्या वृत्तींत बाणलेल्या गुणांची अस्फुट सूचना हे या कवनाचे विशेष आहेत.

## सांत्वन

जयासि तुवां प्रतिपाळिलें । मातेचें स्मरण होऊं न दिलें ॥
श्रीमती वाहिनी वत्सले । बंधु तुझा तो तुज नमी ॥ १ ॥
आशिर्वाद पत्र पावलें । जें लिहिलें तें ध्यानीं आलें ॥
मानस प्रमुदित झालें । धन्यता वाटली उदंड ॥ २ ॥

२

धन्य धन्य आपुला वंश । सुनिश्चयें ईश्वरी अंश ॥
कीं रामसेवा पुण्यलेश । आपुल्या भाग्यीं लाधला ॥ ३ ॥
अनेक फुलें फुलती । फुलोनिया सुकोनि जाती ॥
कोणी त्यांची महती गणती । ठेविली असे ॥ ४ ॥
परी जें गजेंद्रशुंडेनें उपटिलें । श्रीहरीसाठीं मेलें ॥
कमलफूल तें अमर झालें । मोक्षदायी पावन ॥ ५ ॥
त्या पुण्य गजेंद्रासमची । मुमुक्षु स्थिति भारतीची ।
करुणारवें ती याची । इंदीवर शामा श्रीरामा ॥ ६ ॥
स्वोद्यानीं तिनें यावें । आपुल्या फुलास भुलावें ॥
खुडोनियां अर्पण करावें । श्रीरामचरणां ॥ ७ ॥
धन्य धन्य आपुला वंश । सुनिश्चयें ईश्वरी अंश ।
श्रीरामसेवा पुण्य लेश । आपुल्या भाग्यीं लाधला ॥ ८ ॥

३

अशींच सर्व फुलें खुडावीं । श्रीरामचरणीं अर्पण व्हावीं ।
काहीं सार्थकता घडावी । या नश्वर देहाची ॥ ९ ॥
अमर होय ती वंशलता । निर्वंश जीचा देवाकरितां ।
दिगंतीं पसरे सुगंधिता । लोकहितपरिमलाची ॥ १० ॥
सुकुमार आमुच्या अनंत फुलां । गुंफोनि करा हो सुमनमाला ॥
नवरात्रींच्या नवकाला । मातृभूमी वत्सले ॥ ११ ॥
एकदां नवरात्र संपली । नवमाला पूर्ण झाली ।
कुलदेवी प्रकटेल काली । विजयालक्ष्मी पावन ॥ १२ ॥

४

तूं धैर्याची असमी मूर्ति । माझे वहिनी माझे स्फूर्ति ।
रामसेवाव्रताची पूर्ति । ब्रीद तुझें आधींच ॥ १३ ॥
महत्कार्याचें कंकण धरिलें । आतां महत्तमत्व पाहिजे बाणलें ।
ऐसें वर्तन पाहिजे केलें । कीं जें पसंत पडलें संतांना ॥ १४ ॥
अनेक पूर्वज ऋषीश्वर । अज्ञात वंशजांचे संभार ।
साधु साधु गर्जतील । ऐसें वर्तणें या काला ॥ १५ ॥

वहिनींचें अशा प्रकारें सांत्वन करून, कौटुंबिक संकटांचीं तीक्ष्ण टोकें बोथट बनविणें हें विनायकरावांचें या सुमाराचें अपरिहार्य कर्तव्यच होतें. कारण, त्यांनीं व

त्यांच्या सहकाऱ्यांनीं प्रतिपक्षाला संत्रस्त करण्यासाठीं जे डाव टाकले होते ते उलटून टाकण्याचा व उधळून लावण्याचा पराकाष्ठेचा प्रयत्न या सुमारास ब्रिटिश सत्तेनें सुरू केला होता. भारतांतले संस्थानिक हे स्वकीयच असल्यामुळें, त्यांच्या कर्तृत्व-स्वातंत्र्यावर जीं बंधनें आहेत तीं सांभाळून का होईना, ते अखेरच्या प्रसंगीं भारतीय स्वातंत्र्याचे पाठिराखेच ठरतील, अशी श्रद्धा विनायकरावांच्या मनांत पूर्वीपासून असावी, असें दिसतें. जव्हारच्या संस्थानिकाला उद्देशून विनायकरावांनीं १९०६ सालीं एक कविता लिहिली होती हें यापूर्वीं सांगण्यांत आलें आहे. हिंदी संस्थानिक हे परिस्थितिशरण बनून सध्यां स्वत:ला इंग्लंडच्या राजाचे मांडलिक म्हणवीत असले तरी, आपली 'नृपाल' ही पदवी ईश्वरदत्त आहे हें लक्षांत ठेवून, संस्थानिकांनीं राघवाचें उद्बोधक, उत्तेजक व सांकेतिक चरित्र ध्यासिलें व अभ्यासिलें पाहिजे असें सांगून झाल्यावर, विनायकरावांनीं या संस्थानिकांपाशीं जें एकच एक मागणें मागितलें, तें पुढीलप्रमाणें आहे :

परंतु कीं आर्यवसुंधरा ही । माता नृपा आपुलि सुंदरा ही ॥
गेलें तिचें तें निज द्यावया तें । झटेन ह्या दे वचनासि मातें ॥

संस्थानिकांचे व भारतीय स्वातंत्र्यासाठीं झटणाऱ्या लोकांचे मनोमन संबंध नीट असतील तर संस्थानें हीं स्वकीय शक्तिकेंद्रें आहेत हा सिद्धान्त विनायकराव अलीकडे हिंदु संस्थानांना उद्देशून वारंवार उद्घोषित असतात. भारतीय मुसलमानांच्या व निजामासारख्या मुसलमान संस्थानिकांच्या इस्लामी व हिंदुविरोधी . मनोगतांचें उच्चारण व आचरण पूर्वीं सध्यांच्या इतक्या सातत्यानें व अट्टाहासानें होत नसल्यामुळें, सर्वच हिंदी संस्थानें हीं स्वकीय शक्तिकेंद्रें आहेत असें मानण्याचा विनायकरावांच्या मनाचा १९०९-१० च्या सुमारास रोख होता, असें समजण्यांत कोणतीच चूक होण्याचा संभव नाहीं. 'अभिनव भारता' चे बापटप्रभृति कार्यकर्ते १९०७ सालापासून लंडनमध्यें येणाऱ्या वा असणाऱ्या गायकवाडांसारख्या संस्थानिकांच्या गांठीभेटी घेत. त्या वेळीं या संस्थानिकांचें मनोगत ज्या प्रकारें व्यक्त होत असे तो प्रकारहि वरील समजुतीला पोषकच असावा. धिंग्रासारखा क्रांतिकारक जगता-वाचता तर, परीक्षा उत्तीर्ण झाल्याबरोबर त्याची एका हिंदु संस्थानांत चांगल्या पगारावर नेमणूक झाली असती. धिंग्रासारख्या जहाल क्रांतिकारकाला नोकरी देण्याचें अभिवचन एका संस्थानिकानें ज्या तत्परतेनें दिलें ती तत्परताहि संस्थानिकांविषयींची ममत्वबुद्धि वृद्धिंगत करणारीच होती. आयरिश लोकांनीं नेमबाजीचें शिक्षण कसें घ्यावें या विषयाची चर्चा करण्याच्या मिषानें सावरकरांनीं एका बातमीपत्रांत पुढील वाक्य[1] लिहिलें आहे.

---

१ लंडनचीं बातमीपत्रें : पृ. ४७.

*ज्या अर्थी आयर्लंडमध्यें* **सशस्त्र संस्थानें नाहींत** *त्या अर्थी तरुण लोकांनीं अमेरिकेंत जाऊन नेम मारण्यास शिकावें.*

या अवतरणांतले जाड ठशांतले शब्द द्व्यर्थी असून, ते शब्द वाचणाऱ्या मराठी वाचकांचें लक्ष हिंदी संस्थानांकडे वळावें असा लेखकाचा अभिप्राय असला पाहिजे असा प्रस्तुत लेखकाचा तर्क आहे. नाशिक कटाची उभारणी करणाऱ्या तरुण मंडळींनीं भोंवतालच्या निजामहद्दीचा उपयोग किती व कसा करून घेतला होता हें यापुढील एक प्रकरण वाचीत असतांना वाचकांना तर्कानें समजूं शकेल.

सावरकरांची संस्थानांविषयींची वृत्ति कशीहि असो, १९०९ च्या शेवटीं-शेवटीं अशा कित्येक घटना घडूं लागल्या होत्या कीं, त्यांच्याकडे दुर्लक्ष करणें सावरकर-प्रभृति क्रांतिकारकांना अशक्य वाटूं लागलें. व्हाइसरॉयसाहेब दौऱ्यावर निघाले व राजपुतान्यांत शिरले. त्यापूर्वी तीनचार महिनेपर्यंत या बाबतींतल्या उलाढाली आंतल्या आंत शिजत होत्या. सरकारी गोटांतली माहिती मिळवून आपलें पुस्तक सजविणाऱ्या सर व्हॅलेंटाइन चिरोलनें या उलाढालींची सुरुवात नेमकी कोणत्या तारखेला झाली, हेंच सांगितलें आहे. Indian Unrest या पुस्तकांत ग्रंथकारानें पुढील मजकूर[१] लिहिला आहे :

On August 6, 1909, the Viceroy took the unusual step of communicating direct with all the principal ruling princes and chiefs of India on the subject of the active unrest prevalent in many parts of the country and invited an exchange of opinion, 'with a view to mutual co-operation against a common danger '

(दि. ६ ऑगस्ट १९०९ रोजीं व्हाइसरॉयसाहेबांनीं एक अपूर्व पायंडा पाडला. देशाच्या पुष्कळ भागांतून जो जागता असंतोष नांदत होता त्यासंबंधींचीं पत्रें सर्व प्रमुख राजेरजवाड्यांकडे धाडण्यांत आलीं. या असंतोषाचा धोका ब्रिटिश रियासत व संस्थानी रियासत या दोघांनाहि सारखाच तापदायक असल्यामुळे, त्याचा प्रतिकार करण्याच्या कामीं परस्पर सहकार्य कसें करतां येईल याविषयीं विचारविनिमय करण्याचें पाचारण या पत्रद्वारें देण्यांत आलें होतें.) बड्या लाटांकडून हें पत्र येतांच एकेका संस्थानिकाला कंठ कसा फुटूं लागला हेंहि चिरोलसाहेबांनीं विस्तारानें सांगितलें आहे. निजामानें लिहिलें[२]:

Once the forces of lawlessness and disorder are let loose, there is no knowing where they will stop. It is true that compared with the enormous population of India, the disaffected people are a very insignificant minority; but, given time and opportunity, there exists the danger of this small minority spreading its tentacles all over the country and inoculating with its poisonous doctrines the classes and masses hitherto untouched by this seditious movement.

(बेशिस्तपणाचे व बंडाळीचे हे प्रवाह एकदां मोकळे सुटले म्हणजे ते कुठवर

१ Pp. 190-191

२ Indian Unrest : Pp. 191-92.

जाऊन भिडतील, हें सांगतां येणार नाहीं. हिंदुस्थानांतली अफाट जनसंख्या पाहतां या प्रवाहांत सांपडलेल्या लोकांचें प्रमाण दुर्लक्ष करण्याइतकें अल्प आहे हें खरें; पण वेळ व संधि मिळाली तर, हा अल्पसंख्य वर्ग आपले पाश पसरील व आजपर्यंत ज्या वर्गांना व बहुसंख्य समूहाला या लाटेचा स्पर्श झालेला नाहीं, त्या वर्गांमध्येंहि या विषाचें आरोपण होईल, असा धोका आहे हें मात्र खरें !) ज्या धोरणामुळें संस्थानांच्या तिजोरीला फटका बसतो अशीं धोरणें हिंदुस्थान सरकार परस्पर आंखतें—त्या वेळीं आपल्याला एका शब्दानेंहि विचारण्यांत येत नाहीं—याबद्दल मनांतून रुष्ट असलेल्या संस्थानिकांना असें वाटूं लागलें कीं, आज ब्रिटिश सरकार एका बाबतींत आपला सल्ला विचारीत आहे; या वेळीं धोरणीपणानें वागून, सार्वभौम सरकारच्या सुरांत सूर मिसळून दिला तर आपलें महत्त्व कायमचेंच वाढून बसेल व प्रत्येक महत्त्वाचें धोरण ठरवितांना आपला सल्ला विचारला जावा, असा अग्रहहि आपल्याला हळुहळू धरतां येईल. स्वार्थाच्या या गळाला बिलगून ज्यांनीं साम्राज्य-सरकारच्या धोरणाचा पुरस्कार करण्याला सुरुवात केली त्यांत निजामाप्रमाणेंच उदेपूर, रतलाम वगैरे राजस्थानी संस्थानांचे नरेश, कोल्हापूरचे महाराज वगैरे हिंदु संस्थानिकहि होते. सार्वभौम सरकारच्या प्रेमाची ही जी सार्वत्रिक लागण झाली तिच्यांतून बडोदा नरेश कै. सयाजीराव महाराज हे मात्र शाबूत निभावले ! त्यांनींहि व्हाइसरॉयसाहेबांना आश्वासन दिलें; पण, नवें वारें दडपून टाकण्याच्या कामीं साम्राज्यसरकारला जी मदत द्यावयाची ती देतांना साम्राज्य सरकारच्या सयुक्तिक मागणीचाच आपण अनुकूल विचार करूं, असेंहि बजावण्याला ते चुकले नाहींत !

व्हॉइसरॉयसाहेबांनीं आपल्या दौऱ्यांत उदेपूर मुक्कामीं नोव्हेंबरच्या प्रारंभीं जें भाषण केलें त्यामुळें या विषयाची जाहीर चर्चा सुरू झाली. सार्वभौम सरकारच्या पंखाखालीं जाऊं पाहणाऱ्या या संस्थानिकांना एकवार मात्रेचे चार वळसे दिले पाहिजेत, असें लंडनमधील क्रांतिकारक तरुणांना वाटूं लागलें. व क्रांतिकारकांचें संस्थानिकांसंबंधींचें धोरण स्पष्ट करणारें Choose, O Indian Princes ! [ हिंदी संस्थानिकांनो, काय पत्करता सांगा ! ] हें पत्रक तयार करण्यांत येऊन त्याच्या शेंकडों छापील प्रती सर्वत्र प्रसृत करण्यांत आल्या. या समग्र पत्रकाची प्रत प्रस्तुत लेखकाला मिळूं शकली नाहीं. तथापि, चिरोलसाहेबांनीं 'Indian Unrest' या पुस्तकांत[1] या पत्रकांतील जे दोन उतारे अंशतः उद्धृत केले आहेत, त्यांच्या साहाय्यानें व श्री. इंदुलालजी याज्ञिक यांनीं पंडित शामजी कृष्णवर्मा यांच्या चरित्रांत या पत्रकांतला जो आणखी एक उतारा दिला आहे त्याच्या मदतीनें या पत्रकाची पुष्कळशी स्पष्ट कल्पना करून देणें बऱ्याच अंशीं शक्य आहे. संस्थानें व संस्थानिक यांची व्यवस्था स्वतंत्र भारतांत कशी करावयाची हें क्रांतिकारकांनीं

१ Pp 195-196.

अद्याप दोरीसूदपणानें ठरविलें नाहीं अशी प्रस्तावना केल्यावर, या पत्रकांत पुढील विचार व्यक्त करण्यांत आले आहेत :

No one but the voice of the Mother herself will and can determine when once She comes to Herself and stands free what constitution shall be adopted by Her for the guidance of Her life after the revolution is over...... Without going into details, we may mention this much that whether the head of the Imperial Government of the Indian Nation be a President or a King depends upon how the revolution develops itself... ...The Mother must be free, must be one and united, must make Her will supreme Then it may be that She gives out this Her will either wearing a kingly crown on Her head or a Republican mantle round Her sacred form.

( भारतमाता एकदां स्वत्वसंपन्न झाली व स्वतंत्रपणें नांदूं लागली कीं, क्रांत्युत्तर कालांत आपलें जविन कसें चालावें हें ठरविण्यासाठीं अवश्य असणारी घटना तिच्याच शब्दानुसार ठरेल; तद्व्यतिरिक्त कोणीहि ती घटना ठरवूं शकणार नाहीं...हिंदी राष्ट्राच्या सार्वभौम सरकारचा प्रमुख म्हणून अध्यक्ष काम करील कीं तें काम राजा पाहील हे क्रांतीचा विकास कसा होईल, यावर अवलंबून राहील; त्याच्या तपशिलांत आज लक्ष घालण्याचें कारण नाहीं...भारतमाता स्वतंत्र झाली पाहिजे, ती एकरूप व अविभक्त राहिली पाहिजे व तिची इच्छा सर्वश्रेष्ठ ठरली पाहिजे. इतकें घडल्यावर तिची इच्छा राजमुकुट धारण करणाऱ्या स्वरूपांत व्यक्त होवो अगर स्वतःच्या पावन मूर्तीवर लोकायत्त शासनपद्धतीचा निदर्शक असा झगा असलेल्या रूपांत तिचा आविष्कार होवो, कांहींहि घडलें तरी तें सारखेंच आहे.) सध्याच्या राष्ट्रीय लढ्यांत संस्थानिकांनीं आत्मसमर्पण करावें, तें साधत नसेल तर त्यांनीं बाजूला होऊन तटस्थपणा स्वीकारावा अशी सूचना दिल्यावर, हें पत्रक संस्थानिकांना बजावून सांगतें :

Forget not, O Princes! that a strict account will be asked of your doings and non-doings and a people newly born will not fail to pay you in the coin you paid. Every one who shall have actively betrayed the trust of the people, disowned his fathers and debased his blood by arraying himself against the Mother—he shall be crushed to dust and ashes... Do you doubt our grim earnestness? If so, hear the name of Dhingra and be dumb. In the name of that martyr, O Indian Princes, we ask you to think solemnly and deeply upon these words Choose as you will and you will reap what you sow. Choose whether you shall be the first of the nation's fathers or the last of the nation's tyrants

( हिंदी संस्थानिकांनो, तुम्ही काय केलें व काय करावयाचें टाळलें याचा हिशोब बारकाईनें मागितला जाईल, हें विसरूं नका. नवजात हिंदी राष्ट्र तुमच्याशीं जशास तसें या न्यायानें वागावयाला चुकणार नाहीं. मातृभूमीच्या विरुद्ध पक्षांत सामील होऊन ज्यानें ज्यानें प्रत्यक्षपणें लोकांचा विश्वासघात केला असेल, आपल्या पूर्वजांचें नांव टाकलें असेल आणि स्वतःच्या शरीरांतलें रक्त मलिन केलें असेल,त्या

प्रत्येकाचा चक्काचूर करण्यांत येईल...आमच्या घोर तळमळीबद्दल तुम्ही साशंक आहां काय ? तसें असेल तर धिंग्राचें नांव ऐका व गप्प बसा हिंदी संस्थानिकांनो, त्या हुतात्म्याच्या नांवाची आठवण तुम्हांला देऊन आम्ही तुम्हाला सांगतों कीं, आमच्या या म्हणण्याचा गंभीरपणें व खोलवर विचार करा. काय पत्करतां तें ठरवा; पण, 'जसें कराल तसें भराल' हें मात्र विसरूं नका. या राष्ट्राचे पहिले जन्मदाते होण्याची तुमची इच्छा आहे कीं, त्याचे शेवटचे पीडक ठरण्याची तुमची तयारी आहे, हें एकदांचें ठरवून टाका. ) वेळींच देण्यांत आलेल्या या इषाऱ्याकडे संस्थानिक दुर्लक्ष करतील तर काय घडेल याचें विवेचन पुढील उताऱ्यांत केलेलें आहे :

But, if in spite of this clear warning, failing to realise the mighty forces that are working underground and which have already revolutionized the modern world of Indian thought, you try to ally yourself with the enemy and array yourself to stop the eruption of this fire-emitting volcano with your thumbs, then, look unto you, O Princes of India When the mightiest of empires is trembling at the very birth pangs of this revolution, you, weak as you are, cannot hinder its onward march or smother its birth any more than you can change the force of gravitation or the rotundity of the earth.

( हिंदी संस्थानिकहो, तुम्हांला स्पष्ट इषारा देण्यांत आलेला आहे. त्याच्याकडे दुर्लक्ष कराल, गुप्तपणें कार्य करणाऱ्या प्रचंड प्रवाहांमुळें हिंदी विचारांचें सध्यांचें जग पार पालटून गेलें आहे हें ध्यानांत ठेवण्याच्या कामीं चुकाल आणि शत्रूशीं संगनमत करून, आगीचा लोळ बाहेर फेंकणाऱ्या या ज्वालामुखीचा उद्रेक आपल्या बोटांनीं थांबविण्याच्या खटाटोपांत सामील व्हाल तर तुमच्यासारखे अभागी करंटे तुम्हीच ! या क्रांतीच्या जन्मकाळच्या प्रसववेदना नुकत्या कोठें सुरू झाल्या आहेत तर बलिष्ठांतलें बलिष्ठ साम्राज्य लटपटूं लागलें आहे ! अशा परिस्थितींत, तुमच्यासारख्या दुबळ्यांनीं त्या क्रांतीचा पुरोगामी प्रवाह थांबविण्यासाठीं पुढें सरसावणें अगर त्या क्रांतीच्या जन्मकाळींच तिच्या नरडीला नख लावण्याचा उद्योग करणें हें गुरुत्वाकर्षणाचा नियम अगर पृथ्वीचा वर्तुळाकार बदलण्याला धजण्यासारखें नाहीं का ? )

हें खरमरीत पत्रक लंडनमधील भारतीय क्रांतिकारकांच्या 'अभिनव भारता'च्या गोटांतच जन्म पावलें असून त्याच्यामागील प्रेरणा विनायकराव सावरकर यांचीच आहे असें श्री. इन्दुलालजी याज्ञिक यांनीं पं. शामजी कृष्णवर्मा यांच्या चरित्रांत नमूद करून ठेविलें आहे. हें पत्रक सावरकरांनीं स्वतःच लिहिलें होतें. या पत्रकाचें लेखन, मुद्रण व प्रसार हें काम एकीकडे सुरू असतांनाच सावरकर हे या वेळीं आणखीहि कित्येक उद्योगांत गुंतलेले होते. शिखांच्या इतिहासावरील मराठी ग्रंथाच्या लेखनासाठीं वाचन व त्या ग्रंथाचें लेखन हा त्यांचा उद्योग या सुमारास चालूच होता. त्या संबंधींची मनोरंजक माहिती याच प्रकरणाच्या यापुढील भागांत ओघानें देण्यांत

येईलच. या बौद्धिक कार्याव्यतिरिक्त आणखी कांहीं कार्यें सावरकरांनीं याच सुमारास--म्हणजे १९०९ सालच्या डिसेंबरांत केलीं, असें तत्कालीन वृत्तपत्रांतून व न्यायमंदिरांतून पुढें आलेल्या माहितीवरून निष्पन्न होतें. हें कार्य म्हणजे जमेल त्या मार्गानें, सांपडेल त्या बऱ्याशा इसमाबरोबर हिंदुस्थानांत शस्त्रास्त्रें व क्रांतिकारक वाङ्मय धाडण्याचें होय. 'इंडिया हाउस' संस्था व त्या संस्थेंतील प्रमुख कार्यकर्ते यांच्याशीं ज्यांचा बरेच दिवस निकट संबंध होता ते श्री. नीतिसेन द्वारकादास याच सुमारास मार्सेलिस येथें 'मॅसिडोनिया' बोटींत चढून हिंदुस्थानकडे यावयाला निघाले. 'हिंदुस्थानांत आल्याबरोबर आपण पकडले जाल' अशी तार त्यांना वाटेंतच मिळाल्यामुळें, ते इस्लामिया येथेंच उतरले. त्यांच्या सामानांत कांहीं भानगडीच्या वस्तू धाडण्यांत आल्या होत्या कीं काय हें निश्चितपणें सांगतां येत नसलें तरी, हा संभव अगदींच दृष्टीआड करण्यासारखा खासच नाहीं. एका फ्रेंच बोटीनें दि. २८-१-१० रोजीं मुंबईस येऊन थडकलेल्या चेंगिरीराव नांवाच्या रंगून येथील ब्रह्मी इसमाची कस्टम शेडमध्यें झडती घेण्यांत आली; तेव्हां त्याच्याजवळ अनेक वस्तू सांपडल्या. त्याच्या जवळच्या पेटीचा दिसणारा तळ खरा नसावा, त्याला एकादा चोरखण असावा असा सरकारी अधिकाऱ्यांना संशय आला म्हणून ते जास्त खोलांत शिरले तों त्यांना एक ब्राऊनिंग रिव्हॉल्व्हर व प्रत्येकांत २५ काडतुसें असलेलीं दोन पुडकीं सांपडलीं. Significance of Indian Nationalism या पुस्तकाची एक प्रत, 'पिक्विक पेपर्स' हा खोटा पुठ्ठा लावलेल्या War of Independence या सावरकरांच्या पुस्तकाच्या दहा प्रती, Pagans and Christians or the Black spot in the East, Germany and England वगैरे पुस्तकांच्या प्रती व क्रांतिकारकांनीं प्रसिद्धिलेल्या कांहीं पत्रकांच्या कित्येक प्रती असें वाङ्मय झडतींत सांपडलें. यांतील कांहीं पुस्तकें चेंगिरीरावानें आपल्या बुटांत दडविलीं होतीं तर कांहीं पत्रकें वगैरे त्यानें आपल्या अंगावरील कपड्यांच्या अस्तरांत शिवून टाकिलीं होतीं. नुकतेच दिवंगत झालेले पंजाबचे पंतप्रधान सर शिकंदर हयातखान हे इंग्लंडांत शिक्षणासाठीं असतांना त्यांचा व सावरकरांचा परिचय चांगलाच वृद्धिंगत झाला होता हें १९३९ सालीं त्यांनींच प्रसिद्ध केलेल्या एका पत्रकावरून स्पष्ट होत आहे. शिकंदर हयातखान हे पंजाबी मुसलमान असल्यामुळें व धिंग्रा-प्रकरणानंतर पंजाबांतले कोणकोण तरुण इंग्लंडांत आहेत व त्यांतले कोणकोण हिंदी क्रांतिकारकांच्या कच्छपीं लागले आहेत याचा तपास बारकाईनें सुरू झाल्यामुळें, शिकंदर हयातखान यांना तांतडीनें स्वदेशीं परत यावें लागलें. आपलें घराणें राजनिष्ठ म्हणून प्रसिद्ध असल्यामुळें आपल्या सामानाची तपासणी मोठ्याशा बारकाईनें होणार नाहीं असा विश्वास शिकंदर हयातखान यांनीं व्यक्त केल्यामुळें त्यांच्या सामानांत कांहीं पिस्तुलें काडतुसें कोंबण्यांत आलीं, कांहीं क्रांतिकारक पुस्तकें व पत्रकें यांचाहि संच त्यांच्या सामानांत बेमालूमपणें घुसडण्यांत आला व या वस्तू सुरक्षितपणें हिंदु-

स्थानांत येऊन,* त्या इष्ट व्यक्तींकडे रवानाहि करण्यांत आल्या, अशा आशयाची माहिती त्या काळची चांगली आठवण बाळगणारे लोक अद्यापहि खाजगी रीतीनें सांगतात.

पत्रकांचें प्रकाशन, पुस्तकांचें लेखन, हिंदुस्थानकडे जाणाऱ्या नानाविध व्यक्तींना गांठून त्यांच्याबरोबर शस्त्रास्त्रें वगैरे देण्याचें काम इत्यादि उद्योगांत सावरकरांचें मन व्याप्त असलें तरी, त्यांचें मन एकसारखें नाशिकाकडे लागलेलें होतें. गणेशपंत सावरकर यांची रवानगी अंदमानकडे होणार हें स्पष्ट दिसत असल्यामुळें व अहमदाबाद येथील बॉंब प्रकरणांत धाकटे बंधू नारायणरावहि गुरफटून पडल्यामुळें विनायकरावांचें मन् कौटुंबिक चिंतेनें व्यग्र झालें होतें व त्यामुळें त्यांचें लक्ष नाशिककडे वळत होतें, असा याचा अर्थ नव्हे.

There was ample evidence to show that murder had been in the air of Nasik for several months before the perpetration of the deed.

( नाशिकांत प्रत्यक्ष खून झाला त्यापूर्वी कित्येक महिने नाशिकचें वातावरण खुनी बनलें होतें असें सिद्ध करण्याला अवश्य असणारा भरपूर पुरावा उपलब्ध होता. ) ही चिरोलसाहेबांनीं पुरविलेली माहिती सरकारी गोटांतली आहे. सावरकरांच्या मित्रांच्या मार्फत त्यांना अशीच माहिती मिळाली नसेल, हें मुळींच शक्य नाहीं; कारण त्यांच्याकडे लंडन येथें येणाऱ्या पत्रांवर सरकारचें चांगलेंच लक्ष असलें तरी, नाशिकच्या अभिनवभारत संस्थेतल्या तरुणांचे विचार काय चालले आहेत हें त्यांना कळूं शकत होतें. एकाद्या जबरदस्त प्रतिपक्षाशीं ब्रिटिश साम्राज्याचें युद्ध जुंपण्याच्या काळाची मार्गप्रतीक्षा करीत रहावयाचें, या मार्गप्रतीक्षेच्या काळांत देशांत भिन्नभिन्न ठिकाणीं शस्त्रास्त्रांचे संभार गोळा करावयाचे, या काळांत तरुणांना शस्त्रास्त्रें वापरण्याचें व शस्त्रास्त्रें निर्माण करण्याचें शिक्षण द्यावयाचें व युद्धप्रसंग प्राप्त होऊन ब्रिटिश साम्राज्याची सैनिकसत्ता त्या प्रसंगांत गुंतून पेंचांत सांपडली कीं देशभर उठाव करून स्वातंत्र्यस्थापनेचा यत्न करावयाचा—या सशस्त्र क्रांतीच्या तत्त्वज्ञानाची संथा त्यांनीं आपल्या नाशिकच्या सहकाऱ्यांना दिलेली असली तरी, त्यांना हेंहि माहीत होतें कीं, सगळींच तरुण मनें पुरेशीं मार्गप्रतीक्षाक्षम नसतात—मन प्रक्षुब्ध करणारे, चीड आणणारे प्रसंग प्रतिपक्षाकडून पुरविले गेले कीं, कांहीं तरी तरुण मनें अधीर बनतात व साधेल त्या मार्गांचा व मिळेल त्या साधनांचा उपयोग करून सूड घेण्याला तीं प्रवृत्त होतात. टिळक-परांजपे यांना देण्यांत आलेल्या अमानुष शिक्षा, गणेशपंत सावरकरांनीं कविता प्रसिद्ध केल्या हें निमित्त काढून त्यांना देण्यांत आलेली जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा इत्यादि क्षोभजनक प्रकारांचा परिणाम म्हणून नाशिकांत कांहीं तरी घडल्याशिवाय रहाणार नाहीं असा तर्क विनायकरावांनीं बांधला असला तर त्यांत विचार या दृष्टीनें चुकीचें कांहींच नव्हतें.

There is reason to believe that it was from India House that came both the idea of murdering Mr. Jackson and the weapon used by the murderer.१

( जॅक्सनचा खून करण्याची कल्पना व तो खून करणाऱ्या इसमानें वापरलेलें हत्यार या दोहींचाहि धागा ' इंडिया हाउस 'पाशीं जाऊन भिडतो असें मानण्याला सबळ कारण आहे ), हें चिरोलसाहेबांचें विधान मात्र तितकेंसें तर्कसंमत नाहीं. कांहीं दिवस 'इंडिया हाउस'मध्यें स्वैंपाकीपणा करीत असलेला चतुर्भुज दि. ७-३-१९०९ रोजीं मुंबईस येऊन पोंचला, विनायकराव सावरकरांनीं चतुर्भुजबरोबर पाठविलेल्या २० ब्राउनिंग रिव्हॉल्व्हर्सपैकीं जीं रिव्हॉल्व्हर्स नाशिकच्या मंडळींच्या हातीं लागलीं त्यांतल्या एकाचा उपयोग करून अनंत कान्हेरे यांनीं जॅक्सनचा वध केला हें खरें असलें तरी, दि. १५-२-१९०९ रोजीं चतुर्भुज इंग्लंडहून निघाला त्या वेळीं सावरकरांच्या दृष्टीसमोर जॅक्सन नव्हता व अमुक पिस्तुल जॅक्सनला मारण्याकरितां आहे अशी सूचनाहि त्यांनीं दिली नव्हती. हटी सरकार क्षोभजनक घटना घडवीत आहे, प्रसंगीं प्राणार्पण करण्याला सिद्ध होऊनहि प्रतिपक्षावर सूड उगवावा या शिकवणींत मुरलेल्या तरुणांच्या हातीं शस्त्रें पडलीं आहेत, असा सूड घेण्याचा निश्चय असला तर तो किती शिताफीनें घेतां येतो हें धिंग्रानें स्वतःच्या वर्तनानें सिद्ध करून दिलें आहे; त्या अर्थी, नाशिकची मंडळी पत्रांतून सुचवीत आहेत त्याप्रमाणें तेथें कांहीं तरी घडेल असें वाटून, विनायकराव नाशिकच्या वृत्ताकडे लक्ष लावून बसले होते. इतक्यांत नाशिकचा कलेक्टर जॅक्सन याचा खून झाल्याची वार्ता प्रसिद्ध झाली.

जॅक्सनच्या वधानंतर अनंत लक्ष्मण कान्हेरे, कृष्णाजी गोपाळ कर्वे, विनायक नारायण देशपांडे प्रभृति तरुणांवरील खटल्याचें काम मुंबई येथें स्पेशल ट्रायब्यूनलपुढें चाललें असतांना, जाबजबाबांच्या रूपानें जी हकीगत पुढें आली तिच्यांतला कांहीं भाग धिंग्रा प्रकरणांतील कांहीं भागाशीं विलक्षण जुळणारा आहे. खून करण्याचा संकल्प झाल्यावर दीर्घ काळपर्यंत चाललेली तयारी, धगधगलेल्या दिव्याची कांचेची चिमणी निमूटपणें हातांत धरून अनंत कान्हेरे यानें दिलेली स्वतःच्या सोशिकपणाची परीक्षा, सार्वजनिक समारंभाच्या प्रसंगीं खून करण्याची कल्पना, एकाचा प्रयत्न कांहीं कारणामुळें फसला तर, संकल्प सिद्धीस जावा म्हणून दुसऱ्या इसमाची करण्यांत आलेली योजना इत्यादि साम्यें कोणाच्याहि सहज लक्षांत राहतील, अशींच आहेत. कान्हेरे याची निर्भय वृत्ति धिंग्राप्रमाणेंच अखेरपर्यंत टिकून राहिली. कान्हेरे तुरुंगांत असतांना चिरोल साहेबांनीं दुरून त्याचें दर्शन घेतलें, असें पुढील वर्णनावरून दिसतें.

I happened, when at Nasik, to see the latter ( Kanhere ) whilst he was performing his ablutions in front of the Government building in which he was confined. Four policemen were in charge of him, but he

१ Indian Unrest : P. 149.

seemed absolutely unconcerned; and after having washed himself leisurely, proceeded to discharge his devotions, looking around all the while with a certain self-satisfied composure, before returning to his cell *

( नाशिक येथें मुक्काम होता तेव्हां कान्हेरेला पाहण्याची संधि मला मिळाली. त्याला सरकारी वाड्यांत अटकेंत ठेवलेला होता व मी त्याला पाहिला तेव्हां तो स्नानासाठीं वाड्याबाहेर आला होता. चौघे शिपाई त्याच्यावर पहारा करीत होते; पण, ती गोष्ट त्याच्या गांवींहि नव्हती. संथपणानें स्नान उरकल्यावर तो कांहीं ध्यानधारणा करूं लागला. आपल्या कोठडीकडे परत जाण्यापूर्वी त्यानें कांहीं वेळ एकसारखें चौफेर पाहिलें. त्या वेळीं त्याच्या चर्येवर आत्मसमाधान व शांति यांचें साम्राज्य पसरलें होतें ). हिंदु तरुण निर्विकार व निर्भय वृत्तीनें मृत्यूला मिठी मारावयाला सिद्ध होतात हा गीतेच्या शिकवणीचा परिणाम असल्यामुळें गीताच दुरुस्त करावी कीं काय हा प्रश्न या सुमारास कित्येक इंग्रजांच्या डोक्यांत थैमान घालीत होता ! अनंत कान्हेरे यानें धैर्यानें मृत्यूला कवटाळलें इतकेंच नव्हे तर कैदेंत असतांना त्याचा छळ करण्यांत आल्यावरहि तो खंबीर राहिला. स्पेशल ट्रायब्यूनलपुढें खटल्याचें काम चाललें असतांना डेप्युटी कलेक्टर खोपकर यांनीं उलटतपासणींत दिलेलें पुढील उत्तर या दृष्टीनें लक्षांत ठेवण्यासारखें आहे : आरोपी कान्हेरे याच्या डोक्यावर कोणी तरी तडाखे हाणीत होता तेव्हां 'मीं कर्तव्य केलें आहे' असें आरोपी म्हणाला.

जॅक्सनसाहेब १९०७सालच्या डिसेंबरपासून नाशिक येथें कलेक्टर होते. त्यांची नेमणूक नाशिक येथें झाली तेव्हां 'वंदे मातरम्' खटला वगैरे प्रकरणें धुमसत होतीं. जॅक्सनला मराठी व संस्कृत या दोन्ही भाषा उत्तम अवगत असल्यामुळें, कांहीं लोक गंमतीनें त्याला पंडित जॅक्सन म्हणत असत. लोकांशीं त्यांच्याच मायभाषेंत बोलून त्यांचीं हृदयें वश करूं शकणारा व 'गोदावरीतीराचें सौंदर्य मला इतकें आवडतें व संस्कृत पांडित्यावर माझी इतकी आसक्ति आहे त्याअर्थी मी पूर्वजन्मींचा कोणी तरी नाशिकक्षेत्रस्थ शास्त्रीपंडित असलों पाहिजे' असें म्हणूं शकणारा जॅक्सन नाशिक येथें जिल्हाधिकारी असला तर 'अभिनवभारता'च्या चळवळीचें निर्मूलन करतां येईल व सामान्य जनतेला राजनिष्ठ बनवितां येईल, अशी मुंबई सरकारची अपेक्षा होती. बाबा सावरकरांना अंदमानच्या वाटेला लावून देण्यांत आल्याकारणानें, बाबासाहेब खरे, यांच्यामागें राजद्रोहाच्या अभियोगाचें शुक्लकाष्ठ लावल्याकारणानें व हायस्कूलच्या प्रत्येक वर्गांत घुसलेली 'अभिनव भारता'ची शाखा उखडून निघावी म्हणून शिक्षक व विद्यार्थी यांना वेळीं अवेळीं सतावण्याची[१] मुभा पोलिसांना दिल्याकारणानें नाशिक शहरापुरतें तरी निर्धास्त राहाण्याला हरकत नाहीं, असें सरकारला वाटत होतें.

* Indian Unrest : P. 59.

[१] विराम : श्री. श्री. र. वर्तक वकील यांचा लेख : पृ. ८८.

नाशिक हायस्कूलच्या मंडळींना सळो कीं पळो करून सोडावयाचें अशा निर्धारानें वागणारे कित्येक पोलिस 'रिपोर्टर' आचरटपणाचा उच्चांकच गांठीत असत. मुलांवर चांगलें लक्ष ठेवावयाचें सोडून शाळेंतील कित्येक शिक्षक वर्गात उघडपणें ' अरविंदांचीं पत्रें ' हा आक्षेपार्ह ग्रंथ शिकवितात अशी लेखी तक्रार एक दिवस हेडमास्तरांपर्यंत जाऊन पोंचली. ही आगळीक करणारे शिक्षक कोण, आक्षिप्त ग्रंथ कोणत्या वर्गात कोणत्या दिवशीं वाचला गेला इत्यादि माहिती तपशिलवार रीतीनें देण्यांत आलेली असल्यामुळें, हेडमास्तरांनीं चौकशीला सुरुवात केली. शेवटीं असें निष्पन्न झालें कीं, सदर शिक्षक सदर दिवशीं वर्गात रघुनाथपंडितांच्या नल-दमयंती स्वयंवराख्यानांतले श्लोक समजावून देत होते. त्या श्लोकांत अरविंद, घोंस, पत्रें वगैरे शब्द योजण्यांत आलेले होते. चोरून ऐकणाऱ्या पोलिस रिपोर्टरनें आपल्या काव्यज्ञानापेक्षां तर्कशक्तीवरच अधिक विश्वास ठेविल्यामुळें, समजुतीचा घोंटाळा माजला असें चौकशींत ठरलें, तेव्हां सर्वांची कांहीं वेळ फार करमणूक झाली.[१]

वरून मिठास बोलत रहावें व चळवळ्या लोकांची हड्डी नरम करण्याचे सारे सूक्तासूक्त उपाय कडकपणें अंमलांत आणावे हें धोरण सतत १५-२० महिने चालविल्यावर जॅक्सन साहेबाला असा विश्वास वाटूं लागला कीं, ज्या हेतूनें नाशिकला आपली नेमणूक करण्यांत आली तो सरकारी हेतु सफल झाला आहे. ज्या दिवशीं रात्रीं जॅक्सनचा वध करण्यांत आला त्याच दिवशीं दुपारीं जॅक्सननें एका मित्राजवळ पुढील उद्गार काढले होते : मी नाशिकला आलों तेव्हां सरकार आणि लोक यांचीं मनें परस्परांविषयीं कलुषित झालेलीं होतीं. या दोन पक्षांचीं मनें साफ करण्याचा माझा हेतु सफल झाल्यामुळें, मला फार समाधान वाटत आहे. जॅक्सनसाहेबानें जवळजवळ दोन वर्षे नाशिकांत काढलीं असल्यामुळें, त्याची तेथून बदली होणें स्वाभाविक होतें. बदली होऊन त्याची नवी नेमणूक मुंबईस करण्यांत आल्याचा सरकारी हुकूम प्रसिद्धहि झाला होता. जॅक्सनसाहेबानें आपल्या पत्नीची मुंबईस रवानगी केली होती व नाशिककरांकडून होणारा सन्मान पुरतेपणीं पदरांत पाडून घेऊन, नाताळची सुटी लागतांच स्वतःहि मुंबईस जाण्याचा जॅक्सनसाहेबाचा मानस होता.

जॅक्सनचा निकाल लावण्याची कल्पना नाशिक येथील देशपांडे-सोमणप्रभृति मंडळींच्या मनांत १९०९ च्या मे महिन्यापासून घोळत होती, असें दिसतें. जॅक्सनबद्दलचा राग या मंडळींच्या मनांत पूर्वीपासूनच असावा; पण, चतुर्भुजबरोबर आलेल्या रिव्हॉल्व्हर्सपैकीं कांहीं रिव्हॉल्व्हर्स नाशिक येथें प्रत्यक्ष येऊन पोंचल्यामुळें, या मंडळींना असें वाटूं लागलें असावें कीं, विधवांच्या बोटें मोडण्यापेक्षां आपल्या रागाला कांहीं प्रभावशाली स्वरूप प्राप्त व्हावयाचें असेल तर ती शक्यता आतां

१ विराम : पृ. १०५.

निर्माण झाली आहे. धिंग्रानें दि. १-७-१९०९ रोजीं रात्रीं कर्झन वायलीला मारलें तें हिंदी देशभक्तांना देण्यांत आलेल्या अमानुष शिक्षांचा सूड उगविण्यासाठीं मारलें असें जेव्हां प्रसिद्ध झालें, तेव्हां नाशिकच्या या मंडळींना 'आपण अद्याप कांहीं करूं शकत नाहीं' याबद्दल चुटपुट वाटूं लागली असावी, असें दिसतें. कारण, धिंग्रा फांशी गेल्यानंतर सव्वा महिन्यानें-म्हणजे दि. १९-९-१९०९ रोजीं-या मंडळींनीं अनंत कान्हेरे याला प्रथम नाशिकास आणला व आपल्या संकल्पाची त्यांनीं त्याच्या-बरोबर वाटाघाट केली.

अनंत कान्हेरे हा तरुण यापूर्वी औरंगाबाद येथें आपल्या मामांच्या घरीं रहात होता व तो तेथील आर्टस् स्कूलमध्यें शिक्षण घेत होता. त्याचा एक भाऊ बार्शीच्या बाजूला नोकरी करीत होता व त्याचे वडील पेन्शन घेऊन नुकतेच कान्हेऱ्यांच्या आयनी गांवीं जाऊन राहिले होते. अनंताचें वय या वेळीं १८-१९ वर्षांचें होतें. तो शरी-रानें मोठा उंचापुरा होता किंवा ताकदीनें मोठा बळकट होता, असेंहि दिसत नाहीं. रंगेलपणाचें गाणें-बजावणें, नाटकीपेशाचा नखरेलपणा यांचीहि त्याला आवड असावी, असें दिसतें; पण, तो जसा रूपानें देखणा तसाच वृत्तीनें मोठा धाडसी व सोशिक आहे, ही गोष्ट येवलें-मनमाड वगैरे केंद्रांतल्या 'अभिनव भारता'च्या कार्यकर्त्यांच्या लक्षांत आली होती. स. १९०९ च्या सप्टेंबर महिन्यांत अनंता नाशिकास येऊन कांहीं दिवस राहिला. त्या मुदतींत त्यानें रिव्हॉल्व्हरच्या नेमबाजीचें शिक्षण घेतलें व कांहीं तरी निमित्तानें सरकारी कचेरींत जाऊन, त्यानें जॅक्सनसाहेब कोणता हेंहि नीटपणीं पाहून ठेविलें.

जॅक्सनला उडवण्याचा बेत नाशिकच्या मंडळींनीं पक्केपणीं ठरविला असला तरी, आक्टोबर व नोव्हेंबर महिन्यांत त्यांना कांहींहि करतां आलें नाहीं. शेवटीं, जॅक्सनसाहेबाची बदली होणार व नाशिकचें काम फत्ते केल्याचा टेंभा मिरवीत तो मुंबईस जाणार हें जेव्हां स्पष्ट दिसूं लागलें तेव्हां या मंडळींनीं एकदां काय तो सोक्षमोक्ष करून टाकण्याचें ठरविलें. अनंता औरंगाबादेहून नाशिक येथें येत आहे असें त्याचा मित्र गंगाराम रूपचंद मारवाडी याला कळलें तर तो इसम, 'अतिस्नेहः पापशंकी' या न्यायानें वागून, कांहींतरी घोंटाळा करील अशी भीति वाटल्यावरून, बार्शी भागांतून अनंताच्या भावाच्या नांवाची खोटी तार करून, अनंताला औरंगा-बादेहून बाहेर काढण्याचें कारस्थान या मंडळींना करावें लागलें. जॅक्सनसाहेब नाशिक सोडून जाणार असें निश्चित दिसूं लागतांच, त्याच्या सन्मानाचे कार्यक्रम नाशिकांत झडूं लागले. या कार्यक्रमांकडे 'अभिनव भारतां'तल्या नाशिक येथील कार्यकर्त्यांचें लक्ष होतें. त्या वेळीं ऐन उत्कर्षांत असलेल्या किर्लोस्कर नाटकमंडळीचा मुक्काम या सुमारास नाशिक येथें होता व 'बालगंधर्व' या लोकप्रिय नांवानें पुढें प्रसिद्धीस आलेले महाराष्ट्रीय नट श्री. नारायणराव राजहंस हे या सुमारास आपल्या रूपसंपदेनें व गानमाधुर्यानें लोकांचीं मनें आकृष्ट करूं लागले होते. देवलांच्या

शारदा ' नाटकांतलें त्यांचें शारदेचें काम तर फारच बहारीचें वठत असे. मराठी नाटयवाङ्मयाशीं परिचित असलेल्या जॅक्सनसाहेबांना हें शारदा नाटक पहाण्याची आतुरता लागली असल्यामुळें, कंपनीनें शारदा नाटकाचा प्रयोग मुद्दाम लाविला. कंपनीच्या नेहमींच्या वहिवाटीप्रमाणें खेळ बुधवार, दि. २२ डिसेंबर रोजीं व्हावयाचा, पण, त्या दिवशीं जॅक्सनसाहेबांनीं अनेक सार्वजनिक कार्यक्रम आगाऊच ठरवून टाकले असल्यामुळें, मंगळवार हा आडवार असूनहि त्या दिवशीं खेळ ठरविण्यांत आला. दि. २२ रोजीं जॅक्सनसाहेबांना तीन ठिकाणीं पानसुपाऱ्या व्हावयाच्या होत्या. आपल्या कचेरींत मोठा दरबार भरवून, लोकांना आपली आठवण रहावी म्हणून आपल्या फोटोच्या प्रती वांटण्याचा कार्यक्रमहि जॅक्सनसाहेबांनीं आंखला होता. हा भव्य कार्यक्रमहि बुधवारींच पार पडावयाचा होता. यापूर्वीपासूनच जे पानसुपाऱ्यांचे कार्यक्रम सुरू झाले होते, त्यांत जॅक्सन साहेब अगदीं निर्भयपणानें भाग घेत होते. रविवार दि. १९ डिसेंबर रोजीं नाशिक म्युनिसिपालिटीनें जॅक्सनसाहेबांना मानपत्र दिलें. या वेळीं साहेबांच्या गुणवर्णनपर पद्य म्हणण्यांत आलें; त्यामध्यें जॅक्सनसाहेबांच्या दयाळूपणाची व शालीनतेची प्रशस्ति करण्यांत आली होती. पानसुपारीचे वगैरे हे प्रसंग अशा रीतीनें मोठ्या उत्साहानें पार पडत असल्यामुळें, जॅक्सनसाहेबांचा असा ठाम ग्रह बनला कीं, आपली कारकीर्द अत्यंत यशस्वी झाली असून, नाशिकांतला असंतोष समूळ नाहींसा झाला आहे. जॅक्सन-साहेबांनीं या संबंधांत काढलेले उद्‌गार चिरोल साहेबांनीं उद्धृत केले आहेत:[१]

> Only a few days before his death he expressed his conviction that disaffection had died out in Nasik and that he could go anywhere and at any hour without the slightest risk of danger.

( मरणाच्या थोडे दिवस आधीं जॅक्सनसाहेबांनीं मोठ्या विश्वासानें असे उद्‌गार काढले होते कीं, नाशकांतला असंतोष पुरा नष्ट झाला आहे. मी केव्हांहि, कोठेंहि गेलों तरी त्यांत धोका असा मुळींच नाहीं. )

जॅक्सनसाहेबांना भोंवतालचें वातावरण निर्धास्त वाटत असलें तरी नाशिक येथील पोलिसांच्या तीक्ष्ण घ्राणेंद्रियाला धोक्याचा वास येत होता व त्यांनीं जॅक्सन-साहेबाला इषाराहि दिला होता; पण, त्यानें त्या इषाऱ्याकडे दुर्लक्ष केलें, अशी माहिती चिरोलसाहेबांनीं लिहून ठेविली आहे.

जॅक्सनसाहेबाला नाशिकांतून सुरक्षित जाऊं द्यावयाचा नाहीं असें 'अभिनव भारता'च्या प्रमुखांनीं ठरविल्यानंतर ते अनंत कान्हेरे याला फिरून नाशिकला बोलावून घेण्याच्या उद्योगाला लागले. सप्टेंबर–ऑक्टोबरमध्यें अनंताचा मुक्काम नाशिक येथें होता. त्या वेळीं त्यानें नाशिकच्या मंडळीस असें सुचविलें होतें कीं, खून करण्याची जबाबदारी प्रामुख्यानें मी पतकरीत असलों तरी, या कामीं कोणी तरी स्थानिक कार्यकर्ते माझ्या मदतीला असले पाहिजेत. स्थानिक मदतनीस न

---

१ Indian Unrest : P. 67.

मिळाल्यामुळें, कांहींसा नाराज होऊन अनंता औरंगाबादेस परत गेला होता. मदतनीस म्हणून कोणाची योजना करावयाची यासंबंधींच्या पुष्कळ वाटाघाटी झाल्यावर कृष्णाजी गोपाळ कर्वे व विनायक नारायण देशपांडे, या दोघां तरुणांनीं हें काम अंगावर घेतलें. अनंताला ही बातमी कळल्यावर, गंगाराम रूपचंद याला चुकवून, तो नाशिकास आला. याच सुमारास जॅक्सनसाहेबाच्या मानसन्मानाचे समारंभ जोरांत सुरू होते. 'शारदा' नाटकाच्या प्रयोगाच्या वेळीं जॅक्सनसाहेबाला विजयानंद थिएटरांत गांठून आपला हेतु सिद्धीस नेणें हीच गोष्ट परिणामाच्या दृष्टीनें प्रभावी ठरेल असें नाशिकच्या तरुण मंडळींत ठरल्यावर, अनंता व त्याचे सहकारी पुढील उद्योगाला लागले. हा प्रयत्न सफल झाला, तर आपल्याला फांसावर चढावें लागेल हें अनंताला स्पष्ट दिसत असल्यामुळें, त्यानें दि. १५-१६ डिसेंबरच्या सुमारास नाशिकच्या एका फोटोग्राफरकडे जाऊन आपला फोटो काढून घेतला. नाटक मध्यंतरीं थांबेल तेव्हां जॅक्सनसाहेबाला गांठतां येईल—आपण थिएटरांत कोठेंहि असलों तरी या विश्रांतीच्या वेळीं आपल्याला जॅक्सनजवळ जातां येईल—अशी अनंताची पहिली कल्पना असावी. आणि म्हणून त्यानें प्रथम बारा आण्यांच्या जागेचें एक तिकीट विकत घेतलें असावें. प्रयत्न फसण्याची अल्पशीहि शक्यता उरूं नये यासाठीं विशेष उपाययोजना करण्याचा विचार अनंताला मागाहून सुचला असावा. जॅक्सनसाहेब खुर्चीवर बसलेले असेल, त्याच्या आसपासच आपण खुर्ची पटकावली तर आपलें कार्य अधिक सुकरतेनें साध्य होईल असें वाटून, अनंतानें मागाहून खुर्चीचेंहि एक तिकीट काढलें असावें. अनंताला थिएटरांत पकडल्यानंतर त्याच्या खिशांतून नाटकाचीं जीं दोन तिकीटें बाहेर निघालीं त्यांची उपपत्ति अशी लागते, असा प्रस्तुत लेखकाचा समज आहे. दि. २१ रोजीं रात्रीं ८–८॥ च्या सुमारासच, भरलेलीं दोन रिव्हॉल्व्हर्स आपल्या खिशांत व्यवस्थित ठेवून, अनंता कान्हेरे विजयानंद थिएटरपाशीं दाखल झाला. कर्वे व देशपांडे हेहि आपापलीं रिव्हॉल्व्हर्स सज्ज करून इष्ट त्या जागीं जाऊन बसले.

नाटक सुरू होण्याची वेळ झाली. थिएटरांत गर्दी तर मनस्वी झालेली होती. जॅक्सनसाहेब याच नाटकाचे इतके भोक्ते असूनहि ते अद्याप आले नाहींत; त्या अर्थीं ते दुसऱ्या कोणत्या तरी महत्त्वाच्या कार्यक्रमांत गुंतले असले पाहिजेत, असें सर्व मंडळींनीं हेरलें. अनंतानेंहि तर्कानें ती गोष्ट ओळखली. आपलें काम साधण्याची संधि पुढें केव्हां तरी मिळेल म्हणून ताटकळत बसण्यापेक्षां, उशिरा येणारा जॅक्सनसाहेब बिनगर्दीच्या प्रवेशद्वारांतून आंत शिरेल तीच संधि साधणें अधिक श्रेयस्कर असें ओळखून, तो नाटकगृहाच्या दाराच्या बाजूशीं असलेल्या ओट्यावर येऊन बसला. ओट्याचा कोंपरा धरून तो टेहळणी करीत होता. इतक्यांत ९॥ वाजले आणि जॅक्सनसाहेब लगबगीनें प्रवेशद्वारापाशीं आले. त्यांच्याबरोबर मि. जॉली हा आणखी एक साहेब व दोन इंग्रज स्त्रियाहि आंत शिरल्या. नाटकगृहांत प्रवेश करून जॅक्सन-

साहेब आपली खास खुर्ची गांठतात आणि आपल्याला उशीर झाल्याबद्दल दिलगिरी प्रदर्शित करतात तोंच, अनंता कान्हेरे, एखाद्या दबून राहिलेल्या संकटाप्रमाणें त्यांच्या पाठीशीं जाऊन उभा राहिला. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच त्यानें आपलें भरलेलें रिव्हॉल्व्हर खिशांतून काढलें व समोर उभ्या असलेल्या जॅक्सनच्या पाठीवर नेम धरून त्यानें गोळी झाडली. एवढ्यानें कदाचित् काम भागणार नाहीं असें वाटून, अनंता तीरासारखा पुढें घुसला व जॅक्सनसाहेबावर समोरून सटासट गोळ्या झाडण्याला त्यानें सुरुवात केली. अशा एकूण सात गोळ्या झाडल्यावर आत्महत्या करण्याच्या उद्देशानें त्यानें हातांतलें पिस्तुल स्वतःच्या डोक्याकडे वळविलें इतक्यांत डे. कलेक्टर खोपकर यांनीं पुढें होऊन त्याचा हात पकडला. मि जॉली यांनीं अनंताचा दुसरा हात धरला. त्यापूर्वी, या हातानें कोटाच्या खिशांतलें दुसरें रिव्हाल्व्हर काढण्याचा अनंतानें प्रयत्न केला. दोन्ही हात धरले गेल्यावर अनंता अगदीं निर्भयपणानें व शांतपणानें स्तब्ध उभा राहिला. जॅक्सनसाहेबाचें शरीर जमिनीवर गतप्राण होऊन पडलें होतें व तें अगदीं छिन्नभिन्न झालें होतें. प्रयोगाच्या ठिकाणीं हजर असलेले डॉ. कुळकर्णी, डॉ. किर्लोस्कर, डॉ. शर्फराज अल्ली वगैरेंनीं जॅक्सनसाहेबाची नाडी कोठें सांपडते कीं काय तें पाहण्याचा प्रयत्न केला; पण, दुर्दैवानें ती कोठेंच सांपडूं शकली नाहीं !

या अद्‌भुत व भिषण प्रकारानंतर नाट्यप्रयोगाचें काय झालें असेल हें सांगत बसण्याचें कारणच नाहीं. अनंतानें आपलें खरें नांव व ठिकाण सांगूं नये असें ठरलें असूनहि त्यानें या दोन्ही गोष्टी कां सांगितल्या, पळशीकर मामलेदार यांनीं या प्रसंगीं प्रसंगावधान राखून स्टेशनवर माणसें कशीं धाडलीं, त्यामुळें औरंगाबादकडे निघालेले अनंताचे स्नेही अंकुशकर व जोशी हे कसे पकडले गेले, यानंतर नाशिकांत व महाराष्ट्रांतील अन्य ठिकाणीं धरपकडीचें व झडत्यांचें सत्र कसें सुरू झालें, कान्हेरेप्रभृति आरोपींवरील खटला कसा चालला, कान्हेरे, देशपांडे व कर्वे या त्रिवर्गांना शेवटीं देहांताची शिक्षा कशी सांगण्यांत आली, दि. १९-४-१९१० रोजीं या त्रिवर्गांना ठाण्याच्या तुरुंगांत फांसावर कसें चढविण्यांत आलें, या खुनानंतर सुरु झालेल्या तपासांत नाशिकच्या कटाचा शोध कसा लागला, या कटाचा शोध लागावा यासाठीं, पोलिस अधिकाऱ्यांनीं अनेकांचा छळ कसा केला इत्यादि माहिती एरवीं महत्त्वाची असली तरी, प्रस्तुत चरित्राच्या दृष्टीनें ती कांहींशीं अप्रस्तुत ठरण्याचा संभव आहे या खुनानंतर थोडक्याच दिवसांनीं म्हणजे दि. ३१-१२-१९०९ रोजीं 'इंडिया हाउस'मधील पूर्वीचा स्वयंपाकी चतुर्भुज याचा मि. पळशीकर यांच्यापुढें जबाब झाला. ज्या 'ब्राउनिंग रिव्हाल्व्हर'नें अनंतानें जॅक्सनचा खून केला तें ब्राउनिंग रिव्हॉल्व्हर सावरकरांकडून आलेल्या वीस रिव्हाल्व्हर्सपैकींच एक आहे अशी स्पष्ट माहिती सरकारला उपलब्ध झाली. कर्झन वायलीच्या खुनाच्या प्रकरणांतील घडामोडींची ज्यांना अगदीं इत्थंभूत माहिती होती ते श्री. कोरेगांवकर

हे गृहस्थ १९०९ च्या ऑक्टोबर–नोव्हेंबर महिन्यांत आपली इंजिनिअरिंगची परीक्षा यशस्वीपणें दिल्यावर, इंग्लंडहून हिंदुस्थानला परत आले होते. जॅक्सन प्रकरणानंतर लौकरच सरकारनें कोरेगांवकरांवरहि झडप घातली. त्यांनीं पुरविलेल्या माहितीवरूनहि सरकारनें असा निष्कर्ष काढला कीं, जॅक्सनचा खून प्रत्यक्षपणें नाशिकांत झाला असला तरी, त्याचा खरा सूत्रचालक लंडनमध्यें आहे. त्याला पकडावा कसा आणि हिंदुस्थानांतलि न्यायालयामार्फत त्याला हुकमी शिक्षा ठोठवावी कशी हा विचार या सुमारास सरकारी अधिकाऱ्यांच्या डोक्यांत प्रामुख्यानें खेळूं लागला. असा कांहीं प्रकार होईल हें सावरकरहि पुरतेपणीं ओळखून होते. ही जाणीव असूनहि त्यांनीं जॅक्सन प्रकरणानंतर लौकरच The Martyr of Nasik या नांवाचा लेख लिहून तो 'तलवार'[1] पत्रांतून प्रसिद्ध केला.

धिंग्रा प्रकरणापासून सुरू झालेल्या सरकारी कारवायांचा त्रास सावरकरांच्या राजकारणी आप्तांना भोंवूं लागला; त्याप्रमाणेंच तो त्रास त्यांच्या कुटुंबीय आप्तांनाहि या सुमारास भोंवूं लागला. सावरकर हे स्वतः इंग्लंडला कोणत्या बुद्धीनें गेले हें वाचकांना यापूर्वीं कळलेंच आहे. सावरकर बॅरिस्टर होण्यासाठीं इंग्लंडला जात आहेत, या घटनेकडे त्यांचे श्वशुर भाऊराव चिपळूणकर हे एका वेगळ्याच दृष्टीनें पहात होते. जव्हारच्या अधिपतींची आपल्या जामातांवर कृपादृष्टि आहे या गोष्टीचा आपल्या मुलीच्या भाग्याच्या दृष्टीनें पुढें चांगला उपयोग होईल–बॅरिस्टर होऊन परत स्वदेशीं आलेले आपले जामात थोड्याच काळांत जव्हार संस्थानचे दिवाण होतील–अशी गोड आकांक्षा भाऊरावांच्या मनांत नांदत होती. शामजी कृष्णवर्मा यांच्याकडून मिळणाऱ्या शिष्यवृत्तीच्या मोजक्या पैशांवर सावरकरांनीं इंग्लंडमधल्या आपल्या सगळ्या उलाढाली उरकल्या हें अशक्य मानणारे कांहीं लोक सुचवितात त्याप्रमाणें, जव्हारच्या अधिपतींकडून सावरकरांना कांहीं द्रव्यसाहाय्य खरोखरच मिळालें असेल तर, भाऊराव चिपळूणकरांच्या मनांतली ही आकांक्षा गैर होती, असेंहि म्हणतां येणार नाहीं. त्या वेळीं जव्हार संस्थानांत बड्या हुद्यावर नोकरीला असलेल्या मि. तारापोर नांवाच्या एका पारशी गृहस्थाच्या मनांत जव्हारची दिवाणगिरी आपल्या एका आप्ताला मिळावी असा हेतु होता. सावरकर आपल्या या आप्ताच्या वैभवाच्या मार्गांत आड येतील ही भीति त्या बिचाऱ्याच्या मनाला नेहमीं व्यग्र करून टाकीत असे. सावरकर दिवाण बनतलि हा संभव अजिबात नाहींसा कसा करतां येईल या विचारामुळें व्यग्र झालेल्या या गृहस्थाच्या मनाला धिंग्रा प्रकरणापासून घडत आलेल्या गोष्टी म्हणजे एक पर्वणीच वाटली. त्यानें आपल्या कारस्थानांना प्रारंभ केला. त्याबरोबर भाऊराव चिपळूणकर व जव्हारचे अधिपति यांच्याविषयीं सरकारनें चौकशी सुरू झाली. आपल्या राजकारणी धोरणाचा त्रास

---

[1] धिंग्राच्या बलिदानानंतर त्याच्या स्मरणार्थ सावरकरांनीं काढिलेलें इंग्रजी पत्र. हें पॅरिस येथून प्रसिद्ध केलें जात असे.

आपल्या श्वशुरांना व त्यांच्या उदारधी धन्याला होऊं पहात आहे ही हकीकत सावरकरांना याच सुमारास कळल्यामुळें, त्यांचें मन बरेंच अस्वस्थ झालें. या पारशी गृहस्थाच्या पुण्याईमुळें, भाऊराव चिपळुणकरांना लौकरच अधिकारपद सोडावें लागलें व सगळी चीजवस्त व जमीनजुमला तसाच टाकून रातोरात जव्हार संस्थानची हद्द सोडून बाहेर पडावें लागलें ! याच भानगडींचा परिणाम म्हणून, जव्हारच्या त्या वेळच्या अधिपतींना कांहीं दिवस मुंबईस आणून ठेवण्यांत आलें होतें व स्थानबद्ध म्हणून त्यांना वागविण्यांत आलें होतें, अशीहि माहिती कानीं येते. चिपळुणकरांची सर्व मिळकत सरकारनें पुढें जप्त केली.

'इंडिया हाउस' सोडल्यापासून सहा सात महिने सावरकरांचे खाण्या-पिण्याच्या व राहण्याझोंपण्याच्या बाबतींत अतिशय हाल चालले होते. त्यामुळें त्यांची प्रकृति मधून मधून बिघडत असे. १९०९ च्या डिसेंबरच्या शेवटीं शेवटीं घडलेल्या राजकीय घटनांचा मनावरील ताण असह्य झाल्यामुळें असो अगर खंग-लेल्या प्रकृतीला डिसेंबरांतल्या थंडीचा कडाका असह्य वाटल्यामुळें असो, ते या सुमारास फार आजारी पडले हें मात्र खरें. त्यांना डबल निमोनिया झाला. राहाण्याजेवण्याची, शुश्रूषेची—प्रत्येक गोष्टीची व्यवस्था कशी करावी असा प्रश्न उपस्थित झाला. या वेळीं डॉ. मुथु या नांवाचे एक मद्रासी हिंदु डॉक्टर वेल्समध्यें रुग्णालय चालवीत होते. ते सावरकरांचे चाहते आहेत असें आढळून आलें. त्यांनीं स्वतः लंडनला येऊन अंथरुणाला खिळलेल्या सावरकरांना आपल्या रुग्णालयांत नेलें इतकेंच नव्हे तर सावरकरांपासून पैहि न घेण्याचा निर्धार बोलून दाखवून त्यांनीं तो कृतींतहि उतरविला. या रुग्णालयांत सावरकरांची प्रकृति हळुहळू सुधारूं लागली. पण इंग्लंडची थंडी सावरकरांना बाधेल, सबब त्यांनीं इंग्लंड सोडून तत्काळ बाहेर कोठें तरी जावें, असा अभिप्राय डॉक्टरमंडळी देऊं लागली. शेवटीं, मित्रमंडळींचा विचार घेऊन, फ्रान्सला जाण्याचा विचार सावरकरांनीं पक्का केला. निघण्यापूर्वीं 'अभिनव भारता'च्या सदस्यांची सभा बोलावून त्यांनीं त्यांना सर्व सूचना दिल्या. इंग्लंड सोडून सावरकर फ्रान्सला गेले त्या दिवशीं घडलेली एक बारीकशी पण चटकदार गोष्ट त्या वेळीं लंडन येथें असलेले कै. ग्यानचंद वर्मा यांनीं नमूद करून ठेविली आहे. श्री. वर्माजी लिहितात :[1]

*जब मुसीबत आती है तो बहुतसी आजाती है । मि. सावरकरजी बीमार हो गये और बीमार भी बहुत बुरे हो गये । डबल निमोनियां हो गया । बडे मुश्किल से अच्छे हुअे डाक्टरों ने सलाह दी कि इंग्लेंड में सर्दी ज्यादा है फरान्स चले जाव । मुझे वह दिन याद है जब सावरकर ने फरान्स जाने के लिये अपना सामान कुल तैयार किया और मुझसे कहा कि मुझे चांवल और बेसन खाने की तबियत होती है और वो इंडियन रेस्टोरेंट याने होटेल-*

१ राजनीतक नौसरबाज : पृ. २०

*खानेकी तैय्यार हुअे। तो मैंने सावरकर से कहा कि तुम अभी कमजोर हो मैं जाकर के अपने सामने बनवा लाअूंगा और यही मैंने किया मैंने जाकर मिनिजा-मुद्दीन होटेलवालेसे कहा कि मख्खन में बेसन बना दो और पुराना हिंदुस्थानी चांवल बना दो। में खाना बनवाकर होटल के आदमी के साथ सावरकर के पास ले आया। और सावरकर ने खाकर नौकर को बर्तन वापिस कर दिये। ये दिन आखिरी दिन था जिस दिन सावरकर को मैंने स्वतंत्र देखा। सावरकर और मैं और एक या दो मित्र और भी व्हिक्टोरिया स्टेशन गये और वहां पर सावरकर को रेल में बिठाला। मैं व और दोस्त वापिस चले आये। सावरकर फरान्स चले गये।*

ग्यानचंद वर्मा यांनीं तयार करून ठेविलेल्या दिनांकवार टिपणांत सावरकर आजारी पडले व ते फ्रान्सला गेले या दोन्ही नोंदी, १९१० जानेवारी या महिन्या-समोर दिल्या आहेत; आजारी पडल्याचे व फ्रान्सला गेल्याचे दिनांक दिलेले नाहींत. त्यावरून असा निष्कर्ष निघतो कीं, सावरकर जानेवारीच्या उत्तरार्धांत इंग्लंडहून फ्रान्सला गेले असावे. दि. १३-३-१९१० रोजीं सावरकर परत लंडनला आले व पकडले गेले. याचा अर्थ असा कीं, त्यांचें फ्रान्समधील वास्तव्य पुरें दोन महिनेहि नव्हतें. एकीकडे प्रकृति सुधारावी म्हणून औषधोपचार चालले असतांना सावरकरांनीं या काळांत कोणते उद्योग केले हें स्थूल मानानें पाहतांना, 'शिखांचा इतिहास' या पुस्तकाविषयींच्या उद्योगाला प्राधान्य द्यावें लागतें. सावरकर डॉ. मुथु यांच्या रुग्णालयांत होते तेव्हां, सवड मिळतांच, प्रत्यहीं तास दोन तास त्यांनीं हा इतिहास लिहिण्याचें काम सुरू केलें होतें. या दवाखान्यांत असतांनाच त्यांना नाशिक येथील आपल्या इष्टमित्रांच्या धरपकडीसंबंधींच्या व छळासंबंधींच्या बातम्या मिळाल्या वगैरे गोष्टी निःसंशयपणें सिद्ध करणारें सावरकरांचें पुढील पत्र[1] वाचण्यासारखें आहे:

Dear Deshbhakta Punditji,

I thank you very much for the kind and sympathetic letter which you wrote By strange coincidence, your letter which was redirected from London came to my hand enveloped together with cuttings of news of quite a different sort, yet regarding the same object! India is advancing and the Hindu race is not dead!

When I had been ill in London, Desh. Niranjan wrote a letter on my behalf which you must have got already. Now I am much better and under the care of Dr x x x who seems to be closely acquainted with you I am sure, I would be able very soon to recover completely. Even now the two hours, which I have forced the Doctor to allow me to work I spend in writing the Shikh History, which I propose to get out some where in the next March.

---

१ दि. २३-५-४१ च्या 'मराठा' पत्रांत हें पत्र प्रसिद्ध झालें आहे.

(प्रिय देशभक्त पंडितजी, आपल्या प्रेमळ व सहानुभूतिपूर्ण पत्राबद्दल मी आपला फार आभारी आहें. लंडनहून इकडे धाडण्यांत आलेल्या आपल्या पत्राचा लिफाफा मला मिळाला. त्यांतच अगदीं भिन्न प्रकारच्या—पण, त्याच हेतूला पोषक असणाऱ्या—वार्तांचीं कात्रणेंहि होतीं. हा एक विलक्षण योगायोग होय ! भारताची प्रगति होत आहे. हिंदु वंश मेलेला नाहीं ! !

मी लंडनमध्यें आजारी असतांना देशबंधु निरंजन पाल यांनीं माझ्या वतीनें आपल्याला एक पत्र लिहिलें होतें. तें पत्र आपल्याला पोंचलेंच असेल. आतां माझी प्रकृति बरीच सुधारली आहे. डॉ. (मुथु) हे माझ्या प्रकृतीची काळजी घेत आहेत—ते आपल्या चांगल्याच परिचयाचे आहेत असें दिसतें—व मी लौकरच खडखडीत बरा होईन असा विश्वास मला वाटत आहे. दोन तास तरी मला काम करूं द्या अशी मी डॉक्टरांना गळ घातली. त्यांनीं या गोष्टीला मान्यता दिल्यामुळें, मी तो वेळ 'शिखांचा इतिहास' हा ग्रंथ लिहिण्यांत घालवितों. येत्या मार्चमध्यें केव्हां तरी हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचा माझा विचार आहे ).हा ग्रंथ लिहिण्याची कल्पना मनांत आल्यावर सावरकर गुरुमुखी भाषा शिकले व आदिग्रंथापासून गोविंदसिंहजींच्या विचित्र नाटकापर्यंतचे शीख संप्रदायाला मान्य असलेले अनेक ग्रंथ त्यांनीं अभ्यासिले.

हें पुस्तक ज्या ' प्रभ्याला ' अर्पण करावयाचें ठरलें होतें त्यावरील सुंदर कविता लंडनमध्येंच लिहिली गेली होती, असें दिसतें. फ्रान्समध्यें आल्यावर या पुस्तकाच्या हस्तलिखितावर अखेरचे संस्कार झाले असावे व त्याच्या प्रती करण्यांत आल्या असाव्या. यांपैकीं एक प्रत पोस्टानें हिंदुस्थानांत धाडण्यांत आली. पण, पोस्टखात्यानें ती प्रत गहाळ तरी केली अगर गट्ट तरी केली. दुसरी एक प्रत त्या वेळीं युरोपमध्यें असलेल्या एका हिंदी चित्रकाराच्या हातीं देण्यांत आली. त्यानें ती सुरक्षितपणें हिंदुस्थानला आणावी व इष्ट स्थळीं पोंचती करावी, असा संकेत ठरलेला होता; पण, इंग्लंड-फ्रान्सकडून येणाऱ्या प्रत्येक हिंदी गृहस्थाच्या सामानाची कसून झडती घेण्याचें सत्र या वेळीं हिंदुस्थानांत फार जोरानें सुरू झालें असल्यामुळें या गृहस्थाला अशी भीति वाटली कीं,ही हस्तलिखित प्रत आपल्यापाशीं झडतीच्या वेळीं सांपडली तर, हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर उतरल्यापासूनच आपल्या कष्टांना सुरुवात होईल. या भीतीच्या आहारीं जाऊन या गृहस्थानें सदर हस्तलिखित प्रवासांतच समुद्रार्पण करून टाकिलें, अशी माहिती मिळते. या पुस्तकाच्या हस्तलिखित प्रतींपैकीं दोन प्रतींची विल्हेवाट अशा रीतीनें लागली. तिसरीहि एक प्रत तयार करण्यांत आलेली होती असें दिसतें. पॅरिसमधील मुक्कामांत सावरकर हे कामाबाईच्या येथें रहात असत. कामाबाईचा विनायकराव सावरकर व त्यांचे बंधु यांच्यावरील लोभ अखेरपर्यंत कायम होता. विनायकरावांनीं अंदमानमधून धाडलेल्या पत्रांतले कामाबाईबद्दलचे उल्लेख आणि या बाईनीं १९३४ सालच्या

अखेरीस गणेशपंत सावरकर व नारायणराव सावरकर या बंधूंना धाडिलेलीं पत्रें यावरून हीं गोष्ट स्पष्ट होत आहे. कामाबाई व विनायकराव सावरकर यांचे परस्पर संबंध अत्यंत विश्वासूपणाचे व जिव्हाळयाचे असल्यामुळें, 'शिखांचा इतिहास' या पुस्तकाची तिसरी हस्तलिखित प्रत त्यांच्या स्वाधीन करण्यांत आली असली, तर ती गोष्ट अगदीं शक्य आहे. या बाई आतां परलोकवासी झालेल्या आहेत. युरोप सोडून त्या १९३५सालच्या शेवटीं मुंबईस आल्या आणि दि.१९-८-१९३६ रोजीं मुंबई येथेंच त्यांचें देहावसान झालें. युरोप सोडून हिंदुस्थानला परत येण्याचा संकल्प केल्यावर या बाईनीं आपल्या जवळचे सर्व महत्त्वाचे कागदपत्र पॅरिसच्या बँकेंत ठेविले, अशी माहिती मिळते. ती खरी असली आणि प्रस्तुत महायुद्धाच्या सर्वभक्षक वणव्यांतून हे कागदपत्र बचावले असले तरच 'शिखांचा इतिहास'हें पुस्तक क्वचित् कोणाला हस्तलिखिताच्या रूपानें पहावयास मिळेल !

या पुस्तकाचा इतिहास व हें पुस्तक सावरकरानीं 'प्रभाकर' नांवाच्या ज्या आपल्या मुलाला अर्पण केलें होतें त्या मुलाच्या जीवनाचा इतिहास यांमध्यें विलक्षण साम्य आहे. सावरकरांचा हा मुलगा १९०५ सालच्या पूर्वार्धांत जन्मला असावा. सावरकर १९०६ सालीं विलायतेस जावयास निघाले त्या वेळीं तो वर्ष दीड वर्षाचा असावा. सावरकर यांनीं लिहिलेल्या एतद्विषयक कवितेच्या पहिल्या भागावरून प्रभाकरच्या तेव्हांच्या वयाची कांहीं कल्पना करतां येते :

> शीघ्रचि सोडुनि अंक जननिचा दुडुदुडु धांवत तूं ।
> घरांत फिरतां डोळे भरुनी पाहिन हा हेतू— ॥
> धरुनि मनीं मी उत्सुक असतां विदेशगमनाचें ।
> " प्रभ्या प्रियकरा ! " कार्य उदेलें प्रियजन-विरहाचें ॥

कोणाहि व्यक्तीचा समागम जितका अधिक व निकट तितकाच त्या व्यक्तीचा विरह मनाला अधिक दुःसह वाटतो. सावरकर विलायतेस गेले तेव्हां हा मुलगा अगदींच लहान असल्यामुळें, सावरकरांना त्याच्या सहवासाचा आनंद फारसा उपभोगितां आलेला नव्हता आणि म्हणून ते परदेशांत असतांना त्यांना या मुलाचा विरह विशेषसा जाणवला नाहीं.

> सत्य सांगतों, परी न गमला बहु तव विरह मला ।
> देशिं जसा होतास विदेशीं सन्निधची सखया ।
> अमूर्त तूं कल्पना अेक मधुमधुर अशी हृदया ॥

अमूर्त अशा कल्पनेप्रमाणें, विलायतेंत नाना प्रकारचे खटाटोप करणाऱ्या सावरकरांच्या मनांत या मुलाची आठवण केव्हांतरी चमकून जात असे. हा मुलगा १९०९ सालच्या प्रारंभीं नाशिक येथें देवी येऊन वारल्याचें वृत्त सावरकरांना समजलें तेव्हां त्यांच्या मनांत नाना प्रकारचे विचार उभे राहिले. आपण क्रांतिकार्यांत

रमून–रंगून गेल्यामुळें व या कार्याच्या नादांत आपण आपल्या कुटुंबांतील सर्व माणसांच्या सुखाचा स्वाहाकार केल्यामुळें, या बालकालाहि एका अर्थी हुतात्म्याचेंच मरण आलें आहे, अशी कल्पना सावरकरांच्या मनांत उभी राहिली. या पाहिल्या मुलासंबंधीं आपण आपल्या मनांत कोणत्या आशा बाळगल्या होत्या व त्या मुलाला एकाद्या अज्ञात हुतात्म्याप्रमाणें मृत्युमुखीं पडावें लागल्यामुळें, त्या आशांची गत काय झाली याबद्दलच्या आपल्या कल्पना सावरकरांनीं पुढील पद्यपंक्तींत व्यक्त केल्या आहेत :

अतनु मूर्ति तैं लटकुनि कितिदां हृदयाशीं निजली ।
हंसली कितिदां दिव्याशेनें कितिदां ती सजली ॥
धर्मकार्यसिद्धयर्थ धाडुनी रणीं खड्गपाणी ।
बाल-बाल झुंजार आपुले श्री-गोविंदांनीं ॥
हुतात्म होतां हंसत पाहिले सुकीर्ति परिसुनि ती ।
म्यांहि कितीदां रणीं पाहिली अमूर्त तव मूर्ती ॥

प्रभाकर इहलोक सोडून गेला असला तरी तो आपल्याला पूर्व स्वरूपांतच कसा दिसत–भासत आहे हें सावरकरांनीं पुढील ओळींत निवेदिलें आहे :

पूर्वि जसा होतास तसाची नंतरही सखया ।
अमर्त तूं कल्पना एक मधु-मधुर अशी हृदया ॥

क्रांतिचे क्रुद्ध वारे भोंवतालीं भिरभिरत आहेत तोंवर प्रभाकराची ही कल्पनामयी मूर्ति आपल्या हृदयांतहि सुखानें निवसूं शकणार नाहीं हें ओळखून, सावरकरांनीं या कोमल मूर्तीच्या निवासासाठीं कोणतें घर निर्माण केलें हें पुढील ओळींच्या साहाय्यानें समजून घेण्यासारखें आहे :

महाराष्ट्र वाक्सुंदरीसवें श्रीगोविंदातें ।
विहार जेथें अखंड-सुंदर-मणिमय मंदिर तें ।
तुला गेह हें यास्तव अर्पी सरस्वती स्वकरें ।
जिथें क्रांतिचे शिवं न शकती अग्नि–मेघ–वारे ।

गुरुगोविंदसिंगाच्या अखंड कीर्तीच्या तेजानें तळपणाऱ्या या मराठी चरित्र-ग्रंथाच्या कोंदणांत आपल्या पहिल्यावहिल्या मुलाची स्मृति सतत टिकून राहील ही सावरकरांची आशा, तो ग्रंथच नष्ट झाल्यामुळें, वटून गेली. लहानगा प्रभाकर हा जसा सावरकरांनीं आपल्या हृदयांत ‘ अमूर्त कल्पना ’ या रूपानें नांदविला होता, त्याप्रमाणेंच या ग्रंथापत्यालाहि तशाच रूपानें आपल्या हृदयांत नांदविण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला ! यामुळें विव्हळ झालेल्या सावरकरांनीं १९१२ सालीं अंदमानांत असतांना या ग्रंथाला उद्देशून पुढील पश्चाल्लेख लिहिला :

जिथें न शकती शिंवू भासले अग्नि मेघ वारे ।
तिथेंहि शकल शिवूं क्रांतिचे अग्नि-मेघ बा, रे ॥

रिस येथें कामाबाईच्या निवासस्थानीं राहून सावरकर आपली प्रकृति सुधारण्याचे क्य ते प्रयत्न करीत होते, तलवार वगैरे वृत्तपत्रांसाठीं लेख लिहीत होते व त्याच वेळीं रिस येथील हिंदी लोकांना सुसंघटित करून त्यांना देशस्वातंत्र्याभिमुखहि बनवीत ते. या गोष्टी चालू असतांनाच, नाशिककटाचा तपास लावूं पहाणाऱ्या हिंदी ोलिस अधिकाऱ्यांनीं हिंदुस्थानांतल्या आपल्या आप्तेष्टांचे व पूर्वपरिचितांचे हाल से सुरू केले आहेत यासंबंधींचें वृत्त त्यांच्या कानीं येऊं लागलें. चतुर्भुज, कोरेगांवकर गैरेंच्या जबाबांतून निघालेल्या माहितीच्या आधारें, हिंदुस्थान सरकार आपल्यालाहि कडून नेण्याचा प्रयत्न करील हा संभव असल्याचें त्यांना स्पष्टपणें दिसूं लागलें. सें असूनहि, हिंदुस्थानांत शस्त्रास्त्रें धाडण्याचा आपला उद्योग सावरकरांनीं ांबविला नाहीं. हिंदुस्थानांत परत जाणारा एक हिंदी चित्रकार गांठून, 'शिखांचा तिहास' या मराठी ग्रंथाची हस्तलिखित प्रत त्यांनीं हिंदुस्थानांत धाडली ही गोष्ट ांगून झालीच आहे. दुसराहि एक हिंदी चित्रकार स्वदेशीं जात आहे असें कळतांच ावरकरांनीं त्याच्याविषयीं तपास चालविला. या चित्रकाराच्या विशेष परि-याची एक इटॅलियन स्त्रीहि हिंदुस्थानकडे जात आहे, असें त्यांना कळलें. हिंदी समानें बरोबर नेलेलीं शस्त्रास्त्रें इष्ट स्थळीं सुखरूप पोंचण्याचा संभव आतां हळुहळू ष्ट होत चालला असल्यामुळें, या इटॅलियन बाईनाच शस्त्रास्त्रें नेण्याची विनंति रणें अधिक श्रेयस्कर होय असें वाटल्यामुळें, सावरकरांनीं सदर बाईची भेट घेऊन यांना आपलें मनोगत सांगितलें. बाईनीं आनंदानें संमति दिली. बाईच्या सामा-ांत एक छोटीशी खुर्ची होती. या डेकचेअरच्या कापडी बैठकींत पिस्तुलें भरलीं ा तें कापड चांगलें शिवून टाकलें तर हीं पिस्तुलें बिनबोभाट रस्ता चालूं लागतील सें वाटल्यावरून, ती व्यवस्था करण्यांत आली. या बाई एकदम हिंदुस्थानांत ेल्या नाहींत. प्रथम सीलोनमध्यें उतरल्यावर त्या मद्रासमार्गें निजामसंस्थानांत ेल्या व तेथील अभिप्रेत स्थळीं त्यांनीं पिस्तुलें पोंचतीं केलीं, अशी माहिती मिळते.

पॅरिसमधील हिंदी लोकांना संघटित करण्याच्या उद्योगाकडे सावरकर वळत आहेत तोंच त्यांना अशी भीति वाटूं लागली कीं, आपण लंडन सोडल्यामुळें तेथील ार्यकर्त्यांची विघटना होणार ! गुप्तपोलिस खात्याच्या सासुरवासाला कंटाळ-ेल्या, सरकारी रोषाच्या संभाव्य उग्रपणामुळें धास्तावलेल्या, सरकारी कृपेच्या ावलींत लाभणाऱ्या संभाव्य सुखाला लालचावलेल्या—अशा नाना प्रकारच्या हिंदी रुणांबद्दलचीं भिन्नभिन्न वृत्तें लंडनहून त्यांना पोंचूं लागलीं. त्यांतल्या बहुतेकांचा ूर एकच होता. अतःपर लंडनमध्यें राहणें सुरक्षित नाहीं, इष्ट नाहीं, अवश्य नाहीं. असा कांहीं तरी विचार बहुतेकांच्या डोक्यांत घोळूं लागला होता व कांहीं तरी निमित्त काढून, इंग्लंडला रामराम ठोकण्याची व युरोपांत इतरत्र सुरक्षितपणें नांदण्याची

इच्छा पुष्कळांच्या मनांत घोळूं लागली होती. आपण संघटित केलेल्या संस्थेंतले हे तरुण लंडन सोडून गेले तर, प्रतिपक्षाच्या खुद्द राजधानींतच राहून त्याला सतावून सोडण्यासाठीं आपण आजवर केलेले सारे उद्योग मातीमोल ठरणार, अशी भीति सावरकरांना वाटूं लागली. उगीच टुरटुर करणाऱ्या या उच्छृंखल हिंदी तरुणांवर आपण मात केली अशी घमेंड ब्रिटिश अधिकारी मारूं लागतील व हिंदी आकांक्षांच्या भवितव्याच्या दृष्टीनें या गोष्टीचा फार अनिष्ट परिणाम घडेल, हें सावरकरांना दिसूं लागलें !

आपल्या या पूर्व सहकाऱ्यांना कांहीं ठासून लिहिलें अगर कळविलें तर ते काय म्हणतील याबद्दलहि सावरकरांचें मन साशंक व्हावें, अशी परिस्थिति नुकतीच निर्माण होऊन गेलेली होती. पंडित शामजी कृष्णवर्मा हे आपल्या 'इंडियन सोशिऑ-लॉजिस्ट' मासिकांतून क्रांतिकारकांना प्रोत्साहन देत होते. त्यावर हिंदी क्रांति-कारकांपैकीं वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांनीं थोड्या महिन्यांपूर्वीच कडाडून तोंडसुख घेतलें हें सावरकरांच्या स्मरणांत होतें. पॅरिससारख्या सुरक्षित स्थळीं जाऊन राहिले-ल्या शामजी कृष्णवर्मांचें सगळें प्रोत्साहक पांडित्य "**स्वस्थे को वा न पंडितः**" या कोटींतलें आहे अशा आशयाच्या जळजळीत टीकेचीं पत्रें श्री. चटोपाध्याय यांनीं दि. १–३–१९०९ व १९–३–१९०९ च्या 'लंडन टाइम्स' मध्यें प्रसिद्ध केलीं होतीं, तीं सावरकरांच्या वाचनांत आलेलीं होतीं. आपले पूर्व सहकारी व अनु-यायी आपल्यावरहि अशी टीका करण्याला प्रवृत्त होतील, असें सावरकरांना वाटत नव्हतें. अनुयायांचें योग्य मार्गदर्शन करणाऱ्या नेत्यानें स्वतःच्या सुरक्षिततेसाठीं जाणूनबुजून संकट टाळणें हें जसें गैर तसेंच त्यानें निष्कारण संकटाच्या खाईंत उडी टाकणें हेंहि गैर होय, ही विचारसरणी अभिनव भारताच्या सदस्यांमध्यें मुरलेली आहे, हा विश्वास सावरकरांना वाटत होता. संकटाच्या प्रसंगीं नेता बाजूला राहतो तो भ्याडपणामुळें नसून, इष्टकार्य अधिक प्रभावी व्हावें म्हणूनच बाजूला राहणें त्याला अवश्य असतें. हें धोरणहि आपल्या पूर्व सहकाऱ्यांना परिचित आहे, हें सावरकर ओळखून होते. माणसांच्या बुद्धीचा खेळ कसा विचित्रपणें चालतो याचाहि अनु-भव त्यांना होताच. कसल्यातरी विकारांच्या आहारीं गेलेल्या अनुयायांकडून नेत्यासंबंधीं शंकाकुशंका घेतल्या जातात—**अपथे पदमर्पयन्ति हि । श्रुतवन्तोपि रजोनिमी-लिताः ॥** हा अनुभव अशा अनुयायांच्या बाबतींत येण्याचा संभव असतो हें सत्य सावरकरांच्या स्मरणांत होतें. आपण स्वतः पॅरिसमध्यें बसलों आणि आपल्या पूर्व सहकाऱ्यांनीं मात्र लंडन सोडून निघून जातां कामा नये असा आग्रह आपण धरला तर हे लोक आपल्याला शामजींच्याच मालिकेंत गोंवण्याला क्वचित् प्रवृत्त होतील, अशा शंकेनें सावरकरांचें मन व्यग्र होत होतें.

भोंवतालच्या परिस्थितींतला हा भाग मनाला निरुत्साह करणारा होता तर परिस्थितींतला दुसरा एक भाग सावरकरांच्या मनाला उत्तेजनहि देणारा होता. लंडन-

मध्यें बसून, हिंदी सैन्यांत असंतोष पसरावा म्हणून त्यांनीं जीं शेंकडों पत्रकें प्रसृत केलीं होतीं त्यांचा परिणाम होत चालल्याची एक प्रकारची पावतीच त्यांना या सुमारास मिळाली होती. कारण, १९१० सालच्या अगदीं आरंभींच दहाव्या जाट पलटणींतील दहा सैनिकांवर राजद्रोहाबद्दल खटले भरल्याची वार्ता प्रसृत झालेली होती. या वार्तेनंतर थोड्याच दिवसांनीं जी एक घटना घडली तिच्यामुळें त्यांना असा विश्वास वाटूं लागला कीं, हिंदी क्रांतिकारकांनीं जर्मनीमध्यें चालविलेल्या उद्योगाचे चटके ब्रिटिश साम्राज्याला बसूं लागले आहेत. १९१० च्या फेब्रुवारी महिन्याच्या प्रारंभींच बर्लिनहून असें वृत्त आलें कीं, १९०८ सालापासून हिंदी क्रांतिकारकांनीं चालविलेल्या प्रचाराकडे बर्लिन पोलिसचें लक्ष होतें. तलवार पत्र बर्लिनमध्यें छापलें जात नाहीं अशीहि ग्वाही या वार्तेंत देण्यांत आलेली होती. जर्मनींत असलेल्या हिंदी क्रांतिकारकांच्या सुरक्षिततेसाठीं जर्मन सरकारनें ही बातमी मुद्दाम प्रसृत केली हें सावरकरांना ज्या मार्गानें कळलें त्याच मार्गानें त्यांना हाहि इषारा मिळाला कीं, त्यांनीं इंग्लंडला परत जाणें श्रेयस्कर नाहीं. याच सुमारास इब्राहिम वॉर्डनी या कैरो येथील इजिप्शियन विद्यार्थ्यानें तेथील पंतप्रधान बोट्रस पाशा ( Boutros Pasha ) यांचा खून केल्यामुळें, वॉर्डनी व धिंग्रा यांची तुलना राजरोसपणें केली जात होती. या तुलनेमुळेंहि हिंदी क्रांतिकारकांचें नांव जगभर गाजत होतें.

आशा-निराशा, उत्साह–निरुत्साह, या द्वंद्वांच्या कैचींत सावरकरांचें मन सांपडलें आहे अशा स्थितींत नाशिकचें जें वृत्त त्यांच्या कानावर आदळूं लागलें त्यामुळें त्यांची मनःशांति पुरी ढळली. ज्यांनीं लहानपणापासून आपलें अनुयायित्व पत्करिलें, आपल्यावरील प्रेमासाठीं ज्यांनीं आपल्या आईबापांची व घरादारांची पर्वा बाळगली नाहीं, आपल्यावरील व ध्येयावरील निष्ठेमुळें ज्यांनीं अनेक सांसारिक मोह लथाडून टाकिले त्या आपल्या जिवाभावाच्या आप्तांची व मित्रांची पिसाळलेल्या पोलिस अधिकाऱ्यांकडून कशी पायमल्ली केली जात आहे, त्यांना अमानुष छळ कसा सोसावा लागत आहे, याचीं सविस्तर वर्णनें त्यांच्या वाचनांत येऊं लागलीं. या वाचनामुळें मनांत प्रक्षुब्ध विचारांचा हलकल्लोळ उडाला असतांनाच, सावरकर एके दिवशीं सकाळीं फिरावयास बाहेर पडले. प्रकृति सुधारण्यासाठीं सकाळीं फिरावयास जाण्याचा त्यांचा पॅरिसमध्यें नित्यक्रमच होता. सकाळच्या त्या प्रशांत वातावरणांत ते एका रम्य उपवनांत हवा खात बसले होते. सभोंवार दिसणाऱ्या रम्य पुष्करिणींमधून सुंदर पक्षी जलक्रीडा करीत होते व कमलाच्या आकाराचीं रेखीव व सुंदर फुलें जलपृष्ठावर लीलेनें डुलत होतीं. या सौंदर्याचा उपभोग घेत असतांना, सावरकरांच्या क्षुब्ध मनाला हिंदुस्थानांतील परिस्थितीचें स्मरण झालें.

**रम्याणि वीक्ष्य मधुरांश्च निशम्य शब्दान् ।**
**पर्युत्सुकीभवति यत् सुखितोऽपि जंतुः ।**

तच्चेतसा स्मरति नूनमबोधपूर्वम् ।
भावस्थिराणि जननान्तरसौहृदानि ।

या प्रसिद्ध श्लोकांत कालिदासानें जो अनुभव नमूद करून ठेविला आहे त्याच प्रकारचा–पण त्याहून किंचितसा वेगळा–अनुभव सावरकरांना येऊं लागला. तिकडे तसा वणवा पेटला असतांना व त्यांत आपले बांधव होरपळून निघत असतांना आपण, प्रकृतिस्वास्थ्यासाठीं का होईना, सौंदर्याचा व सुखाचा अनुभव घेत स्वस्थ बसणें ही शुद्ध कर्तव्यच्युति आहे हा विचार त्यांच्या मनांत उसळी मारूं लागला. एकदम निघून हिंदुस्थान गांठावें व आपल्या बरोबरीच्या मित्रमंडळांत खांद्याला खांदा भिडवून उभें रहावें या विचारानें त्यांच्या मनाची पकड घेतली. ते परत कामाबाईच्या बिऱ्हाडीं आले ते हिंदुस्थानला परत जाण्याचा जवळजवळ निश्चयच करून आले !

मन किंचित् शांत झाल्यावर त्यांनीं आपला हा विचार पॅरिसमधील आपल्या मित्रमंडळापुढें मांडला. हिंदुस्थानांत काय चाललें आहे, कसेंहि करून सावरकरांना कैचींत पकडण्याला हिंदुस्थान सरकार किती उत्सुक झालें आहे, इत्यादि गोष्टींची या मंडळींना चांगली कल्पना असल्यामुळें हिंदुस्थानला जाण्याचा सावरकरांचा विचार कुणालाच पसंत पडेना, सावरकर हे क्रांतिकारक पक्षाचे सर्वमान्य पुढारी असल्यामुळें, त्यांनीं आपणहून प्रतिपक्षाला इष्ट असलेली गोष्ट करण्याला प्रवृत्त होणें हा शुद्ध अविचार आहे असें मत पं. शामजी कृष्णवर्मा यांनीं मोठ्या आग्रहानें व प्रेमळपणानें मांडलें. "मला आपलें पुढारीपण प्रथम सिद्ध करून दाखविलें पाहिजे; आणि ' आ ' वासून समोर उभ्या असणाऱ्या संकटांत उडी टाकल्यानेंच तें सिद्ध होईल" असें उत्तर देऊन सावरकरांनीं पंडितजींचा कोटिक्रम खोडून काढिला. बऱ्याच चर्चेनंतर शेवटीं अशी तोड ठरली कीं, सावरकरांना पॅरिसमध्यें राहाणें रुचत नसेल तर त्यांनीं पॅरिस सोडावें; पण, हिंदुस्थानला मात्र त्यांनीं जाऊंच नये. सावरकरांनीं इंग्लंडला जाण्यांतहि धोका होताच; पण, इंग्लंडमधील न्यायपद्धति ही हिंदुस्थानच्या मानानें जास्त निर्दोष असल्यामुळें, सावरकरांनीं इंग्लंडला जाण्यांत त्यांतल्या त्यांत कमी धोका आहे असें पंडितजींनीं सुचविलें. इंग्लंडला परत जाण्याची सावरकरांनीं सिद्धता केली.

सावरकरांनीं पॅरिस सोडून इंग्लंडला परत जाण्याचा विचार कां केला, याविषयींच्या अनेक गप्पा त्या वेळीं प्रसृत करण्यांत आल्या होत्या. या विषयींचा उल्लेख चित्र-गुप्त-लिखित सावरकर चरित्रांत करण्यांत आलेला असल्यामुळें, या मुद्याचा शक्य तो परामर्ष या ठिकाणीं घेणें अवश्य आहे. एका इंग्लिश तरुणीचें सावरकरांवर मन बसलें होतें आणि तिची भेट घेण्याच्या उत्सुकतेनें सावरकर इंग्लंडला आले व पकडले गेले ही या गप्पांपैकीं एक गप्प असल्याचें चित्रगुप्त-लिखित सावरकर-चरित्राच्या पृष्ठ ९४ वर सांगण्यांत आलेलें आहे. सावरकरांच्या एका

जिवलग मित्राची खोटी सही करून इंग्लिश पोलिसांनीं एक पत्र धाडलें व त्यामुळें सावरकर फसले असा प्रवाद असल्याचें सदर चरित्राच्या पृष्ठ ९५ वर नमूद करण्यांत आलेलें आहे. अशा भानगडींचा व्यर्थ गाजावाजा केला जातो आणि अशा क्षुद्र मुद्यांवर लक्ष देऊन थोरथोर माणसांचें कर्तृत्व कलंकित करण्याचा उपद्व्याप केला जातो ही गोष्ट सामाजिक मन प्रवृत्तीचें गमक या दृष्टीनें फार अनिष्ट आहे. आपल्या या परतंत्र देशांत राजकारणी कर्तृत्ववान् माणसांची अतिशय वाण आहे. त्यांच्या कर्तृत्वाचा विचार करतांना कांहीं तरी आगंतुक भानगडी पुढें ढकलून, त्या कर्तृत्वाकडे कानाडोळा करण्याला चांगलीं विचारवंत माणसेंहि प्रवृत्त होतात, ही अत्यंत खेदाची गोष्ट आहे राजकारणी नेत्यांना जी मान्यता मिळते ती त्यांच्या राजकीय शहाणपणामुळे मिळते ते वसिष्ठ-वाम देवाचे अवतार आहेत, या बुद्धीनें कोणी त्यांना आदरणीय समजत नाहीं. राजकीय शहाणपण असूनहि एकादा नेता प्रति शुक्राचार्य असेल तर त्यामुळे त्याच्या विषयींचा लोकांचा आदर 'अधिकस्याधिकं फलं' या न्यायानें वाढेल, हें खरें; पण, राजकारणी शहाणपणाची कसोटी गौण लेखून, भलत्याच गोष्टींवर भर देण्यात येऊं लागला म्हणजे तो प्रकार विवेकहीनतेच्या सदरांत जमा होऊं लागतो !

वर ज्या गप्पांचा उल्लेख करण्यांत आलेला आहे त्यांत तथ्य किती हें निश्चितपणें सांगण्याचा अधिकार त्या वेळीं इंग्लंडमध्यें असलेल्या जाणत्या माणसांचा आहे. जबलपूरचे बॅ. ग्यानचंद वर्मा हे सावरकरांच्या अगोदर इंग्लंडला गेलेले होते आणि 'इंडिया हाऊस' मधून चालणाऱ्या सर्व उपद्व्यापांत ते सावरकरांचे विश्वासू सहकारी म्हणून वागत होते. प्रस्तुत चरित्रलेखकानें दिनांक ७-११-४२ रोजीं जबलपूर मुक्कामीं बॅरिस्टर महाशयांची भेट घेतली. त्या वेळीं, या गप्पांच्या बाबतींत त्यांची माहिती काय आहे, असा स्पष्ट प्रश्न त्यानें टाकला. या प्रश्नाला श्री. ग्यानचंद वर्मा यांनीं दिलेलें उत्तर या सर्व गप्पा बंद पाडणारें आहे.

If Savarkar had any sweet heart, his country was the only sweet heart he had.

( सावरकरांना जर कोणती एकादी गोष्ट प्रिय असेल तर ती फक्त मातृभूच होय. ) असें सर्व संशयांचा उच्छेद करणारें उत्तर श्री. ग्यानचंद वर्मा यांनीं दिलेलें आहे. ज्या मित्राची बनावट सही करून आपण सावरकरांना बनविलें अशी शेखी इंग्लिश पोलिसांनीं मारली ते मित्र म्हणजे श्री. निरंजन पाल हे असावेत. पण सावरकर फ्रान्सला येऊन राहिल्यापासून श्री. निरंजन पाल यांचीं पत्रें त्यांना एकसारखीं येतच होतीं. निरंजन पालसारख्या जिवलग मित्राचें पत्र आल्यावर पूर्वींच्या पत्रव्यवहाराशीं त्याचा कितपत संबंध जुळतो याचा विचार न करितां, एका पत्रांतील तुटक सूचनेवर भिस्त ठेवून सावरकरांनीं एकादा निर्णय घेतला असेल, ही गोष्ट सावरकरांच्या धोरणी व हिकमती स्वभावाशीं जुळणारी नाहीं.

बॅ. ग्यानचंद वर्मा यांच्यासारख्या निकटवर्ती सहकाऱ्याला जी गोष्ट कळली

नाहीं अगर खरी वाटली नाहीं ती विश्वासार्ह समजून, चांगल्या चांगल्या माणसांनीं आपली दिशाभूल करून घेण्याला प्रवृत्त व्हावें हें नवल होय. पण एका अर्थी यांत नवलहि नाहीं. रोखठोक बुद्धिवादानें आपल्या राजकीय प्रतिपक्षाचा पराभव करतां येत नाहीं असें दिसूं लागतांच पोलिसांनीं पिकविलेल्या गटारगप्पांना वेदवाक्याचें महत्त्व द्यावयाचें आणि ' जितं मया ' हें समाधान भोगावयाचें ही हिंदी राजकारणांतील एक अनिष्ट प्रवृत्तीच आहे.

आपण फरान्समध्यें विलासोपभोगासाठीं राहिलों नाहीं, प्रकृति सुधारणें हाच आपला हेतु आहे असा विश्वास सावरकरांना वाटत होता हें खरें; पण वर त्यांच्या ज्या मन:स्थितीचें वर्णन केलेलें आहे ती मन:स्थिति त्यांना प्रकृतीच्या निमित्ानेंही पॅरिसमध्यें राहूं देईना. अखेरीस त्यांनीं इंग्लंडला जाण्याचा बेत ठरविला व तो बेत अंमलांत आणण्याची तारीखहि त्यांनीं सर्वांना कळविली. सावरकर इंग्लंडमध्यें जातांच त्यांना अटक होणार व त्यांचें पुढें काय होईल हें बराच काळपर्यंत अनिश्चित राहणार हें सर्वांनाच माहीत असल्यामुळें सावरकरांना निरोप देतांना सगळ्यांचेंच हृदय भरून आलें. पं. शामजी कृष्णवर्मा हे इतरांशीं वागतांना कांहींसे तऱ्हेवाईकपणानें वागत असत. पैशांच्या बाबतींत त्यांना पुष्कळांचे भिन्नभिन्न अनुभव आल्यामुळें, ते कवडीचुंबक बनले आहेत असा भास व अनुभव पुष्कळांच्या पदरीं पडत असे. या पैशांच्या व्यवहारामुळेंच पंडितजी व लाला हरदयाळ यांच्या दरम्यान या सुमारास भयंकर तेढ उत्पन्न झालेली होती. इतरांशीं अशा पद्धतीनें वागणारे— व ही तरुण मंडळी आपलें नेतृत्व मानीत नाहींत म्हणून मनांत धुसफुसणारे पंडितजी सुद्धां सावरकरांच्या कर्तबगारीवर खूष असत. सावरकरांनीं हिंदुस्थानला जाण्यापेक्षां इंग्लंडला जावें असें त्यांनीं सुचविलें असलें तरी, सावरकरांनीं फ्रान्स सोडूं नये असेंच त्यांना खरोखर वाटत होतें. आपण पंडितजींना भेटत राहिलों तर त्यांना न पटणाऱ्या आपल्या निश्चयाची वाच्यता आपल्याला करावी लागेल हें ओळखून, सावरकर अखेरीअखेरीस त्यांची भेट घेण्याची टाळाटाळ करूं लागले. सावरकरांनीं पॅरिस सोडलें त्यापूर्वी एक आठवडावर त्यांची व पंडितजींची भेट झालेली नव्हती, हें पंडितजींनीं दि. १५-३-१९१० रोजीं श्री. अय्यर यांना लिहिलेल्या पत्रावरून[1] स्पष्ट होत आहे.

राणाजी, त्यांचें सहृदय जर्मन कुटुंब, त्यांचा छोटा मुलगा रणजी, कामाबाई वगैरेंचा निरोप घेऊन सावरकर पॅरिस सोडून निघाले. त्यांची प्रकृति पुरती सुधारलेली नव्हती. त्यांना जडलेली ब्रॉंकाइटस्ची व्यथा अद्यापि शिल्लकच होती. ह्यामुळें लंडनपर्यंत त्यांच्या बरोबर कोणीतरी जाणें अवश्य आहे असें सर्वांना वाटलें. सावरकर पॅरिसहून निघाले त्या वेळीं पेरिन बेन कॅप्टन ह्याहि त्यांच्याबरोबर निघाल्या.

---

1 The Marhatta 23-5-1941.

## प्रकरण ९ वें

# इंग्लंडमधील कारावास

रविवार दि. १३-३-१९१० रोजीं सावरकर पॅरिसहून निघाले ते रात्रीं ८ वाजण्याच्या सुमारास इंग्लंडांत आले. त्यांना व्हिक्टोरिया स्टेशनवर उतरावयाचें होतें. या स्टेशनच्या आधींच्या स्टेशनवर त्यांना कांहीं पोलीस दिसले; पण, येथें त्यांना अटक करण्यांत आली नाहीं. पेरिन बेन कॅप्टन यांना आपल्या अटके-नंतर त्रास होऊं नये यासाठीं सावरकरांनीं वाटेंत आपल्या व त्यांच्या सामानाची वेगवेगळी बांधाबांध करून टाकली होती. ते व्हिक्टोरिया स्टेशनवर उतरले तों इंग्लंड-च्या गुप्त पोलिस खात्यांतले इन्स्पेक्टर्स मॅककार्थी व पार्कर हे त्यांच्या स्वागताला तयारच होते! सावरकर स्टेशनच्या वेटिंग रूममध्यें शिरले तोंच त्यांनीं आपल्या जवळचें वॉरंट त्यांना वाचून दाखविलें. पेरिन बेन कॅप्टन ह्यांनीं आपल्याबरोबर गाडींतून उतरूं नये असें सावरकरांनीं त्यांना बजाविलें होतें. बरोबर असलेल्या या बाई कोण असा प्रश्न या इन्स्पेक्टर्सनीं सावरकरांना विचारला. तेव्हां त्यांनीं इतकेंच सांगितलें कीं, त्या पॅरिसमधील माझ्या ओळखीच्या आहेत. इकडे येतांना त्यांना कोणाची तरी सोबत पाहिजे होती म्हणून त्या मजबरोबर आल्या; यापलीकडे त्यांचा माझा कांहींहि संबंध नाहीं. हिंदुस्थानांत राजद्रोहाचा गुन्हा केल्याचा व खुनाला मदत केल्याचा सावरकरांवर आरोप असून ते 'फरारी' झाले असल्यामुळें त्यांना सदर वॉरंटाअन्वयें पकडण्यांत यावें, असा इन्स्पेक्टर्सजवळच्या वॉरंटाचा आशय होता. १९०६ सालीं राजरोसपणें पासपोर्ट मिळवून हिंदुस्थानांतून इंग्लंडांत आलेले व या वेळींहि पॅरिसहून निर्भयपणें इंग्लंडला परत आलेले सावरकर 'फरारी' ( Fugitive ) समजण्यांत यावे आणि त्यांना 'फरारी'च्या कायद्याअन्वयें (Fugitive Offenders' Act ) पकडण्यांत यावें ही काय नवल गोष्ट आहे असा प्रश्न या ठिकाणीं अनेकांच्या मनांत उत्पन्न होईल. न्यायप्रियतेबद्दल जगभर शेखी मिरवणाऱ्या इंग्लंडच्या सर्वश्रेष्ठ न्यायालयापर्यंत हा प्रश्न भिडविला जाऊनहि वरील नवलाईचें समर्पक उत्तर देण्यांत आलें नाहीं, एवढीच गोष्ट या ठिकाणीं सांगून ठेवणें पुरेसें आहे. वेटिंग रूममध्यें सावरकरांना वॉरंट वाचून दाखविण्यांत आलें तेव्हा ते हंसत हंसत 'Yes Sir' एवढेंच म्हणाले. या ठिकाणीं अगर या दिवशीं रात्रीं पोलिस ठाण्यावर नेण्यांत आल्यानंतरहि त्यांनीं तोंडांतून ब्रहि काढला नाहीं.

सावरकरांना 'बो स्ट्रीट' पोलिस ठाण्यावर नेण्यांत आल्यावर त्यांच्या बरो-बर असलेल्या सामानाची झडती घेण्यांत आली. त्यांना पकडणाऱ्या अधिकाऱ्यां-

पैकीं मि. पार्कर याची पुढें दि. ७-१०-१९१० रोजीं मुंबई येथें स्पेशल ट्रायब्यूनल पुढें साक्ष झाली. सावरकरांच्या बरोबर सामान काय होतें, ही माहिती पार्करनें या साक्षींत सांगितली. सावरकरांच्या बरोबर जी ट्रंक होती तिच्यावर V. V. S Iyer असें नांव होतें.या पेटींत 'War of Independence' या पुस्तकाच्या दोन प्रती, 'Choose, Oh Indian Princes' या पत्रकाच्या सात प्रती, मॅझिनीच्या चरित्राची एक प्रत, गॅरिबाल्डीच्या चरित्रासंबंधीचे कांहीं कागद, 'Indian Sociologist' चे कांहीं अंक, वर्तमान पत्रांतील कात्रणांची एक वही, सावरकरांचें एक छाया चित्र इत्यादि वस्तू सांपडल्याचें पार्करनें आपल्या साक्षींत सांगितलें. पार्करच्या या साक्षींत पुढें न आलेली एक महत्त्वाची गोष्ट सांगण्यासारखी आहे. सावरकरांच्याजवळ सांकेतिक लिपींत लिहिलेला एक कागद होता व झडतीच्या वेळीं तो पोलिसांच्या हातीं लागला. सांकेतिक लिपींत या कागदावर काय लिहिलेलें आहे हें सावरकरांनीं सांगावें म्हणून पोलिसांनीं पुष्कळ प्रयत्न केले. हाल केल्यानें तरी याविषयींची कांहीं माहिती हातीं लागेल या आशेनें पोलिसांनीं त्याहि मार्गाचा पुढें अवलंब केला. पण, शेवटीं त्यांना या बाबतींत निराश व्हावें लागलें.

दिनांक, १४-३-१९१० रोजीं सावरकर यांना 'बो स्ट्रीट' पोलिस कोर्टांत मॅजिस्ट्रेट सर ए. डी. रट्झेन यांच्या पुढें उभें करण्यांत आलें. या दिवशीं दोन्ही पक्षांच्या वकिलांना खटल्याचे सर्व कागद मिळालेले नसल्यामुळें, खटल्याचें काम दिनांक २१ मार्चपर्यंत स्थगित ठेवण्यांत आलें. पुढील तारखेला कोर्टांत उपस्थित राहण्याविषयींची लेखी संमति सावरकरांनीं द्यावी, याहून अधिक जामिनकी कोर्टानें मागूं नये, एवढ्या खात्रीवर सावरकरांना मुक्त करण्यांत यावें असा अर्ज कोर्टाला करण्यांत आला. पण, खटल्याचें निश्चित स्वरूप काय आहे हें समजेपर्यंत या बाबतींत आपण कांहींहि करूं इच्छित नाहीं, असें मॅजिस्ट्रेटनें सांगितलें. इकडे, सावरकरांना अटक झाल्याची बातमी त्यांच्या लंडन येथील सहकाऱ्यांना व मित्रांना कळल्याबरोबर त्यांनीं सावरकरांची बाजू बळकट करण्याच्या दृष्टीनें खटपटी सुरू केल्या. 'Indian Sociologist' पत्राचा पूर्वींचा मुद्रक गाय ऑल्ड्रेड याच्या नेतृत्वाखालीं 'सावरकर डिफेन्स कमिटी' नेमण्यांत आली. वर्मा, अय्यर,चट्टोपाध्याय वगैरे मंडळी या कमिटीचें काम व सावरकरांसंबंधींचे इतर सर्व काम अत्यंत मनोभावें करूं लागली. 'राजनैतिक नौसरबाज' या पुस्तकांत श्री. ग्यानचंद वर्मा यांनीं या विषयाबाबत पुढील उद्गार काढले आहेत : [१]

*और, दूसरे रोजसे हम तीन आदमी सावरकरके मुकदमेकी अदालत में पैरवी करते रहे। सॉलिसिटरके यहां जाना, नकले लेना, पेशी के दिन सावरकरके लिये खाना वगैरह ले जाना, कपडे बदलने के लिये कपडे ले*

---

१ पृ. २०-२१.

*जाना, वो कुल काम आयर जिनको मैं उपर जिक्र कर चुका हूं और चटोपाध्याय और मै करता रहा।*

सावरकरांना मॅजिस्ट्रेटपुढें उभे करण्यांत आलें त्याच्या दुसऱ्या दिवशीं श्री. अय्यर यानीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना धाडलेलें पुढील पत्र वाचनीय आहे :

81 Clarandon Road,
No'th Kensington, West.
15 th March, 19.0.

Dear Punditji,

I am most grieved to have to write to you that our dear Savarkar has been arrested as soon as he got down from the Express train, on charges of abetment of murder and sedition in India. I would have written to you vesterday but I thought I should wait till I saw Savarkar today. I send you a cutting from the Daily Telegraph' which will tell you accurately what happened in Court yesterday. A solicitor was appointed and he conducted the case yesterday He told me that if proper counsel was appointed, the trial can be made to take place here when of course his innocence can be established beyond the shadow of a doubt. Any legal point that occurs to you please send to me, so that I might instruct solicitor and barrister properly

This morning I saw Savarkar and he was the same as ever expect that we had to converse through the iron bars. But I felt it deeply—too deeply—that he should be interned in the English Jail. A lion in the toils of the hunter! He said, the jail Superintendent etc. treated him with due attention and care and that he had nothing to complain of under the circumstances. I know you as well as Mrs. Shamji would feel so much to find that but the day before yesterday he was with you safe and today !......There is no use crying over spilt milk. We must do our best to see that he is not sent to India. If once he is sent, we shall see no more of him and one of the dearest and most devoted sons of the Motherland would be rotting away in the cells of a Malerious Island. It was pathetic when Savarkar said this morning, if he were to be taken to the Andamans, he would have the happiness of seeing his elder brother. I hope that melancholy sort of happiness will not be his, but that, he will be released and will work out the salvation of his country according to his light.

My Vande Matarams to Mrs. Shamji and all friends.

We are collecting funds for his defence. I request you to send any moneys that you intend to contribute towards the fund to me.

The total cost would be something near £ 200 as far as it appears at present. Vande Mataram.

**V. V. S. Aiyer**

प्रिय पंडितजी,

आपले प्रिय सावरकर गाडींतून उतरले न उतरले तोंच त्यांना अटक करण्यांत आली हें लिहिण्याचा प्रसंग मजवर आल्यामुळें मला अतिशय दुःख होत आहे. खुनाला प्रोत्साहन दिल्याचा व हिंदुस्थानांत राजद्रोह केल्याचा असे दोन आरोप त्यांच्यावर ठेवण्यांत आलेले आहेत. मी आपल्याला कालच पत्र लिहिणार होतों. पण आज सावरकरांची भेट घेतल्यावर पत्र लिहावें हा विचार मनांत आल्यामुळें थांबलों. ‘ डेली टेलिग्राफ ’ पत्राचें एक कात्रण या पत्रासोबत धाडलें आहे. काल कोर्टांत काय झालें याची अचूक कल्पना या कात्रणावरून आपल्याला करतां येईल. एक वकील नेमून काल काम चालविण्यांत आलें. या गृहस्थानें असें मत दिलें कीं, बचावाची व्यवस्था नीटपणें करण्यांत आली तर सावरकरांवरील खटला इंग्लंडांतच चालावा अशी व्यवस्था घडवून आणतां येईल. तसें झालें तर सावरकरांचें निरपराधित्व निर्विवादपणें सिद्ध करतां येईल, असाहि या गृहस्थांचा अभिप्राय आहे. आपल्याला कांहीं कायदेशीर मुद्दा सुचला तर तो आपण मजकडे धाडा; म्हणजे सॉलिसिटर–बॅरिस्टरला मला योग्य त्या सूचना देतां येतील.

आज सकाळीं मी सावरकरांना भेटलों. त्यांच्यामध्यें फरक असा कांहींच झालेला नाहीं. पूर्वींप्रमाणें कसलाहि आडपडदा न ठेवतां आम्हांला बोलतां मात्र आलें नाहीं. सावरकर लोखंडी गजाच्या आंत व मी बाहेर अशा अंतरावरून आम्ही बोलत होतों ! सावरकर इग्लंडमधील तुरुंगांत अडकले हें पाहून मला दुःख वाटलें–माझें मन फारच व्यथित झालें. पारध्यानें पसरलेल्या जाळ्यांत सिंह अडकावा तसा प्रकार झाला. ‘तुरुंगाचा पर्यवेक्षक वगैरे लोक माझी योग्य ती काळजी घेत आहेत’ असें सावरकर म्हणाले. ‘प्राप्त परिस्थितीचा विचार करतां तक्रार करण्यासारखें कांहीं नाहीं,’ असेहि उद्‌गार त्यांनीं काढले. परवां सावरकर आमच्या सन्निध सुरक्षित होते आणि आज ते या स्थितींत सांपडले आहेत हा विचार मनांत आला कीं, आपल्याला व आपल्या गृहिणीला किती दुःख होईल, हें मी जाणतों...पण झाल्या गोष्टी-बद्दल हळहळत बसून निभाव लागावयाचा नाहीं. सावरकरांना हिंदुस्थानांत धाडलें जाणार नाहीं अशी व्यवस्था घडवून आणण्याची पराकाष्ठा आपण केली पाहिजे. जर का त्यांना हिंदुस्थानांत धाडण्यांत आलें तर ते फिरून आपल्या नजरेस पडूं शकणार नाहींत आणि आपल्या मातृदेशाचा एक प्यारा आणि निष्ठावन्त सुपुत्र अंदमानच्या रोगट हवेंत कोठडींत सडत पडेल ! अंदमानला नेलें तर मला माझ्या ज्येष्ठ बंधूंचें दर्शन घेण्याचें सौख्य मिळेल, असे उद्‌गार सकाळीं सावरकरांनीं काढले. ते ऐकतांच माझ्या जीवाची कालवाकालव झाली. असलें उदासवाणें सौख्य त्यांना लाभणार नाहीं, त्यांची मुक्तता होईल आणि आपल्या मताप्रमाणें देशविमोचनाचें कार्य ते करीत राहतील, अशी आशा मला वाटत आहे.

आपल्या गृहिणीला व तेथील मित्रमंडळींना माझे प्रणाम.

सावरकरांच्या बचावासाठीं आम्ही निधि गोळा करीत आहों, त्यासाठीं तुम्हांस जें कांहीं द्रव्य धाडावयाचें असेल तें तुम्ही मजकडे पाठवावें अशी विनंती आहे. आजच्या अंदाजाप्रमाणें या बाबतींतला एकूण खर्च जवळजवळ २०० पौंड होईल, असें वाटतें.

वंदे मातरम् ।

आपला,

व्ही. व्ही. एस्. अय्यर

श्री. अय्यर यांनीं या पत्रांत पंडितजींकडे सावरकरांच्या बचावासाठीं उभारण्यांत आलेल्या निधीसाठीं द्रव्याची मागणी केली. हें पत्र पोंचण्याआधींच पंडितजींनीं अय्यर यांच्या नांवें या कामासाठीं १० पौंड पाठविले असें पंडितजींच्या एका पत्रावरून दिसतें. श्री. अय्यरप्रभृति मंडळींना या खटल्याच्या कामांत पुढें दोन तीन महिनेपर्यंत एकसारखें लक्ष घालावें लागत होतें. दि. २१-६-१९१० रोजीं श्री. निरंजन पाल यांनीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना धाडलेल्या पत्रांतल्या पुढील वाक्यावरून हें स्पष्ट दिसतें कीं, सावरकरांची ही मित्रमंडळी शेवटपर्यंत त्यांच्यावरील खटला हिरीरीनें लढवीत होती :

The cause of the delay lies in my illness, partly due to Savarkar 's appeal, as you know, owing to Chattopadhya's absence from London, I have to make every arrangement about Savarkar and even now I can hardly breathe.

(आपल्या पत्राचें उत्तर धाडण्याला मजकडून विलंब झाला याचें कारण माझा आजार हें आहे. हा आजार अंशतः सावरकरांच्या अपिलांतून निघालेला आहे. चट्टोपाध्याय लंडनबाहेर गेलेले आहेत हें आपण जाणतांच. त्यामुळें सावरकरांसंबंधींची सर्व व्यवस्था मलाच पहावी लागते. सध्यां देखील, मला पुरतेपणीं श्वास घेण्यालाहि फुरसत सांपडत नाहीं.)

सोमवार दि. २१ मार्च रोजीं सावरकरांना फिरून बो स्ट्रीट पोलिस कोर्टांत उभें करण्यांत आलें. या दिवशीं मॅजिस्ट्रेट महाशयांनीं हिंदुस्थानांतून ब्रिटिश सरकारला आलेली एक तार कोर्टांत वाचून दाखविली. सावरकरांना हिंदुस्थानांत नेण्यासाठीं ज्या पोलिस अधिकाऱ्यांची योजना करण्यांत आली होती ते दि. २४ मार्च रोजीं मुंबईहून निघत असून, दि. ९ एप्रिल रोजीं ते लंडनला पोंचतील, असें या तारेंत लिहिलेलें होतें. या दिवशीं खटल्याचें प्रत्यक्ष काम चाललेंच नाहीं. सावरकर यांना कच्च्या कैदेंत ठेवण्याचा गुरुवारपर्यंत अंमलांत राहणारा हुकूम मॅजिस्ट्रेटनें या दिवशीं दिला. आठवडाभर कच्च्या कैदेंत ठेवण्याचा रीतसर हुकूम त्या तारखेला देईन असें मॅजिस्ट्रेटनें सांगितलें. दिनांक २१ मार्च रोजीं सावरकरांचे वकील मि. रेजिनॉल्ड व्हॉगन यांनीं कोर्टाकडे एक अर्ज केला. ब्रिक्स्टन येथील पक्क्या व भव्य तुरुंगांत सावरकरांची

रवानगी करण्यापूर्वी त्यांच्या दोन मित्रांना त्यांची भेट घेतां येईल, असें मॅजिस्ट्रेटनें या तारखेला सांगितलें.

सावरकरांना लंडन येथें पकडल्यापासून, त्यांना 'मोरिया' बोटीवर चढविण्यांत आलें तेथपर्यंतच्या तीन साडेतीन महिन्यांच्या काळांत त्यांना तुरुंगांतून पळवून नेण्याविषयींचे कांहीं तरी प्रयत्न झाले, ही गोष्ट स्पष्ट आहे. अशा प्रयत्नांतला पहिला प्रयत्न मार्च महिन्यांत दिनांक २२–२३ च्या आगेमागे झाला असावा, असें दिसतें. या सुमारास सावरकर ज्या ठिकाणीं कैदेंत म्हणून होते तें ठिकाण तुरुंग म्हणून ओळखलें जात असलें तरी पक्क्या तुरुंगांत जो सायसंगीन बंदोबस्त असतो, तो त्या ठिकाणीं नव्हता. आपल्या मर्जीप्रमाणें पहारा करणारा एक शिपाई जो बंदोबस्त ठेवील त्यापलीकडे मोठासा बंदोबस्तहि या ठिकाणीं नव्हता. सावरकरांच्या मित्रांपैकीं दोघांनीं त्यांना या ठिकाणीं भेटावें अशी परवानगी मिळाल्यावर, या परवानगीचा फायदा घेऊन सावरकरांना सोडवितां येईल कीं काय असा विचार अय्यर, निरंजन पाल, चटोपाध्याय, वर्मा प्रभृतींच्या मनांत घोळूं लागला. या ठिकाणीं बंदोबस्ताला असलेल्या एकुलत्या एक शिपायाचें मन सामदामादि उपायांनीं पोखरण्याच्या कामीं यश आलें तर, आंत बसलेला इसम सावरकर आहे, वर्मा आहे कीं पाल आहे हें पाहण्याचा खटाटोप तो करणार नाहीं; असा या मंडळींचा समज होता. सावरकरांच्या जागीं दुसऱ्या कोणी तरी तुरुंगांत बसावें, तुरुंगांतून निसटतांच सावरकरांना लंडनहून लांबविण्याची सर्व जय्यत तयारी आगाऊच करून ठेवावी व या तयारीच्या साहाय्यानें सावरकरांनीं एकाद्या बंदरसहीच्या ठिकाणीं जाऊन जर्मनी—वगैरे देशच्या एकाद्या बोटीवर चढावें असा व्यूह रचण्यांत आला होता. सावरकर बाहेर पडूं शकले असते तर त्यांना घेऊन जाणाऱ्या मोटारीची—इतकेंच नव्हे तर त्यांना घेऊन जाणाऱ्या आगबोटीचीहि—व्यवस्था करून ठेवण्यांत आलेली होती; पण, ही अवांतर व्यवस्था झाली तरीहि, सावरकर बाहेर पडूं शकले नाहींत. सावरकरांच्या ऐवजीं तुरुंगांत कोणी बसावें याबद्दलच्या वाटाघाटींत कांहीं वेळ गेला असावा. शरीराची उंची, शरीराचा स्थूलपणा इ. दृष्टींनीं सावरकरांच्या मित्रांपैकीं कोणाचें सावरकरांशीं जास्तींत जास्त साम्य जुळतें या मुद्याची चर्चा झाली असावी. निरंजन पाल व सावरकर यांच्यामध्यें इतर पुष्कळशा बाबतींत साम्य असलें तरी, निरंजन बाबू हे सावरकरांच्या मानानें पुष्कळच अधिक उंच असल्यामुळें या कामीं त्यांची योजना करणें अवघड होतें. श्री. ग्यानचंद वर्मा, श्री. अय्यर ही मंडळी बांध्यानें कृश होती इतकेंच नव्हे तर त्यांच्या व सावरकरांच्या तोंडवळयांत साम्य असें कांहींच नव्हतें. यामुळें त्यांचाहि या कामीं उपयोग होण्यासारखा नव्हता. विचार होता होतां, शेवटीं असें ठरलें कीं, श्री. वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय यांची या कामीं योजना करणें हें सर्वांत कमी धोक्याचें आहे. इतकें ठरल्यावर, श्री. चट्टोपाध्याय यांनींच पहारेकऱ्याशीं सूत जमविण्याचा प्रयत्न केला असावा. हा

पहारेकरी वर्गांशीं गोड गोड बोलत असला तरी, त्याचें धोरण नुसतें दुहेरीच नव्हे तर दुधारी असल्याचा चट्टोपाध्याय यांना संशय आला असावा. या माणसाच्या नादीं लागून अखेर सारा फजितवाडा होईल, 'इतं च नास्ति परं न लभ्यते' इतकाच कटु अनुभव आपल्या पदरीं पडेल, सावरकर निसटून जाण्याच्या ऐवजीं इतरांवरहि शत्रूच्या अटकेंत पडण्याचा प्रसंग ओढवेल, अशी साधार भीति श्री. चट्टोपाध्याय यांना वाटूं लागल्यामुळें, त्यांनीं हा नाद सोडून दिला असावा. सावरकरांना ब्रिक्स्टन येथील भक्कम तुरुंगात डांबण्यांत आलें त्यापूर्वीं चट्टोपाध्याय यांनीं जेव्हां त्यांची भेट घेतली तेव्हां घडलेल्या प्रकाराची वार्ता त्यांनीं सांकेतिक पद्धतीनें सावरकरांना कळविली असावी.

बुधवार दिनांक १३ एप्रिल रोजीं सावरकर यांना फिरून बो स्ट्रीट पोलिस कोर्टांत उभें करण्यांत आलें. हिंदुस्थानांतून जाब-जबाबांचे जे कागद यावयाचे होते ते या सुमारास इंग्लडांत आले होते. या शेंकडों कागदांच्या नकला आपल्याला परवांपरवांपर्यंत मिळूं शकल्या नाहींत, पुढील तारखेला सुद्धां सगळे कागदपत्र वाचून आरोपीतर्फे काम चालविण्याची तयारी करणें सोपें नाहीं इ. मुद्दे सावरकरांतर्फे काम चालविणारे मि. व्हॉगन यांनीं मांडले. सावरकरांना जामिनावर मुक्त करण्यांत यावें अशी विनंति मि. व्हॉगन यांनीं पुनः केली, तेव्हां मॅजिस्ट्रेट म्हणाले: पुढील तारखेला मी या प्रश्नाचा विचार करीन. दिनांक २० एप्रिल ही ती पुढील तारीख होती. कागदपत्र वाचून पुरे झाले नाहींत या कारणास्तव याहि तारखेला खटला चालला नाहीं; मात्र या तारखेला जामीन अर्जाचा सोक्षमोक्ष झाला. अशा प्रकारच्या खटल्यांत आरोपीला जामिनावर खुलें करण्याचा प्रघात नाहीं असें मॅजिस्ट्रेटनें सांगितलें. जामिन अर्जाचा असा निकाल लागल्यानंतर सावरकरांची पाठवणी ब्रिक्स्टनच्या भक्कम तुरुंगाकडे करण्यात आली असावी, असा तर्क करतां येतो.

सावरकरांना तुरुंगांतून पळविण्याचा जो एक प्रयत्न यापूर्वीं करण्यांत आला त्याची माहिती, वृत्तान्ताची जुळणी शक्य तोंवर कालक्रमवार होण्याच्या दृष्टीनें, यापूर्वीं देण्यांत आली आहे. इंग्लंडमध्यें तुरुंगांत असतांना सावरकरांनीं ज्या कविता लिहिल्या त्यांतली पहिली कविता सुद्धां त्यांची ब्रिक्स्टन जेलमध्यें रवानगी होण्यापूर्वीं रचिली गेली असावी असा प्रस्तुत लेखकाचा निष्कर्ष असल्यामुळें, त्या कवितेची ओळखहि याच ठिकाणीं करून घेणें क्रमप्राप्त आहे 'माझें मृत्युपत्र' ही प्रसिद्ध कविता सावरकरांनीं आपल्या मातृ-तुल्य येसूवहिनींना उद्देशून लिहिलेली आहे. स्वतःला झालेल्या अटकेची माहिती कळविणें व वहिनींनां व आपल्या पत्नीनें धीर सोडूं नये, म्हणून त्यांना या अटकेचें रहस्य उलगडून सांगणें हा या कवितेचा प्रधान हेतु असल्यामुळें. अटकेनंतर शक्यतों लौकरच त्यांनीं ही कविता लिहिली असली पाहिजे, हें उघड आहे. यावरून असाच निष्कर्ष निघतो कीं, अटक झाल्यापासून ब्रिक्स्टनच्या कारागृहांत पाठवणी होईपर्यंत जो सुमारें महिनाभराचा काळ गेला,

त्यांतच ही कविता रचिली गेली असावी. अशी जिव्हाळ्याची कविता शक्यतों लौकर लिहिली गेली असेल या तर्काला आणखीहि एका तर्कानें बळकटी आणतां येते. तुरुंगांतून हवे ते व हवे तितके कागदपत्र व हवें तितकें लिखाण बाहेर धाडण्याच्या कामीं हिंदी क्रांतिकारकांच्या या अग्रेसरानें पुढें पूर्ण यश मिळविलें हें खरें असलें तरी, कारागृहांत कोंडून पडण्याचा त्यांचा अनुभव या वेळीं ताजाच होता हें विसरून चालणार नाहीं. ब्रिक्स्टनच्या भक्कम कारागृहांतून कांहीं कागद बाहेर धाडण्यापेक्षां तितकें भक्कम नसलेलें पाहिलें कारागृहच त्या दृष्टीनें अधिक सोईचें आहे हें ओळखून त्यांनीं ही कविता या पहिल्या कारागृहांतच लिहून ठेविली असेल व मार्चच्या शेवटीं शेवटीं त्यांचे जे दोन मित्र त्यांना तुरुंगांत भेटावयाला आले असतील त्यांच्याबरोबर त्यांनीं ही कविता बाहेर धाडून दिली असेल, हेंच जास्त युक्तिसंमत आहे. ही कविता ब्रिक्स्टन जेलमध्यें लिहिली गेली असें आजवर अनेकांनीं मानिलें आहे. प्रस्तुत लेखकाला तें पटत नाहीं. ज्या दोन स्त्रियांच्या सांत्वनासाठीं ही कविता लिहिली गेली त्यांपैकीं वहिनींचा उल्लेख या कवितेंत अनेकवार करण्यांत आला आहे. वहिनी व विनायकरावांचें कुटुंब माई या दोघींचा उल्लेख कवितेच्या शेवटीं शेवटीं एकवारच करण्यांत आला आहे; म्हणून तो श्लोक प्रथम उद्धृत करणें युक्त ठरणार आहे.

> माझा निरोप तुज येथुनि हाच देवि
> हा वत्स वत्सल तुझ्या पदिं शीर्ष ठेवी।
> सप्रेम अर्पण असो प्रणती तुम्हांतें
> आलिंगन प्रियकरा मम अंगनेतें ॥

या कवितेंत आरंभीं जें चांदण्यांतल्या मित्रसंमेलनाचें वर्णन केलें आहे तें वाचीत असतांना, नाशिकांत गोदावरीच्या तीरीं असलेल्या एकाद्या भव्य मंदिराच्या गच्चीवर बसून-अगर एकाद्या घांटावर प्रशस्तपणें बसून–गप्पागोष्टी करीत, आपण तरुणतरुणींच्या मेळाव्यांत भोजनाचा व रोमांचकारी कथाकाव्यांचा आस्वादच घेत आहों कीं काय, असा भास होतो. 'सा रम्या नगरी महान् स नृपतिः' या प्रसिद्ध श्लोकाचें अनुकरण करून सावरकरांनीं पुढील श्लोकांच्या आश्रयानें या संमेलनांचें रहस्य वहिनींच्या मनावर ठसविलें आहे :

> तो काल रम्य मधुरा प्रिय संगती ती
> तें चांदणें, नवकथा-रमणीय रात्री
> तें ध्येय दिव्य निजमातृविमोचनाचें
> तो उग्र निश्चयहि ते उपदेश साचे
> झाल्या तदा प्रियकरांसह आणभाका
> त्या सर्व देवि वहिनी स्मरती तुम्हां का ?
> 'बाजी प्रभू ठरूं' वदे युव-संघ सर्व
> 'आम्ही चितोरयुवती' युवती सगर्व

या कवितेच्या प्रथम भागांत वर्णिलेला संमेलनाचा प्रसंग सुमारें आठ वर्षांपूर्वीचा आहे असें :

नाहीं पुरीं उलटलीं जरि आठ वर्षें
तों कार्यसिद्धि इतुकी मन कां न हर्षे ?

या चरणांत म्हटलें असल्यामुळें, असेंहि अनुमानित होतें कीं मॅट्रिकच्या परीक्षेंत उत्तीर्ण होऊन सावरकर उच्च शिक्षणासाठीं पुण्यास गेले, त्या सुमारास नाशिकास झालेला एकादा समारंभच त्यांच्यापुढें असावा. या आठ वर्षांत देशांत व देशांतल्या तरुणांत केवढी मानसिक क्रांति झाली याची कल्पना पुढील श्लोकांत चित्रित झाली आहे.

आसेतुपर्वत उचंबळला स्वदेश
वीराकृती धरित टाकुनि दीन वेश
भक्तांचिया रघुपदीं झुलताति झुंडी
जाज्वल्य होयहि हुताशन यज्ञकुंडीं

या टोंकापासून त्या टोंकापर्यंत उचंबळलेला देश व त्या देशाच्या विमोचनासाठीं आठ वर्षेंपर्यंत झगडत असलेल्या वीराकृति एवढ्या मोघम वर्णनांत स्वातंत्र्य-संग्रामाचा केवढा ओजस्वी इतिहास सांठविलेला आहे, हें नीट समजलें कीं या ओळी किती अर्थगर्भ आहेत हें खऱ्या अर्थानें पटूं लागतें. बॉंब करण्याची विद्या युरोपांतून शिकून येऊन त्या विद्येचा प्रसार बंगालमध्यें केल्यामुळें अंदमानांत खितपत पडलेले हेमचंद्र दास व बारींद्र घोष इत्यादि तरुण, या विद्येमुळें हिंदी स्वातंत्र्यसंग्रामांत साधन-दृष्ट्या अद्ययावत्पणा आलेला आहे हें जगजाहीर करण्यासाठीं मुझफरपूर येथें पहिला बॉम्बचा धडाका उडवून फांशीं गेलेला खुदीराम बसू, स्वातंत्र्येप्सु राष्ट्राला फितुरी-सारखा दुसरा दुष्ट शत्रु असूं शकत नाहीं हें सत्य ओळखणाऱ्या सत्येंद्रनाथ बोस व कन्हैय्यालाल दत्त यांनीं सरकारसामील झालेल्या नरेंद्र गोस्वामीचा केलेला वध व त्यामुळें त्यांनीं स्वतः भोगलेला देहान्त, बंगाल्यांतल्या या भानगडींमुळें अचानक-पणें अज्ञातवासांत शिरून हालअपेष्टा भोगणारे सेनापति बापट, तरुणांतील स्वातंत्र्य-प्रेम चेतविल्यामुळें साबरमतीच्या कारावासांत देहदंड भोगून आलेले ‘ काळकर्ते ’ अण्णासाहेब परांजपे व या सर्वांच्या अग्रभागीं चमकणारे, मंडाले येथें नेऊन ठेवण्यांत आलेले लोकमान्य टिळक—अशा किती तरी देशभक्तांचीं चरित्रें या दोन ओळींच्या वाचनाबरोबर कल्पनेपुढें उभीं राहातात. देशस्वातंत्र्यप्राप्तीचा यज्ञ सफल व्हावा म्हणून त्यागाचें कंकण बांधून राहिलेल्या आपल्याला आजवर कोणत्या आहुती यज्ञकुंडांत टाकाव्या लागल्या याचें परिगणन पुढील चरणांत केलेलें आहे तें अगदीं यथार्थ आहे :

त्वत्स्थंडिलीं ढकलिली गृह-वित्त-मत्ता ।
दावानलांत वहिनी—नवपुत्र-कांता ।।

त्वत्स्थंडिलीं अतुल-धैर्य वरिष्ठ बंधु ।
केला हवी परमकारुण पुण्यसिंधु ॥
त्वत्स्थंडिलावरि बळी प्रिय बाल झाला ।
त्वत्स्थंडिलीं बघ अतां मम देह ठेला ॥
हें काय बंधु असतों जरि सात आम्ही ।
त्वत्स्थंडिलींच असते दिधले बळी मी ॥

भारतस्वातंत्र्यार्थ चाललेल्या या यज्ञांत आपलें कुल नष्ट झालें तर त्यामुळेंच तें कुल खरोखर धन्य व चिरंजीव ठरेल असा विश्वास व्यक्त करणाऱ्या पुढील ओळी फार उदात्त आहेत :

संतान या भरतभूमिस तीस कोटी ।
जे मातृ-भक्ति-रत सज्जन धन्य होती ॥
हें आपुलें कुलहि त्यामधिं ईश्वरांश ।
निर्वंश होउनि ठरेल अखंड वंश ॥

आपण चालविलेल्या कार्याचें इंगित ओळखून वहिनी प्रसंगोचित धैर्य दाखवितील व भारतीय अबलांची दिव्य परंपरा त्या कुंठित होऊं देणार नाहींत असा विश्वास व्यक्त करणाऱ्या पुढील चरणांतला उत्तरार्ध तर, प्रत्येक हिंदु कुटुंबांतल्या कुल-स्त्रियांना देण्यांत आलेला ओजस्वी संदेश म्हणून जतन करून ठेवण्याच्या योग्यतेचा आहे :

ऐसें विवंचुनि अहो वहिनी व्रतातें ।
पाळोनि वर्धन करा कुलदिव्यतेतें ॥
श्रीपार्वती तप करी हिमपर्वतीं तीं ।
कीं विस्तवांत जळल्या बहु राजपूती ॥
तें भारतीय अबला-बलतेज कांहीं ।
अद्यापि या भरत-भूमित लुप्त नाहीं ॥
हें सिद्ध होइल असेंचि उदार उग्र ।
वीरांगने तव सुवर्तन हो समग्र ॥

'वैनायक' वृत्तांत लिहिलेली 'मूर्ति दुजी ती' ही कविता सावरकरांनीं 'ब्रिक्स्टन जेलमध्यें लिहिली, असें समजलें जात आहे. स्वतः सावरकरांनींहि 'ब्रिक्स्टनच्या लंडन तेथिल तुरुंगांत असतांना मी 'दोन मूर्ति' म्हणून एक कविता केलेली होती' असें लिहून ठेविलेलें आहे.[1] पण बारकावे लक्षांत घेऊन बोलावयाचें तर असें म्हणावें लागेल कीं, ही कविता सावरकरांची ब्रिक्स्टन जेलकडे रवानगी होण्यापूर्वीं—म्हणजेच ते बो स्ट्रीट पोलिस ठाण्याच्या कैदेंत असतांना—रचलेली आहे.

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. ७१.

या कवितेच्या पहिल्या टप्प्यांत १११ ते १२० या ओळींत जें थंडीचें वर्णन केलेलें आहे, त्या थंडीचा अनुभव सावरकरांना मार्चमध्यें अटक झाल्यावर आरंभींच्या काळांतच आला असला पाहिजे. तुरुंगाचा अनुभव अगदीं ताजा असतांना, तुरुंगांतली थंडी आंगवळणी पडली नव्हती त्या वेळीं, या कवितेंत व्यक्त झालेले विचार सावरकरांना सुचले असें समजणेंच सयुक्तिक आहे. ही कविता प्रत्यक्ष रचण्याचा उद्योग पुढें अंदमानांत झाला असावा.

बो स्ट्रीट पोलिस कोर्टांत सुरू झालेलें सावरकरांवरील खटल्याचें काम दि. १२ मे १९१० पर्यंत रेंगाळत चाललें. दि. ३ एप्रिल १९१० रोजीं झालेल्या कामाच्या वेळीं सरकारतर्फे पुढें करण्यांत आलेल्या पुराव्यांत चतुर्भुज व कोरेगांवकर यांच्या जबाबांना स्थान मिळालें. बो स्ट्रीट पोलिस स्टेशनमध्यें झालेल्या झडतींत सावरकर यांच्याजवळ काय सांपडलें हें यापूर्वी सांगण्यांत आलें आहे. या दिवशीं झालेल्या साक्षीच्या वेळीं इन्स्पेक्टर पार्कर यानें कोर्टांत असें सांगितलें कीं सावरकर यांच्याजवळ " The Lion of the Punjab " हें पुस्तकहि होतें. सावरकरांनीं कोणाला तरी धाडलेलीं दोन पत्रें या दिवशीं पुराव्यांत दाखल करून घेण्यांत आलीं. पहिल्या पत्रावर ११-२-१९१० हा दिनांक घातलेला असून खालीं स्वाक्षरी म्हणून ' तात्या ' असें लिहिलेलें होतें. पॅरिसमधील मुक्कामांत सावरकर यानीं दिलेल्या एका व्याख्यानाची हकीकत पत्रात वर्णिलेली आहे, हें उघड आहे. पत्रांतील महत्त्वाचा भाग असा आहे :

Perhaps you will be pleased to hear that two Sundays ago, I read an essay on " How to organise a revolution " at our meeting and I had some difference of opinion about it. I will send that article later on to you. The difference arose because I told that we should not hesitate to be loyal outwardly and to work secretly. Our friend took a great objection to that. In Bengal, there are many societies which are working splendidly with this policy.

( पंधरवड्यापूर्वीच रविवारीं मी आमच्या साप्ताहिक बैठकींत एक निबंध वाचला हें कळल्यामुळें तुला कदाचित् बरें वाटेल. ' क्रांतीची संघटना कशी करावी ' हा निबंधाचा विषय होता. निबंधांतल्या विचारसरणीबद्दल माझा व इतरांचा मतभेद झाला. पुढें केव्हां तरी तो निबंध मी तुला पाठवीन. मतभेदाचा मुद्दा पुढीलप्रमाणें होता : बाह्यतः राजनिष्ठ असल्यासारखें वागून गुप्तपणें काम करण्याला आपण कचरूं नये या माझ्या विचारसरणीला येथील मित्रमंडळींनीं फार हरकत घेतली. या धोरणानें वागून नामी काम करणाऱ्या पुष्कळ संस्था बंगालमध्यें आहेत ). दिनांक न घातलेल्या दुसऱ्या पत्रांतला महत्त्वाचा मजकूर पुढीलप्रमाणें आहे :

I have almost finished the life of Garibaldi and part of the third volume of Mazzini. I discussed our propaganda with another gentleman in the last 15 days and have succeeded in converting him to our views.

though he has not taken any oath to work for the benefit of his country. But I am confident he will take the oath in a few days. I am very disappointed with the two other gentlemen. Still, they are very frequent visitors to our place and I have not given them up altogether,

( गॅरिबाल्डी-चरित्राचें माझें काम जवळजवळ पुरें झालें आहे व मॅझिनीच्या तिसऱ्या खंडाचें कामहि अंशतः झालें आहे. गेले पंधरा दिवस मी दुसऱ्या एका गृहस्थापाशीं आपल्या प्रचारकार्याची चर्चा चालविली होती. त्याचें मतपरिवर्तन करण्यांत मी यश मिळविलें आहे. देशहिताचें कार्य करण्याची कोणतीच शपथ मात्र त्यानें घेतली नाहीं; पण थोड्याच दिवसांत तो शपथ घेईल, असें मला वाटतें. दुसऱ्या दोघा गृहस्थांच्या बाबतींत मात्र मी फार निराश झालों आहें. असें असलें तरी ते वारंवार आमच्या निवासस्थानीं येतात व मी त्यांची आशा अगदींच सोडलेली नाहीं.)

दि. ७ मे रोजीं बो स्ट्रीट पोलिस कोर्टांत खटल्याचें काम सुरू झालें तेव्हां पूर्वी सुरू झालेल्या एका महत्त्वाच्या मुद्याचा खल झाला. किंबहुना, या खटल्यांत हाच महत्त्वाचा मुद्दा होता, असें म्हटलें तरी चालेल. सावरकरांविरुद्ध जे आरोप करण्यांत येत त्यांची चौकशी होण्यासाठीं त्यांना हिंदुस्थानांत धाडणें अवश्य आहे कीं काय, असा हा मुद्दा होता. रीतसर परवाना मिळवून चार वर्षांपूर्वी इंग्लंडांत येऊन राहिलेल्या सावरकरांनीं त्यापूर्वी हिंदुस्थानांत दिलेलीं कांहीं व्याख्यानें आक्षेपार्ह होतीं असें सरकारतर्फे सांगण्यांत येत होतें; पण, सरकारपक्षाचा खरा कटाक्ष इतरच गोष्टींवर होता व या गोष्टी घडल्या त्या काळांत सावरकर हिंदुस्थानांत नसून इंग्लंडांत होते, ही गोष्ट सिद्ध होती. परिस्थिति अशी असल्यामुळें, आरोपीची चौकशी इंग्लंडांतच व्हावी असा आरोपीतर्फे काम पहाणारे वकील मि. पॉवेल यांचा आग्रह होता. इंग्लंडमधील न्यायालयांना या आरोपांची चौकशी करण्याचा अधिकार असल्यामुळें चौकशी इंग्लंडांतच व्हावी, सावरकरांना चौकशीसाठीं हिंदुस्थानांत धाडण्याचें कांहींच कारण नाहीं अशा स्वरूपांत हा मुद्दा मांडण्यांत आल्यावर सरकारतर्फे या मुद्याचें खंडन करण्यांत आलें. मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं खटल्याचा निकाल या तारखेला सांगितला नाहीं; पण, त्यांनीं या दिवशीं पुढील आशयाचे उद्गार काढले :

एक तर, आरोपीची चौकशी व्हावी म्हणून मला त्याला हिंदुस्थानांत धाडतां येईल अगर त्याला सोडून देतां येईल. सर्व आरोप आपाततः खरे आहेत असें समजून, आरोपीची चौकशी सेशन्स कोर्टानें करावी असा निर्णय देण्याला पुरेसा पुरावा पुढें आलेला आहे. आरोपीनें या देशांत केलेल्या गुन्ह्यांची चौकशी या देशांतल्या न्यायालयांत होणें अवश्य आहे कीं काय, या प्रश्नाचा विचार हायकोर्टाच्या किंग्ज बेंच विभागाकडून होणें श्रेयस्कर ठरेल. दि. १२ मे रोजीं मॅजिस्ट्रेटनें या खटल्याचा निकाल सांगितला. आरोपीला चौकशीसाठीं हिंदुस्थानांत धाडण्यांत यावें हा या निकालाचा आशय होता. या निकालाविरुद्ध अपील करण्यासाठीं नेहमींप्रमाणें १५ दिवसांचा अवधि आहे, असें मॅजिस्ट्रेटनें आरोपीच्या वकिलांना सांगितलें. अपिलाची तयारी

करण्यासाठीं अधिक मुदत पाहिजे असेल तर आरोपीच्या वकिलानीं ' होम ऑफिस ' कडे अर्ज करावा, त्याचा योग्य तो विचार होईल, असेंहि आश्वासन देण्याला मॅजिस्ट्रेटसाहेब विसरले नाहींत. दोन महिने लांबलेल्या या खटल्याची प्रथमावस्था अशा प्रकारें संपली.

सावरकर इंग्लंडांत कैदेंत होते त्या अवधींत त्यांच्या क्रांतिकारक मित्रांनीं त्यांना तुरुंगांतून पळवून नेण्याच्या हेतूनें जे प्रयत्न केले त्यांतल्या पहिल्या प्रयत्नाचें स्वरूप व त्याचा अंदाजी काळ यासंबंधींची हकीकत याच प्रकरणांत यापूर्वी देण्यांत आलेली आहे. याच हेतूनें प्रेरित झालेल्या त्यांच्या मित्रांनीं आणखीहि असा एक प्रयत्न केला, असें समजण्याला पुष्कळसा विश्वसनीय आधार सांपडतो. बॅ. असफअल्ली यांनीं प्रसिद्ध केलेल्या आठवणींत याविषयींचा जो भाग आहे त्यांत या दोन प्रयत्नांची गल्लत करण्यांत आलेली आहे. बॅ. असफअल्लींनीं असेंहि सूचित करण्याचा प्रयत्न केला आहे कीं, आपण ऐकलेली सारीच हकीकत दंतकथेच्या स्वरूपाचीहि असूं शकेल; कारण, पॅरिसमध्यें असलेल्या असफअल्लींच्या एका स्नेह्यानें त्यांच्या दुसऱ्या एका स्नेह्याला सांगितलेली हकीकत असफअल्लींनीं या दुसऱ्या स्नेह्याच्या तोंडून ऐकली होती. असफअल्लींनीं ही हकीकत अशा अप्रत्यक्ष रीतीनें ऐकिली हें खरें असलें तरी, ती हकीकत दंतकथात्मक आहे हा असफअल्लींचा निष्कर्ष मान्य करण्याची प्रस्तुत लेखकाची तयारी नाहीं, सावरकरांच्या खटल्याकडे लाला हरदयाळ हे उत्सुकतेनें लक्ष ठेवीत होते, या गोष्टीचें दिग्दर्शन लाला हरदयाळजींच्या पत्रांतल्या एका उताऱ्याच्या आधारें यापूर्वी करण्यांत आलें आहे व या पत्राचा दिनांक ४–६–१९१० असावा असेंहि त्या ठिकाणीं अनुमानानें सांगण्यांत आलें आहे. लाला हरदयाळ यांनीं राजाजींना लिहिलेल्या त्याच पत्रांत पुढील महत्त्वाचा मजकूर आहे :

There in India perhaps they will have counsel for the defence. But I think the trial will only be a farce. What can we do for him out there? Here we have done what little could be done. Madam Cama had a little plan but it is very difficult to execute You can discuss it with her. Perhaps. Aiyer and Acharya wish to do something in connection with that plan. But it is necessary to go to India for it.

( कदाचित् तिकडे हिंदुस्थानांत त्यांच्या बचावासाठीं वकील-बॅरिस्टर देण्याची योजना होईल. पण, चौकशी होईल, ती शुद्ध पोरखेळाच्या स्वरूपाची होईल, असें मला वाटतें. एकदां त्यांना हिंदुस्थानांत नेलें म्हणजे मग आपण काय करूं शकणार? जें अल्पस्वल्प करणें शक्य होतें तें आपण येथें केलें आहे. कामाबाईंच्या मनांत कांहीं तरी बारीकशी योजना होती; पण, ती पार पाडणें फार अवघड आहे. तुम्ही कामाबाईंबरोबर या योजनेबद्दल चर्चा करावी. त्या योजनेबाबद कांहीं करावें अशी अय्यर व आचार्य यांच्याहि मनांत कदाचित् इच्छा असेल. पण, ती योजना पार पाडण्यासाठीं हिंदुस्थानला जाणें अवश्य आहे.) मादाम कामा व व्ही.व्ही.एस्.अय्यर

या दोनहि व्यक्ती परलोकवासी झालेल्या आहेत. श्री. आचार्य यांना भेटून या मुद्याची माहिती मिळविण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखकानें केला. मार्सेलिससारख्या ठिकाणीं बोट थांबेल तेव्हां कांहीं मंडळींनीं तयारीनिशीं बोटीवर घुसावें व पिस्तुलांचा उपयोग करण्यापर्यंत मजल मारावी लागली तरी ती मारून देखील सावरकर यांना सोडविण्याचा धाडसी प्रयत्न करून पहावा, असा विचार पॅरिस येथील मंडळींच्या मनांत घोळत होता, असें श्री. आचार्य यांचें म्हणणें पडलें. प्रस्तुत लेखकाचें तेवढयानें समाधान झालें नाहीं. कारण, ही कठीण योजना पार पाडण्यासाठीं हिंदुस्थानांत जाणें अवश्य आहे, या हरदयाळजींच्या वाक्याचा उलगडा येवढयानें होत नाहीं. पॅरिसच्या मंडळींच्या मनांतल्या योजनेचा पूर्ण उलगडा झाला नाहीं तरी, ( Here we have done what little could be done ) हें हरदयाळजींचें महत्त्वाचें वाक्य कांहीं प्रयत्न निश्चितपणें करण्यांत आले होते, अशी खात्री पटविणारें आहे. सत्याची ग्वाही देणारें हें हरदयाळजींचें वाक्य साक्षात् पुढें असतांना या प्रयत्नांची हकीकत दंतकथात्मक आहे, या असफअल्लींच्या म्हणण्याला विशेष महत्त्व काय म्हणून द्यावयाचें ?

सावरकरांना तुरुंगांतून पळवून नेण्याच्या कटांत आयरिश क्रांतिकारकांचें अंग होतें ही असफअल्लींनीं नमूद करून ठेविलेली माहिती दंतकथेच्या स्वरूपाची नाहीं हें 'येथें जें थोडें फार करण्यासारखें होतें तें आपण केलें आहे' या हरदयाळजींच्या वाक्यावरून उघड होत असल्यामुळें, दि. ११-६-३८ च्या 'प्रमोद' साप्ताहिकांत या प्रयत्नाबद्दल जी माहिती प्रसिद्ध झालेली आहे ती विश्वासार्ह समजण्याला हरकत नाहीं. ती माहिती अशी आहे :

*सावरकरांवरील खटल्यासाठीं त्यांना तुरुंगांतून न्यायालयांत नेत असत. त्यांना परत तुरुंगाकडे नेत असतांना, पोलिसच्या मोटारीवर हल्ला करण्याची गुप्त योजना आखण्यांत आली होती. कांहीं धाडसी आयरिश क्रांतिकारकांनीं या रस्त्यावर टेहेळणी करण्याची सिद्धता दाखविली. पोलिस व मोटार ड्रायव्हर यांच्यावर हल्ला करावयाचा व सावरकरांना आयर्लंडला नेऊन तेथून अमेरिकेंत धाडावयाचें, असा बेत होता. पोलिसांना या योजनेचा सुगावा लागला. सावरकरांना नेणारी मोटार नित्याच्या मार्गानें गेली; पण, तिच्यांत सावरकर मात्र नव्हते. एका आयरिश क्रांतिकारकानें मोटारीवर हल्ला केला; पण, सावरकर मोटारींत नाहींत असें दिसतांच त्यानें इतरांना सूचना दिली. त्यामुळें हे आयरिश क्रांतिकारक व भोंवतालीं दबा धरून बसलेले कांहीं हिंदी क्रांतिकारक तेथून पसार झाले. सावरकरांना दुसऱ्याच मोटारींतून तुरुंगाकडे धाडण्यांत आलें होतें.*

हा प्रयत्न निश्चित केव्हां करण्यांत आला हें सांगतां येण्यासारखें नसलें तरी त्याविषयींची माहिती अनुमानानें मिळविणें शक्य आहे. सावरकरांना बेकायदा कैदेंत

ठेवण्यांत आलेलें आहे, त्यांची मुक्तता करण्यांत यावी या आशयाचा अर्ज (Application for a Writ Habeas Corpus) नोंदून घेण्यांत आला तो दिनांक २४ मे १९१० रोजीं नोंदून घेण्यांत आला. हा अर्ज करण्याची युक्ति वरील प्रयत्न फसल्यानंतर सुचलेली दिसते. हें अनुमान बरोबर असेल तर असें निष्पन्न होईल कीं पोलिस कोर्टांतल्या खटल्याचा निकाल प्रतिकूल होणार असें दिसूं लागल्यावर हा प्रयत्न करण्यांत आला असावा. प्रतिकूल निकालाची कांहीं कल्पना आगाऊ करतां आली असेल तर, दि ७ मे १९१० रोजीं झालेल्या पोलिस कोर्टांतल्या कामावरून ती कदाचित् करतां आली असेल. दि. ७ मे रोजीं झालेल्या कोर्टांतील कामाच्या शेवटीं मॅजिस्ट्रेटनें जे उद्‌गार काढले त्यांचा आशय वर दिलेला आहे. या उद्‌गारांवरून निकालाचें स्वरूप लक्षांत आल्यावर, दिनांक १२ रोजीं निकाल सांगण्यांत येईल ही कल्पना असल्यामुळें व दिनांक ७ पासून १२ पर्यंत मिळणारा वेळहि पुष्कळ असल्यामुळें, दिनांक १२ मे रोजीं सावरकरांना कोर्टांतून परत नेण्यांत येईल तेव्हां हा प्रयत्न करावयाचा बेत मध्यंतरीच्या काळांत पक्का ठरला असावा, हेंच संभवनीय दिसतें. या प्रयत्नाचा निश्चित दिनांक कोणता हें विरुद्ध पुराव्यानें ठरेपर्यंत असें म्हणावयाला कसलीच हरकत नाहीं कीं, हा प्रयत्न १२ मे १९१० रोजीं करण्यांत आला.

सावरकरांना बेकायदा तुरुंगांत ठेवण्यांत आलें आहे, त्यांची मुक्तता करण्यांत यावी अशा आशयाचा अर्ज करण्यांत आल्याचें वर सांगण्यांत आलें आहे. हा अर्ज नांवाला दाखल करून घेण्यांत आला तरी त्यांतून निष्पन्न काय होणार याविषयीं शंका नव्हतीच. कारण, अर्ज दाखल करून घेतांनाच न्यायमूर्तींनीं पुढील उद्‌गार काढिले होते : यांतून कांहींहि निष्पन्न होणार नाहीं अशी दाट शंका मला येत आहे. अर्ज दाखल होण्याला हरकत घेण्यांत आली नाहीं याचा अर्थ असा नव्हे कीं, अर्जांत कांहीं तथ्य आहे ! या प्रकरणाची पुरी वाटाघाट होणें श्रेयस्कर आहे असें आम्हांला वाटतें, इतकाच त्याचा अर्थ आहे. दिनांक २ व ३ जून रोजीं हा अर्ज व बो स्ट्रीट पोलिस कोर्टाच्या प्रतिकूल निकालाविरुद्ध करण्यांत आलेलें अपील यांचा विचार किंग्ज बेंच डिव्हिजनमध्यें झाला. सर रूफस आयझॅक्स हे प्रसिद्ध निर्बंधपंडित सरकारतर्फे काम चालवीत होते व पुढें Sedition Committee Report मुळें ज्यांचें नांव हिंदुस्थानांतल्या लोकांच्या परिचयाचें झालें ते रौलेट साहेबहि सावरकरांविरुद्ध उभे होते. सावरकरांच्या १९०६ सालच्या भाषणांतले कांहीं उतारे वाचून दाखविल्यावर सर रूफस आयझॅक्स म्हणाले : या सभांतून लोक 'वंदे मातरम्' असा घोष करीत असत. हे शब्द कानीं पडतांच न्यायमूर्ति कोलरिज म्हणाले : असा घोष करण्यांत कांहीं अपाय आहे कीं काय ?

**रूफस आयझॅक्स :**—शक्तीच्या जोरावर स्वातंत्र्य मिळविणें हा अर्थ अभिप्रेत नसेल तर त्या घोषांत अपायकारक कांहीं नाहीं !

सरन्यायाधीश:-स्वातंत्र्याची नुसती वाटाघाट करणें हा कांहीं राजद्रोह नव्हे.

सरन्यायाधीश महाशयांनीं जो निकाल सांगितला त्यांत आरोपीला हिंदुस्थानांत पाठविणें इष्ट आहे, असें म्हटलें होतें. ज्या भाषणांमुळें राजद्रोहाचा आरोप निर्माण झाला होता तीं भाषणें मराठी भाषेंतलीं असल्यामुळें, हिंदुस्थानांत होणारी चौकशीच आरोपीला हितावह ठरेल असा निर्णय सरन्यायाधीश महाशयांनीं दिला. हिंदुस्थानांत स्पेशल ट्रायब्यूनलपुढें होणारी चौकशी ज्यूरीच्या मदतीशिवाय होणार असल्यामुळें, त्या चौकशीचें स्वरूप आरोपीच्या दृष्टीनें अन्यायाचें व त्रासदायक ठरेल असें मत स्वतंत्र निर्णयांत व्यक्त करण्याइतकी मजल न्यायमूर्ति कोलरिज यांनीं मारली; पण, प्रत्यक्ष परिणामाच्या दृष्टीनें हें मतस्वातंत्र्य निष्फळच ठरलें. मतस्वातंत्र्याच्या या लकेऱ्या मारल्यावर कोलरिज महाशयांनीं निकालाच्या बाबतींत थोरल्यांशीं मिळतें घेतलें !

किंग्ज बेंच डिव्हिजनच्या या निकालावरहि अपील करण्यांत आलें व तें दि. १६ जून रोजीं चाललें. इंग्लंडमधील न्यायालयांना या प्रकरणांत लक्षच घालतां येत नाहीं या मुद्यावर भर देऊन सॉलिसिटर जनरल साहेबांनीं आरोपीपक्षाचें म्हणणें खोडून काढण्याचा प्रयत्न केला व इंग्लिश न्यायालयांचा अधिकार मान्य केला तरी, किंग्ज बेंच डिव्हिजननें निकाल दिल्यावर, पुढें अपील करण्याचा आरोपीस अधिकार नाहीं, असेंहि त्यांनीं प्रतिपादिलें. लॉर्ड जस्टिस व्हॉगन विलियम्स व लॉर्ड जस्टिस फ्लेचर मोल्टन यांनीं अपील फेटाळून लावलें व निर्णयाचीं कारणें दुसऱ्या दिवशीं सांगण्यांत येतील असें आश्वासन दिलें. 'फ्यूजिटिव्ह ऑफेंडर्स ॲक्ट' प्रस्तुत प्रकरणीं लागूं पडतो कीं काय या प्रश्नाचा निकालहि वरिष्ठ कोर्टांत व्हावा या हेतूनें सावरकरांचे वकील मि. पॉवेल यांनीं खटपट सुरू केली होती. या खटपटीला थोडेंसें यश आलें. हा मुद्दा मुळांतच ( Original Motion ) उपस्थित करण्याला त्यांनीं संमति दिली व हें प्रकरण यापुढें लांबणीवर पडूं नये, तडकाफडकी निकालांत निघावें म्हणून प्रतिपक्षाला तातडतोबीची सूचना ( Short Notice ) देण्याबद्दलची मि. पॉवेल यांची विनंतीहि त्यांनीं मान्य केली.

खालच्या कोर्टांत 'फ्जूजिटिव्ह ऑफेंडर्स ॲक्ट'संबंधींचा निर्णय झाला आहे. त्या निर्णयावर अपील म्हणून हें प्रकरण या कोर्टापुढें आलेलें नाहीं, मूळ प्रकरण ( Original Motion ) म्हणून या कोर्टांत या मुद्याचा विचार होणें हें निर्णीताचा पुनर्निर्णय करण्यासारखें ( *Res judicata* ) आहे, या मुद्यावर सॉलिसिटर जनरलसाहेबांनीं अर्जाला विरोध केला. पण उभयतां न्यायमूर्तींनीं तो विरोध अमान्य केला. या प्रकरणाची सविस्तर घासाघीस सोमवार दिनांक २० जून रोजीं झाली व दुसऱ्या दिवशीं न्यायमूर्तींनीं निकाल सांगितला. याहि प्रकरणांत किंग्ज बेंच डिव्हिजनपुढील प्रकाराचीच पुनरावृत्ति झाली. लॉर्ड जस्टिस व्हॉगन विलियम्स यांनीं आपल्या स्वतंत्र निकालपत्रकांत हें मान्य केलें कीं, आरोपीची चौकशी

इंग्लंडांत व्हावी हेंच आपातत: न्याय्य आहे. पण, या मताचा आग्रह या न्याय-मूर्तींनी न धरल्याकारणानें, सावरकरांची रवानगी हिंदुस्थानांत करण्यांत येणार व तेथें स्पेशल ट्रायब्यूनलपुढें त्यांच्यावरील आरोपांची चौकशी होणार हें आतां कायमचें ठरून गेलें. या निर्णयाची अंमलबजावणी सात दिवसपर्यंत होऊं नये या न्याय-मूर्तींच्या अभिप्रायाला सॉलिसिटर जनरल यांनीहि मान्यता दिली. दिनांक २८ जून १९१० नंतर शक्य तितक्या लवकर सावरकर यांची हिंदुस्थानकडे रवानगी करण्यांत येईल, हें या निर्णयामुळें ठरून गेलें.

सावरकर यांच्यावरील खटल्याचें काम इंग्लंडमध्यें जवळजवळ तीन महिने चाललें. या अवधींत त्यांचे हिंदी मित्र त्यांच्यासाठीं किती व कशा प्रकारच्या खटपटी करीत होते व किती त्रास सोशीत होते याची कल्पना यापूर्वी देण्यांत आलेल्या कांहीं माहितीवरून करतां येईल. सावरकर आरोपी म्हणून कोर्टांत येत तेव्हां ते कसे दिसत, कोर्टांत एकदां कशी गंमत झाली वगैरे मनोरंजक माहिती बॅ. असफअली यांनीं आपल्या आठवणींत सांगितली आहे. बो स्ट्रीट पोलिस कोर्टाची अधिष्ठात्री देवता सर आल्फ्रेड डी. रिट्झन हे मोठे मासलेवाईक मॅजिस्ट्रेट होते, त्यांचे भेदक डोळे आरोपीच्या अंत:करणाचा ठाव काढीत आहेत कीं काय, असा पहाणाराला भास होत असे. पण, या भेदक दृष्टीमुळेंहि सावरकर भेदरून जात नसत. आरोपीच्या पिंजऱ्यांत उभे असलेले सावरकर पूर्णपणें शांत व प्रसन्न दिसत असत, आणि खटला ऐकण्यासाठीं आलेल्या मित्रांकडे सस्मित मुद्रेनें पाहून, मान हलवून, ते त्या मित्रा-बद्दलचें ममत्व व्यक्त करीत. मुंबईहून आलेल्या पोलिस अधिकाऱ्यांपैकीं एक जण या कोर्टांत वारंवार उपस्थित असे हिंदुस्थानच्या वातावरणाला योग्य असणारा या अधिकाऱ्याच्या अंगावरील पोषाख लंडनमध्यें विचित्र व अस्थानीं भासे. या पोषाखाची टर उडविणारे कांहीं टवाळ तरुण त्याला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें व कांहींशा उद्धटपणानें त्याची थट्टा करीत. यामुळें, इन्स्पेक्टर मॅकार्थी एकदां गरम झाले व या टवाळ टोळक्याला कोर्टांत येण्याला मनाई करण्यांत यावी, असें त्यांनीं सुचविलें.

न्यायालयाचा अखेरचा निर्णय होण्याची वेळ जवळ आलेली पाहून सावरकर यांनीं श्री. अय्यर यांना तुरुंगांतून जें पत्र[१] लिहिलें त्यांतील महत्त्वाचा भाग पुढील-प्रमाणें आहे :—

Brixton Prison,
21st June, 1910

* ॐ

श्रीस्वातंत्र्यलक्ष्मी प्रसन्न

My dear Rishi,

You must have received by this time two letters or three. Please do

---

१ Mahratta : 10-4-42.

* टीप पुढील पानावर पहा.

acknowledge them. The case does not seem to end today Of course, both of us know the result already. Tomorrow the formal result will be given.

I wanted to send a note to you to kindly take the two instalments or so and send them to my family as already requested by me ...... ..

By this time, my dear Rishi, I have got quite used to the food and mode of living here It was good that I did not ask for special food from the beginning Now, to make me a full-fledged life-transportee, only a change of clothes is wanting. By the by, I got the new suit, our friends prepared for me. It is a very nice one. I will enjoy it on the voyage.

I am in excellent health, and have added two pounds to my weight. ( Not by growing a four-pound-weight beard ! ) I am sure you will be glad to hear it

---

* (टीप मागील पानावरून)

* ॐ

ब्रिक्स्टन तुरुंग, २१ जून १९१०

श्रीस्वातंत्र्यलक्ष्मी प्रसन्न

प्रिय ऋषीजी,

माझीं दोन अगर तीन पत्रें एव्हांना तुम्हांला मिळालीं असतील. त्यांची पोंच कृपा करुन द्या. खटल्याचें काम आज संपेल असें दिसत नाहीं. निकाल काय होणार हें अर्थातच आपल्या दोघांनाहि माहीत आहे. उद्ईक रीतसर निकाल सांगितला जाईल.

दोनतीन हप्ते घेऊन ते पैसे माझ्या कुटुंबाकडे पाठवून देण्याबद्दलची विनंति मी तुम्हांला यापूर्वीच केली आहे. त्याप्रमाणें व्यवस्था करण्याची कृपा करा अशा आशयाचें पत्र तुम्हांला धाडण्याचा माझा मानस होता...प्रिय ऋषीजी, येथील अन्न व रहाणी या गोष्टी आतां माझ्या चांगल्या अंगवळणीं पडल्या आहेत. प्रथमपासूनच मी वेगळें अन्न मागितलें नाहीं, हें फार बरें झालें. आतां फक्त कपडे बदलले कीं, मी पुरा जन्मठेपीचा कैदी बनलों ! मित्रांनीं माझ्यासाठीं तयार केलेले कपडे मिळाले, हेंहि तुम्हांला सहज कळवून ठेवतों. कपडे फार छान झाले आहेत. प्रवासांत मी ते मोठ्या आनंदानें अंगावर चढवीन.

माझी प्रकृति चांगली आहे. माझें वजन दोन पौंडांनीं वाढलें आहे, ( आणि, ४ पौण्ड वजनाची दाढी न वाढवितां तें वाढले आहे ) हें ऐकून तुम्हांला आनंद होईल अशी मला खात्री वाटते.

यापूर्वी तुम्ही मला ज्या प्रकारचीं उदात्त पत्रें धाडिलीं तशींच पत्रें वारंवार पाठवीत चला. अपेक्षित निकाल ऐकण्यासाठी वाटेंत जा याला निघणार तोंच तुमच्या पत्रांपैकी एक पत्र मला मिळालें. तुम्ही मजपासून दूर आहां ही गोष्ट पत्र

Be writing to me the sort of ennobling letters which you had written so many times. One of them I got while just starting for the court to hear the foregone decision of them. It makes me forget all the distance between us and makes me feel as if my Rishi is with me side by side in a meeting or in the room nursing me or chatting with me on the exalted topic of the rising of the people, the rebirth of a race……

With kindest memory
dear Rishi,
Brotherly yours,
**V. D. Savarkar**

आतां आपली हिंदुस्थानांत पाठवणी होणार, तेथील न्यायालयांत आपल्याला बहुधा देहांताची,—क्वचित् काळ्या पाण्याची—शिक्षा सांगण्यांत येणार, हें सावरकरांना स्पष्ट दिसूं लागलें. ज्या मित्रांच्या व हितचिंतकांच्या सहवासांत आपण गेलीं चार वर्षें इतक्या उत्साहानें घालविलीं आणि ज्यांच्या सहकार्यानें आपण क्रांतिकार्याची इतकी उभारणी केली, त्या आपल्या मित्रमंडळीची यापुढें इहलोकीं गांठ पडेल कीं नाहीं, असा प्रश्न त्यांच्या मनांत घोळूं लागला. 'हिंमत मर्दा तो मदत खुदा' या म्हणीतील सत्यावर त्यांचा अढळ विश्वास असल्यामुळें, अशाहि बिकट परिस्थितींत आपल्याला काय करतां येईल यासंबंधींचे विचार त्यांच्या मनांत वावरत होतेच. या विचाराचें फळ म्हणून त्यांनीं आपल्या पॅरिस येथील मित्रमंडळाला एक गुप्त, सांकेतिक पत्र तुरुंगांतून धाडून दिलें व असें सुचविलें कीं, हिंदुस्थानकडे जाणाऱ्या आगबोटीच्या रस्त्यावर फ्रान्स–स्पेनच्या किनाऱ्यालगत जीं महत्त्वाचीं ठिकाणें आहेत व जेथें आगबोटी तात्पुरत्या थांबण्याचा संभव असतो तेथें त्यांनीं तयारीनिशीं उपस्थित रहावें. अशा तऱ्हेचे प्रयत्न आपल्या मित्रांकडून केले जातील हें त्यांना माहीत असलें तरीहि, असे प्रयत्न अयशस्वी होण्याचाच फार संभव असतो हें देखील ते ओळखून होते. म्हणून त्यांनीं ब्रिक्स्टन जेलमध्यें या अखेरच्या दिवसांत आपल्या पॅरिस येथील मित्रांना उद्देशून एक कविताबद्ध इंग्रजी पत्र[1] धाडलें. या पत्राला त्यांनीं 'Farewell' ही संज्ञा दिली आहे.'आमुचा रामराम घ्यावा'असें या संज्ञेचें भाषांतर केलें तर तें शोभण्यासारखें आहे. या इंग्रजी पत्राचे चार टप्पे असून, विशाल कल्पनाशक्ति, ऐतिहासिक घटनांवराल अढळ विश्वास, जातिवंत देशप्रेम व दुर्दम्य आशावाद हे सावरकरांच्या कवित्वाचे विशेष या इंग्रजी कवितेंत उत्कटत्वानें उतरले आहेत,

---

वाचतांवाचतां मी विसरून गेलों ऋषीजी सभेंत माझ्या शेजारीं बसले आहेत, अगर माझी शुश्रूषा करीत आहेत अगर देशांतील लोकांचें उत्थान, वंशांचा पुनर्जन्म अशा कोणत्या तरी विषयासंबंधीं ते मजजवळ बोलत आहेत असें, तें पत्र वाचीत असतां मला वाटलें.

ऋषीजी, आपला प्रिय बंधु,
**वि. दा. सावरकर.**

[1] **An Echo from Andamans : Pp. 12–13.**

या कवितेचा प्रास्ताविक भाग व शेवटचा भाग या ठिकाणीं उद्धृत केला नाहीं तरी चालेल. त्यांतील मधले दोन टप्पे उद्धृत करणें मात्र अवश्य आहे. मातृभूमिप्रेम व मायदेशाची सेवा यांच्या बंधनांनीं ज्यांचीं अंतःकरणें निगडित झालेलीं आहेत, अशा आपल्या मित्रांनीं मातृभूमीच्या प्रगतीकडे जागरूकपणें लक्ष ठेवावें आणि मातृभूमीच्या प्रगतीचें मापन करतांना कार्य किती झालें हा प्रश्न विचारण्यापेक्षां आपण कष्ट किती सोसले असाच प्रश्न त्यांनीं स्वतःला विचारावा, असा उपदेश सावरकरांनीं या कवितेच्या आरंभीच्या व अखेरच्या भागांत केलेला आहे. मधले दोन टप्पे पुढीलप्रमाणें आहेत :

* (2)

We part to play our God-appointed parts : now pent and nailed to burning Rocks; now tossed on surging waves of Fame; now seen, now lost; or humble or exalted—wherever posted by the Lord of Hosts, yet posted best, as if alone it was the mission of our life thus there to act!

As in some oriental play sublime, all characters, the dead as well as living, in Epilogue they meet : thus, actors we innumerable all—once more shall meet on History's copious stage before the great applauding audience of Humanity, that would with grateful cheer fill hill and dale.

Till then, Oh loving friends, Farewell! Farewell!!

---

* (२)

मित्रांनो, ईश्वरानें आपल्यापैकीं प्रत्येकाची भूमिका ठरवून टाकली आहे. आपण प्रत्येकानें आपली भूमिका वठवावी यासाठीं आपली ताटातूट होत आहे. ईश्वरानें नेमून दिलेली भूमिका वठवीत असतांना, प्रसंगीं जळत्या खडकांना बांधून, कोंडून पडावें लागेल; प्रसंगीं कीर्तीच्या उसळणाऱ्या लाटांच्या शिखरावर स्वार होतां येईल; कधीं आपण लोकांना दिसूं, तर कधीं अदृश्य राहूं; कधीं आपण अवनत होऊं, तर क्वचित् उन्नत होऊं! जगन्नियंत्यानें कोणत्याहि परिस्थितींत ठेवलें तरी ती परिस्थिति सर्वोत्तम आहे असें मानून आपण असें समजलें पाहिजे कीं, आपलें जीवितकार्य एकाकी पार पाडणें हेंच आपल्या वांट्याचें कार्य आहे.

एखाद्या उदात्त पौर्वात्य नाटकांत भरतवाक्याच्या वेळीं नाटकांत मेलेलीं व न मेलेली सर्व पात्रें एकत्र जमतात. आपण सगळे इतिहासाच्या अफाट रंगमंदिरांतील असंख्य नटच आहोंत. आपल्या कृतीची प्रशंसा करणारे मानवजातिरूपी प्रेक्षक टाळ्या वाजविण्यासाठीं आपल्यासमोर बसलेले आहेत. हे प्रेक्षक कृतज्ञ व आनंदी बनून जोरजोरानें टाळ्या वाजवतील तेव्हां त्या टाळ्यांचा गरजणारा आवाज दऱ्याखोऱ्यांपर्यंत जाऊन दुमदुमेल!

प्रेमळ मित्रांनो, तो क्षण येईपर्यंत रामराम!

(3)

Wherever may my humble ashes lie : in the Andaman's sad brook whose weeping course adds to its dreariness a tongue or stored by Ganga's sacred crystal stream in which the stars their midnight measures dance :— They will be stirred with fire and glow when, Victory's trumpet—blasts proclaiming ' Shri Ram has crowned his chosen people 's brow with laurels golden green ! ' The evil spirit is cast away and chased back to the deep from whence it first arose ! and lo ! She lordly stands, our Mother-Ind, a beacon light Humanity to guide ! Oh martyed saints and soldiers, do awake ! The battle is won in which you fought and fell !!

Till then oh loving Friends, Farewell, Farewell !

ब्रिक्स्टन तुरुंगांत असलेले सावरकर आपल्या मित्र-मंडळींना गुप्तपणें गद्य व पद्य पत्रे लिहिण्यांत गुंतले होते त्याच वेळीं, त्यांना तुरुंगांत डांबून ठेवणारें सरकारहि अगदीं गुप्तपणानें दुसऱ्या एका उद्योगांत गढून गेलें होतें. सावरकरांना कोणत्या बोटीनें हिंदुस्थानात धाडण्यांत येणार आहे हें कोणालाहि आगाऊ कळूं नये अशी ब्रिटिश सरकारची इच्छा असल्यामुळें, त्यांना ब्रिक्स्टन तुरुंगांतून हलविल्यावर कांहीं वेळपर्यंत कॅनन रो-पोलिस ठाण्यांत ठेवण्यांत आलें. तेथून वेस्टमिन्स्टर पिअरवरून बार्किंगमार्गें त्यांना एका लहानशा आगबोटीपर्यंत आणण्यांत आलें व या आगबोटींतून नदीमधून टिल्बरी येथें नेण्यांत आल्यावर त्यांना दि. १-७-१० रोजीं 'मोरिया' बोटीवर चढविण्यांत आलें.

---

(३)

माझा देह येथें सोडून माझ्या अस्थि आणि रक्षा कोठें पडतील याचा नेम नाहीं. अंदमानच्या बेटावरचा भाग अतिशय निर्जन व भेसूर आहे. तेथें वाहणाऱ्या नदीनाल्यांचा उदासवाणा आवाज तेथल्या मृत्यूच्या निर्जनपणाला अधिकच भेसूर बनवीत असतो. कदाचित् माझ्या अस्थि नि रक्षा त्या उदास नदीनाल्यांच्या जवळ पडून रहातील, किंवा असेंहि घडेल कीं, मध्यरात्रीं आपला नियत खेळ आकाशांत खेळणाऱ्या तारकांचें प्रतिबिंब पोटात सामावून घेणाऱ्या गंगामातेच्या स्फटिकशुद्ध प्रवाहाच्या शेजारीं कोठेंतरी माझ्या अस्थि नि रक्षा पडून रहातील ! त्या कोठेंहि पडलेल्या असोत ! श्रीरामानें आपल्या आवडत्या लोकांचा पक्ष विजयधवल ठरविला आहे, दुष्टांना माघार घ्यावी लागत आहे आणि त्यांना पाय घेऊन पुढें पडला तेथवर त्यांना मागें हटविण्यांत आलें आहे, आपला हा भारतवर्ष वैभवांत उभा आहे, मानव जातीचें मार्गदर्शन करणारा दीपस्तंभ म्हणून यापुढें तो तेजस्वितेनें तळपत राहील, असा पुकारा झाला आणि " वैराग्य गाजविणाऱ्या विचारवीरांनो नि कृतिवीरांनो, तुम्ही ज्या संग्रामांत लढलांत आणि पडलांत तो संग्राम यशस्वी झाला; उठा ! " अशी घोषणा झाली कीं, त्या वेळीं, त्या पडून राहिलेल्या अस्थि आणि ती पडून राहिलेली रक्षा यांच्यात फिरून तेज आणि चैतन्य सळसळूं लागेल.

तोंवर, मित्रांनो रामराम !

# प्रकरण १० वें

# त्रिखंडांत गाजलेली उडी

घातली एकदां अता उडी,
रे, बुडव लाव वा पैलथडी ! ॥धृ०॥
साहस म्हण कीं पोरपणा म्हण ।
भाबडपणा, स्वैरपणा म्हण,
नादिपणा, अविचारिपणा म्हण
पण गेली ती परते न घडी. —कै. कविश्रेष्ठ तांबे

सावरकरांना घेऊन 'मोरिया' बोट इंग्लंडहून निघाली त्याआधींच श्री. अय्यर हे इंग्लंड सोडून निघाले होते. ब्रिक्स्टन तुरुंगांत अय्यर यांनीं सावरकरांची भेट घेतली त्यावेळीं, हिंदींत हळुहळू बोलून, त्यांनीं पुढच्या कांहीं संकल्पांबद्दलचीं खलबतें केलीं होतीं. अय्यर यांच्या मागेंहि इंग्लिश गुप्तहेरांचा ससेमिरा लागला असल्यामुळें त्यांना केव्हां अटक होईल याचा नेम नव्हता. पुढचा संकल्प सिद्धीस नेण्याला अय्यर मोकळे राहिले तर ठीकच; ते मोकळे राहिले नाहींत तरी देखील, संकल्प सिद्धीस नेण्याची खटपट केली जावी यासाठीं, या संकल्पाचें स्पष्टीकरण करणारें एक गुप्त पत्र पुढें पॅरिसला रवाना झालें होतें.

अय्यर पॅरिसला जाण्याच्या बेतांत आहेत ही गोष्ट इंग्लंडच्या गुप्त हेरखात्याला समजली होती. ते आगगाडीनें डोव्हर येथें उतरले कीं, स्टेशनवरच त्यांना अटक करावयाची या हेतूनें सर्व सिद्धता करण्यांत आली होती.. पण, योगायोग असा कीं, त्या दिवशीं अय्यर यांची गाडी चुकली. लंडनहून लगबगीनें निघून अय्यर यांनीं डोव्हरचा बंदरानजीकचा भाग गांठला. अय्यर स्टेशनवर सांपडले नाहींत यामुळें निराश झालेला एक इंग्रज हेर बंदरावर टेहळणी करीत होता. 'मि. अय्यर, ही आपली तार घ्या' असे शब्द उच्चारून या पायघोळ संतानें अय्यर यांना जाळ्यांत अडकविण्याचा प्रयत्न केला ! पण, अय्यर कांहीं कच्चे नव्हते ! गोंधळल्यासारखें करून ते त्या हेराला म्हणाले : आपली कांहीं तरी चूक होत आहे. माझें नांव आहे व्ही. विक्रमसिंग ! अय्यर यांच्या बरोबर असलेल्या पेटीवर V. V S. अशीं अक्षरें लिहिलेलीं होतीं; अय्यर असें नांव कोठेंच लिहिलेलें नव्हतें. या अक्षरांचा खुलासा अशा रीतीनें करून, अय्यर महाशय तेथून निसटले ! अॅम्स्टरडॅमला जाणारी बोट निघण्याच्या ऐन बेतांत होती तिचें तिकिट त्यांनीं विकत घेतलें व ते झटकन् बोटीवर

चढले. ॲम्स्टरडॅमला वेळ न घालवितां अय्यर पॅरिसला पोंचले.[1] त्यानंतर एक दोन दिवसांनीं सावरकरांना ब्रिक्स्टन तुरुंगांतून काढून 'मोरिया' बोटीवर चढविण्यांत आलें.

सावरकरांना डोव्हरवरून कॅले येथें उतरवून तेथून रेल्वेनें मार्सेलिसपर्यंत पोंचविल्यावर त्या ठिकाणीं त्यांना बोटींत चढविणें शक्य नव्हतें, असें नाहीं. पण, सावरकरांचे क्रांतिकारक हिंदी मित्र पॅरिसमध्यें आहेत व फ्रान्समधील अनेक लोकांची सहानुभूति त्यांना मिळण्यासारखी आहे, हें ब्रिटिश सरकारला माहीत होतें. सावरकर तुरुंगांत असतांना, आयरिश क्रांतिकारकांच्या मदतीनें त्यांना मुक्त करण्याचा जो प्रयत्न त्यांच्या मित्रांनीं केला, तो सफल झाला नसला तरी, त्या प्रयत्नाची वार्ता ब्रिटिश सरकारला मिळालेली होती. सावरकर आगगाडींतून फ्रान्समधून गेले तर तेथेंही असाच एकादा प्रयत्न होईल, पं. शामजींसारखा एकादा चिकित्सक कांहीं तरी कायदेशीर मुद्दा काढून सावरकरांना सोडवून घेण्याचा प्रयत्न करील, वगैरे गोष्टी ब्रिटिश सरकारनें ओळखल्या होत्या. म्हणून, सावरकरांना फ्रान्समधून मार्सेलिसपर्यंत धाडण्याचा विचार ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं मुळांतच रद्द ठरविला व सावरकरांना थेट इंग्लंडपासून समुद्रप्रवासाचा लाभ देण्याचें त्यांनीं ठरविलें ! या प्रवासांत सावरकर यांच्याबरोबर इंग्लंडच्या गुप्त पोलिस खात्यातील अधिकारी मिस्टर पार्कर, हिंदुस्थानांतून मुद्दाम धाडण्यांत आलेले मुंबईचे डे. सु. ऑफ पोलिस मि. पॉवर व दोघे हिंदी पोलिस इतकी मंडळी बंदोबस्तासाठीं होती. मि. पॉवर यांच्या बरोबर इंग्लंडला गेलेल्या तिघा हिंदी पोलिसांपैकीं एकजण अपघातानें लंडनमध्यें मरण पावला होता !

'मोरिया' बोट चालू झाल्याबरोबर सावरकरांच्या विचारांनाहि गति मिळाली असली पाहिजे. 'मोरिया' बोटीचीं यांत्रिक चक्रें जशीं जोरजोरानें फिरूं लागलीं तशीं सावरकरांच्या विचाराचीं चक्रेंहि जोरजोरानें फिरूं लागलीं असलीं पाहिजेत. आपला स्वभाव स्वस्थ न बसणारा आहे. सतत धडपड करण्याची आपल्या चित्ताची प्रवृत्ति आहे आणि अशा प्रवृत्तीमुळें आपलें मन खंडेंच्या खंडें आपल्या झेंपेंत घेऊन उड्डाण करीत असतें, अशा आशयाचें स्वतःच्या मनोरचनेचें वर्णन[2] सावरकरानीं पुढें कांहीं महिन्यांनीं लिहिलें. 'मोरिया' बोट चालू लागतांच सावरकरांच्या कल्पनेपुढें त्या बोटीचा सगळा प्रवास, तिच्या वाटेवर लागणारे वेगवेगळे देश, त्या भिन्नभिन्न देशांत त्यांच्यासारख्या क्रांतिकारकाला आश्रय मिळण्याची शक्यता इ० अनेक विषयांसंबंधींचे विचार उभे राहिले असले पाहिजेत. बोटीवरील उतारूंमध्यें मिळूनमिसळून वागण्याची व जेवणाच्या वेळीं त्यांच्याशीं गप्पागोष्टी करण्याची संधि सावरकरांना मिळत असे. अशा वेळीं इतर उतारू सावरकरांकडे

१ स्वामी शुद्धानंद भारती यांनीं पाठविलेल्या आठवणी.

2 An Echo from Andamans : P. 18.

पहात तेव्हां त्यांना सावरकरांचें मन भोंवतालीं चौफेर पसरलेल्या समुद्राच्या पृष्ठ-भागासारखें शांत दिसत असे. समुद्राच्या अंतर्यामीं चाललेला क्षोभ या उतारूंना जसा दिसत नव्हता अगर समुद्राच्या खोलीचा थांग काढण्याचें सामर्थ्य जसें या उतारूंच्या ठिकाणीं नव्हतें तद्वतच, सावरकरांच्याहि मनःक्षोभाची अगर विचारांच्या खोलीची कल्पना करण्याची पात्रता या उतारूंच्या अंगीं नव्हती. दुसऱ्या वर्गाच्या उतारूंमध्यें सावरकर जेवावयासाठीं जाऊन बसत तेव्हां त्यांच्या अंगावर युरोपियन पद्धतीचा पोशाख असे.[1] डोळ्यांवर ठेवून दिलेला ऐटबाज चष्मा आणि अद्य-यावत् पद्धतीनें फिरविलेले डोक्यावरील केस यामुळ सावरकर चांगले प्रसन्न नि आक-र्षक दिसत. शेजारच्या मंडळींशीं गप्पा मारतांमारतां ते मनमोकळेपणानें हंसत त्या वेळीं त्या मंडळींना मोठें कौतुक वाटे! ज्याच्यावर भयंकर आरोप ठेवण्यांत आलेले आहेत आणि ज्याच्या भवितव्यासंबंधीं त्रयस्थपणानें विचार करतांना आपलेंहि मन भयविव्हल होतें, असा हा महाभाग इतक्या बेफिकिरीनें वागतो कसा, याचेंच या लोकांना नवल वाटे!

'मोरिया' बोटीचा प्रवास पहिले तीनचार दिवस सुखाचा झाला. बोट बिस्केच्या उपसागरांत शिरल्यावर वादळी वारे सुरू झाले व लाटांचे जोराचे तडाखे बसूं लागल्यामुळें बोट खूप जोरानें डोलूं लागली. ही बोट अमुक ठिकाणीं नक्की थांबेल असें सावरकरांना माहीत नव्हतें ती मार्सेलिसला थांबणार नाहीं, असाच त्यांचा समज करून देण्यांत आलेला होता. असें असलें तरी, स्पेन व फ्रान्सच्या किनाऱ्यालगत बोट कोठें तरी थांबेल असा पक्का अंदाज सावरकरांनीं मनांत बस-विला होता. बोट अशा रीतीनें थांबली म्हणजे योग्य संधि साधून बोटींतून निसटून जाण्याचा साहसी प्रयत्न करावयाचा, असेंहि त्यांनीं या सुमारास ठरविलें होतें. पॅरिसमध्यें सुखांत असलेला आपला जीव उघड्या डोळयांनी दुःखांत लोटून जें साधावयाचें होतें तें साध्य झालें, असें त्याना वाटत होते. आतां आणखी एक साहस करून दुसरें कांहीं साधतां आलें तर साधावें, असा विचार त्यांच्या डोक्यांत चालला होता. सावरकर आपखुषीनें लंडनला गेले होते व पोलिसच्या ताब्यांत सांपडले होते. असें असूनहि, त्यांना पकडल्यावर इंग्लिश पोलिसांनीं त्यांच्याविषयीं हव्या त्या कंड्या उठवून निष्कारण शेखी मिरविली होती. पोकळ बढाया मारणाऱ्या या ब्रिटिश पोलिसांचा नक्षा उतरविण्याचा एक मार्ग म्हणून, सःधेल त्या ठिकाणीं बोटींतून निस-टून जाण्याचा प्रयत्न करण्याची कल्पना त्यांच्या मनांत एकसारखी डोकावत होती. अय्यर यांच्याशीं त्याचें जें बोलणें झालें होतें आणि कामाबाई प्रभृति मित्रांकडे त्यांनीं तुरुंगांतून जे गुप्त संदेश धाडिले होते त्यांचीहि आठवण त्याना वारंवार होत होती. 'मोरिया' बोट क्वचित् मार्सेलिस येथें थांबलीच तर ही मंडळी पूर्वयोजने-

---

[1] दि. २४-७-१९१० च्या 'Mahratta' पत्रांत उद्‌धृत करण्यात आलेला 'Advocate of India' पत्रांतला उतारा

नुसार तेथें कांहीं तरी धडपड केल्याशिवाय रहाणार नाहीं, असा विश्वास त्यांना वाटत होता. त्यांच्या धडपडीला आपल्या प्रयत्नाचें सहाय्य मिळालें पाहिजे, हा विचार सावरकरांच्या चित्तांत एकसारखा खेळत असल्यामुळें, प्रसग साधतांच बोटींतून निसटण्याचा प्रयत्न कसा करावयाचा याविषयींच्या त्यांच्या कल्पना प्रवासांतल्या पहिल्या तीन चार दिवसांनंतरच पुष्कळशा स्पष्ट झालेल्या होत्या. योग्य संधि पाहून बोटीच्या 'पोर्टहोल' मधून निसटून जाण्याची धडपड करावयाची हें त्यांनीं मनानें ठरविलें होतें. हा प्रयत्न करावयाचा तर 'पोर्टहोल' मधून शरीर बाहेर निघण्याची शक्यता कितपत आहे, याचा आगाऊ अंदाज घेऊन ठेविला पाहिजे हेंहि त्यांनीं ओळखलं होतें. 'पोर्टहोल' पाशीं मुद्दाम जाऊन उभें रहाणें व त्याचें मोजमाप घेण्याचा प्रयत्न करणें हें किती धोक्याचें आहे हे त्यांना कळत होतें. म्हणून बिस्केच्या उपसागरांत बोट डुलत आहे या आपत्तीचा फायदा घेणेंच पथ्यकर ठरेल, असें त्यांनीं ठरविलें. बोट डालूं लागली, उतारूंच्या भेलकंड्या जाऊं लागल्या, हें दिसल्यावर सावरकरांनीं आपणहि भेलकंडत आहोंत असें भासविलें. अशा भेलकांड्या घेत घेत ते सहज एका 'पोर्टहोल' पाशीं गेले व, हातानें आधार घेण्याच्या मिषानें, त्यांनीं निमिषार्धांत 'पोर्टहोल' चें करूने मोजमाप घेतलें. "बोटीच्या 'पोर्टहोल' मधून निसटण्याचा आपला पूर्वसंकल्प नव्हता, असें मार्सेलिस येथें फिरून पकडल्यानंतर सावरकरांनीं सांगितलें" अशी हकीकत दि. २६-७-१० च्या 'पायोनिअर' पत्रांत दिलेली आढळते. "पोर्टहोल उघडा पाहून, दैववशात् लाभत असलेल्या संधीचा शक्य तर फायदा घ्यावा आणि फ्रान्सच्या भूमीवर उतरून आश्रय मिळाला तर पाहावा असे आपण तत्काल स्फूर्तीनें ठरविलें," असेंहि सावरकरांनीं म्हटल्याचें 'पायोनिअर'च्या इतिवृत्तात प्रसिद्ध झालेलें आहे. पण सर्व परिस्थितीचा विचार केल्यावर असं स्पष्ट दिसतें कीं हे शब्द खरोखरच त्यांचे असतील तर, ते औपचारिक असले पाहिजेत. इतक्या मोठ्या साहसाला सावरकरांचें मन प्रवृत्त झालें, ते क्षणभराच्या तात्कालिक विचारानें प्रवृत्त झालें, असें मानणें म्हणजे मनुष्यस्वभावाच्या व्यापारांचें आपल्याला कांहींच ज्ञान नाहीं, असें कबूल करण्यासारखें ठरेल. सावरकरांना पोर्टहोलमधून निसटून जाण्याचा प्रयत्न करण्याचें ठरवितांना अनेक गोष्टींचा साधकबाधक विचार केला असला पाहिजे. आपला प्रयत्न सफल झाला तर काय होईल, हा विचार तर त्यांच्या मनांत आलाच असेल; पण, या विचाराप्रमाणेच, तद्विरोधी विचारहि त्यांच्या मनांत आला असला पाहिजे. "सदोदित प्रतिकूल तच घडेल हें गृहीत धरून त्याला तोंड देण्याची मनाची सज्जता[१]" करून ठेवण्याचा सराव त्यांनीं स्वतःला लावून घेतलेला असल्यामुळें, आपला प्रयत्न अपेशी ठरला तर आपल्यावरील संभाव्य संकट अनेक पटींनीं वाढेल कसें, हा विचार त्यांच्या मनांत येऊन गेला असलाच पाहिजे. सरकार आपल्याशीं

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. ७.

कितीहि खुनशीपणानें वागत असलें तरी, ज्याला प्रत्यक्ष पुरावा म्हणतां येईल असें आपल्याला बाधक ठरणारें, सरकारपाशीं कांहींहि नाहीं, याची जाणीव सावरकरांना होती. बोटींतून निसटून जाण्याचा आपला प्रयत्न फसला तर त्यांतून जे निष्कर्ष निघतील ते आपल्याला प्रतिकूल असे निघतील, हें त्यांना स्पष्ट दिसलें असलें पाहिजे, निसटून जाण्याच्या प्रयत्नाच्या परिणामांची शहानिशा मनांत पुरतेपणीं केल्यावरच सावरकर मार्सेलिस येथील साहसाला उद्युक्त झाले असले पाहिजेत, हें अगदीं उघड आहे. त्यामुळें 'पायोनिअर' पत्रांतल्या वृत्तांतांत त्यांचे म्हणून जे उद्गार दिलेले आहेत, ते परमार्थतः लक्षांत घेण्याचें कारण नाहीं. बोट मार्सेलिसला जाऊन पोंचल्यावर पोर्टहोलचें मोजमाप घेण्याची संधि त्यांना मिळाली नाहीं. बिस्केच्या उपसागरांत बोट खूप डुलत असतांना, शरीराचा तोल सुटल्याचा बहाणा करून सावरकरांनीं 'पोर्ट होल' चें कच्चें मोजमाप घेतलें असलें पाहिजे, हेंच अधिक संभवनीय दिसतें.

बिस्केच्या उपसागरांतील कष्टमय प्रवास संपवून 'मोरिया' बोट मार्सेलिस येथें कोणत्या दिवशीं येऊन पोंचली, यासंबंधीं माहिती देताना तत्कालीन वृत्तपत्रांनीं चुका केलेल्या आहेत. मंगळवार दि. ११ जुलै रोजीं 'मोरिया' बोट मार्सेलिस येथें येऊन पोंचली आणि दि. १२ जुलै रोजीं सकाळीं सावरकरांनीं बोटींतून निसटून जाण्याचा प्रयत्न केला, ही 'अॅडव्होकेट ऑफ इंडिया' या पत्रानें त्या वेळीं दिलेली माहिती इतर पुष्कळशा पत्रांनीं जशीच्या तशी उचललेली दिसते. पण, ही माहिती चुकीची आहे. सावरकर-प्रकरण पुढें हेगच्या न्यायसमितीकडे निर्णयासाठीं धाडण्यांत आलें; त्या वेळीं फरान्स व इंग्लंड यांच्या दरम्यान दि. २५-१०-१० रोजीं करार झाला. या करारांत व हेग येथील न्यायसमितीच्या अखेरच्या निर्णयांत दि. ८ जुलै हा सावरकरांच्या साहसाचा दिनांक दिलेला आहे. श्री. इंदुलालजी याज्ञिक यांनीं पं. शामजी कृष्णवर्मा यांच्या चरित्रांतहि या साहसाचा हाच दिनांक दिलेला आहे. 'मोरिया' बोट दि. ७ जुलै रोजीं रात्रींच्या सुमारास मार्सेलिस बंदरांत पोंचली व दुसऱ्या दिवशीं-म्हणजे दि. ८ जुलै १९१० रोजीं-सकाळीं सावरकरांनीं तिच्यांतून निसटून जाण्याचा प्रयत्न केला, ही गोष्ट निःसंशय खरी आहे. या साहसाचें पहिलें वृत्त 'डेलीमेल' मध्यें प्रसिद्ध झालें तें दि. ११ जुलै रोजीं प्रसिद्ध झाल्यामुळें, 'अॅडव्होकेट ऑफ इंडिया' प्रभृति पत्रांची या बाबतींत दिशाभूल झाली असावी, असें दिसतें.

'मोरिया' बोट मार्सेलिस बंदरांत शिरली ती सर्वस्वी योगायोगानें शिरली, असें म्हणतां येणार नाहीं. ही बोट मार्सेलिस येथें थांबेल कीं नाहीं याविषयीं गुप्तता राखण्याचा कमालीचा प्रयत्न करण्यांत आला होता, हें खरें आहे; पण, मार्सेलिससारख्या महत्त्वाच्या ठिकाणीं अजिबात न थांबतां ही बोट पुढें जाईल, हाहि संभव फारसा नव्हता. योगायोगानें घडलेली गोष्ट अशी कीं, ही बोट मार्सेलिस बंदराच्या थोडी अलीकडे असतांना बोटीच्या यांत्रिक रचनेंत कांहीं बिघाड झाला व यांत्रिक दुरुस्ती पुरी झाल्याशिवाय पुढील प्रवास सुरू करणें धोक्याचें असल्यामुळें, मार्से-

लिस बंदरांतील या बोटीचा मुक्काम लांबला. बोटीची यांत्रिक दुरुस्ती व्हावयाची असल्यामुळें बोट धक्क्यापाशीं शक्य तितक्या जवळ आणून उभी करणें बोटीवरील अधिकाऱ्यांना अपरिहार्य वाटलें. दि. ७ जुलै रोजीं रात्रींच्या वेळीं बोट मार्सेलिस बंदराच्या धक्क्यापासून फारच थोड्या अंतरावर उभी राहिलेली दिसतांच आणि यांत्रिक दुरुस्ती पुरी झाल्याशिवाय ती पुढें जाऊं शकत नाहीं हें उघड दिसूं लागतांच बोटींतून निसटून जाण्याविषयींचा मनांत एकसारखा उचंबळत असलेला सावरकरांचा संकल्प फिरून प्रबळ बनला !

सावरकर–प्रकरण पुढें हेग येथील न्यायसमितीपुढें गेलें तेव्हां इंग्लंडतर्फे ज्या गोष्टी सांगण्यांत आल्या त्यांतली एक गोष्ट महत्त्वाची असल्यामुळें, तिचा या ठिकाणीं निर्देश केला पाहिजे. एका राजकीय कैद्याला घेऊन 'मोरिया' बोट फ्रान्सच्या किनाऱ्यानें चालली आहे, ती मार्सेलिस बंदरांत थांबेल त्या वेळीं फ्रेंच पोलिसांनीं लक्ष ठेवावें, अशी सूचना ब्रिटिश सरकारनें फ्रेंच सरकारला केलेली होती. मार्सेलिस येथील पोलिस अधिकाऱ्यांना ही सूचना मिळालेली असल्यामुळें, 'मोरिया' बोट बंदरांत येऊन उभी राहिल्यावर थोड्या वेळानें, कांहीं फ्रेंच पोलिस अधिकारी 'मोरिया' बोटीवर आले. या अधिकाऱ्यांशीं बोलण्याचा सावरकरांनीं प्रयत्न केला; पण, त्यांना या अधिकाऱ्यांशीं बोलतां आलें नाहीं. या बाबतींत निराशा वांट्यास आलेली दिसतांच सावरकर आपल्या संकल्पाची अम्मलबजावणी करण्याच्या विचारांत गढून गेले, असें दिसतें. येरझारा घालीत असतांना ते मध्येंच एकदम थांबले व आपल्या पहारेकऱ्यांकडे वळून म्हणाले, "मला स्नान करावयाचें आहे!" पहारेकऱ्यांना ही विनंति ऐकून संशय आला त्यांनीं सावरकरांना स्नानगृहांत जाऊं दिलें; पण, सावरकर स्नानगृहांत असतांना त्यांच्यावर सक्त नजर ठेवण्याच्या कामीं त्यांनीं दक्षता दाखविली. त्यामुळें सावरकरांना या वेळीं कांहीच हालचाल करतां आली नाहीं. बोट किनाऱ्यापासून इतकी जवळ उभी राहिलेली आहे, आपल्या ताब्यांत असलेला हा साहसी कैदी या परिस्थितीचा केव्हां, कसा फायदा घेईल याचा नेम नाहीं, हें सावरकरांच्या पहारेकऱ्यांनीं ओळखलें होतें. म्हणून रात्रीं देखील ते चांगल्या दक्षतेनें पहारा करीत होते. आपल्या केबिनमध्यें असलेले सावरकर झोपेचें सोंग करीत होते; पण, त्यांच्या मनांत विचारा-विकारांचें काहूर माजलेलें होतें. रात्रींच्या वेळाच कांहीं तरी करावें असा विचार त्यांच्या मनांत एकदोनदां चमकून गेला; पण, पार्कर व पॉवर ही जयविजयांची जोडी निकटवर्ती असल्यामुळें, त्यांना आपलें मन आंवरावें लागलें.

पहांटेची वेळ जवळ येऊं लागली तसतसा सावरकरांच्या मनांतला अस्वस्थपणा वाढूं लागला. बोटींतून निसटून पोहून सुरक्षित ठिकाणीं जाऊन पोंचावयाचें असेल तर सध्यांच्या इतकी सोईची संधि फिरून मिळणार नाहीं, हें त्यांना स्पष्ट दिसत होतें. त्यांनी लहानपणीं नाशिक येथें असतांना गोदावरीत पोहण्याचा सराव

केला होता हें खरें; पण, गोंगावलेला भरपूर पूर आलेला आहे अशा वेळीं पुरांत पोहण्याचें साहस त्यांनीं कधीं केलेलें नव्हतें.[1] त्यामुळें किनाऱ्यापासून बोट दूर अंतरावर असतांना तिच्यांतून निसटण्याचा प्रयत्न करणें हें फार धोक्याचें आहे, हें त्यांच्या लक्षांत आलेलें होतें. आपल्या शत्रूनें आपल्याला पकडून हिंदुस्थानांत न्यावें, तेथें न्यायदानाचें नाटक होऊन मग आपल्याला फांसावर चढविण्यांत यावें अगर अंदमानांत झिजून झिजून व झडून झडून मरण्याचा प्रसंग आपल्यावर यावा यापेक्षां अफाट दर्यांत लाटांशीं झुंज घेतांघेतां मरण आलें तर तें पतकरलें, असाहि विचार त्यांच्या मनांत चमकून गेला नसेल, असें नाहीं; पण, शेंदीडशें फूट पाणी तोडून[2] किनारा गांठण्याची, सुरक्षित स्थळीं पोंचण्याची, आपल्या शत्रूवर मात करण्याची व आपल्या मातृदेशाची सेवा करीत राहाण्याची सुसंधि समोर दिसत असतांना ती हातची जाऊं द्यावयाची आणि मग मृत्यूला कवटाळीत बसावयाचें हा मार्ग शहाणपणाचा नव्हे, असें देखील त्यांना वाटलें असण्याचा संभव आहे. आपण केलेल्या पूर्वयोजनेनुसार आपली फ्रान्समधील मित्रमंडळी आपल्यासाठीं याच ठिकाणीं कांहीं तरी धडपड करीत असतील, या विश्वासानेहि त्यांच्या मनाला उत्तेजित केलेलें असेल. अशा अनेक तऱ्हेच्या विचारांत मन गढून गेलें असल्यामुळें सावरकरांना त्या रात्रीं झोंप मुळींच लागली नसेल, हें अगदीं उघड आहे. झोंप लागली नसूनहि गाढ झोंप लागल्याचें सोंग मात्र त्यांना करावें लागत होतें; कारण, आपली अस्वस्थता आपल्या पहारेकऱ्यांच्या लक्षांत आली तर तेहि जागृत राहातील—ते अधिक संशयखोर बनतील—आणि केवळ त्यामुळेंच आपल्या मनांतील संकल्प विफल होईल हा संभव सावरकरांना स्पष्ट दिसत होता !

पार्कर व पॉवर या इंग्लिश पहारेकऱ्यांच्यामध्यें अंग चोरून पडल्यावर, झोंप लागल्याचा बहाणा करीत असतांना, सावरकरांच्या मनांत त्या मध्यरात्रीनंतर कोणकोणते विचार उद्‌भवले असतील, याचें काल्पनिक पण वस्तुस्थितिनिदर्शक चित्र रेखाटतां येण्यासारखें आहे. मार्सेलिस बंदराच्या धक्क्यालगत 'मोरिया' बोटीनें नांगर टाकला त्याबरोबर, लांबवितां येईल तितकी नजर लांबवून, सावरकरांनीं आपल्या मित्रमंडळींपैकीं कोणी धक्क्यावर दिसत आहेत कीं काय, हें पहाण्याचा प्रयत्न केला होता. ही मित्रमंडळी धक्क्यावर कां दिसली नाहीं यासंबंधींचे अनेक

---

१ अप्रकाशित आत्मवृत्त.

२ 'मोरिया' बोट किनाऱ्यापासून कितीशा अंतरावर उभी होती याबद्दलचें तत्कालीन वृत्तपत्रांतून आलेलें वर्णन सावरकरांनीं मागून केलेल्या वर्णनाशीं जुळत आहे. अंदमानांतून हिंदुस्थानांत परत आल्यावर सावरकरांना कांहीं दिवस अलीपूर तुरुंगांत ठेवण्यांत आलें होतें. "तुम्ही किती दिवसरात्र पोहत होतां समुद्रांत ?" असा प्रश्न या तुरुंगांतल्या एका जिज्ञासू शिपायानें सावरकरांना विचारला. तेव्हां सावरकर म्हणाले : छट् ! दिवसरात्र कसली ! दहा मिनिटें देखील पोहत नसेन तों तीर गांठलें गेलें. (माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. १७५.)

विचार त्यांच्या मनांत उभे राहिले असले पाहिजेत. बोट मार्सेलिसला थांबणार नाहीं. अशा कल्पनेनें ही मंडळी हात जोडून स्वस्थ बसली असतील कीं काय, 'मोरिया' बोट मार्सेलिस बंदरांत पोंचण्याच्या वेळेबद्दलचा त्यांचा अंदाज चुकला असेल कीं काय, असे प्रश्न त्यांना स्वाभाविकपणेंच सुचले असतील. ही मंडळी आपली मुक्तता करण्यासाठीं आली नाहीं तर आपण स्वस्थ बसावयाचें कीं काय, हाहि प्रश्न मनांत उभा राहून सावरकरांनीं त्याचें नकारार्थी उत्तर दिलें असलें पाहिजे. एकट्याच्या हिंमतीवर कांहीं प्रयत्न करावयाचा तर 'पोर्टहोल' मधून निसटण्याचाच प्रयत्न करणें शक्य आहे व तेंहि पहाटे प्रातर्विधीच्या वेळींच करणें शक्य आहे हें त्यांनीं मनाशीं ठरविलें असलें पाहिजे. रात्रीं स्नानगृहांत गेल्या वेळीं स्नानगृहाजवळ असलेल्या 'पोर्टहोल' कडे त्यांची नजर गेलेली होती. हें 'पोर्टहोल' पक्कें बंद झालेलें दिसल्यामुळें, निसटून जाण्याच्या कामीं या 'पोर्टहोल' चा विशेष उपयोग होण्यासारखा नाहीं, हेंहि त्यांच्या लक्षांत आलें असलें पाहिजे. शौचकुपांत असलेल्या 'पोर्टहोल' चें चित्र त्यांच्या कल्पनेपुढें उभें राहिलें असलें पाहिजे. 'पोर्टहोल' च्या परिघाचा अंदाज त्यांनीं बिस्केच्या उपसागरांत काढला होता. गळ्यांतील जानव्याचा उपयोग करून, आपल्या छातीचा परिघ किती आहे, याचा अंदाज त्यांनीं यापूर्वीच घेतला होता. 'पोर्टहोल'च्या पोकळींतून आपलें शरीर बाहेर निघण्यासाठीं शरीराचा जो संकोच करावा लागेल तो आपल्याला करतां येईल कीं नाहीं, हेंहि त्यांनीं मनाशीं ठरविलें असलें पाहिजे. आपण शौचकूपांत जातों त्या वेळीं पहाऱ्यावरील एक शिपाई बाहेर उभा असतो व शौचकूपाच्या फळयांत बसविलेल्या आरशांतून तो आपल्या आंतील हालचालींवर लक्ष ठेवीत असतो हें त्यांच्या लक्षांत आलेलें असल्यामुळें, या पहारेकऱ्याची नजरबंदी कशी करतां येईल या प्रश्नाचेंहि उत्तर त्यांनीं आपल्या मनांत ठरविलें असलें पाहिजे. आपण हा प्रयत्न केला आणि तो यशस्वी झाला तर काय होईल आणि तो प्रयत्न अपेशी ठरला तर काय होईल—लोक आपल्याला पोरकट कसे म्हणतील, आपले पहारेकरी आपला छळ कसा करतील, आपल्याला होणारी शिक्षा क्रूरतर कशी होईल, इत्यादि अनेक विचार त्यांच्या मनःफलकावरून, चित्रपटांत दिसणाऱ्या विविध चित्रांप्रमाणें, भराभर निघून गेले असतील. 'कसें करूं मी, काय करूं मी' हें जें विचारांचें ध्रुपद तें त्यांच्या मनांत बराच वेळपर्यंत घोळत राहिलें असलें पाहिजे !

अशा विचारांत सावरकरांचें मन गढून गेलें आहे तोंच प्रभातकाल जवळ आल्याची कल्पना त्यांना आली. यापुढें विचारांत वेळ घालविणें सुरक्षितपणाचें नाहीं, जो कांहीं सोक्षमोक्ष व्हावयाचा असेल तो एकदांचा आतांच करून घेतला पाहिजे असें मनांत पक्कें ठरवून, 'Now or never' हे शब्द मनोमन उच्चारून सावरकर अंथरुणावरून अलगत उठले. पहाऱ्यावर असलेल्या हिंदी शिपायाकडे वळून त्यांनीं आर्जवी स्वरांत त्याला 'शौचकूपाकडे घेऊन चल' असें म्हटलें.

आदल्या रात्रीपासून पार्कर व पॉवर हे सावरकरांच्या बाबतींत जास्त जागरूकपणें वागत आहेत हें या पहारेकऱ्याच्या लक्षांत आल्यामुळें, केवळ स्वतःच्या जबाबदारीवर सावरकरांना शौचकूपाकडे घेऊन जाणें त्याला धोक्याचें वाटलें असावें. इंग्रज पहारेकऱ्यांपैकीं एकाला त्यानें उठविल्यावर, थोड्या वेळानें हे दोघे जण सावरकरांना शौचकूपाकडे घेऊन जाण्याला सिद्ध झाले. इंग्रज पहारेकऱ्याची ही ब्याद बरोबर येत आहे हें पाहून सावरकर खूप चरफडले असले पाहिजेत. पण, मनांत चरफडत बसून, तक्रार करून, निभाव लागण्यासारखा नसल्यामुळें; ते त्यांच्याबरोबर शौचकूपापर्यंत गेले शौचकूपांत शिरतां शिरतां ते या पहारेकऱ्यांना म्हणाले: माझी अमूक अमूक वस्तु विस्मरणानें वर राहिली आहे; ती तेवढी कृपा करून मला आणून द्या. ती वस्तु आणण्यासाठीं इंग्रज पहारेकरी वर गेला हें पहातांच, सावरकर शौचकूपांत शिरले व त्यांनीं शौचकूपाचा दरवाजा आंतून जाम बंद करून घेतला.

बाहेर पहारेकरी उभा होता त्याला आंतलें कांहीं दिसूं नये व आपल्याला तितका वेळ अधिक मिळावा यासाठीं काय करावयाचें हें सावरकरांनीं आगाऊच मनांत ठरविलें होतें. त्यांनीं इंग्लंडमध्ये असतांना जीं क्रांतिकारकांचीं चरित्रें वाचलीं होतीं त्यांतल्या एका चरित्रांतला एक प्रसंग रात्रीं अंथरुणावर पडल्या पडल्या त्यांना आठवला होता. अंगांतला कोट झटकन् काढून तो फेंकण्याची संवय त्या क्रांतिकारकानें केली होती व एका बिकट प्रसंगीं लगबगीनें अंगांतून काढलेल्या या कोटानें त्यांचा बचाव केला होता, हें वर्णन त्यांना आठवलें होतें. त्या प्रयोगाची आवृत्ति काढण्याचें मनांत ठरवून, सावरकरांनीं अंगावरील Sleeping gown ( झोपण्याच्या वेळचा झगा) अंगावर तसाच ठेवून दिला होता. शौचकूपाचें दार आंतून घट्ट लावून घेतल्याबरोबर, त्यांनीं हा झगा लगबगीनें काढला व आरशाच्या वर असलेल्या हुकमावर तो अडकवून दिला. आपण कैद्याच्या हालचालींकडे दुर्लक्ष करीत आहों असा आभास निर्माण करण्याची बाहेरच्या पहारेकऱ्यानें ऐट आणली असल्यामुळें, तो आरशाकडे पाठ करून उभा होता. इतक्यांत सावरकरांनीं या आरशाला आंतल्या बाजूनें काळा अभ्रा बसवून टाकला व ते आपल्या पुढील उद्योगाकडे वळले !

लगबगीनें अंगांतले बहुतेक कपडे उतरून सावरकरांनीं पोर्टहोलच्या दिशेनें उडी ठोकून दिली. पहिल्या उडींतच पोर्टहोल त्यांच्या हातीं आलें नाहीं, पण, दुसरी उडी घेतांच ते पोर्टहोलपाशीं जाऊन भिडले ! पोर्टहोल कांहींस किलकिलें आहे हें पाहून त्यांना बरें वाटलें. किलकिलें असलेलें हें पोर्टहोल पुरतेपणीं उघडून त्यांनीं आपलें शरीर त्यांत कोंबण्याचा व त्यांतून निसटून बाहेर पडण्याचा उद्योग सुरू केला. हें करण्यापूर्वी सावरकरांनीं आपल्या अंगाला खूपसा साबण चोपडला होता, अशी अनेकांची समजूत आहे. बॅ. असफअल्ली यांनीं प्रसिद्ध केलेल्या आठवणींतहि 'सावरकरांनीं सर्वांगास साबण चोपडला होता' (Soaping

himself all over ) असें म्हटलें आहे[1]. पण हें वर्णन चुकीचें आहे. प्रत्येक सेकंद बहुमोल असल्याची तीव्र जाणीव सावरकरांच्या मनांत जागृत होती. साबणाचा फेंस काढून तो अंगाला चोपडीत बसण्याइतका तरी वेळ होता कोठें ?

शौचकुपाचें दार सावरकरांनीं आंतून बंद करून घेतलें त्या क्षणापासून, सावरकरांना अटक करून फिरून 'मोरिया' बोटीवर बंदोबस्तानें आणण्यांत आलें त्या क्षणापर्यंत जो काळ लोटला त्या काळांत कायकाय घडलें—किंवा कायकाय घडलें असावें—हें समजून घेण्याला उपयोगी पडणारीं कांहीं समकालीन वर्णनें उपलब्ध आहेत. हीं वर्णनें परस्परांशीं तंतोतंत जुळत नाहींत. कित्येक बाबतींत तीं परस्पर-विरोधी आहेत, हें खरें आहे. असें असलें तरी, समकालीन वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालेलीं वर्णनें म्हणून त्यांना पुष्कळच महत्त्व आहे हें मान्य केलें पाहिजे. 'मोरिया' बोटीवर कांहीं हिंदी प्रवासी होते. पण, त्यांच्यापैकीं कोणीहि या महत्त्वाच्या घटनेचें वर्णन त्या काळीं लिहिलें नाहीं व त्या काळच्या हिंदी वृत्तपत्रांनीं अशा एकाद्या उतारूला गाठून त्याच्याकडून या घटनेची हकीकत मिळविली नाहीं, असें दिसतें. 'इंग्लिशमन' पत्राचा व्यवस्थापक मि. एच्. ए. ग्लॅक्समन हा 'मोरिया' बोटींतून प्रवास करीत होता. हिंदुस्थानांत आल्याबरोबर त्यानें मार्सेलिस–प्रकरणाबद्दल जी हकीकत लिहिली ती त्या वेळीं 'इंग्लिशमन' व 'ॲडव्होकेट ऑफ इंडिया' या पत्रातून प्रसिद्ध झाली. या हकीकतींतला महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :

* He then appears to have divested himself of his sleeping suit and, climbing up to the porthole, commenced to squeeze himself through. The operation was both tedious and painful, judging from the barked appearance of his sides afterwards. When he had worked his body almost through the porthole, his manifest attempt to escape was noticed by the quarter-master of the ship, who was standing on the gangway at the time. The latter raised the alarm which attracted the attention of the Indian Policeman down below, waiting for his charge to reappear from the lavatory. He instantly rushed up on deck to see the quarter-master plunge into the water in pursuit of Savarkar, immediately he saw the latter drop from the porthole into the short space of water separating the vessel's poop

---

1 Life of Barrister Savarkar by Chitra Gupta : P. 134.

*यानंतर सावरकरांनीं आपल्या अंगावर असलेले झोंपण्याच्या वेळचे कपडे काढून टाकले असावे आणि पोर्टहोलपर्यंत उडी मारून, त्यांत आपलें शरीर कोंबून, तें बाहेर घुसविण्याला त्यांनीं प्रारंभ केला असावा, असें दिसतें. मागाहून, सावर-करांच्या बरगड्यांच्या बाजूची कातडी सोलून निघालेली दिसली. यावरून असा निष्कर्ष निघतो कीं, बाहेर पडण्याचें काम कंटाळवाणें व कष्टप्रद ठरलें असलें पाहिजे. त्यांनीं आपलें शरीर पोर्टहोलमधून जवळ जवळ बाहेर घुसविलें. तितक्यांत, निसटून जाण्याचा त्यांचा हा राजरोस प्रयत्न बोटीच्या क्वार्टर-मास्टरच्या लक्षांत आला. उतारूंना जाण्यायेण्यासाठीं ठेवलेल्या रस्त्यावर उभ्या असलेल्या या अधिकाऱ्याच्या

from the quay. Without hesitating, the policeman followed suit and struck out towards the wharf. Savarkar succeeded in scrambling on to it and was closely followed by the quarter-master and his Indian rival who had joined in the chase along the landing stage by a French Gendarme. While in flight, the excited fugitive kept shouting for a cab and two of his Indian compatriots were observed in his immediate vicinity, indicating where a cab was available. Before he could get clear of the wharf, however, the Indian policeman caught him up and captured him and then led him back on board the 'Morea,' where he apologised and said he was very sorry It was then noticed that the supreme efforts he had made to squeeze himself through the porthole had caused him to escape the skin off his sides

ही हकीकत प्रसिद्ध झाल्यावर थोडयाच दिवसांनीं-म्हणजे दिनांक २६ जुलै १९१० रोजीं 'पायोनियर' पत्रानें या हकीकतींत कांहीं महत्त्वाच्या बाबतींत चुका असल्याचा शेरा मारला आणि विश्वसनीय मार्गानें मिळालेली म्हणून कांहीं माहिती प्रसिद्ध केली. त्यांतील पुढील उतारा महत्त्वाचा आहे :

* The next morning (Friday) early about six o'clock, Savarkar desired to be taken to the lavatory but was prevailed upon to wait till about an hour later. In the morning, he was taken to the lavatory by the

---

लक्षांत हा प्रकार आल्याबरोबर, त्यानें आरडाओरडा केला. आपल्या ताब्यांतील कैदी शौचकूपांतून बाहेर केव्हां येतो म्हणून वाट पहात असलेल्या शिपायाच्या कानांवर हा आरडाओरडा गेला. हा शिपाई तत्काळ वरच्या मजल्यावर गेला. पोर्टहोल-मधून उडी टाकून सावरकर धक्का व बोट यांच्या दरम्यानच्या चिंचोळया जल-पृष्ठावर उतरतात तोंच, त्यांचा पाठलाग करावा म्हणून क्वार्टर-मास्टरनेंहि पाण्यांत उडी टाकली आहे, असें या शिपायास आढळून आलें. क्षणाचीहि दिरंगाई न करितां, त्या शिपायानेंहि क्वार्टर-मास्टरचें अनुकरण केलें आणि तो झपाझप धक्क्याकडे जाऊं लागला. धडपडत धक्क्यापर्यंत पोंचण्यांत सावरकर यशस्वी झाले. त्यांचा पाठलाग करणारे दोघे त्यांच्या मागोमाग चालले होते. बोटीवरून धक्क्यावर उतरण्याचा जो मार्ग होता त्या मार्गानें एक फ्रेंच पोलिस अधिकारीहि सावरकरांचा पाठलाग करूं लागला. सावरकर एकीकडे पळत होते आणि पळत असतांनाच ते 'गाडी गाडी' म्हणून ओरडत होते. त्यांच्यापासून जवळच असलेले त्यांचे दोघे हिंदी साहाय्यक गाडी कोठें आढळेल हें त्यांना खुणेनें दाखवीत आहेत, असेंहि दिसून आलें. सावरकर धक्क्यावरून पार निसटले नाहींत तोंच त्यांचा पाठलाग करणाऱ्या हिंदी पोलिसानें त्यांना पकडलें आणि अटक करून त्यांना परत 'मोरिया' बोटीवर आणलें. तेथें आल्यावर "माफ करा, दिलगीर आहें" असे शब्द सावरकरांनीं उच्चारले. पोर्टहोल मधून निसटून जाण्याचा शर्थीचा प्रयत्न केल्यामुळें, सावर-करांच्या छातीच्या दोन्ही बाजूंची कातडी सोलून निघाली होती, असें त्या वेळीं लोकांच्या लक्षांत आलें.

*दुसऱ्या दिवशीं म्हणजे शुक्रवारीं पहांटे सहा वाजण्याचे सुमारास सावरकरांनीं प्रातर्विधीला जाण्याची इच्छा व्यक्त केली; पण, त्यांना 'तासभर थांबा' असें

Scotland Yard officer, who deputed one Indian policeman to look after the prisoner. Meanwhile, Savarkar had quickly closed and bolted the door. The policeman, finding the door closed, peeped through the crevice at the top of the door and noticed Savarkar endeavouring to get through he porthole.

Instead of raising an alarm at once, he tried to breakdown the door, smashing two panes of glass in his fruitless effort. Savarkar, who is 36 inches round the chest, succeeded in getting through a 12 inch circular porthole, after scraping his body very severely in the process. Dropping into the water, he swam to the pier where he was observed by the quarter-master and a steward on the ' Morea. ' These men immediately gave the chase. Running to a Gendarme at the customs barrier, Savarkar begged to be taken before a Magistrate. The Gendarme, however, brought him back to the ship and handed him over to his guardians. The story about two Indian confederates on the quay is not confirmed nor did Savarkar apparently make any attempt to get into a cab.

तत्कालिन वृत्तपत्रांतून त्रयस्थांच्या मार्फत प्रसिद्ध झालेल्या या हकीकती जशा महत्त्वाच्या आहेत त्याप्रमाणेंच तत्कालिन वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालेली आणखीहि एक हकीकत महत्त्वाची आहे. दि. ३-१०-१९१० रोजीं ' डेली न्यूज ' पत्राच्या पॅरिसच्या वार्ताहरानें 'L'Humanite व 'Le Temps' या फ्रेंच पत्रांतून प्रसिद्ध

---

सांगण्यांत आलें व त्यांनीं तें मान्य केलें. सकाळीं हेरखात्यांतल्या अधिकाऱ्यानें त्यांना शौचकूपाकडे नेलें; आणि सावरकरांच्यावर नजर ठेवण्याचें काम त्यानें एका हिंदी शिपायावर सोंपविलें. इकडे सावरकरांनीं दरवाजा लावून घेतला व तो आंतून पक्का बंदहि करून टाकला. दरवाजा बंद झाल्याचें दिसतांच, दरवाजाच्या वरच्या बाजूला असलेल्या फटींतून पहारेकरी पाहूं लागला. पोर्टहोलमधून बाहेर पडण्याचा सावरकरांचा प्रयत्न चालला आहे, असें त्याच्या ध्यानांत आलें.

एकदम हांकाटी न करतां, या शिपायानें दरवाजा फोडण्याचा प्रयत्न केला. हा प्रयत्न तर साधला नाहींच; पण, तेवढ्यांत दरवाजाचीं दोन कांचेचीं तावदानें मात्र छिन्नभिन्न झालीं. सावरकरांच्या छातीचा परिघ तीन फूट आहे. एक फूट परिघाच्या पोर्टहोलमधून यशस्वीपणानें निसटतांना त्यांचें शरीर चांगलेंच सोलून निघालें.

पाण्याशीं गांठ पडतांच सावरकर झपाट्यानें पोहूं लागले आणि त्यांनीं धक्का गांठला. ते या ठिकाणीं असतांनाच ' मोरिया ' बोटीवरील क्वार्टर-मास्तर व स्टीवर्ड या अधिकाऱ्यांनीं त्यांना पाहिलें व त्यांनीं लागलाच त्यांचा पाठलाग सुरू केला. जकातीच्या नाक्याशीं उभ्या असलेल्या फरेंच पोलिसापाशीं धांवत जाऊन, सावरकर म्हणाले : मला मॅजिस्ट्रेटपुढें उभा करा. या शिपायानें सावरकरांना बोटीवर परत आणलें आणि त्यांच्या रखवालदाराच्या स्वाधीन केलें. सावरकरांचे दोघे हिंदी सहकारी धक्क्यावर होते, या हकीकतीला आधार मिळत नाहीं; आणि गाडी गांठून तिच्यांत बसण्याचा सावरकरांनीं प्रयत्न केला या म्हणण्यांतहि कांहीं अर्थ नाहीं, हें स्पष्ट आहे.

झालेली हकीकत तारेनें इंग्लंडला धाडून दिली. ही हकीकत स्वतः सावरकरांनींच लिहून धाडलेली होती. सावरकरांच्या पॅरिसमधील मित्रांनीं वृत्तपत्रांतून चाललेली मार्सेलिस-प्रकरणाची चर्चा, सावरकरांच्या साहसाबद्दल त्यांना मिळालेले धन्यवाद इत्यादि गोष्टी संकलित केल्या व तें सारें संकलित मुद्रित वृत्त तुरुंगांत असलेल्या सावरकरांना मिळेल अशी गुप्त पण खात्रीची व्यवस्था त्यांनीं केली. त्यामुळें, जग आपल्याकडे भयमिश्रित आदरानें पहात आहे हें सावरकरांच्या ध्यानीं आलें. वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या हकीकती कांहीं बाबतींत सदोष आहेत, असेंहि त्यांच्या लक्षांत आलें. या हकीकती दुरुस्त झाल्या नाहींत तर आपल्यासाठीं बाहेर धडपडणाऱ्या आपल्या मित्रांची बाजू कदाचित् लंगडी ठरेल, अशीहि भीति त्यांना वाटूं लागली. १९१० सालीं ऑगस्ट महिन्याच्या अखेरीस सावरकरांना नाशिकहून हलवून येरवड्याच्या तुरुंगांत ठेवण्यांत आलें. सावरकरांचे न्यायालयीन सल्लागार या नात्यानें बॅ. जोसेफ बॅप्टिस्टा यांनीं दि. १३-९-१९१० रोजीं सावरकरांची येरवडा तुरुंगांत जाऊन भेट घेतली. ही भेट होण्याच्या सुमारास सावरकरांनीं तुरुंगांत गुपचुपपणें मार्सेलिस-प्रकरणाची कांहीं हकीकत लिहून काढिली होती.[१] बॅ. बॅप्टिस्टा यांच्या भेटीच्या वेळीं ही लेखी हकीगत गुप्तपणें तुरुंगाबाहेर आली व ती लागलीच सावरकरांच्या फ्रान्समधील मित्रांकडे धाडण्यांत आली. त्या मित्रांमार्फत या हकीकतींतला महत्त्वाचा भाग फ्रेंच वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करण्यांत आला व मग तो इंग्लिश वृत्तपत्रांकडे धाडण्यांत आला. फ्रेंच वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालेल्या या हकीकतींतल्या महत्त्वाच्या भागाचा इंग्रजी मतलब पुढीलप्रमाणें आहे :

Savarkar was prevented from holding any conversation with French officials while the P. & O. Liner Morea, on which he was being taken out to Bombay, was in French waters. Savarkar, on arriving at Marseilles, requested to be landed, claiming that he had been wrongfully arrested. This request was, of course, refused Two French officers went on board the Morea but were not allowed to speak to Savarkar. He then determined to escape ...Having gained the shore, he saw that two English detectives and three of the Morea's officers were in pursuit. He ran about three hundred yards but his pursuers gained on him and he turned to a French Gendarme for help, asking to be taken at once to the Commissary of Police At this moment, the detectives arrived and one of them took Savarkar by the neck, the other by the arm In this brutal fashion, he was taken on board, put in chains and kept in the strictest secrecy.

(पी. अँड ओ. ची 'मोरिया' बोट सावरकरांना घेऊन मुंबईकडे चालली असतांना, ती फ्रेंच किनाऱ्यानजीक समुद्रांत उभी होती त्या अवधींत, बोटीवर आलेल्या फ्रेंच अधिकाऱ्याशीं कोणत्याहि तऱ्हेचें भाषण करण्याला सावरकरांना बंदी करण्यांत आली होती. बोट मार्सेलीस येथें आल्याबरोबर सावरकरांनीं "मला किनाऱ्यावर

---

[१] स्वामी शुद्धानंद भारतियार यांनी धाडिलेल्या अय्यर यांच्या आठवणी.

सोड.' अशी मागणी केली. "मला अटक करण्यांत आली ती बेकायदा करण्यांत आली." हा मुद्दा त्यांनीं जोरानें मांडला. ही विनंति अर्थातच अमान्य झाली. 'मोरिया' बोटीवर दोन फ्रेंच अधिकारी गेले होते; पण, त्यांना सावरकरांशीं बोलण्याची मुभा देण्यांत आली नाहीं. हा प्रकार घडल्यावर सावरकरांनीं बोटींतून निसटण्याचा निश्चय केला....किनारा गांठल्यावर त्यांना असें आढळून आलें कीं, दोघे इंग्लिश हेर आणि 'मोरिया' बोटीवरील तिघे अधिकारी आपला पाठलाग करीत आहेत. ते सुमारें तीनशें यार्ड पळत गेले; पण, त्यांचा पाठलाग करणाऱ्या लोकांनीं त्यांना गाठलें. फ्रेंच पोलिसाची मदत मिळावी म्हणून ते त्याच्याकडे वळले आणि "मला पोलिस खात्याच्या प्रमुखाकडे तत्काळ घेऊन चला" अशी विनंति त्यांनीं केली. इतक्यांत इंग्लिश हेर येऊन भिडले. त्यांपैकीं एकानें सावरकरांची मान पकडली व दुसऱ्यानें त्यांचें मनगट धरलें. अशा अमानुष रीतीनें त्यांना परत बोटीवर नेण्यांत आलें, त्यांना बेड्या घालण्यांत आल्या व त्यांना अगदीं एकांतांत ठेवण्यांत आलें.)

कांहीं बाबतींत परस्परांहून भिन्न अगर परस्परांशीं विरोधी असणारीं वरील वर्णनें लक्षांत घेतलीं आणि 'चित्रगुप्त' लिखित सावरकर-चरित्रांत दिलेला मार्सेलिस प्रकरणाच्या तपशिलाचा भाग नजरेसमोर ठेविला म्हणजे या अद्‌भुत प्रसंगीं ज्या रोमांचकारी घटना अल्पावधींत घडल्या त्या कशा कशा घडल्या असतील याचा आराखडा तयार करतां येतो. एखादें साहस करावयाचें मनानें निश्चित ठरलें असलें आणि त्या साहसाची तपशीलवार कल्पना मनांत उभी असली तरी, तें प्रत्यक्ष करण्याची वेळ आली म्हणजे मनःस्थिति कशी होते याची कल्पना प्रत्येकाला आहेच. पहारेकऱ्याला केबिनकडे लावून दिल्यावर सावरकरांनीं शौचकूपाचें दार आंतून पक्कें बंद करून घेतलें. त्या वेळीं त्यांचें संकल्पित साहस त्यांच्यापुढें मूर्तिमंत उभें राहिलें असलें पाहिजे. पण, तो प्रसंगच असा होता कीं, विचारांत क्षणहि वांया घालविणें हें जन्माची संधि हुकूं देण्यासारखें ठरलें असतें; आणि अकस्मात् दार लावून घेतल्यामुळें व पूर्वींच्या इतर कारणांमुळें निर्माण झालेले संशय बळावण्याला स्वतःच संधि दिल्यासारखें झालें असतें. हा सर्व विचार निमिषार्धांत पुरा करून, आपल्या साहसाचे भले व बुरे काय परिणाम होऊं शकतील याचा पुरा थांग काढून आणि परिणाम कांहींहि झाले तरी आतां माघार घ्यावयाची नाहीं; संकल्प सिद्ध होणार असेल तर तो याच क्षणीं होईल; नाहीं तर जन्मांतून क्वचित् एखाद्या प्रसंगीं येणारी संधि आपण फुकट घालविली अशी बोचणी जन्मभर आपणांला सतावीत राहील, इत्यादि सर्व गोष्टी लक्षांत आणून, आगेमागे न्याहाळून, सावरकर पुढील उद्योगाला लागले असले पाहिजेत, यांत संदेह नाहीं.

अंगावर रात्रींचा म्हणून जो विशिष्ट पोषाख होता तो झटकन् झुगारून देऊन त्यांनीं बाहेरून टेहेळणी करणाऱ्या पहारेकऱ्याचा बंदोबस्त कसा केला, हें वर सांगितलेंच आहे. लहानपणीं नाशिक येथें त्यांनीं जें व्यायामाचें शिक्षण घेतलें होतें

त्यामुळें पोहणें, भिंती चढून जाणें, इ०कलांप्रमाणेंच शरीराचा संकोच करणें हीहि कला त्यांना कांहींशी अवगत होती. पण, मनुष्याला ही कला कितीहि अवगत झाली तरी त्या कलेंत तो नागाची बरोबरी थोडीच करूं शकणार आहे! शरीर जास्तींत जास्त सुटसुटीत झालें आहे असें पाहून, कांहींशा अंतरावर असलेल्या पोर्टहोलच्या दिशेनें त्यांनीं उडी झोंकून दिली आणि सारें धैर्य एकवटून त्यांनीं पोर्टहोल गांठलें! सावरकर हळू हळू पोर्टहोलमधून बाहेर पडूं लागले. त्यांच्या शरीराचें माप व पोर्टहोलचें माप वर दिलेंच आहे. त्यावरून, शरीर संकुचित करून या पोर्टहोल-मधून बाहेर पडतांना त्यांना केवढा प्रयास पडला असेल, त्यांचें शरीर किती ठिकाणीं रक्तबंबाळ झालें असेल आणि त्यांच्या अंगावरील कातडी केवढ्या मोठ्या प्रमाणांत सोलून निघाली असेल, हें कोणालाहि सहज समजण्यासारखें आहे. आंत सावरकरांची ही धडपड चालली आहे तोंच, कैद्याला वेळ लागला म्हणून बाहेरचा पहारेकरी अस्वस्थ झाला. कांचेंतून कैद्याच्या हालचाली दिसत नाहींत हें पाहून तो जास्तच विथरला आणि दाराच्या वरच्या बाजूला असलेल्या फटींतून आंत डोकावून पाहूं लागला. या 'भयंकर' माणसानें आपल्याला शेवटीं गोत्यांत आणलेंच. ही कल्पना त्या शिपायाच्या मनांत आली. कैदी बोटींतून प्रत्यक्ष निसटण्याच्या आधींच त्याला पकडावा म्हणून त्यानें बाहेरून लाथा मारमारून शौचकूपाचें दार मोडण्या फोडण्याचा प्रयत्न केला. पण, त्यांतहि त्या बिचाऱ्याला यश आलें नाहीं. शेवटीं त्यानें खिडकीला असलेलीं कांचेचीं तावदानें फोडलीं. त्याची ही धडपड क्षणा-क्षणाला वाढत चालली त्याबरोबर सावरकरांचा निश्चय व त्यांचें धैर्य हे गुणहि वाढूं लागले. 'स्वातंत्र्यलक्ष्मी की जय' हा जयघोष मनोमन उच्चारून, त्यांनीं आपलें शरीर समुद्रपृष्ठाला नेऊन भिडविलें!

बोटीच्या तळाच्या भागांत ही धडपड चालू होती त्या अवधींत दिवस हळु-हळू वर येत होता. बोटीवरील प्रवासी उठून हालचाल करूं लागले होते. बाहेर धांवाधांव करून थकलेल्या शिपायानें शेवटीं शौचकूपांत प्रवेश केला आणि सावरकर पोर्टहोलमधून निसटत आहेत हें त्यानें प्रत्यक्ष पाहिलें. चिडलेला तो शिपाई पोर्ट होलपाशीं आला. मागोमाग उडी घेऊन या 'सैतानाला' पकडावें असा विचार त्याच्या मनांत आला. पण, जें सावरकरांना साधलें तें या शिपाईदादांना साधण्या-सारखें नव्हतें. कारण, त्यांचा देह बराच स्थूल होता आणि पोर्टहोलमधून निसट-ण्याचा प्रयत्न करून शरीर रक्तबंबाळ करून घेण्याइतकी साहसी वृत्ति आणि ध्येय-वादिताहि त्यांच्या ठिकाणीं नव्हती! म्हणून, हे गृहस्थ शेवटीं बोटीच्या वरच्या मजल्यावर गेले आणि एका अर्थी खजील होऊन, बोटीच्या अधिकाऱ्यांकडे आ वासून पाहूं लागले.

पण, काय प्रकार घडला हें बोटीच्या वरच्या मजल्यावर असलेल्या अधिकाऱ्यां-पैकीं एकाच्या यापूर्वीच लक्षांत आलें होतें आणि त्यानें सावरकरांच्या मागोमाग

समुद्रांत उडीहि टाकली होती. आपली पूर्वी झालेली नामुष्की अंशतः तरी कमी व्हावी यासाठीं, खालून वर आलेला शिपाईहि साहसाला उद्युक्त झाला व त्यानेंहि समुद्रांत उडी झोंकली. पोहत चाललेल्या सावरकरांना पिस्तुलाच्या आवाजासारखा कांहीं आवाज ऐकूं आला. हे पिसाळलेले अधिकारी आपला पाठलाग करतांना आपल्याला गोळी घालून ठार मारणार कीं काय, असें त्यांना वाटूं लागलें. अशा रीतीनें मृत्यु आला तरीहि, त्यामुळें आपल्या क्रांतिकारक पक्षाची प्रतिष्ठा वाढेल, आपल्या ह्या साहसामुळें इंग्लिश पोलिसखात्याची तर आतां पुरी फटफजीति झालीच आहे, आपल्या मृत्यूनें आपल्या पूर्वीच्या चरित्रावर कळस चढणार असेल, तर ती गोष्टहि श्रेयस्करच आहे, अशा विचारपरंपरेनें उत्तेजित होऊन, सावरकर अधिकच जोमानें मार्ग कापूं लागले. पाठलाग करणाऱ्या शिपायांना हुलकावणी बसावी आणि त्यांनीं आपणांवर गोळी झाडण्याचा प्रयत्न केला तर तो शक्य तोंपर्यंत निष्फळ व्हावा म्हणून त्यांना मधून मधून समुद्राच्या पृष्ठाखालीं अदृश्य होऊन, डुबी घेऊन पोहावें लागत होतें. पोहत पोहत ते शेवटीं धक्क्याच्या अगदीं जवळ आले. त्यांचा पाठलाग करीत पोहत येणारे अधिकारीहि त्याच दिशेनें येत होते; पण धक्क्याची सुळक्यासारखी भिंत समोर आहे हें लक्षांत येतांच, त्यांना दिशा बदलावी लागली.

मार्सेलिसच्या धक्क्याला हात लागतांच सावरकरांना हायसें वाटलें. बॅरिस्टरीचा अभ्यास करीत असतांना त्यांनीं आंतरराष्ट्रीय कायद्याचा सूक्ष्मपणानें अभ्यास केला होता. बंदराच्या धक्क्याला हात लागला कीं, आंतरराष्ट्रीय कायद्यांच्या दृष्टीनें बंदरांत पोंचल्यासारखेंच ठरतें, ही गोष्ट त्यांना अवगत होती; आणि म्हणून, धक्क्याला हात लागतांच, आपण फ्रान्सला पोंचलों असा विचार त्यांच्या मनांत आला. समोरची भिंत चढून जाण्याला त्यांनीं आरंभ केला. पण, ज्या विलक्षण परिस्थितींत ते बोटीवरून निसटलेले होते, त्या परिस्थितीचा मनावर कांहीं परिणाम झाल्यामुळें म्हणा अगर शरीराला आलेल्या थकव्यामुळें म्हणा, चढतां चढतां त्यांचा हात एकदां निसटला आणि ते फिरून पाण्यांत पडले! शकुन-अपशकुनांचा मंत्रचळेपणाचा विचार मनांत आणण्याला देखील त्यांना संधि नव्हती आणि असे विचार मनांत येऊं देण्यासारखी त्यांची वृत्तीहि नव्हती. म्हणून ते तसेच तडक पुन्हां चढूं लागले आणि दुर्दम्य धैर्यानें आणि निश्चयानें भिंत चढून जाऊन ते मार्सेलिस बंदराच्या धक्क्यावर जमिनीवर उभे राहिले.

साहसी प्रयत्नांत येथवर आलेल्या यशामुळें मनाला वाटणारा प्रसन्नपणा आणि संकट मागें टाकून पुढें निसटून गेल्यामुळें वृत्तींत उद्भवणारा उत्साह यांमुळें सावरकरांनीं एकवार भोंवताली विजयी मुद्रेनें पाहिलें असेल, यांत संशय नाहीं. ज्या ब्रिटिश पोलिसखात्यानें त्यांच्या अटकेनंतर त्यांची बदनामी करण्याचे हवे ते प्रयत्न केले होते, त्यांतले जे अधिकारी बोटीवर अगर आसपास होते त्यांच्याकडे त्यांनीं

एकवार अधिक्षेपपूर्वक पाहिलें असेल, हें अगदीं शक्य आहे. आपण असहाय स्थितींत असतांना, एका लहानशा कोठडींत आपल्याला कोंडून ठेवून आपल्याला शत्रूच्या स्वाधीन करूं पाहणाऱ्या त्या 'मोरिया' बोटीकडेहि त्यांनीं त्या क्षणार्धांत उपहासपूर्वक पाहिलें असेल. 'झालों फिरून स्वतंत्र झालों' अशा चैतन्ययुक्त विचारानें उत्स्फूर्त झालेल्या त्यांच्या चित्तानें भोंवतालचा देखावा एका नव्या नजरेनें पाहिला असला पाहिजे आणि आतां मोकळेपणानें श्वासोच्छ्वास करण्याला प्रत्यवाय नाहीं हा विचार मनांत येऊन, त्यांनीं खरोखरीच मोकळेपणानें एकादा श्वासहि घेतला असला पाहिजे !

कष्टानें व धडपडीनें मिळविलेल्या स्वतंत्रतेचा उपभोग घेत असतांना व प्रसन्न मनानें भोंवतालीं दृष्टिक्षेप करीत असताना, सावरकरांना क्षणार्धांत निराशेचाहि एक झटका बसल्याशिवाय राहिला नाहीं. यापूर्वीं आपल्या सहकाऱ्यांकडून कांहीं उठावणी होऊं शकली नसली तरी, ते निदान बोटीच्या धक्क्याच्या आसपास तरी टेहेळणी करीत असतील आणि पूर्वसंकेतानुसार आसपास कोठेंतरी मोटार उभी करून आपली उत्सुकतेनें वाट पहात असतील अशी सावरकरांची अपेक्षा होती. आणि या अपेक्षेनें त्यांनीं क्षणमात्र चौफेर दृष्टिक्षेपहि केला. आपली ही मसलतहि फसली असें पाहून क्षणमात्र त्यांचें मन विषण्ण झालें; पण विषण्ण मनःस्थितींत चरफडत अगर विचार करीत वेळ घालविण्याची सोयच नव्हती ! बोटीवरील अधिकारी व पहारेकरी आपल्या मागें लागणार—लागले आहेत—हें त्यांना स्पष्ट दिसत होतें. आतांपर्यंत केलेल्या अचाट धडपडीचें कांहीं चीज व्हावयाचें तर, पळाचाहि विलंब न लावतां तेथून पळ काढण्याशिवाय गत्यंतर नव्हतें !

'अॅडव्होकेट ऑफ इंडिया' व 'इंग्लिशमन' या पत्रांतील उतारा वर दिलाच आहे. सावरकरांचे दोघे सहकारी धक्क्यावर उभे होते व गाडी कोठें मिळेल हें त्यांनीं सावरकरांना खुणेनें सुचविलें, हा त्या उताऱ्यांतला भाग चुकीचा आहे हें 'पायोनियर' पत्रानेंच मागाहून स्पष्ट केलें आणि स्वतंत्र रीतीनें त्या वेळच्या परिस्थितीचा विचार केला तर, सावरकरांचे कोणी सहकारी धक्क्यावर आलेले नव्हते, हेंच कोणालाहि मान्य करावें लागेल. सहकारी धक्क्यावर आले असते तर, सावरकरांना अशा स्थितींत प्रत्यक्ष पाहिल्यानंतर, ते मुखस्तंभासारखे दूर उभे राहिलेच नसते. सहकारी आलेच असते तर ते चांगली पूर्वतयारी करून आले असते आणि मग सावरकर ब्रिटिश पोलिसांच्या हातीं लागणें हें मुष्किलीचेंच ठरलें असतें. दूर उभें राहून गाडी कोठें सांपडेल हें सावरकरांना खुणेनें सुचवीत बसण्यापेक्षां त्यांपैकीं एकानें गाडी आणण्याकरितां धूम ठोकली असती आणि दुसरा एकादा सावरकरांच्या सन्निध येऊन, त्यांना घेऊन, संकल्पित स्थळीं गाडी गांठण्यासाठीं गेला असता.

मार्सेलिस बंदरांतून सावरकर जे धूम पळत सुटले ते किती अंतर पळाले याचा पुरावा दोन ठिकाणीं प्रत्यक्षच सांपडतो. 'डेली न्यूज' पत्रांतील जो उतारा यापूर्वीं

दिला आहे त्यांत हें अंतर जवळजवळ ३०० यार्ड होतें, असें म्हटलें आहे. सावरकर प्रकरण हेग येथील न्यायालयापुढें गेल्यानंतर, न्यायालयानें या प्रकरणीं जो निर्णय दिला त्यांत पुढील वाक्य आहे :

The Brigadier arrested the fugitive after a pursuit of about 500 metres.

( लष्करी शिपायानें पळणाऱ्या सावरकरांचा सुमारें ५०० मीटरपर्यंत पाठलाग केला व त्यांना पकडलें. ) पांचशें मीटर म्हणजे सुमारें ५४० यार्ड होतात. तेव्हां हें स्पष्ट दिसतें कीं, सावरकर दोनअडीच फर्लांग अंतर जोसांत पळत गेले. इतकें अन्तर काढीत असतांना, समोरून चाललेल्या ट्रॅम्स त्यांना मधूनमधून दिसत होत्या. ट्रॅमचें तिकीट काढण्याइतके चिल्हर नाणें त्यांच्याजवळ असतें तरीहि त्यांना आपला पाठलाग करणाऱ्या लोकांपासून आपला बचाव करण्याचा आणखी एक प्रयत्न करतां आला असता. पण बोटींतून उडी टाकतांना अंगावरील सर्व कपडे काढून टाकावे लागल्यामुळें आणि कैदी म्हणून जवळ पैसा असण्याचा संभवहि नसल्यामुळें त्यांना या मार्गाचाहि अवलंब करतां आला नाहीं. त्यांचा त्या वेळचा एकंदर जामानिमाच असा होता कीं, ते ट्रॅममध्यें चढले असते तर, हा एकादा शिष्ट नागरिक आहे ही गोष्ट कोणालाहि मान्य झाली नसती. या सर्व परिस्थितीचा परिणाम असा विचित्र झाला कीं, मी मी म्हणणाऱ्या गुप्त हेरांना हातोहात चकवून हतप्रभ करणाऱ्या या थोर पुरुषाला, चारदोन आणे जवळ नाहींत म्हणून, नुसतें पळत राहण्याशिवाय गत्यंतर उरलें नाहीं ! ' कोणी तरी एक घोडा मला देईल तर तेवढाहि मला राज्यपदप्राप्तीचा प्रयत्न करण्यासाठीं अत्यावश्यक व उपकारक आहे ' असे केविलवाणे उद्गार काढण्याची एका राजावर पाळी आली, असें शेक्सपियरनें एका ठिकाणीं वर्णिलें आहे. एकादा उद्यांचा शेक्सपियर सावरकर-चरित्रांतील या प्रसंगाचें वर्णन करूं लागला तर त्याला ' A horse a horse my Kingdom for a horse ' या उद्गाराऐवजीं बहुधा 'A penny, a penny, my freedom for a penny' असे आर्त शब्द वापरावे लागतील !

सावरकर पळत चालले आहेत आणि ब्रिटिश पोलिस अधिकारी त्यांचा पाठलाग करीत चालले आहेत या दृश्याकडे रस्त्यांतून जाणाऱ्यायेणाऱ्या कित्येकांचें लक्ष वेधूं लागलें. तेव्हां सावरकरांचा पाठलाग करणाऱ्या शिपायांनीं ' चोर चोर ' म्हणून हाकाटी करण्याला सुरुवात केली. हेतु असा कीं, भोंवतालच्या लोकांची सहानुभूति वळलीच तर ती आपल्या बाजूला वळावी; आपल्या हातावर तुरी देऊन निसटलेल्या या बड्या क्रांतिकारकाकडे वळूं नये ! शिपायांच्या ह्या ओरडीचा परिणाम काय होणार हें हेरून व इतक्या शारीरिक ग्लानीनंतर पळत किती वेळ टिकाव धरतां येईल याचा विचार करून सावरकरांनीं शेवटीं असें ठरविलें कीं, जवळ भेटेल त्या फ्रेंच पोलिसाला गांठावयाचें, त्याला आपलें म्हणणें काय हें समजून सांगावयाचें आणि त्याच्या मदतीनें आपलें सर्व प्रकरण फ्रेंच न्यायालयाच्या मार्मांका

लपवण्याचा प्रयत्न करावयाचा ! असा निश्चय करून, ते वाटेंत भेटलेल्या पोलिसाच्या पुढें जाऊन उभे राहिले तोंच त्यांचा पाठलाग करणाऱ्या लोकांनीं त्यांना गांठलें.

फ्रेंच पोलिसासमोर उभ्या असलेल्या सावरकरांना केवळ हडेलहप्पीनें अटक करून परत बोटीवर नेणें ही गोष्टी सोपी नव्हती. फ्रेंच शिपाईच सावरकरांवर उलटला व त्यामुळें त्यांचा पाठलाग करणाऱ्या शिपायांना त्यांना सहज पकडतां आलें ! फ्रेंच पोलिसानें सावरकरांना इंग्लिश अधिकाऱ्यांच्या हवालीं केलें तें कां केलें, हा प्रश्न मोठा नाजुक आहे. सावरकरांच्या त्या वेळच्या पोषाखाकडे व चर्येकडे पाहून, हा कोणी तरी चोरच असावा अशी प्रामाणिक समजूत झाल्यामुळें, त्या फ्रेंच पोलिसानें सावरकराना इंग्लिश अधिकाऱ्यांच्या स्वाधीन केलें असेल असें समजणें हें औदार्याचें ठरलें तरी, तें सत्याला पोषक मात्र ठरणार नाहीं. फ्रेंच शिपायाचा असाच समज झाला असें क्षणमात्र गृहीत धरलें तरीहि, तेवढ्यानें त्याचें सर्व कृत्य समर्थनीय ठरत नाहीं. आपल्यापर्यंत आलेलें हें सर्व लटांबर बंदराकडून आलेलें आहे आणि इंग्लिश शिपाई ' चोर ' म्हणून ज्याची मागणी करीत आहेत त्याचा बोटीशीं कांहीं तरी संबंध आहे हें ध्यानांत आणून, या फ्रेंच शिपायानें सावरकरांना आपल्या ताब्यांत घेऊन चौकशीसाठीं वेळ मागून घेतला असता आणि नीट चौकशी करून मग काय तें केलें असतें तर, ती गोष्ट व्यक्तिशः त्या शिपायाला आणि फ्रेंच राष्ट्राच्या स्वातंत्र्य-प्रेमाला भूषणास्पद ठरली असती ! मोडक्यातोडक्या फ्रेंच भाषेत सावरकर त्याला आपली बाजू समजून सांगण्याचा प्रयत्न करात होते. ती त्याला नीट समजली नसेल असेंहि गृहीत धरून चालण्याला हरकत नाहीं. पण, बोटीवरील शिपायांच्या विरुद्ध कांहींतरी ऐकून घेण्यासारखें आहे एवढा निष्कर्ष काढून, सावरकरांना त्या शिपायांच्या हवालीं करण्यापूर्वीं त्यानें कांहीं विचार केला असता तर, एका स्वतंत्र राष्ट्रांतील नागरिक व अधिकारी या नात्यानें त्यानें आपलें कर्तव्य योग्य त्या जबाबदारीच्या जाणिवेनें पार पाडलें, असेंच कोणीहि म्हटलें असतें. पण, त्या शिपायाला तशी सुबुद्धि सुचली नाहीं, ही वस्तुस्थिति आहे. " सर्वः सगंधेषु विश्वसिति " हें वचन जसें जीवसृष्टीला लागू पडतें तसेंच तें मानवी सृष्टीनें निर्माण केलेल्या अधिकारीवर्गाला-हि लागू पडतें असें म्हणून, या शिपायाच्या वर्तनाचा उलगडा कोणीं केला तर तें अगदींच गैर ठरणार नाहीं. आणि कोणी असेंहि म्हणण्याला प्रवृत्त होतील कीं, एका क्षुल्लक दिसणाऱ्या माणसाच्या तक्रारीपेक्षां आणि स्वातंत्र्यापेक्षां, इंग्लिश शिपायांच्या खिशांत खेळकरपणानें खुळखुळणारे वा त्यांच्या हातांत लखलखणारे दामाजीपंतच या शिपाईदादाला अधिक लोभनीय वाटल्यामुळें,[1] त्यानें सावरकरांना निमूटपणें इंग्लिश शिपायांच्या हवालीं केलें असावं !

---

[1]या फ्रेंच शिपायाला पुढें तुरुंगवास भोगावा लागला अशी माहिती श्री. व्ही. व्ही. एस्. अय्यर यांच्या आठवणींत नमूद करण्यांत आलेली आहे. या शिपायानें लांच घेतली व सावरकरांचा विश्वासघात केला असें या नव्या माहितीवरून निष्पन्न होतें.

अटक करून सावरकरांना फिरून ' मोरिया ' बोटीवर नेण्याच्या वेळचा सगळा प्रकारहि अगदीं सौधेपणाचा नाहीं. येवढा अचाट प्रयत्न दैवगतीमुळें फसल्याकारणानें मनांत चरफडणारे सावरकर व ' शेवटीं आपण जिंकली ' अशा तोऱ्यानें वागणारे पोलिस अधिकारी यांच्या संघर्षामुळें वाटेंतहि कांहीं ठिणग्या उडाल्या ! बोटीवर पोंचतां-क्षणींच पहारेकऱ्यांपैकीं एकानें त्यांच्या डोक्यावर मागच्या बाजूनें गुद्दा मारला तेव्हां तर प्रकरण बरेंच हातघाईवर आलें. धरणाऱ्या लोकांची पकड ढिली पाहून सावरकर त्या पहारेकऱ्यावर उसळले व ' अतिप्रसंग कराल तर एकाद्याचा तरी मुडदा पाडल्याशिवाय मी मरणार नाहीं ! ' असें त्यांनीं सर्वांना बजावलें. इतका प्रकार होतांच, सावरकरांना हातकड्यापायकड्या घालून केबिनमध्यें कोंडून टाकण्यांत आलें. सकाळीं घडलेल्या प्रकाराचा बोभाटा गांवभर झाल्याकारणानें मार्सेलिस गांवांतल्या लोकांचे थवेच्या थवे सायंकाळ पावेतों बंदरावर येऊन ' मोरिया ' बोटीचें अवलोकन करून जात होते. कांहीं फ्रेंच अधिकारीहि बोटीवर आले व सावरकरांना पाहून गेले. अधिकाऱ्यांच्या दृष्टीनें अनिष्ट असा हा प्रकार घडल्यामुळें व बोटींतल्या यांत्रिक दुरुस्तीचें कामहि पुरें झाल्यामुळें, दिनांक ९ जुलै रोजीं प्रातःकाळींच ' मोरिया ' बोटीनें मार्सेलिस सोडलें व तिचा पुढील प्रवास सुरू झाला.

केवळ योगायोगामुळें किंवा दैवयोगामुळें घडणाऱ्या कांहीं गोष्टींमुळें थोर माणसांच्या सुद्धां जीविताचा प्रवाह किती व कसा पालटूं शकतो हें या प्रसंगीं घडलेल्या एका घटनेवरून लक्षांत येतें. सावरकरांना कोणच्या बोटींतून हिंदुस्थानला धाडण्यांत येत आहे, वगैरे माहिती गुप्त राखण्याचा ब्रिटिश सरकारनें कितीहि प्रयत्न केला तरी, पॅरिस येथें रहाणाऱ्या सावरकरांच्या मित्रांनीं ही माहिती मिळविली होती. ' मोरिया ' बोट मार्सेलिस येथें केव्हां पोंचेल ही माहितीहि त्यांनीं मिळविली असली पाहिजे. ती माहिती मिळाल्यावर कामाबाई, श्री. अय्यरप्रभृति मंडळी पॅरिसहून निघाली व ती मार्सेलिसला येऊन पोंचली. सावरकरांनीं मार्सेलिसच्या रस्त्यांतून पळतांपळतां दोनअडीच फर्लांग अंतर तोडलें; तसेंच व त्याच दिशेनें पुढें जाऊन त्यांनीं आणखी दोन अडीच फर्लांग अंतर तोडलें असतें तर, पूर्वसंकल्पाप्रमाणें मोटार घेऊन त्यांच्या मुक्ततेसाठीं निघालेली मित्रमंडळी त्यांना वाटेंत भेटली असती.[१] हें घडलें असतें तर सावरकर ब्रिटिश पोलिसांच्या हातीं निश्चित लागले नसते. असें घडलें असतें तर सावरकरांचें पुढील जीवन कसें काय बनलें असतें या प्रश्नाचें उत्तर कल्पनेनें देणं, हें मोठें मनोरंजक ठरण्यासारखें आहे. असें खरोखरच घडलें असतें तर सावरकरांना दोन जन्मठेपींची शिक्षा घेऊन अंदमानांत जावें लागलें नसतें व अंदमानी जीवनांतल्या प्राणघातक परिस्थितीशीं अकरा-बारा वर्षें झगडावें लागलें नसतें. माणसानें भोगलेल्या शारीरिक कष्टांवरच त्याच्या देशभक्तीचें महत्त्व अवलंबून आहे, अशी एकतर्फी विचारसरणी उराशीं बाळगणारे व प्रसृत करणारे कित्येक

---

१ स्वामी शुद्धानंद भारतियार यांनीं पाठविलेली माहिती.

निर्बुद्ध प्राणी, कमालीचे कष्ट भोगलेल्या सावरकरांनाहि कमी प्रतीचे देशभक्त लेखण्याला कमी करीत नाहींत. अशा निर्बुद्धांच्या दृष्टीनें त्या परिस्थितींतल्या सावरकरांची देशभक्ति बहुधा शून्यच ठरली असती! या निर्बुद्धांचा विचार मनांत आणावयाचा नाहीं असें ठरवून, त्या परिस्थितींतल्या सावरकरांच्या संभाव्य जीवनक्रमाचा विचार केला कीं दोनच प्रकारचीं उत्तरें कल्पनेपुढें उभीं रहातात. पं. श्यामजी कृष्णवर्मा, बॅ. राणा, श्री. वीरेंद्र चट्टोपाध्याय, प्रो खानखोजे, लाला हरदयाळ प्रभृति भारतीय देशभक्तांना जसे दीर्घकाळपर्यंत निर्वासित म्हणून परदेशांत हालअपेष्टांत दिवस कंठावे लागले तसेच कष्टमय दिवस सावरकरांनाहि कंठावे लागले असते! असे दिवस कंठीत असतांना त्यांनीं गेल्या महायुद्धप्रसंगीं अगर चालू युद्धप्रसंगीं निर्माण झालेल्या परिस्थितीचा भारतीय स्वातंत्र्याच्या दृष्टीनें कसा फायदा करून घेतला असता हें ज्यानें त्यानें आपल्या कल्पनेनें ठरवावयाचें आहे! 'अभिनव भारता'चे हरदयाळ गेल्या महायुद्धाच्या वेळीं मोकळे होते; त्यांनीं व त्यांच्या सहकाऱ्यांनीं त्या काळांत युरोपांत बसून कसले अचाट उद्योग केले यांची अल्पशी कल्पना या पुस्तकांत पुढील एका प्रकरणांत[1] देण्यांत येईलच. निर्वासित स्थितींत का होईना, सावरकर मोकळे रहाते तर भारतीय क्रांतिकारकांनीं गेल्या महायुद्धाच्या काळीं केलेल्या या उद्योगांना अधिक तीव्रतर व अधिक प्रभावशाली स्वरूप आलें असतें, एवढें तरी खासच म्हणतां येईल!

कामाबाई, अय्यरप्रभृति मित्रमंडळींची व सावरकरांची योग्य वेळीं गांठ पडली नाहीं व त्यामुळें सावरकरांचें भावी जीवन जवळजवळ ठरून गेल्यासारखें झालें हें खरें असलें तरी, ही मित्रमंडळी मार्सेलिस येथें आल्याचा उपयोग अंशतः तरी झालाच! ही मित्रमंडळी ज्या मोटारींतून मार्सेलिसला आली होती ती मोटार इंग्लिश शिपायांनीं सावरकरांना आपल्या ताब्यांत घेतल्यावर थोड्याच वेळानें त्या पोलिसनाक्यापाशीं आली असली पाहिजे. सावरकर, त्यांचा पाठलाग करणारे शिपाई, त्या शिपायांच्या हवालीं सावरकरांना करणारा फ्रेंच शिपाई या सर्वांचा भर रस्त्यांत जो संघर्ष झाला त्यामुळें त्या रस्त्यांत जमलेल्या मंडळींपैकीं कोणाच्या तरी तोंडून या मित्रमंडळींना बरीचशी हकीकत समजली असली पाहिजे; व संदर्भ माहीत असल्यामुळें, या मित्रमंडळींनीं घडलेला सर्व प्रकार अनुमानानें ओळखला असला पाहिजे. आपला पुढारी मुक्त होण्याच्या आनंदाचा पेला अगदीं ओठाशीं लागण्याच्या वेळीं हातचा हिसकावला गेला हें लक्षांत आल्यामुळें, सावरकरांच्या या मित्रमंडळींना अतिशय हिरमोड झाला असला पाहिजे. मार्सेलिस बंदराच्या धक्क्यापर्यंत जाऊन बोटीवरील परिस्थिति काय आहे हें समजून घेण्याला ही मंडळी चुकली असतील, असें वाटत नाहीं. 'मोरिया' बोटीची दुरुस्ती घाईनें पुरी करून बोटीच्या अधिकाऱ्यांनीं दि. ९ रोजीं सकाळीं बोट पुढें हांकारली याचें एक कारण असेंहि असूं

1 प्रकरण १४ : गेलें महायुद्ध व अंदमान.

शकेल कीं, फ्रान्सच्या किनाऱ्यालगत बोट उभी असली तर सावरकरांना कायदेशीर रीतीनें तेथून काढून नेण्याचा कांहीं प्रयत्न होईल, ही शक्यता त्यांना स्पष्टपणें दिसली असावी.

सावरकरांची मित्रमंडळी निराश होऊन स्वस्थ मात्र बसली नाहीं. मार्सेलिस शहराचा त्या वेळचा नगराध्यक्ष मतानें सोशॅलिस्ट होता.[१] त्याला तावडतोब भेटून या मंडळींनीं घडलेला सर्व प्रकार त्याच्या कानीं घातला असावा. सावरकरांचा विश्वासघात करणाऱ्या फ्रेंच पोलिसाला पुढें जी शिक्षा झाली ती या सोशॅलिस्ट नगराध्यक्षाच्या खटपटीमुळेंच झाली असेल. असा संभव आहे. या सर्व खटपटी चालल्या असतांना कामाबाई, अय्यरप्रभृति मित्रांनीं घडलेल्या हकीकतीचें वृत्त शक्य त्या तांतडीनें पॅरिसला धाडून दिलें. अशा मार्गानें पॅरिसला गेलेलें हें वृत्त दि. ११ जुलै रोजीं 'डेलीमेल' पत्राच्या पॅरिस आवृत्तींत एका कोपऱ्यांत प्रसिद्ध झालें व त्यामुळेंच पुढें सावरकरप्रकरणाची शहानिशा जोरजोरानें होऊं लागली.

बंदिवान म्हणून सावरकरांना मार्सेलिसपर्यंत जो अनुभव आला तो व त्यांना यापुढें जो अनुभव येणार होता, तो या दोहोंमध्यें जमीनअस्मानाचें अंतर होतें. संकल्पित साहसाच्या कल्पनानिर्मित चित्रापाशीं रमण्याचा विरंगुळा प्रवासाच्या पूर्वार्धांत सावरकरांच्या मनाला मिळत होता. तें चित्र भंग पावून त्याची शोभा कायमचीच हरपल्यासारखी झाल्यामुळें, प्रवासाच्या उत्तरार्धांत, भग्नाश मनाचा उद्विग्नपणा सावरकरांना ग्रासीत होता. बोटीवरील उतारूंशीं मोकळेपणानें वागतां येत असल्यामुळें व समुद्रावरील मोकळा वायुसंचार उपभोगावयास मिळत असल्यामुळें, सावरकरांची प्रकृति प्रवासाच्या पूर्वार्धांत ठीक होती. हालचाल बंद झाल्यामुळें व कोठडींत कोंडून पडावें लागल्यामुळें त्यांची प्रकृति प्रवासाच्या उत्तरार्धांत क्षीण होऊं लागली व कफाची व्यथा त्याना त्रासदायक भासूं लागली. प्रवासाच्या पूर्वार्धांतहि त्यांच्यावरील देखरेख कडकच होती; पण, देखरेख करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या वृत्तींतला खिलाडूपणा प्रवासाच्या पूर्वार्धांत कांहीं अंशीं तरी शिल्लक होता. मार्सेलिस सुटतांच पहारेकऱ्यांच्या वृत्तींतला भलेपणा तर पारच नष्ट झाला; त्यांच्या वृत्तींत कमालीचा खुनशीपणा व चिडखोरपणा दिसूं लागला.

आणि, निव्वळ ह्या अधिकाऱ्यांच्याच दृष्टीनें क्षणभर विचार केला तर त्यांनीं चिडखोर बनावें, हें स्वाभाविकहि होतें. सरकारचा कट्टा शत्रू बंदोबस्तानें घेऊन जाण्याचें काम आपण पत्करलें, त्या शत्रूनें आपली शोभा केली! त्याला आपण फिरून कसा तरी हस्तगत केला, त्यामुळें जिवावर बेतणार होतें तें शेपटावरच निभावलें हें खरें; पण, घडलेल्या प्रकाराची शहानिशा होईल तेव्हां आपल्यावर हलगर्जीपणाचा आरोप ठेवण्यांत येईल व त्यामुळें आपली अपकीर्ति होऊन नोकरी-

१ मुंबईच्या 'कैसर-इ-हिंद' साप्ताहिकांत श्री. एम्. पी. टी. आचार्य यांनीं लिहिलेली हरदयाळविषयक लेखमाला : लेखांक १ : दि. १०-१-१९४२.

तली बढती वगैरे दृष्टीनें आपलें नुकसान होईल, ही विचारमालिका मनांत फिरूं लागल्यामुळें, त्यांची वृत्ति कावरीबावरी व्हावी, हें अस्वाभाविक नव्हे. सावरकर-प्रकरण आंतरराष्ट्रीय न्यायालयापुढें निर्णयासाठीं मांडावें असें शेवटीं इंग्लंडनें कबूल केलें त्या वेळीं 'लंडन टाइम्स' या ब्रिटिश सरकारच्या प्रतिध्वनिरूपी पत्रानें या प्रकरणाबाबतची सगळी मळमळ एकवार ओकून टाकली. त्या वेळीं या पत्रानें ज्यांच्या वर्तनावर खूप ताशेरा उडविला त्यांमध्यें 'मोरिया' बोटीवरील पहारेकऱ्यांचाहि समावेश करण्याला त्यानें सोडिलें नाहीं, हें त्या पत्राच्या दि.७–१०–१९१० च्या अंकांतील पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होईल. अशी टीका व त्या टीकेचे होणारे परिणाम यांची कल्पना असल्यामुळें, सावरकरांवर पहारा करणारे अधिकारी तिरसटपणानें वागूं लागले. हा प्रकार क्षम्य म्हणतां आला नाहीं तरी, तो मनुष्य-स्वभावाला धरून आहे हें मान्य केलें पाहिजे. घडलेला सगळाच प्रकार आपल्याला अमान्य आहे; पण, आंतरराष्ट्रीय कायद्याची जरब तर टाळतां येत नाहीं, अशा पकडींत सांपडलेल्या 'लंडन टाइम्स 'नें म्हटलें :

It is of course to be deeply regretted that the fate of such a prisoner should, in the event of his conviction in the Indian courts, be dependent upon the decision of another tribunal on points of international law, which, however important in themselves, are wholly irrelevant to his actual guilt. But, for this, we have unfortunately only to thank the ineptitude of our own officials, first that of the officials responsible for sending Savarkar out to India in a ship that touched at any foreign port while there were so many ships available that sailed direct from England to India and secondly, that of the officials actually in charge of Savarkar during the voyage on board the 'Morea' through whose inconceivable negligence, he was allowed so obvious a chance to escape.

( सावरकरांसारख्या कैद्याला हिंदी न्यायालयांत दोषी ठरविण्यांत आलें तरी, त्याचें भवितव्य दुसऱ्या एका न्यायालयाकडून मिळणाऱ्या आंतरराष्ट्रीय कायद्यांतल्या मुद्यांविषयींच्या निर्णयावर अवलंबून रहावें, ही गोष्ट अर्थातच फार शोचनीय आहे. या मुद्याचाच विचार केला तर ते खूप महत्त्वाचे असतीलहि; पण, सावरकरांच्या खऱ्या गुन्ह्याच्या दृष्टीनें ते मुद्दे सर्वस्वीं गैरलागू आहेत. पण, हा शोचनीय प्रकार घडणार याबद्दलचा दोष दुर्दैवानें एकट्या आमच्या अधिकारी वर्गालाच देणें प्राप्त आहे. इंग्लंडहून तडक हिंदुस्थानला जाणाऱ्या हव्या तेवढ्या बोटी मिळण्याजोग्या असूनहि, अधिकाऱ्यांनीं सावरकरांना अशा बोटींतून रवाना केलें, कीं ती बोट परदेशच्या बंदराला लागणार होती. ही अशी व्यवस्था करणारे अधिकारी हे ह्या बाबतींतील पहिल्या प्रतीचे गुन्हेगार! 'मोरिया' बोटीवर सावरकर ज्या अधिकाऱ्यांच्या ताब्यांत होते, त्या अधिकाऱ्यांनीं कल्पनातीत दुर्लक्ष केलें व त्यांनीं सावरकरांना निसटून जाण्याची अगदीं राजरोस संधि दिली. हे अधिकारी या बाबतींतले दुसऱ्या प्रतीचे गुन्हेगार होत. )

पहारेकऱ्यांच्या क्रोधाचें प्रदर्शन अनेक प्रकारांनीं होऊं लागलें. नित्याचे शरीरधर्म पार पाडण्यासाठीं सावरकर त्यांच्या खुराड्यांतून म्हणजे केबिनमधून बाहेर पडले कीं, हे बहाद्दर दोन्ही बाजूंनीं त्यांचे हात पकडून त्यांना हलवूं लागले ! त्यांच्या हातकड्या अहोरात्र निधेनाशा झाल्या. त्या खुराड्यांतला विद्युद्दीप अष्टौप्रहर धगधगत राहूं लागल्यामुळें, सावरकरांचा जीव घाबरा व घामाघूम होऊं लागला; तरी या बहाद्दरांनीं तिकडे लक्ष दिलें नाहीं. अभद्र शिव्याशाप व सूड घेण्याची, दमदाटीची ओंगळ भाषा यांचा वर्षाव होऊं लागला ! सावरकरांच्या खुराड्याच्या आसपास आज रात्रींपासून कोणी झोपतां कामा नये असा पुकारा करून, या पहारेकऱ्यांनीं एका रात्रीं बोटीच्या त्या विभागांत सारें सामसूम केलें ! तेव्हां तर सावरकरांच्या मनानें असें पक्कें च घेतलें कीं, हे यमदूत आजच्या रात्रीं आपला अनन्वित छळ करण्याचा निर्धार करूनच वागत आहेत. नाशिक प्रकरणांत पकडलेल्या त्यांच्या सहकाऱ्यांचा कल्पनातीत छळ करून, हिंदी पोलिस अधिकाऱ्यांनीं त्यांना वठणीवर आणण्यासाठीं कायकाय प्रकार केले होते ही हकीकत त्यांना कळली होती; तिचें स्मरण त्यांना होऊं लागलें. त्या यमयातनांना आतां आपल्यालाहि तोंड द्यावें लागणार हें स्पष्ट दिसूं लागतांच, त्यांनीं कर्मयोगाचार्य भगवान् श्रीकृष्णाचें स्मरण केलें व "मामनुस्मर युध्यच" या वचनाप्रमाणें आपल्याला याहि परिस्थितींत काय करणें शक्य आहे, याचा विचार ते आपल्याशींच करूं लागले !

शत्रूनें केलेल्या छळाला पुरून उरलेल्या धैर्यशाली धर्मवीरांच्या नि कर्मवीरांच्या उदात्त चरित्रांचें मनन करणाऱ्या सावरकरांना त्या परिस्थितींत पुढील कविता स्फुरली:

—१—

अनादि मी, अवध्य मी, अनंत मी भला
जिंकिल रिपु कवण असा जगतिं जन्मला ।। धृ० ।।
धर्मरक्षणार्थ तो शस्त्रधारणीं । अट्टहास खड्गपाणि करि जई रणीं ।
न देह अग्नि जाळितो न खड्ग भंगितो । मलाचि भिउनि भ्याड रिपू पळत सूटतो ।
तयाचि या मृत्युच्या भयें
खुळा हा शत्रू मजासि भिववुं ये । अनादि मी० ।।

—२—

लोटि हिंस्र सिंहाच्या पंजरीं मला । नम्र दाससम चाटिल तो मत्पदांघ्रिला ।
कल्लोळीं ज्वाळांच्या फेंकशी तरी । हृद्धनि भंवतिं रचिल शीत सुप्रभावली ।
आण तुझ्या तोफांना क्रूर सैन्य तें । यंत्र तंत्र शस्त्र अस्त्र आणि तें ।
हलाहल, त्रिनेत्र तो
तुम्हां मी सर्वां गिळुनि जिरवितों ॥ अनादि मी० ॥

सावरकरांच्या पहारेकऱ्यांनीं त्यांच्या कोठडींत एक नंगी तरवार तळपत ठेवली. तसाच प्रसंग आला तर आपण आपले हात कडी-तोड्यांतून सोडवूं आणि मग ही 'भवानी' माताच आपल्या मदतीला धांवून येईल, असें सावरकरांना वाटलें. ज्या रात्रीं एका अतिप्रसंगी पहारेकऱ्यानें त्यांचा अंतच पाहिला त्या रात्रीचा योगायोग तर विशेषच होता. त्यांच्या समोरच्या खिळयाला आपली तुमान अडकवून पहारेकऱ्यांपैकीं एकजण निद्रावश झाला होता. या तुमानीच्या खिशांत या पहारेकऱ्याचें रिव्हॉल्व्हर होतें व तेंहि भरलेलें होतें. ही गोष्ट सावरकरांच्या तीक्ष्ण नजरेंतून सुटली नव्हती. या नीचांनीं तसा प्रसंगच आणला तर, ही अल्पकाय महाकालीहि आपल्या मदतीला पाचारून घेतां येईल, असा विश्वास त्यांना वाटत होता! आज रात्रीं कांहीं तरी विशेष घडणार असें त्यांचें मन त्यांना बजावून सांगत असल्यामुळें, त्यांना झोंप लागली नव्हती! ते डोळे मिटून पडून राहिले होते.

पिंजऱ्यांत सांपडलेल्या वाघाला चिडवण्यासाठीं खडे मारणाऱ्या बावळी वृत्तीच्या एका पहारेकऱ्यानें सावरकरांना चिडवण्यासाठीं जिभेचा पट्टा सुरू केला. 'क्या अवलाद है' हे सावरकरांना उद्देशून वारंवार उच्चारलेले अपशब्द सावरकरांच्या कानीं पडले. त्यांनीं आपले मिटलेले डोळे उघडले. आणि पडल्यापडल्याच त्या मुजोर पहारेकऱ्याकडे ते रोखून, खोंचून पाहूं लागले. सावरकर जागे असून प्रत्युत्तर देत नाहींत, याचा सोईस्कर अर्थ आपल्याच बुद्धीनें ठरवून, त्यानें आपल्या तोंडाचा पट्टा तसाच चालू ठेवला. त्याला वाटलें, अलीकडच्या कडक बंदोबस्तामुळें व हालामुळें सावरकर अगदीं गोगलगाय बनले असून, आपण कांहींहि बरळत राहिलों तरी तें सगळें सावरकर निमूटपणें ऐकून घेतील. अगदीं गलिच्छ भाषा वापरून, त्यानें सावरकरांना मारहाण करण्याचीहि भाषा सुरू केली. त्याबरोबर सावरकर त्या खुराड्यांत ताडकन् उठून बसले व खड्या आवाजांत त्याला म्हणाले : मारहाणीचें भय कोणाला दाखवतोस! मेलेल्याला भय रे कशाचें वाटणार? मी या उद्योगाकडे वळलों तेव्हांच सर्वस्वाला प्रथम पेटलेली चूड लावली; आणि मगच दुसऱ्याची चिता पेटविण्यास तयार झालों! तेव्हां, मला मारहाण करण्याच्या तुझ्या बल्गनांची मोठीशी मातब्बरी नाहीं. तुझें काय, त्याचा मात्र नीट विचार कर. जिवावर उदार झालेल्या माझ्यासारख्याशीं उगीच अतिप्रसंग करशील व फुकट मरशील तर मुलालेंकरांना व्यर्थ मुकशील. प्राज्ञा असेल तर माझ्या अंगाला हात लावून पहा. तुमच्या सगळ्यांशीं मला झुंझतां आलें नाहीं तरी, एकाचा तरी निकाल लावल्याशिवाय मी मरणार नाहीं, हें खचित!

सावरकरांनीं करारीपणानें अशा आशयाचे शब्द उच्चारले त्यांचा उपयोग झाला. उत्कटतेला पोंचलेल्या प्रत्येक सद्गुणांत जी प्रभावशाली तेजस्विता असते, ती सावरकरांच्या करारीपणांतहि होतीच व तिच्यामुळें त्यांचे पहारेकरी दिपूनच गेले. पूर्वींचा उर्मटपणा टाकून, ते गरिबीनें आपलें गाऱ्हाणें सावरकरांना सांगूं

लागले. आपल्या मार्सेलिस येथील साहसामुळें या पहारेकऱ्यांना ठपका देण्यांत येईल, नोकरीच्या वगैरे दृष्टीनें त्यांचें कांहीं नुकसानहि होईल, हा संभव सावरकरांनाहि स्पष्टपणें दिसत होता. पहारेकऱ्यांचें या मुद्यावरील म्हणणें मोकळया मनानें मान्य करून सावरकर त्यांना म्हणाले : तुमचे व माझे संबंधच असे आहेत कीं, इष्टानिष्टाबद्दलच्या तुमच्या–माझ्या कल्पना एकरूप असणेंच शक्य नाहीं ! माझ्या हातापायांत बेडया घालून मला मरणाकडे फरफटत नेणें हें तुम्हांला स्वकर्तव्य वाटत आहे; त्या अर्थी, तुमच्या हातून निसटून तुम्हांला चकवणें हें मीहि स्वकर्तव्यच समजणार ! प्रत्येकानें आपलें कर्तव्य केलें म्हणून दुसऱ्यानें रागावण्याचें व खुनशी बनण्याचें कांहींच कारण नाहीं !'

या प्रसंगीं सावरकरांनीं जो बाणेदारपणा दाखविला त्यामुळें त्यांचा अमानुष छळ करण्याची पहारेकऱ्यांची कल्पना लुलीच पडली. बोटीचा प्रवास चालूच होता व सावरकरांवरील निर्बंधहि शिथिल झालेले नव्हते. पण, मारहाण, छळ, वगैरेंचे प्रसंग अतःपर उद्भवणार नाहींत असें सावरकरांना देखील भासूं लागलें. आतां त्यांच्या मनांत एक विवंचना मात्र जोरानें उद्भवूं लागली. आपल्या प्रबळ शत्रूचा नक्षा उतरावा म्हणून आपण जो धाडसी प्रयत्न केला तो तात्कालिक परिणामाच्या दृष्टीनें विफल झाला असला तरी, त्या प्रयत्नाचें वृत्त जगभर प्रसिद्ध होण्यानेंहि पुष्कळच कार्यभाग साधेल, अशी खात्री त्यांना वाटत होती. कोणत्या ना कोणत्या तरी मार्गानें हें वृत्त एकाद्या वृत्तपत्रांत प्रसिद्ध झालें असेल का, हा प्रश्न वारंवार त्यांच्या मनांत उद्भवत होता. मार्सेलिस बंदराच्या धक्क्यावर आपण फ्रेंच मुलुखांत पदार्पण केलें होतें एवढें साधें वृत्त प्रसिद्ध झालें तरी पुरे; त्या प्रसिद्धीचा पुरेपूर उपयोग करून घेणारे आपले स्नेही व हितचिंतक इंग्रजांच्या मागें या प्रकरणाचें शुक्लकाष्ठ सारखें लावीत राहिल्याशिवाय स्वस्थ बसणार नाहींत, असा विश्वास त्यांना वाटत होता. दिनांक ८ रोजीं घडलेल्या या प्रकाराला दिनांक ११ रोजीं एका वृत्तपत्रांतल्या कोपऱ्यांत थोडीशी जागा मिळाली व तेवढी ठिणगी पडल्याबरोबर हें प्रकरण चांगलेंच धुमसूं लागलें वगैरे गोष्टी त्यांना खुलासेवार कळणें तूर्त शक्यच नव्हतें ! ' मोरिया ' बोट पोर्ट सैद बंदरांत थोडा वेळ थांबली तेव्हां न्याहारीचें वाढप करण्यासाठीं आलेल्या एका वाढप्याकडून सावरकरांना इतकें मात्र समजलें कीं, आपल्या साहसाचें वृत्त प्रसिद्ध झालेलें आहे व वृत्तपत्रांतून त्याची कांहींतरी चर्चा चालली आहे. वास्तविक शत्रूच्या हातांत असूनहि, सावरकरांना त्या वेळीं असें वाटलें कीं, आपला मार्सेलिसचा प्रयत्न अर्धाअधिक सफलच झाला आहे. मार्सेलिसच्या साहसाच्या प्रसिद्धीमुळें केवढा आंतरराष्ट्रीय क्षोभ उसळला, त्या क्षोभांतून आंतरराष्ट्रीय कायद्याच्या सूक्ष्म मुद्यांचा किती कीस निघाला, हें प्रकरण दाबून, मिटवून टाकण्याचे इंग्लंडचे प्रयत्न साफ फसल्यामुळें, नाक मुठींत धरून इंग्लंडनें हें प्रकरण आंतरराष्ट्रीय न्यायालयाकडे कसें सुपूर्त केलें इत्यादि गोष्टींची तपशीलवार माहिती पुढील प्रकरणांत देण्यांत येईल. ती माहिती वाचल्यावर, मार्सेलिसच्या वृत्ताची प्रसिद्धी झालेली ऐकून सावरकरांना जो आनंद वाटला, तो सर्वस्वीं योग्य होता, असेंच कोणीहि कबूल करील.

'मोरिया' बोटीचा यापुढील एडनपर्यंतचा प्रवास नवलविशेष कांहीं न घडतां पूर्ण झाला. एडन बंदर आल्यावर बोटींतील उतारू व टपाल यांना दुसऱ्या बोटीवर चढविण्यांत आलें. एस्. एस्. साष्टी या बोटीवर सावरकरांना वरच्या मजल्यावरील एका चिंचोळ्या खोलींत बंदोबस्तानें ठेवण्यांत आलें. या चिंचोळया खोलीचा कोंदटपणा आणि भोवतालच्या उष्णतेचा त्रास यांमुळें सावरकरांना एडन सुटल्यापासून मनस्वी क्लेश होऊं लागले. त्यांना मध्यंतरीं जडलेली दम्याची व्यथा या वेळीं चांगलीच वर डोकें काढूं लागली. हळुहळू श्वासोच्छ्वास करतांनाहि त्यांना कष्ट होऊं लागले. बोटीच्यावर आच्छादन म्हणून जी ताडपत्री होती, ती दुपारच्या उन्हानें मनस्वी तापे. समुद्रावरील गरम वारे त्यांना असह्य होत. अशा पंचाग्निसाधनाशीं टक्कर देतांना त्यांना 'नको जीव' असें होऊन जाई. ज्या कोठडींत त्यांना कोंडून ठेवलें होतें त्या कोठडींत ते नीट उभे राहिले तर वरची ताडपत्री त्यांच्या डोक्याला लागे, हें लक्षांत ठेवलें म्हणजे दुपारच्या उन्हाचा त्रास त्यांना किती असह्य होत असेल, याची कल्पना सहज करतां येईल.

प्रवास अशा रीतीनें चाललेला असल्यामुळें आणि मुंबईस पोंचल्याबरोबर पुढें कोणतीं संकटें आ वासून आपल्यापुढें उभीं रहाणार आहेत, याविषयींची कल्पना मनांत घोळत असल्यामुळें, या साष्टी बोटींतून जातांना सावरकरांच्या मनांत एकदां आत्महत्या करण्याचा विचार फार प्रबळ झाला. सावरकरांच्या मनानें आत्महत्या करण्याच्या बाबतींत या प्रसंगीं उचल खाल्ली; इतकेंच नव्हे तर, यापुढील काळांत अकराबारा वर्षेपर्यंत अंदमानी परिस्थितीशीं झगडतांना ज्या संकटाकीर्ण मार्गाचें आक्रमण त्यांना करावें लागलें तो मार्ग आक्रमीत असतांना दोन वेळां मृत्यूला मिठी मारण्याची अनावर इच्छा त्यांना झाली.

*मला ज्या दोन चार वेळां माझ्या विपन्नांतील यातना असह्य होऊन आत्महत्या अत्यंत आकर्षक वाटूं लागली त्यांपैकीं पहिली वेळ म्हणजे मार्सेलिसहून परत धरलों गेल्यानंतर एडनच्या आजूबाजूस भयंकर उष्म्यांत आणि त्रासांत बंद केलेला होतों, ती होय.*

असें स्वतः सावरकरांनीं सांगून ठेविलें आहे.[१] हत्या ही ज्याप्रमाणें सामान्यतः दूषणीयच त्याप्रमाणेंच आत्महत्या देखील सामान्यतः दूषणीयच होय. शरीराचा नैसर्गिक दुबळेपणा प्रभावी ठरून त्यामुळें एकाद्या उच्चतर कार्याचा वा ध्येयाचा बिघाड होईल असें निश्चित वाटूं लागलें तर त्या कार्याच्या वा ध्येयाच्या पूर्ततेंतील एक कर्तव्य म्हणून केलेली आत्महत्या क्षम्यच नव्हे तर श्रेयस्करहि मानणें उचित ठरण्यासारखें असलें तरी, समाजांत आपल्या भोंवतीं ज्या अनेक आत्महत्या वारंवार घडतात त्या प्रायः मनोदौर्बल्यांतूनच निघालेल्या असतात. आत्महत्येला उद्युक्त

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १३०.

होणारा मनुष्य हा एका अर्थी आततायीच होय असें समजून, इंडियन पीनल कोड-मध्यें आत्महत्येचा प्रयत्न दंडय ठरविण्यांत आलेला आहे, हेंहि बरोबर आहे. या बाबतींत आक्षेपाला जागा असेल तर ती एकच आहे. मनुष्याला स्वतःचा जीव इतर सर्व वस्तूंहून प्रिय असतो. त्याचा अंत करण्याला मनुष्य उद्युक्त होतो तेव्हां न्याया-लयांनीं सकृत्दर्शनींच (Prima facie) असें गृहीत धरलें पाहिजे कीं, जिवा-वर उदार होणाऱ्या माणसाला चिडविणारी किंवा वैतागविणारी परिस्थिति त्याच्या आत्मघाततत्परतेला कारणभूत आहे. Every suicide is generally at bottom a murder (प्रायः प्रत्येक आत्महत्या ही मूलतः खुनाच्याच स्वरूपाची असते) हें सत्य लक्षांत घेऊन, न्यायालयांनीं आत्महत्येचा प्रयत्न करणाऱ्या लोकांची चौकशी केली तर त्या चौकशींतून समाजाला आरोग्यप्रद असे अनेक निर्णय निष्पन्न होऊं शकतील. शुद्ध मनोदौर्बल्यामुळें अगर शुद्ध आततायीपणामुळें आत्महत्येच्या विचाराकडे वळणें एवढेंच दंडय वा दूषणीय ठरविणें योग्य आहे. आणि, शुद्ध मनोदौर्बल्यामुळें मोठमोठीं माणसेंहि आत्मघाताच्या विचाराकडे कशीं वळतात हें गांधीजींइतक्या थोर माणसाच्या चरित्राच्या द्वाराच स्पष्ट झालेलें आहे. गांधीजी तेराचौदा वर्षांचे होते त्या वेळीं एका कुमित्राच्या संगतीमुळें त्यांना कांहीं दिवस धूम्रपानाची चटक लागली होती. याहि बाबतींत आपल्याला स्वातंत्र्य नाहीं—अशा साध्या गोष्टी देखील आपल्याला चोरटेपणानें कराव्या लागतात—हें पाहून वैताग-लेल्या गांधीजींनीं धत्तुऱ्याचा प्रयोग स्वतःवर करून आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला होता, असें गांधीजींच्या 'सत्याच्या प्रयोगां' त नमूद करण्यांत आलेलें आहे.[1]

अशा परिस्थितींत आपल्याला फिरून आपल्या मातृभूमीला घेऊन जाण्याऐवजीं सागरानें आपल्याला आपल्या विशाल उदरांत जागा दिली तर त्या उदाराधि साग-राचे आपण शतशः उतराई होऊं असा विचार सावरकरांच्या मनांत वारंवार थैमान घालूं लागला. "ने मजसी ने परत मातृभूमीला । सागरा प्राण तळमळला ॥" ही आर्त विनंति सावरकरांनीं कोणत्या प्रसंगीं आणि कशा परिस्थितींत केली हें यापूर्वी सांगण्यांत आलेलेंच आहे. साष्टी बोटींतून जात असतांना सावरकरांचें मन आत्महत्याप्रवण झालें त्या वेळीं त्यांच्या मनांत जो विचारांचा कल्लोळ उठला असेल तो छंदोबद्ध रीतीनें व्यक्त झाला तर मराठी काव्यसंपत्तींत त्यामुळें अमूल्य भर पडेल, यांत संशय नाहीं.

जीव कासावीस झाल्यामुळें आत्महत्येचे विचार सावरकरांना भंडावून सोडीत होते हें खरेंच; पण, विकाराला विचारांच्या जरबेंत ठेवण्याचें धोरण याहि प्रसंगीं प्रभावशाली ठरलें. आणि त्यामुळें बंदिवान सावरकर शेवटीं शुक्रवार दि. २२-७-१० रोजीं सकाळीं साष्टी बोटीनें मुंबईस आले. ही बोट धक्क्यापासून कांहीं अंतरावर उभी राहातांच, मुंबईच्या पोलिस खात्याची लाँच सावरकरांना

[1] The Story of My Experiments with Truth : Pp. 39-40.

आणावयास बोटीजवळ गेली. या कामगिरीवर मुंबई इलाख्याचे इन्स्पेक्टर जनरल ऑफ् पोलिस मि. केनडी, त्यांचे पर्सनल असिस्टंट मि. गायडर व गुप्त पोलिस खात्यांतील इन्स्पेक्टर मि. फव्हेल यांची योजना झालेली असून त्यांच्याबरोबर आणखी तीन हत्यारबंद युरोपियन पोलिस कामगार धाडण्यांत आलेले होते. या सर्व अधिकाऱ्यांनीं सावरकरांना बंदोबस्तानें साष्टी बोटींतून उतरून घेतलें. पोलिस लॉंच या सर्व मंडळींना उतरून घेऊन धक्क्याशीं आली. डॉक यॉर्डमध्यें सरकारी गाडी तयारच होती. सावरकरांना गाडींत बसवून ही सर्व मंडळी तडक बोरीबंदर स्टेशनवर गेली. बोरीबंदर स्टेशनच्या उजव्या प्रवेशद्वाराशीं सावरकरांना उतरून घेण्यांत आलें. स्टेशनामध्यें दिल्ली एक्स्प्रेस निघण्याच्या ऐन तयारींतच होती. त्या गाडीला तिसऱ्या वर्गाचा कैद्यांचा डबा मुद्दाम जोडलेला होता. पोलिस अधिकारी व सावरकर या डब्यांत येऊन बसतांच गाडी बोरीबंदरावरून सुटली. त्या दिवशीं दुपारच्या सुमारास सावरकरांना नाशिक येथें बंदोबस्तानें उतरून घेण्यांत आलें व त्यांना कच्च्या कैदेंत बंदोबस्तानें ठेवण्यांत आलें.

मार्सेलिस प्रकरणामुळें फ्रान्समध्यें ज्या घडामोडी सुरू झाल्या होत्या त्यांचा फायदा सावरकरांना जास्तींत जास्त प्रमाणांत मिळावा यासाठीं काय केलें पाहिजे यासंबंधींची चर्चा पं. शामजी कृष्णवर्मा, बॅ. राणा, कामाबाई वगैरेंनीं भरपूर प्रमाणांत केली. या चर्चेनंतर असें ठरलें कीं, मुंबईचे जोसेफ बॅप्टिस्टा यांना ताबडतोब तार धाडण्यांत यावी आणि सावरकरांच्यावरील खटल्याचें काम स्थगित झालें तर पहावें. या हेतूनें कामाबाईनीं बॅ. बॅप्टिस्टा यांना पुढील तार पाठविली होती :

See immediately professionally Savarkar arriving Bombay Steamer Morea. French Govt. demands his return. Choose your Solicitor. Letter follows.

( सावरकर हे मोरिया आगबोटीनें मुंबईस येत आहेत. त्यांचे कायदेशीर सल्लागार या नात्यानें त्यांची गांठ घ्या. सावरकरांना फ्रेंच सरकारच्या हवालीं करण्यांत यावें अशी त्या सरकारची मागणी आहे. सॉलिसिटर म्हणून कोणाची निवड करावयाची तें आपणच ठरवा. सविस्तर पत्र येत आहे. )

कामाबाईनीं बॅ. बॅप्टिस्टा यांना पॅरिसमधून धाडलेली तार २२ जुलैपूर्वींच बॅरिस्टरसाहेबांच्या हातीं पडली होती. तार हातीं पडतांच बॅ. बॅप्टिस्टा उद्योगाला लागले. दप्तरी, फेरेरा ॲण्ड दिवाण या सॉलिसिटर्स फर्ममार्फत त्यांनीं पोलिस कमिशनरला आपलें म्हणणें कळविलें व सावरकरांची भेट घेण्याची आपली इच्छा व्यक्त केली. ' सावरकर हे नाशिकच्या जिल्हा पोलिसच्या ताब्यांत असल्यामुळें, मला या बाबतींत कांहीं करतां येत नाहीं ' असें उत्तर पोलिस कमिशनरनें दिलें. त्यामुळें बॅ. बॅप्टिस्टा यांनीं मुंबई सरकारच्या पोलिटिकल डिपार्टमेंटच्या सेक्रेटरीशीं पत्रव्यवहार सुरू केला. पुष्कळ खटपटीनंतर बॅप्टिस्टा यांना सावरकरांच्या भेटीची परवानगी महिन्यानंतर मिळाली.

# प्रकरण ११ वें

# मार्सेलिस प्रकरणाचें उपाख्यान

लंडन व पॅरिस येथील भारतीय देशभक्तांनीं १९०६ सालापासून जे वेगवेगळे उद्योग चालविले होते त्यांमुळें युरोपांतील प्रबल राष्ट्रें भारतीय प्रश्नांकडे एका नव्या दृष्टीनें पाहूं लागलीं होतीं. भारतांतील लोक ब्रिटिशांच्या गुलामगिरींत आहेत, इतकेंच नव्हे तर, त्यांना ती गुलामगिरी संमत आहे असा या राष्ट्रांचा आजवर समज होता. १९०६ सालापासून लंडन व पॅरिस येथील भारतीय देशभक्तांनीं ज्या नानाविध चळवळी केल्या त्यांमुळें हा समज पालटला. भारतीय लोक ब्रिटिशांच्या गुलामगिरीविरुद्ध झगडूं लागले आहेत, हीं गोष्ट युरोपियन राष्ट्रांना कळूं लागल्यामुळें, जगाच्या स्वामित्वासाठीं ब्रिटनबरोबर झगडूं पाहाणारीं युरोपांतील राष्ट्रें भारताचा विचार भिन्न प्रकारें करूं लागलीं. प्रत्यक्ष अप्रत्यक्ष रीतीनें आपण भारतीय स्वातंत्र्याचा प्रश्न उचलिला तर भारतीय लोकहि स्वतःच्या स्वातंत्र्यसंपादनासाठीं कांहीं तरी करतील, असा विश्वास युरोपांतील प्रमुख राष्ट्रांना १९०६ नंतरच्या तीनचार वर्षांत वाटूं लागला. भारताला आंतरराष्ट्रीय राजकारणांत स्थान मिळवून देण्याचें श्रेय या चार वर्षांत हिंदी क्रांतिकारकांनीं केलेल्या उलाढालींना दिलें पाहिजे. भारताला हें आंतरराष्ट्रीय महत्त्व प्राप्त झालेलें असल्यामुळें, सावरकरांनीं मार्सेलिस येथें जें साहस केलें त्याचे प्रतिध्वनि कित्येक महिनेपर्यंत युरोपभर उमटत राहिले. भारतीय राजकारणाला आंतरराष्ट्रीय महती मिळवून देणाऱ्या घटनांमध्यें सावरकरांचें मार्सेलिस येथील साहस ही घटना पुष्कळच प्रमुख आहे.

दि. ८ जुलै रोजीं सावरकरांनीं मार्सेलिस येथें जो साहसी प्रयत्न केला त्याविषयींचें वृत्त प्रकाशित होण्याला तीन दिवस लागले. दि. ११ जुलै रोजीं 'डेली मेल' पत्राच्या पॅरिस आवृत्तींत सावरकरांनीं केलेल्या धाडसी प्रयत्नाची बातमी एका कोपऱ्यांत चारसहा ओळींतच देण्यांत आली; पण, एवढी बारीकशी ठिणगी पडल्याबरोबर या प्रकरणाच्या चर्चेचा वणवा सारखा पसरतच चालला. जीन जॉरिस, या समाजसत्तावादी कार्यकर्त्यानें हें प्रकरण तत्काळ हातीं घेतलें व त्यामुळें "L' Humanite" या पत्राच्या दि. १२ जुलैच्या अंकांत या विषयावर एक सणसणीत लेख प्रसिद्ध झाला. त्यांतील महत्त्वाच्या भागाचें इंग्रजी भाषांतर पुढीलप्रमाणें[1] आहे :

---

[1] श्री. इंदुलालजी याज्ञिक यांनीं लिहिलेलें शामजी कृष्णवर्मांचें चरित्र : इंग्रजी ( अप्रकाशित ).

This abominable violation of the right of asylum was effected in absolute secrecy. Had it not been for a telegram published yesterday in the Paris Daily Mail, we should still have been ignorant of the incident ?

But, it is quite impossible that the matter can be allowed to rest there. In delivering up a political refugee, the Marseilles authorities—admitting that they had acted on their own initiative--have committed an outtrage of which account will most assuredly be demanded and in respect of which the sanction of the State itself is necessary.

( आश्रय मागण्याच्या अधिकाराचा या प्रकरणीं भंग झाला असून तो भंग अत्यंत गर्ह्य स्वरूपाचा आहे. शिवाय, तो भंग अत्यंत गुप्तपणें करण्यांत आलेला आहे. 'डेलीमेल'च्या कालच्या पॅरिस आवृत्तींत प्रसिद्ध झालेला विद्युत्संदेश प्रसिद्ध झाला नसता तर अद्यापहि आपण मार्सेलिस प्रकरणीं अज्ञानांतच राहिलों असतों.

पण, या प्रकरणाची इतिश्री येथेंच होऊं देणें अगदीं अशक्य आहे. मार्सेलिस येथील अधिकारीवर्गानें राजकीय स्वरूपाच्या एका आश्रयार्थी गृहस्थाला परक्यांच्या हातीं दिलें आहे. ही गोष्ट त्यांनीं स्वतःप्रेरणेनें केली असेंच मानलें तरीहि, त्यांच्या हातून न्यायाचे धिंडवडे निघाले, असें म्हणावें लागेल. या बाबतींत त्यांना जाब विचारला जाईल, हें निश्चित ! या प्रकरणीं थेट राजसत्तेची संमति मिळणें अवश्य आहे. )

ही सरबत्ती सुरू होतांच फ्रान्समधील इतर वृत्तपत्रांनींहि टीकेचा धडाका सुरू केला. सावरकर-विमोचन समितीचे सदस्य गाय आल्डरेड यांच्या प्रयत्नांमुळें खुद्द इंग्लंडमध्येंहि हा विषय चर्चिला जाऊं लागला. जर्मनीप्रभृति देशांतील वृत्तपत्रांना इंग्लंडला नापत करण्याला हा एक नामी विषय सांपडला, असें वाटूं लागलें. जुळवितां आली तेवढी माहिती जुळवून भिन्नभिन्न देशांतल्या वृत्तपत्रांनीं सावरकरांच्या चरित्राला प्रसिद्धी दिली व सावरकरांवरील खटला तहकूब करून त्यांना फ्रेंच सरकारच्या स्वाधीन करण्यांत यावें, अशी मागणी सुरू केली. सावरकरांच्या पॅरिसमधील मित्रांच्या खटपटीकडे कानाडोळा करणें शक्य नाहीं, असें फ्रेंच मंत्रिमंडळालाहि वाटूं लागलें. या मंत्रिमंडळानें पत्रकें नि प्रतिपत्रकें काढण्याला सुरवात केली.

दि. १२ जुलै रोजीं "L'Humanite" पत्रांत प्रसिद्ध झालेल्या लेखानंतर फ्रेंच सरकारनें या प्रकरणांत लक्ष घातलें. 'मराठा' साप्ताहिकाच्या दि. १७ जुलैच्या अंकांत पॅरिसच्या कांहीं तारांचा गोषवारा छापलेला आहे. फ्रेंच सरकारनें या सुमारास या विषयासंबंधीं जीं पत्रकें प्रसिद्ध केलीं त्यांचें प्रतिबिंब या तारांच्या पुढील गोषवाऱ्यांत पडलेलें आढळतें :

Owing to newspaper protests against the surrender of Savarkar, Government has issued a statement explaining charges against Savarkar. It adds that British authorities requested Government to have the Morea watched at Marseilles, lest any of his compatriots should attempt Savar. kar's escape. This was done.

( सावरकरांना ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या हवालीं करण्यांत आलें, या गोष्टीचा वृत्तपत्रांतून निषेध करण्यांत आला. त्यामुळें फ्रेंच सरकारनें एक वक्तव्य प्रसिद्ध केलें व सावरकर यांच्यावर कोणते आरोप होते याविषयीं खुलासा केला. 'मोरिया' बोटीच्या मार्सेलिस येथील वास्तव्याच्या काळांत सावरकरांचे सहकारी त्यांना पळवून नेण्याचा प्रयत्न करतील अशी भीति वाटत असल्यामुळें, मार्सेलिस बंदरांत मुक्काम असलेल्या 'मोरिया' बोटीवर पहारा ठेवण्याबद्दलची विनंति ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं फ्रेंच सरकारला केली होती व पहाऱ्याची व्यवस्थाहि झाली होती, असें या वक्तव्यांत म्हटलेलें आहे. )

'मोरिया' बोटीनें सावरकरांना हिंदुस्थानकडे धाडण्यांत येत आहे, ती बोट दि. ७ अगर ८ जुलै रोजीं मार्सेलिस येथें थांबण्याचा संभव आहे व त्या वेळीं बंदरावर देखरेखीची व्यवस्था होणें अवश्य आहे असें ब्रिटिश सरकारनें फ्रेंच सरकारला दि. २९जून रोजींच कळविलें होतें, वगैरे गोष्टी हेग निर्णयाच्या प्रास्ताविक परिच्छेदांतून निर्दिष्ट करण्यांत आल्या आहेत, हें या प्रकरणांत यापुढें विस्तरशः दिलेल्या हेग-निर्णयावरून वाचकांच्या लक्षांत येईलच. 'मोरिया' बोट वाटेंत कोठें थांबणार हें सावरकरांना आणि त्यांच्या मित्रमंडळीला माहीत नव्हतें. सरकारनें या बाबतींत गुप्तता राखल्यामुळें ही गोष्ट त्यांना कळूं शकली नाहीं. निदान फ्रान्समधील कोणत्याहि बंदरांत 'मोरिया' बोटीनें थांबूं नये असें ब्रिटिश सरकारला मनःपूर्वक वाटत असेल; व त्यामुळें बोटीचा मार्सेलिस बंदरांतील मुक्काम हा पूर्वयोजनेनुसार घडला नसेल, हें अगदीं संभवनीय दिसतें. असें असलें तरीहि, ब्रि. सरकारनें फ्रेंच सरकारला कळविलेली ही माहिती निरुपपत्तिक ठरत नाहीं. लांबीच्या प्रवासांत बोटीला आकस्मिक रीतीनें कोठें काय होईल, व कशाची जरूरी भासेल हें निश्चित सांगणें अवघड असल्यामुळें, ब्रिटिश सरकारनें फ्रान्सला पूर्वसूचना देऊन सारी व्यवस्था केली हें योग्यच दिसतें. अशी सर्व व्यवस्था करण्यांत आल्यावर बोटीवरील एकादा राजबंदी निसटला व त्यानें फ्रान्स देशाच्या भूमीवर पदार्पण केलें तर फ्रेंच अधिकाऱ्यांचें त्या बाबतींत कर्तव्य कोणतें व तें कर्तव्य सावरकरांच्या बाबतींत कितीसें पार पडलें हा मुद्दा महत्त्वाचा असूनहि, फ्रेंच सरकारनें प्रसिद्ध केलेल्या वक्तव्यांत या मुद्याचा ऊहापोह करण्यांत आलेला नाहीं.

इंग्लंडच्या किनाऱ्यावर उतरून ब्रिटिश सरकारकडे आश्रयार्थी म्हणून आलेल्या परस्थांच्या बाबतींतली एक विशिष्ट व स्पृहणीय परंपरा इंग्लंडमध्यें निर्माण झालेली होती. ब्रिटिश मुत्सद्दी व ब्रि. विचारवीर यांना या परंपरेबद्दल मोठा अभिमान वाटत असे. राष्ट्रस्वातंत्र्याच्या संग्रामांत ऑस्ट्रियाशीं झगडणाऱ्या मॅझिनीला इंग्लंडनें आश्रय दिला होता त्याप्रमाणेंच कोशूट ( Kossuth ) या हंगेरियन देशभक्तालाहि इंग्लंडनें आश्रय दिला होता. आश्रयार्थ आलेल्या परस्थांचे अधिकार ( Right of asylum ) दक्षपणानें पाळले जावे म्हणून इंग्लंडनें १८५० सालीं

उद्भवलेल्या डॉन पॅसिफिको प्रकरणांत ग्रीस व फ्रान्सपाशीं संग्राम सुरू करण्याची सिद्धता दर्शविली होती; आणि १८५६ मध्यें उपस्थित झालेल्या अशाच एका प्रसंगीं चीनविरुद्ध युद्धघोषणा करण्यापर्यंत इंग्लंडची मजल गेली होती. अशा परंपरागत स्पृहणीय इतिहासाचा अभिमान जगापुढें पाजळणारें इंग्लंड सावरकर-प्रकरणांत फ्रान्सपाशीं कोणत्या रीतीनें वागतें हें पाहण्यासाठीं सारें जग उत्सुक झालें ! फ्रान्सनें सावरकरांच्या बाबतींत योग्य तो आग्रह धरला व इंग्लंडनें तो मानला नाहीं तर इंग्लंडवर 'परोपदेशे पांडित्या 'चा आळ सहजच घेतां येईल व इंग्लंडच्या प्रतिष्ठेचे तीन तेरा उडविण्याच्या कामीं या गोष्टीचा सुंदर उपयोग होईल हें ओळखून, इंग्लंडच्या वाइटावर असलेले लोक या प्रकरणाला चालना देण्यासाठीं अहमहमिकेनें पुढें येऊं लागले.

जीन जॉरिस या फ्रेंच समाजसत्तावाद्यानें आणि इतरहि कांहीं फ्रेंच राजकारणी लोकांनीं फ्रेंच सरकारच्या मागें या प्रकरणीं सारखा लकडाच लावला ! त्यामुळें, मार्सेलिस येथें घडलें तरी काय या प्रश्नाची चौकशी करणें फ्रेंच सरकारला भाग पडलें. सरकारी रीत्या झालेल्या या चौकशीमुळें फ्रेंच सरकारची अशी खात्री पटली कीं, सावरकर मार्सेलिस येथें फ्रान्सच्या भूमीवर निश्चितपणें उतरले होते. अशी खात्री पटल्याबरोबर फ्रेंच सरकारनें पहिल्या प्रथम काय केलें हें दि. १९ जुलै १९१० रोजीं पॅरिसहून सुटलेल्या पुढील विद्युत्संदेशावरून लक्षांत येतें :

The French Government, in view of the fact that Savarkar actually landed on French soil, have requested the British Government to suspend the trial, till full reports of the case are received.

(सावरकरांनीं फ्रान्सच्या भूमीवर प्रत्यक्ष पदार्पण केलें ही गोष्ट सिद्ध झाली असल्यामुळें, फ्रेंच सरकारनें ब्रिटिश सरकारला अशी विनंति केली आहे कीं, सावरकरांनीं मार्सेलिसला कायकाय केलें याचें विस्तृत इतिवृत्त हातीं येईपर्यंत सावरकरांवरील आरोपांच्या चौकशीचें काम स्थगित व्हावें.) अलाहाबादच्या 'पायोनियर' पत्राला लंडनहून दि. १९-७-१९१० रोजीं आलेल्या विद्युत्संदेशांत फ्रान्समधील वृत्तपत्रांतून या प्रकरणीं प्रसिद्ध होणाऱ्या वृत्तांचा गोषवारा दिलेला आहे. त्यावरून असें निष्पन्न होतें कीं, मुंबईस पोंचल्याबरोबर सावरकरांना फ्रेंच सरकारच्या प्रतिनिधींच्या ताब्यांत देण्यांत यावें, अशी मागणी फ्रान्सनें ब्रिटिश सरकारकडे केली होती. फ्रेंच सरकार सावरकर-प्रकरणीं खुलासे आणि पुरवणीखुलासे प्रसिद्ध करूं लागलें तरी, दिनांक २० जुलैपर्यंत ब्रिटिश सरकारनें फ्रान्सला कोणतेंच उत्तर धाडिलें नाहीं ! दिनांक २१ जुलै रोजीं या प्रकरणाचा प्रतिध्वनि ब्रि. पार्लमेंटमध्यें प्रश्नोत्तरांच्या रूपानें उमटला. सावरकरप्रकरणीं फ्रेंच सरकारचा खलिता आला असल्याचें पंतप्रधान सर एडवर्ड ग्रे यांनीं या प्रसंगीं मान्य केलें. या प्रकरणांतल्या मुद्याच्या गोष्टी व या प्रकरणांत अंतर्भूत झालेलें तत्त्व यांचा नीटपणीं विचार केल्याशिवाय अधिकृत वक्तव्य करण्याचें मात्र ग्रे साहेबांनीं या प्रसंगीं नाकारलें.

दिनांक २२-७-१९१० रोजीं 'मोरिया' बोटीवरील उतारू 'साष्टी' बोटीनें मुंबई बंदरांत उतरले. त्यानंतर त्या उतारूंपैकीं कित्येकांच्या मार्फत सावरकरप्रकरणाची हकीकत प्रसिद्ध होऊं लागली व या प्रकरणांतील कायद्याच्या मुद्यांचा कीस निघूं लागला. त्या वेळीं कलकत्ता येथें ज्या परदेशच्या सरकारांच्या वकिलाती होत्या त्यांतलीं जाणतीं माणसें ह्या विषयासंबंधीं कोणतें मत व्यक्त करतात हें उत्सुक व जिज्ञासू जनतेला कळावें म्हणून, वृत्तपत्रांच्या प्रतिनिधींनीं अशा माणसांपैकीं कित्येकांचीं मतें मुलाखतीच्या रूपानें प्रसिद्ध केलीं. स्पेनचे दुय्यम वकील मसिऑं पेरॉं (Monsieur Pierron) यांनीं असें मत व्यक्त केलें कीं, फ्रेंच शिपायानें सावरकरांना आपल्या मुलुखाच्या स्वाधीन करावयाला हवें होतें; हिंदी पोलिसांच्या हवालीं सावरकरांना करून त्यानें मोठी चूक केली आहे. ब्रिटिश सरकारनें सावरकरांना आपल्या ताब्यांत दिलें पाहिजे ही फ्रेंच सरकारची मागणी रास्त आहे, असेंहि मासिऑं पेरॉं यांनीं स्पष्टपणें सांगितलें. पोर्तुगालचे दुय्यम वकील व पेरॅग्वेचे वकील मासिऑं जम्बॉं (Monsieur Jambon) यांनीं व्यक्त केलेलें मत अधिक सूचक आहे. ज्या फ्रेंच शिपायानें सावरकरांना 'मोरिआ' बोटीवरील अधिकाऱ्यांच्या हवालीं केलें त्याला कायद्याचें ज्ञान नव्हतें, तो कांहीं न्यायाधीश नव्हता; अतएव त्याचें कृत्य हें फ्रेंच सरकारचें प्रातिनिधिक कृत्य म्हणून लक्षांत घेतां येत नाहीं, असें मासिऑं जम्बॉं यांनीं सांगितलें. आंतरराष्ट्रीय कायद्यासंबंधीं अधिकारयुक्त विवेचन करणारा ग्रंथकार वॉकर याच्या म्हणण्याच्या आधारानें 'पायोनियर' पत्रानें याच सुमारास सावरकर-प्रकरणाचा ऊहापोह केला. या ऊहापोहांतील पुढील वाक्यें लक्षांत ठेविलीं म्हणजे मासिऑं जम्बॉं यांच्या मतांतलें मर्म सहज लक्षांत येतें :

The surrender of a fugitive must be a national act. A surrender by local authorities is invalid unless local authorities are expressly authorised by their government to give up a criminal

(बंदोबस्तांतून निसटलेल्या इसमाला हवालीं करण्याचें कृत्य हें 'राष्ट्रीय कृत्य' ठरावें लागतें. स्थानिक अधिकारी असें कृत्य करतील व त्या कृत्याला त्यांच्या सरकारची स्पष्ट पूर्वमान्यता नसेल तर तें कृत्य अनधिकृत ठरेल.)

सावरकरांना तुरुंगांत ठेवून त्यांच्यावरील खटल्याच्या साक्षीपुराव्याची सिद्धता करण्यांत सरकार गुंतलें होतें त्या अवधींत इंग्लंडमधील व फ्रान्समधील वृत्तपत्रांतून मार्सेलिस प्रकरणाची 'भवति न भवति' चालूच होती. या चर्चेच्या निमित्तानें आणखी एक मुद्दा पुढें मांडण्यांत आला. इंग्लंडच्या ताब्यांतून निसटलेल्या सावरकरांसारख्या गृहस्थाचें भवितव्य केवळ आंतरराष्ट्रीय कायद्याच्या तत्त्वांच्या अनुरोधानें ठरावयाचें नसून, फ्रान्स व इंग्लंड यांच्यामधील विशिष्ट तहनामे व करारमदार यांच्या अनुरोधानें तें भवितव्य ठरवावें लागणार आहे, अशी माहिती पुढें आली. १८७६ सालीं इंग्लंड व फ्रान्स यांच्या दरम्यान झालेला या बाबतींतला तहनामा व पुढें १८९६ सालीं या दोन राष्ट्रांत झालेल्या करारान्वयें या तहनाम्याच्या मूळ स्वरूपांत

झालेलें रूपांतर यांच्या आधारें सावरकर-प्रकरणाची चर्चा झाली पाहिजे, असें प्रतिपादन करण्यांत येऊं लागलें. 'मोरिआ' बोट मार्सेलिसला येईल तेव्हां फ्रेंच सरकारनें बंदरावर पहारा ठेवावा असें आगाऊ कळविण्यांत आलें असल्याबद्दलचें वृत्त प्रसिद्ध झालें होतें; पण, त्याचा खरेपणा बाधित करणारा पुरावाहि फ्रेंच वृत्तपत्रांतून पुढें मांडण्यांत येऊं लागला होता. या वादांत ब्रिटिश सरकारची बाजू चांगलीच लंगडी असल्याची ओरड होऊं लागली. फ्रान्स व इंग्लंडमधील तहनाम्यांचा उल्लेख करून 'डेलीमेल' पत्रानें दिनांक ३–८–१९१० रोजीं या प्रकरणावर जी टीका केली तिच्यांतील पुढील भाग वाचनीय आहे :

The illegality of Savarkar's surrender is so plain that the only defence so far attempted has been to suggest that the British Government cannot be responsible for the errors of a French Policeman. That argument is utterly fallacious because the error and the offence were committed by the French Policeman in conjunction with British officials and would have been impossible without the co-operation of British officials We need not dwell upon the fatal consequences if we insist in not returning Savarkar to French custody and taking chances under the extradition treaty. Having ourselves maintained the legitimacy of our action, we should be unable to protest, if a British policeman were, in the future, to hand over a fugitive Garibaldi or Kossuth to a foreign Government. The right of asylum, instead of being under the protection of the law, would be at the mercy of the arbitrary caprice or the corruptibility of the meanest police constable

( फ्रेंच पोलिसाच्या हातून झालेल्या चुकीबद्दल ब्रिटिश सरकारला जबाबदार धरतां येणार नाहीं, एवढयाच मुद्याच्या आधारें सावरकर–प्रकरणांतल्या ब्रिटिश सरकारी धोरणाचें समर्थन करण्याचा प्रयत्न करण्यांत आलेला आहे. सावरकरांना ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या हवालीं करण्यांत कायद्याचें उल्लंघन किती स्पष्टपणें झालें आहे, हेंच यावरून सिद्ध होतें. हें समर्थन सर्वस्वी चुकीचें आहे; कारण, जो प्रमाद व अपराध घडला तो फ्रेंच पोलिस व ब्रिटिश अधिकारी यांच्या सहकार्यानें घडला आहे. ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या सहकार्याशिवाय तो घडणें शक्यच नव्हतें. तहनाम्यांप्रमाणें काय होईल तें होईल असें म्हणून सावरकरांना फ्रेंच सरकारच्या हवालीं न करण्याचा आपला आग्रह आपण चालू ठेविला तर त्याचे परिणाम काय होतील यासंबंधीं ऊहापोह करण्याची आवश्यकता नाहीं. आमचें कृत्य कायदेशीरच आहे ह्या मुद्याला आपण बिलगून बसलों तर भविष्यकालीं त्याचे फार दुर्धर परिणाम होतील. ब्रिटनमध्यें आश्रयासाठीं आलेल्या एकाद्या गॅरिबाल्डीला किंवा कोशूटला एकाद्या ब्रिटिश पोलिसानें परकी सरकारच्या स्वाधीन केलें तर त्या कृत्याचा निषेध आपल्याला कोणत्या तोंडानें करतां येईल ! आश्रयदानाच्या अधिकाराचें संगोपन कायद्याप्रमाणें करणें अशक्य होऊन बसेल ! हलक्यांतल्या हलक्या पोलिस कॉन्स्टे-

बलचा स्वच्छंद लहरीपणा किंवा लांचखाऊपणा यांच्याशिवाय या अधिकाराला अन्य वालीच उरणार नाहीं. )

'मॉर्नंग पोस्ट' पत्रानेंहि या सुमारास असें स्पष्टपणें कबूल केलें कीं, ब्रिटिश सरकारच्या ताब्यांतल्या राजबंदीनें परकी राष्ट्राच्या भूमीवर नुसतें पदार्पण केलें कीं तेवढयानेंच तो ब्रिटिश सरकारच्या अधिकाराच्या कक्षेंतून मुक्त होतो. फ्रेंच व ब्रिटिश वृत्तपत्रांतून चाललेल्या या टीकेमुळें ब्रिटिश सरकारची जी नाचक्की होत होती तिच्यावर १९१० सालच्या सप्टेंबर महिन्यांत आंतरराष्ट्रीय स्वरूपाचें शिक्का-मोर्तबच झालें. दिनांक ६-९-१९१० रोजीं कोपन हेगन येथें आंतरराष्ट्रीय समाजसत्तावादी कॉंग्रेसचें अधिवेशन झालें. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकांक्षेबद्दल आस्था बाळगणारे ब्रिटिश पार्लमेंटचे सभासद मि. केर हार्डी हे या अधिवेशनाला उपस्थित होते. त्यांनीं या अधिवेशनांत असा प्रस्ताव मांडला कीं, परदेशांत आश्र-यार्थी म्हणून जाणाऱ्या इसमाचा आश्रय मिळण्याचा अधिकार सर्वांनीं महत्त्वाचा मानला पाहिजे व या अधिकारानुसार सावरकरांना फ्रेंच सरकारच्या स्वाधीन कर-ण्यांत आलें पाहिजे.

सावरकर यांना आपल्या ताब्यांत ठेवण्याचा ब्रिटिश सरकारला अधिकार आहे कीं काय हा प्रश्न अशा रीतीनें विवेचिला जात असल्यामुळें आणि सावरकरांना फ्रेंच सरकारच्या स्वाधीन करणेंच न्याय्य होय असा अभिप्राय अनेक देशांतल्या जाणत्या लोकांकडून दिला जात असल्यामुळें, सावरकरांवरील खटल्याचें काम तरी हिंदुस्थान सरकारकडून स्थगित केलें जाईल, अशी लोकांची अपेक्षा होती. सावर-करांना आपल्या ताब्यांत ठेवण्याचा अधिकार कोणाचा या प्रश्नाचें उत्तर फ्रान्सला अनुकूल ठरलें तर, हिंदी न्यायालयांत चाललेलें काम निरर्थक ठरून तें न्यायालयच हास्यास्पद ठरण्याचा संभव असल्यामुळें, हें काम स्थगित होणेंच श्रेयस्कर होतें. या न्यायालयांतून होणाऱ्या कामकाजामुळें अगर निर्णयामुळें, सावरकरांविषयीं प्रतिकूल ग्रह निर्माण होण्याची शक्यता वाढणारी असल्यामुळेंहि, हें काम स्थगित करून त्रय-स्थांना सावरकर-प्रकरणाची शहानिशा पूर्वग्रहमुक्त वृत्तीनें करतां येईल अशी व्यवस्था करणें हेंहि हिंदुस्थानसरकारचें कर्तव्य होतें. सावरकरांवर ब्रिटिश सरकारचा व हिंदु-स्थान सरकारचा कांहीं अधिकार चालतो कीं नाहीं हाच प्राथमिक मुद्दा विवाद्य असल्यामुळें, सदर सरकारांच्या इच्छेमुळें निर्माण झालेल्या न्यायालयाचा सावरकरांची चौकशी करण्याचा अधिकारहि संशयास्पदच होता. ज्या न्यायालयांत सावरकरांना आरोपी म्हणून उभें करण्यांत आलें त्या न्यायालयांतल्या न्यायाधिशांनीं हा प्राथमिक मुद्दा स्वेच्छेनेंच उपस्थित केला असता व सावरकरांवरील आरोपांची चौकशी स्थगित केली असती तर त्यांनीं न्यायदानाच्या कार्याची प्रतिष्ठा सांभाळली व संवर्धिली असेंच कोणीहि म्हटलें असतें. पण, मुंबई येथें निर्माण करण्यांत आलेल्या स्पेशल ट्रायब्यूनल-मधील न्यायमूर्तींना असें करण्याची स्वतःप्रेरणा तर लाभलीच नाहीं; उलट, चौक-

शीला सुरुवात झाल्यावर सावरकरांतर्फे या मुद्यावर वारंवार भर देण्यांत आल्यावरहि न्यायमूर्तींनीं त्या मुद्याकडे योग्य तें लक्ष पुरविलें नाहीं व त्यांनीं इतर आरोपींबरोबरच सावरकरांच्या चौकशीचें काम तसेंच पुढें रेटिलें !

आंतरराष्ट्रीय कायद्याच्या प्रश्नाचा निकाल लागण्याची वाट न पाहतां हिंदुस्थान सरकारनें सावरकरांवरील खटला तसाच पुढें दामटला आहे, सावरकरांची चौकशी करण्याचा अधिकार कोर्टाला आहे कीं नाहीं हा मुद्दा उपस्थित करण्यांत आल्यावरहि त्याचा योग्य प्रकारें विचार होत नाहीं, सावरकरांवरील आरोपांची चौकशी प्राय: एकतर्फीच चालली आहे इत्यादि हकीकत बाहेर देशांतल्या स्वातंत्र्यप्रेमी व विचारशलि जनतेला कळूं लागतांच, न्यायदानाच्या या तऱ्हेबद्दल निषेध प्रकट होऊं लागला. 'जस्टिस' या उदारमतवादी पत्रानें या धोरणाबद्दल नापसंति व्यक्त करतांना जी कडक टीका केली ती 'लंडन टाइम्स'ला फार झोंबली. सावरकरांची चौकशी इंग्लंडमध्यें न करतां त्यांना हिंदुस्थानांत धाडण्यांत ब्रिटिश सरकारचा खरा हेतु कोणता होता या मुद्याचें चोख स्पष्टीकरण करतांना 'जस्टिस'नें पुढील उद्‌गार काढिले :

In order that Savarkar might not have a fair trial defended by counsel and safeguarded by public opinion in England, he was sent back to India where, innocent or guilty, his condemnation could officially secured.

(सावरकर यांच्यावरील आरोपांची चौकशी इंग्लंडमध्यें झाली असती तर त्यांचा बचाव कुशल कायदेपंडितांकडून करण्यांत आला असता व इंग्लंडमधील लोकमताचाहि आश्रय त्यांना लाभला असता. सावरकरांना हे लाभ मिळूं नयेत व त्यांच्यावरील आरोपांची चौकशी न्याय्य पद्धतीनें होऊं नये म्हणून त्यांना हिंदुस्थानला पाठवून देण्यांत आलें. सावरकर खरोखरच अपराधी असले किंवा नसले तरी सरकारी वजनानें त्यांना दोषी ठरविण्याची शक्यता हिंदुस्थानांत असल्यामुळेंच त्यांची रवानगी तिकडे करण्यांत आली !)

१९१० सालीं सप्टेंबरच्या शेवटीं मुंबईस सावरकरांवरील पहिल्या खटल्याचें काम चालू झालें. यानंतर सुमारें महिन्यानें फ्रेंच व ब्रिटिश सरकार यांनीं सावरकर-प्रकरण हेगच्या आंतरराष्ट्रीय न्यायालयाकडे सोंपविण्याचा निर्धार जाहीर केला. हा निर्धार जाहीर होण्यापूर्वी या दोन राष्ट्रांमध्यें या प्रकरणीं पुष्कळच खटाखटी झाली असली पाहिजे व अगदीं नाइलाज झाल्यावरच इंग्लंडनें हें प्रकरण त्रयस्थांपुढें मांडण्याला मान्यता दर्शविली असली पाहिजे हें त्या वेळीं 'लंडन टाइम्स'नें लिहिलेल्या एका संपादकीय लेखांतील पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे :

The French Government demanded the surrender of Savarkar on the ground of his having landed on French soil and having thereby established the right to asylum. This demand the British Government were unable to concede as, in the opinion of their law officers, the right of asylum could not, in the circumstances, be properly pleaded. The issue was joined upon highly controversial points of international law which have never yet been authoritatively settled. The correspondence that

ensued between the two governments showed no prospect of any agreement either as to the principle involed or even as to some of the facts connected with the prisoner's recapture.

(सावरकरांनीं फ्रान्सच्या भूमीवर पदार्पण केलें होतें व त्यामुळें आश्रयार्थी म्हणून फ्रान्स देशांत आश्रय मागण्याचा त्यांचा अधिकार सिद्ध झाला होता या मुद्यांवर भर देऊन फ्रेंच सरकार 'सावरकरांना आमच्या स्वाधीन करा' अशी मागणी करीत होतें. ही मागणी मान्य करण्याला ब्रिटिश सरकार तयार नव्हतें; कारण, त्यांच्या कायदेपंडित अधिकाऱ्यांचें-मत असें पडलें होतें कीं, मार्सेलिस-प्रकरणांतील सर्व परिस्थितीचा विचार करतां,आश्रयार्थी म्हणून आश्रय मागण्याच्या अधिकाराचा मुद्दा या प्रकरणीं वास्तविक रीतीनें उपस्थित करतां येत नाहीं.आंतरराष्ट्रीय कायद्यांतील ज्या मुद्यांचा आजपर्यंत अधिकृतरीत्या निर्णयच झालेला नाहीं असे अत्यंत वादग्रस्त मुद्दे पुढें येऊन, त्यांच्याभोंवती वादाचें खूप रण माजलें! फ्रेंच सरकार व ब्रिटिश सरकार यांच्या दरम्यान या प्रकरणीं जी पत्रापत्री झाली तिच्यांतून सहमत निष्पन्न होण्याचा आशा दिसेना! या प्रकरणांत अंतर्भूत झालेल्या तत्त्वाविषयींच केवळ नव्हे तर, बंदी सावरकर यांना फिरून हस्तगत करतांना घडून आलेल्या कांहीं घटनांविषयींहि मतांचा मेळ बसणें दुर्घट दिसूं लागलें.)

दि. ७–१०–१९१० रोजीं 'लंडन टाइम्स'नें लिहिलेल्या एका लेखांत बरीचशी आदळआपट करण्यांत आल्याची हकीकत मागील प्रकरणांत सांगून झालेली आहे. सावरकर-प्रकरण पडद्याआड कसें खदखदत होतें व त्यामुळें ब्रिटिश सरकार कसें बेचैन झालें होतें हें त्याच सुमारास 'लंडन टाइम्स'नें लिहिलेल्या लेखांतल्या वरील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे. फ्रेंच सरकारनें सावरकरांना आपल्या स्वाधीन करण्याची मागणी ब्रिटिश सरकारकडे केली ती 'मोलें घातलें रडाया' अशाच वृत्तीनें केली होती, हें मात्र लक्षांत ठेविलें पाहिजे. ती मागणी धुडकावून लावण्याचा प्रयत्न ब्रिटिश मुत्सद्दी परोपरीनें करीत होते हें 'लंडन टाइम्स'च्या लिखाणांतील जळफळाटावरून स्पष्ट होत आहे. सावरकर-प्रकरण हें आमचें घरगुती प्रकरण आहे, त्याच्याशीं फ्रान्सला अगर अन्य कोणा देशाला कांहींहि कर्तव्य नाहीं असेंहि सांगण्याचा दरडावणीचा प्रयत्न ब्रिटिश मुत्सद्यांनीं करून पाहिला. पण अशा दबकावणीनें फ्रान्सची पिरपीर थांबत नाहीं हें पाहून ब्रिटिश मुत्सद्यांनीं आपल्या सुपीक मेंदूतून एक नवी शकल काढली. हातीं लागलेल्या सावरकरांना फ्रान्सच्या हवालीं करून मग कायदेशीर भानगडींचा काथ्याकूट करीत बसणें हें 'हातचें सोडून पळत्याच्या मागें लागल्यासारखें' ठरलें असतें. तेव्हां तसें कांहीं न करतां, हें सारें प्रकरण हेगच्या न्यायालयाकडे सोंपविण्याचा सोइस्कर उपाय इंग्लंडनें सुचविला व एका हिंदी क्रांतिकारकासाठीं शेजारच्या प्रबळ राष्ट्राशीं घासाघीस घालीत बसण्यांत अर्थ नाहीं हें ओळखणाऱ्या फ्रेंच मुत्सद्यांनीं तो उपाय मान्य केला! एका हिंदी क्रांतिकारकाच्या रास्त अधिकारापेक्षां आपली राष्ट्रीय इभ्रत व आपलें राष्ट्रीय

स्वास्थ्य हेच मुद्दे फ्रेंच मुत्सद्यांना अधिक महत्त्वाचे वाटले व सावरकर-प्रकरण हेगच्या न्यायालयाकडे धाडून आपण हे दोन्ही मुद्दे बऱ्याच अंशीं पदरांत पाडून घेत आहों असें ठरवून फ्रेंच मुत्सद्यांनीं ब्रिटिश सरकारची सूचना संमत केली. सावरकर-प्रकरणाची बोळवण अशा प्रकारें करण्यांत फ्रेंच सरकारकडून फार मोठी चूक केली जात आहे असा इषारा 'L' Humanite' या फ्रेंच वृत्तपत्रानें वेळींच दिला होता. दिनांक २५–१०–१९१० रोजीं लंडन येथें या बाबतींतला करार पुरा होऊन त्यावर फ्रान्सतर्फे Paul Cambon व इंग्लंडतर्फे E. Grey यांच्या स्वाक्षऱ्या झाल्या.

सावरकर-प्रकरणाची वासलात फ्रेंच मुत्सद्यांनीं अशा हलगर्जीपणानें कां लावली असावी या प्रश्नाचें मार्मिक उत्तर देणाऱ्या एका अप्रकाशित पत्राचा उल्लेख या ठिकाणीं करणें अप्रस्तुत ठरणार नाहीं. या संधीस जपानमध्यें असलेले दे. भ रामभाऊ मंडलीक यांनीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना लिहिलेलीं तीन पत्रें प्रस्तुत लेखकाच्या अवलोकनांत आलेलीं आहेत. या तीन पत्रांपैकीं दुसरें पत्र तोकियोहून दि. ४-१०-१० रोजीं लिहिलेलें आहे. सावरकरांना फ्रेंच सरकारच्या स्वाधीन करावयाचें ठरलें तरी, हिंदी तुरुंगांतून व हिंदी पोलिसांच्या हातून सुरक्षित बाहेर येऊन सावरकर सुखरूपपणें फरान्सला पोंचतील कीं काय, अशी शंका व्यक्त करण्यापर्यंत श्री. मंडलीक यांच्या मनाची मजल गेली होती, हें पुढील उताऱ्यावरून स्पष्ट होत आहे :

The constitutional question arisen by Mr. Savarkar's escape may as we all hope, be decided satisfactorily by the two governments concerned; but, that does not mean that Mr. Savarkar will reach the shores of France, hale and alive! Indian jails are not exceptionally healthy places–epidemics so many times visit them and the clever C. I. D. of India are not ignorant of that fact.

'(सावरकरांनीं झुकांडी दिल्यामुळें निर्माण झालेल्या घटनात्मक प्रश्नाचा निर्णय त्या प्रकरणाशीं संबंध असलेल्या दोन्ही सरकारांकडून समाधानकारक रीतीनें सोडविला जाईल, अशीच आशा आपण करूं या! पण, सावरकर फ्रान्सच्या किनाऱ्या-पर्यंत धडपणीं–आणि जिवानिशीं–पोंचतीलच असा मात्र याचा अर्थ नव्हे! आरोग्यप्रद ठिकाणें म्हणून हिंदी तुरुंगांचा कांहीं चांगलासा लौकिक नाहीं–त्यांमध्यें सांथीचे रोग कितीतरी वेळां उद्भवतात! हिंदुस्थानांतल्या कुशल गुप्त पोलिसांना या गोष्टींची माहिती नसते; असें नाहीं). 'मन शंकी तें वैरी न शंकी' असा प्रकार झाल्यामुळें असो, 'अतिस्नेहः पापशंकी' या सत्य वचनाचें उदाहरण म्हणून असो अगर अन्य कांहीं कारणांमुळें असो, सावरकरांच्या सुरक्षिततेविषयीं अशी शंका व्यक्त करणारे श्री. मंडलीक दिनांक २०–११–१९१० रोजीं लिहिलेल्या पत्रांत हेग न्यायालयाकडे सावरकर-प्रकरण सोंपविणाऱ्या फ्रेंच सरकारबद्दल लिहितात :

I very much doubt the sincerity of the French government in this matter. The French government under the presidentship of M. Briand do not seem to be very alive to the grand traditions of the great republic, as

is evident from their treatment of the great republic, as is evident from their treatment of the Egyptian nationalists. In Mr. Savarkar's case, they could certainly have been more peremptory, if they had a mind to be so. They could certainly have asked the British Government to stop the trial of Mr. Savarkar that is vigorously going on at present in India and to remove him to a more healthy and decent place than the rotten Indian prison-house.

( या बाबतींत फ्रेंच सरकारला खरी तळमळ कितपत वाटत आहे याबद्दल मला फार संशय वाटतो. ब्रियां महाशयांच्या अध्यक्षीय कारकीर्दींत फ्रेंच सरकारला आपल्या लोकसत्तात्मक राष्ट्राच्या महनीय परंपरेचें फारसें जागृत स्मरण राहिलेलें नाहीं, असें त्या सरकारनें ईजिप्तमधील राष्ट्रवाद्यांना ज्या तऱ्हेनें वागविलें त्यावरून दिसतें. फ्रेंच सरकारची तशी इच्छा असती तर सावरकरांच्या बाबतींत जास्त आग्रह धरणें त्याला निश्चित शक्य झालें असतें. सध्यां सावरकरांवरील आरोपांच्या चौकशीचें काम हिंदुस्थानांत खूप जोरांत चालू आहे. हें काम थांबवा असें ब्रिटिश सरकारला सांगणें फ्रेंच सरकारला निश्चित शक्य होतें. हिंदी कारागृहासारख्या ओंगळ ठिकाणांतून काढून सावरकरांना अधिक आरोग्यप्रद व योग्य ठिकाणीं ठेवण्याबद्दलची मागणीहि फ्रेंच सरकारला करतां आली असती. )

ऑक्टोबर १९१० च्या आरंभाच्या सुमारास सावरकर-प्रकरण हेगच्या न्यायालयाकडे सोंपविण्यासंबंधींच्या वाटाघाटी संपल्या असाव्या. दि. २५-१०-१९१० रोजीं या बाबतींतला उभय राष्ट्रांमधलि करार पुरा होऊन त्यावर या राष्ट्रांच्या प्रतिनिधींच्या सह्या झाल्या. या करारान्वयें जें न्यायाधीश मंडळ नेमलें गेलें त्यांत पुढील पंडितांचा समावेश करण्यांत आला होता. बेल्जमचे भूतपूर्व पंतप्रधान बर्नार्ट ( M. Beernaert ) हे या न्यायसभेचे अध्यक्ष होते. नॉर्वेचे एक भूतपूर्व मंत्री ग्रॅम व हॉलंडच्या वरिष्ठ लोकसभेचे ( Second Chamber ) सदस्य लोहमन ( Jonkheer A. F. de Savornin Lohman ) हे त्रयस्थ राष्ट्रांचे प्रतिनिधि म्हणून न्यायमंडळावर नियुक्त झाले होते. ब्रिटनचे प्रतिनिधि म्हणून अर्ल ऑफ डेसर्ट यांची योजना करण्यांत आली होती व फ्रान्सच्या प्रतिनिधित्वाचा मान लुई रेनॉ ( Louis Renault ) यांना देण्यांत आला होता. इंग्लंडची बाजू या न्यायालयापुढें मांडण्यासाठीं परराष्ट्रीय कचेरींतल्या दोघा बड्या अधिकाऱ्यांची योजना करण्यांत आलेली होती व फ्रान्सची बाजू सजविण्याची जबाबदारी पॅरिस येथील एका प्रोफेसर महाशयांवर टाकण्यांत आली होती. हें न्यायाधीशमंडळ नेमण्याचा व सावरकर-प्रकरण त्या मंडळाकडे निर्णयासाठीं सोंपविण्याचा जो करार झाला तो पुढीलप्रमाणें होता :

* The Government of the French Republic and the Government of his Britanic Majesty, having agreed by means of an exchange of notes

* फ्रेंच व ब्रिटिश सरकार यांच्या दरम्यान ४ व ५ ऑक्टोबर १९१० रोजीं खलित्यांची देवाणघेवाण होऊन पुढील गोष्टी ठरल्या : मोरिया

dated October 4 and 5, 1910, to submit to arbitration on the one hand, the questions of fact and right raised by the arrest and the taking back on board the steamship Morea on July 8th, 1910 at Marseilles of the Indian Vinayak Damodar Savarkar who escaped from the boat on which he was a prisoner and, on the other hand, the claim of the Government of the Republic for the surrender of Savarkar, the undersigned duly authorised to that effect have agreed on the following arrangements :

ARTICLE 1 :—An arbitration tribunal composed as set forth below will be charged to decide the following question : Ought Vinayak Damodar Savarkar, in conformity with the rules of international law to be or not to be surrendered by the Government of his Britannic Majesty to the Government of the French Republic ?

ARTICLE 2 :—The arbitration tribunal will be composed of five arbitrators chosen from amongst the members of the permanent court at the Hague. The two contracting parties will come to an agreement as to the composition of the tribunal. Each of them shall have the right to nominate, as arbitrator, one of its nationals.

ARTICLE 3 :—On December 6th, 1910 each of the high contracting parties shall deposit, at the office of the Permanent Court, fifteen copies of its case together with duly certified copies of all papers and documents, which it intends to cite in the proceedings. The office will under-

---

आगबोटींतून हिंदुस्थानकडे कैदी म्हणून नेण्यात येत असलेले हिंदी गृहस्थ विनायक दामोदर सावरकर हे दि. ८-७-१९१० रोजीं त्या बोटींतून निसटले. त्यांना पकडण्यांत आलें व फिरून मोरिया बोटीवर नेण्यांत आलें. यामुळें उपस्थित झालेले वस्तुस्थितिविषयक व अधिकारविषयक प्रश्न मध्यस्थांपुढें मांडावे; त्याचप्रमाणें, सावरकरांना आपल्या स्वाधीन करण्याविषयीं फ्रेंच सरकारनें जी मागणी केली त्या बाबतींत त्या सरकारचा अधिकार काय हाहि मुद्दा त्रयस्थांपुढें मांडावा. हें ठरल्यावर, खालीं सह्या करणाऱ्या इसमांना या प्रकरणीं अधिकार देण्यांत आल्यावरून, त्यांच्या सहमतानें पुढील योजना ठरविण्यांत आली आहे :

कलम १ :—खालीं दिलेल्या तपशिलाप्रमाणें त्रयस्थांचें न्यायाधीशमंडळ नेमण्यांत येऊन त्या मंडळाला पुढील मुद्यांचा निर्णय ठरविण्याचा अधिकार देण्यांत यावा : आंतरराष्ट्रीय कायद्याच्या नियमांनुसार ब्रिटिश सरकारनें विनायक दामोदर सावरकर यांना फ्रेंच सरकारच्या स्वाधीन करायला पाहिजे कीं नको ?

कलम २ :—न्यायाधीश-मंडळांत पांच त्रयस्थांचा समावेश करण्यांत येईल. हेग येथील स्थायी न्यायालयाच्या सदस्यांमधून या पांच जणांची निवड करण्यांत येईल. हा करार करणाऱ्या उभय पक्षांची न्यायाधीश-मंडळाच्या घटनेबाबत एकवाक्यता व्हावी लागेल. या पक्षांपैकीं प्रत्येकाला या मंडळावर आपल्या राष्ट्राचा एक, प्रतिनिधि नियुक्त करण्याचा अधिकार असेल.

कलम ३ :—करार करणाऱ्या पक्षांपैकीं प्रत्येक पक्ष ६ डिसेंबर १९१० रोजीं स्थायी न्यायालयाच्या कार्यालयांत आपल्या पक्षाच्या समर्थनाच्या १५ प्रती सादर करील. चौकशीच्या वेळीं ज्या कागदपत्रांचा आधार घ्यावयाचा असेल त्या कागदपत्रांच्या सहीशिक्याच्या नकलाहि या प्रतींबरोबरच प्रत्येक पक्षानें सादर केल्या

take to forward them without delay to the arbitrators and the parties in the case, two copies being supplied to each of the parties while two copies will remain in the archives of the office. On January 17, 1911 the high contracting parties will deposit in the same way their counter cases with the documents in support thereof. The counter-cases may give occasion for replies which must be presented, within a fortnight of the handing in of the counter-cases. The period fixed under the present arrangement for the handing in of the cases, counter-cases and replies may be extended by mutual agreement between the high contracting parties

ARTICLE 4 :—The tribunal will meet at the Hague on February 14, 1911. Each party shall be represented by one agent charged to act as intermediary between it and the tribunal. The Arbitration tribunal shall be able, if it deemed it necessary, to request one or the other of the agents to furnish it with explanations, verbal or written to which the agent of the opposite party shall have the right of replying. It will have also the power to cite witnesses before it.

ARTICLE 5 :—The parties may employ either the English or French language. The members of the tribunal may employ at will either the French or the English language. The decision of the tribunal will be rendered in the two languages.

---

पाहिजेत. न्यायाधीश व विरुद्ध पक्ष यांना कागदपत्र तत्परतेनें पुरविण्याची जबाबदारी कार्यालय पार पाडील. प्रत्येक पक्षाला दोन प्रती देण्यांत येतील व दोन प्रती कार्यालयाच्या संग्रहालयांत राहतील. दि. १७-१-१९११ रोजीं प्रत्येक पक्ष वरील पद्धतीनेंच आपल्या बाजूचें उत्तर सादर करील व त्या उत्तराला आधारभूत असलेले कागदपत्रहि त्याच पद्धतीनें दाखल करील. या उत्तरांना प्रत्युत्तर देण्याची शक्यता निर्माण होईल. ती निर्माण झाल्यास, उत्तरें सादर केल्यापासून १५ दिवसांच्या अवधींत प्रत्युत्तरें दाखल करावीं लागतील. वरील सर्व गोष्टी सादर करण्यासाठीं जो कालावधि निश्चित करण्यांत आला आहे तो वाढवावयाचा असेल तर, उभय पक्षांच्या संमतीनें तो वाढवितां येईल.

**कलम ४** :—न्यायाधीश-मंडळाची बैठक हेग येथें १४ फेब्रुवारी १९११ रोजीं होईल. प्रत्येक पक्षाच्या वतीनें एक मुखत्यार उपस्थित राहील. आपला पक्ष व न्यायाधीशमंडळ यांच्या दरम्यान मध्यस्थी करण्याचा अधिकार या मुखत्याराकडे राहील. जरूर त्या मुखत्यारांकडून तोंडी अगर लेखी स्पष्टीकरण मागण्याचा अधिकार न्यायाधीशमंडळाच्या हातीं राहील. एका पक्षाच्या मुखत्यारानें स्पष्टीकरण सादर केल्यास दुसऱ्या पक्षाच्या मुखत्याराला त्याला उत्तर देण्याचा अधिकार मिळेल. साक्षीदार बोलावण्याचाहि अधिकार न्यायाधीशमंडळाला आहे.

**कलम ५**:—इंग्लिश व फ्रेंच या भाषांपैकीं कोणतीहि भाषा पक्षकारांना वापरतां येईल. न्यायाधीश-मंडळांतील सदस्यांनीं आपल्या इच्छेनुसार या भाषांपैकीं कोणतीहि भाषा वापरावी. न्यायाधीश-मंडळाकडून जो निर्णय देण्यांत येईल तो या दोन्ही भाषांत व्यक्त केला जाईल.

ARTICLE 6 :—The decision will have to be issued in the shortest possible time, thirty days at most, after the date of the meeting at the Hague or that of the handing in of the written explanations which will be furnished to it at its request. The time, however, may be prolonged, if the tribunal so demands, provided that the two chief contracting parties consent to such a step.

Done in London in two copies, the 25 th day of October, 1910.

**Paul Cambon**
**E. Grey**

या न्यायाधीश-मंडळांत बेल्जम, हॉलंड, नॉर्वे या युरोपांतल्या चिमुकल्या व दुय्यम दर्जाच्या राष्ट्रांचे प्रतिनिधी घेण्यांत आले; जर्मनी, इटली, रशिया अशा मोठ्या व बलशाली राष्ट्रांचे प्रतिनिधी या मंडळावर येऊं शकले नाहींत, ही गोष्ट मोठी सूचक आहे. न्यायाधीश-मंडळापुढील तंटा मुख्यतः इंग्लंड व फ्रान्स या दोन राष्ट्रांच्या अधिकाराविषयीं असला तरी, त्या तंटयाच्या निकालाचा भलावाईट परिणाम सावरकर यांना सोसावा लागणार होता. या दृष्टीनें सावरकरांना आपलें म्हणणें या न्यायाधीश-मंडळापुढें मांडण्याची सवड मिळणें अवश्य होतें. पण, ही सवड देण्यांत आली नाहीं.[1] कोणत्याहि न्यायसभेचें काम खुल्या दरबाराच्या पद्धतीनें चाललें म्हणजे त्या कामाच्या निःपक्षपातीपणाबद्दल संशय घेण्याची सवडच कोणाला मिळत नाहीं. हेगच्या न्यायसभेंत जें काम झालें त्यापैकीं फक्त पहिल्या व शेवटच्या दिवसाचें काम खुल्या दरबाराच्या पद्धतीनें झालें; बाकीचें सगळें काम पडद्याआड झालें! त्यामुळें, त्या कामाच्या चोखपणाविषयीं साशंकपणाची वृत्ति बाळगण्याला दुनियेला साहजिकपणेंच सवड मिळाली!

शुद्ध न्यायदानाच्या दृष्टीनें या गोष्टी गैर ठरतातच; पण, हेगच्या न्यायाधीशमंडळापुढें हें प्रकरण मांडण्याचा करार उभयपक्षांच्या संमतीनें झाल्यानंतर म्हणजे दि.२५–१०–१९१० नंतर—मुंबई येथें स्पेशल ट्रायब्यूनलपुढें सावरकरांवरील

---

कलम ६:—निर्णय शक्य तितक्या थोड्या वेळांत द्यावयाचा आहे. न्यायाधीशमंडळाची बैठक हेग येथें होईल त्या दिवसापासून, अगर, या मंडळानें लेखी स्पष्टीकरणाची मागणी केली तर तें स्पष्टीकरण ज्या दिवशीं सादर करण्यांत येईल त्या दिवसापासून ३० दिवस ही निर्णय देण्यासाठीं म्हणून ठरलेली जास्तींत जास्त मुदत मानण्यांत यावी. न्यायाधीश-मंडळानें तशी मागणी केली तर ही मुदत वाढविण्याला हरकत नाहीं; मात्र या मुदतवाढीला दोन्ही पक्षकारांची मान्यता मिळाली पाहिजे. २५–१०–१९१० रोजीं लंडन मुक्कामीं या कराराच्या दोन प्रती केल्या.

**पॉल कॅम्बॉ**
**ए. ग्रे**

१ जीन जॉरिसच्या सांगण्यावरून जीन लॉग (Jean Longuet) यांनीं सावरकरांची बाजू या न्यायाधीश–मंडळापुढें मांडली असें श्री. एम्. पी. टी. आचार्य यांनीं लिहिलें आहे—'कैसर-ई-हिंद' : १०–१–४३.

आरोपांच्या चौकशीचें काम चालू राहिलें, ही गोष्ट तर अत्यंत आक्षेपार्ह अशीच घडली. दि. २५-१०-१९१० रोजीं झालेल्या करारांत हेग येथील न्यायाधीश-मंडळाकडून होणाऱ्या कामकाजाचें संपूर्ण वेळापत्रकच देण्यांत आलें होतें. या वेळापत्रकानें आंखून घेतलेला कालावधि संपून जाईपर्यंत, मुंबई येथील चौकशीचें काम पूर्णपणें स्थगित करणें अवश्य होतें. हा कालावधि संपला असता, हेगचा निर्णय जगापुढें आला असता व सावरकरांना फ्रेंच सरकारच्या हवालीं करण्याची जबाबदारी ब्रिटिश सरकारवर नाहीं असें ठरलें असतें तर, त्यानंतर सावरकरांवरील आरोपांची चौकशी करून त्यांना योग्य ती शिक्षा देण्याला कांहींच प्रत्यवाय नव्हता! पण, प्रत्यक्ष प्रकार घडला तो अगदींच विपरीत घडला! सावरकर-प्रकरण हेगच्या न्यायालयाकडे सोंपविण्याचा करार झाला त्या दिवसापासून दोन महिन्यांनीं म्हणजे दि. २४-१२-१० रोजीं नाशिक कटाच्या खटल्याचा निकाल सांगण्यांत आला व सावरकरांना जन्मठेप काळ्यापाण्याचीं शिक्षा ठोठावून त्यांची सर्व मालमत्ता जप्त करण्याविषयींची पुरवणी त्या शिक्षेच्या कठोरपणाला जोडण्यांत आली! पहिला खटला-म्हणजे नाशिक कटाचा खटला दि.२५-१०-१९१०पूर्वीं सुरू झाला असल्याकारणानें तो तसाच चालविला यांत फारसें बिघडलें नाहीं, असा कोटिक्रम करून कोणी सरकारच्या खुनशीपणाला सौम्य स्वरूप देण्याचा प्रयत्न करील तर, सरकारनें तीहि सवड ठेविली नाहीं! १९११ सालच्या जानेवारी महिन्यांतच सरकारनें सावरकरांवरील दुसऱ्या आरोपाच्या चौकशीचें काम तांतडीनें सुरू केलें व हेग येथील न्यायालयांतील कामकाज सुरू होण्याआधीं पंधरा दिवस—म्हणजे दिनांक ३०-१-१९११ रोजीं—याहि खटल्याचा निकाल सांगण्यांत येऊन, सावरकरांना दुसरी जन्मठेपीची शिक्षा सांगण्यांत आली! हेग येथील न्यायाधीशमंडळानें आपल्या कामाला सुरुवात केली त्या वेळीं सावरकर हे साधे आरोपी राहिले नव्हते! 'भयंकर प्रकारचे गुन्हेगार' असा एका न्यायालयानें मारलेला शिक्का त्यांच्या नांवाला चिकटला होता. या प्रकारामुळें हेग येथील न्यायाधीशमंडळांतील न्यायमूर्तींचीं मनें कलुषित झालीं व सावरकरांना जो न्याय या ठिकाणीं एरव्हीं मिळाला असता तोहि मिळणें दुर्घट झालें, असा कोटिक्रम करणाराला निरुत्तर करणें सरकारच्या या प्रकरणांतल्या एकंदर वर्तनामुळेंच अशक्य झालें!

हेगच्या न्यायाधीश-मंडळापुढें सुरू व्हावयाचें कामकाज पूर्वसंकल्पानुसार दि. १४-२-१९११ रोजीं सुरू झालें नाहीं. सुरुवातीला एकदोन दिवस विलंब झाला तरी देखील, या मंडळानें दि. २४-२-१९११ रोजीं आपला निर्णय जाहीर करून टाकिला. हेग येथील कामकाज जवळजवळ महिनाभर चालेल, कदाचित् हा अवधि अपुराहि पडेल, अशी अपेक्षा होती. ती पार खोटी ठरून, सुमारें एक आठवड्याच्या अल्प अवधींतच हेग येथील कळसूत्री बाहुल्यांचा हा खेळ खलास झाला! जगभर पसरलेल्या टीकाकारांच्या डोळ्यांत धूळ फेंकण्यासाठींच हें नाटक उभें कर-

ण्यांत आलें असल्यामुळें, येथील कामांत योग्य तो कांटेकोरपणा व निःपक्षपातीपणा दिसला नाहीं आणि त्यामुळें सावरकरांना व भारतीय क्रांतिकारक पक्षाला फार मोठा अन्याय झाला, असें म्हटल्यावांचून गत्यंतरच नाहीं. इतकें सगळें असूनहि, सावरकरांना पकडण्याच्या कामीं व ब्रिटिश पोलिसांच्या हवालीं करण्याच्या कामीं बेशिस्तपणा झाला, असें या न्यायाधीश-मंडळाला मान्य करावेंच लागलें! दि. २४-२-१९११ रोजीं या न्यायाधीश-मंडळानें जो निर्णय दिला त्याच्या पूर्वार्धांत साक्षीपुराव्यांत निष्पन्न झालेल्या माहितीची कालक्रमवार मांडणी करण्यांत आलेली आहे. निर्णयांत समाविष्ट झालेली ही माहिती पुढीलप्रमाणें आहे :

* By letter dated June 29, 1910, the Commissioner of the Metropolitan Police informed the Director De La Surete Generale in Paris that Savarkar was about to be sent to India in order to be prosecuted for abetment of murder etc, and that he would be on board of the vessel Morea touching Marseilles on July 7 or 8.

In consequence of the receipt of this letter, the Ministry of the Interior informed the Prefect of the Bouches du-Rhone by telegram dated July 4, 1910 that the British police were sending Savarkar to India on board the Steamship Morea. The telegram stated that some revolutionary Hindus, then on the continent, might take advantage of this to further the escape of this foreigner and the Prefect was requested to take the measures necessary to guard against any attempt of that kind.

The Director De La Surete Generale replied by letter dated July 9, 1910 to the letter of the Commissioner of the Metropolitan Police stating that he had given the necessary instructions for the purpose of guarding against the occurrence of any incident during the presence of Savarkar at Marseilles.

---

* दि. २९-६-१९१० रोजीं लंडन शहराच्या पोलिस प्रमुखानें पॅरिसच्या पोलिसप्रमुखाला पत्र धाडलें. सावरकर याजवर खुनाला मदत केल्याचा वगैरे आरोप असून त्या आरोपांच्या चौकशीसाठीं त्यांना हिंदुस्थानला धाडण्यांत येत आहे आणि ७ अगर ८ जुलै रोजीं मार्सेलिस येथें थांबणाऱ्या 'मोरिया' बोटीवर सावरकर असतील अशी माहिती या पत्रांत देण्यांत आली होती. हें पत्र मिळाल्यामुळें फरान्सच्या अंतर्गत संरक्षणाबद्दल जबाबदार असणाऱ्या अधिकाऱ्यांकडून खालील अधिकाऱ्यांना असें कळविण्यांत आलें कीं, ब्रिटिश पोलिस सावरकरांना 'मोरिया' बोटीनें हिंदुस्थानला धाडीत आहेत. वरिष्ठ अधिकाऱ्यांनीं दि. ४-७-१९१० रोजीं तारेनें ही माहिती कळविली. युरोपांतल्या कांहीं देशांत असलेले कित्येक क्रांतिकारक हिंदु या परिस्थतीचा फायदा घेतील व सावरकरांना पळवून नेण्याला ते प्रवृत्त होतील, असाहि इषारा या तारेंत देण्यांत आला होता असा कांहीं प्रयत्न होईल हें ओळखून जरूर ती दक्षता घेण्याबद्दलची सूचनाहि या तारेंतच करण्यांत आली होती. पॅरिसच्या पोलिसखात्याकडून दिनांक ९-७-१९१० रोजीं लंडनच्या पोलिसखात्याला पत्र गेलें मार्सेलिस येथें बोटीचा मुक्काम असेल त्या अवधींत, सावरकरांच्या बाबतींत [illegible]

On July 7, the Morea arrived at Marseilles. On the following monr ing between 6 and 7, Savarkar swam ashore and then began to run. He was arrested by a brigadier of the France Maritime Gendarmeric and taken back to the vessel. Three persons who had come ashore from the vessel assisted the brigadier in taking the fugitive back. On July 9, the Morea left Marseilles with Savarkar on board.

It appears that the brigadier saw the fugitive, throw himself into the sea and swim to the quay. At the same moment, some persons from the ship, who were shouting and gesticulating, rushed ashore in order to pursue him. A number of people on the quay commenced to shout "Asrez-le." The brigadier arrested the fugitive after a pursuit of about 500 meters. The brigadier declares that he was altogether unaware of the identity of the fugitive but thought he was one of the crew who had possibly committed an offence on board. With regard to the assistance offered him by one of the crew and two Indian policemen, it appears that these men came up after the arrest had been effected and their intervention was only auxiliary to the action of the brigadier. The brigadier had seized Savarkar by one arm for the purpose of taking him back to the ship and the prisoner went peacefully with him. The brigadier did not release his hold till they reached the deck of the vessel. It would appear that the incident did not occupy more than a few minutes.

---

सूचना देण्यांत आल्या आहेत असें या पत्रांत म्हटलें आहे. दि. ७ जुलै रोजीं 'मोरिया' बोट मार्सेलिसला आली. दुसऱ्या दिवशीं सकाळीं ६ ते ७ च्या दरम्यान सावरकरांनीं पोहतपोहत किनारा गांठला व मग ते पळूं लागले. फ्रान्सच्या नाविक-दल-विभागांतल्या एका अधिकाऱ्यानें त्यांना पकडलें व परत बोटीवर आणलें. बोटीवरून किनाऱ्यावर आलेल्या तीन इसमांनीं सावरकरांना बोटीवर नेणाऱ्या या अधिकाऱ्याला मदत केली. दि ९ जुलै रोजीं सावरकरांना घेऊन 'मोरिया' बोट मार्सेलिसहून निघाली.

सावरकरांनीं समुद्रांत उडी टाकली आहे व ते पोहून धक्क्याकडे येत आहेत, ही गोष्ट फ्रेंच अधिकाऱ्यानें पाहिली, असें दिसतें. बोटीवरील कांहीं इसमहि याच वेळीं आरडाओरड करूं लागले व हातवारे करूं लागले. सावरकरांचा पाठलाग करण्यासाठीं हे इसमहि लगबगीनें किनाऱ्यावर आले. धक्क्यावरील कित्येक लोक 'चोर, चोर' म्हणून ओरडत सुटले. सुमारें ५०० मीटर पाठलाग केल्यावर फ्रेंच अधिकाऱ्यानें सावरकरांना पकडलें. पळत सुटलेला इसम नेमका कोण होता हें आपल्याला मुळींच माहीत नव्हतें, बोटीवर कांहीं तरी गुन्हा करून एकादा खलाशी पळत चालला आहे असा आपला ग्रह झाला, असें या फ्रेंच अधिकाऱ्याचें म्हणणें आहे. या फ्रेंच अधिकाऱ्याला बोटीवरील एका खलाशानें व दोघा हिंदी शिपायांनीं मदत केली, असें सांगण्यांत आलें आहे. त्या बाबतींत असें दिसतें कीं, सावरकरांना पकडल्यानंतर हीं माणसें येऊन दाखल झालीं. या माणसांनीं फ्रेंच अधिकाऱ्याला जी कांहीं मदत केली ती केवळ दुय्यम स्वरूपाची होती. सावरकरांना बोटीवर परत नेण्यासाठीं या अधिकाऱ्यानें त्यांचें मनगट धरलें होतें. सावरकर या अधि-

It is alleged that the brigadier was not ignorant of the presence of Savarkar on board the vessel and that his orders, like those of the French Police and Gendarmes were to prevent any Hindu from coming on board who had not got a ticket. These circumstances show that the persons on board in charge of Savarkar might well have believed they could count on the assistance of the French Police.

It is established that a Commissaire of the French Police came on board the vessel shortly after its arrival and in accordance with the orders of the Prefect placed himself at the disposal of the commander in respect of the watch to be kept. In consequence of this, the Commissaire was put in communication with the British police officer in charge of the prisoner The Prefect of Marseilles, as appears from the telegram of July 13, addressed to the Minister of the Interior stated that he had acted in this matter in accordance with the instructions given him by the Directeur-De-La-Surete Generale to make the necessary arrangements to prevent the escape of Savarkar.

साक्षीपुराव्याची अशी मांडणी केल्यावर, हेगच्या न्यायाधीशमंडळानें निर्णय म्हणून असें मत दिलें कीं, सावरकरांना फिरून फ्रान्समध्यें आणण्यानें विशेष फलनिष्पत्ति होण्यासारखी नाहीं. सावरकरांच्या मायदेशांतल्या सर्वश्रेष्ठ न्यायालयानें त्यांना अतिशय गंभीर स्वरूपाच्या गुन्ह्यांबद्दल दोषी ठरविलें असल्यामुळें तर, त्यांना फिरून फ्रान्समध्यें आणण्यांत कांहींच अर्थ उरलेला नाहीं, असेंहि मत या न्यायाधीश-मंडळानें व्यक्त केलें. आश्रयार्थी म्हणून येणाऱ्या परस्थांना फ्रान्स-

---

काऱ्याबरोबर निमूटपणें गेले. बोटीवर प्रत्यक्ष पोंचेपर्यंत या अधिकाऱ्यानें सावरकरांचें मनगट सोडलें नाहीं. हा सर्व प्रकार पुरा होण्याला कांहीं मिनिटांहून जास्त वेळ लागला नाहीं, असें दिसतें.

बोटीवर सावरकर आहेत या गोष्टीचें ज्ञान या फ्रेंच अधिकाऱ्याला होतें व तिकिटाशिवाय कोणीहि हिंदु बोटीवर येऊं पाहील तर त्याला अडविण्याच्या सूचना फ्रेंच पोलिसांना देण्यांत आल्या होत्या, तशाच त्या या अधिकाऱ्यालाहि देण्यांत आल्या होत्या, असें सांगण्यांत आलें आहे. ज्या अधिकाऱ्यांच्या ताब्यांत सावरकर होते त्या बोटीवरील अधिकाऱ्यांचा कोणता समज झाला असेल हें या परिस्थितीवरून उघड होतें. फ्रेंच पोलिसांची मदत आपल्याला मिळेल, असा विश्वास या अधिकाऱ्यांना वाटत असला पाहिजे.

'मोरिया' बोट मार्सेलिस बंदरांत येऊन पोंचल्यावर थोडक्या वेळानें एक फ्रेंच पोलिस अधिकारी बोटीवर आला व त्याला असलेल्या हुकुमान्वयें कप्तानाची भेट घेऊन पहाऱ्याची वगैरे व्यवस्था करण्याची आपली तयारी असल्याचें त्यानें कप्तानाला सांगितलें, हें सिद्ध झालेलें आहे. हें घडल्यामुळें, सावरकर ज्यांच्या ताब्यांत होते त्या ब्रिटिश पोलिस अधिकाऱ्यांची व फ्रेंच अधिकाऱ्याची गांठ घालून देण्यांत आली. मार्सेलिसच्या पोलिसप्रमुखानें दि. १३ जुलै रोजीं अंतर्गत व्यवस्थेचें खातें पाहणाऱ्या मंत्र्याला तार केली. तिच्यावरून असें दिसतें कीं, सावरकरांनीं पळून जाऊं नये म्हणून बंदोबस्त ठेवण्याविषयीं या पोलिसप्रमुखाला वरून ज्या सूचना मिळाल्या होत्या त्यांच्या अनुरोधानें तो वागत होता.

सारख्या देशांत आश्रय मिळण्याचा अधिकार आहे ही गोष्ट मात्र या न्यायाधीश मंडळानें तांत्रिक दृष्टया मान्य केली. आपल्या निर्णयाची कारणमीमांसा सांगतांना या न्यायाधीश-मंडळानें पुढील उद्‌गार काढिले :

* Whereas having regard to what has been stated, it is manifest that the case is not one of recourse to fraud or force in order to obtain possession of a person who had taken refuge in foreign territory, and that there was not in the circumstances of the arrest and delivery of Savarkar to the British Authority and of his removal to India anything in the nature of the violation of the Sovereignty of France and that all those who took part in the matter certainly acted in good faith and had no thought of doing anything unlawful.

Whereas in the circumstances cited above, the conduct of the brigadier not having been disclaimed by his chiefs before the morning of July 9, i. e., before the Morea left Marseilles, the British police might naturally have believed that the brigadier had acted in accordance with his instructions or that his conduct had been approved.

Whereas while admitting that an irregularity was committed by the arrest of Savarkar and by his being handed over to the British police there is no rule of international law imposing, in circumstances such as those which have been set out above, any obligatian on the Power which has in its custody a prisoner to restore him because of a mistake committed by the foreign agent who delivered him up to that Power.

---

* यापूर्वी निर्दिष्ट केलेल्या सर्व गोष्टी लक्षांत घेतल्या कीं, एक मुद्दा स्पष्ट होतो. परदेशच्या मुलुखांत आश्रय मिळविलेल्या इसमाला ताब्यांत घेण्यासाठीं कपटाचा अगर बलाचा आश्रय घेण्यांत आला, असें या प्रकरणांत घडलें नाहीं. सावरकरांना ज्या परिस्थितींत पकडण्यांत आलें, ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यांत आलें व हिंदुस्थानांत नेण्यांत आलें त्या परिस्थितींत फ्रान्सच्या सार्वभौमत्वाला बाधक असें कांहींच नव्हतें. ज्यांनीं ज्यांनीं या प्रकरणांत भाग घेतला ते सर्व लोक सद्‌बुद्धीनें वागले हें निश्चित ! कोणतीहि गैरकायदा गोष्ट करण्याचा या लोकांचा मानस नव्हता.

सावरकरांना पकडणाऱ्या फ्रेंच पोलिस अधिकाऱ्याचें वर्तन आपल्याला अमान्य आहे असें, 'मोरिया' बोटीनें दि. ९ जुलै रोजीं सकाळीं मार्सेलिस सोडलें तोंपर्यंत, त्याच्या वरिष्ठांनीं जाहीर केलें नव्हतें. त्यामुळें ब्रिटिश पोलिसांना स्वाभाविकपणें असें वाटलें असलें पाहिजे कीं, हा फ्रेंच पोलिस अधिकारी वरिष्ठांच्या सूचनांबरहुकूम वागत असला पाहिजे अगर त्याच्या वागणुकीला मागाहून मान्यता मिळाली असली पाहिजे.

सावरकरांना पकडणें व त्यांना ब्रिटिश पोलिसांच्या स्वाधीन करणें हे गैरवाजवी प्रकार झाले, हें आम्हांला मान्य आहे. पण, वर ज्या परिस्थितीचा निर्देश करण्यांत आला आहे तशा प्रकारच्या परिस्थितींत, एका राष्ट्राच्या ताब्यांत असलेला बंदिवान दुसऱ्या एका राष्ट्राच्या हस्तकानें चुकीनें आपल्या ताब्यांत दिला आहे म्हणून त्या बंदिवानाला त्या राष्ट्राच्या परत हवालीं करण्याची जोखीम त्या दुसऱ्या राष्ट्रावर आहे अशी जबाबदारी लादणारा कोणताहि नियम आंतरराष्ट्रीय कायद्यांत नाहीं.

हेगचा निकाल लागला त्या वेळीं सावरकर हे दोन जन्मठेपींची शिक्षा होऊन मुंबई येथील डोंगरीच्या कारागृहांत होते. हेगचा निकाल प्रतिकूल लागला ही बातमी सरकारी गायमुखांतून कळण्यापूर्वींच सावरकरांना कळलेली होती. हेगच्या आशेवर सावरकर अवलंबून नव्हतेच. झालेली शिक्षा पुरी भोगण्याची मनाची तयारी करून ठेवूनच ते वागत होते. हें खरें असलें तरी, त्या दारुण शिक्षेची मूर्तिमंत कल्पना मनांत उभी राहिल्यावर त्यांचेंहि मन किंचित् विषण्ण झालें.[1]

हेगचा हा विपरीत निकाल देतांना न्यायाधीशमंडळाची एकवाक्यता झालेली नव्हती असें 'लंडन टाइम्स' च्या हेग येथील वार्ताहरानें धाडलेल्या वृत्तांत स्पष्टपणें सांगितलेलें आहे. फरान्सतर्फे मांडण्यांत आलेले मुद्दे या निर्णयांत प्रायः उपेक्षिले गेले आहेत व या बाबतींत सर्व अधिकारी सद्बुद्धीनें वागले हा सारवासारव करणारा मुद्दा प्रामुख्यानें पुढें मांडण्यांत आला आहे, या गोष्टीचा निर्देश करण्याला हा वार्ताहर विसरला नाहीं. 'पोस्ट' नांवाच्या जर्मन वृत्तपत्रानें या निर्णयावर प्रतिकूल टीका केली. सावरकर-प्रकरणांतल्या खऱ्या मुद्याला या निर्णयानें बगल दिली आहे असें स्पष्ट मत या पत्रानें व्यक्त केलें. 'मँचेस्टर गार्डियन' पत्रानें असे उद्गार काढिले कीं, हेगचा निर्णय वाचून लोक आश्चर्यानें स्तिमित होऊन जातील! 'डेलीन्यूज'ची सडेतोड टीका तर विस्तारानें देण्यासारखी आहे. त्या पत्रानें लिहिलें :

This Judgment reduces the right of asylum to very narrow limits. According to the Judgment, to put the matter in its extreme form, a Prince Kropotkin might conceivably be kidnapped by Russian agents in collusion with British police and without the knowledge or consent of the British Government and no rule of international law could be invoked for his restoration. The decision serves to emphasise the urgent need for the establishment, as supplementary to the Arbitration Courts at the Hague, of a permanent court of international law from which not negative compromises but sensible, authoritative Judgments could be obtained

(आश्रयार्थ परदेशांत जाणाऱ्या माणसाला आश्रय मिळण्याच्या अधिकाराचा या निर्णयानें फार संकोच झालेला आहे. या निर्णयामुळेंच काय घडूं शकेल याचें कांहींसें एकांतिक स्वरूपाचें दिग्दर्शन करण्यासारखें आहे. रशियाच्या हस्तकांनीं ब्रिटिश पोलिसांशीं संगनमत केलें आणि त्यांनीं प्रिन्स क्रोपॉटकिनसारख्या एकाद्या गृहस्थाला इंग्लंडमधून लांबविला ही गोष्ट ब्रि. सरकारच्या संमतीनें वा माहितीनें झालेली नसली तरी, त्या गृहस्थाची परत मागणी करण्याच्या कामीं ज्या नियमाचा इंग्लंडला उपयोग होईल, असा नियम आंतरराष्ट्रीय कायद्यांत नाहीं, असा या निर्णयाचा अर्थ आहे. हेग येथील पंचायत-न्यायालयाला पुरवणी-वजा असणारें, आंतरराष्ट्रीय कायद्याचें, नित्य स्वरूपाचें न्यायालय स्थापण्याची जरुरी निकडीची आहे या गोष्टीचें महत्त्व ठळकपणें पटविण्याला या निर्णयाचा मोठा उपयोग झालेला आहे. असें नित्य

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. २.

स्वरूपाचें न्यायालय प्रस्थापित झालें तर तें अकरणात्मक व देवाणघेवाणीच्या स्वरूपाच्या निर्णयांऐवजीं युक्तिसंमत व प्रमाणभूत निर्णय देईल, अशी अपेक्षा आहे. )

इंग्लिश पार्लमेंटचे सभासद मि. वेजवुड यांनींहि या निर्णयाबद्दलची नापसंति स्पष्ट शब्दांत व्यक्त केली. सावरकरांनीं पॅरिस सोडून जाऊं नये, तसें करण्यानें ते अचानकपणें आपल्या शत्रूच्या ताब्यांत जात आहेत असा इषारा देणारे व सावरकरांना पकडण्यांत आलें हें कळल्यापासून, त्यांच्या मुक्ततेसाठीं शक्य ते सर्व प्रयत्न करणारे पं. शामजी कृष्णवर्मा यांना हेगचा हा निर्णय कळला तेव्हां दुःखहि वाटलें व संतापहि आला. त्यांच्या मनांतल्या या भावना पुढील लेखांशांत व्यक्त झाल्या आहेत :

The decision of the International tribunal at the Hague has shattered all faith in the maintenance of the rights of political refugees as ordinarily understood and it is sad to observe that the nations hitherto most conspicuous for their love of liberty are slow to recognise these rights when they are beset by political consideration. L' humanite was ofter all justified in finding that the Submission of L'Affaire to arbitration in the first instance was a tactical error on the part of France and a friend, who was a memeber of the British Parliament, assures us that the way in which France submitted her case ensured its failure, all the strongest grounds having been omitted.

( हेगच्या आंतरराष्ट्रीय न्यायालयानें दिलेल्या निर्णयामुळें एक फार अनिष्ट परिणाम घडून आला आहे. राजकीय स्वरूपाच्या आश्रयार्थी लोकांच्या अधिकारांच्या संगोपनाविषयीं ज्या सर्वसामान्य समजुती रूढ होत्या त्यांना या निर्णयामुळें जबरदस्त धक्का बसला असून त्या बाबतींतला लोकांचा विश्वास त्यामुळें डळमळला आहे. स्वातंत्र्याचा अभिमान बाळगणारीं म्हणून आजवर प्रामुख्य पावलेलीं राष्ट्रें अशा अधिकारांचा प्रश्न राजकीय विचारांत गुरफटलेला दिसला कीं,त्या अधिकारांना मान्यता देण्याला खळखळ करतात, हा अनुभव मोठ्या खेदानें नमूद करावा लागत आहे. सावरकर–प्रकरण त्रयस्थांकडे सोंपविण्यांत मुळांतच डाव–पेंचांच्या दृष्टीनें फ्रान्सची चूक होत आहे असें ' L' Humanite ' या पत्रानें त्याच वेळीं म्हटलें होतें. तें म्हणणें शेवटीं समर्थनीय ठरलें आहे. ब्रिटिश पार्लमेंटचा सभासद असलेल्या आमच्या एका मित्रानें आम्हांला खात्रीपूर्वक माहितीवरून असें कळविलें आहे कीं, फ्रान्सनें आपली बाजू ज्या तऱ्हेनें मांडली त्या तऱ्हेवरूनच ' फ्रान्स हरणार ' हें ठरून गेलें होतें; फ्रान्सच्या वतीनें मांडण्याजोगे अतिशय जोरदार मुद्दे अजिबात वगळण्यांत आले होते )

अशा तऱ्हेची कितीहि टीका झाली तरी ब्रिटिश सरकार त्या वेळीं त्या टीकेचा विचार करण्याच्या मनःस्थितींत नव्हतें. हेगचा हा निकाल जाहीर होऊन त्यावर प्रतिकूल टीकेची झोड उठली त्याबरोबर, सावरकरांना ५० वर्षें काळ्या पाण्याची शिक्षा देण्यांत आली या गोष्टीचाहि निषेध यूरोपांत वेगवेगळया देशांतल्या वृत्त-

पत्रांतून होऊं लागला. मुंबईंची ॲंग्लो-इंडियन वृत्तपत्रें सावरकरांना झालेली अमानुष शिक्षा हेगच्या निकालानें वज्रलेप झालेली पाहून हर्षनिर्भर झालीं व त्यांतल्या एकानें तर The rascal has at last met with his fate (या हरामखोराला शेवटीं चांगली अद्दल घडली) असे निर्लज्जपणाचे उद्गार काढण्यालाहि सोडलें नाहीं.[1] युरोपांतलीं अनेक पत्रें मात्र सावरकरांना 'हुतात्मा' ही बहुमानदर्शक पदवी लावून त्यांचा गौरव करण्यांत धन्यता मानीत होतीं.

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १३.

## प्रकरण १२ वें

# दोन जन्मठेपींची अमानुष शिक्षा

*Live and take comfort. Thou hast left behind
Powers that will work for thee air, earth and skies
There is not a breathing of the common wind
That will forget thee; thou hast great allies;
Thy friends are exultations, agonies
And love; and man's unconquerable mind.

—William Wordsworth

दिनांक २२--७--१९१० रोजीं सावरकरांना मुंबईहून नाशिकास नेण्यांत आलें व तेथें त्यांना अटकेंत ठेवण्यांत आलें. कामाबाईनीं तारेनें सुचविल्याप्रमाणें बॅ. बॅप्टिस्टा यांनीं सावरकरांची भेट घेण्याची खटपट केली; पण, मुंबईच्या पोलिस कमिशनरकडे व 'होम डिपार्टमेंट'च्या सेक्रेटरीकडे या बाबतींत केलेल्या अर्जांचा उपयोग झाला नाहीं. शेवटीं 'दत्तरी, फेरेरा अँड दिवाण' या सॉलिसिटर्स फर्ममार्फत नाशिकचे फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेट मि. मॉंटगॉमरी यांजकडे अर्ज धाडण्यांत आला. पहिल्या अर्जाला या मॅजिस्ट्रेट महाशयांनीं जें उत्तर धाडलें तें मोठें मासलेवाईक होतें. नव्या कायद्याप्रमाणें सावरकरांतर्फेचा वकील म्हणून त्यांना कोणास भेटूं देतां येत नाहीं, स्वत: सावरकरांनीं वकिलाची मदत पाहिजे असें कळविलेलें नाहीं, इत्यादि मुद्दे उपस्थित केल्यावर या महाशयांनीं असेंहि सांगण्याला सोडलें नाहीं कीं, या प्रकरणीं आम्हीं कामाबाईना ओळखीत नाहीं! हें ताठरपणाचें उत्तर आल्यावर 'दत्तरी, फेरेरा अँड दिवाण' यांनीं मॉंटगॉमरीसाहेबांना दुसरें पत्र धाडिलें. सावरकर यांचे सॉलिसिटर मि. व्हॉन बांजकडून त्यांच्या खटल्यासंबंधींचे सर्व कागदपत्र आमच्याकडे आले असून, आम्ही सावरकरांच्या कुटुंबातर्फे मुलाखत मागत आहों, असें या पत्रानें कळविण्यांत आलें होतें. फ्रेंच अधिकाऱ्यांनीं तुम्हांस परत फ्रान्समध्यें मागाविलें आहे असें सावरकरांना कळविण्यासाठीं बॅ. बॅप्टिस्टा हे त्यांची भेट घेऊं इच्छितात हीहि गोष्ट सदर पत्रांत नमूद

---

* शूर देशभक्ता! आपली जीवनयात्रा धीरानें कंठीत रहा. प्राणिसृष्टीला आधार देणारी पृथ्वी, सर्वांना व्यापून उरणारें आकाश, कशाहि स्थितींत स्वच्छंदानें खेळणारा वारा या शक्ती मागें ठेवून तूं कारावासांत जात आहेस. वाऱ्याची साधी झुळूक सळसळली तर तिलाहि तुझें विस्मरण होऊं शकणार नाहीं. तुझ्या मित्रपरिवारांत थोरमोठे समाविष्ट झाले आहेत. मनांत उद्‌भवणारीं अभिमानजन्य प्रस्फुरणें, भावनांतून निघणाऱ्या वेदना-संवेदना, सहानुभूतींतून स्रवणारें प्रेम-आणि या सर्वांहूनहि श्रेष्ठ असणारें अजय्य मानवी मन हे तुझे जिवलग मित्र आहेत.

करण्यांत आलेली होती. हा पत्रव्यवहार चालू असतांनाच सावरकरांना नाशिकच्या तुरुंगांतून येरवडयाच्या तुरुंगांत नेण्यांत आलें. ते या तुरुंगांत असतांना दिनांक १३–९–१९१० रोजीं त्यांची व बॅ. बॅप्टिस्टा यांची शेवटीं भेट झाली.

जॅक्सनच्या वधापासून सरकार कसें पिसाळल्यासारखें झालें आहे, कांहीं तरी भयंकर कट झालेले आहेत ही कल्पना अधिकाऱ्यांच्या मनांत मूळ धरून बसल्यामुळें आपल्या जिवलग आप्तेष्टांचे व सहकाऱ्यांचे कसे मनस्वी हाल केले जात आहेत, इत्यादि गोष्टी सावरकर युरोपांत असतांनाच त्यांना कळल्या होत्या. नाशिकला अटकेंत असतांना त्यांना या बाबतींतली माहिती पुष्कळच विस्तारानें कळूं शकली. आपल्या सहकाऱ्यांपैकीं कित्येकांचें धैर्य कसें गळून गेलें आहे, कित्येकजण माफीचे साक्षीदार कसे बनत आहेत इत्यादि हकीकती त्यांना आतां विस्तारानें कळूं लागल्या. अशा लोकांच्या मानसिक दौर्बल्यामुळें हानि होते हें खरें असलें तरी, त्यांना दूषणें देत बसण्यांत अर्थ नाहीं, परिस्थितीचा सर्व दृष्टींनीं विचार केला तर त्यांचें करणें क्षम्यहि समजावें लागेल हें सावरकर मनांत ओळखून होते. या सुमारास जपानमध्यें असलेले श्री. रा. ना. मंडलीक यांनीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना धाडिलेल्या पत्रांतला एक उतारा मागील प्रकरणांत देण्यांत आलेला आहे. सावरकरांची प्रस्तुत प्रकरणांतील विचारसरणी हुबेहूब वठाविणारा त्याच पत्रांतला आणखी एक उतारा या ठिकाणीं देण्यासारखा आहे. मुंबईच्या गोपाळराव पाटणकरप्रभृतींना किती तरी गोष्टी माहीत असून त्यांनीं तोंडावाटे ब्रहि काढला नाहीं याबद्दल त्यांना धन्यवाद देणारे श्री. मंडलीक नाशिक कटाच्या खटल्यांतील दुसऱ्या प्रकारच्या लोकांबद्दल म्हणतात:

I personally know some of the so-called accused in the Nasik Case. Many of them are really good, honest men who have worked sincerely for the cause in spite of so many troubles to themselves and to their family. Some of them were the last persons to be expected to make any confessions or give any information but they have actually made the confession and given the information required by the police, certainly not without aching hearts or with willingness.

(नाशिक प्रकरणांतले आरोपी म्हणून पुढें आलेले कांहीं इसम माझ्या प्रत्यक्ष परिचयाचे आहेत. त्यांतले पुष्कळजण खरोखर चांगले प्रामाणिक आहेत आणि स्वतःला व स्वतःच्या कुटुंबाला सोसावा लागलेला त्रास लक्षांत न घेतां त्यांनीं अंगीकृत कार्यासाठीं कळकळीनें कष्ट केले आहेत. त्यांतले कांहीं इसम कांहीं झालें तरी कबुलीजबाब देणार नाहींत अगर माहिती पुरविणार नाहींत, अशी अटकळ होती. पण, त्यांनीं कबुलीजबाब देऊन टाकिले आहेत व पोलिसांना हवी असलेली माहितीहि पुरविली आहे. असें करतांना त्यांचें मन व्यथित झालें असेल व त्यांनीं ही गोष्ट स्वखुषीनें केली नसेल, हें निश्चित!) तोकियोमध्यें असलेले श्री. मंडलीक हिंदी पोलिसांच्या कृपाप्रसादाला यापूर्वींच पात्र ठरलेले होते! आपल्याला इष्ट ती गोष्ट घडवून आणण्यासाठीं पोलिसखातें हव्या त्या मार्गाचा अवलंब करण्याला

मार्गेपुढें पहात नाहीं असा प्रत्यक्ष अनुभव श्री. मंडलीक यांना आलेला होता. दि. ४-१०-१९१० रोजीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना लिहिलेल्या पत्रांत या अनुभवाविषयींचें आपलें मत सांगतांना श्री. मंडलीक लिहितात :

I am sorry to say that my knowledge of the crooked ways of the Indian police does not allow me to be equally sanguine. There is no knowing where the Indian police might stop when they have set their hearts upon doing a certain thing. By hook or crook, they will carry out their object......I am unfortunately cognisant also with many instances of police monstrocities which all make me very much afraid of Mr. Savarkar's safety in the hands of the Nasik C. I. D, at the present moment A recent telegram from India says that some 48 new arrests have been made in connection with the Nasik Conspiracy Case. This development has taken place after Mr. Savarkar being placed in the hands of the Indian police.

( हिंदी पोलिसांच्या वाममार्गी वर्तनाची मला जी माहिती आहे तिच्यामुळें मी सावरकरांच्या भवितव्याबद्दल तुमच्याइतका आशावादी राहूं शकत नाहीं, हें लिहितांना मला दुःख वाटत आहे. एकादी गोष्ट करावयाची असें हिंदी पोलिसांच्या मनानें एकदां ठाम घेतलें म्हणजे ती गोष्ट घडवून आणण्यासाठीं ते काय करतील नि काय करणार नाहींत हें सांगतां येणार नाहीं. भल्याबुऱ्या कशाहि मार्गानें ते आपल्याला पाहिजे असलेली गोष्ट घडवून आणतील...पोलिसांच्या राक्षसी लीलांचा दुर्दैवानें मला परिचय आहे. त्यामुळें सध्यांच्या काळीं नाशिकच्या गुप्त पोलिसांच्या ताब्यांत असलेल्या सावरकरांच्या सुरक्षिततेबद्दल मला जबरदस्त शंका वाटते. हिंदुस्थानांतून आलेल्या अलीकडच्या एका तारेंत असें वृत्त आहे कीं, नाशिककटाच्या बाबतींत आणखी ४८ इसमांना पकडण्यांत आलें आहे. सावरकर हिंदी पोलिसांच्या हातांत सांपडल्यानंतर हा प्रकार घडून आला आहे. )

श्री. मंडलीक यांनीं तोकियोसारख्या ठिकाणाहून नाशिक कटाच्या खटल्यांत गुंतलेल्या आरोपींचें व त्यांना त्रास देणाऱ्या पोलिसांचें जें वर्तन केलें तें बरोबर होतें. या खटल्यांतल्या आरोपींनीं कोर्टांत जें वर्तन केलें अगर त्यांना शिक्षा देतांना न्यायमूर्तींनीं जे उद्गार काढले तेवढ्यांचा विचार करून त्यांच्या संबंधींचें मत कोणी बनवील तर तें मत चुकीचें ठरण्याचा पुष्कळसा संभव आहे. या आरोपींपैकीं कित्येक जण सुदैवानें अद्याप हयात असल्यामुळें, त्यांच्या वर्तनाची सगळी फोड करून सांगणें आजहि शक्य नाहीं. पण, सर्वसामान्य रीतीनें असें म्हणावयाला हरकत नाहीं कीं, या खटल्यांतल्या कांहीं आरोपींनीं जी थोडीफार माहिती सरकारी अधिकाऱ्यांना सांगितली तीहि प्रायः सद्हेतूनेंच सांगितली. या प्रकरणांत ज्यांचा पुष्कळच प्रामुख्यानें उल्लेख केला जाणार आहे ते श्री. गोपाळराव पाटणकर हे आतां हयात नाहींत. शिक्षा भोगीत असतांनाच ते १९१९ सालीं येरवड्याच्या कारागृहांत मरण पावले. त्यामुळें त्यांच्या वर्तनाची कांहींशी फोड करणें आज शक्य आहे. कै. गोपाळराव

पाटणकर यांनीं जी माहिती सांगितली ती अत्यल्प होती. त्यांनीं मनांत आणलें असतें तर आणखी कितीतरी माहिती त्यांना सांगतां आली असती, हा श्री. मंडलीक यांच्या पत्रांत व्यक्त झालेला अभिप्राय अगदीं बरोबर आहे. अजिबातच कानावर हात ठेवले तर निभाव लागणार नाहीं, थोडकीशी माहिती सांगितली तर वेळ निभावून नेतां येईल व आपल्या अनेक सहकाऱ्यांचा जीव बचावतां येईल, अशी खात्री वाटल्या-मुळेंच श्री. गोपाळराव पाटणकर यांनीं एवढी तरी माहिती सांगितली. गोपाळराव पाटणकर यांना पोलिसांनीं मुंबईस अटक केली त्या वेळीं मुंबईलगतच्या एका ठिकाणीं चालविण्यांत येत असलेल्या पिक्रिक ॲसिडच्या कारखान्यांतून ते नुकतेच परत आले होते. त्यांच्या अंगावरील कांहीं कपड्यांना पिक्रिक ॲसिडचे पिवळे डाग पडलेले होते. आपण कानावर अजिबात हात ठेवले तर पोलिस आपल्या अंगाला बिलगतील व पिक्रिक ॲसिडचें हें सगळें बिंग बाहेर येईल हें ओळखून, गोपाळरावजींनीं समय-सूचकपणानें पोलिसांना अल्पशी माहिती दिली व अनेक लोकांचे हाल वाचविले. गोपाळरावांच्या या वेळच्या सहकाऱ्यांपैकीं एक गृहस्थ पुढें सरकारी नोकरींत शिरले व आज ते पेन्शन घेऊन सुखानें कालक्रमणा करीत आहेत. गोपाळरावजींनीं हा समयसूचकपणा दाखविला नसता व पिक्रिक ॲसिडच्या कारखान्याचें बिंग बाहेर आलें असतें तर कितीतरी तरुणांना अंदमान पहावें लागलें असतें. या खटल्यांत ज्यांनीं कबुलीजबाब दिले त्यांच्या वर्तनावर आक्षेप घेण्याला प्रवृत्त होणाऱ्या आजच्या पिढींतल्या लोकांनीं या सर्व गोष्टी लक्षांत घेऊन मगच आपलें मत बनवावें, हें इष्ट आहे. या खटल्यांत माफीचे साक्षीदार म्हणून ज्यांनीं साक्षी दिल्या त्यांनाहि कमी प्रतीचे लेखण्यापूर्वीं सध्यांच्या काळांतल्या लोकांनीं फार विचार केला पाहिजे.

नाशिक येथें तुरुंगांत असतांना सावरकरांना आपल्या गैरहजेरींत घडलेल्या अनेक गोष्टी कळल्या. 'अभिनव भारता'च्या नाशिक येथील मंडळींत मतभेद कसे व कां झाले, या मतभेदांमुळें मूळची संस्थेंतली मंडळी भिन्नभिन्न गटांनीं काम कशी करूं लागली, अनंत कान्हेरे यांनीं आपलें नाव व गांव सांगूं नये—जरूरच पडली तर त्यांनीं आपण युक्तप्रांतांतले कोणी तरी परदेशी आहोंत, असें सांगावें—हें आगाऊ ठरलें असतांना, कान्हेरे यांनीं स्वतःचें नांवगांव कां सांगितलें, कान्हेरे यांचे तोंडून औरंगाबाद या ठिकाणाचें नांव कळतांच जोशी व अंकुशकर यांना अटक कशी करण्यांत आली, वगैरे अनेक गोष्टी त्यांना नाशिक येथील वास्तव्यांत कळल्या. पोलिस खात्यांतल्या कित्येक संत-महंतांनीं कधीं गोडीनें वागून तर कधीं रुद्रावतार धारण करून आपल्या अल्पवयी सहकाऱ्यांपैकीं कांहींना कसें गुंगाविलें, ही हकीकत त्यांना कळली. आपण आतां सरकारच्या हातीं सांपडल्यामुळें, सरकार आपल्याला कमालीची शिक्षा देणार हें त्यांनीं पक्केपणीं ओळखलें होतें. त्यामुळें त्यांनीं आपल्या सहाभियुक्तांपैकीं ( co-accused ) अनेकांना जो सल्ला दिला तो लक्षांत ठेवण्यासारखा आहे. जास्तींत जास्त जबाबदारी माझ्यावर ढकलल्यानें ज्यांच्या

दोषांचें स्वरूप सौम्य होईल व ज्यांची शिक्षा कमी होईल अगर टळेल, त्यांनीं माझ्या-वर शक्य ती सर्व जबाबदारी टाकून आपला मार्ग मोकळा करून घ्यावा, असा त्यांनीं आपल्या सहकाऱ्यांना दिलेल्या सल्ल्याचा आशय होता. सावरकरांना नाशिकच्या तुरुंगांत आणून ठेवल्यापासून पुढील महिना दीड महिना पोलिसांच्या कारावासांत गेला. खटल्यांतील सरकारी पुराव्याची जुळवाजुळव करण्याची या काळांत पोलिसांनीं शर्थ केली. नाशिकचे फर्स्टक्लास मॅजिस्ट्रेट मि. मॉंटगॉमरी यांनीं सावरकर व त्यांच्या बरोबरचे इतर आरोपी यांच्यावरील आरोपांची प्राथमिक चौकशी करून त्यांच्या वरील खटला ' कमिट ' केला. नव्यानेंच केलेल्या कायद्याच्या आधारें सरकारनें या आरोपींची चौकशी करण्यासाठीं मुंबई हायकोर्टाचे सर न्यायाधीश सर बेसिल स्कॉट, न्यायमूर्ति नारायणराव चंदावरकर व न्यायमूर्ति हीटन अशा तिघांचें खास न्यायाधीश मंडळ ( Special Tribunal ) नेमलें. गुरुवार दिनांक १५–९–१९१० रोजीं या न्यायाधीश मंडळापुढें सावरकर व त्यांचे सहाभियुक्त यांच्यावरील खटल्याचें काम मुंबई हायकोर्टाच्या इमारतींत सुरू झालें. दिनांक १३–९–१० रोजीं बॅ. बॅप्टिस्टा यांनीं येरवडा तुरुंगांत सावरकरांची भेट घेतली. यानंतर लागलीच सावरकरांना येरवड्याहून हलवून मुंबईस नेण्यांत आलें व डोंगरीच्या तुरुंगांत ठेवण्यांत आलें.

'स्पेशल ट्रायब्यूनल' पुढें एकंदर तीन खटले चालावयाचे होते. यांपैकीं पहिल्या खटल्यांत सावरकरांसकट ३८ आरोपी होते, दुसऱ्यांत सावरकरांचे बरोबर आणखी एकच आरोपी होता व तिसरा खटला एकट्या सावरकरांवरच होता. दिनांक २७–९–१० रोजीं स्पेशल ट्रायब्यूनलपुढें काम चालू असतां, सरकारतर्फे बादशहाविरुद्ध युद्ध करण्याचा आरोप काढून घेण्यांत आला, यामुळें दुसरा खटला या अवस्थेतच नाहींसा झाला. पहिल्या खटल्याचें काम दि. २२–१२–१९१० रोजीं संपलें व त्यानंतर न्यायाधीश मंडळानें निकाल सांगितला. सव्वातीन महिने चाललेल्या या खटल्याचें प्रत्यक्ष काम ६९ दिवस चाललें होतें व न्यायाधिशांनीं ७० व्या दिवशीं खटल्याचा निकाल सांगितला. या खटल्यांतल्या आरोपींपैकीं शंकर बळवंत वैद्य, विनायक सदाशिव बरवे व विनायक काशिनाथ फुलंब्रीकर या तीन आरोपींना खटला चालू असतांनाच दोषमुक्त ठरवून सोडून देण्यांत आलें होतें. या खटल्यांत एकंदर सुमारें ३०० साक्षीदारांच्या साक्षी झाल्या. काशिनाथ हरी अंकुशकर, दत्तात्रय पांडुरंग जोशी, वा. रा. कुलकर्णी व चतुर्भुज असे चौघेजण माफीचे साक्षीदार बनले होते व त्यांच्या साक्षीनें ' टाइप ' केलेलीं दोन हजारवर पानें भरलीं होतीं.

खटल्याच्या कामानें व्यापलेला दीर्घ काळ, साक्षीदारांची संख्या, आरोपींना ठोठावण्यांत आलेल्या जबर शिक्षा इत्यादि अनेक दृष्टींनीं अपूर्व ठरलेल्या या खटल्याचें काम गुरुवार दिनांक १५–९–१० रोजीं सुरू झालें. त्या वेळचा न्यायालयाभोंवतालचा व न्यायालयांतला एकंदर थाट अपूर्व होता. हायकोर्टाच्या ज्या बाजूला त्या वेळीं

नॅशनल बँकेची कचेरी होती, त्या बाजूला पन्नास पोलिसांची तुकडी मुद्दाम आणून ठेविली होती. हायकोर्टाजवळ तर निरनिराळ्या वाटांवरहि पोलिसांचा सक्त पहारा ठेवलेला होता. मुंबईचे पोलिस कमिशनर हे जातीनें हायकोर्टांत हजर होते. कोर्टांत प्रेक्षक म्हणून येण्याची नागरिकांना बंदी करण्यांत आलेली होती. एवढा महत्त्वाचा खटला चालावयाचा असूनहि, सर्व वृत्तपत्रांच्या प्रतिनिधींना कोर्टांत, प्रवेश देण्यांत आलेला नव्हता. 'टाइम्स ऑफ इंडिया' 'सांज वर्तमान' व 'इंदु-प्रकाश' एवढ्याच वृत्तपत्रांच्या प्रतिनिधींना खटल्याचें प्रतिवृत्त घेण्याची मुभा देण्यांत आली होती. बॅरिस्टर व वकील, आरोपी, न्यायमूर्ती, मोजक्या वृत्तपत्रांचे वार्ताहर व बंदोबस्तासाठीं बोलावलेले पोलिस यांच्याशिवाय चिट्पाखरूंहि कोर्टांत फिरकूं नये, अशी दक्षता बाळगण्यांत आलेली होती.

आरोपींची संख्या बरीच मोठी असल्यामुळें नेहमींचा पिंजरा त्यांना पुरण्यासारखा नव्हता; म्हणून गॅलरीसारखा, भोंवतालीं भक्कम कठडा असलेला मोठा पिंजरा मुद्दाम तयार करण्यांत आलेला होता. दहा वाजण्याच्या सुमारास आरोपींना कैद्यांच्या गाड्यांतून हायकोर्टांत आणल्यावर, त्यांना या पिंजऱ्यांत सोडण्यांत आलें. या पिंजऱ्यांत बिनपाठीचीं बाकें ठेवलेलीं होतीं. त्यांच्यावर आरोपी बसले. आरोपींच्या प्रत्येक रांगेच्या शेवटीं पोलीस उभे करण्यांत आले. आरोपींचे पोषाख घरगुती पद्धतीचेच होते आणि खटल्याचें काम सुरू होईपर्यंत ते आनंदी वृत्तीनें आपापसांत बोलत होते.

न्यायमूर्ती न्यायासनावर अधिष्ठित होण्यापूर्वीं थोडा वेळ पोलिसांच्या सहवासांत सावरकर कोर्टांत आणिले गेले. त्यांचा मार्सेलिसचा उद्योग सर्वांच्या स्मरणांत अगदीं ताजा असल्यामुळें, निसटून जाण्याची संधि त्यांना मिळूं नये यासाठीं विशेष खबरदारी घेण्यांत आली होती. त्यांच्या तोंडावर हास्य झळकत होतें व त्यांच्या अंगावरील विलायती पद्धतीचा पेहेराव त्यांना शोभून दिसत होता. सावरकर पिंजऱ्यांत येतांच त्यांच्या सहकाऱ्यांनीं व सहाभियुक्तांनीं त्यांच्या सन्मानार्थ सहजस्फूर्तीनें टाळ्या वाजविल्या व पुढारी म्हणून त्यांच्याबद्दल मनांत वसत असलेला आदर त्यांनीं व्यक्त केला. इतकीं वर्षें लोटल्यावर, इतके अनुभव आल्यावर आणि इतकीं दिव्यें अनुभवावीं लागल्यावर आपल्या पूर्वसहकाऱ्यांनीं व मित्रांनीं आपल्याविषयींचा आदरभाव कायम ठेविला आहे हें पाहून सावरकरांना क्षणभर धन्यता वाटली असली, तर ती क्षम्यच आहे. इतक्या दीर्घकालानंतर सावरकर आपल्या मित्रांपैकीं कोणाकोणाला नेमके ओळखतात हें पाहण्याचा मौजेचा कार्यक्रम सुरू झाला. सावरकरांनीं सर्व मित्रांना सहज ओळखलें; पण, त्यांचा धाकटा भाऊ बाळ याला ओळखणें मात्र त्यांना बरेंच अवघड गेलें; कारण, मधल्या चारपांच वर्षांत बाळाच्या शरीरयष्टींत व तोंडावळ्यांत चांगलाच पालट झाला होता! या मौजेच्या कार्यक्रमानंतर बाळ सावरकर हे आपल्या थोरल्या भावाला कडकडून भेटले. सर्वांचे डोळे भरून आले; पण

पोलिसांना ही बंधुभेट सहन झाली नाहीं! सावरकर आपल्या जुन्या स्नेह्यांशीं गप्पा-गोष्टी करण्यांत रंगून गेले. या गप्पांत ते इतके तन्मय झाले कीं, पुढें कोर्टाचें काम-काज सुरू होऊन वकिलांचीं भाषणें चालू झालीं तरीहि त्यांच्या या गप्पांत खंड पडला नव्हता. अशाहि प्रसंगीं सावरकरांच्या तोंडावर झळकत असलेलें हास्य, त्यांच्या चेहऱ्यावर पसरलेलें बुद्धिमत्तेचें तेज व त्यांच्या वागण्यांत प्रतिबिंबित होत असलेला त्यांच्या वृत्तींतला धीरोदात्तपणा या गोष्टींचें अवलोकन केल्यावर, सावरकरांची इतर आरोपींशीं मनोमन तुलना करणाऱ्या एकाद्या रसिक वार्ताहराला अगर न्यायमूर्ति चंदावरकरांसारख्या एकाद्या पंडिताला ' गोपांत गोप भासे कृष्ण, परि नयेचि पाहतां वीट ' या पंतोक्तीचें सहज स्मरण झालें असलें तर त्यांत आश्चर्य काय ?

या खटल्यांत सावरकरांव्यतिरिक्त जे ३७ आरोपी होते त्यांतल्या तिघांना खटला चालू असतांनाच मध्यंतरीं दोषमुक्त ठरविण्यांत आलें, हें वर सांगितलेंच आहे. या तिघांशिवाय जे ३४ आरोपी उरले त्यांचीं नांवें दामोदर महादेव चंद्रात्रे, पुरुषोत्तम लक्ष्मण दांडेकर, विनायक काशिनाथ गायधनी, विष्णु गणेश केळकर, नारायण दामोदर सावरकर, काशिनाथ दाजी टोणपे, रामचंद्र बाबाजी काथे, गोपाळ कृष्ण पाटणकर, गोपाळ गोविंद धारप, सखाराम दादाजी गोऱ्हे, विनायक वासुदेव मनोहर, गोविंद सदाशिव बापट, विष्णु महादेव भट, त्रिंबक गंगाधर मराठे, पुरुषोत्तम वामन गोखले, केशव श्रीपत चांदवडकर, श्रीधर वासुदेव शिधये, हरी अनंत थत्ते, कृष्णाजी गोपाळ खरे, त्रिंबक विनायक जोग, विनायक गोविंद तिखे, व्यंकटेश परशुराम नागपूरकर, गंगाराम रूपचंद मारवाडी, वामन काशिनाथ पाळंदे, दामोदर चिंतामण परांजपे, रघुनाथ विद्याधर भावे, शंकर पांडुरंग महाजन, अनंत विष्णु कोनकर, रघुनाथ चिंतामण आंबडेकर, विश्वास बळवंत डावरे, मुकुंद पांडुरंग मोघे, केशव गणेश परांजपे, बळवंत रामचंद्र बरवे व सखाराम रघुनाथ काशीकर अशीं होतीं. फिर्यादीतर्फे काम चालविण्यासाठीं ॲडव्होकेट जनरल मि. जार्डिन, मि. वेल्डन, मि. वेलिणकर व मि. निकोल्सन हे नियुक्त करण्यांत आले होते व वेगवेगळ्या आरोपींतर्फे मि. रांगणेकर, बॅ. गोविंदराव गाडगीळ, बॅ. चित्रे व बॅ. जोसेफ बॅप्टिस्टा हे काम पहात होते.

दिनांक १५ सप्टेंबर रोजीं खटल्याच्या कामाला आरंभ झाला. ॲडव्होकेट जनरल मि. जार्डिन यांनीं छोटेंसें भाषण करून ' मित्रमेळया 'च्या स्थापनेपासून १९०९ ते १९१० सालापर्यंत घडत गेलेल्या अनेक गोष्टींची सांखळी कशी गुंफतां येते हें थोडक्यांत सांगितलें. तिन्ही खटल्यांचा निकट संबंध असल्यामुळें ते एकदम चालावे म्हणजे व्यर्थ चर्वितचर्वण होणार नाहीं व कालापव्ययहि होणार नाहीं, असें त्यांनीं सुचविलें. तिन्ही खटले एकदम चालविण्याच्या या सूचनेला आरोपींच्या सर्व वकिलांनीं हरकत घेतली. अवश्य ते सर्व कागदपत्र आपल्याला अद्याप पहावयास मिळाले नाहींत असें सांगून, सर्व वकिलांनीं मुदतीची मागणी केली. बॅ. बॅप्टिस्टा यांनीं

असें सांगितलें कीं, सावरकर यांच्या खटल्यासंबंधींचे सर्व कागदपत्र माझ्या अद्याप हातीं आलेले नाहींत; त्यांच्यावरील खटला 'कमिट' करण्यांत आला अशा आशयाचा हुकुमहि अद्याप मला मिळालेला नाहीं, कालपरवांपर्यंत त्यांची माझी भेटहि होऊं शकली नाहीं व खटला आज निघणार नाहीं अशीच सावरकरांचीहि समजूत होती, असें मला आढळून आलें. हीं सर्व कारणें सांगून बॅ. बॅप्टिस्टा यांनींहि काम स्थगित होण्याबद्दलची विनंति केल्यावर, न्यायमूर्तींनीं दिनांक २६ पर्यंत खटल्याचें काम पुढें ढकललें.

सोमवार दिनांक २६–९–१० रोजीं खटल्याचें काम सुरू झाल्यावर बॅप्टिस्टा यांनीं सावरकर यांच्यातर्फे न्यायालयाला एक विनंति केली. इंग्लंड व फ्रान्स या देशांच्या सरकाराकडे सावरकरांसंबंधींचा प्रश्न अर्जद्वारें विचारास पाठविण्याची सवड मिळावी, असा या विनंतीचा आशय होता. ही विनंति न्यायालयानें अमान्य ठरविली. सर्व आरोपांची व आरोपींची चौकशी एकत्र होऊं नये असा मुद्दा बॅ. बॅप्टिस्टा यांनीं मांडला व बॅ. चित्रे, सेटना, रांगणेकर प्रभृतींनीं त्याला पाठिंबा दिला. ही चर्चा चालू असतांना न्यायमूर्तींनीं सावरकरांचें या मुद्या-वरील म्हणणें समजून घेण्याचा प्रयत्न केला. या खटल्याच्या चौकशीशीं कोणताहि संबंध ठेवण्याची माझी इच्छा नसल्याकारणानें या प्रश्नाचें उत्तर मला देतां येत नाहीं, असें सावरकर म्हणाले. सर्व आरोपींवर असलेल्या आठ आरोपांची चौकशी एकत्रच करण्याचा आपला मानस असल्याचें न्यायालयानें सांगितलें. चौकशी करण्याच्या बाबतींत कोर्टाला मिळालेल्या अधिकाराची व्याप्ति, कट कोठेंकोठें झाला हें फिर्यादीपक्षातर्फे सांगितलें जाण्याची आवश्यकता इत्यादि, हे बॅ. बॅप्टिस्टा यांनीं उपस्थित केले. या मुद्यांना अॅडव्होकेट जनरल उत्तर देत होते तेव्हां, 'कट केला म्हणजे कोणतीं विशिष्ट कृत्यें केलीं तें सांगा' असें सरन्यायाधीशमहाशय यांनीं सांगि-तलें. या प्रश्नाचें तावडतोब उत्तर देण्याची जॉर्डिनसाहेबांची तयारी नसल्यामुळें, कोर्टाचें काम दुसऱ्या दिवसापर्यंत स्थगित करण्यांत आलें.

दिनांक २७ रोजीं या मुद्याचें सरकारपक्षाचें म्हणणें ऐकून घेतल्यावर, सर न्यायाधीशसाहेबांनीं आरोपींतर्फे मांडण्यांत आलेले मुद्दे रद्द ठरविले. बादशहाविरुद्ध प्रत्यक्ष युद्ध केलें हा आरोप सरकारतर्फे काढून घेण्यांत आला. बादशहाविरुद्ध युद्ध करण्याचा प्रयत्न करणें, त्या उद्देशानें कट करणें, बादशहाचें राज्य नष्ट करण्याच्या उद्देशानें कट करणें, मुंबई सरकारास व हिंदुस्थान सरकारास धाक दाखविण्याकरितां कट करणें, बादशहाविरुद्ध युद्ध करण्याच्या हेतूनें हत्यारें व दारूगोळा जमा करणें वगैरे आरोप आरोपींवर शिल्लक राहून त्यांच्या चौकशीच्या सुरुवातीचें काम म्हणून अॅडव्होकेट जनरल यांनीं सरकारची बाजू मांडण्याला प्रारंभ केला. दिनांक २७ रोजीं सुरू झालेलें मि. जार्डिन यांचें हें भाषण त्या दिवशीं अपुरेंच राहिलें. दिनांक २८ रोजीं हें भाषण पुरें झाल्यावर पब्लिक प्रॉसिक्यूटर मि. निकोल्सन यांची सर-

कारी मंजुरीविषयीं साक्ष झाली. सरकारतर्फेचे दुसरे साक्षीदार रघुनाथ व्यंकटेश गोसावी यांची सरतपासणी याच दिवशीं झाली. गोसावी हे 'अभिनव भारत' संस्थेच्या स्थापनेपासून कांहीं वर्षे त्या संस्थेचे सदस्य होते असें भासवून, सदर संस्थेचे उद्देश, तिची कार्यपद्धति इत्यादि मुद्यांविषयींची भरपूर माहिती त्यांच्या तोंडून काढून घेण्याचा सरकारी वकिलांनीं प्रयत्न केला. आरोपींतर्फेच्या वकील मंडळानेंहि त्यांची कसून उलटतपासणी करून त्यांना चांगलेंच छेडलें. आरोपी गंगाराम रूपचंद यानें दिनांक ३० रोजीं स्वतःच कांहीं प्रश्न गोसावी यांना विचारले. दिनांक ३० रोजीं या साक्षीदाराची साक्ष संपण्याच्या सुमारास, साक्षीदाराला कांहीं विचारावयाचें असल्यास विचारा असें कोर्टानें सावरकरांना सुचविलें. तेव्हां सावरकर उभे राहून म्हणाले :

*फ्रान्सनें माझें रक्षण करावें अशी माझी हक्काची मागणी आहे. फ्रेंच राष्ट्राच्या इतिहासांत स्वातंत्र्य, समता व बंधुता या तत्त्वत्रयीची परंपरा प्रस्थापित झालेली असल्यामुळें, त्या देशांत मला आश्रय मिळेल अशा विश्वासानें मी तेथें गेलों. पण, ब्रिटिश शिपायांनीं जबरदस्तीनें पकडून मला परत आणलें. मी फ्रान्सच्या इभ्रतीवर भरंवसा टाकून आहें आणि ब्रि. सरकार मला फ्रान्सला पाठवील, अशी मला आशा आहे. तेव्हां मजवरील खटल्याचें काम या कोर्टाच्या अधिकाराच्या बाहेरचें असून मी या खटल्याशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवूं इच्छीत नाहीं.*

सावरकरांच्या या उत्तरानंतर सरकारपक्षाचा पुढचा साक्षीदार, नाशिक येथील पोलिस हेड कॉन्स्टेबल अमरसिंग सखारामसिंग याची साक्ष झाली. या साक्षीदाराची उलट तपासणी चालली असतांना बॅ. बॅप्टिस्टा यांनीं मार्सेलिस येथें सावरकरांना करण्यांत आलेली अटक बेकायदा असल्याबद्दलचा मुद्दा उपस्थित केला; पण, न्यायमूर्तीनीं तो मुद्दा गैरलागू ठरविला. धनाप्पा सिद्राप्पा आळवे या साक्षीदाराची साक्ष चालू असतांनाच दि. ३०-९-१० चें कोर्टाचें काम संपलें. शनिवार दि. १-१०-१० रोजीं कोर्टाच्या कामाला प्रारंभ झाल्यावर, सर न्यायाधीश यांनीं एक्स्ट्रॅडिशन ॲक्टान्वयें उपस्थित होणाऱ्या प्रश्नांची चर्चा अगोदर करणें श्रेयस्कर असल्याबद्दलचें आपलें मत व्यक्त केलें. ही चर्चा चालू असतांना सर न्यायाधीश यांच्या सूचनेवरून सावरकर यांना बॅरिस्टरांच्या टेबलाजवळ खुर्ची देण्यांत आली. 'तुम्ही कायद्याचा अभ्यास केला आहे काय' या सरन्यायाधीशांच्या प्रश्नाला सावरकरांनीं होकारार्थी उत्तर दिल्यावर, कोर्टाकडून त्यांना क्रि. प्रो. कोडची एक प्रत देण्यांत आली. ॲडव्होकेट जनरल साहेबांनीं या चर्चेतलें आपलें म्हणणें पुढें मांडल्यावर 'तुम्हांला या मुद्यावर कांहीं म्हणावयाचें आहे का?' असा प्रश्न कोर्टानें सावरकरांना विचारला. 'माझी सर्व भिस्त आंतरराष्ट्रीय कायद्यावर असल्यामुळें मला फ्रान्समध्यें परत धाडण्यांत आलें पाहिजे असें माझें म्हणणें आहे व त्यामुळें या मुद्यावर मी बोलूं इच्छीत नाहीं,' असें उत्तर सावरकरांनीं दिलें. या मुद्यावरील

आपलें म्हणणें बॅ. बॅप्टिस्टा यांनीं सोमवारीं मांडावें असें ठरून, वाळवे या साक्षीदाराची साक्ष घेण्याचें काम पुढें सुरू झालें. या साक्षीदाराची सरतपासणी, उलटतपासणी व फेरतपासणी हे सर्व प्रकार या दिवशीं पुरे झाले व विठ्ठल दत्तात्रय पेठकर, या साक्षीदाराची साक्ष चालू झाल्यावर कोर्टाचें या दिवसाचें काम समाप्त झालें.

सोमवार दिनांक ३ ऑक्टोबर रोजीं चौकशीचें काम सुरू झाल्याबरोबर बॅ. बॅप्टिस्टा यांनीं सावरकरांच्या तर्फेचे अनेक मुद्दे न्यायाधीश-मंडळापुढें मांडले. बॅ. बॅप्टिस्टा यांचें विद्वत्ताप्रचुर विवेचन चाललें असतांना सरन्यायाधीश साहेबांनीं २–३ वेळां त्यांना अडविण्याचा प्रयत्न केला; तरीहि बॅप्टिस्टा यांनीं आपलें म्हणणें नेटानें मांडलेंच. अर्थात्‌च त्याचा कांहीं उपयोग न होतां, ट्रायब्यूनलनें हे सर्व मुद्दे रद्द ठरविले. यानंतर पेठकर, या साक्षीदारानें १९०६-१९०७ सालीं पोलिस कॉन्स्टेबल या नात्यानें घेतलेल्या सभांच्या रिपोर्टासंबंधीं माहिती सांगितली. ही साक्ष चालू असतांना, बॅ. गाडगीळ, बॅ. बॅप्टिस्टा यांनीं कांहीं हरकत उपस्थित केल्यामुळें ॲडव्होकेट जनरल म्हणाले : १९०३ सालीं 'मित्रमेळ्या'च्या सुरुवातीबरोबरच कटाची सुरुवात झाली. बॅ. बॅप्टिस्टा, बॅ. गाडगीळ, बॅ. चित्रे यांनीं या साक्षीदाराची उलटतपासणी घेतली. नाशिकचे पो. कॉन्स्टेबल दाणी, 'विद्याभूषण' छापखान्याचे मालक श्री. बर्वे, व 'मॅझिनीचें चरित्र' या ग्रंथाचे मुद्रक केशव रावजी गोंधळेकर यांच्या साक्षी पुऱ्या झाल्यावर जळगांव येथील पो. इन्स्पेक्टर विठ्ठल अण्णाजी काकडे याच्या साक्षीला सुरुवात झाली. ही साक्ष अपुरीच राहून या दिवशींचें कोर्टाचें काम संपणार तों बॅ. गाडगीळ यांनीं कोर्टाला एक विनंति केली. 'नारायण सावरकर याला आपला भाऊ विनायक याची भेट घेण्यासंबंधानें परवानगी मिळावी,' असा या विनंतीचा आशय होता. 'या कामांत आम्हांला हात घालतां येत नाहीं' असें उत्तर देऊन, कोर्टानें ही विनंति अमान्य केली.

दिनांक ४ रोजीं काकडे याची साक्ष पुरी झाल्यावर इतरहि बऱ्याच साक्षी झाल्या. त्यांत सी. आय्. डी. सबइन्स्पेक्टर पिंगळे व पोलिस खात्यांतला सीतारामसिंग हे दोन साक्षीदार सरकारी नोकरींतले असून, कृष्णाजी दामोदर लिमये, बाळकृष्ण नारायण फाटक, गणपत नारायण कुलकर्णी व श्रीधर वामन परचुरे हे साक्षीदार स्वतंत्र धंदा करणारे होते. यांपैकीं लिमये हे सांगलीकडील एक खाजगी शिक्षक असून, फाटक हे मुंबईचे एक प्रसिद्ध ग्रंथप्रकाशक होते. 'विहारी' पत्राची मालकीहि कांहीं दिवस फाटक यांजकडे होती. कुलकर्णी हे मुंबईच्या कर्नाटक छापखान्याचे मालक होते व परचुरे हे नाशिक येथील एक फोटोग्राफर होते. दिनांक ५ च्या रमजानच्या सुटीनंतर दिनांक ६ रोजीं प्रारंभीं कांहीं पुरावा घेण्यांत आल्यावर त्या दिवशीं सरन्यायाधीश यांनीं, बॅ. बॅप्टिस्टा यांनीं सावरकरांतर्फे जे मुद्दे उपस्थित केले होते त्यांना उत्तर देणारा आपला विस्तृत निर्णय सांगितला व असें ठरवून

टाकिलें कीं, मार्सेलिस येथें सावरकर यांना पकडण्याच्या कामीं कांहीं गैरकायदा गोष्ट झाली असली तरी, त्यामुळें हिंदी कोर्टाच्या अधिकाराला कोणतीहि बाधा येत नाहीं.

शुक्रवार दिनांक ७ ऑक्टोबर रोजीं, सावरकरांबरोबर ' मोरिया ' बोटींतून आलेला ब्रिटिश गुप्तहेरखात्यांतला अधिकारी पार्कर याची साक्ष झाली. सरतपासणी, उलटतपासणी व फेरतपासणी या त्रिस्थळींतून बाहेर पडतांपडतां या साक्षीदारानें सावरकरांच्या लंडन येथील जीवनांतील कित्येक घटनांसंबंधींची बरीच माहिती सांगितली. दि. २९-१२-१९०८ रोजीं कॅक्स्टन हॉलमध्यें श्रीगुरुगोविंदसिंग यांच्या वार्षिक उत्सवानिमित्त भरलेल्या सभेंत ' शीखांच्या देशबांधवांवर जुलूम होत आहे म्हणून शीखांनीं उठावणी केली पाहिजे, ' असे उद्गार सावरकरांनीं काढिल्याचें या साक्षीदारानें सांगितलें. दि. १३ मार्च १९१० रोजीं सावरकरांना व्हिक्टोरिया स्टेशनवर पकडल्यावर काय घडलें, सावरकरांपाशीं कोणत्या वस्तू सांपडल्या इत्यादि हकीकतहि पार्कर यानें सांगितली. नाशिक कटाच्या खटल्याशीं संबंध असलेल्या वीस पिस्तुलांबद्दलहि या साक्षीदारानें बरीच माहिती सांगितली.

शनिवार दिनांक ८ ऑक्टोबर रोजीं मुंबईच्या गुप्त हेरखात्यांतला इन्स्पेक्टर फव्हेल याची साक्ष झाली. दि. २८-१-१९०९ रोजीं एस्. एस्. सिडने या आगबोटीनें युरोपमधून मुंबईस आलेल्या चेंगिरीराव नांवाच्या ब्रह्मी इसमाची कस्टम्स-शेडमध्यें झडती झाली; त्या वेळीं सांपडलेल्या वस्तूंचें या साक्षीदारानें वर्णन केलें. यानंतरचा साक्षीदार गणेश बळवंत वैद्य हा नाशिकचा रहिवासी असून जॅक्सन खुनाच्या खटल्यांत त्याला जन्मठेप काळ्यापाण्याची शिक्षा झालेली होती. चालू खटल्यांत तो माफीचा साक्षीदार झाला. या सर्व प्रकारामुळें या साक्षीदारातर्फे बाहेर येणाऱ्या माहितीला दोन्ही पक्षांच्या दृष्टीनें फार महत्त्व होतें. या साक्षीदाराची साक्ष शनिवार दिनांक ८-१०-१० रोजीं सुरू झाली व ती बुधवार दिनांक १२ रोजीं संपली. नाशिक येथील क्रांतिकारक संस्थांची घटना व कार्यपद्धति, मनुष्यबळ, द्रव्यबळ व शस्त्रबळ यांच्या सिद्धतेसाठीं या संस्थांच्या घटकांकडून करण्यांत आलेले उद्योग, पिस्तुलांच्या देवघेवीचे व्यवहार, स्फोटक द्रव्यें बनविण्यासाठीं या मंडळींना करावा लागलेला अभ्यास, इत्यादि अनेक महत्त्वाच्या गोष्टींची माहिती या साक्षिदाराच्या मार्फत बाहेर आली. मि. जॉर्डिन यांनीं या साक्षीदाराला ' स्वदेशी चळवळ म्हणजे काय ' असा प्रश्न विचारला तेव्हां या साक्षीदारानें उत्तर दिलें : हत्यारें गोळा करण्याची व बॉंब करण्याच्या तयारीची चळवळ ती स्वदेशी चळवळ होय !

वैद्यासारखा गृहस्थ माफीचा साक्षीदार बनून आपल्या पूर्वपरिचितांविरुद्ध व सहकाऱ्यांविरुद्ध साक्ष देण्यास तयार होतो, त्या अर्थीं, त्याच्या या मनोरचनेमागें कांहीं तरी गूढ प्रकार असावा असा समज त्या वेळीं प्रसृत झाला होता. त्या वेळचे गुप्तहेरखात्यांतले मधुजिव्ह इन्स्पेक्टर बाबासाहेब देशपांडे यांचा या गूढ प्रकाराशीं

कांहीं तरी संबंध आहे असाहि समज आरोपींपैकीं बऱ्याच जणांच्या मनांत दृढ झाला होता. या समजावर प्रकाश पाडणारीं पुढील प्रश्नोत्तरें लक्षांत ठेवण्यासारखीं आहेत.

**बॅ. गाडगीळ** :—१९१० च्या मे महिन्यांत इन्स्पेक्टर बाबासाहेब देशपांडे यांनीं तुझी व आरोपी मनोहर याची मुलाखत घडवून आणली होती कीं नाहीं !

**साक्षीदाराचें उत्तर** :—मला बाबासाहेबांनीं फक्त मनोहर दाखविण्याकरितां नेलें होतें.

**प्र.** :—इन्स्पेक्टर बाबासाहेबांनीं सुचविल्याप्रमाणें अमूकअमूक सांगून टाक व आपली सुटका करून घे असें तूं मनोहरास सांगितलें नाहींस ?

उ. :—मी मनोहराशीं बोललोंच नाहीं.

प्र. :—इन्स्पेक्टर बाबासाहेबांनीं तुझ्या समक्ष मनोहरला धमकी दाखविली कीं नाहीं ?

उ. :—यासंबंधानें मला कांहीं एक माहीत नाहीं !

'माझ्या समक्ष तरी धमकी दाखविली नाहीं' असें उत्तर देऊन हा साक्षीदार मोकळा झाला असता तर, त्याच्या सर्व परिस्थितीचा विचार करतां, त्याला कोणी फारसा दोष दिला नसता. पण असें उत्तर देण्यालाहि हा साक्षीदार धजला नाहीं; गुळमुळीत, मोघम उत्तर देणें त्याला श्रेयस्कर वाटलें ही गोष्ट महत्त्वाची आहे. प्रलोभन, धाक इत्यादींच्या कात्रींत सांपडल्याशिवाय गणू वैद्य उलटणार नाहीं हा या साक्षीदाराच्या पूर्वसहकाऱ्यांच्या मनांतला विश्वास पुढील प्रश्नोत्तरांच्या रूपानेंहि व्यक्त झाला आहे. दि. १२--१०--१९१० रोजीं आरोपी गंगाराम रूपचंद यानें या साक्षीदाराची स्वतःच उलटतपासणी घेतली. त्या वेळीं पुढील संवाद झाला :

प्र.:—तुला कोणी वाईट रीतीनें वागविल्याशिवाय तूं सर्व कांहीं सांगण्यास तयार झालास, असें तुझें म्हणणें आहे ?

उ.:—मला कांहीं माहीत नाहीं.

**प्र.**:—पोलिसांनीं मला मारलें तर मी सारें पोलिसांना सांगेन असें तूं अनंत कान्हेरे याचेजवळ मनमाड येथें म्हणाला नाहींस काय ?

उ.:—असें मी म्हटलें असेल !

दिनांक १२–१०–१० रोजीं गणू वैद्याची साक्ष संपल्यावर, माफीचा साक्षीदार काशिनाथ हरी अंकुशकर याची साक्ष घेण्यांत आली. मी खरें सांगितलें तर मला माफी देण्यांत येईल अशा अटीवर मीं साक्ष देत आहें असें या साक्षीदारानें आरंभींच सांगितलें. साक्षीदारानें आरोपी तिखे याला लिहिलेल्या एका पत्रांतील कांहीं वाक्यांबद्दल न्या. चंदावरकर यांनीं कांहीं प्रश्न विचारले. आपलीं मनोगतें गुप्त रीतीनें व्यक्त करण्याची क्रांतिकारक तरुण कशी खटपट करीत असत हें कळण्याच्या दृष्टीनें हे प्रश्न व साक्षीदारानें त्यांना दिलेलीं उत्तरें नमूद करण्यालायक आहेत.

औरंगाबादेपासून १६ मैलांवर असलेल्या पिंपरी गांवीं दरोडा घालण्याचा संकल्प हा पत्राचा विषय आहे.

प्र.:—पत्रांतील 'वदेहं' चा अर्थ काय ?

उ.:—अर्थ मला माहीत नाहीं. मी तो शब्द कोठें तरी वाचला होता इतकेंच !

प्र.:—नऊ बैल म्हणजे काय ?

उ.:—नऊ बैल म्हणजे दरोडा घालणारे संस्थेचे नऊ सभासद.

प्र.:—आम्ही जुना पूल पहावयास येणार आहोंत, या वाक्याचा अर्थ काय ?

उ.:—'जुना पूल' ही हैदराबादेंतलि एक जागा असून तेथें हत्यारें विकत मिळतात. या वाक्याचा अर्थ 'आम्ही हत्यारें पहावयास येणार आहोंत' असा घ्यावयाचा !

दसऱ्याच्या सुटीच्या दुसऱ्या दिवशीं म्हणजे शुक्रवार दि. १४-१०-१९१० रोजीं अंकुशकर याची साक्ष पुरी झाली. माफीचा साक्षीदार दत्तात्रय पांडुरंग जोशी याची साक्ष याच दिवशीं सुरू झाली व ती दुसऱ्या दिवशीं संपली. गुप्त हेरखात्यां-तलि सुपरिंटेंडेंट रामकृष्ण हणमंत पागे व माफीचा साक्षीदार वा. रा. कुलकर्णी, बी. ए. एल्‌एल्. बी. या दोघांच्या साक्षी पुऱ्या झाल्यावर दिनांक १५–१०–१९१० चें कोर्टाचें काम संपलें. सोमवार व मंगळवार मिळून—म्हणजे दिनांक १७ व १८ मिळून—येवल्याचे शिक्षक नारायणराव जोशी, येवल्याचे व्यापारी एकनाथशेट गुजर, शिदरामशेट सोनार, सोलापूरचे वामन धोंडो कुंटे, अक्कलकोटचे श्रीधर गणेश ब्रह्मोपाध्ये, इगतपुरी स्टेशनवरील कारकून केशव सखाराम सिंधेकर, इगतपुरीचे रहिवासी नरहर अनंत खांबेटे व इगतपुरीचे वकील वामनराव विठ्ठल देवळालकर यांच्या साक्षी झाल्या.

बुधवार दि. १९–१०–१९१० रोजीं नाशिकचे पो. इन्स्पेक्टर रामचंद्र आप्पाजी बल्लाळ यांची साक्ष झाली. गणेशपंत सावरकर यांना दि. २८–२–१९०९ रोजीं मुंबईस मोहन बिल्डिंगमध्यें पकडल्याची हकीकत व दिनांक १३–६–१९०८, १७–१२–१९०८ व १२–३–१९०९ या तीन दिवशीं घेतलेल्या नाशिक येथील सावरकर बंधूंच्या वसतिस्थानाच्या झडतीची हकीकत, अशा हकीकती या साक्षीदारानें सांगितल्या. पहिल्या झडतींतल्या वस्तूंची म्हणून जी यादी या साक्षीदारानें सांगि-तली त्यांत मॅझिनीच्या चरित्राच्या बऱ्याच प्रती, 'सायन्स ऑफ वॉर' 'इन्फंट्री सोर्ड एक्सर्साईज' 'लष्करी इंजिनिअरिंग' वगैरे पुस्तकांचा उल्लेख होता. एका झडतीच्या वेळीं, छपराजवळच्या भिंतीच्या बाहेरच्या बाजूनें एक वीट काढल्याबरोबर, आंत कांहीं पुस्तकें व कागदांचें एक पुडकें या वस्तू हातीं लागल्याचें साक्षीदारानें सांगि-तलें. या पुडक्यांत बॉंबचा फार्म्युला, कित्येक लोकांच्या पत्त्यांचें टिपण, विनायक-राव सावरकर यांचीं गणेशपंतांना आलेलीं पत्रें वगैरे वस्तू आढळल्या, असेंहि हा साक्षीदार म्हणाला. नरहर बापूजी जोशी मामलेदार यांनीं अटकेंत असलेल्या गणेश-

पंत सावरकरांना भेटावयास त्यांचा भाऊ नारायण आला असतां झालेल्या संभाषणाची व त्या संभाषणामुळें हातीं आलेल्या पुराव्याची माहिती सांगितली. भेटीच्या वेळीं गणेशपंतांनीं नारायणास सांगितलें : गच्चीच्या डागडुजीच्या वेळीं विटेखालीं मी पांच रुपयांची नोट ठेविली आहे. हा प्रकार साक्षीदाराला चमत्कारिक कसा वाटला, फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेट मि. निसीम यांना साक्षीदारानें ही हकीकत सांगितल्यावर झडती घेण्याची परवानगी कशी मिळाली व झडतीच्या वेळीं कौलाराच्या खालीं असलेल्या कोनाड्यांत नोट न सांपडतां कागदपत्र कसे सांपडले ही माहिती साक्षीदारानें कोर्टाला सांगितली. नाशिकचे डेप्युटी सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस रा. ब. मारुति पांडुरंग तोरडमल्ल यांची साक्ष चालू असतांनाच कोर्टाचें या दिवसाचें काम संपलें.

गुरुवार दिनांक २० रोजीं आरंभींच कोर्टानें शंकर बळवंत वैद्य, विनायक सदाशिव बरवे व विनायक काशिनाथ फुलंब्रीकर या तीन आरोपींना दोषमुक्त म्हणून सोडून दिलें. रा. ब. तोरडमल्ल यांची उलट-तपासणी त्यांनीं आपली डायरी बरोबर आणल्यावर व्हावी ही विनंति कोर्टानें मान्य केल्यामुळें, हा साक्षीदार मागें ठेवण्यांत आला. नाशिक येथील वेगवेगळया झडत्यांच्या वेळीं पंच म्हणून ज्यांनीं कामें केलीं होतीं अशा चारपांच इसमांच्या व पो. इन्स्पेक्टर जीवना महादू यांची मिळून पांच साक्षीदारांच्या साक्षी झाल्यावर, नाशिकचे पो. हेडकॉन्स्टेबल काशिनाथ शामराव पाठक व इगतपुरीचे पो. इन्स्पेक्टर तुकाराम नारायण सावंत यांनीं आरोपी काशीकर याच्या घराच्या झडतीच्या वेळची हकीकत सांगितली. आरोपी काशीकर यांनीं स्वतःच या साक्षीदाराची उलटतपासणी घेतली. आरोपी थत्ते याच्या घराची झडती घेणारे गुप्त हेरखात्यांतील इन्स्पेक्टर मॉरिस व त्याच खात्यांतील इन्स्पेक्टर फव्हेल यांच्या साक्षी झाल्यांवर नाशिकचे हुजूर डे. कलेक्टर व फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेट मि. पळशीकर यांच्या साक्षीला प्रारंभ झाला. या खटल्याचें काम शनिवारीं चाललें नाहीं तर वकिल, बॅरिस्टर मंडळींना थोडी फार तरी विश्रांति मिळेल अशी विनंति बॅ. बॅप्टिस्टा यांनीं या दिवशीं न्यायमूर्तींना केली; पण, ती अमान्य झाली!

दिनांक २० रोजीं सुरू झालेली पळशीकर महाशयांची साक्ष मंगळवार दिनांक २५ रोजीं संपली. आरोपी दांडेकर याचा जबाब घेण्याचें काम चार तास चाललें होतें, या अवधींत आरोपी हत्यारबंद पोलिसांच्या ताब्यांत होता आणि या पोलिसांचा खटल्याच्या चवकशीशीं अर्थाअर्थी कांहींच संबंध नव्हता, असें पळशीकरांनीं कबूल केलें. "माझा कबुलीजबाब झाला तेव्हां मी भ्यालेला होतों" असें आरोपी मनोहर यानें मॉंटगॉमरीपुढें सांगितलें व "मलाहि आरोपीच्या चेहऱ्यावरून तसें वाटलें" असें पळशीकरांनीं सांगून टाकलें. आरोपींनीं दिलेले अशा प्रकारचे जबाब पुराव्यांत समाविष्ट होण्याला वकील मंडळींनीं हरकत घेतली; पण, ती अमान्य झाली. शुक्रवार दिनांक २१--१०--१० रोजीं साक्ष देतांना पळशीकरांनीं असें सांगितलें कीं, पोलिस

इन्स्पेक्टर बाबासाहेब देशपांडे हे माझे नातेवाईक आहेत. आरोपी चंद्रात्रे याला हत्यारबंद पोलिसांनीं जबाब देण्यासाठीं आणला होता, मी लिहून घेतलेले चौदा कबुलीजबाब पकडल्यानंतर बारापेक्षां अधिक दिवस झाल्यावर आरोपींनीं दिले आहेत, आरोपी तिखे यानें तर ४२ दिवसांनंतर जबाब दिला, वगैरे माहिती पळशीकरांच्या तोंडून निघाली. या जबाबासंबंधीं बोलतांना बॅ. बॅप्टिस्टा यांनीं असें सांगितलें कीं इतक्या अवधीनंतर दिलेले जबाब आरोपींवर जुलूम झाल्यामुळें देण्यांत आले, असें अनुमान काढतां येण्यासारखें आहे. कबुलीजबाब घेण्याचें काम गुप्तपणें व्हावयाला नको होतें, असेंहि बॅ. बॅप्टिस्टा यांनीं सांगितलें. " चौकशी चालवयाची ती ' न्यू क्रिमिनल लॉ अॅमेंडमेंट अॅक्टा'प्रमाणें चालवावयाची हें कळण्यापूर्वींच ज्या मॅजिस्ट्रेटला चौकशी गुप्तपणें चालावयाची असें वाटलें त्या मॅजिस्ट्रेटनें कबुलीजबाब लिहून तरी घेतले कीं नाहींत " असा संशय बॅ. रांगणेकर यांनीं प्रगट केला. जबाब लिहून घेतांना पळशीकरांचें मन आरोपींविषयीं कलुषित झालेलें होतें असें बॅ. गाडगीळ यांनीं दाखवून दिलें. दिनांक २२–१०–१० रोजीं सरन्यायाधीशांनीं या जबाबांविषयीं पुढील निकाल दिला :

*७ जानेवारीपासून पुढें किंवा त्या दिवशीं घेतलेले कबुलीजबाब निशाणीचे कागद समजून चालावे; आरोपी पक्षातर्फे मॉंटगॉमरी व गायडर यांची उलट तपासणी झाल्यावर कबुलीजबाब दाखल करून घेण्याच्या प्रश्नाचा निकाल आम्ही करूं.*

यानंतर कांहीं आरोपींचे कबुलीजबाब पुराव्यांत दाखल करण्यांत आले. बॅ. रांगणेकर यांनीं पळशीकरांची उलटतपासणी घेतली तेव्हां आरोपी मराठे याच्या जबाबांत कांहीं महत्त्वाची खाडाखोड करण्यांत आल्याचें निष्पन्न झालें. पळशीकर यांच्या साक्षीबद्दल न्यायाधीशांचेंहि मत कसें प्रतिकूल बनूं लागलें होतें हें सरन्यायाधीश व पळशीकर यांच्या दरम्यान झालेल्या पुढील प्रश्नोत्तरांवरून स्पष्ट होत आहे.

चीफ जस्टिस :—तुम्ही कबुलीजबाब कसे घेत होतां ?

मि. पळशीकर :—मी व माझा कारकून दोघेहि एकदम लिहीत होतों. एकजण मराठींत व एकजण इंग्रजींत असे लिहीत होतों.

चीफ जस्टिस :—तर मग तुम्ही दोघांनीं एकच दुरुस्ती केली, हें कसें झालें?

मि. पळशीकर :—असें झालेलें दिसतें खरें !

बॅ. बॅप्टिस्टा यांनीं चालविलेल्या उलटतपासणीच्या वेळीं पळशीकर कसे चिडून गेले व सरन्यायाधीशांनीं त्यांना कसें ताळ्यावर आणलें, हें पुढील संवादावरून समजण्यासारखें आहे :

( बॅ. बॅप्टिस्टा यांनीं केलेल्या उलटतपासणींत ) पळशीकर:—मी आपल्या खोलींत कधींकधीं पागोटें व कोट काढूनहि बसलों असेन. मी केव्हांहि टेबलावर

यांची ठेविली नव्हती; कारण, मी तंबाखू खाणारा नाहीं. केवळ मला त्रास देण्या-करितां हे प्रश्न केले जात आहेत.

चीफ जस्टिस :—तसें नाहीं. हे प्रश्न लागूं आहेत. तुम्हांला त्रास देण्या-करितां हे प्रश्न केले जात आहेत असें तुम्हांला वाटतें, ही तुमची चूक आहे. तुम्ही मॅजिस्ट्रेट आहांत हें ओळखतां आलें असतें कीं नाहीं, हें पाहण्याचा बॅ. बॅप्टिस्टा यांचा हेतु आहे.

सोमवार दिनांक २४--१०--१० रोजीं आरोपी काशीकर यांच्या जबाबा-विषयींचे कांहीं प्रश्न सरन्यायाधीशांनीं साक्षीदाराला विचारले. या प्रश्नांचीं उत्तरें देतांना साक्षीदाराचा फारच गोंधळ उडाला! जॅक्सन--खुनाच्या खटल्यांतील आरोपी शंकर सोमण यानें त्या खटल्यांत दिलेला कबुलीजबाब या खटल्यांतील पुरावा म्हणून दाखल करण्याचा सरकारपक्षातर्फे प्रयत्न झाला. तेव्हां न्यायमूर्ति चंदावरकर यांनीं व आरोपीतर्फेच्या बॅरिस्टरांनीं त्याला हरकत घेतली. मंगळवार दिनांक २५ रोजीं सरन्यायाधिशांनीं हा कबुलीजबाब दाखल करूं नये, असा निर्णय दिला. पळशीकरांच्या जबानीनंतर नाशिकचे डे. कलेक्टर व पहिला वर्ग मॅजिस्ट्रेट श्री. विनायक नारायण खोपकर यांची साक्ष झाली. आरोपीच्या कांहीं जबाबांवर तारखाच घातलेल्या नाहींत असें या साक्षींत बाहेर आलें. आरोपी परांजपे यांच्या जबाबाबद्दल बॅ. बॅप्टिस्टा यांनीं या साक्षीदाराची उलटतपासणी घेतली. ही तपासणी चालू असतांना, न्यायमूर्ति चंदावरकर यांनाहि या साक्षीदाराला चापण्याचा प्रसंग टाळतां आला नाहीं. या प्रसंगीं कोर्टांत जीं प्रश्नोत्तरें झालीं तीं मोठीं मासलेवाईक आहेत.

बॅ. बॅप्टिस्टा:—माझा कबुलीजबाब जरी खुषीचा नाहीं तरी तो खरा आहे असें आरोपी म्हणत असतांहि,तो खुषीचा आहे असा शेरा तुम्ही त्यावर कसा मारला ?

खोपकर :— कबुलीजबाब देण्याच्या एकंदर तऱ्हेवरून तो खुषीचा आहे असें मला वाटलें.

ज. चंदावरकर :—हा शेरा मारतांना आपली मॅजिस्ट्रेट या नात्याची जबाबदारी तुम्ही जाणत होतां काय ?

खोपकर :—मी या संबंधाचा सर्व खुलासा करतों. कबुलीजबाब खुषीचा आहे काय असा प्रश्न केला असतां आरोपी म्हणाला : आरोपी कधीं तरी खुषीनें कबुलीजबाब देतात कीं काय हें तुम्हांस माहित नाहीं काय ? तेव्हां 'मला प्रश्न विचारण्याचें तुझें काम नाहीं' असें मी त्यास बजावल्यावर त्यानें कबुलीजबाबांत वर दिल्याप्रमाणें उत्तर दिलें.

ज. चंदावरकर :—प्रत्येक आरोपीचा कबुलीजबाब जसा खुषीचा नसतो तसा तो माझाहि नाहीं, असा त्याचा अर्थ होत नाहीं काय ?

खोपकर :—होय, तसा अर्थ होतो खरा !

आरोपी नागपूरकर याचा जबाब दाखल करून घेण्याचा सरकारपक्षातर्फे

प्रयत्न चालू झाला तेव्हां ज.चंदावरकर यांनीं खोपकर यांची जी खरडपट्टी काढली तीहि मोठी खुसखुशीत आहे.

ज. चंदावरकर :—तो कबुलीजबाब या नात्यानें कसा दाखल होईल? कबुलीजबाब दाखल होण्यापूर्वी अनेक शर्ती पुऱ्या झाल्या पाहिजेत, असा कायद्यानें बंदोबस्त केला आहे.

चीफ जस्टिस :—( खोपकरांस ) ह्या जबाबास तुम्हीं सर्टिफिकिट जोडलें काय ?

खोपकर :—ही केवळ साक्ष असल्यामुळें मीं तिला सर्टिफिकिट जोडलें नाहीं.

ज. चंदावरकर :—१६४ व्या कलमाखालीं तुम्हीं हा साक्षीपुरावा कसा घेतला ?

खोपकर :—खटल्याची सुनावणी सुरू होण्यापूर्वी या कलमाखालीं साक्षीपुरावा घेतां येतो व कबुलीजबाबहि घेतां येतो, असें मला वाटतें.

ज. चंदावरकर :—पहिला वर्ग मॅजिस्ट्रेटनें असें बोलावें, याचें मला आश्चर्य वाटतें !

खोपकरांनंतरचे साक्षीदार नाशिकचे पो. इन्स्पेक्टर शेख जलाल उस्मान यांनीं नाशिकांतील तीन झडत्यांची हकीकत सांगितली. या झडत्यांच्या वेळच्या पंचांच्या साक्षी झाल्यावर, नाशिकचे पो. इन्स्पेक्टर यशवंत महादेव कर्णिक यांची साक्ष झाली. नाशिकचे पो. सुपरिंटेंडेंट कुक, पो. इन्स्पेक्टर बल्लाळ, पो. हेड कॉन्स्टेबल रामचंद्र पवार, हैदराबाद रेसिडेन्सींतले पो. इन्स्पेक्टर अबदुल्लाखान, झडत्यांच्या वेळचे कांहीं पंच इत्यादिकांच्या साक्षी झाल्यावर, डेप्युटि सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस मारुति पांडुरंग तोरडमल्ल यांची साक्ष दि. २८–१०–१० रोजीं सुरू झाली. ही साक्ष पुरी झाल्यावर दिनांक २९-१०-१० रोजीं हेरखात्यांतील इन्स्पेक्टर मारुति सखाराम कामटे यांची साक्ष झाली. उलटतपासणीच्या वेळच्या कांहीं प्रश्नांना उत्तरें देतांना साक्षीदारानें आरोपी कोनकर व ब्रह्मागिरीबुवा यांचा संबंध असलेली पुढील माहिती सांगितली :

*कोल्हापूरचे महाराज व सबनीस यांचा खून करण्याचा विचार होता अशा प्रकारची बनावट गोष्ट सांगण्याविषयीं मी कोनकरास कधीं पढविलें नाहीं. ब्रह्मगिरीच्या मनांत व्हाइसरॉयचा खून करावयाचा होता ही गोष्टहि वरील गोष्टीला जोडून देण्यासंबंधानें मी कोनकरास कधीं सांगितलें नाहीं. पुण्याहून नाशिकास जातांना गाडींत कोनकरानें ही गोष्ट सांगितली.*

दिवाळीच्या सुटीनंतर गुरुवार दिनांक ३-११-१९१० रोजीं खटल्याचें काम सुरू झालें. इन्स्पेक्टर कामटे यांची साक्ष पुरी झाल्यावर या दिवशीं हेरखात्यांतला सब इन्स्पेक्टर रामचंद्र गणेश झारापकर याची साक्ष झाली. धुळें येथील एका

झडतीची हकीगत सांगतांना साक्षीदार म्हणाला : या झडतींत दोन ब्राऊनिंग पिस्तुलें, दोन काडतुसें, एक गोळी, ब्राऊनिंग पिस्तुल वापरावें कसें यासंबंधींचें एक पुस्तक वगैरे वस्तू सांपडल्या. इन्स्पेक्टर सुलतानखान याच्या साक्षींत असें बाहेर आलें कीं, पेण येथील झडतींत सांपडलेलें ( १८५७ च्या ) बंडासंबंधाचें पुस्तक चिंतामण विनायक वैद्य यांनीं लिहिलेलें असून, झडतींत सांपडलेल्या मॅझिनीविषयक पुस्तकाचा कर्ता सावरकर नव्हता. झडतीच्या वेळीं पंच म्हणून हजर असलेल्या कांहीं इसमांच्या साक्षी झाल्यावर खटल्याचें या दिवसाचें काम संपलें.

शुक्रवार दिनांक ४ रोजीं व त्याच्या दुसऱ्या दिवशीं झालेल्या साक्षींत पोलिस स. इन्स्पेक्टर श्रीधर रामचंद्र कर्णिक, असिस्टंट सुप. ऑफ पोलिस मि. स्टुअर्ट व डेप्युटि कमिशनर ऑफ पोलिस मि. व्हिन्सेंट यांच्या साक्षी महत्त्वाच्या होत्या. शेवटच्या साक्षीदारानें उलट तपासणींत असें सांगितलें कीं, दि. १५–६–१९०९ पासून—म्हणजे जॅक्सन-खुनाच्या पूर्वींच—चतुर्भुजसंबंधींची गुप्त बातमी त्याला समजली होती. चतुर्भुजला शोधून काढणें जरूर आहे असें साक्षिदाराला वाटत असूनहि, साक्षीदार त्याला शोधून काढूं शकला नाहीं. पुण्याचा व्यापारी शेठ गमनाजी पिठाजी याची या दिवशीं साक्ष झाली. आरोपी डावरे यांनीं साक्षीदाराच्या घराच्या आवारांत पुरून ठेवलेल्या गाठोड्याबद्दलची हकीगत साक्षीदारानें सांगितली. ' डावरे याला माझ्यापुढें आणिलें तेव्हां त्याच्या नाकांतून रक्त वाहात होतें कीं काय तें मला सांगतां येणार नाहीं ' असेंहि साक्षीदार म्हणाला. पुण्याचे माजी सिटी पोलिस इन्स्पेक्टर विल्यम किंग यांची साक्ष संपण्यापूर्वींच कोर्टाचें दिनांक ५ चें काम संपलें.

सोमवार दिनांक ७–११–१० रोजीं विल्यम किंग यांची साक्ष पुरी होऊन एकदोन किरकोळ साक्षी झाल्यावर, हेरखात्यांतील इन्स्पेक्टर केशव विठ्ठल कोगजे यांची साक्ष झाली. आरोपी कोनकर यांच्या जवळचें पिस्तुल कसें सांपडलें, आरोपी डावरे यांच्या जवळच्या पिस्तुलाचा थांग काढण्यासाठीं पुणें येथील भवानी पेठेंतल्या एका विहिरीचें पाणी कसें उपसावें लागलें, या विहिरींतून किती गाळ काढावा लागला व शेवटीं लाल कापडाच्या एका गाठोड्यांत पिस्तुल व काडतुसें कशीं सांपडलीं, इत्यादि हकीकत या साक्षीदारानें सांगितली. मंगळवारीं प्रारंभीं पेण येथील कांहीं साक्षीदारांच्या किरकोळ साक्षी झाल्यावर, हेरखात्यांतील सुपरिंटेंडेंट ऑफ पोलीस मि. सुलिव्हान यांची साक्ष झाली. आरोपी नागपूरकर यांच्या घराच्या झडतीची हकीकत या साक्षीदारानें सांगितली. हेरखात्यांतील पोलिस इन्स्पेक्टर मि. पेटिगारा यांनीं आरोपी नागपूरकर व भट यांच्याबद्दलची माहिती आपल्या साक्षींत सांगितली. पुण्याचे पोलिस इन्स्पेक्टर शिवराम विष्णु सदावर्ते यांची साक्ष मंगळवारीं सुरू होऊन बुधवारीं संपली. आरोपींपैकीं कोणालाहि आपण अन्न, खेळण्याचे पत्ते, मेवा-मिठाई, फळफळावळ वगैरे वस्तू दिल्या नाहींत असें या साक्षीदारानें सांगितलें.

नाशिकचे पो. इन्स्पेक्टर बल्लाळ प्रभृति कांहीं साक्षीदारांच्या साक्षी झाल्यावर बुधवार दिनांक ९ चें कोर्टाचें काम संपलें.

गुरुवारीं पेणचे रहिवासी केशव सखाराम परांजपे, मुंबईचे सखाराम बल्लाळ जोशी, तळेगांव कांचकारखान्यांतील बाळकृष्ण शंकर करंदीकर, पुण्याचे सदाशिव विद्याधर कवडीकर प्रभृतींच्या साक्षी झाल्या. शुक्रवारीं नाशिकचे असि. कलेक्टर व मॅजिस्ट्रेट मि. गॅरेट यांची साक्ष झाली. आरोपी बळवंत रामचंद्र बरवे व काशीकर यांच्या जबाबांच्या मराठी प्रतींना सर्टिफिकिटें न जोडण्याची चूक आपल्या हातून झाल्याचें साक्षीदारानें कबूल केलें. बरवे व काशीकर यांचे जबाब खटल्यांत दाखल कां होऊं नयेत याविषयीं आरोपींतर्फेच्या वकिलांनीं अनेक कारणें सांगितलीं. तरीहि हे जबाब दाखल करण्यांत आले. पश्चिम खानदेश जिल्ह्याचे असि. कलेक्टर व फ. क्लास मॅजिस्ट्रेट मि. मॉंटगॉमरी यांची साक्ष पुरी होण्यापूर्वींच शुक्रवारचें कोर्टाचें काम संपलें. शनिवारीं कांहीं विशेष सुट्टी असल्यामुळें, पुढील कामाला सोमवार दि. १४-११-१० या दिवशीं सुरुवात झाली. या दिवशीं मि. मॉंटगॉमरी यांची उलटतपासणी चालली असतां त्यांनीं अनेक महत्त्वाच्या कबुल्या दिल्या. " जबाब देण्यास मी खुषी आहें असें आरोपींनीं आपण होऊन म्हटलें नसतां, आरोपींचे जबाब लिहून घेतले, पोलिसांनीं हाल करून जबरदस्तीनें कबुलीजबाब घेतले असें कांहीं आरोपी म्हणत होते व या बाबतींत आपण कांहीं चौकशी केली नाहीं " असें साक्षीदारानें सांगितलें. मुंबईच्या फोर्थ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेटच्या अटकेंत असतांना माझ्या मिशा उपटल्या अशी तक्रार आरोपी खरे यांनीं केली असल्याचें साक्षीदारानें सांगितलें. मला मारहाण केली व धमकी दिली आणि त्यामुळें मी कबुलीजबाब दिला, असें आरोपी चंद्रात्रे आपल्यापुढें म्हणाला असल्याचें साक्षीदारानें सांगितलें. साक्षीदारानें ही हकीकत सांगितल्यावरहि, या साक्षीदारासमोर झालेले जबाब पुराव्यांत दाखल करण्यांत आले. 'फ्यूजिटिव्ह ऑफेंडर्स ॲक्ट' अन्वयें सावरकरांवर करण्यांत आलेल्या खटल्यांत विष्णु महादेव भट यांनीं दिलेली साक्ष चालू खटल्यांत दाखल होऊं नये हीं बॅ. बॅप्टिस्टा यांची मागणी या दिवशीं अमान्य झाली. नाशिकचे सिव्हिल सर्जन व नाशिकच्या दवाखान्यांतलि हॉस्पिटल असिस्टंट यांच्या, आरोपी कैदेंत असतांना त्यांना करण्यांत आलेल्या औषधोपचाराबद्दलच्या साक्षी पुऱ्या झाल्यावर, मंगळवार दिनांक १५-११-१९१० रोजीं नाशिकचे हरी गोविंद वैशंपायन यांची आरोपी मराठे याच्या घरांतील पिस्तुलांसंबंधीं साक्ष झाली. बुधवार दिनांक १६ रोजीं ज्या साक्षीदारांच्या साक्षी झाल्या त्यांत 'विहारी' चे भूतपूर्व संपादक भास्कर विष्णु फडके व मुंबईच्या 'माधवाश्रम'चे व्यवस्थापक धोंडो विष्णु सावळे हे होते. गुरुवार दिनांक १७ रोजीं भास्कर गणेश केळकर, विठ्ठल विनायक सहस्रबुद्धे वगैरेंच्या मागून पेणचे सावकार चिंतामण विठ्ठल जोशी यांची साक्ष झाली. पूर्वीं जबाब देतांना आपण गोंधळून गेलों होतों, आतां सुद्धां आपण थोडे-

फार गोंधळलों आहों, पेणच्या फौजदारांनीं सांगितल्यामुळें आपण पूर्वी कांहीं खोट्या गोष्टी सांगितल्या इत्यादि हकीकत सांगतांना या साक्षीदाराचे डोळे पाण्यानें भरून आले. आरोपी गंगाराम याच्या भावाची साक्ष चालली होती तेव्हां पोलिसांनीं आपल्याला कोणत्या शब्दांत धमकी दिली होती हें त्यानें सांगितलें. "तुझ्या भावाला फांसावर लटकवूं व तुला काळया पाण्यावर धाडूं अशी जरब पोलिसांनीं दिल्यामुळें आपण भ्यालों" असें साक्षीदारानें सांगितलें. शनिवार दिनांक १९--११--१० रोजीं झालेल्या साक्षींत नाशिकचे कापडाचे व्यापारी त्र्यंबक कृष्ण बुरकुले यांची साक्ष झाली. दुकानच्या हिशोबांच्या वह्यांतूनहि स्वातंत्र्यलक्ष्मीच्या नांवाचा उल्लेख करण्याची नाशिकांत पद्धत पडली असल्याचें या साक्षीदारानें सांगितलेल्या माहितीवरून स्पष्ट झालें.

आरोपींपैकीं कांहीं जणांनीं एक सोन्याची सरी, पाटल्या वगैरे वस्तू चोरल्या असें फिर्यादी पक्षाचें म्हणणें होतें. सोमवार दिनांक २१--११--१० व मंगळवार दिनांक २२--११--१० या दोन दिवशीं या मुद्याविषयीं माहिती सांगणाऱ्या कांहीं साक्षीदारांच्या साक्षी झाल्या. सभास्थानाभोंवतीं असलेल्या जाड भिंतीच्या बाहेर उभा राहून, चांदण्यांत भाषणांचीं टिपणें घेऊन व आवाजांवरून बोलणाऱ्या व पदें म्हणणाऱ्या व्यक्तींचीं नांवें निश्चित करून सभेचें इतिवृत्त लिहिणारे काशिनाथ शामराव पाठक यांची साक्ष २२ रोजींच झाली. गणू वैद्य याचा एक आप्त भास्कर सदाशिव ओक याची साक्ष याच दिवशीं सुरू झाली व ती दुसऱ्या दिवशीं संपली. ज्या कधीं घडल्याच नाहींत अशा एक दोन गोष्टी (ब्रह्मगिरी) बावांविरुद्ध सांगण्यास पोलिस मला सांगत होते; पण, मी त्यांचें म्हणणें ऐकलें नाहीं, असें या साक्षीदारानें उलटतपासणींत सांगितलें. बुधवार दिनांक २३--११–१० रोजीं झालेल्या साक्षींत गोविंद सिताराम गोगटे या साक्षीदाराची साक्ष चालू असतां पुढील प्रश्नोत्तरें झालीं.

प्र. :—कायदेशीर साधनानें यश येईनासें झालें तर काय करावयाचें होतें ?

उ. :—होतील ते परिणाम सहन करावयाचे, दुसरें काय !

ज. चंदावरकर :—सरकारला भेवडवावयाचें म्हणजे काय करावयाचें ?

उ. :—गांधी वगैरे इसम ट्रान्सव्हालांत करीत आहेत तसें करावयाचें. जुटीनें वागून सरकारला भेवडवावयाचें आणि जुलमी कायद्याचा प्रतिकार करण्याकरितां पुष्कळ लोकांनीं भराभर तुरुंगांत जावयाचें.

मिदनापूर पोलिसांतील सब इन्स्पेक्टर शरच्चंद्र बानर्जी यांची साक्षहि याच दिवशीं झाली. अलीपूर बॉंब खटल्यांतील आरोपी हेमचंद्र दास यांच्या संबंधींची माहिती या साक्षीदारानें सांगितली. याच दिवशीं नाशिकचे डे. सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस मारुतराव तोरडमल यांची मागें पडलेली साक्ष सुरू झाली व ती गुरुवारीं बराच वेळ चालल्यावर संपली. उलटतपासणींतल्या कांहीं प्रश्नांना उत्तरें देण्याची सक्ती नसावी अशी या साक्षीदारानें एक दोन वेळां कोर्टाला विनंति केली; पण, ती

मान्य झाली नाहीं. शनिवार दिनांक २६-११-१० रोजीं मुंबईचे केमिकल ॲनलायझर कॅप्टन व्हर्नोन हायहॅम यांची साक्ष चालली असतांना, आरोपींपैकीं कित्येकांच्या कार्याला अप्रत्यक्षपणें प्रशस्तिपत्रच देणारीं अशीं कित्येक वाक्यें त्यांच्या तोंडून निघालीं 'दांडेकरानें आपल्या जबाबांत दिलेली पिक्रिक ॲसिडची कृति बरोबर आहे, तिखे यांच्या घरीं सांपडलेला बॉंबचा फॉर्म्युलाहि बरोबर आहे, गणू वैद्य यानें पिक्रिक ॲसिडची जी कृति सांगितली ती खरी आहे; गणेश सावरकर व चेंगिरीराव यांच्या जवळ सांपडलेला व विनायक सावरकरानें 'इंडिया हाऊस' येथें छापलेला बॉंबच्या फॉर्म्युल्याचा मजकूर म्हणजे स्फोटकारक पदार्थ व बॉंबची कृति यांच्या सविस्तर विवेचनाचें एक पुस्तकच आहे ' असें या साक्षीदारानें कबूल केलें.

सोमवार दिनांक २८-११-१० रोजीं झालेल्या कामकाजाच्या ओघांत, सावरकर यांनीं कामाबाईच्या नांवानें धाडलेल्या कुलमुखत्यारनाम्याची हकीकत बाहेर आली. हेग येथील पंच कोर्टासाठीं हा कागद तयार करण्यांत आला असून तो सॉलिसिटर दिवाण यांचे समक्ष तयार झाला होता. या कागदावर गुप्त पोलिसखात्याचे डे. इन्स्पेक्टर जनरल मि. गायडर यांच्या समक्ष सावरकर यांनीं सही केली होती व बॅ. बॅप्टिस्टा यांनीं त्या कागदावर आपली साक्ष घातली होती. मंगळवार दिनांक २९–११–१० रोजीं मि. गायडर यांनीं उलटतपासणींत असें कबूल केलें कीं, आरोपी काशीकर यानें कबुलीजबाब दिला त्याच्या आधीं त्याच्या चुलत्याला सरकारी नोकरींतून सस्पेंड केलें होतें व आतां त्याला फिरून नोकरीवर घेतलें आहे. अहमदाबाद येथें व्हाइसरॉयवर फेंकण्यांत आलेल्या बॉंबसंबंधानें खबर देण्याकरितां लक्ष्मण वासुदेव ब्रह्मे याला चाकरीला ठेविलें होतें; पण, त्याला लौकरच कामावरून दूर केलें, अशीहि माहिती मि. गायडर यांनीं सांगितली. खटला ' कमिट ' करणाऱ्या मॅजिस्ट्रेटांसमोर आरोपींनीं दिलेले जबाब वाचून दाखविण्याचें काम ॲडव्होकेट जनरल करीत होते त्या वेळीं कांहीं आरोपींनीं आपण दिलेले जबाब खोटे असल्याचें सांगितलें. जबाबांचें वाचन झाल्यावर फिर्यादीतर्फेचा पुरावा संपला असल्याचें ॲडव्होकेट जनरल यांनीं सांगितलें.

निरनिराळ्या आरोपींविरुद्ध जो पुरावा दाखल करण्यांत आला होता त्याविषयीं कांहीं खुलासा करावयाचा असेल तर आरोपींनीं तो करावा अशी सूचना सरन्यायाधीशांनीं केल्यामुळें, आरोपींनीं अनुक्रमानें जबाब व पुरवणीजबाब देण्याचें काम सुरू केलें. दिनांक २९-११-१० रोजीं सुरू झालेलें हें काम दिनांक ३-१२-१० रोजीं संपलें. आरोपी महाजन आजारी असल्यामुळें त्यांचा जबाब घेण्यासाठीं सर्व न्यायमूर्ति दवाखान्यांत गेले होते. बहुतेक आरोपींनीं आपले पूर्वींचे जबाब फिरविले. स्वतःचे हाल करण्यांत आले म्हणून अगर स्वकीयांचे हाल होण्याची भीति वाटली म्हणून पूर्वीं आपण हवे ते जबाब दिले, असें कित्येकांनीं सांगितलें. ' पोलिसांनीं छळल्यामुळें १९१० च्या जानेवारींत मला फेफरें येऊं लागलें ' असें आरोपी धारप यांनीं आपल्या

जबाबांत सांगितलें. 'पोलिसच्या छळामुळें मला एकदां इस्पितळांत नेलें होतें, नाशिकासहि माझा छळ झाला. कामटे यांनीं सांगितल्याप्रमाणें मी आपला जबाब लिहून काढला. त्याची पळशीकरांनीं नक्कल केली व त्याजवर मजकडून जबर-दस्तीनें सही घेतली' अशी तक्रार आरोपी डावरे यांनीं केली. गंगाराम रूपचंद आपल्या जबाबांत म्हणाला : पोलिसांनीं दिलेल्या भांगेच्या अंमलांत आणि पोलिस कामदाराच्या उपदेशाच्या मान्यांत पोलिसांनीं जें जें सांगितलें तें तें मी बोललों ! "बाबा देशपांडे यांनीं लिहून तयार ठेवलेल्या कागदांवर मि. पळशीकर यांच्यापुढें मी सही केली आणि मला फांसावर चढविण्यास पुरेल असा तो आहे हें जेव्हां मी ऐकिलें तेव्हां मी आनंदानें तुरुंगांत गेलों," असेंहि या आरोपीनें आपल्या जबाबाच्या पुढील भागांत सांगितलें. इतर सर्व आरोपींचें म्हणणें ऐकून घेतल्यावर सरन्यायाधीश यांनीं सावरकर यांचा जबाब मागितला. तेव्हां ते म्हणाले : मी अगदीं निरपराधी आहें आणि माझी सदसद्विवेकबुद्धि मी गुन्हेगार नाहीं अशी ग्वाही मला देत आहे. माझ्यावरील खटल्याचें काम इंग्लंडमधील न्यायालयांतून चाललें तेव्हां मी त्यांत योग्य तो भाग घेतला. कारण, इंग्लंडमधील सरकार हें लोकायत्त सरकार असल्यामुळें, तेथील न्यायनिर्णयाला लोकसंमतीचा आधार आहे. अशा न्यायनिर्णयां-तून न्याय मिळण्याचा कांहीं तरी संभव असतो; कारण, तीं न्यायालयें केवळ पाशवी सामर्थ्यावर अधिष्ठित झालेलीं नसतात. हिंदुस्थानांतल्या न्यायालयांची स्थिति वेगळी आहे. म्हणून, माझी चौकशी करून निवाडा करण्याचा त्या न्यायालयांचा अधिकारच मला मान्य नाहीं. सबब, मी कोणताहि जबाब देण्याचें नाकारतों. आरोपींतर्फे बचावासाठीं पुरावा देण्याचें नाकारण्यांत आल्यामुळें, फिर्यादीपक्षातर्फे ॲडव्होकेट जनरल यांनीं आपल्या भाषणाला सुरुवात केली.

शनिवार दिनांक ३-१२-१९१० रोजीं सुरू झालेलें ॲड. जनरल यांचें भाषण पुढील शनिवारपर्यंत चाललें होतें. छळ झाल्याविषयीं जवळजवळ प्रत्येक आरोपीनें तक्रार केली असली तरी ती तक्रार विश्वासार्ह कां ठरत नाहीं या प्रश्नाचें उत्तर दिल्यावर ॲड. जनरलमहाशयांनीं प्रत्येक आरोपीविरुद्ध आलेल्या पुराव्याची छाननी केली. आरोपींच्या यादींत बॅ. सावरकर यांचा क्रमांक शेवटचा असूनहि, ॲड. जनरल यांना त्यांच्याविषयींचें विवेचन सर्वांआधीं करणें श्रेयस्कर वाटलें. शनिवार दि. १० रोजीं ॲड. जनरल महाशयांनीं आपलें भाषण संपविलें आणि हत्यारांच्या व ज्वालाग्राही पदार्थांच्या कायद्यांच्या अन्वयें सरकारनें कांहीं आरोपीं-संबंधानें दिलेल्या मंजुऱ्या त्यांनीं दाखल केल्या. याच दिवशीं आरोपींतर्फेच्या वकिलां-पैकीं बॅ. बॅप्टिस्टा यांचें भाषण सुरू झालें. हें भाषण बुधवार दिनांक १४ रोजीं सबंध दिवस चालून त्या दिवशीं संपलें. फिर्यादीतर्फे मांडण्यांत आलेल्या गोष्टींतील अव्यवहार्यता, साक्षीदारांच्या जबाबांतलि विसंगति, मॅजिस्ट्रेट व पोलिस अधिकारी यांनीं केलेल्या कारवाया इत्यादि सर्वांचा विस्तृत परामर्ष घेऊन बॅ. बॅप्टिस्टा यांनीं

असा निष्कर्ष काढिला कीं, 'युद्ध करणें' या गुन्ह्यास अवश्य अशा गोष्टी झाल्याचें फिर्यादीपक्षानें सिद्ध केलेलें नाहीं, कट असल्याचेंहि सिद्ध झालेलें नाहीं आणि कट सिद्ध होण्यास अवश्य लागणारा सहकार आणि संबंध निरनिराळ्या मंडळ्यांत होता, ही गोष्ट सिद्ध झालेली नाहीं.

गुरुवारीं सबंध दिवस बॅ. रांगणेकर यांचें भाषण चाललें होतें व हें भाषण शुक्रवारीं बराच वेळ चालल्यावर संपलें. यानंतर सुरू झालेलें बॅ. गाडगीळ यांचें भाषण मंगळवारीं संपलें. बॅ. चित्रे व बॅ. सेटना यांनीं मिळून पुढील दोन दिवस घेतले. आरोपी गंगाराम रूपचंद यांच्यातर्फे कोणी वकीलबॅरिस्टर काम चालवीत नसल्यामुळें, सर्व बॅरिस्टरांचीं भाषणें आटोपल्यावर त्यांनीं आपलें लिहून आणलेलें भाषण वाचून दाखविलें. ते म्हणाले : तुम्ही राजकारणांत पडूं नका असें मी ज्या मित्रांना सांगत होतों तेच आतां माझ्यावर उलटले असून मी त्यांना शपथा दिल्याचें सांगत आहेत. राजविरुद्ध युद्ध करण्याकरितां मी कटांत सामील झालों नव्हतों— आखाड्यांत जाण्याच्या बाबतींत मी माझे शिष्य म्हणविणाऱ्या कित्येकांच्या विरुद्ध होतों. त्यांनीं मात्र माझ्यावर बहिष्कार घालून माझ्याविरुद्ध युद्ध केलें आहे. माझे हाल करून मला कबुलीजबाब व जबाब देण्यास लाविलें. प्रेम उत्पन्न करण्याचें माझें ब्रीद असून युद्ध करण्याचें माझें ब्रीद नाहीं.

शनिवार दिनांक २४–१२–१९१० रोजीं या खटल्याचा निकाल सांगण्यांत येईल, असें जाहीर करण्यांत आलें होतें. निकाल काय लागणार याचें स्वप्न बहुतेकांना पूर्वींच पडलेलें होतें. बहुतेक आरोपींना शिक्षा होणार, कांहीं जणांना जबरदस्त शिक्षा होणार आणि सावरकर यांना तर जास्तींत जास्त शिक्षा दिली जाणार हें विधिलिखित सर्वांनीं अगोदरच मुखोद्गत करून ठेविलें होतें. शिक्षा सांगितल्यावर आपले बाकीचे मित्र आणि आपला धाकटा भाऊ बाळ आपल्याला कदाचित् जन्मभरसुद्धां भेटण्याचा संभव नाहीं हें सावरकरांना नक्की माहीत होतें. आपल्या बरोबरीच्या सहाभियुक्तांना व बाहेरच्या आपल्या बांधवांना या प्रसंगीं कांहीं तरी आशादायक व स्फूर्तिप्रद संदेश देणें ही गोष्ट आपल्या जबाबदारीचा विचार करतां अवश्य आहे हें ओळखून, सावरकरांनीं दिनांक २३ रोजीं पुढील कविता रचिली व लिहून काढिली. या खटल्यांतले जे आरोपी निर्दोषी ठरून दिनांक २४ रोजीं बाहेर आले, त्यांच्याबरोबर बाहेर आलेली ही कविता पुढीलप्रमाणें आहे. मातृभूमीचें व समाजाचें जें ऋण आपल्याला फेडावयाचें आहे त्यांतला 'पहिला हप्ता' आपण या शिक्षेमुळें फेडीत आहों अशी भावना मनांत ठेवून ही कविता रचली असल्यामुळें, तिला 'पहिला हप्ता' हें यथार्थ नांव देण्यांत आलेलें आहे :

## पहिला हप्ता

मानुनि घे साची। अल्पस्वल्प तरि सेवा अपुल्या अर्भक बालांची॥ध्रु०
ऋण हें बहु झालें। तुझ्या स्तनींचें स्तन्य पाजुनी धन्य अम्हां केलें॥
जननी, धन्य अम्हां केलें॥
ऋण तें फेडाया। हप्ता पहिला तप्त स्थंडिलीं देह अर्पितों हा॥
जननी देह अर्पितों हा॥
सर्वोचि जन्मुनियां। त्वन्मोचन--हवनांत हवी करुं पुनःपुन्हा देहा
जननी पुनःपुन्हा देहा॥
सारथी जिचा अभिमानी। कृष्णजी अणी। राम सेनानी॥
अशि तीस कोटि तव सेना॥
ती अम्हां विना थांबेना॥
परि करुनि दुष्ट-दलदलना॥
रोंविलची स्वकरीं। स्वातंत्र्याचा हिमालयावरि झेंडा जरतारी॥ जननी
(तरिहि तूं) मानुनि घे साची। अल्पस्वल्प ही सेवा अपुल्या अर्भक बालांची॥

आज यां गाजलेल्या खटल्याचा शेवटचा दिवस! मोठ्या बंदोबस्तानें आरोपींना कोर्टांत आणून बसविण्यांत आलें! बडेबडे पोलिस अधिकारी दक्षतेनें बंदोबस्त ठेवीत होते. आरोपींचा हास्यविनोद चाललाच होता. उभय पक्षांची वकील मंडळी निकाल ऐकण्यासाठीं आतुरतेनें व गंभीरपणानें येऊन बसली! आरोपी सगळेच तरुण असल्यामुळें, त्यांना या खटल्याचा निकाल म्हणजे एका महत्त्वाच्या परीक्षेच्या निकालासारखाच वाटत होता. काळेपाण्याची शिक्षा मिळून या परीक्षेंत पहिला वर्ग कोण पटकावणार, सात अगर दहा वर्षें सश्रम कारावासाची शिक्षा मिळून दुसऱ्या वर्गांत कोण उत्तीर्ण होणार आणि निर्दोषी ठरून अगर नाममात्र शिक्षा मिळून नापास कोण होणार यासंबंधींचे अंदाज आणि चर्चा करण्यांत आरोपींचीं मनें वरवर तरी रंगून गेलीं होतीं. इतक्यांत न्यायमूर्ति येत असल्याची ललकारी झाली! न्यायालयांतील शांतता व गांभीर्य यांमध्यें भर पडली! त्रिवर्ग न्यायमूर्ती आसनावर बसले. सरन्यायाधिशांनीं निर्णय वाचण्याला सुरुवात केली. निर्णय वाचून होत असतांना पहिली शिक्षा सांगण्यांत आली ती सावरकरांचीच—जन्म ठेप काळें-पाणी व असेल नसेल त्या मिळकतीची सरकारतर्फे जप्ती ही! ३५ आरोपींपैकीं गायधनी, काथे, बापट, थत्ते, जोग, महाजन, मोघे व के. ग. परांजपे या आठ जणांना दोषमुक्त ठरवून सोडण्यांत आलें. गोखले, कोनकर व डावरे यांना हत्यारांच्या कायद्याखालीं दोषी ठरवून त्या तिघांना ३-३ वर्षें सश्रम कारावासाची शिक्षा सांगण्यांत आली. उरलेल्या आरोपींचें राजाविरुद्ध युद्ध करण्याच्या कटांत अंग असल्याचा आरोप सिद्ध करून न्यायमूर्तींनीं त्यांना वेगवेगळ्या मुदतीच्या शिक्षा दिल्या. चांदवडकर अर्थात्

ब्रह्मगिरीबुवा यांना पंधरा वर्षें काळें-पाणी सांगण्यांत आलें आणि पाटणकर, खरे, व मराठे या त्रयीला दहा वर्षें सश्रम कारावासाची शिक्षा देण्यांत आली. चंद्रात्रे, दांडेकर, धारप, गोऱ्हे व भट या पांडवांना पांच वर्षें सश्रम कारावास, शिधये, पाळंदे, दा. चिं. परांजपे व भावे या चौकडीला चार वर्षें सश्रम कारावास, केळकर व टोणपे या दुकलीला तीन वर्षें सश्रम कारावास आणि तिखे, बरवे, व काशीकर या त्रयीला दोन वर्षें सश्रम कारावास अशा शिक्षा सांगून त्यांची बोळवण करण्यांत आली. मनोहर, गंगाराम रूपचंद, आंबडेकर व ना. दा. सावरकर या चौघांनीं प्रत्येकीं सहा महिने सश्रम कारावासाची शिक्षा भोगली म्हणजे काम भागेल, असें न्यायमूर्तींनीं ठरविलें !

अशा कठोर शिक्षा सांगण्यांत आल्यामुळें हे तरुण आरोपी दबून जातील अशा विश्वासानें न्यायमूर्तींनीं आपलीं आसनें सोडलीं. ते जावयाला निघतांच पोलिस अधिकारी, वकील वर्ग वगैरे सर्वजण जागच्या जागीं उभे राहिले. भोंवतालीं संपूर्ण शांतता आपलें साम्राज्य नांदवीत होती इतक्यांत 'स्वातंत्र्यलक्ष्मी की जय !' हा जयघोष एका क्षणांत व एका ठेक्यांत सर्व आरोपींच्या कंठांतून बाहेर उमटला. याच जयघोषाच्या नादीं लागल्यामुळें या तरुणांना अशा कठोर शिक्षा झाल्या होत्या. तरीहि त्यांचीं दुर्दम्य मनें त्याच जयघोषांत अद्याप रंगून रहात आहेत, हें पाहून न्यायमूर्तींना आश्चर्य वाटलें ! पोलिस खात्यांतले जे घाशीराम कोतवाल त्या ठिकाणीं उपस्थित होते त्यांना हा शिस्तभंग असह्य वाटला ! ' पकडो ! मारो ! ! अब कैदी है ' अशा आरोळ्या ठोकून गायडरसाहेब या तरुणांना दटावूं लागले ! फिरून एकवार तोच पवित्र जयघोष वातावरणांत दुमदुमून गेला ! पोलिस अधि-काऱ्यांनीं सावरकरांच्या हातांत हात-कडी अडकविली ! आरोपींच्या पिंजऱ्यांतून त्यांना एकट्यालाच प्रथम बाहेर काढून ते त्यांना घेऊन चालले ! त्यांनींहि जातां जातां आपल्या मित्रांना प्रणाम केला ! ' आतां नाहीं येणें जाणें । सहज खुंटलें बोलणें ' ही तुकाराममहाराजांची उक्ति ऐकून जो भाव सामान्यतः सर्व माणसांच्या मनांत संचरतो तोच भाव हा प्रणाम करणाऱ्या सावरकरांच्या मनांत त्या वेळीं संचरला असेल, असें मानावयाला हरकत नाहीं.

या खटल्याच्या शेवटीं न्यायमूर्तींनीं जो निर्णय दिला तो पुष्कळच लांबलचक आहे. यापूर्वीच्या कांहीं प्रकरणांतून सावरकरांच्या विविध उद्योगांचें जें वर्णन करण्यांत आलें आहे त्या वर्णनावर या खटल्यांतील निर्णयामुळें न्यायालयाचें शिक्का-मोर्तबच झालें. १९०६ पूर्वींपासूनच 'मित्रमेळा' ही संस्था अस्तित्वांत असून, नाशिक, पुणें, मुंबई, पेण, येवलें, औरंगाबाद इत्यादि ठिकाणीं या संस्थेच्या क्रांतिकारक कटाचें कार्य चाललें होतें असा निष्कर्ष काढून, सावरकर इंग्लंडला गेले या टप्प्या-पर्यंत न्यायमूर्तींनीं प्रवास केला आहे व या सुमारास 'मित्रमेळा' या संस्थेचें 'अभिनव भारत' संस्थेंत रूपांतर झाल्याचें त्यांनीं कबूल केलें आहे. ' अभिनव भारत ' संस्थेचा

पोलिसांना संशय आलेला असूनहि, संस्थेच्या गुप्त कार्यपद्धतीमुळें जॅक्सन–खुनापर्यंत संस्थेविरुद्ध कांहीं करण्याला ते प्रवृत्त झाले नाहींत असें म्हटल्यावर, न्यायमूर्तींनीं 'अभिनव भारत' या संस्थेची रशियांतील क्रांतिकारक संस्थांशीं तुलना केली आहे. निर्णयांतील हा भाग मुळांत जसा आहे तसाच उद्धृत करणें श्रेयस्कर आहे :

There is evidence in the shape of certain documents found in the Possession of the accused Kashikar, shortly after the arrest of Ganesh Savarkar in 1909, which indicates that the association aimed at some sort of organisation founded upon the model of Revolutionary Societies in Russia. The suggested methods of preparation for war are the purchase and storing of weapons in neighbouring countries to be used when opportunity should occur, the opening of many very small but secret factories at some distance from one another for the manufacture of weapons clandestinely in the country seeking independence and the purchase by secret societies of weapons in other countries to be secretly imported in merchantships

( १९०९ सालीं गणेशपंत सावरकरांना अटक झाली. त्यानंतर थोडक्याच काळांत आरोपी काशीकर यांच्याजवळ कांहीं कागदपत्र सांपडले. या कागदपत्रांच्या पुराव्यावरून असें दिसतें कीं, रशियांतल्या क्रांतिकारक संस्थांच्या धर्तीवर कांहीं तरी संघटना करण्याचा 'अभिनव भारत' संस्थेचा हेतु होता. शेजारच्या देशांतून शस्त्रास्त्रें विकत घ्यावयाचीं, त्यांचा सांठा करून ठेवावयाचा व प्रसंग येतांच हीं शस्त्रास्त्रें उपयोगांत आणावयाचीं, स्वातंत्र्योत्सुक देशांतच गुप्तपणें शस्त्रास्त्रें निर्माण व्हावीं म्हणून एकमेकांपासून कांहीं अंतरावर लहानलहान पण गुप्त असे पुष्कळ कारखाने सुरू करावयाचे आणि, गुप्त संस्थांनीं परदेशांत शस्त्रास्त्रें खरेदी करून तीं मालवाहू गलबतांतून गुप्तपणें आणावयाचीं हे युद्धाच्या तयारीचे मार्ग सुचविण्यांत आले होते. )

सावरकरांनीं लंडनमध्यें 'मॅझिनीचें चरित्र' कसें व केव्हां लिहिलें, या पुस्तकाच्या प्रस्तावनेत राजकारणाचें विवेचन कोणत्या पद्धतीनें केलेलें आहे हें पुस्तक हिंदुस्थानांत छापून होतांच तें लोकप्रिय कसें झालें, या पुस्तकांत सूचित केल्याप्रमाणें सावरकरांचे मित्र महाराष्ट्रांत संघटना कशी करूं लागले, सावरकरांनीं १८५७ सालच्या 'बंडाचा' वृत्तान्त 'स्वातंत्र्ययुद्ध' या नांवानें कसा प्रसिद्ध केला, बॉंब वगैरे स्फोटक पदार्थांच्या निर्मितीची पद्धत सांगणारीं पत्रकें तयार करून सावरकरांनीं तीं हिंदुस्थानांत कशीं धाडून दिलीं, 'इंडिया हाउस' मधील आचारी चतुर्भुज याच्याबरोबर त्यांनीं २० ब्राऊनिंग पिस्तुलें हिंदुस्थानांत कशीं धाडून दिलीं इत्यादि गोष्टी संगतवार सांगून झाल्यावर न्यायमूर्तींनीं आपल्या निर्णयांत धिंग्रा-प्रकरणानंतर लिहिण्यांत आलेल्या 'वंदे मातरम्' पत्रकाचा उल्लेख केला आहे. या पत्रकाविषयीं आपलें मत मांडतांना न्यायमूर्तींनीं पुढील उद्गार काढिले आहेत :

The pamphlet strongly advocates political assassination in India and whether or not it is from the pen of Vinayak savarkar, it at all events

represents doctrines which he was anxious to disseminate in India. The following passage may be quoted as indicating its aim : ' Terrorise the officials and the collapse of the whole machinery of oppression is not very far. The persistent execution of the policy that has been so gloriously inaugurated by Khoodiram Bose, Kanialal Dutt and other martyrs will soon cripple the British Government in India. This campaign of separate assassinations is the best conceivable method of paralysing the bureaucracy and of arousing the people. The initial stage of the Revolution is marked by the policy of separate assassinations.'

( हिंदुस्थानांत राजकीय स्वरूपाचे खून व्हावे या मताचा या पत्रकांत फार जोरानें पुरस्कार करण्यांत आलेला आहे. हें पत्रक स्वतः विनायकराव सावरकरांनीं लिहिलें असेल वा नसेल; हिंदुस्थानांत ज्या तत्त्वांचा प्रसार करण्याबद्दल ते उत्सुक होते तींच तत्त्वें या पत्रकांत प्रतिबिंबित झालीं आहेत, हें तरी निश्चित आहे. या पत्रकाच्या हेतूच्या दिग्दर्शनासाठीं पुढील उतारा उद्धृत करण्यासारखा आहे : सरकारी नोकरांमध्यें दहशत उत्पन्न करा कीं जुलूम करणारें सगळें यंत्र लौकरच जमीनदोस्त होईल. खुदीराम बोस, कन्हयालाल दत्त आणि इतर हुतात्मे यांनीं उदात्तपणें घालून दिलेल्या धोरणाचा सतत आचार घडेल तर भारतांतील ब्रिटिश सरकार लौकरच लुलेंलंगडें बनेल ! नोकरशाहीच्या नाड्या आंखडण्याच्या दृष्टीनें व लोकांना जागृत करण्याच्या दृष्टीनें पाहिल्यास, वैयक्तिक खून करण्याची मोहिम हीच कल्पनेला पटणारी सर्वोत्तम रीत होय. वैयक्तिक खून करण्याचें हें धोरणच क्रांतीच्या प्राथमिक अवस्थेचें वैशिष्टय ठरत असतें.') हिंदी संस्थानिकांना उद्देशून लिहिलेल्या पत्रकाचा उल्लेख करून व त्या पत्रकाची संगति लावण्याचा प्रयत्न करून न्यायमूर्ति शेवटीं ' Oh Martyrs ' या पत्रकांतील पुढील उताऱ्याकडे प्रामुख्यानें वळले आहेत :

The war began on the 10 th of May 1857 is not over on the 10 th of May 1908, nor can it ever cease till a 10 th of May to come. sees the destiny accomplished

( १८५७ सालीं १० मेला सुरू झालेला संग्राम १९०८ च्या १० मेपर्यंत संपलेला नाहीं. भविष्यकाळीं केव्हां तरी १० मे उजाडून इष्ट तें भवितव्य साध्य झाल्याविना हा संग्राम केव्हांहि थांबणार नाहीं. )

ही सर्व माहिती कालक्रमवार दिल्यावर न्यायमूर्तींनीं सावरकरांबद्दल पुढील निष्कर्ष काढून त्यांना दिलेल्या शिक्षेचें समर्थन केलें :

We find the accused guilty of the abetment of waging war by instigation, by the circulation of printed matter inciting to war, the providing of arms and the distribution of instructions for the manufacture of explosives. He is, therefore, guilty of an offence punishable under section 121 A of the Indian Penal Code. We also find him guilty of conspiring with others of the accused to overawe, by criminal force or show of criminal force the Government of India and the Local Government.

( चिथावणी देऊन, युद्धाला प्रोत्साहन देण्याला वाङ्मयाचा प्रसार करून, शस्त्रास्त्रें पुरवून आणि स्फोटक पदार्थांच्या निर्मितीबद्दलच्या सूचना करून आरोपीनें युद्धाला मदत केली हा आरोप आम्हीं सिद्ध समजतों. म्हणून, इं. पि. कोडच्या १२१ अ कलमान्वयें ज्याला शिक्षा देतां येते असा गुन्हा आरोपीनें केला आहे. ज्याला गुन्ह्याचें स्वरूप आहे अशा जबरदस्तीनें अगर अशा जबरदस्तीच्या देखाव्यानें हिंदुस्थानसरकारला व स्थानिक सरकारला भयभीत करून टाकण्याचा कट आरोपीनें इतर आरोपींच्या सहकार्यानें केला, ही गोष्टसुद्धां आम्हीं सिद्ध समजतों. )

सावरकरप्रभृति आरोपींना या खटल्यांत अशा जबरदस्त शिक्षा देण्यांत आल्यामुळें सरकारचा कार्यभाग वस्तुतः संपला होता. एका जन्मठेपेची शिक्षा भोगून सावरकर १९३५ अगर १९३० सालीं परत येथील त्या वेळीं जगाची रंग-रंगोटी कशी काय पालटलेली असेल, त्या पालटलेल्या परिस्थितींत सावरकर काय करतील हें त्या वेळीं पाहतां येईल, असा विचार करून सरकारनें हें प्रकरण येथेंच आंवरतें घेतलें असतें तर कांहींहि बिघडलें नसतें. पण, सावरकरांवरील दुसरा खटला—म्हणजे जॅक्सन-खुनाला मदत केल्याविषयींचा खटला—सुरू करण्याची हटवादी मनीषा सरकारनें व्यक्त केली. पहिल्या खटल्याचा निकाल लागल्याबरोबर नाताळची सुट्टी सुरू झाली व त्यामुळें या खटल्याचें काम पुढें जानेवारी महिन्यांत सुरू करण्यांत येईल, असें जाहीर करावें लागलें. सोमवार दिनांक २३-१-१९११ रोजीं या दुसऱ्या खटल्याचा प्रारंभ पूर्वीच्या खटल्यांतल्या न्यायाधीशांच्या स्पेशल ट्रायब्यूनलपुढेंच करण्यांत आला व दिनांक ३०-१-१९११ रोजीं या खटल्याचा निकालहि सांगण्यांत आला. पण, या खटल्याची हकीकत सांगावयाला एकदम सुरुवात करून, न्यायमूर्तींना मिळालेल्या नाताळच्या विश्रांतींत व्यत्यय आणणें श्रेयस्कर नसल्यामुळें, मध्यंतरीं घडलेल्या एका मनोरंजक प्रकरणाची माहिती अगो-दर सांगून टाकणें इष्ट आहे. हें प्रकरण खुद्द इंग्लंडमध्यें घडलें व त्यांत सर हेन्री कॉटनसारख्या वजनदार इंग्रजाचा संबंध आला. 'माझी जन्मठेप' या आपल्या ग्रंथाच्या पूर्वार्धांत[१] स्वतः सावरकर यांनीं या प्रकरणाचा ओझरता उल्लेख केला आहे. सावरकर या शब्दाला इंग्लंडमधले प्रतिष्ठित लोक त्या वेळीं कसे बुजत असत, दूरान्वयानेंहि सावरकर यांच्यांबद्दल कोणी भली भावना व्यक्त केली तर त्या वेळच्या इंग्लंडमधल्या बड्या धेंडांचें पित्त कसें उसळत असे आणि अशा प्रकारची भली भावना व्यक्त करणाऱ्यावर चोहोंकडून भडिमार कसा केला जात असे, हें या प्रकरणामुळें उत्तम प्रकारें सिद्ध होत असल्यामुळें, या प्रकरणाचा निर्देश करणें अवश्य आहे.

त्या वेळीं इंग्लंडांत असलेले हिंदी देशभक्त बाबू बिपिनचंद्र पाल यांनीं १९११ साल उगवलें म्हणून, या उगवत्या संवत्सराच्या स्वागतार्थ आपल्या घरीं एक लहा-

---

१ पृ. ११—१२.

नसा समारंभ केला. या समारंभाला निमंत्रित या नात्यानें जी मंडळी उपस्थित होती त्यांत सर हेन्री कॉटन हे प्रमुख होते. समारंभाला जी तरुण मंडळी उपस्थित होती त्यांतली पुष्कळशी मंडळी सावरकरांच्या मित्रपरिवारांतली होती. बिपिन-बाबूंचे चिरंजीव श्री. निरंजन पाल हे सावरकरांचे जिवा-भावाचे स्नेही असल्यामुळें व 'इंडिया हाऊस' बंद पडल्यावर कांहीं दिवस सावरकरांचें वास्तव्यच बिपिनबाबूं-च्या घरीं असल्यामुळें, सभास्थानीं सावरकरांचें एक छायाचित्रहि दिसत होतें. सर हेन्री कॉटन यांच्यावर समोरच्या हिंदी तरुणांना उपदेशपर असे चार शब्द सांगण्याचा प्रसंग आला तेव्हां त्यांनीं सावरकरांची मोठी घसघशीत स्तुति केली, असेंहि नाहीं! स्वातंत्र्योत्सुक भारताच्या प्रगतीसाठीं हिंदी तरुणांनीं आशावादीपणानें व नेटानें—झटलें-झगडलें पाहिजे इत्यादि मामुली उपदेश केल्यावर, कॉटनसाहेबांनीं सावरकरांच्या बुद्धिमत्तेचा व साहसीपणाचा नुसता उल्लेख केला. तरुणांनीं आपल्या ठिकाणचे असे सद्गुण सावरकरांप्रमाणें वांया घालवूं नयेत असाहि इषारा देण्याला सरसाहेब विसरले नाहींत. 'आपल्याला फिरून फ्रान्समध्यें धाडण्यांत यावें' ही सावरकरांची मागणी आंतरराष्ट्रीय कायद्याच्या दृष्टीनें रास्त आहे असें वाटल्यामुळें सरसाहेबांनीं असें मात्र म्हटलें कीं, सावरकरांची ही मागणी मान्य होईल अशी आशा मला वाटत आहे. समारंभाला उपस्थित असलेल्या मंडळींपैकीं कोणाच्या ध्यानींमनींहि नव्हतें कीं, या साध्या वाक्यांमुळें इंग्लंडमधलीं सारीं वृत्तपत्रें सरसाहेबांवर तुटून पडतील!

पण, या साध्यासुध्या उद्‌गारांमुळें भोंवतालच्या वातावरणांत भलताच भडका उडाला! आय्. सी. एस्. च्या पोलादी चौकटींत घटलेल्या, भारताच्या कुरणांत चरूनचरून भल्या लट्ठ पगाराच्या व अधिकाराच्या जागेपर्यंत पोंचल्यानें प्रतिष्ठा पावलेल्या आणि अद्यापहि पेन्शन घेत असलेल्या एका गाऱ्या इसमानें सावरकरांबद्दल इतकीहि सहानुभूति दाखवावी हें इंग्लंडमधील लोकमताला सहन झालें नाहीं! त्या वर्षींच्या इंडियन नॅशनल काँग्रेसचे अध्यक्ष वेडरबर्नसाहेब यांनीं व्हाइसरॉयच्या गळ्यांत हार घालून त्यांचा गौरव करावा—व अशा रीतीनें आपली राजनिष्ठा व्यक्त करावी आणि त्याच वेळीं त्यांच्याच जातींतले कॉटनसाहेब यांनीं सावरकरांबद्दल असें ममत्व दाखवावें या घटनेचा कांहीं तरी गूढ अर्थ असला पाहिजे अशी स्वतःची खोटीच समजूत करून घेऊन, इंग्लिश लोक आपले मेंदू उगीचच शिणवूं लागले. कॉटनसाहेबांची 'सर' पदवी काढून टाका अशी सूचना कित्येकांकडून करण्यांत आली तर कित्येकांनीं असेंहि सुचविलें कीं, कॉटनसाहेबांना मिळत असलेलें पेन्शन सरकारनें बंद करून टाकावें! काँग्रेसशीं संबंध असलेल्या एका इंग्रजाच्या उक्तीमुळें इंग्लंडमध्यें इतका लोकक्षोभ निर्माण झाला असें दिसतांच, काँग्रेसचे हिंदुस्थानांतले प्रमुख बरेच भयभीत झाले. शेवटीं, वेडरबर्न व सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं कलकत्त्या-च्या एका सभेंत या विषयाकडे मुद्दाम वळून कॉटनसाहेबांच्या उद्‌गारांविषयींचें स्पष्टीकरण केलें! इतकें झालें तेव्हां कुठें 'चहाच्या कपांतलें हें वादळ' शांत झालें!

सोमवार दिनांक २३–१–१९११ रोजीं सावरकर यांजवरील दुसरा खटला पूर्वीच्याच न्यायाधीशमंडळापुढें पूर्वीच्याच स्थळीं सुरू झाला. नाशिकचे कलेक्टर मि. जॅक्सन यांचा खून करण्याला मदत केल्याचा आरोप या खटल्यांत सावरकर यांच्यावर ठेवण्यांत आला होता. कटाच्या खटल्यांत सावरकर यांना जी जबरदस्त शिक्षा देण्यांत आली तिनें सरकारचें समाधान झालें नाहीं, सरकारनें हट्टानें हा दुसरा खटला उभा केला, त्या अर्थी सावरकरांना शक्य तर फांसावर लटकवण्याचा सरकारचा उद्देश आहे असें अनेक लोकांना या वेळीं वाटूं लागलें. खटला नीटपणीं लढविला गेला तर सरकारचें हें मनोराज्य सहज कोसळवितां येईल असें वाटून अनेक इष्टमित्रांनीं—व स्वतः बॅ. बॅप्टिस्टा यांनीं—'खटला लढवा' असा सावरकरांच्या मागें लकडा लाविला. सावरकरांची नुसती संमति मिळाल्याबरोबर उत्तमांतल्या उत्तम बॅरिस्टराच्या हातीं खटल्याचें काम देण्याच्या दृष्टीनें सर्व तयारीहि झाली होती; पण, आतां बॅरिस्टर दिल्यानें पहिल्या खटल्यांत घेतलेली तर्कशुद्ध भूमिका निष्कारण सुटते म्हणून व बॅरिस्टर देऊन खटल्यांत भाग घेतला कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांतल्या न्यायालयाचा अधिकार मान्य केल्यासारखें होईल व मग हेग येथील निर्णयावर त्याचा प्रतिकूल परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं हें ओळखून, सावरकरांनीं खटल्यांत भाग न घेण्याचा निर्धारच कायम ठेविला. स्ट्रँगमन, इन्व्हॅररिटी, लौंडिस, जार्डिन, वेलिणकर प्रभृति विधिविशारद सरकारची बाजू सजविण्याला सज्ज झाले !

खटल्याचें काम सुरू होऊन सावरकर यांजवरील आरोप वाचून दाखविण्याचें औपचारिक काम संपल्यावर, सावरकरांनीं आपलें म्हणणें मांडावें अशी सूचना त्यांना करण्यांत आली. तेव्हां त्यांनीं पुढील आशयाचें उत्तर दिलें :

*ज्या आरोपांसाठीं मला फ्रेंच भूमीवर बेकायदेशीरपणें अटक करण्यांत आली त्यांपैकींच हा एक आरोप आहे, या गोष्टीकडे मी न्यायमूर्तींचें लक्ष वेधूं इच्छितों. परिस्थिति अशी असल्यामुळें मी एकसारखा फ्रेंच राष्ट्राच्याच अधिकाराखालीं आहें. मला झालेली अटक कायदेशीर नसली तरीहि या न्यायालयाचा माझ्यावर अधिकार चालतो, असें न्यायमूर्तींनीं मानलें तर या खटल्याच्या कामांत कोणताहि भाग घेण्याला नकार देण्याशिवाय मला दुसरा मार्गच उरत नाहीं. अर्थातच, जॅक्सनच्या खुनाला मदत करण्याच्या बाबतींत माझा प्रत्यक्ष अगर अप्रत्यक्ष रीतीनें कांहींहि संबंध नाहीं.*

साक्षीपुराव्याला सुरुवात होण्यापूर्वीं सरकारतर्फें एक विनंति करण्यांत आली. नाशिक कटाच्या खटल्यांत मुंबईचे श्री. गोपाळराव पाटणकर यांना १५ वर्षें काळ्या पाण्याची शिक्षा देण्यांत आली होती. "पाटणकरांची शिक्षा वाढली पाहिजे असा आग्रह सरकार धरणार नाहीं; पण, त्यांना जर या खटल्यांत सावरकरांचे सहाभियुक्त (Co-accused) म्हणून गोंविलें नाहीं तर, मागील खटल्यांत त्यांनीं

सावरकरांविरुद्ध जो कबुलीजबाब दिला आहे त्याचा उपयोग करणें फार जड जाईल. सबब, सहाभियुक्त म्हणून त्यांना या खटल्यांत उभें करावें " असा सरकारी अर्जाचा आशय होता. सरन्यायाधीशांनीं हा अर्ज अमान्य केला. नाशिकचे मुखत्यार वकील श्री. रघुनाथ व्यंकटेश गोसावी यांना पहिले साक्षीदार म्हणून पुकारण्यांत आलें. सोमवारीं त्यांची साक्ष अपुरी राहिली होती ती मंगळवारीं पुरी करण्यांत आली. खटल्यांत भाग न घेण्याचें धोरण सावरकर यांनीं कायम ठेविलें असल्यामुळें, त्यांनीं या किंवा दुसऱ्या कोणत्याच साक्षीदाराची उलटतपासणी घेतली नाहीं.

पोलिस कॉन्स्टेबल वामन नरहर दाते व इन्स्पेक्टर पिंगळे यांनीं १९०६ सालीं झालेल्या सावरकर यांच्या कांहीं व्याख्यानांचे रिपोर्ट ओळखले. इगतपुरीचे रेल्वे-कारकून सिंधेकर, पुण्याचे केशवराव गोंधळेकर, नाशिकचे पो. इन्स्पेक्टर बल्लाळ व पोलिस कॉन्स्टेबल पाटक यांच्या साक्षी याच दिवशीं झाल्या. 'इंडिया हाउस' मधील आचारी चतुर्भुज पटेल याची साक्ष बुधवार दि. २५-१-११ रोजीं झाली. 'इंडिया हाउस' मधील सभांतून जहाल मतें प्रतिपादिलीं जात असें नसून, शेकोटीभोंवतीं बसून ज्या गप्पा चालत त्यांतहि अशाच मताचें प्रतिपादन होत असे; 'इंडिया हाउस' च्या बाहेरहि लंडनमध्यें हिंदी तरुणांच्या गुप्त सभा होत असत; कर्झन वायलीला मारणारा मदनलाल धिंग्रा कांहीं दिवस 'इंडिया हाउस' मध्यें रहात होता; पिस्तुलें तयार करण्याची विद्या शिकण्यासाठीं कोणाला तरी बेल्जमला पाठविण्याचा विचार सावरकर यांच्या मनांत घोळत होता, इत्यादि गोष्टी या साक्षीदाराच्या तोंडून बाहेर आल्या. इन्स्पेक्टर फव्हेल यांची साक्ष झाल्यावर गोपाळराव पाटणकर यांना साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत उभें करण्यांत आलें.

साक्षीदार म्हणून शपथ घेण्याची वेळ येतांच गोपाळराव पाटणकर यांची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. शेवटीं त्यांनीं शपथ घेण्याला स्पष्ट शब्दांत नकार दिला. माझ्या देशबंधूविरुद्ध साक्ष देण्यास मी नाखूष आहें असें सांगून पाटणकर मोकळे झाले! उत्तरें देण्याविषयींचा हुकूम सरन्यायाधिशांनीं दोनदां धीरगंभीर आवाजांत उच्चारला; तरीहि पाटणकर याची वृत्ति अचल राहिली. अखेरीस नाइलाज झाला; व पाटणकरांना कोर्टांतून घेऊन जाण्याबद्दलचा हुकूम देण्याचा न्यायमूर्तींवर प्रसंग आला. 'विहारी' पत्राचे संपादक श्री. फडके यांची साक्ष आटोपतांच, कोर्टाचें दि. २५-१-११ चें काम संपलें. गुरुवार दिनांक २६ रोजीं नाशिकचे त्रिंबक कृष्ण बुरकुले, मुंबईच्या माधवाश्रमाचे मालक श्री. सावळे, मि. गायडर इत्यादींच्या साक्षी झाल्यावर जॅक्सन खुनाच्या खटल्यांत फांशी गेलेले श्री. कर्वे व देशपांडे यांचे त्या खटल्यांतले जबाब वाचून दाखविण्यांत आले व ते पुराव्यांत दाखल करण्यांत आले. श्री. गोपाळराव पाटणकर यांना या दिवशीं फिरून साक्षी-दाराच्या पिंजऱ्यांत उभें करण्यांत आलें. या वेळींहि त्यांनीं शपथ घेण्याला नकारच दिला; पण, विचारलेल्या थोडक्याशाच प्रश्नांना त्यांनीं कशीं तरीं उत्तरें मात्र दिलीं!

जॅक्सनच्या खुनाच्या खटल्यांत दोन वर्षें सश्रम कारावासाची शिक्षा मिळवून ती भोगीत असलेले श्री. द. पां. जोशी, यांची शुक्रवार दि. २७ रोजीं साक्ष झाल्यावर अंकुशकर व इतर कांहीं किरकोळ साक्षीदार यांनाहि याच दिवशीं पुकारण्यांत आलें. नाशिकचे डेप्युटि सुपरिंटेंडेंट ऑफ पोलिस तोरडमल यांची साक्ष आटोपल्यावर मि. गायडर यांना फिरून पुकारून कांहीं प्रश्न विचारण्यांत आले. सावरकरांच्या बरोबर इंग्लंडहून आलेले ब्रि. हेरखात्यांतले अधिकारी मि. पार्कर यांची साक्ष संपल्यावर कोर्टाचें या दिवसाचें काम आटोपलें व सरकारतर्फेचे साक्षीदारहि संपले. शनिवारीं प्रथमतः खटला कमिट करणाऱ्या मॅजिस्ट्रेटपुढें सावरकर यांनीं दिलेला जबाब दाखल करून घेण्यांत आला. "माझ्यातर्फेचा खुलासा मी वरिष्ठ कोर्टांत करीन" इतकाच त्रोटक जबाब देऊन सावरकर मोकळे झाले होते. आरोपीतर्फे कांहीं साक्षीपुरावा द्यावयाचाच नव्हता! स्वतःतर्फेचा खुलासा म्हणून सावरकरांनी पुढील जबाब दिला :

*मि. जॅक्सन यांच्या खुनाशीं माझा कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं, असें मी निक्षून सांगितलें आहे. हल्लींच्या स्थितींत खटल्यांत सामील न होण्याखेरीज दुसरा कोणताहि मार्ग मला अवलंबितां येत नाहीं. खटल्यांत जो पुरावा पुढें आला आहे त्यांत मला अनुकूल असा भाग बराच आहे— गणू वैद्य व गोसावी यांच्या साक्षींतला भाग असा आहे; पण, मी कोणत्याहि प्रकारें खटल्यांत सामील होऊं शकत नाहीं.*

ॲडव्होकेट जनरल यांचें भाषण संपल्यावर सावरकर यांनीं आपल्याला कांहीं बोलावयाचें आहे असें कोर्टाला कळविलें. त्यामुळें सावरकर यांना आरोपीच्या पिंजऱ्यांतून काढून, बॅरिस्टर बसतात त्या टेबलाजवळ नेण्यांत आलें. त्यानंतर न्यायाधिशांना उद्देशून सावरकरांनीं पुढील आशयाचें भाषण केलें :

*जॅक्सनच्या खुनाशीं माझा प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कसलाच संबंध नाहीं असें मी अजूनहि म्हणतों. सध्यां मी चमत्कारिक परिस्थितींत असल्यामुळें, या खटल्यांत कोणताच भाग न घेतां तटस्थ राहणें मला भाग आहे. मी खटल्यांत भाग घेऊं शकलों असतों तर माझ्यावरील पहिला आरोप तरी मी नाशाबीत ठरविला असता. माझा पाटणकरांशीं संबंध जोडणारा किंवा पाटणकर व कर्वे यांच्यामधील संबंध दाखविणारा कोणताच पुरावा कोर्टापुढें आलेला नाहीं. मी खुनाला प्रोत्साहन दिलें असें म्हणण्याला उपयुक्त पुरावा म्हणजे चेंगिरीरावाजवळ सांपडलेलें 'वंदे मातरम्' चोपडें! पण, या पुराव्याचाहि संबंध जॅक्सनच्या खुनाशीं जोडतां येणार नाहीं; कारण, तें चोपडें जॅक्सनच्या खुनानंतर धाडलें गेलें, असें साक्षीपुराव्यांत निष्पन्न झालें आहे.*

सोमवार दि. ३०-१-११ रोजीं न्यायमूर्तींनीं या खटल्याचा निकाल सांगितला. इंग्लंडांत जाण्यापूर्वींचें आरोपीचें चरित्र व आरोपीनें इंग्लंडांत असतांना केलेलीं कृत्यें असे साक्षीपुराव्याचे दोन भाग कल्पून न्यायमूर्तींनीं असा निष्कर्ष काढला कीं, आरोपीनें पाठविलेलीं पिस्तुलें सरकारी अधिकाऱ्यांचे खून करण्यासाठींच पाठविलीं होतीं व आरोपीनें धाडिलेल्या पत्रकांतून असे खून करण्याचा उपदेश करण्यांत आलेला होता. आरोपीनें जॅक्सनच्या खुनाला मदत केली हा आरोप सिद्ध समजून, न्यायमूर्तींनीं आरोपी सावरकर यांना जन्मठेप काळया पाण्याची शिक्षा ठोठावली !

ही कठोर शिक्षा सांगण्यांत आल्यावर सावरकर यांनीं पुढील संस्मरणीय उद्‌गार न्यायालयांत काढले असें चित्रगुप्तविरचित सावरकर चरित्रांत[1] सांगण्यांत आलें आहे :

I am prepared to face ungrudgingly the extreme penalty of your laws in the belief that it is through sufferings and sacrifice alone that our beloved Motherland can march on to an assured, if not a speedy, triumph.

( तुमच्या नियमनिर्बंधांनुसार तुम्ही जी परमावधीची शिक्षा मला सांगितली आहे, ती निमूटपणें सोसण्याला मी सिद्ध आहें. आमची प्रिय मायभूमि तात्कालिक नसली तरी शाश्वतीच्या विजयाप्रत पोंचावयाची ती हालअपेष्टा व स्वार्थत्याग या मार्गांनींच पोंचेल, अशी माझी श्रद्धा आहे. )

हे शब्द उच्चारून, ' **सारथी जिचा अभिमानी, कृष्णजी अणी राम सेनानी** ' हे पूर्वीं अशा प्रसंगासाठीं रचिलेल्या स्वतःच्याच कवितेतले शब्द स्वतःशींच गुणगुणत, उरलेलें आयुष्य कोणत्या ना कोणत्या तरी तुरुंगाच्या अंधेरींत घालवावें लागणार अशी मनाशीं खात्री बाळगीत, सावरकर तेथून निघाले व डोंगरीच्या तुरुंगांतल्या आपल्या कोठडींत जाऊन पडले !

सावरकरांना ही दुसरी जन्मठेपेची शिक्षा सांगण्यांत आली तोंपर्यंत ते डोंगरीच्या तुरुंगांतच होते. हेग प्रकरणाचा निकाल लागून, तो हिंदुस्थान सरकारमार्फत या तुरुंगाच्या अधिकाऱ्यांपर्यंत येऊन पोंचेपर्यंत १९११ चा फेब्रुवारी महिना संपत आला होता. दोन जन्मठेपींची शिक्षा सांगण्यांत आली असली तरी हेगच्या निकालाची भुणभुण मिटलेली नसल्यामुळें, तो निकाल तुरुंगांत कळेपर्यंत सावरकरांना अन्न व वस्त्र या बाबतींत सामान्य कैद्याचा दर्जा देण्यांत आलेला नव्हता. हेगच्या निकालावर सावरकरांची मोठीशी भिस्त नव्हतीच; त्यामुळें, कदन्नाची संवय व्हावी म्हणून कैद्याचें अन्न प्रत्यक्ष मिळूं लागण्याआधींच त्यांनीं तें अन्न अंगवळणी पडावें यासाठीं प्रयत्न सुरू केले होते. शेवटीं हेगचा निकाल सरकारी पद्धतीनें त्यांना सांगण्यांत आला व अंगावर असलेले घरगुती कपडे उतरून कैद्याचे कपडे अंगावर चढविण्याचा प्रसंग त्यांच्यावर आला. १९११ सालीं अंगावर चढत असलेले हे कैदखान्याचे कपडे आतां १९६० सालीं आपल्या अंगावरून निघणार—म्हणजे बहुधा ते जिवंतपणीं

---

[1] P. 117.

अंगावरून निघणारच नाहींत—हा विचार मनांत आल्यावर सावरकरांचें निर्भय मन सुद्धां कांहीं काळ शोकग्रस्त झालें. मृत्यूसकट सर्व संकटांना धैर्यानें तोंड देण्याची तयारी त्यांनीं केली होती हें खरें; पण, अगदीं अंधुक अशी आशा त्यांना मधूनच असाहि आभास दाखवी कीं, सगळ्या सुशिक्षित जगाला धुतकारून हेगचें न्यायालय भलताच निर्णय देणार नाहीं! ही आशा विलयाला जातांच सावरकरांना काय वाटलें तें 'सप्तर्षि' या कवितेंत त्यांनीं व्यक्त केलें आहे. ही कविता मुद्रणसंस्कार पावून लोकांना १९२४ सालीं मिळाली असली तरी, ती याच वेळीं स्मृतिपत्रावर लिहिण्यांत आलेली होती. तिचा पूर्वार्ध म्हणजे तर या विशिष्ट दिवसाच्या भावनांची आन्हिकीच होय! या कवितेच्या पूर्वार्धाचें स्फुरण डोंगरीच्या अंधारकोठडींत या रात्रीं झालें; उत्तरार्धाचें स्फुरण भायखळ्याच्या कारागृहांत आणखी थोड्या दिवसांनीं झालें.[1]

दुसऱ्या दिवशीं काथ्या कुटण्याचें काम करण्याचा प्रसंग आला त्या वेळीं सावरकरांच्या हाताचीं सालडीं निघालीं. या काथ्याकुटीच्या कामाचा मनाला धसका बसूं नये म्हणून सावरकरांच्या बुद्धीनें मनाला जे विचार सुचविले ते 'माझी जन्मठेप' या ग्रंथांत[2] पुढील शब्दस्वरूप पावले आहेत:

*काथ्या कुटावयाचा इतकेंच ना! हा रे वेड्या मना! त्यांत हलकेपण तें काय आहे! आयुष्य व्यर्थ जातें! अरे हें आयुष्य ही स्वतःच एक काथ्याकूट आहे. पंचमहाभूतांस पिळून वळून हें आयुष्याचें चऱ्हाट वळावयाचें, तेच ते तंतु जोडूनजोडून लांबवीत बसावयाचें व शेवटीं सडत आलें कीं, मृत्यूच्या 'मोगरी'नें कुटून, पुनः काथ्या करून, पंचमहाभूतांच्या ढिगांत मिसळून द्यावयाचें!*

*सकाळ झाली कीं संध्याकाळ, संध्याकाळ झाली कीं सकाळ, सगळी काथ्याकूट! आपण वनस्पति खातखात जगावयाचें, जगत-जगत मरावयाचें, मरतांच त्या हाडामांसास वनस्पतींनीं खावयाचें, सगळी काथ्याकूट! तेजोमेघांची सूर्यमाला, सूर्यमालेची पृथ्वी, पृथ्वीची एकाद्या धूमकेतूशीं टक्कर उडाली कीं पुन्हां तेजोमेघ, सगळी काथ्याकूट! तशीच, त्याचाच व त्याचाच अवश्य व अपरिहार्य भाग म्हणून हें वळलेलें चऱ्हाट उकलून कुटण्याची आमची काथ्याकूट! जर ती महान् काथ्याकूट महत्त्वाची असेल, जर तींत आयुष्य व्यर्थ जात नसेल तर हीहि एक छोटीशी काथ्याकूट कर्तव्यच आहे.*

कल्पनेचा उदात्तपणा, भौतिक शास्त्रांच्या ज्ञानाचा तात्त्विक विचारांच्या गुंफणींत केलेला उपयोग, निर्भय वृत्तींत निगडित झालेले विचारांचे धागेदोरे इत्यादींचा विचार केला तर या उताऱ्याला 'गद्यकाव्याचा उत्तम नमुना' असें प्रशस्तिपत्र श्रेष्ठ साहित्यिकहि देतील, अशी प्रस्तुत लेखकाला खात्री वाटत आहे.

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १७.
२ पूर्वार्ध : पृ. ५.

प्रतिकूल तेंच प्रायः घडेल असें समजून वागण्याची मनाला लागलेली संवय या दुर्धर प्रसंगीं किती उपकारक ठरली हें सांगतां सांगतां, सावरकरांनीं ' माझी जन्मठेप ' या पुस्तकांत जो एक सामान्य सिद्धांत मांडला आहे तोहि, भाषेंतील काव्यगुण व विचारांतील धृतिगुण यांचा मासला म्हणून, या ठिकाणीं देण्यासारखा आहे :

*अनुकूल तेंच घडेल अशी आशा, लालसा करीत बसलें असतां जर प्रतिकूल घडलें–आणि असहाय पिढींत जन्मलेल्यांच्या जीवनांत तोच संभव अधिक–तर मात्र एकाएकीं निराशेच्या कोसळणाऱ्या पहाडाखालीं धैर्याचा चक्काचूर होऊन गेल्याविना सहसा रहात नाहीं. सिद्धीच्या मानससरोवरावर क्रीडा करण्याचें ज्या पिढीचें भाग्य असेल ते राजहंस सुखेनैव मुक्ताफळभोजन करून बिसतंतूंचा फराळ करोत ! परंतु प्रयत्नांच्या मृतसरोवराच्या विषारी प्रदेशांतून ज्या पिढीस मार्ग कंठावयाचा आहे तिनें प्रतिकूलाचे लोखंडाचे चणेच खावयाची व पचवावयाची संवय ठेविली पाहिजे.*[1]

दोन जन्मठेपींचें म्हणजे पन्नास वर्षांचें जीवन निष्क्रिय वैफल्यांत जाऊं नये म्हणून, लहानपणापासून मनांत तरंगत असलेली महाकाव्य रचण्याची महत्त्वाकांक्षा याच तुरुंगांत असतांना सावरकरांच्या मनांत जोरजोरानें डोकावूं लागली. या बाबतींत मनाचा निश्चय होऊन कार्याला प्रारंभ झाला. महाकाव्यरचनेसाठीं उद्युक्त व उत्सुक बनलेलें सावरकरांचें मन प्रथम गुरु गोविंदसिंहाच्या चरित्राकडे वळलें. याच चरित्राची निवड मनानें कां केली हें सावरकरांनीं पुढील उताऱ्यांत[2] स्पष्ट केलें आहे :

*गोविंदसिंह हुतात्म्यांचा मुकुटमणि होता. थोर यशानें मंडित झालेले थोर पुरुष राजप्रासादाच्या सुवर्णकलशाप्रमाणें तेजःपुंज दिसतातच. पण, आज मला त्यांच्या चरित्रवर्णनानें, त्यांचीं तीं यशोगीतें गाइल्यानें, तितकी शांति न मिळतां, उलट माझ्या कपाळीं आलेल्या अपयशाची तीव्रता मात्र अधिक जाचूं शकण्याचा संभव आहे. आज मला त्या यशाच्या राजप्रासादाच्या पायाखालीं खोल दडपून गेलेल्या अपयशाच्या पायाचें चिंतन हें ध्येय आहे म्हणून ' चमकोर ' दुर्गांतून निसटतांना ज्याचा संपूर्ण पराभव झालेला आहे, ज्याचे माता, पत्नी, पुत्र वाताहत होऊन संसाराची राखरांगोळी उडाली आहे, ज्याच्या शिष्यांनींहि त्याच्यावर शपथपूर्वक ठेविलेल्या निष्ठेचें त्यागपत्र देऊन, आयत्या वेळेस त्यास सोडून, त्या पराभवाचें व अपयशाचें खापर त्याच्याच डोक्यावर फोडलेलें आहे आणि तरीहि जो सिंह तें अपयशाचें व दुःखाचें हलाहल एखाद्या रुद्रासारखा धारण करून पचविता झाला, त्या गोविंदसिंहाचें तें अपयशच आज मला गेय आहे ! या माझ्या भयंकर दुःखास व अपजयास*

---

१ पूर्वार्ध : पृ. ७.
२ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १०.

*तें मेरुदंडाप्रमाणें आधार होईल. माझ्या पिढीच्या अपयशाच्या, दुःखाच्या व पराजयाच्या खोल पायावर भावी पिढ्यांचे यशःप्रासाद तें उभवील.*

हें डोंगरीचें कारागृह सुटण्याच्या सुमारासच, सावरकरांच्या पत्नी माई आपल्या बंधूंना बरोबर घेऊन आपल्या पतिदेवाच्या दर्शनाला आल्या होत्या. सावरकर नाशिक येथें बंदिवान असतांना, म्हणजे सुमारें ७–८ महिन्यांपूर्वी, तेथील मामलेदारानें मनावर घेतल्यामुळें, या साध्वीला आपल्या सौभाग्याचा ठेवा एकवार दिसला होता. त्यानंतर आज जी भेट घडणार होती ती किती विलक्षण परिस्थितींत ! खटला लढविला जाईल व आपलें भाग्यनिधान आपल्याला परत मिळेल–तत्काळ मिळालें नाहीं तरी लवकरच मिळण्याचा संभव निर्माण होईल–अशी आशा त्या वेळीं त्या माउलीच्या मनांत नांदत होती. या भेटीच्या वेळीं ती अशा पार कोळपून गेली होती. हातापायांत लोहशृंखला, अंगावर कैद्याचे जाडे भरडे कपडे अशा स्थितींतल्या आपल्या पतिदेवाचें दर्शन घडतांच त्या वीरपत्नीच्या मनांत कोणते विकार उद्भवले असतील ! जवळजवळ जन्माच्या ताटातुटीच्या अगोदरचा पतिपत्नीच्या अखेरच्या भेटीचा तो करुणाजनक प्रसंग आणि त्याहि प्रसंगीं काराधिपांच्या सान्निध्यामुळें, मनमुराद रडायला, मनमोकळेपणानें बोलायला चोरी उत्पन्न व्हावी, हें विधिघटनेचें केवढें वैचित्र्य ! या भिषण प्रसंगीं उभयतांनींहि परस्परांना धीर देण्याचा प्रयत्न केला. सावरकरांनीं आपल्या पत्नीला उपदेश म्हणून जे शब्द या प्रसंगीं उच्चारिले ते देशस्वातंत्र्यासाठीं झगडणाऱ्या देशभक्तांच्या गृहिणींना सदैव मार्गदर्शक ठरणारे आहेत :

*जर कधीं ह्या सामान्य संसाराचा मोह होऊं लागला तर असा विचार करा कीं, मुलामुलींची वीण वाढविणें व चार काटक्या एकत्र करून घरटीं बांधणें ह्यालाच जर संसार म्हणावयाचें असेल तर असले संसार कावळेचिमण्याहि करीतच आहेत. पण, संसाराचा याहून भव्यतर अर्थ जर घेणें असेल तर मनुष्यासारखा संसार थाटण्यांत आपणहि कृतकार्य झालों आहोंत. आपलीं चार चूलबोळकीं आपण फोडून टाकलीं; पण, त्यायोगें पुढेंमागें हजारों जणांच्या घरीं क्वचित् सोन्याचा धूर निघेल. आणि घर घर म्हणून करीत असतांहि, प्लेगनें नाहीं का शेंकडो जणांचीं घरें ओसाड पाडलीं ? लग्नाचे मंडपांतून नवरानवरीस विलग हिसडून, मृत्यूच्या दाढेंत ढकलून, दैवानें जोडपीं विजोड करून टाकलीं ! असा विवेक करून संकटास तोंड द्या.*[१]

ही भेट संपून परत जातांना माईंचें मन किती बधिर झालें असेल, हें सहृदय मनालाच कळूं शकेल ! कोठडींत परत आल्यावर सावरकरांनाहि क्षणमात्र शक्ति क्षीण झाल्यासारखी वाटली ! त्यांच्या कोठडीच्या आढ्याच्या फटींत कबुतरांचें एक कुटुंब वास्तव्य करून होतें. सहानुभूतीसाठीं उत्सुक झालेलें सावरकरांचें मन

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १४–१५.

या कुटुंबाकडे वळलें ! विचारीं कबुतरांचीं पिलें केविलवाण्या स्वरानें आक्रोश करीत होतीं व तडफडत होतीं ! चोंचींत दाणे घेऊन आपली आई परत येण्याची वेळ टळून गेल्यामुळें त्यांचा जीव कासावीस झाला होता ! आपली आई सकाळींच साहेबाच्या बंदुकीला बळी पडली आहे हें त्या बापड्यांना प्रत्यक्ष माहीत नसलें तरी पक्ष्यांच्या ठिकाणीं असलेल्या उपजत बुद्धीमुळें, कांहीं तरी धोका आहे हें त्यांना मनोमन कळलें होतें व त्यामुळें त्यांच्या जिवाची तडफड क्षणोक्षणीं वाढत होती. नजीकच्या बाह्य सृष्टींत दिसणारें आपल्या मनाच्या तडफडीचें हें प्रतिबिंब पाहून सावरकरांचें संवेदनाक्षम मन किती हेलावलें असेल हें शब्दांच्या साहाय्यानें सांगणें दुर्घट आहे ! रे. टिळक यांची ' केवढें क्रौर्य हें ! ' ही कविता वाचणाऱ्या अगदीं साध्या माणसाचें हृदयहि जसें हेलावून जातें त्याप्रमाणेंच ' माझी जन्मठेप ' या पुस्तकांतलें या प्रसंगाचें[1] वर्णन वाचतांना वाचकाचें मन हळहळून व होरपळून निघतें !

१९११ सालीं मार्चच्या शेवटीं किंवा एप्रिलच्या प्रारंभीं सावरकरांना डोंगरीच्या तुरुंगांतून हलवून भायखळ्याच्या तुरुंगांत नेण्यांत आलें असावें; कारण, शिक्षा झाल्यानंतर डोंगरीच्या तुरुंगांत त्यांना सुमारें महिनाभर ठेवण्यांत आलें असलें पाहिजे असें त्यांनींच लिहून ठेविलें आहे.[2] सावरकर यांना ठाणें तुरुंगांतून हलवून मद्रासकडे नेलें, तेथून आगबोटीनें त्यांना अंदमानला रवाना करण्यांत आलें, त्यांना कोणत्या गाडीनें मद्रासकडे नेण्यांत येत आहे ही बातमी बाहेर फुटल्यामुळें पुणें स्टेशनवर गर्दी होण्याचा संभव होता व त्यामुळें तेथें विशेष बंदोबस्त ठेवण्यांत आलेला होता वगैरे हकीकत ' केसरी ' च्या दि. ४-७-११ च्या अंकांत ' वर्तमानसार 'या सदरांत देण्यांत आलेली आहे. तिनेवेल्लीचे डि. मॅजिस्ट्रेट मि. ॲश यांचा खून दि. १७-६-१९११ रोजीं झाला. ही गोष्ट सावरकर यांना कळली त्यापूर्वींच त्यांना भायखळा तुरुंगांतून ठाण्याच्या तुरुंगांत नेण्यांत आलें होतें. काळ्या पाण्याच्या कैद्यांना अंदमानला नेणाऱ्या महाराजा बोटीचें वेळापत्रक ठरलेलें असे. चाळीस दिवसांच्या क्रमांत ती दोन वेळां रंगूनला जात असे, एक वेळ कलकत्त्याला जात असे व एक वेळ मद्रासला जात असे.[3] महाराजा बोटीच्या या वेळापत्रकाचा विचार केला तर असें दिसतें कीं, ही बोट मेअखेरीस मद्रास सोडून गेल्यानंतर, ती फिरून मद्रासला केव्हां येणार हें अंदाजानें ठरतांच, सावरकरांना भायखळ्याच्या तुरुंगांतून ठाण्यास नेण्यांत आलें असलें पाहिजे. एप्रिल व मे या दोन महिन्यांचा बहुतेक भाग भायखळा तुरुंगांत काढून, मेचे कांहीं दिवस व बहुतेक सगळा जून महिना सावरकरांना ठाणें येथील तुरुंगांत काढावा लागला, असा अंदाज करण्यांत मोठीशी चूक होण्याचा संभव नाहीं.

---

१ पूर्वार्ध : पृ. १५-१६.
२ माझी जन्मठेप : पूर्वार्ध पृ. १६.
३ राजनैतिक कारस्थान : द्वितीय खंड : तृतीय मंडळ.

भायखळ्याच्या तुरुंगांत असतांना सावरकरांनीं ‘ सप्तर्षि ’ या कवितेच्या रचनेचें कार्य पुरें केलें असें दिसतें. या कवितेच्या उत्तरार्धांत वर्णिलेले अनुभव या तुरुंगांतले आहेत हें सावरकरांनीं स्वतःच सांगून ठेविलें आहे.[1] आपल्याला झालेली दोन जन्मठेपींची शिक्षा एककालिक समजण्यांत आली तर ती गोष्ट दंडविज्ञानानुसार कशी योग्य ठरणार आहे हें सावरकरांनीं या तुरुंगांत असतांनाच सरकारला एका अर्जाच्या द्वारा कळविलें. तुमच्या जन्मठेपी एककालिक करतां येत नाहींत, त्या अनुक्रमानेंच भोगल्या पाहिजेत हें सरकारी उत्तरहि त्यांना या तुरुंगांतच मिळालें. या तुरुंगांत असतांना, वाचावयाला कांहीं तरी पुस्तक म्हणून त्यांना शेवटीं बायबल देण्यांत आलें. गुरु गोविंदसिंहावरील काव्य व ‘ सप्तर्षि ’ काव्य हीं दोन काव्यें पुरीं होत आल्यामुळें, येशूचें चरित्र मराठींत कविताबद्ध करण्याचा विचार सावरकरांच्या मनांत या ठिकाणीं आला. ज्यू लोकांचा राष्ट्रीय बंदिवास, त्यांची दुर्दैवी व निःसहाय स्थिति आणि त्यांतून सुटण्यासाठीं त्यांनीं केलेले प्रयत्न इत्यादि विषयांचें काव्यरचनेच्या दृष्टीनें महत्त्व केवढें मोठें आहे हें सावरकरांना या ठिकाणीं अवगत झालें. येशू ख्रिस्ताच्या जीवनांतल्या एका प्रसंगावर त्यांनीं या ठिकाणीं कांहीं कविता रचिल्या.

ठाणें तुरुंगांत आल्यावर पहिल्याच दिवशीं सावरकरांना त्यांचे धाकटे बंधु नारायणराव यांची वार्ता समजली. तेहि तुर्त त्याच कारागृहांत होते. एरव्हीं दुष्टपणांत अग्रगण्य समजला जाणारा एक वार्डर सावरकरांच्या शौर्याची ख्याति ऐकून त्यांचा भक्त बनला होता. मोठें साहस करून त्यानें त्या रात्रीं पाटीवर लिहिलेलें धाकट्या भावाचें पत्र थोरल्या भावाकडे पोंचतें केलें. या पत्राला प्रत्युत्तर धाडतांना सावरकरांच्या मनांत कोणत्या शंका उद्‌भवल्या व त्यांनीं प्रत्युत्तर म्हणून काय लिहिलें[2] हें पहाण्यासारखें आहे :

*तरी देखील शंका आली. ‘ न जाणों लिहून घेऊन हा ही पाटी बाळाचे हातीं न देतां अधिकाऱ्यांसच देऊन आपल्यास तोंडघशीं पाडणार नाहीं कशावरून !’ माझा जन्म डिटेक्टिव्हांशीं पेचपांच खेळण्यांत गेलेला होता. म्हणून मी कोणाचींहि नावेंगावें वा विशिष्ट स्फुट कार्यक्रम न लिहितां, अंदमानाच्या अंधकाराच्या फलकावर दोनतीन आशेच्या कुंचल्या मारून लिहिलें कीं,*

*“ जर तेथील नियमांप्रमाणें मला कुटुंबास तिकडे दहापांच वर्षांनीं नेऊं दिलें तर जीवित तिकडे ज्ञानाच्या व्यासंगात घालवीन. आणि मला जरी परत हिंदुस्थानाच्या पुण्यभूमीच्या तटावर पाय ठेवतां आला नाहीं तरी, मी रचीत असलेलें महाकाव्य जसें :*

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध पृ. १७.
२ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. २३–२४.

अथ प्राचेतसोपज्ञं रामायणमितस्ततः
मैथिलेयौ कुशलवौ जगतुर्गुरुचोदितौ ॥[1]

*तसें, ईश्वरानें दिलें तर, त्या अभिनव कुमारांचे कंठानीं देशभर प्रख्यात करवीन. एका आयुष्याचें साफल्य संपादण्यास हें एक कार्यहि समर्थ आहे."*

या एकाच तुरुंगांत हे दोन बंधु पांचचार दिवस तरी होते; पण, त्यांची भेट होऊं शकली नाहीं. अल्पकाळांतच नारायणरावांना येथून दुसरीकडे हलविण्यांत आलें.

या तुरुंगांतला एक हिंदी अधिकारी बोलण्यांत मोठा मिठास होता. सावरकरांच्या मनाला यातना देऊन त्यांचा तेजोभंग करण्यासाठीं त्याला त्यांच्या विभागांत हेतुपूर्वक नेमण्यांत आलें असल्याची त्या वेळीं तुरुंगांत बोलवा होती. 'अजब तेरी करणी, अजब तेरा खेल । मकडीके जालेमें फसाया शेर !' हें विचित्र गाणें म्हणत हा अधिकारी सावरकरांना हास्यविषय बनवी, तेव्हां त्यांच्या मनाला फार वेदन होत असत. या वेदना सहन करणाऱ्या सावरकरांच्या मनांत पुढील विचार उद्भवत असत :

*पुनःपुन्हां 'ते प्रतिप्रसवहेयाः सूक्ष्माः' हें योगसूत्र मनांतल्या मनांत म्हणत विवेक करावा, कीं शारीरिक यातना जशा भोगाव्या लागतात तशाच मानसिक यातनाहि तुला भोगल्याच पाहिजेत. त्यानें जर तुझा तेजोभंग होत असेल तर तें तेज क्षणिक उत्तेजनच होय, असें होईल. त्यांना त्या तमाशाची गंमत वाटते तशी तुला कां वाटूं नये ? तो 'तुझा' तमाशा असें तुला वाटत आहे म्हणून ! ती तदाकारवृत्ति तेवढी मार. तूं कोण, काय केलेंस ? कां केलेंस... तुझें तुला ठाऊक आहे ना ? चोरांच्या तमाशानें तुझें काय बिघडतें ? तुझ्या आधीं हा कांटेरी मुकुट 'This crown of thorn' प्रेषित म्हणविणारांनाहि घालावा लागला होता. कारागारातील चोरांनीं तुझ्यापूर्वीच त्यांची देखील हुर्यो केली आहे कीं आज द्वीपद्वीपांतरें ज्याच्या चरणांवर आपलें मस्तक ठेवीत आहेत. असा विवेक करीत मी त्या मनुष्याचें वर्तन सोशीत असावें.*[2]

तिनेवेल्लीचे डि.मॅजिस्ट्रेट मि. ॲश यांना एका शाक्त ब्राह्मणानें गोळी घालून ठार मारलें ही बातमी जूनच्या उत्तरार्धांत प्रसिद्ध होतांच, या भानगडीचा सावरकरांना कांहीं सुगावा होता कीं काय हें समजून घेण्याची अधिकाऱ्यांची धडपड सुरू झाली. भायखळ्याच्या तुरुंगांत सुरू झालेली ही धडपड सावरकरांनीं 'महाराजा' बोटीवर पदार्पण करीपर्यंत पुरली ! एक हिंदी अधिकारी व सावरकर यांच्या दरम्यान या बाबतींत मद्रासला कशी शाब्दिक चकमक उडाली हें सांगणारी पुढील हकीकत[3] मोठी मनोरंजक आहे :

---

१ रघुवंश : सर्ग १५–६३.
२ माझी जन्मठेप : पूर्वार्ध पृ. २७.
३ माझी जन्मठेप : पूर्वार्ध पृ. ४३–४४.

*समुद्रांत अंदमानची ' महाराजा ' नांवाची आगबोट आलेली. सर्व बंदिवान एका मोठ्या नावेंत खेंचाखेंच करून तिकडे नेलेले. मीच तेवढा मागें उरलेलों. इतक्यांत एक लहान बोट घेऊन मला न्यावयास हे ( हिंदी अधिकारी ) व इतर एक का दोन अधिकारी आले. मी त्या लहान नावेंत बसलों. मी होऊन कोणाशींहि बोलत नसें; कारण मी बंदिवान. पटकन् कोणी 'चुप बैस' म्हणून म्हणायचें ! थोड्याच वेळांत त अधिकारी इकडचेतिकडचे कुशल प्रश्न विचारून इंग्लंडांतील क्रांतिकारकांची माझ्या मागें काय स्थिति झाली म्हणून जिज्ञासा करते झाले.*

मीं म्हटलें :—हें तुम्हीं मला सांगावयाचें. तुरुंगांत मला काय माहीत पडणार !

मला जाणून उत्तेजविण्यासाठीं ते म्हणाले : तें खरेंच ! आणखी कसले ते भिकार कट ! चार माणसें देखील त्यांत नव्हतीं !

मी हंसून उत्तरलों :—तर मग तुम्ही कांहीं जास्त मिळवावयाचीं होतीं !

ते म्हणाले :— छे : भलतेंच ! या इलाख्यांतील लोक सूज्ञ आणि विचारी आहेत. तुमच्या तिकडच्या तरुणांसारखे इकडे कोणी उच्छृंखल नाहींत. येथें कोणी प्रचारक आला तर त्याला एकहि अनुयायी मिळणार नाहीं !

हें बोलत असतांना ते पदोपदीं बघत होते कीं, त्यांचा प्रतिकार करण्यासाठीं मद्रासच्या कांहीं प्रख्यात राज्यक्रांतिकारकांचीं नांवें मी सांगतों कीं काय ! नंतर आपणच म्हणाले : तुमचा अनुभव कसा आहे ?

मी म्हणालों :—मद्रासचा अनुभव मजपरीस तुम्हांस अधिक असला पाहिजे.

ते म्हणाले :—माझा अनुभव तर मद्रासला सर्वत्र शांतता आहे, असा आहे.

मीं हंसून विचारलें :—होय ना ? अगदीं शांतता आहे ही तुमची अगदीं निश्चिति आहे ना !

तो समजला. तो दुसरा अधिकारीहि हंसला आणि म्हणाला : त्यांना सर्व बातमी ठाऊक असली पाहिजे. केवळ तुम्ही त्यांना ' पंप ' करूं पहात आहां आणि ते तुम्हाला ' पंप ' करूं पहात आहेत !

नाशिक–कटाच्या खटल्यांत सावरकरांना नुसती जन्मठेप काळ्या पाण्याची शिक्षा झालेली नव्हती ! सावरकर जिवंत परत येण्याची शक्यता फारशी नाहींच हें ओळखणाऱ्या दूरदर्शी न्यायमूर्तींनीं त्यांची सारी मालमत्ता जप्त करण्याबद्दलचाहि हुकूम फर्माविला होता. ज्या मालमत्तेवर या हुकूमाची अंमलबजावणी करतां येईल अशी सावरकरांची निर्वेध मालमत्ता या वेळीं फारशी उरलेलीच नव्हती ! भगूरचीं घरें, भगूरची जमीन, राहुरीची जहागिरदारींतली जमीन वगैरे सर्व मत्ता बापूंचीच कर्जफेडीसाठीं अगर खर्च भागविण्यासाठीं गहाण तरी टाकावी लागली होती अगर विकून तरी टाकावी लागली होती ! नाहीं म्हणायला भगूर येथील एक बखळ मोकळी

असल्याचें सरकारला आढळलें व तिची विक्री करून आलेले २५० रुपये सरकारनें आपल्या तिजोरींत जमा केले.[1] यामुळें निराश होऊन म्हणा अगर सरकारी नियमांची काटेकोर अंमलबजावणी करण्याच्या बुद्धीनें म्हणा, सावरकर भावखळा तुरुंगांत होते तेव्हां त्यांच्याजवळ असलेलें श्रीमद्भगवद्गीतेचें लहानसें पुस्तक व त्यांचे उपनेत्र (चष्मा) या वस्तूहि एक दिवस जप्त करून नेण्यांत आल्या! 'बंदिवानास वापरावयास दिलेल्या वस्तू' या नात्यानें हे दोन्ही जिन्नस सावरकरांना परत देण्याची कृपा मात्र सरकारनें लौकरच केली!

ठाण्याच्या तुरुंगांतल्या ओसाड भागांतल्या एका खोलींत कांहीं दिवस गेले. आतां मात्र अंदमानला जाण्याचा समय जवळ येत चालला. अंदमानला कैदी धाडण्याची एक रीत ठरून गेलेली होती. मुंबई इलाख्यांतल्या उग्र अपराध्यांतहि भयंकर ठरलेल्या अपराध्यांची निवड होत होत त्यांना शेवटीं ठाण्याच्या तुरुंगांत आणण्यांत येत असे. ठाण्याहून ते लौकरच पुढें रवाना होणारे असल्यामुळें, एकजुटीनें आणण्यांत येणाऱ्या या बंदीजनांना 'चलान' ही रूढिसिद्ध संज्ञा लावण्यांत येत असे. एक 'चलान' म्हणजे गुन्हेगार जगांतल्या प्रातिनिधिक व्यक्तींचा मेळावाच! रंगरूप, जातगोत, वयविद्या अशा कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी प्रत्येक 'चलान' सामान्यतः प्रातिनिधिक स्वरूपाचें ठरूं शकलें असतें. अंदमानच्या यात्रेकरूंचा म्हणून जो विशेष भाग ठाणें तुरुंगांत राखून ठेवण्यांत आला होता त्यांतल्या एका खोलींत कित्येक दिवस एकलकोंडेपणानें घालविल्यावर, १९११ च्या जून महिन्याच्या अखेरीस जेव्हां 'चलान' आलें तेव्हां हा एकलकोंडेपणा तरी नाहींसा झाला! या 'चलानां'तील लोकांचें हंसणेंखिदळणें, रडणेंआरडणें, बोलणेंचालणें सगळें इतकें लोकविलक्षण होतें, कीं सावरकरांना या सर्व प्रकारामुळें कांहीं वेळ गंमतहि वाटली. अंदमानचें 'चलान' ठाण्याच्या तुरुंगांतून एकदांचें बाहेर पडलें म्हणजे त्या तुरुंगावरील अधिकारी सुटकेचा एक दीर्घ निःश्वास सोडीत असत! 'चलाना' ची ही बंडखोर परंपरा कायम टिकविण्यासाठीं या वेळच्या 'चलानां'तील लोकांचीहि खूप धडपड चालली होती. 'चलानांतील इतर बंदिजनांबरोबर सावरकरांना ठाण्याच्या स्टेशनपर्यंत पायीं कां चालविलें नाहीं, त्यांना मोटारींतून कां नेलें, याविषयींची कारणें सांगतांना सावरकरांनीं पुढील हकीकत[2] लिहिली आहे :

*मी आज काळेपाण्यावर जाणार म्हणून कशीतरी गांवांत आणि स्टेशनकडे बातमी फुटली होती. बंदिवान ज्या मार्गानें जातात त्या मार्गावर मी दिसेन म्हणून लोक हरएक प्रकारें यत्न करून टपून लपून जमत होते. म्हणून मला दुसरीकडून गुपचप नेणें अवश्य वाटलें हें एक; आणि दुसरें कीं, मी मार्सेलिसला पळालेला आणि ते गुप्त कटांचे दिवस! न जाणों, कोठें काय*

---

१ नासिक व भगूर येथें मिळालेली एकीव माहिती.
२ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. ३९-४०.

*कट होऊन मला सोडविण्याचा यत्न कोण करील, तें कोणीं सांगावें ? सहज पाय टाकतां त्या दिवसांत सुरुंग उडत ! अशा स्थितींत मार्सेलिसच्या चुकीची पुनरावृत्ति न व्हावी म्हणून मला त्या घोळक्यांत स्टेशनावर जन-संमर्दांतून पायीं न नेतां स्वतंत्र मोटार आणून नेण्यांत आलें.*

ठाणें स्टेशनवर सावरकरांना एका स्वतंत्र डब्यांत कोंबण्यांत आलें. त्यांच्या हातांत जी हातकडी होती तिचें दुसरें टोंक एका धिप्पाड इंग्रज अधिकाऱ्याच्या हाताशीं बखडून टाकण्यांत आलें होतें. सावरकरांच्या पायांतहि बेडी होतीच ! अनेक स्टेशनांवर सावरकरांचे देशबांधव त्यांच्या दर्शनासाठीं गोळा झाले होते; पण, त्यांच्या डब्याच्या खिडक्या बंद करून ठेवण्यांत येत असल्यामुळें, व या गरीब लोकांना डब्याजवळ येण्याला मनाई होत असल्यामुळें, त्यांना सावरकरांचें दर्शन घेतां आलें नाहीं. कित्येक स्टेशनांवर युरोपियन लोकहि सावरकरांना पाहण्याच्या उत्सुकतेनें गोळा झाले होते. त्यांतल्या कित्येकांनीं खिडक्या उघडून सावरकरांना पोटभर पाहून घेतलें. एका स्टेशनवर गोळा झालेल्या कांहीं साहेबांनीं तर आपल्या मडमांना उचलून खांद्यांवर घेतलें आणि There's he; that is Savarkar ( ते पहा ! तेच सावरकर हं ! ) असें म्हणून आपल्या 'मंडळींना' सावरकरांचा परिचय करून दिला. मोंगलाईतल्या मैदानांतून रायचूरच्या आसपास प्रवास चालला असतांना सावरकरांना उन्हाळयाचा त्रास असह्य वाटूं लागला. त्या रखरखीत मैदानांची आणि त्या डब्यांतील काहिलीची तीव्रता आणि अस्वस्थता बाहेरून असह्य होत चालली होती आणि सावरकरांच्या अंतःकरणांतील रखरखीत उष्माहि त्यांच्या जिवाची आंतून लाही लाही करीत होता. त्या प्रसंगीं मनांत उद्भवलेले भेसूर विचार सावरकरांनीं पुढील शब्दांत[१] व्यक्त केले आहेत :

*जेव्हां मनास अगदीं कसेंसेंच वाटावें तेव्हां रशियामधून सैबेरियांत ज्या राजकीय बंदिवानांच्या टोळया धाडण्यांत येत त्यांच्या प्रवासांतील त्यांचे हाल आठवून मनास म्हणत असावें : अरे, अजून तुम्हीं काय भोगिलें आहे ! ही तोंडाची गोष्ट नाहीं ! जो करील तो भरील ! जो भरील तो करील !*

*गांवांमागून गांवें, नगरांमागून नगरें मागें टाकीत, वनें-उपवनें, पर्वत-नद्या ओलांडीत, ती आगगाडी पिसाळलेल्या वाघिणीसारखी मला तोंडांत धरून धांवत चालली होती ! जितक्या वेगानें ही आगगाडी मला माझ्या माय-देशांतून काळेपाण्याकडे ओढून नेत आहे, हाय हाय, तितक्याच वेगानें ती मला काळ्या पाण्यावरून परत आणून माझ्या मायदेशांत कधीं सोडील ? कधीं सोडील का ? कसली सोडणार ? ती आशा धरणें हें मानसिक आश्चर्य होय ! सैबेरियांत नाहीं का "रशिया रशिया" करीत शेकडों लोक मेले ! मीहि अंदमानांत 'हाय भारत' ! 'हाय हिंदुस्थान' करीत मरेन !*

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. ४१-४२.

अखेरीस गाडी मद्रासला पोंचली. सावरकरांना घेऊन येणारे जे अधिकारी होते त्यांनीं त्यांना मद्रासच्या अधिकाऱ्यांच्या स्वाधीन केलें तेव्हां त्यांना एका जबाबदारींतून सुटल्याचें समाधान वाटलें. तिनेवेल्लीच्या डि. मॅ. च्या वधाच्या बाबतींतली कांहीं माहिती सावरकरांच्या तोंडून काढून घेतां आली तर पहावी म्हणून मद्रासच्या अधिकाऱ्यांनीं पुष्कळ प्रयत्न केले. अशा प्रयत्नांपैकीं एकाचा उल्लेख यापूर्वीच करण्यांत आलेला आहे. आतां 'महाराजा' बोटीकडे जाण्याची वेळ अगदीं जवळ आली. इतर बंदिवानांना एका मोठ्या नावेंत कोंबून तिकडे नेण्यांतहि आलें. एका लहान नावेंतून सावरकरांना स्वतंत्र रीतीनें न्यावयाचें असें ठरलें असल्यामुळें, ती नाव धक्क्यापाशीं आली व सावरकर आणि एक दोन अधिकारी या नावेंत बसून 'महाराजा' बोटीच्या दिशेनें जाऊं लागले.

या स्वतंत्र नावेंतून सावरकर येत आहेत ही माहिती 'महाराजा' बोटीवरील नोकरचाकर, प्रवासी, अधिकारी वगैरे सर्वांना मिळाली होती. सावरकर चढूं लागले तेव्हां साहजिकपणेंच या सर्वांची दृष्टि त्यांच्यावर खिळून गेली. बोटीवर चढतांना व बोट सुटतांना त्या बोटीवर चढविण्यांत आलेल्या इतर बंदिजनांचीं हृदयेंहि भरून आलीं! आपला विस्तीर्ण व संपन्न देश, त्याची महनीय परंपरा, त्याची सध्यांची दारुण स्थिति इत्यादि विषयांचें ज्ञान त्या बिचाऱ्यांना लवमात्रहि नव्हतें, असें म्हटलें तरी चालेल! जन्मभूमि, मातृभूमि इत्यादि शब्द त्यांच्या कानांवरूनहि गेले नसतील, हाच संभव विशेष! असें असूनहि, आतां आपल्या घरची व आपली ताटातूट होणार हा विचार मनांत येऊन ते बिचारे बंदिजन धाय मोकलून कंठ मोकळा करून रडूं-आरडूं लागले! सावरकरांसारख्या उच्चपदस्थित व्यक्तींना अशा प्रसंगीं रडण्याचेंहि स्वातंत्र्य लाभत नाहीं. पण, अशा व्यक्तींनीं अश्रुद्वारा आपल्या भावनांचें आविष्करण केलें नाहीं म्हणून त्यांच्या हृदयाची कालवाकालव होत नाहीं, असें थोडेंच आहे! अश्रूंच्या द्वारा मनावरील भार हलका करण्याचीहि सोय नसल्यामुळें अशा व्यक्तींची स्थिति जास्तच बिकट होते! 'कंठस्तंभितबाष्पवृत्तिकलुषः' हें एका महर्षींच्या स्थितीचें कालिदासकृत वर्णनच अशा प्रसंगाशीं टक्कर देणाऱ्या सावरकरांसारख्या लोकाग्रणींना लागू पडतें!

आपली प्राप्तपरिस्थिति व आपल्याकडे असहायपणें पाहणारे लोक यांच्या विचारानें सावरकरांच्या मनांत कोणत्या भावनांचा कल्लोळ उडाला हें स्वतः सावरकरांनीं पुढील शब्दांत[1] सांगितलें आहे :

*त्या 'महाराजा' आगबोटीवरील जन्मठेप्याचें चढणें म्हणजे प्रेताच्या तिरडीवर जिवंतपणींच बांधलें जाणें होतें! आजपर्यंत जे शेकडों, हजारों जन्मठेपी अपराधी त्या भयंकर बोटीवर चढून काळेपाण्याकडे गेले त्यांतून हजारीं दहाहि जिवंतपणीं देशास परत येऊं शकले नाहींत. अठरा-वीस*

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. ४४-४५.

*वर्षांचीं चढत्या तारुण्याचीं पोरें त्या जहाजावर पाय टाकतांच ऐशीं वर्षांच्या म्हाताऱ्यासारखीं प्रेतकळा आलेलीं दिसूं लागत. मनुष्य एकदां तिरडीवर बांधला गेला म्हणजे जसे त्याचे आप्तइष्ट तो ह्या जगांतून कायमचा जात आहे म्हणून समजतात आणि त्या भावनेनें दुःखित, विस्मित व स्तिमित होऊन शून्यपणें त्याच्या त्या प्रेतयात्रेकडे पाहतात, त्याचप्रमाणें काळेपाण्यास जाणाऱ्या त्या बोटीवर जन्मठेपी चढूं लागले म्हणजे लोक ते स्वदेशास मेले असें समजून, त्यांच्याकडे शून्यपणें पहात ! तसेच ते माझ्याकडेहि पाहात होते ! मी या जगतास मेलों अशी भावना त्यांच्या मुद्रेवर स्पष्ट उमटलेली होती. आणि ती खरी होती. मी खरोखरच तिरडीवर चढविला जात होतों. फरक इतकाच की, प्रेताला तिरडीवर चढवितांना ज्या भावना प्रेक्षकांच्या मनास स्तंभित करून वा कासावीस करून प्रेतयात्रेच्या वाटेवर खिळून धरतात त्या भावना प्रेतास कळत नसतात. पण, मी तिरडीवर बांधला जात आहें आणि माझी प्रेतयात्रा निघत आहे हें मला कळत होतें.... या कळण्याचेंच मला अधिक दुःख वाटलें.*

इंग्लंडहून हिंदुस्थानला ने[illegible] सावरकरांना ' मोरिया ' बोटीवर चढविण्यांत आलें त्यानंतर बरोबर वर्षानें त्यांना या ' महाराजा ' बोटीवर चढविण्यांत आलें ! आणि तें कोणत्या मनःस्थितींत ! तर, दोन जन्मठेपींची ही दारुण शिक्षा भोगून आपल्या प्रिय व पूज्य मायदेशाच्या पुनर्दर्शनाची या जन्मांत तरी आतां आशा नाहीं असें निश्चित वाटण्याच्या मनःस्थितींत !

---

## प्रकरण १३ वें

# अंदमानांतलीं पहिलीं वर्षें

*It is a wonder that from Andamans, the nation has been fortunate to get back so many of its valiant sons alive. The degree of Andamans repression in the Great War days was in no way less than what we read of the Russian fortress. Extreme courage and fortitude were needed to resist the authorities all through the years and yet keep alive.[1]

कारागृहीं तो न तपोवनाला । स्वातंत्र्य-योगेंद्र जणूं निघाला ।
भूभक्तिच्या आचरि सत्तपाला । कारागृहाचें भय काय त्याला ?

—कवि गोविंद

भारतखंडाचें रेखाचित्र समोर धरून त्याच्या उजव्या अंगाला नजर टाकली तर, गंगासागरांत (बंगालच्या उपसागरांत) कलकत्ता व मद्रास या शहरांपासून ६००—७०० मैल अंतरावर अंदमान असें नांव आढळतें. या नांवानें सूचित होणारा भूभाग हा एक द्वीपपुंज आहे. अगदीं लहानसहान बेटें जमेस धरलीं तर या द्वीपपुजांतल्या सर्व द्वीपांची संख्या २०० हून जास्त भरते. उत्तर अंदमान, मध्य अंदमान व दक्षिण अंदमान हे तीन महत्त्वाचे भूभाग व दक्षिण अंदमानच्या दक्षिणेस असलेला रतलंद नांवाचा लहानसा भूभाग यांचा मिळून 'वडा अंदमान' बनलेला आहे व उरलेल्या भागाला 'छोटें अंदमान' ही संज्ञा प्राप्त झालेली आहे. या दोन्ही अंदमानांचें एकवट क्षेत्रफळ २५०८ चौरस मैल आहे.[२] सध्यां हा भूभाग जपानच्या ताब्यांत आहे व त्यामुळें आपल्याला शरीरतः तेथें जाणें शक्य नाहीं. तथापि, कल्पनेच्या विमानांत बसून या भूभागाचा परिचय करून घेणें आजहि आपल्याला शक्य आहे. सावरकरप्रभृति देशभक्तांनीं राजबंदी म्हणून अंदमानच्या कारावासांत १०—११ वर्षें काढलेलीं आहेत. त्यांच्याबरोबर, त्यांचे सहकष्टभोगी म्हणून आपल्याला रहावें लागलें

---

* In Andamans : The Indian Bastille, by Bejoy Kumar Sinha : Preface p. 13.

१ अंदमानांत निर्वासित करण्यांत आलेल्या शूर भारतपुत्रांपैकीं इतके सुदैवानें जिवंत परत आले हें नवल होय. रशियांतल्या दुर्गांतून डांबून ठेविलेल्या राजबंदींच्या छळाचीं वर्णनें आपण वाचतों; गेलें महायुद्ध चालू होतें त्या काळांत अंदमानांत राजबंद्यांवर जो जुलूम होत होता तो या रशियन जुलुमाहून कमी नव्हता. अधिकारीवर्गाशीं एकसारखें वर्षानुवर्षें झगडतहि रहावयाचें व जीवहि जगवावयाचा— या दोन्ही गोष्टी साधावयासाठीं कमालीच्या धृत्युत्साहाची आवश्यकता होती.

२ Cardew Committee Report.

असतें तर, आपल्यापैकीं पुष्कळांचा निभावच लागला नसता. निदान कल्पनेनें तरी त्यांच्याबरोबर अंदमानांत वास्तव्य करण्यावांचून मात्र आपल्याला गत्यंतरच नाहीं. आणि, हें वास्तव्य कष्टप्रदहि वाटण्याचा संभव नसल्यामुळें, आपण अंदमानांत शिरूं या; तेथील व्यक्ति, राहणी, शिस्त इत्यादींचा परिचय करून घेऊं या आणि, अशा रीतीनें, सावरकरांच्या तेथील वास्तव्यकाळाची माहिती मिळविण्याचा आपण प्रयत्न करूं या!

हिंदुस्थानांतल्या कांहीं गुन्हेगारांना हिंदुस्थानाबाहेर कोठें तरी डांबून ठेवण्याची कल्पना इंग्रजांच्या मनांत १७८७ सालींच प्रथम उद्‌भवली. प्रथम कित्येक वर्षें अशा कैद्यांना सुमात्रा बेटांत धाडण्यांत येत असे. १८२५ सालीं सुमात्रा बेट डच्चांकडे गेल्यावर, तेथील कैद्यांना स्ट्रेट्स् सेटल्मेंटमध्यें धाडण्यांत आलें. १८५६–५७ पर्यंत हा क्रम चालू होता; पण, १८५७ च्या क्रांतियुद्धांत अनेक राजक्रांतिकारकांना देशाबाहेर कोठें तरी डांबून ठेवण्याची जरुरी वाटूं लागली व त्यामुळें अंदमान बेटांचा या कामीं उपयोग करण्याला प्रारंभ झाला. समुद्रपर्यटन करण्याची कल्पना त्या काळांत भयप्रद व पापप्रद वाटत असल्यामुळें, समुद्रपर्यटन करून अंदमानांत पाठविण्यांत येणाऱ्या गुन्हेगारांना 'काळ्या पाण्याचे कैदी' अशी संज्ञा लावण्यांत येऊं लागली. या गुन्हेगारांना कामाला लावून हा भूभाग 'सुधारतां' येईल, अशी इंग्रजांची प्रथम कल्पना होती व या ठिकाणीं आपण जणूं एक नवी वसाहतच वसवीत आहों, अशा थाटांत पुष्कळसे इंग्रज लिहीत बोलत असत. पण, वसाहत वसविण्याचा हा प्रयोग अनेक कारणांमुळें यशस्वी होऊं शकला नाहीं. या मुलुखाची सर्द हवा वसाहतीच्या सुस्थितीच्या दृष्टीनें अत्यंत प्रतिकूल ठरली. जानेवारी, फेब्रुवारी व मार्च हे तीन महिने वगळले तर उरलेल्या साऱ्या वर्षभर पाऊस पडत असल्यामुळें, येथील हवा अत्यंत सर्द असते. या सगळ्या बेटभर दाट जंगल असल्यामुळें व खाड्यांचें पाणी अनेक ठिकाणीं आंत घुसलें असल्यामुळें, येथील रहिवाशांना मलेरियाचा त्रास मनस्वी होत असे. १९१४ नंतर या कामीं सरकारनें कांहीं लक्ष घातलें व मलेरियाचा त्रास हटविण्याच्या कामीं कांहीं प्रयत्न झाले हें खरें; पण, अद्यापहि हें बेट वसाहतीला पूर्णपणें योग्य झालें असें म्हणतां येणार नाहीं. चालू युद्धानंतर हें बेट कोणाकडे राहतें व या बेटाचें लष्करीदृष्ट्या महत्त्व ओळखून, त्याची आरोग्यविषयक व वसाहतविषयक व्यवस्था कशी काय लागते हें आजच ओळखणें फार कठीण आहे. या हवामानाचा मृत्यूच्या प्रमाणाच्या दृष्टीनें भयंकर परिणाम होत असे हें सरकारी इतिवृत्तांतूनहि नमूद करण्यांत आलेलें आहे.[1]

अंदमानांतील वसाहत यशस्वी न होण्याचें हवामानाइतकेंच दुसरेंहि एक सबळ कारण होतें. कारावासाच्या एकंदर अवधींतला कांहीं काळ कारागृहांत काढल्यावर कैद्याला हळूहळू बाहेर सोडण्यांत येत असे व असा कांहीं काळ गेल्यावर त्याला

[1] Cardew Committee Report.

स्वावलंबी (Self-supporter) म्हणून बाहेर मर्यादित स्वातंत्र्यांत राहतां येत असे हें खरें; पण, स्वावलंबी म्हणून राहूं इच्छिणाऱ्या लोकांचें मन तेथें रमावें यासाठीं अवश्य असणाऱ्या सोई पुरविल्या जात नसत. वैवाहिक जीवनाची सोय ही अशा सोईपैकीं अत्यंत प्रमुख सोय असूनहि, तिची म्हणण्यासारखी व्यवस्था करण्यांत येत नसे. अंदमानांत येणाऱ्या कैद्यांपैकीं ज्यांचीं लग्नें पूर्वी झालेलीं असतील अशांच्या बायका दीर्घकाळ लोटल्यावर अंदमानांत येऊन राहतीलच असा नेम नसे; व अशा बायकांनीं तेथें येऊन राहण्याच्या दृष्टीनें अंदमानचें जीवन निर्मळ होतें असेंहि नाहीं. अशा अनेक भानगडींमुळें वसाहतीची कल्पना खऱ्या अर्थानें पारख-ण्यांतच आली नाहीं; त्यामुळें, ती कल्पना अपेशी ठरली असेंहि खरोखर म्हणतां यावयाचें नाहीं !

हें खरें असलें तरी, अंदमानांतल्या कैद्यांच्या श्रमानें शक्य ते उद्योगधंदे चालविण्याची मात्र सरकार पराकाष्ठा करीत असे. सभोंवार जंगल मुबलक असल्या-मुळें व तें तोडीत जाण्यानेंच हा मुलूख अधिक आरोग्यप्रद होण्यासारखा असल्या-मुळें जंगलसफाईचें काम सतत सुरू असे. हें काम मोठें कष्टाचें व त्रासाचें होतें. जंगल तोडतांना माशा व मलेरियाचे डांस यांचा त्रास तर सोसावा लागतच असे; शिवाय, भोंवतालच्या चिखलांत व झाडांच्या पानांतून लपून बसलेल्या जळवांचाहि मनस्वी त्रास सोसावा लागत असे. या जळवांचा त्रास कैद्यांना किती असह्य वाटत असे हें सावरकर यांनीं पुढील शब्दांत सांगितलें आहे [1] :

*मोठे मोठे बदमाष, पाजी कंटक लोक—कारागृहांतील कठोरांतील कठोर शिक्षेस भीक न घालणारे—पण जंगल काटण्यास ते जात तेव्हां जळवांच्या भयानें ते देखील कांपूं लागत. जंगलांतून काम करून संध्याकाळीं बंदी लोक परत येतांना रक्तांत न्हाल्यासारखे दिसत; कारण, जेथें तेथें जळवांनीं डसून डसून त्यांच्या अंगास छिद्रें पडलेलीं आणि त्यांतून रक्ताच्या बारीक धारा सारख्या सुरू असलेल्या असत. बरें, त्या जळवा तरी एक का दोन, हातांनीं मनुष्य मुठी—मुठी भरून अंगावरून काढून टाकतोच आहे आणि लहान-मोठ्या जळवांच्या झुंडीवरून उड्या घेत वा खालून चढत या बाजंनीं बिलगतच आहेत.*

जंगलतोडीच्या कामांतून निघणारा प्रचंड उद्योग म्हणजे इमारतींना योग्य असें लांकूड तयार करण्याचा. हें लाकूड तयार करणारी एक गिरणी (Saw-mill) अंदमानांत चालू होती. अंदमानांत नारळीचीं झाडें विपुल असल्यामुळें, खोबऱ्याचें तेल बनविणें, चोडणें कुटून काथ्याच्या दोऱ्या बनविणें इत्यादि उद्योगहि येथें फार मोठ्या प्रमाणावर चालत असत. याशिवाय चहाबाग, भाजीबाग वगैरे संस्थां-

---

1 माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. ५६.

मधूनहि कैदी कामें करीत असत. लोखंड, पितळ वगैरेंचे कामहि येथें चाले. भोंवतालच्या समुद्रकिनाऱ्यावर मोठ्या प्रमाणांत सांपडणारे शिंपले, कांसवांच्या पाठी इत्यादि पदार्थांच्या सुंदर सुंदर वस्तु बनविण्याचें कामहि येथें फार मोठ्या प्रमाणावर चालत असे. अंदमानसभोंवार पसरलेल्या समुद्रांतील प्राणिसृष्टि अशा कामाला किती अनुकूल आहे हें श्री. बारींद्रकुमार घोष यांनीं लिहिलेल्या हकीकतींतल्या पुढील अवतरणावरून[1] वाचकांच्या लक्षांत येईल :

*जलचर प्राण्यांच्या किती जाती आहेत आणि त्यांच्यांत विचित्रता किती भरली आहे हें सांगणें जवळ जवळ अशक्यच आहे. पांढरे मासे, काळे मासे, गोगलगाय, कांसवें यांचे ते हजारों तऱ्हेचे इंद्रधनुष्याप्रमाणें चमकणारे रंग पाहिले म्हणजे मन मोहून जातें. घोडा मासळी या नांवाच्या एका जातीचें तोंड तर हुबेहूब घोड्यासारखेंच असतें !...अशीं सर्व जातींची नांवें आणि वर्णनें लिहूं लागलों तर तें एक स्वतंत्र पुस्तकच होईल. शंकार माशाचें पुच्छ अति बळकट असतें. त्याचा एकच तडाखा पायावर बसला तर मांस कापून हाड भंगून जातें. या मासळीच्या शेंपटाचे चाबूक बनविण्यांत येतात ब्लेडर मासा ज्या वेळीं भयभीत होऊन जातो त्या वेळीं आपलें सर्व शरीर फुगवून, तोंडांत खूप पाणी भरून घेतो व तें जोरानें उडावितो आणि डोळे फडफडून बघूं लागतो.*

हे सर्व उद्योगधंदे ज्यांच्या जिवावर चालावयाचे ते सर्व कैदीच असल्यामुळें, व अंदमान हें हिंदुस्थानच्या कोणत्याहि भागापासून तीनचार दिवसांच्या तरी प्रवासाच्या अंतरावर वसलेलें असल्यामुळें, येथील एकंदर व्यवस्था म्हणजे एखाद्या स्वतंत्र राज्याच्या व्यवस्थेसारखीच भासत असे. चीफ कमिशनर हा येथील सर्वश्रेष्ठ सरकारी अधिकारी असे. अंदमानमधील प्रमुख भाग जो पोर्ट ब्लेअर त्यांतल्या रास नांवाच्या टापूंत याचा बंगला असे व या बंगल्याइतका उंच बंगला या वसाहतींत दुसरा कोणताहि नसे. कमिशनरसाहेब जागेवर असतील तेव्हां या बंगल्यावर 'यूनियन जॅक' फडकत असलें पाहिजे, असा प्रघात होता. माउन्ट हेरियट या अत्युच्च पर्वत-शिखरावरहि कांहीं सरकारी बंगले होते व सिमल्याचें अनुकरण करण्याच्या बुद्धीनें सरकारी अधिकारी उन्हाळ्यांत या बंगल्यांत जाऊन रहात असत.[2] या बेटांतील रानटी टोळ्यांशीं क्वचित् संघर्ष उत्पन्न झाला, किंवा कैद्यांनींच कांहीं विशेष बंडाळी केली अगर बारीकसारीक शत्रूंचें भय उत्पन्न झालें तर त्या सगळ्याचा कांहींतरी बंदोबस्त करतां यावा म्हणून पोर्ट ब्लेअरच्या पश्चिम भागांत समुद्रकिनाऱ्यालगत लष्करी छावणी ठेविलेली होती. चीफ कमिशनरच्या खालोखाल असा दुसरा अधिकारी म्हणजे सुपरिंटेंडेंट व त्याच्या हाताखालचा अधिकारी म्हणजे

---

१ राजनैतिक कारस्थान : द्वितीय खंड ( काळ्या पाण्यावर ) पृ. १२८-१२९.
२ राजनैतिक कारस्थान : द्वितीय खंड (काळ्या पाण्यावर) पृ. १४१-१४२.

जेलर. १९११ सालीं कर्नल ब्राउनिंग नांवाचा साहेब चीफ कमिशनर होता, कॅप्टन मूर नांवाचा साहेब सुपरिंटेंडंट होता व बारीसाहेब मुख्य जेलर होता. याच्याखालीं डेप्युटि जेलर, डॉक्टर्स वगैरे जे सरकारी अधिकारी असत त्यांतले पुष्कळसे हिंदी असत.

याठिकाणच्या कारागृहाची आंखणीहि कांहीं एका पद्धतीनें करण्यांत आलेली होती. भोंवतालच्या बळकट तटाच्या आंत जवळजवळ एकसारख्या अशा तिमजली सात इमारती बांधलेल्या होत्या व त्या इमारतींच्या मध्यभागीं सेंट्रल टॉवर म्हणून एक इमारत होती. कांहीं इमारतींत प्रत्येक मजल्यावर २० खोल्या काढलेल्या होत्या तर कांहींतून खोल्यांची संख्या ३० होती. तुरुंग कोठड्या-कोठड्यांचा असल्यामुळें त्याला Cellular Jail अशी संज्ञा मिळाली होती व या संज्ञेचें इंग्रजी अपभ्रष्ट रूप 'सिल्व्हर जेल' हेंच पुष्कळांच्या तोंडीं बसून गेलें होतें. १९११ सालीं सावरकर अंदमानांत गेले तोंपर्यंत, १८५७–५८ च्या स्वातंत्र्ययुद्धांत पाडाव झालेल्या क्रांतिकारकांपैकीं एक कैदी तेथें होता व सुमारें साठ वर्षे कैद भोगल्यावर त्याची नंतर कांहीं वर्षांनीं मुक्तता झाली. वासुदेव बळवंत फडक्यांच्या साथीदारांपैकीं एकदोन साथीदार अंदमानांत डांबून ठेवण्यांत आलेले होते व ते १९११ च्या सुमारासच अंदमानांतून सुटले.[1] १९०९ पासून आधुनिक काळच्या हिंदी क्रांतिकारकांच्या पादस्पर्शानें अंदमान पावन होऊं लागलें. श्री. गणेशपंत सावरकर व जोशी या महाराष्ट्रीय क्रांतिकारकां-व्यतिरिक्त बंगाल, युक्तप्रांत वगैरे भागांतले कांहीं क्रांतिकारक यापूर्वींच तेथें गेलेले होते. बारींद्रकुमार घोष, उल्हासकर दत्त, हेमचंद्र दास, हृषीकेश कांजीलाल, इन्दुभूषण राय चौधरी, विभूतिभूषण सरकार, अविनाशचंद्र भट्टाचार्य, उपेंद्रनाथ बानर्जी प्रभृति बंगप्रांतीय क्रांतिकारक व अलाहाबादच्या 'स्वराज्य' पत्राचे संपादक श्री. नंदगोपाळप्रभृति संयुक्तप्रांतिय राजद्रोही कैदी हे सर्व 'राजबंदी' तेथें नेऊन ठेवण्यांत आलेले होते.

पहिल्या वर्षाभराच्या काळांत या राजबंदींचें जीवन विशेषसें कष्टमय झालें नसावें, असें दिसतें. त्यांना बारीसाहेबांच्या घाशीरामी शिस्तीमुळें त्रास झाला, नाहीं असें नाहीं. अंदमानमधल्या पठाण वॉर्डरांचा व पेटी ऑफिसरांचा त्रासहि त्यांना सहन करावा लागला. अंदमानांत येणाऱ्या पठाण कैद्यांची वास्तविक योग्यता काय असे, हें सरकारी इतिवृत्तांतूनहि नमूद करण्यांत आलें आहे. काडर्यू कमिटीनें १९१९ सालीं असा अभिप्राय व्यक्त केला कीं, पुष्कळशा बंद्यांना अतःपर अंदमानला धाडण्याचें कारणच उरलेलें नाहीं. पण, हा अभिप्राय सरहद्द प्रांतांतल्या पठाणांना लागू नाहीं, असें या समितीनें मुद्दाम स्मरणपूर्वक बजावून ठेविलें आहे. गुन्हेगार पठाणांची वृत्ति धर्मांध असते, ते खुनी व अत्याचारी असतात, म्हणून त्यांना

---

1 माझी जन्मठेप : पूर्वार्ध पृ. ६३.

तेवढा काळया पाण्याचा हिसका दाखवलाच पाहिजे, असें सांगतांना काडर्यू कमिटी म्हणते: Their deportation to Andamans would be necessary and desirable even when deportation is discontinued in a number of cases. (कैद्यांना अंदमानला काळया पाण्यावर धाडण्याची प्रथा पुष्कळशा बाबतींत बंद केली तरी, अशा कैद्यांना अंदमानला धाडणें अवश्य व इष्टच ठरेल!) पापाचाराच्या बाबतींत या पठाणांचा क्रमांक किती श्रेष्ठ होता याबद्दलचें प्रशस्तिपत्रहि काडर्यू कमिटीनेंच देऊन ठेविलें आहे: The Pathans enjoy a bad pre-eminence as the active agents in the matter of unnatural vice while the Burman is generally reputed to be the passive agent. (अनैसर्गिक गुन्हे करण्याच्या प्रवृत्तीचा विचार केला तर पठाणांची या क्षेत्रांतली कुप्रसिद्धि सर्वश्रेष्ठ ठरते. या गुन्ह्यांना बळी पडणारे म्हणून ब्रह्मी कैद्यांचा लोमान्यतः दुर्लौकिक झालेला आहे.)

पठाण कैद्यांच्या या प्रवृत्ती अधिकाऱ्यांच्या लक्षांत येत नसत, असें नाहीं. पण, कैदीसाम्राज्यांत अधिकार चालविण्यासाठीं या मूठभर अधिकाऱ्यांना ज्या प्रकारचे हस्तक हवे होते ते हस्तक या पठाणांतूनच मिळण्यासारखे असल्यामुळें, त्यांच्या पापप्रवृत्तीकडे दुर्लक्ष करण्याला ते तयार होत व त्यामुळें जमादार, टंडेल, पेटी ऑफिसर वगैरे क्षुद्र अधिकारस्थानांवर पठाण कैद्यांचीच वर्णी लागे. १९१० ते ११ सालच्या सुमारास जमादार खोयदादखां, मुन्शी गुलाम रसूल, मिर्झाखान वगैरे पठाण अधिकारी अंदमानांत राज्य करीत होते. वीस नारळांचीं सुकीं सोडणें कुटून त्यांतल्या तंतूंचा बंगाली एक शेर वजनाचा गोळा बनाविणें, तीन रत्तल काथ्या बनाविणें इत्यादि नियमसिद्ध कामें कैद्यांनीं पुरीं केलीं नाहींत तर हे अधिकारी त्यांना सतावीत; इतकेंच नव्हे तर, चालणें-बोलणें अशा सामान्य व्यवहारांतल्या साध्या नियमभंगांबद्दलहि ते त्यांना मारहाण करावयाला चुकत नसत. या क्रूर देवतांचा क्षोभ टळावा म्हणून एक उपाय योजावा लागे. श्री. बारींद्रकुमार घोष यांच्याच शब्दांत या उपायाचें वर्णन करणें शक्य आहे. ते लिहितात[1]:

*मी आणि अविनाशबाबू आजाऱ्यांच्या मंडळांत असल्यामुळें आम्हांला रोज बारा औंस दूध मिळत होतें. मला मिळणारें दूध केव्हां केव्हां मी खांसाहेबांना नैवेद्य म्हणून अर्पण करीत असें. पहिल्यापहिल्यानें साहेब जरासा संकोच दाखवीत. पण पुढेंपुढें, दूध हातीं घेऊन 'कशाला कशाला' म्हणून डोळे मिचकावीत घटघटा दूध पिऊन टाकीत.........मला येथें प्रांजलपणें कबूल करणें भाग आहे कीं, असें दूध पिणें म्हणजे एक प्रकारची लांचच होती.*

---

१ राजनैतिक कारस्थान: द्वितीय खंड (काळया पाण्यावर): पृ. १६०, (माझी जन्मठेप: पूर्वार्ध: पृ. ९८–९९ ही पहा.)

या सर्व गोष्टी घडत असल्या तरी, त्या वेळेस राजकीय बंद्यांची अवस्था तुरुंगांतल्या मानानें अगदींच दुःसह नव्हती.[१] दीड वर्ष अंदमानांत काढल्यावर श्री. इंदुभूषण राय चौधरी यांनीं आपल्या वडील बंधूंना जें पहिलें पत्र धाडिलें त्यांत त्यांनीं कारावासांतल्या आपल्या स्थितीचें वर्णन केलें असून, श्री. हेमचंद्र दास यांच्यासाठीं कांहीं पुस्तकांची मागणी केली आहे. या पत्रांतल्या कांहीं वाक्यांच्या पुढील भाषांतरावरून असा निष्कर्ष निघतो कीं, या सुमारास तेथील राजबंद्यांची स्थिति दुःसह झालेली नव्हती :

*आज दीड वर्षानें मला बंगालीमध्यें लिहू दिलें जात आहे...सध्यां आम्हांस खावयास तूप मिळत असून, मासे व दहीं आठवड्यांतून दोनदां मिळतें. तुरुंगावरील अधिकारी आमच्याशीं दयाळूपणानें वागतात.*

हें पत्र लिहिलें गेल्यानंतरच्या वर्षाभराच्या अवधींत राजबंदींना वागविण्याच्या धोरणांत जो अनिष्ट बदल झाला त्याची मीमांसा सावरकर यांनीं पुढील शब्दांत केली आहे[२] :

*कांहीं महिने असे जातांच कलकत्त्याहून पाहणीसाठीं + + + नांवाचे एक पोलिस अधिकारी अंदमानास आले. त्यांनीं येऊन जेव्हां राजकीय बंदी 'छिलका' कुटीत आहेत आणि एकत्रच—जरा अंतराअंतरावर—ठेवलेले आहेत हें पाहिलें तेव्हां बंदिगृहांतील माणसांस इतक्या तरी माणुसकीनें वागविण्यांत यावें याचा त्यांना साहजिकच विषाद वाटला. त्यांनीं अंदमानाच्या अधिकाऱ्याची कानउघाडणी केली आणि हे बंदिवान ...अट्टल बदमाष राजकीय बंदिवान आहेत आणि त्यांची खोड मोडेल असेंच त्यांस इतःपर वागविलें जावें असें उच्च राजकीय तत्त्वाचें मर्म ह्या स्थानिक आडदांड अधिकाऱ्यांच्या चित्तांवर ठसवून दिलें.*

कलकत्त्याहून मिळालेल्या या कानमंत्रामुळें राजबंद्यांना वागविण्याच्या एकंदर धोरणांतच पालट झाला हें जसें खरें त्याप्रमाणेंच, पूर्वीचा सुपरिंटेंडेंट बदलून त्याच्या जागीं नवा सुपरिंटेंडेंट आल्यामुळेंहि, बारी व त्याचे यमदूत यांच्याकडून पालटलेल्या धोरणाची कडक अंमलबजावणी होऊं लागली हेंहि खरें. कॅप्टन मूर हे जुने सुपरिंटेंडेंट,स्वतःचें लग्न जमविण्यासाठीं, रजा घेऊन इंग्लंडला गेले व त्यांच्या जागीं मेजर बर्क हे नवे सुपरिंटेंडेंट आले त्या वेळेपासून राजबंदींच्या छळाला पद्धतशीरपणें प्रारंभ झाला. राजबंद्यांना अलग अलग ठेवण्याची पद्धत सुरू झाली व त्यांना परस्परांपाशीं बोलण्याला मनाई करण्यांत आली. त्यांना घाण्याची शिक्षा देण्यांत येऊं लागली तीहि याच काळांत! या सर्व प्रकारांचा परिणाम असा झाला होता कीं, १९११ जुलैच्या प्रारंभीं सावरकर अंदमानला येऊन पोंचले त्या सुमारास

१ केसरी : ९–८–१९१०.
२ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. ९९.

तेथील राजबंदींचीं मनें अत्यंत असंतुष्ट झालेलीं होतीं व अधिकारी आणि राजबंदी यांचे वारंवार खटके उडूं लागले होते.

सावरकर अंदमान येथील कारागृहांत दिनांक ४-७-११ रोजीं प्रविष्ट झाले अशी नोंद त्यांच्या History Ticket मध्यें करून ठेवण्यांत आलेली आहे. दिनांक १-७-११ रोजीं त्यांना मद्रास बंदरांत 'महाराजा' आगबोटीवर चढविण्यांत आलें असावें. या बोटीच्या कोंदट तळमजल्यावरील अंधारी पिंजऱ्यांत त्यांना कोंबण्यांत येऊं लागलें तेव्हां त्यांनीं आपल्याला ब्रॉंकायटिसची व्यथा असल्याचें अधिकाऱ्यांस कळविलें. पण, त्याचा उपयोग झाला नाहीं. पिंजऱ्याच्या मध्यभागीं अंथरूण न घालतां कोपऱ्यांतल्या भोंकानजीक गजापाशीं अंथरूण घालावें म्हणून जी सवलत त्यांना देण्यांत आली ती परिणामीं त्रासदायकच ठरली. कारण, पिंजऱ्यांत कोंबण्यांत आलेल्या सर्व कैद्यांच्या मलमूत्रोत्सर्गासाठीं जें पीप ठेवण्यांत आलें होतें तें याच कोपऱ्यांत असल्यामुळें, रात्रीं दुर्गंधीमुळें सावरकरांना भयंकर त्रास सोसावा लागला. काळें पाणी व तेथील भयाण जीवन यांच्या कल्पनेनें भयभीत झालेल्या पिंजऱ्यांतल्या इतर कैद्यांना, सावरकरांना पन्नास वर्षांचा काळ अंदमानांत काढावयाचा आहे हें कळलें, तेव्हां तुलनेनें आपलें दुःख सुसह्य आहे असें वाटूं लागलें. बोटीवरील कित्येक उतारूंना सावरकरांचें चरित्र कळलेलें असल्यामुळें त्यांच्या मनांत त्यांच्याबद्दलचा आदरभाव वसत होता. त्यांच्या आग्रहामुळें व बोटीच्या कप्तानानें परवानगी दिल्यामुळें सावरकर व त्यांच्याबरोबरचे इतर बंदिवान यांना भात, मासे, लोणचीं वगैरे पदार्थ खाण्यासाठीं मिळूं शकले. बरोबरीच्या बंदिवानांना स्वदेशाच्या स्थितीसंबंधीं माहिती सांगावी, स्वतःशीं तात्त्विक विचार करण्यांत तासचे तास घालवावे, अंदमानांतल्या संभाव्य अनुभवांची कल्पना रेखाटण्यांत घटकाघटका घालवाव्या, अशा प्रकारें सावरकरांचा प्रवासांतील वेळ चालला आहे तों दिनांक ४-७-१९११ चा प्रभातकाळ झाला व अंदमानचा किनारा दुरून दिसूं लागला.

आगबोटीनें बंदरांत नांगर टाकला तों चांगलें उजाडून सूर्य वरती आला होता. बंदिवानांस नेण्यासाठीं आलेल्या छोटया आगबोटी महाराजा बोटीच्या अंगाशीं भिडूं लागल्या. सगळ्या बंदिवानांच्या डोक्यावर 'बिस्तारा' व हातांत 'थाळीपाट' देण्यांत आले. घाटावर आल्याबरोबर इतर बंदिवानांना बंदोबस्तानें तुरुंगाकडे नेण्यांत आलें. सावरकर यांना मात्र युरोपियनांच्या पहाऱ्यांत निराळें ठेवण्यांत आलें. अंदमानचें सृष्टिसौंदर्य, हिंदुस्थानच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें अंदमानचें नाविक सामर्थ्य सुसज्ज ठेवण्याची जरुरी इत्यादि गहन विषयांत सावरकरांचें मन गढलें आहे तोंच 'चलो, उठाव बिस्तारा' हे शब्द त्यांच्या कानांवर आदळले. खांकेंत वळकटी घेऊन घाटावरून निघाल्यावर एक चढण चढून जावयाचें होतें. सावरकर अनवाणी चालत होते व त्यांचे पाय बेड्यांनीं जखडलेले होते. त्यामुळें त्यांना चढण्याला

थोडा विलंब लागूं लागला. त्याबरोबर त्यांना ' चलो, जलदी चलो ' असें आज्ञापिण्यांत आलें. कारागृहाचा भक्कम दरवाजा दिसूं लागला. सावरकरांच्या भीषण स्वागतार्थ त्या दरवाजाच्या लोखंडी बिजागरांच्या दाढा करकरूं लागल्या ! तुरुंगानें आपल्या दाराचा जबडा उघडला. सावरकर आंत शिरल्याबरोबर तो जबडा तत्काळ बंद झाला. बाह्य जगाच्या दृष्टीनें सावरकर अदृश्य झाले !

" बारीसाहेब आता है " अशी गर्जना झाली. दोघां सार्जंटांनीं सावरकरांना धरून ठेविलें आहे व ते भोंवतालीं दिसणाऱ्या भीषण वस्तूंकडे पहात आहेत तों आपण जरा आंत घुसूं व बारीसाहेबांचा परिचय करून घेऊन, त्यांच्याबरोबर फिरून या ठिकाणीं येऊं. स्वतःला अंदमानाचा परमेश्वर मानणारे बारीसाहेब हे एक आयरिश गृहस्थ आहेत. हा परमेश्वर कैदेंतल्या सर्व बंदिवानांना प्रत्यक्ष यमराज भासतो. बारीचा बंगला या कारागृहालगतच असून त्याच्या कुटुंबांत माणसेंहि मोजकींच आहेत. बारीची पत्नी पायानें व्यंग आहे. तिचा एक पाय दुसऱ्याच्या मानानें आंखूड आहे ! या जोडप्याला कॅथेलिन नांवाची एकुलती एक मुलगी आहे. बारीचे बटबटीत डोळे, त्याचें लाल लाल तोंड, त्याच्या उग्र व भव्य मिशा, त्याचें चपटें नाक व त्याचें ठेंगणें शरीर या सर्व साधनसामग्रीला त्याच्या डेरेदार पोटानें मोठी शोभा आणली आहे. कसल्याहि अट्टल बदमाष गुन्हेगाराला भयग्रस्त करील अशीच बारीची एकंदर मूर्ति आहे. या आपल्या रुबाबांत भर पडावी म्हणून बारी आपल्या हातांत सदैव एक लठ्ठ काठी बाळगीत असतो. बारीबाबा हिंदु नसूनहि, अग्निहोत्री आहे ! त्याच्या तोंडांत चार इंच लांबीचा ब्रह्मी चिरूट सारखा शिलगावलेला असतो !

बारीसाहेब सावरकरांच्या समोर येऊन उभे राहिले तरी सावरकर आपल्याच विचारांच्या तंद्रींत होते. सावरकरांचें आपल्याकडे लक्षहि नाहीं हें पाहून बारीला आश्चर्याचा पहिला धक्का बसला. अखेर या दोघांची दृष्टादृष्ट होतांच बारीनें सार्जंटांना बाजूला होण्यास सांगितलें. नंतर या दोघांचें पुढील आशयाचें संभाषण झालें :—

बारी :—मार्सेलिस येथें निसटून जाण्याचा प्रयत्न करणारे आपणच वाटतं !

सावरकर :—अलबत ! कां बरें ?

बारी :—कशासाठीं बरें तो प्रयत्न केलात ?

सावरकर :—होतीं. तशींच कारणें होतीं ! या सगळ्या त्रासांतून सुटतां आलें तर पहावें, हेंहि त्या कारणांतलें एक कारण होतें !

बारी :—पण, त्या त्रासांत तुम्ही स्वतः आपणहूनच पडलेत ना !

सावरकर :—होय ! पण, त्या त्रासांत स्वतःच पडणें हें जसें कर्तव्य वाटलें तसेंच त्यांतून शक्य तर सुटणें हेंहि कर्तव्यच वाटलें !

बारी :—हें पहा—मी कांहीं इंग्रज नाहीं—मी आयरिशमन आहे—

सावरकर :—आणि, कदाचित् इंग्रज असतेत तरी, तेवढ्याचमुळें मी

तुम्हांला अपूज्य वा तिरस्करणीय मानलें नसतें ! माझ्या उमलत्या तारुण्याचीं कांहीं वर्षें मीं इंग्लंडांत काढलीं आहेत आणि इंग्रजांच्या कित्येक सद्गुणांचा मी चाहता आहें.

बारी :—मी आयरिशमन आहें हें अशासाठीं सांगितलें कीं, आयर्लंडच्या स्वातंत्र्यसंग्रामांत मीहि लहानपणीं झुंजलों आहे ! पण, आतां माझें मत पालटलें आहे. मी मित्र म्हणून तुम्हांला सांगतों कीं, तुम्ही अजून तरुण आहांत, मी बराच वडील आहे—

सावरकर :—आणि कदाचित्, तुमच्या मानसिक स्थित्यंतराचें तेंच प्रमुख कारण असेल, नव्हे का ? वाढलेल्या शहाणपणामुळें तुमचें मतपरिवर्तन झालें असें मानण्यापेक्षां, ओसरलेल्या उत्साहामुळेंच तें परिवर्तन झालें हेंच जास्त संभवनीय नाहीं का ?

बारी :—हें पहा ! तुम्ही आहां बॅरिस्टर; मी आहें एक अशिक्षित जेलर ! पण, माझा उपदेश मात्र तुम्ही तुच्छ लेखूं नका. अहो ! खून ते खून ! त्यांनीं का कधीं देशस्वातंत्र्य मिळालें आहे !

सावरकर :—पण, हें सगळें तुम्ही तुमच्या सिनफीनवाल्यांना कां शिकवीत नाहीं ? आणि, मी हत्येचा पक्षपाती आहें हें अगोदर तुम्हांला सांगितलें कोणीं ?

बारी :—मीं तुमच्याशीं राजकारणी चर्चा केली हेंच वस्तुतः नियमाविरुद्ध आहे ! पण, तुमच्याविषयीं द्रव आल्यामुळेंच इतकें बोलावेंसें वाटलें ! असो ! येथील नियम तुम्हीं नीटपणें पाळिले म्हणजे इतर गोष्टींशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. नियमांविरुद्ध वागाल तर मात्र मला शिक्षा करावी लागेल ! आणि हें पहा, येथून पळूनबिळून जाण्याचा प्रयत्न करूं नका ! तसें कराल तर मात्र संकटांत सांपडाल ! या तटाभोंवतीं गहन अरण्यें असून त्यांत क्रूर रानटी लोक राहतात. तुमच्यासारखें कोंवळें पोर दिसलें कीं ते काकडीसारखें खाऊन टाकतात !

सावरकर :—तें मीहि जाणतों ! पकडला जातांच मी अंदमानचें सरकारी इतिवृत्त वाचून काढलें. पोर्ट ब्लेअर हें मार्सेलिस नव्हे, हें मी जाणून आहें !

सावरकरांना सात क्रमांकाच्या चाळीच्या तिसऱ्या मजल्यावरील कोठडींत बंद करून ठेवण्याची बारीनें आज्ञा दिली. या चाळींतला विजनवास सावरकरांना चांगलाच जाणवावा या हेतूनें ही चाळ पूर्णपणें रिकामी करण्यांत आलेली होती. या चाळीकडे सावरकरांना घेऊन जाणाऱ्या जमादारानें वाटेंतल्या हौदावर त्यांना स्नान करण्यास सांगितलें. जमादाराची शिस्त संभाळून तीन कटोऱ्या पाण्यांत स्नान करण्यापूर्वी सावरकरांना लंगोटी नेसावी लागली. त्या वेळीं क्षणभर त्यांना संकोच वाटला; पण, अशा गोष्टींची मनाला आतां संवय झालीच पाहिजे हें ओळखून, त्यांनीं त्या संकोचाला संक्षेप दिला. स्नानाचें पाणी समुद्राचें खारें पाणी आहे असें कळल्यावर, स्नानाच्या मानगर्डीत

पडल्याबद्दल सावरकरांना पश्चात्ताप झाला. पण, पिण्याला मिळणाऱ्या मोजक्या पाण्याशिवाय बाकीचा सर्व व्यवहार यापुढें खाऱ्या पाण्याच्या द्वाराच व्हावयाचा आहे हें ओळखून, त्यांनीं हें समुद्रस्नान उरकून घेतलें. कोठडींत बंद होऊन पडल्यावर त्यांच्या हें ध्यानांत आलें कीं, ज्या तिघा वॉर्डरांच्या हातीं त्यांना सोंपविण्यांत आलें होतें ते सर्वजण निर्ढावलेले पठाण होते व बंदिवानांचा छळ करून आणि अधिकाऱ्यांची खुषामत करून सुखांत जगणें एवढेंच एक ध्येय त्यांच्या दृष्टीसमोर होतें.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं बारीसाहेब व त्यांचे कांहीं गोरे पाहुणे असे मिळून सावरकरांच्या कोठडीपाशीं आले. बोलण्याच्या ओघांत बारी १८५७ च्या क्रांतियुद्धाकडे व सावरकरांनीं लिहिलेल्या त्या विषयावरील ग्रंथाकडे वळला. तेव्हां सावरकर म्हणाले : त्या विषयावरील बरींच पुस्तकें मीं वाचलीं आहेत हें खरें. बारीचें बोलणें ऐतिहासिक सत्यापेक्षां दंतकथांवरच जास्त आधारलेलें आहे हें सावरकरांनीं सिद्ध केल्यावर, बारीच्या पाहुण्यांपैकीं एकजण नानासाहेब पेशवे, तात्या टोपे इत्यादींच्या वर्तनाची चिकित्सा करूं लागला. ऐतिहासिक चर्चा मनमोकळेपणानें करण्याइतकें स्वातंत्र्य आपल्याला आहे अशी खात्री करून घेतल्यावर सावरकर म्हणाले : इंग्रजी स्त्रियांवर झालेल्या अत्याचारांचीं वर्णनें खोटीं व अतिरंजित आहेत हें इंग्रजांनींच नेमलेल्या एका सरकारी कमिशनचें मत आहे. नानासाहेब व तात्या टोपे यांना स्वार्थी म्हणावयाचें तर कोणत्याहि क्रांतियुद्धांतल्या पुढाऱ्यांवर तो आक्षेप घेतां येण्यासारखा आहे. मध्येंच बारी प्रचलित गोष्टींकडे वळूं लागला, त्याबरोबर सावरकरांनीं त्याला चापला. कानपूरला झालेल्या इंग्रज स्त्रियांच्या कत्तलीची जबाबदारी त्या स्त्रियांच्या फितुरी कारवायांवरच पडते असें स्पष्ट शब्दांत सांगितल्यावर सावरकर म्हणाले : निर्दयतेबद्दल दूषणेंच द्यावयाचीं तर तीं उभय पक्षांनाहि कमीजास्त प्रमाणांत द्यावीं लागतील.

कांहीं काम नाहीं, वाचायला पुस्तक नाहीं, लिहावयाचें म्हटलें तर जवळ कागदाचा बारीक कपटाहि नाहीं, अशा स्थितींत कोठडींत अहोरात्र पडून वेळ घालविण्याचा प्रसंग येतांच, सावरकरांचें मन काव्यरचनेकडे वळलें. अनुष्टुभ् छंद मराठी वाङ्मयांत निष्कारण मागें पडला हा विचार मनांत येऊन त्यांनीं त्या छंदांतच काव्य रचण्याची धडपड चालविली. या छंदाचीं लक्षणें त्यांना एकदम आठवेनात. एकेक लक्षण आठवून काव्यरचना सुरू झाली व मग दुसरें लक्षण आठवूं लागलें. अशा रीतीनें या छंदाचे सर्व सूक्ष्म नियम स्वतःच शोधून निश्चित करावे लागल्यामुळें, पहिल्यापहिल्या कांहीं कविता दोनदोन तीनतीन वेळां दुरुस्त कराव्या लागल्या. अशा क्रमानें एकदांचें एकेक अनुष्टुभ् जुळत गेलें व त्या वृत्तांतलें 'कमला' काव्य सात क्रमांकाच्या चाळींतल्या त्या एकांत कोठडींत हळुहळू विकसित होऊं लागलें व लेखनसाहित्याच्या अभावीं तें कवीच्या स्मरणांत संग्रहीतहि होऊं लागलें. 'कमला'

काव्याच्या प्रारंभींचा सुंदर वर्णनात्मक भाग १९११ च्या जुलै महिन्यांत या कोठडींत रचिला गेला असला पाहिजे.

या कोठडींत अशा रीतीनें चारपांच दिवस काढल्यावर, एकदां दुपारीं दोन वाजण्याच्या सुमारास सावरकर कोठडींत स्वस्थ बसले आहेत तों, खालून एक लहानसा दगड कोठडीच्या गजांवर आपटला. तो खालीं पडला. पुनः कोणी तरी तो खालून नीट फेंकला. या वेळीं तो दगड कोठडीच्या दाराशीं येऊन पडला. खालीं असलेल्या एका वॉर्डरनें केलेल्या खुणेचा अर्थ ओळखून, सावरकरांनीं दगड उचलला व त्याला बांधलेली कागदाची चिठ्ठी हस्तगत करून घेतली. इतक्यांत आरडाओरड झाली. पहाऱ्यावरच्या पठाण वॉर्डरनें चिठ्ठी फेंकणाऱ्या हिंदु वॉर्डरला पाहिलें असलें, तर आतां पुढें काय होईल याची कल्पना सावरकरांनीं केली. चिठ्ठी फाडून टाकावी अगर फेंकून द्यावी असें त्यांना वाटेना. शेवटीं त्यांनीं ती इतक्या बेमालुमपणें अशा जागीं लपविली कीं, प्रत्यक्ष झडतीच्या वेळीं तिचा पत्ताहि लागला नाहीं. झडतीबिडतीच्या सगळ्या भानगडी संपल्यावर सावरकरांनीं ती चिठ्ठी काढून वाचली. त्यांच्यापूर्वीं अंदमानांत येऊन पडलेल्या, त्यांच्या एका पूर्वपरिचित बंगाली मित्रानें[१] ती चिठ्ठी मुद्दाम धाडिली होती. अंदमानांत असलेल्या राजकीय बंदिवानांतल्या एका पक्षानें दुसऱ्या पक्षाविरुद्ध सूचना म्हणून ही चिठ्ठी सावरकरांना पाठविली होती. चिठ्ठींतल्या हकीकतीच्या खरेपणाबद्दल खात्री पटवून घेण्याचा प्रयत्न करावयाचा व मध्यंतरींच्या काळांत सावधपणें वागावयाचें असें ही चिठ्ठी वाचून झाल्यावर, पुष्कळशा विचारानंतर, सावरकरांनीं ठरविलें.

हळुहळू या क्रमांक ७ च्या चाळीच्या तळमजल्यावरील अंगणांत बंदिवान कामासाठीं सोडण्यांत येऊं लागले. मात्र राजबंदिवानांना कामासाठींसुद्धां या भागांत येऊं दिलें जात नसे. सहस्रावधि नारळांची वासलात लावावयाची असल्यामुळें एकदां दुपारीं अंगणांत जणूं बाजार भरला होता. नारळ सोलणें, ते फोडणें, त्यांचें पाणी पिपांनीं भरून वाहून नेणें, फोडलेल्या नारळांच्या वाटया खुरपणें व खोबऱ्याचे तुकडे बनविणें इत्यादि कामें करण्यांत जवळजवळ दोनशें बंदिवान गुंतले होते. सावरकरांच्या बंदोबस्तासाठीं नियुक्त झालेल्या पठाण वॉर्डरनें हा बाजार पाहिला तेव्हां त्याच्या तोंडाला पाणी सुटलें. तिसऱ्या मजल्यावरून स्वतःची सुटका करून घेऊन ही स्वारी खालीं तळमजल्यांत गेली व काम करीत असलेल्या बंदिजनांच्या ओळींतून येरझारा घालूं लागली. काम करणाऱ्या पुष्कळशा बंदिजनांची एकाददुसरें शहाळें किंवा दहीनारळ चोरून ठेवण्याकडे व काम संपल्यावर तो चोरून खाण्याकडे प्रवृत्ति असे. या दहीनारळांतले तीनचार नारळ लांबवून पोटभर मुखशुद्धि करावी अशी खालीं गेलेल्या पठाण वॉर्डरची इच्छा होती.

नागप्पा व चिन्नाप्पा या नांवाचे दोघे मद्रासी बंदीजन आपलें काम करीत

---

१ हें वर्णन श्री. हेमचंद्र दास यांनाच लागू पडतें, हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

आहेत तों या पठाणानें त्यांतल्या एकापाशीं दहीनारळ मागितला. 'इल्ले, स्वामी इल्ले' असें म्हणून या मद्रासी बंदिवानानें आपल्यापाशीं नारळ नसल्याचें सांगितलें. पठाणांची मागणी व मद्राश्याचा नकार यांचा हा खेळ कांहीं वेळ असाच चालल्यावर, पठाण आपल्या जातीवर गेला व मद्राश्याची शेंडी उखडून काढण्यासाठीं त्यानें त्याच्या शेंडीला हात घातला! त्यामुळें तो मद्रासीहि प्रतिकार करूं लागला. वॉर्डरनें आपल्या सोटयाचा एक दणका मद्राशाला मारला. मद्राशाची शेंडी अर्धी उखडून निघाली तरी, 'काफर, साला काफर' ही पठाणी वटवट व मारपीट चालूच होती. शेवटीं त्या मद्राशानें पठाणाच्या दाढीचा हाताला पीळ मारून त्याला जोरानें जमिनीवर आदळलें व त्याच्या छातीवर बसून तो भडाभड त्याच्या श्रीमुखांत लगावूं लागला! 'अब बस हुआ! माफ करो' असें म्हणत पठाण गयावया करूं लागला; पण, हिंदुस्थानी भाषा मुळींच परिचित नसल्यामुळें, 'माफ' शब्दांतलें 'मा' हें अक्षर ऐकून त्या मद्रासी माणसाचा फार गोंधळ झाला. त्याला वाटलें हा पठाण आपल्याला मायबहिणीवरून शिव्या देत आहे! त्यामुळें 'माफ करो' असें पठाण म्हणाला कीं, हा मद्रासी जास्तच चवताळे व जास्तच जोरानें गुद्दे व ठोसे लगावी. या सर्व प्रकरणांतलें पठाण वॉर्डरचें वर्तन मुळापासूनच नियमाविरुद्ध असल्यामुळें, वर तक्रार करणें त्याला शक्यच नव्हतें. इतस्ततः फेंकले गेलेले स्वतःचे कपडे गोळा करून वॉर्डर फिरून सावरकरांवर पहारा करण्यासाठीं आला. घडलेला सर्व प्रकार सावरकरांनीं आपल्या कोठडीच्या दारांतून पाहिला होता. तरीहि त्यांनीं 'काय झालें' असा प्रश्न वॉर्डरला विचारला. तो निर्लज्ज वॉर्डर उत्तरला: वो एक चोर साला; दहीनारळ चोरी करना मंगता था! वो खूप पीट गया! सावरकरांनीं अर्थपूर्ण दृष्टीनें पाहिलें व म्हटलें: ठीक! एक चोर साला दहीनारळ चोरी करना मंगता था, वो साला खूप पीटा गया नहीं?

पहिला जवळजवळ एक महिना सावरकरांना छिलका कुटण्याचें म्हणजे नारळाचीं सोडणें कुटून काथ्याचे तंतू बनविण्याचें काम देण्यांत आलें होतें. या कामामुळें त्यांच्या हाताचीं सालडीं निघून हात रक्तबंबाळ होऊं लागले म्हणून त्यांनीं दाद मागितली. तेव्हां 'तुम्हांला सवलत म्हणून फक्त एक पौंडच तंतू करण्यास लाविलें आहे' असें उत्तर देण्यांत आलें. दिनांक १-८-१९११ रोजीं छिलका कुटण्याच्या कामाऐवजीं त्यांना काथ्या वळण्याचें काम सांगण्यांत आलें. सात नंबरच्या चाळींत कामासाठीं येणाऱ्या राजकीयेतर बंदिवानांकडून त्यांना हळूहळू तेथील राजबंदिवानांची—विशेषतः त्यांच्या ज्येष्ठ बंधूंची—माहिती कळूं लागली. अंदमानी शिस्तपालनामुळें बंदिजनांना मलमूत्रोत्सर्गासारख्या नैसर्गिक क्रियांच्या बाबतींतहि किती छळ सहन करावा लागतो याचा अनुभव त्यांनाच हळुहळू येऊं लागला होता. आपल्या ज्येष्ठ बंधूंना अर्धशिशी, अमांश वगैरे विकारांची बाधा झाली असूनहि, त्यांना कोलूसारख्या अमानुष कामाला लावण्यांत आल्यामुळें त्यांना किती असह्य

यातना सोसाव्या लागल्या हें त्यांच्या कानावर आलें तेव्हां त्यांचा जीव कासावीस झाला. इतके कष्ट भोगावे लागले तरी त्या धैर्याच्या मेरूनें तोंडांतून लाचारीचा शब्दहि बाहेर पडूं दिला नाहीं हें कळल्यामुळें, त्यांचा आपल्या बंधूबद्दलचा आदरभाव दुणावला.

कोलूचें किंवा तेलाच्या घाण्याचें काम किती कष्टप्रद होतें हें अंदमानांतून परत आलेले श्री. उपेंद्रनाथ बानर्जी यांनीं पुढील शब्दांत[१] वर्णिलें आहे :

*उल्हासकरला राईचें तेल काढावयास घाण्यास जुंपण्यांत आलें. ही घाणी आपल्याकडील तेल्याच्या घाणीसारखीच जवळजवळ असते. हेमचंद्र, सुधीर, इंदुभूषण वगैरेंना जी घाणी देण्यांत आली होती तिची लाट हातांनीं फिरवावयाची होती. प्रत्येकास रोज दहा शेर राईचें अथवा तीस शेर खोबऱ्याचें तेल काढून द्यावें लागे. मोटमोठे पहिलवानहि या घाणी फिरविण्याच्या कामीं हार खात असत....खांद्यावर सव्वामण खोबऱ्याच्या वाट्या आणि एका हातांत बादली घेऊन घाणीपाशीं जाऊन झटपट कामास एकदम सुरवात करणें भागच होतें. अरे, तें काम नव्हतें; तें तर खरोखर एक प्रकारचें मल्लयुद्धच होतें. आठदहा मिनिटांत इतका दम लागे की, जीभ पार सुकून जात असे. एका तासाभरांतच हातपाय थकून जाऊन जणूं कांहीं गळूनच गेले आहेत, असें वाटूं लागे.*

स्वतः सावरकर यांनीं या कामाचें वर्णन पुढील शब्दांत[२] केलें आहे :

*तेलाचा घाणा ओढण्याचें तुरुंगांतील कठिणतम काम राजबंदिवानांस देण्यांत आलें ...... दोनदोन महिने हें काम केल्यानंतर एक महिना पुनः छिलका देण्यांत येई कीं पुनः तेलाच्या घाण्यास त्यांना जुंपून देण्यांत येई. सकाळीं उठतांच लंगोटी नेसून खोलींत बंद व्हावयाचें; आंत घाण्याची दांडी असून खोलीबाहेर तेल पडेल अशी व्यवस्था केलेली असे. ती लोखंडी दांडी हातांनीं चाक फिरवितात तशी फिरवावयाची. खोबरें त्या उखळींत पडलें कीं ती इतकी जड होई कीं कसलेले हमालदेखील तिच्या वीस फेऱ्या फिरवितांना रडकुंडीस येत.. .त्या दांडीस हातांनीं उचलून अर्धा गरका देऊन वर केल्यावर बाकीचा अर्धा गरका देण्यास लागणारा जोर हातांत नसल्यानें तिला लोंबकळून तो पुरा करावा लागे. सकाळीं दहा वाजेपर्यंत एकसारखे असे गरके फिरवितां फिरवितां श्वास जड होई. कोणाकोणास—नव्हे बहुतेकांस—खरोखरच चक्कर येऊन वारंवार खालीं बसावें लागे!*

बंदिवानांना हें अमानुष काम देण्यांत येऊं लागलें इतकेंच नव्हे तर त्यांनीं

---

१ राजनैतिक कारस्थान ( काळ्या पाण्यावर ) : द्वितीय खंड : पृ. १६९.
२ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. ९९–१००.

तेलाचें ठरीव माप प्रत्यहीं पुरें केलें पाहिजे, यासाठीं त्यांचा कल्पनातीत छळ होऊं लागला. दुपारची सुट्टी, विश्रांति, सायंकाळीं काम बंद करण्याची वेळ, इत्यादि बाबतींतले सगळे नियम बारी बेधडक दुर्लक्षूं लागला. "तेल पूरा करना पडेगा" हे वॉर्डरांचे शब्द, त्या शब्दांबरोबर दाखविण्यांत येणारा धाक, प्रसंगीं वॉर्डरकडून होणारी मारहाण, मधूनमधून देण्यांत येणाऱ्या हातकडी, दंडाबेडी, वगैरे शिक्षा इत्यादि प्रकारांमुळें राजबंदींचीं मनें संतापानें जळफळूं लागलीं. या छळामुळें कांहीं राजबंदींचें धैर्य गळालें व बारीला इष्ट ती माहिती पुरविण्याचें काम पत्करून त्यांच्यापैकीं कांहींनीं स्वत:ची सोडवणूक करून घेतली !

राजबंदिवानांत नंदगोपाळ या नांवाचे एक गृहस्थ होते. त्यांच्यावर कोल फिरविण्याचा प्रसंग आला तेव्हां त्यांनीं मात्र बारीची पुरी फजिती केली. पहिल्या दिवशीं सकाळीं दहा वाजेपर्यंत त्यांनीं शक्य तें काम केलें. नंतर ते सावकाशपणानें स्नान-भोजन वगैरे दिनक्रम उरकूं लागले. एकेक घांस नीट चावून ते जेवूं लागले. तेव्हां वॉर्डर, पेटी ऑफिसर, हवालदार वगैरे सर्व अधिकारी त्यांच्याभोंवतीं गोळा झाले व अपशब्दांचा वर्षाव करून, जेवण झटपट उरकण्याची ते घाई लावूं लागले. अपशब्दांकडे पूर्ण दुर्लक्ष करून नंदगोपाळजी म्हणाले : हवालदारजी, प्रत्येक घांस चावून गिळला तर नीट पचतो. अन्न घाईनें खाल्लें तर पोट बिघडतें. चिडलेल्या हवालदारजींनीं बारीबाबाला बोलावून आणिला व तोहि पुष्कळसें अगडतगड बोलला. तरीहि नंदगोपाळजींची शांत वृत्ति ढळली नाहीं. ते म्हणाले : वैद्यशास्त्राच्या मतें प्रत्येक घांस निदान दहादां तरी चावला जावा. बारीनें त्यांना शिक्षेचा धाक दाखविला; तेव्हां, दहा ते बारा हा वेळ नियमाप्रमाणेंच विश्रांतीचा वेळ असल्याचें त्यांनीं बारीच्या निदर्शनास आणून दिलें. संध्याकाळीं तेल पुरें झालें नाहीं तर तुझ्या पाठीचीं सालें काढीन, अशी धमकी देऊन बारी मनगटें चावीत निघून गेला ! जेवण आटोपतांच नंदगोपाळजी घाणा फिरवूं लागतील अशी हवालदारप्रभृतींची अपेक्षा होती; पण खोलींत बंद झाल्याबरोबर नंदगोपाळजींनीं एक घोंगडी आंथरून व दुसरी पांघरून घेऊन वामकुक्षीला सुरुवात केली. जमादार—हवालदार परत येऊन गिल्ला करूं लागले तेव्हां नंदगोपाळजी उद्गारले : जेवल्याबरोबर घाणा फिरवूं लागलों तर खाल्लेलें अन्न पचणार नाहीं. जेवणानंतर वामकुक्षी करावी असें वैद्यशास्त्राचें प्रमेयच आहे. दुपारीं कामाला लागल्यावर नंदगोपाळजींनीं कांहीं वेळ घाणा चालविला व बालडींत सुमारें १५ शेर तेल सांठलेलें दिसतांच ते स्वस्थ बसले. "सर्व दिवसभर घाणा चालवायला मी कांहीं घाण्याचा बैल नाहीं; तीस शेर तेल काढायचं तर जेलर साहेबालाच आणून जुंपलें पाहिजे घाण्याला" असें सडेतोड उत्तर देण्यालाहि त्यांनीं त्या दिवशीं कमी केलें नाहीं.

नंदगोपाळजींकडून तीस शेर तेल मिळण्याची आशा नाहीं असें दिसतांच बारीनें त्यांच्या पायांत बेड्या ठोकल्या व त्यांना कोठडीबंद करून टाकलें. अविनाश-

चंद्र भट्टाचार्य यांना याच सुमारास मोठ्या घाणीला जुंपण्यांत आलें होतें. दहा वाजल्या-नंतर काम करणें त्यांना अशक्य होई. इंदुभूषण सशक्त असल्यामुळें ते त्यांना मदत करीत. नंदगोपाळजींनीं सुमारें महिनाभर शिक्षा भोगल्या; पण, त्यांच्या वृत्तींत पालट पडला नाहीं. शेवटीं बारीनें त्यांच्याशीं सामोपचार केला. ‘ चार दिवसपर्यंत तूं जर काम पुरें करशील तर घाण्याच्या कामांतून तुझी कायमची मोकळीक करीन ’ असें बारीनें सांगितल्यामुळें, नंदगोपाळजींनीं तें मान्य केलें. चार दिवस काम पुरें केल्यावर त्यांची तात्पुरती मुक्तता झाली; पण, फिरून थोडयाच दिवसांनीं त्यांना मोठया घाण्याला जुंपण्यांत आलें. त्यांनीं काम करण्याचें नाकारल्यावर फिरून शिक्षासत्र सुरू झालें. इतरांनींहि घाणी फिरविण्याला नकार दिल्यामुळें, अंदमानांत छोटासा संपच सुरू झाला. अंदमानांत राजबंदिवानांनीं केलेला हा पहिला संप होय. हा संप विकोपाला जाण्याच्या थोडे दिवस अगोदर नानीगोपाळ, पुलिनबाबूप्रभृति कांहीं नवे राजबंदी अंदमानास येऊन पोंचले होते.

आपल्या कोठडींत एकांतांत बसून विचारांत वेळ घालवावा, ‘ कमला ’ काव्याचीं नवीं अनुष्टुभें रचावीं व जुनीं स्मृतींत पक्केपणीं सांठवावीं, कामासाठीं बाहेर यावें, राजबंदिवानांविषयींची व स्वतःच्या ज्येष्ठ बंधूंविषयींची शक्य तितकी माहिती मिळवावी असा सावरकरांचा दिनक्रम चालला आहे तों १४ ऑगस्ट १९११ रोजीं त्यांना सरकारतर्फे एक पत्र देण्यांत आलें. सावरकर अंदमानांत येऊन पोंचले त्याच सुमारास मुंबई विद्यापीठाच्या पंडितांनीं त्यांच्यासंबंधींचा एक ठराव संमत केला होता. सावरकर, खरे, भटप्रभृति नाशिककटाच्या खटल्यांतल्या आरोपींच्या बी. ए. च्या पदव्या रद्द करण्याचें विद्यापीठाच्या अधिकाऱ्यांनीं ठरविलें. विद्यापीठाचा हा निर्णय सावरकरांना ज्या पत्रद्वारा कळविण्यांत आला तें पत्र त्यांना वरील तारखेला मिळालें. सर्वस्व गमावण्याला सिद्ध झालेल्या सावरकरांना हें पत्र वाचून मोठी गंमत वाटली असेल, यांत शंकाच नाहीं. ही पदवी गेल्याबद्दल सावरकरांना आजहि विषाद वाटत नसेल हें निश्चित ! पण, सावरकरांसारखा देशभक्त हा आपल्या विद्यापीठाचा पदवीधर आहे या गोष्टीचा अभिमान मुंबई विद्यापीठानें आतां तरी व्यक्त केला पाहिजे ! १९११ सालीं जुलै महिन्यांत करण्यांत आलेला ठराव तर या विद्यापीठानें रद्द करावाच; पण, चालू सालीं पावसाळ्यांत जो वार्षिक पदवीदान समारंभ होईल त्या वेळीं सावरकरांना LL. D. ची पदवी देऊन विद्यापीठानें स्वतःचा गौरव करून घ्यावा !

या दिवसाच्या आगेमागेच केव्हांतरी सावरकरांना आपल्या ज्येष्ठ बंधूंचें मोठ्या प्रयासानें दर्शन घडलें. संध्याकाळीं सर्व बंदिवानांनीं आपापलीं कामें मोजून द्यावीं व कोठडीकडे जावें असा क्रम ठरलेला होता. या वेळीं आपल्या बंधूंचें ओझ-रतें तरी दर्शन घडावें यासाठीं सावरकरांनीं एका वॉर्डरच्या मार्फत व्यवस्था केली होती. तात्याला पाहतांच बाबांना अगदीं भडभडून आलें व मनांत उमळून आलेल्या

साऱ्या दुःखावेगाचें सार म्हणून " तात्या ! तूं इथें कसा आलास ? " एवढे शब्द त्यांच्या तोंडांतून बाहेर पडले. या दोन बंधूंना अधिक वेळ समोरासमोर ठेवलें तर सगळाच गोंधळ माजेल—सर्वांनाच कठोर शिक्षा सोसावी लागेल—हें ओळखून वॉर्डरनें दोघांनाहि त्यांच्या त्यांच्या कोठड्यांकडे नेलें ! आपल्यासारखीं सामान्य माणसें बाहेर असलीं काय वा तुरुंगांत असलीं काय, त्या गोष्टीला मोठेंसें महत्त्व नाहीं, आपला तात्या ईश्वरांश आहे, तो मोकळा राहिला म्हणजे भारतीय स्वातंत्र्याच्या पक्षाची बाजू बळकट होत गेलीच पाहिजे, अशी बाबांची दृढ श्रद्धा होती. त्यामुळें तात्या अंदमानांत आलेले पाहून त्यांना साश्चर्य दुःख वाटलें. आतां मात्र आपल्या पक्षाची फार मोठी हानि झाली असें त्यांना वाटलें. बाबांच्या मनांतल्या या सगळ्या भावना त्यांनीं विचारलेल्या प्रश्नांत व्यक्त झाल्या होत्या. थोडक्याच काळांत बाबांनीं धाडलेली एक गुप्त चिठ्ठीहि तात्यांना मिळाली ! या चिठ्ठीचें उत्तर धाडून आपल्या ज्येष्ठ बंधूंचें सांत्वन करण्याचें व त्यांना धीर देण्याचें कामहि तात्यांनीं केलें; पण, तें करतांना त्यांच्या मानसिक शक्तीवर फार ताण पडला !

सावरकर अंदमानांत येऊन पोंचले त्याच्या अगोदरच त्यांच्या विद्वत्तेची, देशभक्तीची व पराक्रमाची कीर्ति अंदमानभर पसरली होती. या घटनेचा बारीसारख्या अधिकाऱ्याच्या मनावर अप्रत्यक्षतः परिणाम कसा झाला होता हें यापूर्वीच दिग्दर्शित करण्यांत आलें आहे. सावरकरांबद्दलचा आपला आदरभाव व्यक्त करण्यासाठीं त्यांना ' बडा बाबू ' ही संज्ञा लावण्याचा शिरस्ता ते अंदमानांत गेल्यावर लौकरच बंदिवानांनीं पाडला व आपल्या या पूज्य बड्या बाबूला कोलूची शिक्षा देण्यांत येणार नाहीं, असेंहि ते म्हणूं लागले. इतक्यांत, दिनांक १५–८–१९११ रोजीं सायंकाळीं बारीनें सावरकरांना आपल्या कार्यालयांत बोलावून घेतलें. ज्या कारणांमुळें कांहीं राजबंदींनीं काम नाकारलें होतें त्या कारणांचें सावरकर समर्थन करीत असतात ही गोष्ट बारीच्या हेरांनीं त्याला पूर्वीच कळविली होती व त्यामुळें सावरकरांनाहि कोलूची शिक्षा देण्याचें त्यानें ठरविलें होतें. गोड गोड बोलत बारीनें सावरकरांना सांगितलें : उद्यांपासून चौदा दिवस तुम्हांला कोलूचें काम देण्याबद्दल वरून लिहून आलें आहे. इतरांप्रमाणें हें काम तुम्हांला वारंवार देण्यांत येणार नाहीं. या वेळीं नाहीं म्हणून तुम्ही आपले कष्ट वाढवूं नका. तुम्हांला पन्नास वर्षें शिक्षा भोगावयाची आहे, इतरांहून तुमची शिक्षा उग्र आहे हें लक्षांत ठेवा.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सावरकरांवर कोलू फिरविण्याचा प्रसंग आला. त्यांना मदत म्हणून त्यांच्याबरोबर एक ब्रह्मी राजबंदी कोलूला जुंपण्यांत आला होता. या कामाच्या कष्टप्रद अनुभवांचें वर्णन सावरकर यांनीं पुढील शब्दांत[1] केलें आहे :

*लंगोटी नेसून सकाळीं दहा वाजेपर्यंत काम करावें. सारखें फिरवीत राहिल्यानें चक्कर यावेत. अंगाचें ठणठणणें तर इतकें झालें कीं, रात्रीं फळ्या-*

---

[1] माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १२७–१२८.

*वर अंग टाकतांच झोंप लागण्याचे स्थळीं अंगांत कसर भरून तळमळ करीत पडावें लागे, कीं पुन्हां दुसऱ्या दिवशीं तो घाणा दत्त म्हणून उभा ! असे सहासात दिवस काढले. काम तोंवर पुरें होत नव्हतें. एक दिवस बारी आला आणि जरा ऐटीनें म्हणाला : हा पहा शेजारच्या खोलींतला बंदिवान ! तीस पौंड तेल दोन वाजतां पुरें मोजून देतो आणि तुम्ही संध्याकाळपर्यंत राबूनहि अजून दोन पौंड तेल कमीच ! याची तुम्हांस लाज वाटली पाहिजे! मी म्हटलें : वाटली असती लाजहि जर मलाहि लहानपणापासूनच त्याच्यासारखे हमालीचे धंदे करण्याची संवय असती तर !. . . तमच्या कार्यालयांत तुम्ही अर्धशिक्षित शेतकऱ्यादि चोरदरोडेखोरांस लिहावयाचें काम देतां, त्यांस जसें आमच्यासारखें त्वरित इंग्रजी बोलतां येत नाहीं म्हणून लाज वाटण्याचें कारण नाहीं, तसाच आम्हांस त्यांच्यासारखे शारीरिक कष्ट एकदम झेंपत नाहींत म्हणून संकोच वाटणें अनावश्यक आहे.*

कपडे धुणें, भांडीं घासणें वगैरे कामेंहि सावरकरांना स्वतःला करावीं लागूं नयेत म्हणून दक्षता बाळगणारे भोंवतालचे निष्ठावंत बंदिजन या कोलूच्या कामांतहि त्यांना शक्य तें साहाय्य देत असत. पण, हें कामच असें होतें कीं, तें करण्याच्या प्रसंगांत सांपडलेल्या कोणाहि स्वाभिमानी माणसाला त्या कामामुळें आपलें जीवन विफल वाटूं लागावें !

*'राष्ट्रेंच्या राष्ट्रें उदयास आणण्यासाठीं ज्या शरीराचा नि ज्या कर्तृत्वाचा उपयोग व्हावयाचा तें कर्तृत्व असें मातीमोल ठरत असलेलें पाहून ' सावरकर अत्यंत उद्विग्न झाले ! समुद्रमंथनाच्या उपयोगी पडावा म्हणून निर्माण झालेला स्वतःच्या कर्तृत्वशक्तीचा मेरुदंड या यःकश्चित् कथलींतलें ताक घुसळण्याच्या कामाला लावून आपण स्वतःच त्या कर्तृत्वाचा अनादर कां करावा हा प्रश्न त्यांच्या मनांत वारंवार घोळूं लागला.*

हळुहळू जीवित विफल वाटूं लागण्याच्या या मनःस्थितीचें एके दिवशीं आत्महत्या प्रिय व अवश्य वाटण्यांत रूपांतर कसें झालें हें सावरकरांनीं पुढील शब्दांत[१] सांगितलें आहे :

*एके दिवशीं दुपारीं भयंकर उकाड्यांत कोलू फिरवीत असता, धापा टाकीत, गिरकी आल्यासारखें वाटून खालीं बसलों आणि...आंतडीं ताठरल्यानें पोट हातानें धरून भिंतीशीं टेंकलों आणि डोळे मिटले तों तेथल्या तेथेंच गाढ गुंगी लागली—इतकी गाढ कीं, दचकून जों जागा झालों तों दिशा, विदिशा, स्थल, काल, हें मला चारपांच मिनिटें कांहीं कळेना...*

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १३०.

*पुन: कामास लागलों पण मन एकसारखें म्हणे हें काम शेवटचें कां होऊं देत नाहींस ?*

त्या रात्रीं कोठडींत बंद असतांना, खिडकीच्या गजांस टांगून घेऊन, गळफांस लावून आत्महत्या करण्याचा विचार सावरकरांच्या मनांत एकसारखा चारपांच वेळां तरी आला. कांहीं वेळपर्यंत त्यांच्या मनांत विकार व विचार यांचें तुमुल युद्ध माजलें. पण, शेवटीं त्यांनीं आत्महत्या करण्याचा विचार वर्ज्य ठरविला. हें ठरवितांना त्यांच्या मनांत पुढील विचार चमकून गेले :

*मरणारच असशील तर असा कुत्र्याचे मोलानें आपल्या हातानें कां मरतोस ? त्यांना तुला फांशी देऊं नये म्हणून दया आली होती कीं काय ? मग जें त्यांना करतां आलें नाहीं तें तूं त्यांच्याकरितां स्वत:च्या हातानें करून, आपल्या पक्षाचे हानींत आणि अपजयांत आणखी भर कां घालतोस ? जर मरणें तर ज्या सेनेंतील तूं एक सैनिक आहेस त्या सेनेचें तसेंच एकादें कार्य करून मग तरी मर.*[1]

कोलूचें काम संकटासारखें तर खरेंच; पण, त्या कामाच्या निमित्तानें सावरकरांचा कांहीं राजबंदिवानांशीं प्रत्यक्ष परिचय झाला. त्यांच्याशीं होणाऱ्या चर्चेंत सावरकरांना एक गोष्ट कळली. राजबंदिवानांपैकीं बहुतेकांचा उत्साह दुर्दम्य असला तरी, त्या उत्साहाचा पुढें राष्ट्रकार्यांत खरा उपयोग होण्याच्या दृष्टीनें त्यांच्या शिक्षणांत, ज्ञानांत व विचारांत भर पडणें अवश्य होतें. ज्यांच्या मनांतले आशादीप अंदमानीय परिस्थितीमुळें मालवूं पहात होते त्यांच्या त्या आशादीपांत स्नेहाचें पूरण घालून व त्यांच्या विचारांना योग्य तो मार्ग दाखवून सावरकरांनीं या पंधरा दिवसांच्या काळांतच राजबंदींच्या संघटनेची सुरुवात केली. १९११ सालीं ऑगस्टच्या अखेरीस सावरकर कोलूंतून सुटले व फिरून दोरखंडें वळूं लागले. सावरकरांना तेलाच्या घाण्याला जुंपल्याची ही हकीकत हिंदुस्थानपर्यंत पोंचण्याला पांचचार महिने लागले; पण, तेवढ्या अवधींत ती हिंदुस्थानांत प्रसिद्ध झाली. येथून ती बातमी अमेरिकेंत जाऊन पोंचली. सावरकर कोलू ओढीत आहेत असें काल्पनिक चित्र काढून त्या मुद्रित चित्राच्या शेंकडो प्रती पुढें अमेरिकेंत वांटण्यांत आल्या.[2]

वर ज्या पहिल्या संपाचा उल्लेख केला तो संप या सुमारास विकोपाला जाऊं लागला होता. काम नाकारणाऱ्या राजबंदींना भयंकर शिक्षा ठोठावण्यांत येऊं लागल्या. उल्हासकर दत्त, नंदगोपाळ, होतीलाल वर्मा वगैरे राजबंदींना जवळजवळ पंधरवडाभर नुसत्या कांजीवर ठेवण्यांत आलें. कांहीं राजबंदींना महिनेच्या महिने पृथक् कारावासाची किंवा एकांतवासाची शिक्षा सांगण्यांत आली. पण, अशानें संप मोडला

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १३१.
२ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १६५.

नाहीं. उलट यामुळें अनेक राजबंदींची प्रकृति एकदम बिघडूं लागल्यामुळें, चालू परिस्थितीचा कांहीं तरी विचार करणें अधिकाऱ्यांनाहि अवश्य वाटूं लागलें. इतक्यांत १९११ चा डिसेंबर महिना उजाडला. पंचमजॉर्ज बादशहांचा राज्यारोहण समारंभ याच महिन्यांत झाला. त्या प्रसंगीं राजबंदींना कारागृहाच्या बाहेर वसाहतींत धाडण्यांत येईल, असें आश्वासन देण्यांत आल्यावर हा संप मिटला. या अवधींत सावरकरांचें जीवन मामुली पद्धतीनें चाललें होतें. १९११ च्या डिसेंबरच्या प्रारंभीं त्यांच्याजवळ शिसपेन्सिलीचा कांहीं मजकूर लिहिलेला एक कागदाचा चिठोरा सांपडला; पण, हा त्यांचा पहिलाच गुन्हा असल्यामुळें त्यांना नुसती ताकीद देण्यांत आली. त्यांच्यावर या प्रसंगीं खटला भरण्यांत आला नाहीं.

पंचमजॉर्ज बादशहा हिंदुस्थानांत येऊन दिल्लीस थाटाचा राज्यारोहणसमारंभ झाला त्याच्या थोडे दिवस आधीं अंदमानमधील राजबंद्यांमध्यें सुटकेच्या बातम्यांचें वेडें पीक फैलावलें होतें. कोणी म्हणावें राजबंदी अजिबात सुटणार, कुणी म्हणावें त्यांच्या शिक्षा फार मोठ्या प्रमाणांत कमी होणार, प्रत्येकानें आपल्या म्हणण्याला आधार म्हणून भिन्नभिन्न, भलींबुरीं कारणें सांगावीं, कुणी सुटकेचा निश्चित दिवसहि सांगावा—असे तर्कवितर्क सगळीकडे पसरले होते. आणि असे तर्कवितर्क त्या वेळीं—आणि विशेषतः अंदमानांत—पसरावे यांत नवलहि नाहीं! अद्यापहि—म्हणजे हिंदी तुरुंगांतलें राजबंदींचें जीवन इतकें सुसह्य झाल्यावरहि—राजबंदी एकाद्या तुरुंगांत एकत्र ठेवण्यांत आले म्हणजे त्यांच्यांत जीं बोलणीं चालतात त्यांत कांहीं तरी आकस्मिक निमित्तानें होणाऱ्या सार्वत्रिक सुटकेचा विषय सर्वांच्या फार आवडीचा असतो. कालिदासानें मेघदूत काव्यांत विरही स्त्रिया आपला वेळ जावा म्हणून कोणते उपाय योजतात याचें बहारीचें वर्णन केलें आहे व शेवटीं '**प्रायेणैते रमणाविरहेष्वंगनानां विनोदाः**' असा चरण लिहिला आहे. एकादा आधुनिक कवि तुरुंगांत पडलेल्या राजबंदींच्या विनोदविषयांचें सुरस वर्णन करील तर त्यांत सुटकेच्या संभवाबद्दलचे अंदाज या विषयाला त्याला बरेंच प्राधान्य द्यावें लागेल, हें निश्चित!

राज्यारोहणाच्या निमित्तानें किती राजबंद्यांना मुक्त करण्यांत आलें अगर सूट देण्यांत आली असा प्रश्न १९११ सालच्या शेवटीं पार्लमेंटांत केर हार्डी यांनीं उपस्थित केला. त्याला उत्तर देतांना भारतमंत्री मि. मोर्ले यांनीं अशी माहिती सांगितली कीं, २२० हिंदी राजबंद्यांपैकीं १८३ इसमांना या प्रसंगाचा फायदा मिळाला—म्हणजे त्यांच्यापैकीं कांहीं थोड्या इसमांना मुक्त करण्यांत आलें व कांहींची शिक्षा कमी करण्यांत आली—अंदमानांतल्या पुष्कळ राजबंद्यांना गणेशपंत सावरकरांसुद्धां शिक्षेच्या प्रत्येक वर्षागणिक एक महिन्याची सूट मिळाली. एका पठाण वॉर्डरनें विनायकराव सावरकर नक्की सुटणार अशी बातमी कोठून तरी मिळविली व 'बडे बाबू छूट गये' असें म्हणून सावरकरांचें अभिनंदन करण्यापर्यंतहि त्यानें मजल मारली. पण, या पर्वणीचा लाभ आपल्याला अल्प प्रमाणांतहि मिळेल अशी आशा सावरकरांना वाटत नव्हती व शेवटीं त्यांचाच तर्क खरा ठरला! त्यांना व एका

बंगाली राजबंद्याला या प्रसंगीं थोडीशीहि सूट मिळाली नाहीं. एक दिवस अंदमानांतल्या सर्व कैद्यांना देण्यांत आलेलें बटाटेभाताचें भोजन एवढया एकाच लाभावर या दोघांची बोळवण करण्यांत आली ! दिल्ली–दरबारच्या निमित्तानें ज्या दोन घटना घडल्या त्यांपैकीं एकीचें सावरकरांना फारसें महत्त्व वाटलें नाहीं. हिंदुस्थानची राजधानी कलकत्त्याहून बदलावयाची तर ती उज्जयिनीस जावी असें त्यांचें व्यक्तिशः मत असलें तरी[1] बदल झालाच तर राजधानी दिल्लीस जाईल हें त्यांनीं हेरलें होतें. त्यामुळें दिल्लीस राजधानी गेल्याबद्दल त्यांना विशेषसें कांहीं वाटलें नाहीं. बंगालची फाळणी रद्द केल्याची घोषणा दिल्ली दरबारच्या प्रसंगीं करण्यांत आली यामुळें मात्र त्यांना आनंद झाला व अभिमानहि वाटला. ज्या घटनेला मोर्लेसाहेबांनीं वज्रलेप झालेली घटना ( Settled fact ) म्हटलें होतें ती घटना लोकांनीं केलेल्या चळवळींमुळें बदलली ही गोष्ट लोकांना आत्मविश्वास वाढविण्याला कारणीभूत होईल असें त्यांना वाटलें व यामुळें या सुमारास त्यांचें व इतर राजबंदींचें मन बरेंच उल्हसितहि झालें. बंगालची फाळणी रद्द झाली या गोष्टीचें खरें महत्त्व किती हें भोंवतालच्या राजबंद्यांना समजावें म्हणून सावरकर म्हणत : फाळणी रद्द झाली याचा अर्थ ताप अजिबात उतरला असा नव्हे ! रोग्याच्या अंगांत ताप अजून आहेच ! ताप अजिबात उतरूंच शकत नाहीं असें अद्यापपावेतों वाटत होतें. या तापावर औषधच नाहीं अशी समजूत होती. थोडासा तरी ताप उतरला, कोणत्या तरी औषधानें ताप उतरूं शकतो ही आशादायक गोष्ट लक्षांत आली, कोणत्या औषधानें ताप उतरूं शकतो हेंहि नेमकें कळलें, हा आणि एवढाच या बाबतींत झालेला खरा लाभ होय !

पहिल्या संपाच्या शेवटीं ठरल्याप्रमाणें, १९१२ च्या प्रारंभीं कांहीं राजकीय कैद्यांना बाहेर वसाहतींत कामावर धाडण्यांत आलें. यांत सावरकर बंधु नव्हतेच. श्री. बारींद्रकुमार घोष यांना मेस्त्रीच्या हाताखालीं मजुरी करण्यास धाडण्यांत आलें. उल्हासकर दत्त यांना जमीन खणण्याचें व मातीच्या विटा बनविण्याचें काम देण्यांत आलें. कांहींना जंगलतोडीच्या कामावर नियुक्त करण्यांत आलें, तर कित्येकांची समुद्रकांठीं चाललेल्या बांधकामावर योजना झाली. तुरुंगांतून सुटून बाहेर निघतांना या मंडळींना बरें वाटलें; पण लौकरच 'आगींतून सुटून फुफाटयांत' पडावें तशी गत झाल्याचें त्यांच्या लक्षांत आलें. कारण बाहेर पडलेल्या राजबंद्यांचे खाण्यापिण्याच्या व औषधपाण्याच्या बाबतींत पूर्वींहूनहि जास्त हाल होऊं लागले. त्यांना उन्हांत काम करावें लागे; पावसाचाहि त्रास त्यांना जाणवूं लागला ! अंदमानांतल्या परिस्थितीच्या मानानें तेथील बंदिवानांना देण्यांत येणारे कपडेहि अपुरे असत, ही गोष्ट पुढें Cardew Committee लाहि मान्य करावी लागली. या कमिटीनें आपल्या इतिवृत्तांत या विषयासंबंधींचा पुढील अभिप्राय व्यक्त करून ठेविला आहे :

---

[1] सावरकर साहित्य : भाग २ : पृ. १०८–१०९.

A prisoner is at present given three suits. One is always at the wash, leaving two for practical use. Of these, one is supposed to be available when the man returns from work; but, in the absence of any drying apparatus and in consequence of the high percentage of humidity which exists during the rains, it frequently happens that both suits are wet and thus the convict is forced to remain in or put on wet clothes. We have little doubt that this has a considerable effect on the production of disease.

( सध्यां प्रत्येक कैद्याला कपड्यांचे तीन संच देण्यांत येतात. एक संच नेहमीं धुवावयाला पडत असल्यामुळें, प्रत्यक्ष वापरण्याच्या दृष्टीनें दोन संच उरतात. कैदी कामावरून परत आला कीं, त्याला वस्त्रांतर करण्याला एक संच शिल्लक आहे, असें समजलें जातें. पण, कपडे वाळविण्याचीं कांहीं साधनें नसल्यामुळें व पावसाळयांत हवेची आर्द्रता अतिरिक्त असल्यामुळें, पुष्कळ प्रसंगीं असें घडतें कीं, हे दोन्ही संच ओले असतात. ओले कपडे अंगावर तसेच ठेवणें किंवा ओले कपडे अंगावर चढविणें याखेरीज दुसरा मार्गच कैद्यांपुढें शिल्लक उरत नाहीं. रोगराई उत्पन्न होण्याला ही वस्तुस्थिति फार मोठया अंशीं कारणीभूत होते यांत आम्हांला मुळींच संदेह वाटत नाहीं. ) या परिस्थितीला कंटाळून, बाहेर गेलेले पुष्कळसे राजबंदी फिरून तुरुंगांत आले! तेथें बारीचा क्रम पूर्ववत् सुरू झाल्यामुळें त्यांच्यापैकीं पुष्कळांना आपलें जिणें असह्य वाटूं लागलें !

बारीच्या छळाला कंटाळलेले राजबंदी बंडखोर बनत व शिक्षा सोशीत हें खरें; पण, या शिक्षा कैद्यांच्या पत्रकांत नमूद न करण्याची दक्षता बारीकडून घेतली जात असल्यामुळें, या शिक्षांचा बोभाटा होऊन तक्रारींची कधीं काळीं दाद लागेल हीहि आशा त्यांना वाटेनाशी झाली होती. आपली कांहीं दाद लागावयाची असेल तर एकच मार्ग आहे, भल्याबुऱ्या कोणत्या तरी मार्गानें आपली गाऱ्हाणीं हिंदुस्थानांतच वेशीवर टांगणें हाच तो मार्ग होय, असें राजबंदींना वाटूं लागलें. सध्यांच्य काळींहि हिंदी तुरुंगांतून एकादें पत्र चोरून बाहेर धाडावयाचें झालें तर कोण प्रयास पडताव ! त्या काळीं—आणि अंदमानांतून—अशीं पत्रें धाडणें हें अशक्यप्रायच होतें. पण, श्री. होतीलाल वर्माजींनीं ही अशक्यप्राय गोष्ट करण्याचें मनावर घेतलें. कोठडींत बंद असतांनाच त्यांनीं एक लांबलचक पत्र लिहून काढलें व हजार हिकमती लढवून, हिंदुस्थानला निघालेल्या एका हिंदी अधिकाऱ्याच्या हातीं तें पत्र पडेल, अशी त्यांनीं व्यवस्था केली. अखेरीस हें पत्र १९१२ सालीं ऑगस्टच्या अखेरीस कलकत्त्यास पोंचलें व तें कै. सुरेंद्रनाथ बानर्जींच्या हातीं पडतांच, त्यांनीं तें दि. ४-९-१९१२ च्या 'बंगाली'त प्रसिद्ध करून टाकलें. या पत्राच्या आधारें ना. भूपेंद्रनाथ बसू यांनीं दिनांक १८-९-१९१२ रोजीं वरिष्ठ विधिमंडळांत बरेच प्रश्न विचारले. पण, गृहमंत्री सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक यांनीं नियमांकडे बोट दाखविलें व विशेष कांहींहि करण्याची सरकारची तयारी नाहीं, असें त्यांनीं सांगून टाकलें! इतका

काळ लोटेपर्यंत सावरकर यांना एकदां एक महिना एकांतवासाची कोठडीबंदीची शिक्षा सांगण्यांत आली होती ! दुसऱ्या कोणा कैद्याला त्यांनीं लिहिलेलें एक पत्र पकडलें गेल्यामुळें ते पठाण वॉर्डरच्या तडाक्यांत सांपडले व त्यांना ही शिक्षा भोगावी लागली. ही शिक्षा भोगल्यावर थोड्याच दिवसांनीं त्यांना सात क्रमांकाच्या चाळींतून काढून क्रमांक दोनच्या चाळींत ठेवण्यांत आलें.

श्री. होतीलाल वर्मा यांचें पत्र सुरेंद्रबाबूंच्या बंगल्याच्या दिशेनें वाट चालत होतें त्या अवधींत राजबंदींच्या छळाचा अंदमानांत अतिरेक चालला होता. श्री. इंदुभूषण रॉय चौधरी हे बंगाली राजबंदी शरीरानें चांगले सुदृढ होते. अनेक प्रसंगीं आपल्या मित्रांचें घाण्याचें काम हलकें करण्यासाठीं ते झटले होते; पण, या सुमारास त्यांनाच घाण्याचें काम असह्य वाटूं लागलें. अशा मानहानीचे प्रसंग गिळून जिवंत राहणें श्री. इंदुभूषणजींना किती असह्य झालें होतें हें त्यांचें व सावरकरांचें पुढील भाषण वाचलें असतां कळूं शकतें. हें भाषण[1] १९१२ सालीं एप्रिल महिन्याच्या उत्तरार्धांत—बहुधा २०–२२ ते २५–२६ एप्रिलच्या दरम्यान—केव्हां तरी झालें असावें :

*संध्याकाळीं तेल घेऊन जातांना मी त्यास गुप्तपणें भेटलों. चारच शब्द बोलूं शकलों. तो म्हणाला—तो नेहमींच म्हणे—छे ! या नीच मानहानींत जिवंत राहण्यापेक्षां मेलेलें बरें ! मी...धीर दिला आणि म्हटलें : स्वदेशासाटीं स्वार्थ, प्राण यांचा त्याग करणें जसें कर्तव्य, तसेंच, बंधो ! मानाचाहि त्याग करणें कर्तव्यच आहे...धीर धर. सध्यां कष्ट सोसून जग कीं पुढें सुटतांच पुनः देशमातेची सेवा करतां यावी...रोज संध्याकाळीं घामानें चिंब झालेला, अंगावर पिसलेल्या खोबऱ्याची भुशी केंसापासून पायापर्यंत चिकटलेली, पायांत बेडी खळखळत आहे, वीस तीस पौंड तेलाची बादली उचलून आणि खांद्यावर भुशीचें पोतें घेऊन वांकत, उवडाबोडका चाललेला इंदु मला दुरून दिसत असे.*

अखेरीस इंदुभूषणजींनीं दिनांक २९–४–१२ रोजीं मध्यरात्रींच्या सुमारास आपल्या कोठडींत गळफांस लावून आत्महत्या केली ! राजबंदिवानानें अंदमानांत केलेली ही पहिली आत्महत्या होती ! इतर कैद्यांपैकीं २–३ कैदी प्रतिवर्षी आत्महत्या करीत आलेले होते ! आत्महत्या करण्याचें ठरविल्यावर इंदुभूषणजींनीं आपल्या गळ्यांत एक चिठ्ठी बांधून ठेविली होती. बारीनें ती दाबून टाकली. इंदुभूषणजींच्या आत्महत्येचें खरें कारण बाहेर पडूं नये म्हणून बारीनें केलेल्या कारवाया किती यशस्वी झाल्या असतील हें पुढील माहितीवरून[2] स्पष्ट होत आहे :

---

१ माझी जन्मठेप पूर्वार्ध : पृ. १९४–१९५.
२ केसरी : दिनांक ११–६–१२.

(इंदुभूषण रॉय यानें केलेल्या आत्महत्येसंबंधानें) त्याच्या इकडील आप्तानें चौकशी केली असतां अंदमान बेटावरील सुपरिंटेंडेंट यांनीं कळविलें कीं, सरकार-तर्फे संकेत साक्षीदार या नात्यानें साक्ष दिली म्हणून (आपल्या) खटल्यांत शिक्षा पावलेले व हद्दपार झालेले तरुण माझा खून करतील, असें वाटल्यानें भिऊनच इंदुभूषण यानें जीव दिला.

या आत्महत्येच्या कारणांची चौकशी चालली असतांना बारीनें सावरकरांना साक्षीदार म्हणून बोलावण्याचें टाळलें; तरीहि, एका साक्षीदारानें 'इंदु कष्टांस कंटाळून मेला' असें स्पष्ट सांगितलें. आत्महत्येच्या दुसऱ्या दिवशीं सायंकाळीं बारी मुद्दाम सावरकरांकडे गेला. या प्रकरणाची चर्चा बारीनेंच सुरू केली तेव्हां दोनच मुद्याचे प्रश्न उपस्थित करून सावरकरांनीं त्याला कुंठित केलें! बारीनेंच इंदुभूषणनें लिहून ठेवलेल्या चिठ्ठीचा उल्लेख केला; तेव्हां सावरकर म्हणाले : हा अस्सल पुरावा तुम्हांला अनुकूल असूनहि तुम्ही तो पुढें कां आणीत नाहीं? इंदूचें माथें फिरलें असेंच क्षणभर मानलें तरी, त्याच्यासारख्या पक्क्या मनाच्या तरुणाचें माथें कां फिरलें, हा प्रश्न शिल्लक उरतोच! व हा प्रश्न शेवटीं राजबंदींच्या कष्टप्रद जीवनाशीं जाऊन भिडतो. इंदुभूषणजींचें डोकें थिऑसफीवरील पुस्तकें वाचल्यामुळें फिरलें अशीहि उपपत्ति लावण्याला बारी कचरला नाहीं! या आत्महत्येचा बराच गवगवा झाला तरीहि बारीची प्रतिष्ठा काडीभरहि कमी झाली नाहीं; यामुळें तर तो जास्तच चढेल बनला!

श्री. उल्हासकर दत्त यांचें प्रकरणहि याच सुमारास उपस्थित झालें. उल्हासकर हा एक मोठा उमदा विनोदी तरुण होता व त्यामुळें तो सर्वांनाच आवडत असे. सावरकरांना तर उल्हासकरबद्दल विशेषच ममत्व वाटत होतें जिवावर उदार होऊन उल्हासकरजींनीं काम नाकारलें! या कारणास्तव त्यांना हातकडींत अडकून उभें राहण्याची शिक्षा देण्यांत आली. ही शिक्षा भोगीत असतांनाच त्यांना ताप भरूं लागला. ताप फणफणूं लागला व तो फारच चढल्यामुळें उल्हासकरजींचे ज्ञानतंतु क्षीण होऊन त्यांना भ्रमाचे झटके येऊं लागले. अशा एका झटक्याचा अंमल मनावर बसला असतांना उल्हासकरजींना जें दृश्य दिसलें त्याचें वर्णन त्यांनींच मागाहून केलें, तें पुढीलप्रमाणें आहे :[1]

*मघाशीं (जेलर) साहेबाचा मी जो अपमान केला होता त्या अपमानासाठीं मला द्वंद्वयुद्ध करण्यास आव्हान देण्यांत येत आहे असा भास झाला. एक क्षणभरांतच टेबलावर पुष्कळशीं शस्त्रास्त्रें येऊन पडलीं व आमच्या द्वंद्वयुद्धाची बातमी सगळ्या जेलभर पसरली. परंतु, मला प्रोत्साहन देण्यासाठीं कोणीच पुढें येईना. इतक्यांत जेलरसाहेब आठवण केल्यासारखें करून एक-*

---

१ राजनैतिक कारस्थान : द्वितीय खंड (काळ्या पाण्यावर) : पृ. २३५-२३६.

*दम गरजले : अरे, सावरकरला तरी बोलव ! तो याला अवश्य मदत करील. इतकें बोलून त्यांनीं स्वतःच 'विनायक' म्हणून हांक मारली. डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच सावरकरांच्या आकृतीचा एक मनुष्य त्या ठिकाणीं येऊन हजर झाला....सावरकराला पाहतांच जेलरसाहेबांनीं.. विनायक सावरकरांशींच द्वंद्वयुद्ध करणें पसंत केलें. विनायक सावरकरनेंहि.. आव्हानाचा ताबडतोब स्वीकार केला...सावरकरनेंहि इशाऱ्यासरशीं (तोच) पंजा (gauntlet) उलट फाडकन् फेंकून जेलरच्या तोंडावर मारला. सावरकरांची ती हातचलाखी व समयसूचकता पाहून माझ्या आनंदाला पारावार उरला नाहीं.*

उल्हासकरला वेड कसें लागलें, त्याला विजेची पेटी देण्यांत आली तेव्हां तो भूतबाधा झाल्यासारखा कसा किंचाळला, उल्हासकरच्या उन्मादामुळें सर्व राजबंदी किती चिंताग्रस्त झाले, आत्महत्या करण्याला सिद्ध झालेल्या उल्हासला एका पहारेकऱ्यानें ऐन वेळीं पाहिल्यामुळें तो बचावला कसा, शेवटीं त्याला वेड्याच्या रुग्णालयांत कसें ठेवण्यांत आलें, १९१३ सालच्या मे महिन्यांत त्याला मद्रासच्या वेड्याच्या रुग्णालयांत कसें धाडण्यांत आलें इत्यादि हकीकतींकडे दुर्लक्ष करणें आपल्याला प्राप्त आहे. उल्हासला वेड लागल्याचें वृत्त हिंदुस्थानपर्यंत येऊन पोंचण्याला फारसा उशीर लागला नाहीं. दिनांक १८–९–१२ रोजीं वरिष्ठ विधिमंडळांत श्री. होतीलाल वर्मा यांच्या पत्रासंबंधींचीं प्रश्नोत्तरें झाल्यावर, ना. भूपेंद्रनाथ बसू यांनीं पुढील पुरवणी-प्रश्न विचारला : उल्हासकर दत्त नांवाच्या एका बंदिवानाला अलीकडे वेड लागलें आहे ही गोष्ट सरकारला माहीत आहे का ? यावर गृहमंत्री सर रेजिनाल्ड क्रॅडॉक उत्तरले : या वार्तेविषयींची पक्की माहिती पोर्टब्लेअरच्या सुपरिंटेंडेंटकडून अद्याप आलेली नाहीं. ही वार्ता खरी कीं खोटी हें कळविण्याबद्दलची सूचना या अधिकाऱ्याला करण्यांत आलेली आहे.

उल्हासकर वेडा झाल्याचें वृत्त कारागृहांत पसरल्यानंतर दोनचार दिवसांनीं बारीसाहेब सावरकरांशीं बोलायला गेले. उल्हासकराचें वेड खोटें आहे असा त्यांचा पक्का ग्रह बनला असल्यामुळें, त्यांनीं सावरकरांना पहिलाच प्रश्न विचारला तो 'तुम्हांला कधीं वेड लागणार' हा होता. सावरकरांनींहि उत्तर दिलें : आधीं तुम्हांला वेड लागेल; मग क्वचित् मला ! इंदुभूषणच्या आत्महत्येप्रमाणेंच उल्हासकराच्या वेडाचें कारणहि येथील असह्य कष्टप्रद जीवन हेंच आहे असें सावरकर म्हणाले. तेव्हां बारीनें म्हटलें : उल्हासकरनें काम चुकविण्यासाठीं वेडाचें ढोंग पांघरलें आहे. यावर सावरकर उत्तरले : त्याला वेड लागलें नसेल तर तुम्हांला तरी तें खास लागलेलें आहे ! सध्यांच्या स्थितींत कांहीं तरी इष्ट बदल झाला नाहीं तर राजबंदींना फिरून संप पुकारावा लागेल, असेंहि सावरकरांनीं या भेटींत बारीला बजावलें.

इकडे या गोष्टी घडत असतांनाच सावरकरांना कारावासांतील शिस्त मोडल्या-

च्या निमित्तानें पहिली शिक्षा सांगण्यांत आली. १९१२ च्या सप्टेंबर महिन्याच्या प्रारंभींच सावरकरांनीं दुसऱ्या कोणा तरी बंदिवानाला एक पत्र लिहिलें. हें पत्र योग्य स्थळीं रवाना होण्याच्या आधींच त्यांची झडती झाली व त्या वेळीं त्यांच्या-जवळ हें पत्र सांपडलें. ज्या कारागृहांत कागदाचा कपटा अगर पेन्सिलीचा तुकडा जवळ वाळगणें हा गुन्हा समजला जात होता व ज्या कारागृहांत प्रत्यक्ष ज्येष्ठ बंधूंची साधी पूसतपासहि आक्षेपार्ह ठरत होती त्या कारागृहांत सावरकरांसारख्या बंडखोरा-जवळ व बंडखोरांचा पुरस्कार करणाऱ्या कैद्याजवळ असें पत्र सांपडल्यावर बारीला केवढा आनंद वाटला असेल बरें ! त्यांच्यावरील खटल्याचा निकाल होऊन असें ठरलें कीं, १० सप्टेंबरपासून एक आठवडापर्यंत त्यांनीं हातकडींत अडकून पडावें. या अवधींत त्यांच्याजवळचीं पुस्तकेंहि हिरावून घेतलीं गेलीं होतीं. ही हातकडीची शिक्षा काय प्रकारची असे ते श्री. उल्हासकर दत्त यांनीं पुढील शब्दांत[१] वर्णिलें आहे :

*एका खोलींत साधारणपणें एक पुरुषभर उंचीवर एक हूक बसविलेला असतो. त्यास एक हातकडी झुलती ठेवलेली असते. त्या कडींत हात अड-कवून, आकाशाकडे तोंड करून, सकाळीं सहा वाजल्यापासून संध्याकाळच्या चार वाजेपर्यंत अधांतरी लोंबकळत ठेवण्यांत येतें. मध्यंतरीं दहा वाजतां जेवणासाठीं सुटका होते तेवढीच !*

या सुमारास सावरकरांना अंदमानांत येऊन सव्वा वर्ष होऊन गेलें होतें. कांहीं विशिष्ट कालपर्यंत तुरुंगांत राहिल्यावर वसाहतींत कामाला धाडण्यासंबंधींचा जो प्रघात होता त्याचा फायदा मागावयाचा असेल तर तो मागण्याची वेळ जवळ येत चालली होती. कामासाठीं बाहेर धाडण्यांत आलेल्या राजबंदींना कोणते दारुण अनुभव आले ते सावरकरांना पूर्णपणें माहीत झालेले होते. आपल्यालाहि कदाचित् तोच अनुभव येईल हेंहि ते चांगलें ओळखून होते. इतकें असूनहि, त्यांनीं २९-१०-१२ रोजीं चीफ कमिशनरकडे अर्ज केला व वसाहतींत कामाला धाड-ण्याच्या निमित्तानें कारागृहांतून मुक्तता व्हावी, अशी मागणी केली. ही मागणी मान्य झाली तर, क्वचित् अधिक कष्ट भोगावे लागले तरीहि, अनेक लोकांत मिस-ळतां येईल व प्रचारकार्य करतां येईल या हेतूनें सावरकरांनीं हा अर्ज केला होता. आपल्या अर्जाचा उपयोग झाला तर आपल्या पूर्वींच वर्षभर अंदमानांत येऊन पडलेल्या आपल्या थोरल्या भावालाहि वसाहतींत काम करण्याची मुभा मिळूं शकेल, या अंदाजानेंहि हा अर्ज धाडलेला होता. दि. ४-११-१९१२ रोजीं चफि कमिशनरनें या अर्जाचें नकारार्थी उत्तर धाडिलें ! शिक्षा होण्यापूर्वींचें या कैद्याचें जीवनवृत्त अशा प्रकारचें आहे कीं, त्यामुळें त्याची कारागृहांतून मुक्तता करणें श्रेयस्कर नाहीं, असा अभिप्राय देऊन चीफ कमिशनरनें हा अर्ज फेंटाळून लाविला होता !

---

१ राजनैतिक कारस्थान : द्वितीय खंड ( काळ्या पाण्यावर ) : पृ. २३६.

बाहेरच्या जगाला सावरकरांचें विस्मरण व्हावें म्हणून हिंदुस्थान सरकारनें त्यांना अंदमानांत डांबून ठेविलें होतें तरीहि, बाहेरच्या जगांत सावरकरांचें स्मरण ताजेंतवानें ठेवण्याचे प्रयत्न चाललेच होते. अशा प्रयत्नांपैकीं एक प्रयत्न या सुमारास उघडकीस आला. या प्रयत्नाचें स्वरूप विशद करणारा पुढील उतारा[1] मनोरंजक आहे :

*'हेरल्ड ऑफ रिव्होल्ट' नांवाच्या इंग्रजी वर्तमानपत्राचा एक अंक नुकताच प्रसिद्ध झाला असून, त्यांत विनायक दामोदर सावरकर यांच्यासंबंधीं मजकूर छापला आहे. हा अंक कोणीहि कोणत्याहि प्रकारें ब्रिटिश हिंदुस्थानांत आणूं नये असें हिंदुस्थान सरकारनें फर्माविलें आहे. यासंबंधानें लिहितांना मुंबई गॅझेट म्हणतें : गेल्या मेलनें या पत्राचे पुष्कळसे अंक हिंदुस्थानांत आले व पोस्ट ऑफिसतर्फे वांटले गेले. या अंकांत सावरकरांच्या हातांत बंदूक असलेलें एक चित्र देऊन त्यांजवरील खटल्याची अतिशयोक्तिपूर्ण हकीकत दिली आहे व 'बदमाषांचें राज्य' (*Government by Hooliganism*) या मथळ्याखालीं एक भयंकर लेख छापला आहे.*

इंदुभूषणची आत्महत्या, उल्हासकर दत्तचा उन्माद वगैरे प्रकरणांमुळें प्रक्षुब्ध झालेले राजबंदी दुसरा संप पुकारण्याच्या विचारांत होते इतक्यांत सावरकरांजवळ एक पत्र सांपडलें व त्यांना एक आठवडा हातकडींत अडकून पडण्याची शिक्षा झाली. या पकडलेल्या पत्रांत सावरकरांनीं संकल्पित संपाच्या धोरणासंबंधीं विवेचन केलेलें होतें, हें खरें; पण, शिक्षा सांगतांना बारीनें जादा अक्कल लढविण्याची हुषारी दाखविली व सावरकरांनीं बारीच्या ह्या वर्माचा पुरेपूर फायदा घेऊन त्याला चांगलेंच फजीत केलें. सावरकरांचें पत्र बंगालींत आहे असें बारीचें म्हणणें होतें. वस्तुत: तें पत्र मोडींत लिहिलेलें होतें. पत्र बंगालींत आहे असें बारी आग्रहानें म्हणूं लागला व त्याची खुशामत करणाऱ्या कांहीं बंदिजनांनीं बारीच्या सांगण्यावरहुकूम काल्पनिक पत्र रचून, तें बंगालींत वाचूनहि दाखविलें! पत्र बंगालींत आहे कीं मोडींत आहे या मुद्याची शहानिशा व्हावी अशा आशयाचा अर्ज, शिक्षा भोगीत असतांनाच, सावरकरांनीं सुपरिंटेंडेंटकडे धाडून दिला. सुपरिंटेंडेंटनें या कामांत नीट लक्ष घातलें व पत्र मोडींत आहे, बंगालींत नाहीं अशी स्वत:ची खात्री करून घेतली. यामुळें बारीची चांगलीच शोभा झाली व त्याला चांगल्या कानपिचक्याहि बसल्या!

दुसरा संप पुकारण्याचा राजबंदींचा निर्धार झाला व संप सुरू झाल्यावर किमान मागण्या म्हणून काय आग्रह धरावयाचा याचीहि चर्चा सुरू झाली. १९१२ सालच्या ऑक्टोबर–नोव्हेंबर महिन्यांत केव्हां तरी हा संप प्रत्यक्ष सुरू झाला व राजबंदींच्या मागण्यांचें आवेदनपत्रक अधिकाऱ्यांकडे धाडण्यांत आलें. या वेळीं सावरकरांना अंदमानांत येऊन दीड वर्ष होत आलें होतें. त्यामुळें, त्यांच्या घरून

१ केसरी : दि. २९–१०–१९१२.

येणारें पहिलें पत्र येण्याची ते वाट पहात होते. हें पत्र येऊन त्याचें उत्तर धाडलें कीं संपांत सामील होण्याला आपण मोकळे झालों, असें त्यांनीं ठरविलें होतें. गणेशपंत सावरकर पहिल्या दिवसापासून च संपांत सामील झाले होते. संप सुरू होतांच बारीनें नियमभंगाबद्दल शिक्षा ठोठावण्याला सुरुवात केली. पण, या शिक्षांची अंमलबजावणी करणें फार कठीण आहे, हें बारीला स्पष्ट दिसूं लागलें. पदोपदीं बारीचा पाणउतारा होऊं लागला. अधिकाऱ्यांचा उपमर्द करण्याची ही प्रवृत्ति बळावली तर राजबंदींचें अनुकरण करून इतर बंदिवानहि आपल्या आज्ञा अव्हेरूं लागतील, अशा भीतीनें बारीचें मन ग्रस्त झालें. संपावर गेलेल्या राजबंदींना मारहाण करण्यांत येते अशाहि वार्ता सावरकरांच्या कानावर येऊं लागल्या. तेव्हां मात्र त्यांनीं बारीची एकदां कानउघाडणी केली. राजबंदींना शिवीगाळ कराल अगर मारहाण कराल तर तेहि शक्य तो प्रतिकार केल्याशिवाय राहणार नाहींत, प्रसंगीं ते ठोशास ठोसा देण्यालाहि कचरणार नाहींत असें सावरकरांनीं बारीला बजावलें! त्याला मनांतून हा उपदेश पटत असे; पण, आपली इभ्रत राखण्यासाठीं तो वरिष्ठांना असें सांगे कीं, सावरकर मारहाणीला उत्तेजन देतात!

आपल्या कनिष्ठ बंधूंचें पहिलें पत्र मिळाल्यावर सावरकरांनीं त्याचें जें उत्तर अधिकाऱ्यांच्या मान्यतेनें धाडिलें तें दिनांक १५-१२-१९१२ रोजीं धाडलें. या वेळीं सावरकरांना एक महिना मुदतीची पृथक् कोठडीबंदीची शिक्षा झालेली होती. दि. २२-११-१२ रोजीं त्यांची झडती घेण्यांत आली. तेव्हां दुसऱ्या एका बंदिवानानें त्यांना धाडलेलें एक पत्र त्यांच्याजवळ सांपडलें; त्यामुळें, दि. २३-११-१२ पासून ते ही शिक्षा भोगूं लागले होते. हें पत्र लिहिण्यापूर्वी सावरकरांनीं अंदमानांत जें दीड वर्ष घालविलें होतें त्यांत त्यांनीं कितीतरी गोष्टी अनुभविल्या होत्या. पण, त्यांचा नुसता निर्देशहि या पत्रांत करण्याची शक्यता नव्हती! विश्वांत मोकळेपणानें संचार करण्याला सरावलेल्या आपल्या मनाला संवयीनें अंदमानांतलें जीवनहि मानवूं लागलें आहे—आपलें शरीरस्वास्थ्य व मनःस्वास्थ्य सामान्यतः चांगलें आहे—असें आपल्या बंधूंना सांगतांना सावरकरांनीं कारावासांतल्या जीवनासंबंधींचा एक संस्मरणीय सिद्धांत सांगितला आहे :[1]

Life in a jail, for good, for evil, is a unique chance. Man can never go out of it exactly as he came in. He goes out far better or far worse either more angelic or more fiendish.

(भल्याबुऱ्या कोणत्याहि दृष्टीनें पाहिलें तरी, कारागृहांत जीवन व्यतीत करण्याची संधि ही एक पर्वणीच आहे. तुरुंगांत येतांना मनुष्य जसा असेल तशाचा तसा तो तेथून बाहेर पडेल, ही गोष्ट शक्यच नाहीं! बाहेर पडतांना एक तर तो पूर्वीहून फार भला तरी होईल किंवा फार खराब तरी होईल—त्याच्या अंगांतला

1 An Echo from Andamans : P. 18.

दैवी अंश तरी वाढल्याचें आढळेल किंवा आसुरी अंश तरी बळावल्याचें आढळेल!) कारावासांतल्या यातना भोगणें हेंहि एक महत्त्वाचें कार्यच आहे हें आपल्या धाकट्या भावाला पटावें म्हणून सावरकरांनीं पुढील वाक्यें[१] लिहिलीं आहेत:

Those who work outside work much; but those who work in the prison work more; and after all, my dearest Bal, don't you think that suffering is in itself work—intense because subtle?

(कारागृहाबाहेर राहून जे कार्य करतात त्यांचें कार्य मोठें आहे; पण, कारागृहांत राहून जे कार्य करतात त्यांचें कार्य महत्तर आहे. आणि, प्रियतम बाळ, कष्ट भोगणें हेंच एक कार्य आहे—हें कार्य सूक्ष्म असल्यामुळें इतर कामांच्या मानानें तें जास्त मूल्यग्राही आहे, असेंच सारासार विचार केल्यावर तुला वाटत नाहीं?)

या पहिल्या पत्रांत सावरकरांनीं काँग्रेसच्या ठरावांपासून चीनच्या लोकांच्या शासनपद्धतीपर्यंत—गोखल्यांच्या शिक्षणासंबंधींच्या ठरावापासून टिळकांच्या मुक्ततेच्या समयापर्यंत अनेकविध घडामोडींची चौकशी केली आहे.

वैद्यकीय अभ्यास करणाऱ्या आपल्या धाकट्या भावानें या विद्येकडे कोणत्या दृष्टीनें पहावें हें सुचविताना सावरकरांनीं जे विचार व्यक्त केले आहेत ते देशी वा विदेशी वैद्यकाकडे वळलेल्या अगर वळणाऱ्या सर्वांनींच लक्षांत ठेवण्यासारखे आहेत. या व्यवसायाचें स्वरूप किती उदात्त आहे वगैरे मुद्दे स्पष्ट करून सांगतांना सावरकर लिहितात:[२]

Please to follow it up not only as a profession but as a pursuit. It opens out an inexhaustible field for charity and benevolence. It is respected all over the world... The study of body—a temple, wherein the soul lives—is next to the study of the soul itself.

(वैद्यकीचा उद्योग करावयाचा तो केवळ धंदेवाईक दृष्टीनें करावयाचा नसून आवडीचा व्यवसाय म्हणून करावयाचा, हें लक्षांत ठेव. परोपकार करण्याच्या दृष्टीनें व औदार्य दाखविण्याच्या दृष्टीनें केवढें तरी अफाट क्षेत्र या व्यवसायामुळें दृष्टीसमोर येतें! जगांतील सर्व प्रकारच्या लोकांना या व्यवसायाबद्दल आदर वाटतो... मानवी शरीर हें आत्म्याच्या निवासासाठीं निर्मिलेलें मंदिर आहे. त्या मंदिराचा अभ्यास करणें ही गोष्ट आत्म्याच्या अभ्यासाच्या खालोखाल महत्त्वाची आहे.)

वैद्यकाच्या अध्ययनासाठीं कलकत्त्यास जाऊन राहिलेले आपले बंधुराज एखाद्या बंगाली युवतीच्या प्रेमपाशांत सांपडले असें कळलें तर आपल्याला आश्चर्य वाटणार नाहीं असें लिहून सावरकरांनीं आपली विनोदवृत्ति व्यक्त केली आहे. यानंतर त्यांनीं व्यक्त केलेले आंतरप्रांतीय विवाहासंबंधींचे विचार[३] महत्त्वाचे आहेत:

---

१ An Echo from Andamans: P. 19.
२ ,, ,, : P. 16.
३ ,, ,, : P. 17.

I am as strongly in favour of these inter-provincial marriages among the Hindus as I am deadly opposed to the practice of marrying European girls at this stage of our national life.

( हिंदूहिंदूमध्यें होणाऱ्या अशा आंतरप्रांतीय विवाहांचा मी जितका कट्टा पुरस्कर्ता आहें तितकाच, आपल्या राष्ट्रीय जीवनाच्या सध्यांच्या अवस्थेंत, युरोपियन मुलींशीं विवाह करण्याच्या पद्धतीचा मी विरोधक आहें. ) वहिनींना नमस्कार लिहिले, इतर अनेकांचा नामनिर्देश केला नाहीं. तरी त्या सर्वांचें आपल्याला स्मरण होत आहे असें आश्वासनपूर्वक सांगतांना सावरकरांनीं जीं वाक्यें लिहिलीं आहेत तीं वाचतांना

स्नेहानाहुः किमपि विरहे ध्वंसिनस्ते त्वभोगात्
इष्टेवस्तुन्युपचितरसाः प्रेमराशीभवंति ॥

या कालिदासवचनाचें सहज स्मरण होतें. सावरकर लिहितात :[१]

**No, a man in a prison cannot forget The mind, shut up from new impressions can only feed on old ones.** ( छत् ! कारागृहांत असलेला मनुष्य विस्मरणशील बनेल, हें अशक्य आहे ! नवे संस्कार घडण्याच्या दृष्टीनें बंदिस्त झालेल्या मनाला जुने संस्कार घोळवीत राहून त्यांच्यावर गुजराण करण्याशिवाय गत्यंतरच उरत नाहीं ! ) अश्रु ढाळले नि कोणी तरी येऊन ममतेनें, प्रेमानें ते अश्रु पुसले कीं त्या अश्रुविमोचनाचें सार्थक होतें ! अंदमानांत गेलेल्या राजबंदींवर अश्रुविमोचनाचे प्रसंग वारंवार ओढवतात; पण त्यांचें अश्रुविमोचन सार्थकीं लागत नाहीं हें पुढील वाक्यांत[२] सांगण्यांत आलें आहे :

My sweet friends, in a prison one weeps and weeps and vainly waits for someone to come to wipe the tears—to speak a word of affection and love.

( जिवलग मित्रांनो, कारागृहांत अडकलेला कैदी रडून रडून कष्टी होतो. कोणी तरी येऊन आपले अश्रु पुशील, आपल्यापाशीं प्रेमाचा, ममतेचा एक शब्द तरी बोलेल यासाठीं तो मार्गप्रतीक्षा करतो; पण, ही त्याची मार्गप्रतीक्षा विफल ठरते ! )

घरचें पत्र मिळणें व घरीं पत्र धाडणें ही अंदमानांतल्या कैद्यांच्या दृष्टीनें येणारी वार्षिक पर्वणी होती ! १५–२–१९१४ रोजीं लिहिलेल्या दुसऱ्या पत्रांत सावरकरांनीं या पर्वणीला 'पाडवा' हें नांव खरोखरच दिलें आहे. पाडव्याचा खरा अर्थ आपण कोणता समजतों हें सावरकरांनीं या सुमारासच 'कमला' काव्याच्या पुढील ओळींत[३] सांगितलें होतें :

---

१ An Echo from Andamans : P. 20.
२ ,, ,, : Pp. 20-21.
३ कमला : ११२–११३.

बाढवा जो नवीनाचा, आज तो सण पाडवा।
शुभे, हो शिव हें तूतें नवें वर्ष, ऋतू नवा॥
आशा आशा तशा आजी उष्णशीतल मानवा।
शुभे, हो शिव हें तूतें नवें वर्ष, ऋतू नवा॥

घरीं पत्र पाठविण्याचा दिवस हा आपल्याला पाडव्यासारखा कां वाटतो हें सावरकरांनीं पुढील शब्दांत[1] स्पष्ट केलें आहे :

In fact the day of a letter to Home is to me always the real पाडवा my New Year's Day; I count my year from that day, for I get a stock of energy and enthusiasm from the communion with my chosen few which enables me to breathe and live and laugh a year further on.

(घरीं पत्र घालण्याचा दिवस हा खरोखरच मला नेहमीं खरा पाडवा, खरा नववर्षदिन वाटतो. त्या दिवसापासून मी नवी वर्षगणना करूं लागतों; कारण, त्या दिवशीं माझ्या निवडक इष्टमित्रांशीं तादात्म्य पावल्यामुळें माझ्या कार्यशक्तींत व उत्साहांत नवी भर पडते व हंसत खेळत आणखी एक वर्ष काढण्याचें सामर्थ्य मला लाभतें.) अंदमानांतला हा पहिला पाडवा साजरा करून थोडका काळ लोटल्याबरोबर सावरकर संपांत सामील झाले, असें दिसतें. कारण, दि. ३०-१२-१२ रोजीं व दि. १-१-१३ रोजीं सावरकरांनीं संपूर्ण अन्नत्याग केल्याबद्दलची नोंद त्यांच्या History Ticket मध्यें आढळते.

सावरकरप्रभृति अंदमानीय राजबंदींचें बाह्य जगाला विस्मरण व्हावें ही ब्रिटिश सरकारची इच्छा सफल झाली नाहीं; त्याप्रमाणेंच, बाह्य जगांत होणाऱ्या राजकीय घडामोडींची माहिती या राजबंद्यांना मिळूं नये ही बारीप्रभृतींची इच्छाहि सफल झाली नाहीं. दर महिन्याला अंदमानांत धाडण्यांत येणाऱ्या बंदिवानांकडून मिळेल ती मोडकीतोडकी, अर्धीमुर्धी बातमी मिळविण्याचा संघटित प्रयत्न राजबंदींकडून प्रथम करण्यांत आला. अशा नव्या बंदिवानांमार्फत बातमी मिळविण्याची उत्सुकता अंदमानमधील राजबंदिवानांना असे; त्याप्रमाणेंच, या राजबंदिवानांना माहिती पुरविण्याची उत्सुकता हिंदी तुरुंगांतल्या राजकीय कैद्यांनाहि असे. स्वतःपाशीं असलेल्या एखाद्या यःकश्चित् पुस्तकाच्या बांधणींत पत्रें लपवून तीं अंदमानला निघालेल्या कैद्यांबरोबर धाडण्याचें साहस करण्याला हिंदी तुरुंगांत डांबून ठेवलेले राजबंदी कचरत नसत. याहूनहि अद्भुत मार्गांचा अवलंब करून हिंदी राजबंदी अंदमानांत बातम्या कशा धाडीत हें सावरकरांनीं स्वानुभवानेंच लिहिलें आहे :

*मला एकदां पंजाबमधल्या एका थोर पुरुषाच्या तरुण पुत्रानें...पंजाबच्या तुरुंगांतून बिल्ल्यामागें लिहिलेलें पत्र धाडलें होतें. ज्या बंदिवानाच्या गळ्यांत तो बिल्ला होता त्याची पंजाबमधून निवून अंदमानामध्यें मला*

[1] An Echo from Andamans : P. 22.
[2] माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १५९.

*भेटेतों पन्नास वेळां कसून कपडे काढून झडती झाली असेल. पण, त्याच्या गळ्यांत लटकणाऱ्या त्या बिल्ल्यामागें पत्र लिहिलेलें असेल याची कोणास शंका देखील आली नाहीं. त्या बंदिवानानें तें पत्र घासून घासून पुसूं नये म्हणून बिल्ला अलगत ठेवीत ठेवीत अंदमान कारागारांत येतांच तें माझ्या हातीं दिलें. मी वाचून पुसून तो बिल्ला त्याला परत केला.*

वर्तमानपत्राचें चिठोरें हातीं लागावें व स्वदेशी अगर परदेशी घडामोडींचें थोडेंफार तरी वृत्त कळावें म्हणून राजबंदींनी कचरा घेऊन बाहेर जाणाऱ्या गाड्या ओढण्याचें काम आनंदानें पत्करण्यास प्रारंभ केला. गोऱ्या अधिकाऱ्यांच्या प्रातर्विधिगृहांत ताज्या पत्रांचे तुकडेहि फेंकलेले असत; त्यामुळें तेथील गदळ कामहि बंदिवान अहमहमिकेनें करूं लागले. कारागारांतील कारखान्यांतून ठेवलेले टेकस, खिळे वगैरे सामान ज्या जुन्या वृत्तपत्रांतून गुंडाळून ठेवलेलें असे त्यांचें संशोधन करून, बंदिवान स्वदेशी बातम्या मिळवूं लागले. स्वतंत्र म्हणून अंदमानांत वास्तव्य करून राहिलेल्या लोकांकडे कामानिमित्त जाणाऱ्या बंदिवानांना तेथें येणारीं वृत्तपत्रें मधूनमधून पहावयाला मिळत; त्या मार्गानेंहि कांहीं बातमी मिळूं लागली. भेदनीतीचा अवलंब करून बातमी मिळविण्याच्या कामांतहि राजबंदींनी चांगलेंच यश मिळाविलें. सुपरिंटेंडेंट, जेलर इत्यादींच्या कार्यालयांतून काम करणाऱ्या कांहीं बंदिवानांना वश करून घेण्याचें काम सिद्ध झाल्यामुळें तेथें पोंचणारी प्रत्येक लहानमोठी बातमी कारागृहांतल्या राजबंदींना लगोलग कळूं लागली.

अशा मार्गानें राजबंदींना बातम्या किती ताज्या मिळत हें १९१२ सालीं डिसेंबर महिन्यांत सिद्ध झालें. गव्हर्नर जनरल लॉर्ड हार्डिंज यांच्या दिल्ली-प्रवेशाला अपशकुन करण्यासाठीं त्यांच्यावर क्रांतिकारकांकडून बॉंब फेंकण्यांत आला ही बातमी अगदीं गुप्त ठेवण्याचें अंदमानच्या अधिकाऱ्यांनीं ठरविलें. पण, त्यांना ती बातमी कळली न कळली तोंच सावरकरप्रभृति राजबंदिजनांपर्यंत ती पोंचलीहि होती! या कामीं बारीनें कार्यालयांतल्या एका बंदी लेखकावर संशय घेतला व त्याला त्यानें खूप दटावलें! पण, त्या दटावणीचा फारसा उपयोग झाला नाहीं. या प्रकरणांत आपल्या धाकट्या भावाला त्रास होत आहे, ही माहिती खरी कीं खोटी हें कळण्याबद्दलची तीव्र जिज्ञासा सावरकरांच्या मनांत जागृत झाली होती. ही जिज्ञासा तृप्त करून घेण्याची संधि सावरकरांना कशी मिळाली, हें पुढील वृत्तांतावरून [1] समजण्यासारखें आहे :

*दुपारीं पर्यवेक्षक सहज आम्हांस म्हणाला : काय! तुमचा धाकटा भाऊ तेवढा बाहेर आहे, नाहीं? आम्ही यावर उत्तर देण्यापूर्वीच बारी हंसून म्हणाला : तोहि येईलच आतां इथें! ... किंचित् त्रासानें आम्ही म्हटलें : तोच काय, पण, हिंदुस्थानांतील कोणीहि मनुष्य इथें येऊं शकेल.*

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. ७२-७३.

*हिंदुस्थानच एक प्रचंड बंदिशाळा आहे...तेव्हां पर्यवेक्षक म्हणाला : छे, इथें येईल कीं नाहीं तें कांहीं मला ठाऊक नाही; पण, तो जरा भित्रा आहे असें दिसतें. मी बातमी काढण्याकरितां विचारलें : तें कशावरून? तेव्हां सुपरिंटेंडेंट म्हणाला : त्यानें दिल्लीची बातमी ऐकतांच आपण होऊनच घाबऱ्याघाबऱ्या पोलिसांचे मुख्यास तार दिली कीं, मी कलकत्त्यास हा इथेंच आहें. पुढेंमागें मजवर आळ घ्याल म्हणून सांगून ठेवतों. मी म्हणालों : तर मग सगळ्या कलकत्त्यांत तोच एक खरा चाणाक्ष मनुष्य आहे. त्यानें तो बाँब फेंकला नाहीं हें उघडच आहे; पण, जरी त्यानें तो फेंकला असता तरी देखील त्यानें अशीच त्वरित तार पोलिसांस करून चकवावयास पाहिजे होतें. तो भित्रा नव्हे—जो दुष्ट शत्रूवर आघात करून पुन्हां निसटून जाण्याचेंहि साधतो तोच खरा शूर !*

अंदमानांतल्या बंदिवानांची स्थिति, तेथील रोगट हवा, तेथील अधिकाऱ्यांचें वर्तन वगैरे गोष्टींचा वर्ष दीडवर्ष बराच बोभाटा झाल्यामुळें हिंदुस्थान सरकारनें १९१३ सालच्या सुरुवातीलाच सर्जन जनरल सर सी. पी. ल्यूकिस यांना अंदमानांत धाडलें व तेथलि परिस्थितीची पहाणी करून अहवाल सरकारकडे धाडण्याचें काम त्यांच्यावर सोंपविलें. हिंवताप, हगवण, क्षय वगैरे आजारांमुळें अंदमानांतल्या बंदिवानांना विशेष त्रास होतो कीं काय हें त्यांनीं मुद्दाम पहावें असें त्यांना सांगण्यांत आलें होतें. त्याप्रमाणें ल्यूकिससाहेब अंदमानला जाऊन आलेहि ! त्यांनीं सादर केलेला अहवाल प्रसिद्ध करण्याची सरकारची इच्छा नाहीं असें गृहमंत्री सर रोजिनॉल्ड क्रॅडॉक यांनीं वरिष्ठ विधिमंडळांत ना. सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्या प्रश्नाला उत्तर देतांना दिनांक १८–३–१९१३ रोजीं सांगितलें हें खरें. पण, वर्ष दीडवर्ष चाललेल्या धडपडीचा इतका तरी उपयोग झाला हें पाहून चळवळी करणाऱ्या राजबंदींना बरेंच समाधान वाटलें.

सुरू झालेला संप अद्याप मिटला नव्हता. या संपांत ज्यांनीं अप्रतिम धैर्य दाखविलें त्यांच्यामध्यें नानी गोपाळ हा बंगाली युवक होता. त्याचें वय या सुमारास सतराअठरा वर्षें इतकेंच होतें. आपल्याला राजबंदिवान म्हणून समजण्यांत आलें पाहिजे असा त्याचा आग्रह होता व हा आग्रह मान्य होणार नाहीं, असें अधिकाऱ्यांनीं त्याला अगदीं निक्षून सांगितलें होतें. त्यानें काम नाकारल्यामुळें त्याला शिक्षांमागून शिक्षा सांगण्यांत येऊं लागल्या. पण, आपल्या सोशीकपणानें व सत्याग्रही वृत्तीनें नानी गोपाळनें सर्व शिक्षांची धार बोथट बनवून टाकली! १८ व २५ जुलै १९१३ च्या 'इंडिया' पत्रांत प्रसिद्ध झालेल्या माहितीच्या आधारें दि. १२–८–१३ च्या 'केसरी'त प्रसिद्ध झालेली पुढील हकीकत नानी गोपाळचीच आहे.

*गेल्या सालच्या पावसाळ्यांत अंदमानांतील सर्व कैद्यांनीं संप करून काम करण्याचें नाकारलें. तेव्हां अंदमानच्या चीफ कमिशनरनें त्यांची दाद घेण्याचें*

*वचन दिलें व हिंदुस्थान सरकारचा हुकूम येईपर्यंत संप मोडा असें त्यांस सांगितलें. त्याप्रमाणें कांहीं वागले; पण, इतर संप मोडीनात. तेव्हां शिक्षा म्हणून त्यांच्या हातांत बेडया व पायांत साखळदंड घालण्यांत आले व गोणपाटांचे कपडे, अंधारकोठडी व कमी दर्जाचें अन्न देण्यांत आलें. यावर मेडिकल ऑफिसरनें तक्रारी ऐकून रिपोर्ट केला. तेव्हां हिंदुस्थान सरकारनें उत्तर पाठविलें कीं, या कैद्यांस राजकीय कैदी किंवा पहिल्या वर्गाचे गुन्हेगार मानून त्या सवलतीनें वागविण्यास आम्ही तयार नाहीं. यानंतर एक तरुण कैदी इतका हट्टास पेटला कीं, त्यानें ७२ दिवस अन्नपाणी वर्जिलें. अधिकाऱ्यांनीं जबरीनें त्याच्या नाकांतून त्याच्या पोटांत अन्न घातलें. त्याचा नेहमींचा तुरुंगी पोषाख काढून घेऊन त्यास गोणपाटाचा पोषाख घालावयास दिला; पण, तो न घालतां तो नागड उघडाच राहिला. तेव्हां त्यास उभ्या हातकडया घालण्यांत आल्या व असेर त्याची कैदहि एक वर्षानें वाढविण्यांत आली.*

नानी गोपाळला वेत मारण्याचें ठरवून बारीन आपला बेत सावरकरांना मुद्दामच सांगितला. तेव्हां सावरकरांनीं त्याला बजाविलें[1] त्या मुलास तुम्हीं वेत माराल तर आजपर्यंत कधींहि बिथरले नाहींत असे राजबंदी बिथरून जातील.... जर असाधारण शिक्षा दिल्या गेल्या आणि रक्त सांडलें तर रक्त सांडण्यास ते कमी करणार नाहींत. नानी गोपाळला वेत मारण्याची सगळी तयारी झाली; पण, त्याच्या त्या वेळच्या अवस्थेंत त्या शिक्षेची जबाबदारी घेण्यास कोणताहि अधिकारी तयार होईना; म्हणून शेवटीं ही शिक्षा रद्द होऊन नानी गोपाळला बाहेरच्या एका जिल्ह्यांतल्या जुन्या तुरुंगांत धाडून देण्यांत आलें. नानी गोपाळच्या शौर्यावर मिर्झाखानसारखे पठाण अधिकारीहि त्या काळीं किती खुष झालेले होते, हें सावरकर व मिर्झाखान यांच्यामधील पुढील संवादावरून[2] सिद्ध होत आहे :

*' माझ्या कोठडीकडे येऊन एकांतांत, अगदीं राहवेना म्हणून, मिर्झाखान अर्थात् छोटा बारी म्हणाला : ' बडे बाबू, ए लडका नानी गोपाळ तुमारा सच्चा शिष्य है...त्याचें धाडस हिंदूस शोभत नाहीं; एखाद्या पठाणाच्या मुलासारखा तो आहे.' मी म्हटलें : ' बडे जमादार, तुम्ही चुकतां. तुमचे वडील पठाण होते. मग, तुमच्यासारखा जर तो पठाणाचा मुलगा असता तर, आज स्वदेशासाठीं येथें खितपत पडून बारीस कस्पटासमान न लेखतां तो तुमच्यासारखा बारीचे पाय चाटीत फिरत असता...तो हिंदु आहे म्हणूनच तो असा शूर आहे. जमादार, पठाण जातींतील बुद्धिमत्ता आणि शौर्य मीहि वाखाणतों.*

---

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. २१८-१९.
२ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. २३१.

*पण, सगळेच पठाण शूर असते आणि सगळेच हिंदू शूर नसते तर तुमचें पठाणी वा मुसलमानी राज्य हिंदू उलथून कसें टाकूं शकते?'*

नानी गोपाळचें मन वळविण्यासाठीं सावरकरांनींहि कांहीं दिवस अन्न सोडलें. अखेरीस नानी गोपाळास भेटण्याची संधि सावरकरांना देण्यांत आली. सावरकरांच्या उपदेशाचा उपयोग होऊन नानी गोपाळनें अन्नग्रहण करण्यास प्रारंभ केला. दिनांक १-१-१३ च्या सुमारास २-३ दिवस सावरकरांनीं सर्वस्वीं अन्नत्याग केला होता अशा आशयाची नोंद त्यांच्या 'History ticket' च्या उपलब्ध नकलेंत सांपडते. तिच्यावरून असें निष्पन्न होतें कीं, नानी गोपाळचें हें प्रकरण १९१३ सालच्या जानेवारी महिन्याच्या मध्यापर्यंत तरी चाललेलें असावें. या प्रकरणाची वार्ता 'इंडिया' पत्रांत जुलैच्या मध्याच्या सुमारास प्रसिद्ध झाली हें यापूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे. अंदमानांतील छळाची वार्ता बाहेर पोंचण्याला कधींकधीं किती विलंब लागत असे व अशा वार्ता धाडणें कांहीं प्रसंगीं किती धोक्याचें व कष्टाचें ठरत असेल याची अंधुकशी तरी कल्पना या तारखांच्या आधारें करतां येण्यासारखी आहे.

आपल्याला तुरुंगाबाहेर म्हणजे वसाहतींत कामासाठीं धाडण्यांत यावें ही सावरकरांची विनंति अंदमानच्या चीफ कमिशनरनें यापूर्वींच अमान्य केली होती. पण, सावरकरांनीं या प्रकरणीं अर्जावर अर्ज पाठविण्याचा तडाखा चालविला. अखेरीस सुपरिंटेंडेंटला काय वाटलें कोणास ठाऊक, त्यानें सावरकरांना बाहेर धाडण्याचा दिवस निश्चित केला व सावरकराना त्याप्रमाणें कळविलें. तो दिवस उजाडला तरीहि सावरकरांना तुरुंगांतून बाहेर काढण्यांत आलें नाहीं. सुपरिंटेंडेंटशीं भेट झाली तेव्हां त्यांना असें सांगण्यांत आलें कीं, अंदमानचा चीफ कमिशनर रंगूनला गेला आहे तो परत आल्यावर या प्रश्नाचा काय तो निकाल सांगण्यांत येईल. रंगून येथील मुक्कामांत चीफ कमिशनरनें ब्रह्मदेशच्या लेफ्टनंट गव्हर्नरची भेट घेतली व त्यानंतर चीफ कमिशनर अंदमानला परत आला. तो परत आला तरीहि सावरकरांना बाहेर धाडण्यांत आलें नाहींच. उलट, एके दिवशीं अचानकपणें बाहेर धाडण्यांत आलेल्या राजबंद्यांचीच सरसहा धरपकड सुरू झाली! राजबंदिवानांनीं बाँबगोळे तयार केले असून त्यांनीं अंदमानमधून निघून जाण्याचा गुप्त कट रचला, आहे अशी माहिती 'लाल मोहन' नांवाच्या एका बंदिवानानेंच अधिकाऱ्यांना पुरविल्यामुळें ही धरपकड करण्यांत आली होती. यामुळें सावरकरांना बाहेर धाडण्याचा प्रश्न मागें पडला.

अंदमानची व्यवस्था, तेथील बंदिवानांची परिस्थिति, तेथील राजबंदिवानांनीं उपस्थित केलेल्या भानगडी, इत्यादि गोष्टींमुळें हिंदुस्थान सरकारला अंदमान या विषयानें अलीकडे बरेंच अस्वस्थ केलें होतें. या अस्वस्थतेचा एक परिणाम असा झाला कीं, त्या वेळचे हिंदुस्थान सरकारचे गृहमंत्री सर रेजिनाल्ड क्रॅडॉक यांनीं सर्व परिस्थिति समक्ष पाहाण्यासाठीं अंदमानला जाण्याचें ठरविलें. १९१३ सालच्या

नोव्हेंबर महिन्याच्या मध्याच्या सुमारास गृहमंत्र्यांची स्वारी अंदमानला पोंचली. तेथील त्यांच्या मुक्कामांत अनेक राजबंदिवानांनीं बारीविरुद्ध तक्रारी केल्या. या सर्व तक्रारी खोट्या असल्याचें बारीनें सरसाहेबांना सांगितलें. तेव्हां, एका राजबंदिवानानें (Men tell lies; circumstances do not) माणसें खोटें बोलूं शकतात; परिस्थिति मात्र खोटें बोलू शकत नाहीं, या सूत्राचा उपयोग करण्याचें ठरविलें. कोठडींत कोंडून टाकलेल्या बंदिवानांना मलमूत्राचा अवरोध करण्याचे प्रसंग वारंवार कसे सहन करावे लागतात व हे प्रसंग असह्य झाले म्हणजे बंदिवानांना कोठड्यांच्या भिंती खराब करण्यावांचून गत्यंतरच कसें उरत नाहीं, हें या बंदिवानानें क्रॅडॉकसाहेबांना सप्रमाण दाखवून दिलें !

सावरकर व सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक यांची भेट दि. १६-११-१३रोजीं झाली. क्रॅडॉकसाहेबानीं या भेटींत सावरकरांच्या श्रेष्ठ बुद्धिमत्तेची स्तुति केली. हरदयाळप्रभृति क्रांतिकारक अद्याप सावरकरांना विसरलेले नाहींत, अद्यापहि ते क्रांतिकारक रणगर्जना करीत आहेत आणि हिंदुस्थानांत व अमेरिकेंत त्यांनीं अद्यापहि क्रांतिकारक चळवळी चालू ठेवलेल्या आहेत ही माहिती सरसाहेबांच्या बोलण्यांतूनच निघाल्यामुळें सावरकरांना समाधान वाटलें. आपल्या पूर्वसहकाऱ्यांनीं क्रांतिकारक मार्ग सोडून शांततेच्या मार्गानें जावें असा उपदेश सावरकर त्यांना करणार असतील तर तशा आशयाचें पत्र टाकण्याची परवानगी त्यांना देण्यांत येईल, असें सरसाहेब म्हणाले. तेव्हां सरसाहेब व सावरकर यांच्यामध्यें पुढील संभाषण झालें :

सावरकर :—पत्र मी मोठ्या आनंदानें टाकीन; परंतु, तें मजकडून त्यांस स्वतंत्रपणें गेलें तर त्याचा उपयोग !

सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक :—आमच्या हातून तें पत्र गेलें पाहिजे.

सावरकर :—त्यायोगें त्यांस मी तें पत्र सरकारी दाबानें टाकलें, असें नाहीं का वाटणार ?

क्रॅडॉक :—तसें आम्हांस करतां येणार नाहीं.

सावरकर :—मग सरकारी हातांतून पत्र टाकण्यांत कांहीं अर्थ आहे असें मला वाटत नाहीं.

राजबंदीवानांच्या तक्रारी ऐकून गृहमंत्री परत गेले खरे; पण त्या तक्रारींचा परिहार करण्यांत आला नाहीं. त्यामुळें बारीसाहेब व त्याचे यमदूत यांना जास्तच फावलें. यामुळें १९१३ सालच्या डिसेंबर महिन्याच्या सुमारास राजबंदिवानांनीं फिरून संप पुकारला. सावरकरांचें घरचें पत्र येण्याची वेळ झालेली होती. पत्र मिळालें कीं, मी संपांत सामील होईन असें सावरकरांनीं सांगितलें होतें. पत्र आलें तरी तें सावरकरांना देण्याला अधिकाऱ्यांनीं हरकत घेतली. या पत्रांत (डॉ.) सावरकर यांनीं घरगुती गोष्टींशिवाय कांहीं राजकीय स्वरूपाच्या गोष्टींचा उल्लेख केला असावा, असें दिसतें. नाशिक–कटाच्या खटल्यांतील सखाराम दाजी गोरे दि. १२–२–११

रोजीं उमरखाडी येथील तुरुंगांत मरण पावले होते; ही वार्ता या पत्रांत असावी. १९१२ सालच्या पावसाळ्यांत झालेल्या चर्चेच्या वेळीं मि. केर हार्डी यांनीं पार्लमेंटमध्यें सावरकरांसारखे हिंदी क्रांतिकारक व आयरिश क्रांतिकारक यांची तुलना केली होती व सावरकरांना देण्यांत आलेली शिक्षा रानटी आहे असा शेरा मारला होता. या चर्चेचाहि उल्लेख पत्रांत केलेला होता. या कारणांमुळें अधिकाऱ्यांनीं सावरकरांच्या घरचें पत्र त्यांना देण्याची टाळाटाळ चालविली. त्याबरोबर सावरकर संपांत सामील झाले. दि. १७–१२–१३ रोजीं त्यांना एक महिना एकांत कोठडीची शिक्षा सांगण्यांत आली व त्यांच्याजवळचीं पुस्तकेंहि काढून घेण्यांत आलीं. ही शिक्षा भोगल्यावर त्यांना फिरून सात क्रमांकाच्या चाळींत ठेवण्यांत आलें व दोरखंडें वळण्याचें काम त्यांना देण्यांत आलें. हा संप चालू होता त्या अवधींत सावरकरांना हातकडीची शिक्षा, दंडाबेडीची शिक्षा वगैरे अनेक शिक्षा भोगाव्या लागल्या. १९१४सालीं ऑगस्टमध्यें गेलें महायुद्ध सुरू झालें तोंपर्यंत संप, शिक्षासत्र वगैरे भानगडी अंदमानांत चाललेल्याच होत्या. अखेरीस सरकारनें राजबंदिवानांच्या कांहीं मागण्या मान्य केल्या तेव्हां हा संप संपविण्यांत आला. मान्य झालेल्या या गोष्टी पुढीलप्रमाणें[1] होत्या.

( १ ) ज्या राजबंदिवानांना जन्मठेपीची शिक्षा नसेल—ज्यांना निश्चित मुदतीची शिक्षा झालेली असेल—त्यांना हिंदुस्थानांतल्या तुरुंगांत धाडण्यांत येईल व तेथें त्यांना रीतीप्रमाणें शिक्षेची सूट वगैरे सवलती मिळत जातील.

( २ ) जन्मठेपीच्या राजबंदिवानांना चौदा वर्षें तुरुंगांत ठेवण्यांत येईल. त्यानंतर, त्यांची वर्तणूक समाधानकारक असल्यास, त्यांना बाहेर वसाहतींत मोकळें सोडण्यांत येईल. तेथें त्यांना श्रम करावे लागणार नाहींत.

( ३ ) तुरुंगांत राहण्याच्या मुदतींत त्यांना वरिष्ठ दर्जाचें अन्नवस्त्र देण्यांत येईल. तुरुंगांत पांच वर्षें काढल्यावर त्यांना स्वतःचा स्वयंपाक करून खाण्याची मुभा देण्यांत येईल, मासिक खर्चासाठीं त्यांना महिना रुपयाभर देण्यांत येईल.

राजबंदीवानांची संघटना, त्यांचें ज्ञानार्जन, त्यांचें राजकीय शिक्षण इत्यादि हेतू सिद्ध करण्यासाठीं सावरकरांनीं या तीन वर्षांत ज्या गोष्टी कल्पकपणानें योजल्या, त्यांतल्या कांहीं विशेष उल्लेखनीय आहेत. चुना लावलेल्या सफेत भिंतींवर घायतांच्या कांट्यांनीं किंवा क्वचित् लोखंडी खिळींनीं लिहिण्याच्या विद्येंत सावरकर या काळांत चांगलेच तरबेज झाले होते. जवळजवळ नऊशें ओळींचें 'कमला' काव्य प्रथम या भिंतीवरच लिहिण्यांत आलें. तेथून तें स्मृतिपत्रांवर कोरून ठेवल्यावर, कित्येक दिवसांनीं अंदमानांतच तें गुपचूपपणें कागदावरहि लिहून काढण्यांत आलें. मिल–स्पेन्सरच्या प्रमुख ग्रंथांतलीं प्रमेयें, भूस्तरशास्त्रांतल्या अवघड पारिभाषिक शब्दांच्या व्याख्या वगैरे अनेक गोष्टी या भिंतींवरून लिहून काढण्याचा सावरकरांनीं

1 माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. २३२.

परिपाठ पाडला. राजबंदिवानांनीं स्थलांतर केलें व त्यांच्या कोठडया बदलल्या कीं, भित्तिपत्रावर लिहून ठेवलेलें नवेंनवें ज्ञान त्यांच्या परिचयाचें होऊं लागलें व त्यामुळें त्यांचा बौद्धिक विकास चांगल्या प्रकारें होऊं शकला. रात्रीं कोठडींत कोंडल्यावर कोठडीच्या भोंकापाशीं बसून एकमेकांचें मनोगत एकमेकांना कळविण्याचा व अशा प्रकारें सर्व राजबंदिवानांना एकविचारें भरण्याचा उपक्रम सावरकरांनीं सुरू केला. कोठड्यांतून हातपाय जखडलेल्या स्थितींत रात्रंदिवस घालविण्याचे प्रसंग उद्‌भवूं लागल्यामुळें हा मार्ग निष्फळ ठरूं लागला. तेव्हां परस्परांचे बेत परस्परांना कळावे यासाठीं एका नव्या मार्गाचें संशोधन करण्यांत आलें. बेड्यांच्या वाळ्यांतून उमटणारे आवाज आधारभूत समजून एक सांकेतिक भाषा ठरविण्यांत आली. सावरकरांनीं ही ध्वनिभाषा प्रथम इंग्रजींत निश्चित केली. त्यांच्या ज्येष्ठ बंधूंनीं या भाषेचें मागाहून देवनागरींत रूपांतर केलें.

अंदमानांत आल्यावर थोडयाच दिवसांनीं सावरकरांना असें आढळून आलें कीं, मिर्झाखान, खोयदादखां इत्यादि पठाण अधिकाऱ्यांच्या पुण्याईमुळें अल्पवयी हिंदु बंदिवान हळुहळू मुसलमान बनतात. राजबंदिवान व इतर बंदिवान या सर्वांची जेवणाची पंगत प्रायः एक होत असे. या पंक्तींत हिंदु व मुसलमान वेगवेगळे वेंचले जात असत. महिनाभर लोटला कीं एकादा हिंदु बंदिवान पूर्वींची पंगत सोडतो व मुसलमानांच्या पंक्तींत जाऊन बसतो ही गोष्ट सावरकरांच्या लक्षांत आल्यावर त्यांनीं या प्रकरणीं तपास सुरू केला. अंदमानांतले सर्व राजबंदी हिंदूच होते. त्यांना वठणीवर आणण्यासाठीं बारीनें पठाण-मुसलमानांचा भस्मासुर उभा केला होता. पण, तो भस्मासुर आपल्या नियुक्त कार्याव्यतिरिक्तहि अनेक तापदायक उद्योग करूं लागला होता. प्रत्येक पठाण अधिकारी मुसलमानी धर्माचा प्रचारक बनला होता आणि नवा बंदिवान अंदमानांत आल्यादिवसापासून त्याच्या चांचपणिला सुरुवात करून धाकदपटशा, लोभप्रलोभन इत्यादि अनेक उपायांनीं त्याला इस्लामाच्या कळपांत ओढण्याचा उद्योग पठाणांकडून शिस्तशीर रीतीनें चालविण्यांत येत होता. बारी पुष्कळशा बाबतींत या पठाणांच्या हातचें बाहुलें बनून गेलेला असल्यामुळें, नव्या व कोंवळ्या वयाच्या बंदिवानांना घेरण्याच्या उद्योगांत पठाणी अधिकाऱ्यांना चांगलेंच यश लाभत होतें.

या सर्व गोष्टी कळल्या तरी त्यांचा प्रतिकार करणें फारसें सोपें नव्हतें. स्वतः सावरकर कोठडीबंद असल्यामुळें, पठाणी लीलांवर टेहेळणी करण्याचें काम त्यांना फारसें करतां येत नसे. ज्यांच्या ठिकाणीं सार्वजनिक हितबुद्धि जागृत असावयाची ते राजबंदी स्वतःच्याच हालअपेष्टांनीं इतके जर्जर झाले होते कीं, हिंदुत्व सोडून मुसलमान बनूं पाहणाऱ्या बंदिवानांच्या भानगडींचें 'विकत श्राद्ध घेऊन सव्यापसव्य करीत बसण्याचा' उत्साहच त्यांच्या ठिकाणीं उरला नव्हता. बाहेरच्या मोकळ्या जगांत हिंदुमनाची जी ठेवण आढळते तीच ठेवण अंदमानांतल्या स्वातंत्र्य-

शून्य जगांतहि कायम असल्यामुळें, हिंदूंचा आस्थाशून्यपणाच त्यांच्या धर्मबांधवांना पठाणांच्या जाळ्यांत ढकलीत होता. केवळ मुसलमानी भटारखान्यांतलें अगर मुसलमानाच्या हातचें अन्न खाल्ल्यामुळें अगर पाणी प्याल्यामुळें मुसलमान बनलेल्या हिंदु मुलांना आपल्या पंक्तींत घेण्याला हिंदु बंदिवान तयार नसत. अशा लोकांचीं आर्जवें करून त्यांची समजूत पाडण्याचें काम सावरकरांना करावें लागे. अशा रीतीनें हिंदुत्वांत राखून ठेविलेल्या लेंकरांना, सावरकर पंक्तींत स्वतःच्या शेजारीं बसवून घेत. त्यामुळें कित्येक सोंवळे हिंदु बंदिवान सावरकरांना 'भंगीबाबू' ही पदवी अर्पण करीत ! या सर्व अडचणींना न जुमानतां सावरकरांनीं १९१३ पासून अंदमानांत शुद्धीचें कार्य सुरू केलें. हिंदु बंदिवानांना बहकाविण्याच्या उद्योगांत रंगून गेलेले पठाण आधिकारी नियमनिर्बंध वगैरे सर्व गोष्टी कशा धुडकावून लावितात हें सप्रमाण सिद्ध करून,वरिष्ठ आधिकाऱ्यांची खात्री पटवून देण्याचें काम फार अवघड होतें. पण, तेंहि सावरकरांनीं मोठ्या शिताफीनें करून दाखविलें. या कार्याचा हळुहळू बोलबाला सुरू झाला तेव्हां अंदमानांतल्या बंदिवानांत जे आर्यसमाजी होते त्यांची या कामीं सावरकरांना चांगली मदत मिळूं लागली. बंदिजनांतले जे गुंड व आडदांड म्हणून ओळखले जात असत त्यांना या कार्याची महती हळुहळू पटूं लागल्यामुळें, मुसलमानी गुंडगिरीला तोंड देण्याचें व हिंदूंना हिंदुधर्मांत कायम राखण्याचें काम त्यांच्यामार्फतहि चांगल्या प्रकारें होऊं लागलें. गणेशपंत सावरकरहि या शुद्धिकार्याविषयीं फार आस्था दाखवीत असत. गणेशपंतांची ही आस्था त्यांना एकदां खूपच भोंवली ! त्यांच्या शुद्धिकार्यविषयक चळवळीमुळें चवताळलेल्या कल्लू नांवाच्या एका मुसलमानी बंदिवानानें ते गैरसावध असतांना त्यांच्या डोक्यावर कटोरा फेंकून मारला ! यामुळें गणेशपंत पुष्कळ दिवस आजारी होते !

महायुद्ध सुरू होईपर्यंतच्या तीन सव्वातीन वर्षांच्या अवधींत सावरकरांना आपल्या धाकट्या भावाला आणखी एक पत्र धाडण्याची संधि मिळाली. दि. १५-२-१४ रोजीं लिहिण्यांत आलेल्या या पत्राच्या प्रती पॅरिसमधील मादाम कामाप्रभृति मंडळींकडे रवाना झाल्या असल्या पाहिजेत, असें बॅ. असफअल्लींनीं 'फॉरवर्ड' पत्रांत प्रसिद्ध केलेल्या आठवणींतल्या एका वाक्यावरून[1] दिसतें. हें सर्व पत्र अत्यंत हृदयविदारक आहे असें असफअल्लींनीं मान्य केलें आहे. तुरुंगांतल्या माणसाला घरच्या माणसांना पत्र धाडणें व घरच्या माणसांकडून आलेलें पत्र वाचणें या गोष्टी किती आल्हाददायक वाटतात हें सांगतांना सावरकर लिहितात :

> Only those who have been in a jail can fully appreciate what a soul—entrancing blessing it is to hear from home, to write to home. Sweet-Sweet, something like the sweetness of conversation in the moonlight by the seabeach with one who loves and adores.

( घरच्या माणसांना पत्र धाडण्यांत व त्यांच्याकडून आलेलें पत्र वाचण्यांत

---

१ Life of Barrister Savarkar : by Chitra Gupta : P. 122.

कोणतें समाधिसौख्य सांठविलेलें आहे, हें तुरुंगाचा अनुभव असलेल्या माणसालाच पूर्णांशानें कळूं शकेल ! या अनुभवाच्या आनंदाची गोडी काय वर्णावी ! चांदण्या रात्रीं समुद्रकिनाऱ्यावर बसणें हें सुखावह असतेंच ! पण, अशा वेळीं आपल्या प्रेमादराला पात्र ठरलेल्या माणसाचा सहवासहि लाभला तर त्या सुखाची गोडी अधिकच खुलते ! पत्र धाडण्याचा व पत्र येण्याच्या आनंदाची गोडीहि तशाच प्रकारची आहे. ) आपल्या अरुंद कोठडींतून दिसणारा आकाशाचा तोकडा भाग आकाशांत मिसळणाऱ्या रंगाची लीला, मनांत उद्भवणाऱ्या तात्त्विक विचारांचें काहूर, आत्मनिरीक्षणांत गढून गेलेल्या मनांत चालणारें विचारांचें द्वंद्व व या सर्वांतून निभावून गेलेल्या मनाला फिरून वाटणारा उत्साह इत्यादींचें वर्णन मूळ इंग्रजींतून वाचण्याच्या योग्यतेचें आहे.

आपल्या प्रिय पत्नीला व पूज्य वहिनींना आशा वाटावी म्हणून कांहीं गोष्टी सांगितल्यावर सावरकरांनीं या पत्रांत त्यांचे पूर्व सहकारी व स्नेही कै० सखारामपंत गोरे यांना स्मृतिसुमनें वाहिलीं आहेत. सर्व आप्तेष्टांना प्रणाम लिहिल्यावर मादाम कामा यांना उद्देशून सावरकरांनीं जीं वाक्यें लिहिलीं आहेत, तीं कृतज्ञताबुद्धि व आस्था यांनीं ओथंबलेलीं आहेत. मागील खेपेस आपल्याला धाडण्यांत आलेल्या पुस्तकांचें वर्णन करण्याच्या ओघांत सावरकरांनीं ‘ भारत गौरव ग्रंथमाले ’ चा गौरवपर उल्लेख केला आहे. या वर्णनाच्या ओघांत सावरकरांनीं वेदांताबद्दलचे जे उद्गार काढिले आहेत[1] ते संस्मरणीय आहेत :

The Americans need Vedanta philosophy and so does England; for they have developed their life to that fulness, richness and manliness–to Kshatriyahood and so stand on the threshold of that Brahminhood wherein alone the capacity to read and realise such philosophy can co-exist. But India has not. We are at present all Shudras and cannot claim access to the Vedas and Vedanta.

That is the underlying idea why Shudras were not allowed to read the Vedas; not, certainly not, for cruelty nor for narrow or vested interests···otherwise, Puranas would not have been written by the very Brahmins, expounding the same philosophy more lucidly. We, as a nation are unfit for these sublime thoughts, for it is well known that Bajirao II was a great Vedantist and that is why perhaps he could not see the difference between a kingdom and a pension.

( अमेरिकेला व इंग्लंडलाहि वेदांत तत्त्वज्ञानाची जरूरी आहे. क्षत्रियत्व या शब्दांत पूर्णता, संपन्नता व पौरुष इत्यादि विशेषांचा अंतर्भाव होतो. त्या विशेषां-पर्यंत या दोन देशांचें जीवन विकसित झालें आहे, व हीं राष्ट्रें आतां ब्राह्मण्याच्या उंबरठ्यापाशीं येऊन पोंचलीं आहेत. हा जीवनविकास व वेदांत-तत्त्वज्ञान वाच-ण्याची व कृतींत उतरविण्याची पात्रता या गोष्टींचें साहचर्य आहे. हिंदुस्थानांतला

---

[1] An Echo from Andamans : Pp. 24–25.

जीवनविकासच या मर्यादेपर्यंत झालेला नाहीं. सध्यां आपण सारे शूद्र आहों; वेद व वेदांत यांमध्यें प्रवेश व्हावा, ही मागणी करण्याचा आपल्याला अधिकारच नाहीं.

शूद्रांनीं वेदाध्ययन करूं नये या निर्बंधाच्या मुळांत ही कल्पना दडून बसलेली आहे. कृपणपणामुळे, संकुचित स्वार्थामुळें किंवा स्थिरावलेल्या हितसंबंधांचें संगोपन करण्याच्या हेतूनें हे निर्बंध निश्चितच निर्माण करण्यांत आलेले नाहींत. तशी बुद्धि असती तर, वेदान्त तत्त्वज्ञानाचेंच जास्त रसाळपणानें स्पष्टीकरण करणारीं पुराणें त्याच ब्राह्मणांनीं कशाला रचलीं असतीं ? या उदात्त विचारांच्या ग्रहणाला आपण राष्ट्र म्हणून अपात्र आहों. दुसरे बाजीरावसाहेब पेशवे हे मोठे वेदान्ती होते ही गोष्ट प्रसिद्ध आहे. राज्य व निवृत्तिवेतन यांमधील फरक त्यांच्या लक्षांत आला नाहीं याचें कारण कदाचित् त्यांचा हा वेदान्तीपणाच असेल ! )

अंदमानांतल्या वास्तव्यांत सावरकरांनीं जी कविता रचिली तिच्यापैकीं 'कमला' हें मुद्रित झालेलें दीर्घकाव्य या काळांतलें आहे. या दीर्घ काव्याव्यतिरिक्त त्यांनीं या काळांत 'बेडी' 'कोठडी' 'कोलू' 'सायंघंटा' वगैरे चुटकेवजा कविता आणि 'चांदोबा चांदोबा भागलास कां' ही गंमतीदार कविता अशा कविता लिहिल्या. पायांतल्या असह्य बेडीला उजळा देत बसलेल्या एका बंदिवानाला कवीनें प्रश्न विचारला : जी बेडी तुला तिरस्करणीय वाटावी ती बेडी एखाद्या बहुमोल दागिन्याप्रमाणें तूं उजळीत बसला आहेस या तुझ्या वेडगळ हौसेला म्हणावें तरी काय ! यावर त्या बंदिवानानें उत्तर दिलें: जोंवर ही बेडी तुटत नाहीं तोंवर तिच्या स्वच्छतेकडे लक्ष पुरविणें प्राप्तच आहे. कारण, तसें न केलें तर ही बेडी गंजते व मग ती पायाला जास्त अपाय करूं लागते. मनुष्य आपल्या इच्छेनुसार विधिनिषेधांची बेडी बनवितो व ती स्वच्छ राखण्यासाठीं कष्ट करतो असें या कवितेच्या शेवटीं सुचविण्यांत आलेलें आहे. आपल्या कोठडीच्या मातीच्या भिंती लिंपीत बसलेल्या एका बंदिजनाचा दुसऱ्या एका पृच्छकाशीं झालेला संवाद हा दुसऱ्या कवितेचा वर्ण्यविषय आहे. या मातीच्या भिंती फोडून मी बाहेर पडलों तरी पलीकडे दगडी तट आहे, तो तटाहि मी धुळीला मिळविला तरी पलीकडे क्षितिजाचें बंधन आहे; त्याहि बंधनाच्या पलीकडे असलेल्या मुक्ततेच्या प्राप्तीसाठीं तळमळणारा जीव हंसू असूंच्या झोंपाळ्यावर झुलत आहे व या झोंपाळ्याला बसणाऱ्या झोक्यामुळें, कल्पनेला ज्ञेयाज्ञेयाच्या सीमाप्रांतावर असलेल्या गोष्टींचें दर्शन घडत आहे. हा झोंपाळा ज्या अफाट दालनांत बांधला गेला आहे त्या दालनाला आकाशरूपी छत लावलेलें असून त्या छताला विश्वकर्म्यानें नानाविध रंग दिलेले आहेत; मीपणाच्या हलक्यांनीं हा झोंपाळा छतांत अडकवून टाकलेला आहे, इत्यादि विशाल कल्पना व तात्त्विक विवेचनपर विचार या कवितांत आढळतात.

चांदोबा चांदोबा भागलास का ही कविता फार हृदयंगम आहे. ज्या अंद-

मानी कारागृहाच्या कठोर कोठडयांत जिवांची कण्हणी व चित्तांची झुरणी या-व्यतिरिक्त कशाचेंच दर्शन प्राय: होत नव्हतें, कालगणनेची साधनें म्हणून निर्माण झालेले दिन, मास, संवत्सर इत्यादींचेंहि ज्या ठिकाणीं विस्मरण होत होतें, त्या कारावासाच्या कोठडींत पडलेल्या कवीला एका रात्रीं अचानकपणें चंद्राची कोर दिसली :

टाकुनि कांबळि मी अपुली, टाकित अंगा तैं दिसली ।
समोरची नभिं मज देखा, चमकत चिमुकलि शशिलेखा
'शशिलेखा रे शशिलेखा' माववुं शकुनि न त्या हरिखा ।
टाळी वाजवुनि मीच मशीं, कथिली वार्ता अद्‌भुतशी ॥

चंद्रकोरीचें दर्शन झाल्यामुळें आनंदांत निमग्न झालेल्या कवीच्या मनांत कल्पना कशा गर्दीगर्दीनें उसळूं लागल्या याचें पुढील वर्णन सुंदर आहे :

आनंदाचा पूर परी, मधेंचि बुडवित ती सारी ।
बोलाचाली नेइ मला, उंच उंच त्या उंच स्थला ॥
पुरांत मिसळति पूर जिथें, नीलांचे आणि अनिळांचे ।
मधुर स्मृतीचे-विस्मृतिचे, मोदांचे आणि कौमुदिचे ।
पोळयांतुनि त्या मधमाशा, लघु-लघु नीडीं निज जैशा ॥
गोड कल्पना तशा तदा आनंदाचा मध खातां ।
मम मस्तिष्कीं शत गाणीं, गुणगुणती मंजुळवाणी ॥

डोक्यांत कल्पना भिरभिरूं लागतांच कवीला बालपणीं ऐकलेलें 'चांदोबा चांदोबा भागलास कां' हें जानपदगीत आठवलें व त्या जानपदगीताशीं निगडित झालेलीं कवीच्या बालपणांतलीं मनोहर दृश्यें त्याच्या चित्तचक्षूंपुढें चमकूं लागलीं. या दृश्यांचें वर्णन कवीनें पुढील शब्दांत केलें आहे.

बालपण जिथें मम जातें, जुन्या घराचें अमुच्या तें ।
अंगण सुंदर ज्यामाजी खेळवि बाळा त्या आजी ॥
तिथें शामला आमलकी जी साजे तत्तलींच कीं ।
भावंडें अम्हि सकल बसूं कधीं हंसूं वा कधीं रुसूं ॥
चौकाच्या त्या पूर्वदिशे ललित लिंबुणी जी विलसे ।
डुलत्या पालवींतुनी तिच्या तरंगांत कीं लघु नदिच्या ॥
होति त्याहुनी लांब अशी, दिसली एका सांजेशी ।
धार वाहत्या चांदीची तशी कोर नव चंद्राची ॥
सहसाची तैं गात उठूं टाळी बालें अम्ही पिटूं ।
चांदोबा चांदोबा भागलास का लिंबुणिच्या झाडाखालिं
लपलास का ॥
लिंबुणिचें झाड करवंदी । मामाचा वाडा चिरेबंदी ।

या गीताच्या स्मृतीबरोबर मामांच्या वाड्याचें स्मरण ताजेंतवानें झालें व त्या-मुळें कवीला आपल्या आजोळच्या प्रेमळ मंडळींचें स्मरण झालें. लहानपणीं आजोळीं झालेल्या लाडांचें स्मरण होऊन कवीनें पुढील उद्गार काढले आहेत :

आजोळींच्या लाडांचा लीलांचा आणि लोभांचा ॥
अस्फुटसा स्मृतिपुंज मनीं कुठुनि तरी परि विमोहुनी ।
फुलझेला कीं लपलेला तसा न दिसतां दरवळला ॥
चांदण्याचिया त्या पाना पीत मीतिच्या आणि ताना ।
मनःपटीं त्या मधुमंत्रें चमकत चलती स्मृतिचित्रें ॥
होत तया आणि बघत तया रंगुनियां आणि गुंगुनियां ।
पुनःपुन्हा गे लुटित सुखा, गायी चांदोबा भागलास का ? ॥

बालपणच्या या विविध स्मृतींना सौंदर्य आणणारी एक अस्फुट, अव्यक्त स्मृति मनांत जागृत होऊन कवि लिहितो :

कैशोरी जी मनामधीं सौंदर्याच्या चढुन रथीं— ।
तिची असावी गमे स्मृती, तिचीच, हो हो तिचीच ! ती ॥
जिनें चोरुनी तदा मला च दण्यांत तैं चुंबियला ।
जें ती गायी येउनि जा । मामाच्या वाड्यांत येउनि जा ॥
मामाच्या वाड्यांत येउनि जा । तूपरोटी खाउनि जा ।
गात तोंच मी चरण नवें । जें तिजही जमलेंच हवें ॥
लावुनी—स्मरे ते न जरी, चंद्रासी वा तिला परी— ।
गायी चांदोबा येउनि जा तूपरोटी खाउनि जा ॥

या किशोरीनें त्या वयांत घेतलेलें कवीचें चुंबन व कोंवळ्या चंद्राची कोर यांचें स्मरण आपल्या मनांत साहचर्य करून राहिलें आहे असें सांगून, स्वतःच्या बाल-पणच्या स्मृतींवर अधिष्ठित झालेली ही कविता सावरकरांनीं पुरी केली आहे.

या अवधींत लिहिलें गेलेलें 'कमला' हें दीर्घकाव्य अनुष्टुभ् वृत्तांत लिहिण्याचें सावरकरांनीं योजल्यावर वृत्ताचीं लक्षणें ठरविण्यापासून प्रत्येक बारीक सारीक बाब-तींत त्यांना किती अडचणी सोसाव्या लागल्या याचें दिग्दर्शन याच प्रकरणांत या-पूर्वीं करण्यांत आलेलें आहे. सावरकरांच्या मनांत पानपतच्या कालांतलि एका कथा-नकाच्या आधारें एक महाकाव्य रचण्याचा विचार घोळत होता. 'कमला' हें काव्य त्या संकल्पित महाकाव्याचा एक भाग म्हणून लिहिलेलें आहे. १९२२ सालीं हें काव्य प्रथम प्रसिद्ध झालें त्या वेळीं सावरकर हे रत्नागिरीच्या तुरुंगांत खितपत पडलेले होते. हें काव्य तुरुंगांतून कारागृहाच्या निर्बंधांकडे दुर्लक्ष करून बाहेर धाड-ण्यांत आलेलें असल्यामुळें तें प्रथम प्रसिद्ध झालें तेव्हां कवीचें नांव 'विजनवासी' असें जाहीर करण्यांत आलें होतें. अशाही परिस्थितींत या काव्यानें अनेकांच्या

हृदयाला चटका लावून टाकला. पुढें जेव्हां या काव्याचा कर्ता कोण हें लोकांना कळलें तेव्हां तर रसिकांनीं या काव्याचें चांगलेंच कौतुक केलें. बंदिशाला एरवीं कितीहि अप्रिय असली तरी, मराठी सारस्वताचीं कित्येक भूषणें बंदिशालेंतच निर्माण झालेलीं असल्यामुळें बंदिशाला धन्य ठरते असें सुचवितांना प्रो. वा. भा. पाठक यांनीं 'आशागीत' या आपल्या कवितासंग्रहांत पुढील चरण लिहिले आहेत :

गीतारहस्य बाला । कमला विनायकाला ।।
दे स्फूर्ति गावयाला । ती धन्य बंदिशाला ।।

नागपुर प्रांतींचे एक लोकप्रिय कवि कै. श्रीनिवास रामचंद्र बोबडे यांनीं या कवितेचें कवितात्मक रसग्रहण लिहिलें आहे.[१] हें रसग्रहण लिहितांना कै. बोबडे यांनीं 'कमला' काव्यांतील सुंदर स्थलें जशींच्या तशीं उद्धृत केलीं आहेत. 'कमला' काव्याचें पहिलें अनुष्टुभ्

फूलबाग किती शोभे लहान नटवी, करी ।
नटुनी थटुनी नाना नखरे वरचे वरी ।।

असें आहे. कै. बोबडे यांनीं लिहिलेल्या कवितेचें पहिलें अनुष्टुभ्

कमला ही किती शोभे लहान नटवी, करी ।
नटुनी थटुनी नाना नखरे वरचे वरी ।।

असें आहे. 'कमला' काव्याच्या आरंभीं बागेचें सुंदर वर्णन आलेलें आहे. त्यांतील कांहीं भाग व बोबडे यांच्या कवितेंतील तत्सदृश भाग यांची एकरूपताहि सहज लक्षांत येण्यासारखी आहे.[२] मागें पडलेल्या अनुष्टुभ छंदांत कवीनें हें

---

१ 'प्रतिभा' : दि. १५-१-३६.

२ नौकेंत कौमुदीच्या ही नटली कितिदां तरी ।
बाग योजनगंधा त्या वनदेव-पराशरीं ।।
मांडवी ही प्रवेशाची जाईनें विणिली जिला ।
फुलें हीं हंसरीं ये त्या आदरीती पलोपला ।
फुलें? अहा फुलें ना तीं उद्यानीं विहरावया ।
रात्रींत चोरुनि येतां अप्सरा धरिलें जयां ।।
नोंद त्या दिव्य पाप्यांची ठेवूं जाइवरी असे ।
चुंबनांचेचि त्यांच्या घे देवीद्वारप हे ठसे । —कमला ६-९

**बोबडे यांची रचना**

काव्यें अहा न काव्यें हीं गगनीं गीतसंपदा ।
नौकेंत कौमुदीच्याही बसुनी गात शारदा ।
नोंद त्या दिव्य गाण्याची ठेवूं पृथ्वीवरी असे ।
संगीताचेच तीच्या घे कवि काव्यांत या ठसे ।।

काव्य रचलें याबद्दलचें आपलें आदरमिश्रित आश्चर्य व्यक्त करतांना श्री. बोबडे यांनीं लिहिलेल्या

अनुष्टुभ कविश्रेष्ठा वृत्तांत रुचलें भलें ।
गुणांधत्वाहि मोठ्यांचें मोठेंच असणें बरें ॥

या ओळी मूळ 'कमला' काव्यांतल्या

धोतऱ्याचीं महादेवा फुलांत रुचलीं फुलें ।
गुणांधत्वहि मोठ्यांचें मोठेंचे असणें बरें ॥

या ओळींची आठवण करून देणाऱ्या आहेत.

अंदमानच्या अंधेरीची असह्यता धिक्कारून कवीच्या कल्पनेनें हें काव्य निर्मिलें याबद्दलचा अचंबा व्यक्त करतांना कै. बोबडे यांनीं पुढील चरण लिहिले आहेत :

आणि हे कविराया तूं शिकलास तरी कुठें ।
दिव्य ही किमया आम्हां स्वयंमन्य नरां जिथें ॥
सृष्टिच्या सहवासींहि क्षण स्फूर्ति न लाभते ।
भुयारांत तुरुंगांच्या बैसुनियां सख्या तिथें ॥
तुज जीवंत काव्याचीं रसरम्य अशीं फुलें ।
सुवासमत्त पाहोनी निर्मितां मन हें भुले ॥

हें काव्य रचणाऱ्या सावरकरांना आधुनिक मराठी कवींत आद्य महाकवीचा मान दिला पाहिजे हा अभिप्राय कै. बोबडे यांनीं पुढील चरणांत व्यक्त केला आहे :

कालेंचि ना गुणेंही जो ठरे आद्यकवी महा ।
कवींत महाराष्ट्राच्या आज त्यासम अन्य हा ॥

सावरकरांच्या अंदमानांतल्या दीर्घ व कष्टमय जीवनांतला पाहिला हप्ता येथेंच पुरा होतो. गेल्या महायुद्धकालांत सावरकरप्रभृति राजकीय बंदिवान अंदमानांत डांबून ठेवण्यांत आले होते त्यांचा व गेल्या महायुद्धाच्या पोटांत दडून राहिलेल्या कांहीं घटनांचा फार निकट संबंध असल्यामुळें, त्या सर्व घटनांचें स्पष्टीकरण एका स्वतंत्र प्रकरणांत करणेंच श्रेयस्कर ठरेल.

———

## प्रकरण १४ वें

# गेलें महायुद्ध व अंदमान

When the Berlin committee of Indian Revolutionaries headed by Lala Hardayal, Raja Mahendra pratap, Dr. Bhupendra Dutt and others negotiated with the Kaiser and planned a national insurrection in India with German assistance, the Andamans was assigned a definite place in the scheme of action. 1

( लाला हरदयाळ, राजा महेंद्र प्रताप, डॉ. भूपेंद्र दत्त, इत्यादींच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या बर्लिन येथील हिंदी क्रांतिकारकांच्या समितीनें कैसरशीं वाटाघाटी केल्या व जर्मनीच्या मदतीनें भारतांत राष्ट्रिय बंड उभारण्याची योजना ठरविली त्या वेळीं, कार्याच्या रूपरेषेंत, अंदमानला एक निश्चित स्थान देण्यांत आलें होतें. )

गेल्या महायुद्धाची सुरुवात १९१४ सालच्या ऑगस्ट महिन्याच्या प्रारंभीं झाली. हें युद्ध टळणार नाहीं हें ओळखून जर्मनीचा कैसर व त्याच्या प्रभावळींतले लोक १९०७-०८ सालापासून या युद्धाची तयारी करीत होते. कण्या घालून कोंबडीं झुंजवीत रहावें हीच इंग्रजांची शतकानुशतकांची परराष्ट्रीय नीति असल्यामुळें इंग्रज शेवटपर्यंत असें मानीत होते कीं, जर्मनीविरुद्ध युद्ध करण्याचा प्रसंग टाळतां येईल. गेल्या महायुद्धाचा निकाल कसाहि लागला असला तरी, त्या महायुद्धाची पूर्वयोजना म्हणून जर्मनीनें केलेल्या कांहीं गोष्टी लक्षांत ठेवण्यासारख्या आहेत. १९०७-०८ सालापासून हिंदुस्थानांत जी चळवळ सुरू झालेली होती तिचा फायदा आपल्याला घेतां येईल हें जर्मन मुत्सद्यांनीं ओळखलेलें होतें. १९०८-०९ सालापासून तर लंडन व पॅरिस येथील हिंदी क्रांतिकारकांचें बर्लिनमध्येंहि चांगलेंच बस्तान बसलें होतें. या ग्रंथांत यापूर्वींच्या कांहीं प्रकरणांतून ज्या कित्येक घटनांचा निर्देश करण्यांत आलेला आहे त्यांवरून हें कोणाच्याहि लक्षांत येईल कीं, बर्लिन येथील अधिकारी इंग्रजांशीं उघड दावा मांडण्याचें शक्य तोंवर टाळीत असत हें खरें असलें तरी, हिंदी क्रांतिकारकांच्या आकांक्षांना व कृतींना आंतून शक्य ती मदत करण्याचाच जर्मन अधिकाऱ्यांनीं कृतनिश्चय केलेला होता.

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें या युद्धांत शक्य तोंवर तटस्थ राहतील असा अंदाज बांधून जर्मनांनीं आपल्या कारस्थानांसाठीं अमेरिकेचा नामी उपयोग करून घेतला होता. कॅप्टन बॉईड नांवाच्या हस्तकामार्फत अमेरिकेंत धान्य वगैरे पदार्थ खरेदी करून ते जर्मनीला पुरविण्याची योजना आंखण्यांत आलेली होती व या

---

१ In Andamans, the Indian Bastille : preface : P. 12.

कामासाठीं 'हॅम्बुर्ग अमेरिका कंपनी' या नांवाची कंपनी अस्तित्वांत आलेली होती. दक्षिण अमेरिका, दक्षिण आफ्रिका, चीन, सयाम इत्यादि राष्ट्रांतल्या अधिकारी वर्गाला वश करून घेण्याच्या कामीं जर्मनीनें यश मिळविलें होतें. अशा दूरदर्शीपणानें वागणाऱ्या जर्मनीला हिंदी असंतोष म्हणजे स्वतःला अनुकूल असणारी एक संधीच असें वाटलें असलें तर आश्चर्य नाहीं. १९११ च्या अखेरी-अखेरीस बर्नहार्डी यांचें Germany and the Next War हें पुस्तक प्रसिद्ध झालें. बंगालमधील हिंदूंमध्यें क्रांतिकारक मनोवृत्तीचें बीजारोपण चांगल्या प्रमाणांत झालेलें आहे आणि इंग्लंडला जगांत जें उन्नतस्थान प्राप्त झालें आहे तें हादरविण्याच्या दृष्टीनें बंगाली लोकांच्या या मनोवृत्तीचा उपयोग करून घेतां येईल असें भविष्य बर्नहार्डींनीं आपल्या पुस्तकांत वर्तविलें होतें.[1]

हॉफमन या जर्मन ग्रंथकारानें लिहिलेलें 'इंग्रजांचा ऱ्हास' हें पुस्तक १९१४च्या मध्याच्या सुमारास प्रसिद्ध झालें होतें. या पुस्तकांत इंग्रजांविरुद्ध उठावणी करण्याची हिंदुस्थानी सैन्याला चिथावणी देण्यांत आलेली होती.[2] दि. ६-३-१९१४ रोजीं प्रसिद्ध झालेल्या Berliner Tageblatt या पत्रांत हिंदुस्थानांत पसरलेल्या गुप्त संस्थांचें वर्णन करण्यांत आलें होतें आणि अमेरिकेंतल्या कॅलिफोर्निया संस्थानांत हिंदुस्थानांत सशस्त्र क्रांति घडवून आणण्याची विशेष तयारी करण्यांत आल्याची सूचना दिलेली होती.[3] कॅलिफोर्नियांतील या चळवळीचे धागेदोरे दूरवर पसरलेले होते आणि महायुद्ध सुरू झाल्यावर कित्येक दिवसपर्यंत, या चळवळीचे सूत्रचालक लाला हरदयाळ हे हिंदी स्वातंत्र्याच्या प्रस्थापनेसाठीं जिवाचें रान करीत होते. या चळवळीचें स्वरूप वाचकांच्या नीटपणीं लक्षांत यावें म्हणून लाला हरदयाळ यांच्या मध्यंतरींच्या हालचालींचें वर्णन या ठिकाणीं करणें अवश्य आहे.

सावरकरांना अटक करण्यांत आल्यामुळें लाला हरदयाळ यांचा जीव निराशेनें ग्रस्त झाला. लालाजी १९०९ सालापासून आजारीच होते. त्यामुळें त्यांचें भावनाप्रधान मन अगोदरच उद्विग्न झालेलें होतें. सावरकरांच्या अटकेमुळें भारतीय स्वातंत्र्यप्राप्तीचे सारे व्यूह कोलमडून पडले असें त्यांना वाटूं लागलें व कांहीं दिवस तर ते ऐहिक गोष्टींकडे पाठ वळवून पारलौकिक व आध्यात्मिक गोष्टींच्या मागें लागले. पूर्वी आपण ज्या मार्गाचा अवलंब केला ते मार्ग चुकीचे होते असेंहि त्यांच्या मनानें घेतलें. १९१० सालीं जूनमध्यें राणाजींना लिहिलेल्या पुढील पत्रांत लाला हरदयाळ यांचें हें मनोगत स्पष्टपणें प्रतिबिंबित झालें आहे :

Conspiracies and secret societies cannot free India. What conspiracy was there before the French Revolution, the American Revolution, the Russian war against Napoleon,...etc ? And Ireland and Russian revo-

१ Sedition Committee Report : P. 119.

२ केसरी : १७-११-१९१४.

३ Sedition Committee Report : P. 119.

lutionaries have failed in spite of carefully organised secret societies. Why? Because, where the general level of character and spirit is high, secret societies are not needed; where it is low, they are useless!

( कट आणि गुप्त संस्था यांच्या द्वारा भारत स्वतंत्र होऊं शकणार नाहीं. फ्रेंच राज्यक्रांति, अमेरिकन राज्यक्रांति, रशियानें नेपोलियनाविरुद्ध केलेली उठावणी, ...इत्यादि घटनांपूर्वी कोणता कट करण्यांत आला होता ? आणि, अत्यंत काळजी-पूर्वकपणें बनविण्यांत आलेल्या गुप्त संस्थांचा आधार असूनहि आयर्लंड व रशिया या देशांतील क्रांतिकारक अपेशी ठरलेच ना ? असें कां व्हावें ? ज्या ठिकाणीं शील व धैर्य यांचा सर्वसामान्य दर्जा वाढलेला आहे त्या ठिकाणीं गुप्त संस्थांची आवश्यकता नसते. हा दर्जा वाढलेला नसेल तर गुप्त संस्था निरुपयोगी ठरतात!) पूर्वीचीं मतें पालटल्यामुळें लाला हरदयाळ यांनीं १९१० च्या उत्तरार्धात राजकारणसंन्यास घेतला व एक नवा धर्मपंथ स्थापण्याच्या महत्त्वाकांक्षेनें ते मार्टिनिक बेटांत जाऊन तपश्चर्या करूं लागले. लालाजी या ठिकाणीं रहात होते त्या सुमारास भाई परमानंद त्या ठिकाणीं गेले व भाईजींच्या मनधरणीचा उपयोग होऊन लालाजींनीं शेवटीं हार्वर्ड युनिव्हर्सिटींत काम करण्याचें ठरविलें. या ठिकाणची हवा लालाजींच्या प्रकृतीला न मानवल्यामुळें ते कॅलिफोर्निया संस्थानांत जाऊन राहिले. संन्यस्त वृत्तीनें राहाण्याची फिरून एकवार लहर आल्यामुळें, ते कांहीं काळ होनोलुलू बेटांत तपश्चर्येसाठीं जाऊन राहिले. पण, हीं सर्व स्थित्यंतरें पुरीं करून, १९१२ सालच्या मार्चच्या सुमारास लालाजी कॅलिफोर्निया संस्थानांत स्थैर्यानें राहण्यासाठीं आले. १९१२ सालच्या मार्च महिन्यांत त्यांनीं स्टॅनफोर्ड विद्यापीठांत संस्कृत विषयाच्या अध्यापकाचें काम पतकरलें.

या ठिकाणीं येऊन राहिल्यानंतर थोडक्याच दिवसांनीं लालाजींची चळवळी मनोवृत्ति फिरून वर डोकें काढूं लागली, असें दिसतें. दि. १४-५-१९१२ रोजीं लालाजींनीं राणा यांना लिहिलेलें पुढील पत्र त्यांच्या मनोवृत्तींत झालेला पालट सुचविणारें आहे :

We have formed here a Friends of India Association of American sympathisers with the cause. So, kindly ask Madam Cama to send me as much literature as she can spare and also, at least, two volumes of Savarkar's books.

( आपल्या पक्षाबद्दल सहानुभूति बाळगणाऱ्या अमेरिकन लोकांना गोळा करून भारत-मित्र-संघ नांवाची एक संस्था आम्ही काढिली आहे. म्हणून, कामाबाईंना जेवढें प्रचार-वाङ्मय धाडतां येईल तेवढें त्यांनीं धाडून द्यावें अशी विनंति त्यांना करा. सावरकरांच्या ग्रंथाच्या निदान दोन तरी प्रती त्यांनीं मला पाठवाव्या. हळुहळू लालाजींचें मन भारतांतील क्रांतीच्या विचारांकडे फिरून वळूं लागलें होतें हें दि.८-७-१९१२ रोजीं त्यांनीं राणाजींना धाडलेल्या पुढील पत्रावरून स्पष्ट होतं

आहे. भाई परमानंद यांचा सहवास आपल्याला लाभलेला असून, त्यांच्याशीं चर्चा करून आपण पुढील बेत ठरवीत आहों असें सांगितल्यावर लालाजी लिहितात :

I am writing a book of the size of the Bhagvat Gita to be called 'The New Gita' in eighteen chapters in form of questions and answers, dealing with all matters relating to the revolution in India.

( भगवद्गीतेच्या आकाराचें एक पुस्तक मी लिहावयाला घेतलें आहे. 'अभिनव गीता' असें या पुस्तकाचें नांव असून, हें अठरा अध्यायी पुस्तक प्रश्नोत्तर स्वरूपांत लिहिण्याचें मी ठरविलें आहे. भारतीय क्रांतीसंबंधींच्या सर्व गोष्टींचें विवेचन या ग्रंथांत करण्याचा माझा मानस आहे.) दि.२६-५-१९१३ रोजीं कॅलिफोर्निया संस्थानांतील Berkeley या ठिकाणाहून राणाजींना लिहिलेल्या पत्रांतील पुढील उताऱ्यावरून असें स्पष्टपणें दिसतें कीं, या सुमारास लालाजींची चळवळ चांगली जोरानें सुरू झाली होती :

Just now I am lecturing among the Hindus near Portland. These people have invited me to come and speak to them. They also want to do something practical So, I have laid the plan of a press ( Urdu, Gurumukhi etc. ) and a House before them and our appeal has been very successful Within three months, we shall start weekly and monthly papers in Urdu and Gurumukhi, and monthly pamphlets too. I shall name the House Anandmath, the press will be named Yugantar press, the Paper will be named Gadar

(सध्यां मी पोर्टलँडच्या आसपास राहाणाऱ्या हिंदूंपुढें व्याख्यानें देत आहें. त्यांनीं निमंत्रण केल्यावरून मी आलों आहें. प्रत्यक्ष कांहीं तरी करावें अशीहि या लोकांची इच्छा आहे. म्हणून मी त्यांच्यापुढें उर्दु, गुरुमुखी वगैरे भाषांतून चालवावयाच्या वृत्तपत्रांची व एका निवासस्थानाची योजना मांडली आहे. या योजनेला त्यांनीं दिलेला पाठिंबा फार उत्साहवर्धक आहे. आणखी तीन महिन्यांच्या अवधींत आमचीं उर्दु व गुरुमुखी भाषेंतील साप्ताहिक व मासिक पत्रें निघूं लागतील. दर महिन्याला कांहीं प्रचारपत्रकेंहि आम्हांला काढतां येतील. निवासस्थानाचें नांव 'आनंदमठ' असें ठेवावयाचें, वृत्तपत्राचें नांव 'गदर' ठेवावयाचें असें ठरविलें असून, मुद्रणालयाला युगांतर हें नांव देण्यांत आलें आहे. )

लाला हरदयाळ यांनीं आपलें 'गदर' पत्र दि. १-११-१९१३ रोजीं सुरू केलें.[१] 'हिंदी वीरांनो, हत्यारें, शस्त्रें धारण करा' ही बिरुदावली या पत्रावर मुद्रित केलेली असे.[२] या पत्रांतील लिखाणाचा एकंदर सूर कशा स्वरूपाचा होता यासंबंधींचें पुढील वर्णन[3] मोठें मासलेवाईक आहे :

---

१ Sedition Committee Report : P. 168.

२ माफीचा साक्षीदार ज्वालासिंग याची साक्ष : केसरी : १८-५-१५.

३ Sedition Committee Report : Pp. 145-46.

It was of a violent anti-British nature playing on every passion which it could possibly excite, preaching murder and mutiny in every sentence and urging all Indians to go to India with the express object of committing murder, causing revolution and expelling the British Government by any and every means. It constantly preached the formation of secret associations.

(हें पत्र जहाल ब्रिटिशविरोधी स्वरूपाचें होतें. जी जी भावना प्रक्षुब्ध करणें शक्य होतें, ती ती उद्दीपित करण्याचा प्रयत्न या पत्रांत केलेला असे. खून व बंड यांचा पुरस्कार तर त्याच्या वाक्यावाक्यांतून केलेला असे. खून करण्याच्या, क्रांति घडविण्याच्या आणि शक्य त्या सर्व साधनांनीं ब्रिटिश सरकारची हकालपट्टी करण्याच्या उघड उद्देशानें भारतीयांनीं हिंदुस्थानांत परत जावें, असें या पत्रांत आग्रहपूर्वक सांगितलेलें असे. गुप्त संस्थांचें संघटन करण्याची शिकवण त्यांत वारंवार दिलेली असे.) युगांतर आश्रमांतून या पत्राव्यतिरिक्त अनेक गोष्टी प्रसिद्ध केल्या जात असत गदर-ई-गुंज हा काव्य-गुच्छ अशा प्रकाशनांपैकींच एक होता. टिळक, लियाकत हुसेन, बरकतुल्ला, सूफी, अजितसिंग, सावरकर, अरविंद घोष, कृष्णवर्मा, हरदयाळ इत्यादींच्या स्तुतीनें भरलेली एक कविता या कवनगुच्छांत छापलेली होती.[1] अशा प्रकाशनांपैकींच गदर-संदेश, इलाई जंग वगैरे पत्रकें पुढें हिंदुस्थान सरकारनें जप्त केलीं. या प्रचारकार्याला हरदयाळजींनीं दुसऱ्याहि एका प्रकारच्या प्रचाराची जोड दिली होती. अमेरिकेंत भिन्नभिन्न ठिकाणीं राहणाऱ्या हिंदु-शीखांच्या सभा करून हरदयाळजी व त्यांचे सहकारी हे व्याख्यानें देत असत व भविष्यकाळीं होणाऱ्या क्रांती-साठीं द्रव्यसहाय्य मिळवीत असत. सॅक्रेमेंटो या गांवीं दि. ३१-१२-१९१३ रोजीं झालेल्या सभेंत हरदयाळजींनीं आपल्या श्रोत्यांना अशी सूचना दिली कीं,[2] जर्मनीचें इंग्लंडबरोबर युद्ध जुंपण्याची वेळ समीप आली आहे आणि भारतांतील भावी राज्यक्रांती-साठीं भारतांत परत जाण्याची तयारी करण्याची वेळ येऊन ठेपली आहे. १९१४ च्या जानेवारी महिन्यांत कॅनडा, मेक्सिको व अमेरिकेचीं संयुक्त संस्थानें या भागांत राहणाऱ्या हिंदी लोकांची एक प्रचंड सभा भरविण्यांत आली होती.[3] हिंदुस्थानांत जाऊन बंड करण्याला सिद्ध असणाऱ्या लोकांनीं येत्या जुलैपर्यंत हिंदुस्थानांत परत जावें, असें या सभेंत सांगण्यांत आलें होतें.

लाला हरदयाळ यांच्या या प्रचाराची वार्ता हिंदुस्थान सरकारला लगोलग मिळाली होती. १९१३ सालीं सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक हे अंदमानांत गेले असतांना त्यांचा सावरकरांबरोबर जो संवाद झाला त्यांत हरदयाळजींच्या कृत्यांची माहिती त्यांच्यापर्यंत येऊन भिडली असल्याचें दिग्दर्शन झालें होतें.[4] या प्रचारामुळें भय-भीत झालेल्या हिंदुस्थान सरकारनें अमेरिकन सरकारवर दडपण आणलें व

---

१ Sedition Committee Report : P. 168.

२ Sedition Committee Report : P. 168.

३ केसरी : ३०-३-१९१५. ४ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. २२५-२६.

श्री. लाला हरदयाळ यांचें हस्ताक्षर

श्रीयुत। वंदे मातरम। आप का प्रेमपत्र मिला। जैसा मैं ने लिखा था दरवाजा न रहने के कारण मैं न मिल सका। यहां काम जिस के लिये मैं आया था बहुत अच्छी तरह हो रहा है। आशा है कि अपने देश की तरफ भी कुछ काम शुरू होगा। यहां मैं मिसरी और टरकिश देशभक्तों से मिला हूं। सब बहुत अच्छे हैं। यहां की राजनीति देख कर मन प्रसन्न हुआ। मैं काम को पूरा करके लौटूंगा। पहले नहीं आसकूंगा। अभी कुछ समय पीछे और काम यहां होगा जिस से भारतवर्ष को अत्यंत लाभ होगा। सो मेरा ठहरना जरूरी है। मगर सब कर्तव्य करने पर फिर स्विटजरलेंड ही में आऊंगा॥ अभी ऐसा ही विचार है॥ श्रीमती जी को वंदेमातरं और नमस्कार पहुंचे॥ भवदीय हरदयाल

Boite Poste Centrale 173
Stamboul (Turquie)

Bien le bonjour à vous et Mme. Shymaji.

September 22, 1914.

— Dutt

त्यामुळें अमेरिकन सरकारनें १९१४ च्या मार्च महिन्यांत लाला हरदयाळ यांना पकडून ठेवलें. ही बातमी बारीनें दुष्टपणानें सावरकरांना मुद्दाम सांगितली. तेव्हां अंदमानांत असहाय स्थितींत असलेल्या सावरकरांची स्थिति कशी झाली याविषयींचें पुढील वर्णन[1] वाचण्यासारखें आहे :

*बारीनें अगदीं गुपचुप म्हणून बातमी कळविली कीं, लाला हरदयाळजींना हत्येचे आरोपावरून धरून मुंबईस आणलें आहे. आमच्या मनांत चर्र झालें ! आमच्या सहकाऱ्यांतील प्रमुख सहकारी आणि त्या काळच्या क्रांतिकारकांचा पुढारी पकडला जाऊन त्याच्या आयुष्याचे आतां आमच्यासारखेच धिंडवडे निघावे ना ?...या विचारानें आमचें डोकें तापून गेलें. सोबतच्या राजबंदिवानांनीं पाण्याची धार धरून थोडें शांत केलें. त्यांतच पर्यवेक्षक प्रत्यहींच्या पाहणीस येऊन मला विचारता झाला : 'काय, लाला हरदयाळ तुमचा मित्र होता, हें खरें काय !' मी स्पष्टपणें सांगितलें, 'होय, त्यांच्या मैत्रीचा मान मला मिळालेला होता.' 'त्यांच्यावर हत्येच्या अपराधाचा आरोप ठेवून त्यांस पकडण्यांत आलें आहे. दिल्लीच्या बाँबमध्यें त्यांचें अंग होतें.' मी म्हटलें, 'असेल; असलें तरी त्यामुळें त्यांच्याविषयींचा माझा स्नेह वा सन्मान कमी होणार नाहीं.'*

अमेरिकन सरकारनें लालाजींना अटकेंत ठेविलें; पण, असें करण्यांत त्या सरकारचे कोणतेच हितसंबंध गुंतलेले नसल्यामुळें, लालाजी तुरुंगांतून निसटले तेव्हां अमेरिकन सरकार फारसें कावरेंबावरें झालें नाहीं! अमेरिका सोडून लालाजी युरोपांत आले त्या सुमारास महायुद्धाची सुरुवात झालेली होती. १९१४ सालच्या ऑगस्ट-सप्टेंबर महिन्यांत लालाजींनीं स्वित्झर्लंड व तुर्कस्थान या देशांत काळ काढला व तेथून ते बर्लिनला जाऊन पोंचले. दिनांक, ३०-८-१९१४ रोजीं जिनीव्हा येथून हरदयाळजींनीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना लिहिलेलें पुढील पत्र त्यांच्या मनांतलि विचारांचें दिग्दर्शन करण्याला फार उपयोगी आहे :

*और मेरा विचार जलदी टरकी जानेका है क्यों कि यहांसे अब तो कुछ प्रचार या और काम नहीं हो सकता । टरकी का रास्ता खुला है और वहाँ खरच बहुत कम है । ससता मुलुक है । सो स्वास्थ्यरक्षा अच्छी होगी और हज के लिये जो मुसलमान आते है उनमें अखबार फैलावूं गा । अमेरिका से टरकी की डाक भी खुली रहेगी ।*

जर्मनींत जाऊन जें कार्य करावयाचें त्याला अनुकूल असें वातावरण तुर्कस्थानमध्येंहि आढळल्यामुळें लालाजींनीं प्रसन्न चित्तानें दि. २२-९-१९१४ रोजीं पं. शामजी कृष्णवर्मा यांना पुढील पत्र लिहिलें :

*यहाँ काज जिसके लिये मै आया था बहुत अच्छी तरह हो रहा है । आशा है कि अपने देशकी तरफभी कुछ काम शुरू होगा । यहाँ मै मिसरी और*

---

[1] माझी जन्मठेप : उत्तरार्ध पृ. ७४.

*टाकिश देशभक्तोंसे मिला हूं । मै काम को पूरा करके लौटूं गा । पहले नहीं आसकूंगा । अभी कुछ समय पीछे और काम यहाँ होगा जिससे भारतवर्ष को अत्यंत लाभ होगा । सो मेरा ठहरना जरूरी है । मगर सब कर्तव्य करनेपर फिर स्विट्‌जरलेंडही में आऊंगा । अभी अैसाही विचार है ।*

महायुद्ध सुरू झालें त्या सुमारासच राजा महेंद्र प्रताप हे हिंदुस्थान सोडून युरोपांत गेले होते. हुतात्मा स्वामी श्रद्धानंदजी यांचा एक मुलगा हरीशचंद्र हाहि त्यांच्याबरोबर होता. राजा महेंद्र प्रताप, हरदयाळप्रभृति मंडळींच्या गांठीभेटी झाल्यावर बर्लिनमध्यें जी भारतीय स्वातंत्र्य समिति स्थापन करण्यांत आली तिचें नेतृत्व श्री. चंपकरमण पिले. यांना देण्यांत आलें होतें. हरदयाळशिवाय या समितींत असलेल्या प्रमुख भारतीयांत वीरेंद्रनाथ चट्टोपाध्याय, अबदुल हफीज, बरकतुल्ला, डॉ. प्रभाकर आणि स्वामी विवेकानंदांचे बंधू श्री. भूपेंद्र दत्त ही मंडळी होती. मुसलमानी मुलखांतून कारस्थानांची पेरणी करून पंजाब, वायव्य सरहद्द प्रांत या भागांत योग्य वेळीं उठावणी करावयाची आणि अमेरिकेच्या प्रशांत महासागराच्या लगतच्या भागांत कारस्थानें करून चीन, मलाया, इंडोचायना, ब्रह्मदेश, सयाम वगैरे भागांतून हिंदुस्थानच्या पूर्वसरहद्दीवर गडबड उडवून द्यावयाची, असा या मंडळींचा बेत होता. गेलें महायुद्ध चालू असतांना लाहोर कटाचा खटला या नांवाचे तीन खटले झाले. १९१६ च्या आरंभीं बनारस कटाचा खटला निकालांत निघाला. १९१७ सालीं मार्च-एप्रिलच्या सुमारास मंडाले येथील कटाचा खटला चालू होता. या खटल्यांतील हकीकतींवरून असें निष्पन्न होतें कीं, महायुद्धकाळांत हिंदुस्थानांतील आंग्ल सत्ता नष्ट करण्यासाटीं शेंकडों हिंदु तरुण जिवापाड कष्ट करीत होते आणि त्यांना जर्मन सरकार लक्षावधि रुपयांची मदतहि करीत होतें. हिंदी क्रांतिकारकांना हाताशीं धरून हिंदुस्थानांतल्या आंग्ल सत्तेला अस्वस्थ करण्याचे जर्मनीचे हे प्रयत्न कोणत्या थरापर्यंत जात असत याची कांहीं माहिती 'सेडिशन कमिटी रिपोर्ट' या सरकारी इतिवृत्तांतच देण्यांत आलेली आहे.[१] गेलें महायुद्ध चालू असतांना बटेव्हिया वगैरे विभागांतून मॅव्हेरिक, ॲनीलासेन वगैरे जहाजांतून हिंदी क्रांतिकारकांना शस्त्रास्त्रें

---

1 Page 161 : The Ghadr movement in the punjab. came within an ace of causing widespread bloodshed... ... Few Persons......will not be disposed to endorse the considered opinion of the Punjab authorities that, had not Government been armed with extensive Powers the Ghadr movement could not have been suppressed so rapidly.

( पंजाबांतल्या गदर आंदोलनामुळें चौफेर रक्तपात व्हावा असा प्रसंग आलाच होता; पण, तो अगदीं थोडक्यांत टळला. सरकारच्या हातीं व्यापक सत्ता नसती तर गदर आंदोलन इतक्या तांतडीनें दडपून टाकतां आलें नसतें हें पंजाब-मधील सरकारी अधिकाऱ्यांचें मत विचारपूर्वक बनविण्यांत आलेलें होतें. या मताला मान्यता देण्याला प्रवृत्त होणार नाहीं असा इसम विरळा. )

पुरविण्याचा प्रयत्न करण्यांत आला होता.[1] लुधियाना येथील गदर पार्टीच्या विद्यार्थ्यांना पाऊण लाख रायफल्स देण्याचें जर्मनीनें कबूल केलें होतें.[2] तिबेटमध्यें हत्यारें जमवून तीं पंजाबांत धाडण्याची योजना आंखण्यांत आलेली होती.[3] या सर्व विप्लव-कार्यांशीं आपल्याला या चरित्रग्रंथांत प्रत्यक्षतः कांहींहि करावयाचें नसलें तरी, जर्मनीचें पाताळयंत्र कसें फिरत होतें व त्याचा शक्य तो उपयोग करून घेण्यासाठीं हरदयाळप्रभृति क्रांतिकारक कसे झटत होते एवढें कळण्याच्या दृष्टीनें व सावरकरप्रभृति तरुणांनीं केलेल्या बीजारोपणाला कोणतें फळ आलें हें समजण्याच्या दृष्टीनें या विप्लवकार्यांचा ओझरता उल्लेख करणें अवश्य आहे.

महायुद्ध सुरू झाल्याची बातमी अंदमानांत येऊन पोंचल्याबरोबर तेथील बंदिवानांच्या मनांत भिन्नाभिन्न भावना उदय पावूं लागल्या. जर्मनी व इंग्लंड यांचें युद्ध सुरू होण्याची ही पर्वणी प्राप्त झाली असतांना आपणांवर अंदमानांत अडकून पडण्याचा प्रसंग आला हें पाहून सावरकरांना अतिशय वाईट वाटलें. हरदयाळ प्रभृति क्रांतिकारक भारताच्या स्वातंत्र्यसिद्धीसाठीं कांहीं तरी हालचाल केल्याशिवाय राहणार नाहींत असा विश्वास त्यांना वाटत होता. आणि कोणत्या प्रसंगीं कसें वागावें याविषयींचा विचार करण्यांत त्यांचें मन गढून गेलें होतें. या युद्धांत तुर्कस्थानची सहानुभूति जर्मनीकडे असल्यामुळें, भारताच्या भवितव्याच्या दृष्टीनें या घटनेचा काय परिणाम होईल, या प्रश्नाचा विचार ते मोठ्या चिंतातुर वृत्तीनें करीत असत. तुर्कस्थान इंग्रजांविरुद्ध जाऊन जर्मनीबद्दल सहानुभूति बाळगूं लागला यामुळें त्याचें महत्त्व वाढलें. अंदमानमधील मुसलमान व पठाण कैदी तुर्कस्थानच्या वाढलेल्या महत्त्वाच्या जाणिवेनें फुरफुरूं लागले होते. तुर्कस्थानच्या या धोरणामुळें हिंदुस्थानांत लौकरच इस्लामी राज्य सुरू होईल अशा सुखस्वप्नांचा आनंद उपभोगण्यांत हे मुसलमान व पठाण कैदी दंग झाले होते. वस्तुस्थितीची योग्य कल्पना देऊन त्यांचा स्वप्नाळु उन्माद उतरविण्याचें काम सावरकर यांना करावें लागे. हिंदुस्थानांत मुसलमानांचें राज्य होतांच अंदमानांतल्या फक्त मुसलमान बंदिवानांची मुक्तता होईल अशी कंडी पिकवून, पठाण व मुसलमान वॉर्डर्स कित्येक भोळ्याभावड्या हिंदु बंदिवानांना बाटविण्याचा प्रयत्न करीत. अशा खोडसाळ प्रयत्नांकडे बारकाईनें लक्ष ठेवण्याचें व असे प्रयत्न हाणून पाडण्याचें कामहि सावरकरांना करावें लागे.

महायुद्ध सुरू होण्यापूर्वी अंदमानांतील अधिकारी व राजबंदी यांच्यामधील कटकटी बऱ्याच प्रमाणांत कमी झाल्या होत्या. महायुद्ध सुरू झाल्याबरोबर अंदमानच्या संरक्षणाची विशेष व्यवस्था करण्याची योजना आंखणें अधिकाऱ्यांना अवश्य वाटूं लागलें व राजबंदिवानांना चिडविलें तर संप होतात ही गोष्ट अनुभवसिद्ध

---

१ Sedition Committee Report : Pp : 121-24.

२ लाहोर कटाच्या खटल्यांतील माफीचा साक्षीदार : केसरी : दि. १८-१-१९१६

३ केसरी, दि. १६-१-१७.

असल्यामुळें, या वर्गातील बंदिजनांना चुचकारण्याचें धोरण सुरू झालें. अधिकाऱ्यांची या प्रसंगीं इच्छा अशी असे कीं, राजबंदिवानांनीं इतर बंदिवानांवर देखरेख करावी व त्यांच्याकडून नेहमींपेक्षां अधिक काम करून घ्यावें. सावरकरांच्या बाबतींत अधिकाऱ्यांची ही इच्छा सफल झाली नाहीं.

दि. १४–९–१९१४ रोजीं सावरकर यांनीं हिंदुस्थानसरकारला एक आवेदनपत्र धाडलें. या आवेदनपत्राला हिंदुस्थान सरकारनें जें उत्तर धाडलें तें सावरकरांना दि. १–१२–१९१४ रोजीं मिळालें. सावरकरांच्या विनंतीच्या आधारें कांहीं विशिष्ट हुकूम काढण्याची सरकारची इच्छा नाहीं, असें या उत्तरांत सांगण्यांत आलेलें होतें. सावरकरांच्या आवेदनपत्रांतील सूचनांचा सद्य:परिस्थितींत विचार करतां येत नाहीं असेंहि सावरकरांना सरकारनें कळविलें होतें. हिंदुस्थान-सरकारनें ज्या आवेदनपत्राला हें उत्तर धाडलें तें आवेदनपत्र मुळांत जसें होतें तसें आज मिळण्यासारखें नसलें तरी, स्वत: सावरकरांनींच स्मरणानें लिहून ठेविलेला त्या आवेदनपत्राचा सारांश उपलब्ध आहे.[1] या विस्तृत सारांशांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :

*या महायुद्धांत हिंदुस्थानची राजकीय स्थिति सरकारास चिंता उत्पन्न करीत असणें साहाजिकच असल्यानें आणि विशेषत: हिंदुस्थानी क्रांतिकारक या युद्धांत कोणतें धोरण स्वीकारतात हें समजण्यासाठीं त्यांस उत्सुकता लागणें संभवनीय असल्यानें....माझ्यासारख्या बंदिवानाचे विचार त्यांस कळविणें मला आपलें कर्तव्य वाटत आहे. हिंदुस्थानांत स्वतंत्र राष्ट्राच्या पदवीस पोंचविणें हें आमचें ध्येय होतें आणि आहेही. तथापि त्या ध्येयाच्या सिद्धीसाठीं रक्तपाताचा सशस्त्र प्रतिकारी मार्गच काय तो अवलंबन करावयाचा अशी कांहीं आम्ही शपथ घेतलेली नाहीं. इतकेंच नव्हे तर, इतर कोणताहि उपाय जर सफल होण्याचा संभव असता तर आम्ही सशस्त्र प्रतिकाराचा अवलंब केलाच नसता. जी गोष्ट साधनांची तीच साध्याची !...उभ्या मनुजजातीचें राजकीय, सात्त्विक एकीकरण हेंच ज्यांचें अंतिम ध्येय आहे त्या आम्हांस त्या ध्येयाच्या सिद्धीसाठी तदनुकूल असलेल्या सर्व संस्था त्या ध्येयाकडे जाणाऱ्या मार्गावरील टप्पे म्हणून ग्राह्यच वाटतात. ...आज ज्यास ब्रिटिश साम्राज्य म्हटलें जात आहे त्यांत अंतर्भूत असणाऱ्या हिंदुस्थानादि देशांस जर स्वस्वप्रकृतिप्रमाण आणि तत्तत्परिस्थितिप्रमाण स्वातंत्र्य उपभोगूं देण्यांत येईल तर, आम्ही त्या साम्राज्याशीं एकनिष्ठ राहणें हेंच आमचें कर्तव्य समजूं. अशा रीतीनें आयर्लंडपासून हिंदुस्थानापर्यंत सर्व देशांस एकसूत्रीपणांत गोंवण्याचें कार्य करणारें तें साम्राज्य' ब्रिटिश साम्राज्य'*

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. ८२–८५.

*हें नांव देखील त्याज्यच मानील-इतर नांव प्राप्त होईतों त्यास 'आर्य-साम्राज्य' असें पाहिजे तर म्हणावें.*

*ह्या साम्राज्याच्या प्रस्तुत चालकांच्य अंगांत जर तसें सात्विक साहस करणारें धैर्य असेल तर तदंतर्गत असलेल्या हिंदुस्थानच्या विस्तृत आणि प्रमुख राष्ट्रास तरी त्यांनीं तें स्वातंत्र्य उपभोगितां येईल असे अधिकार त्वरित देऊन टाकले पाहिजेत. युद्धाचे धांदलींत इतर कांहीं करतां न आलें तरी, औपनिवेशीक स्वायत्तता ( Colonial self-government ) जर हिंदुस्थानास देण्यांत येईल आणि वरिष्ठ विधिमंडळांत हिंदी प्रतिनिधींचें निरपवाद बहुमत स्थापित करण्यांत येईल तर आम्ही व आमच्या मताचे क्रांतिकारक आपला पूर्वीचा सशस्त्र प्रतिकाराचा मार्ग स्थगित करून या युद्धांत इंग्लंडचा पक्ष मनःपूर्वक एकानिष्ठेनें अवलंबितील.*

*आमचें हें विधान मनःपूर्वक आहे कीं नाहीं हें सिद्ध करून दाखविण्याची संधि आम्हांस देण्यासाठीं आणि इंग्लंड खरोखरीच हिंदुस्थानच्या दास्यशृंखला तोडण्यास इच्छित आहे याविषयीं हिंदी लोकांचे मनांत विश्वास उत्पन्न करण्यासाठीं सरकारनें प्रथमतः आम्हा राजबंदिवानांसहि त्वरित मुक्त केलं पाहिजे. आम्ही असें वचन देतों कीं, जर आम्हांस या वेळीं मुक्त करण्यांत येईल तर आम्ही हिंदुस्थानावर स्वारी करून येण्याची शक्य ती खटपट करणाऱ्या अफगाण तुर्कादिक आशियांतील विदेशी मुसलमानी टोळधाडीपासून स्वदेशाचें संरक्षण करण्यासाठीं सैन्यांत भरती होऊन हिंदुस्थानच्या सीमासमरावर किंवा इतर तदनुषंगिक अशा कोणत्याहि रणक्षेत्रांत जाण्यास कचरणार नाहीं.... इतर राजबंदिवान सोडले असतां आम्हांसहि सोडण्याची पाळी येणार आणि आमच्या सुटकेनंतर आम्ही हिंदुस्थानच्या शांततेचा भंग करूं कीं नाहीं हें नक्की सांगतां येणें तर कठीण; तेव्हां राजबंदिवान वर्गासच न सोडणें बरें अशी शंका जर सरकारास येत असेल तर मी असें आनंदानें आपण होऊन सुचवितों कीं, सरकारनं मला न सोडतां अंदमानांतल्या, हिंदुस्थानांतल्या आणि बाहेर देशोदेशीं निर्वासित होऊन अटकून पडलेल्या राजबंदिवानांस तत्काळ मुक्त करावें. त्यांच्या मुक्ततेंत मला जवळ जवळ माझ्या मुक्तते-इतकाच आनंद वाटेल.*

सावरकरांनीं हें आवेदनपत्र हिंदुस्थानसरकारकडे धाडलें व हिंदुस्थानसरकारनें त्याला दिलेलें उत्तर सावरकरांना मिळालें त्या अवधींत अंदमानाबाहेरच्या जगांत ज्या अनंत घडामोडी घडत होत्या, त्यांपैकीं एकीचा परिणाम अंदमानांतील जीवनावर फार मोठ्या प्रमाणांत झाला. १९१४ सालीं सप्टेंबर महिन्याच्या सुरुवातीलाच 'एम्डेन' हें जर्मन जहाज बंगालच्या उपसागरांत धुमाकूळ घालूं लागलें. दि. १२-९-१४ रोजीं 'एम्डेन'नें या भागांत संचार करणारें ब्रिटिशांचें एक जहाज

पकडलें; पण, जहाज प्रत्यक्ष न बुडवितां त्यानें त्याला तसेंच जाऊं दिलें. याच सुमारास 'एम्डेन'नें ब्रिटिशांचीं पांच व्यापारी जहाजें बुडविलीं. दि. २२-९-१४ रोजीं 'एम्डेन'नें मद्रास शहरावर अग्निवर्षाव केला. सप्टेंबर महिन्याच्या अखेरी-पर्यंत हें जर्मन जहाज सुमात्राच्या किनाऱ्याकिनाऱ्यानें अंदमान निकोबार बेटांच्या भोंवतालच्या समुद्रभागांतून बंगालच्या उपसागरांत घिरट्या घालीत होतें. दि. ९-११-१४ रोजीं 'एम्डेन'चा अखेरीस नाश करण्यांत आला; तोंपर्यंत 'एम्डेन'चें नांव जसें हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं चर्चिलें जात होतें त्याप्रमाणेंच अंदमानचे अधिकारी व तेथील बंदिवान यांच्याकडूनहि 'एम्डेन'च्या संकल्पित हेतूंसंबंधींची भरपूर चर्चा केली जात होती.

एम्डेनच्या या हालचालींमुळें अंदमानमधील अधिकारीवर्गावर काय परिणाम झाला हें सावरकरांनीं पुढील वाक्यांत[१] वर्णिलें आहे :

*एम्डेनचा आणि एकंदर जर्मन नौसाधनाचा प्रताप ऐकून त्या मूठभर इंग्रजी दळाच्या मनांत एकदां दोनदां तरी खरोखरच भयंकर चिंता उत्पन्न झालेली होती. बंदिवान तितका वेळेवर त्यांच्यावर उलटल्यावांचून राहाणार नाहीं, ही त्यांची शंका अगदींच अस्थानीं नव्हती. त्यांतहि त्यांच्यापाशीं लढाऊ साहित्य अगदीं थोडें! समुद्रांत पडलेलें तें एक पृथ्वीचें ढेंकूळ! मूठ-भर इंग्रज-तेहि सैनिक व्यवहारांत अनभ्यस्त! जर एकादें प्रबळ जर्मन विध्वंसक किंवा रणतारी येती तर त्यांची काय कथा होती!*

एम्डेनसारखें जर्मन जहाज अंदमानभोंवतीं कोणत्या हेतूनें घुटमळत आहे याविषयींचा अचूक अंदाज सावरकरांनीं बांधला होता. अंदमानांत असलेल्या हिंदी राजबंदिवानांची मुक्तता करणें याच प्रमुख हेतूनें या साहसाचा आरंभ झालेला आहे हें सावरकरांनीं पुरतेपणीं ओळखलें होतें. जर्मनी आपल्या नौसाधनाच्या बळा-वर इंग्रजांना मेटाकुटीस आणील कीं नाहीं, याविषयीं सावरकरांचें मन त्या वेळीं कांहींसें साशंक होतें हें अगदीं खरें असले तरी, प्रसंगीं जोराचा फटकारा मारून अंदमान काबीज करण्याच्या कामीं व हिंदी क्रांतिकारकांना तेथून हलविण्याच्या कामीं जर्मनीला यश मिळूं शकेल, हीहि शक्यता सावरकरांना दिसत होती. एम्डेन-वर ज्या योजनांचे आराखडे सांपडले म्हणून म्हणतात त्या योजना व सावरकरांचा तर्क यांमध्यें बराच मेळ होता. अंदमानच्या आजूबाजूला गडबड सुरू होतांच इंग्रजांनीं तेथील बचावाची तयारी घाईघाईनें चालविली होती हें तर त्यांना प्रत्यक्षच दिसत होतें. या सर्व घडामोडी पाहून व ऐकून सावरकरांच्या मनांत जे विचार उदभवले त्यांचें वर्णन त्यांनींच पुढील शब्दांत[२] केलें आहे :

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ १००.
२ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. १०३-०४

*त्या सर्व प्रकारास विचारांत न घेतां 'कांहीं होणार नाहीं' म्हणून रडत आणि सडत पडण्याचा पंगूपणा करणें हें आम्हांस अगदीं मूर्खपणाचें आणि निकम्मीपणाचें वाटूं लागलें. हिंदी राज्यक्रांतिकारकांच्या योजनेप्रमाणें जर्मन रणतरी अंदमानावर आक्रमण करून आमची मुक्तता करण्याचा प्रयत्न करण्यास शक्य तों झटतील, हें आम्हांस संभवनीयच वाटत होतें. एक दोन वेळां तर ही गोष्ट अगदीं झाल्यासारखीच होती. कारण, जर्मनीच्या भटकणाऱ्या रणतरीनें एकदां अंदमानास जवळ जवळ असहाय स्थितींत घेरून टाकलें होतें...अशा घेरांत अंदमान निःसहाय्य होऊन कधीं शत्रूच्या हातीं पडेल हें सांगणें सोपें नव्हतें. जर अशी वेळ आलीच तर—*

*तर, ती संधि येण्यापूर्वीच त्या अपूर्व घटनेच्या प्रसंगीं कसें वागायाचें हें पूर्वीच न ठरविणें म्हणजे अजागळपणाची पराकाष्ठा झाली असती. ती संधि व्यर्थ गमाविण्याचें पातक त्या अजागळपणावर येणारें होतें.*

एम्डेनच्या हालचालींची वार्ता अंदमानांत प्रसिद्ध होऊं लागतांच एका राजबंदिवानानें बारीला असेंहि सांगितलें कीं, सावरकरांस कारागृहांतून अचानक उचलून नेण्यासाठीं जर्मनीच्या वतीनें एक विमानहि येण्याची बोलणीं चालली आहेत. या खऱ्याखोट्या वार्तांचा परिणाम असा झाला कीं, अंदमानांत सगळीकडे कडेकोट बंदोबस्त करण्यांत आला आणि जिकडेतिकडे गोऱ्या सैनिकांचें राज्य सुरू झालें. सावरकरांच्या प्रत्येक बारीकसारीक हालचालीवर सूक्ष्म नजर ठेवण्यांत येऊं लागली. सावरकरांना चाळींतून हलविण्यांत आलें व सर्व चाळींच्या मध्यभागीं असलेल्या टॉवरमध्यें वरच्या मजल्यावर बंदोबस्तानें ठेवण्यांत आलें.

एम्डेन हें जर्मनीचें जहाज अंदमानांतील क्रांतिकारकांच्या मुक्ततेसाठीं धडपडत होतें या सावरकरांच्या म्हणण्याला इतर लेखांचाहि पाठिंबा मिळत आहे. दि. १५–२–१९१५ रोजीं सिंगापूर येथें पांचव्या पायदळ पलटणींतील शिपायांनीं बंड केलें व पांच दिवस उभयपक्षीं गोळागोळी करण्यांत आल्यावर बंडखोर शिपायांना शरण जाणें भाग पडलें. हे बंडखोर शिपाई अंदमानांत धाडण्यांत आलेले आहेत अशी जर्मनीची समजूत झालेली असावी. १९१५ सालच्या शेवटीं जर्मनीनें जे प्रयत्न केले त्यांचें वर्णन Sedition Committee Report मध्यें[1] पुढीलप्रमाणें करण्यांत आलेलें आहे :

> A third steamer was to sail to the Andamans, shipping a cargo of arms at sea and raid port Blair, pick up anarchists, convicts and men of the mutinous Singapore Regiment, who it was thought, were interned there, and then proceed to Rangoon and raid it.

[ वाटेंत शस्त्रास्त्रांचा पुरवठा करून घेऊन, तिसरें एक जहाज अंदमानकडे जावयाचें होतें. या जहाजानें पोर्ट ब्लेअर बंदरावर हल्ला करावा, तेथील क्रांति-

---

[1] P 124

कारक, इतर सार्वे कैदी व सिंगापूरच्या बंडांत सामील झालेले शिपाई ( ज्यांना तेथें डांबून ठेवण्यांत आलें असावें, अशी समजूत होती ) या सर्वांसह त्यानें रंगूनला जावें व त्या शहरावर हल्ला चढवावा, अशी योजना ठरलेली होती. ]

'राजनैतिक इतिहास : द्वितीय खंड ' या पुस्तकावरूनहि[1] असें दिसतें कीं, अंदमानमधील राजकीय कैद्यांना मुक्त करण्याचा हेतु या योजनांत प्रामुख्यानें अंतर्भूत झालेला होता :

*सयामस्थित जर्मनांनीं भारतीय सैन्याला येऊन मिळून मोलमेनच्या मार्गानें ब्रह्मदेश आक्रमण करावा, चीनस्थित जर्मन सैन्यानें दुभाग विभक्त होऊन एका तुकडीनें सयाममधील सैन्यास जाऊन मिळावें आणि दुसऱ्या तुकडीनें ब्रह्मदेशच्या निर्वासित राजवंशाच्या उत्तराधिकारी पुरुषाच्या पुढारीपणाखालीं, भामोच्या मार्गानें उत्तर:ब्रह्मदेश आक्रमण करावा—इतकें होत आहे तोंपर्यंत शस्त्रास्त्रांनीं भरलेलीं तीन लढाऊ जहाजें—ज्यांपैकीं एका जहाजांत पांचशें जर्मन ऑफिसर्स असतील व शंभर सैन्य असेल तें जहाज अंदमानाहून राजकीय कैद्यांना मुक्त करून घेऊन थेट कलकत्त्यास येईल आणि दुसऱ्या दोन जहाजांपैकीं एक जहाज बंगालच्या आसपास राहील व तिसरें पश्चिम हिंदुस्थानच्या बाजूला खंबायत जवळ राहून क्रांतिकारकांच्याकडून त्याविषयीं पुढें निश्चित होईल.*

या सर्वच योजनांचा सुगावा हिंदुस्थानांतील ब्रिटिश अधिकाऱ्यांना योग्य वेळीं लागला व प्रतियोजना आंखण्याच्या कामीं त्यांना यश मिळाल्यामुळें प्रत्यक्ष परिणाम म्हणून कांहीं घडूं शकलें नाहीं हें खरें असलें तरी, एम्डेनपासूनच्या सर्व साहसांमागें अंदमानमधील क्रांतिकारकांच्या मुक्ततेचा हेतु प्रामुख्यानें होता हें सत्य विसरून चालणार नाहीं. या धडपडीमुळें ब्रिटिश सरकारला लढाईच्या काळांतली दोनतीन वर्षें चांगलींच अस्वस्थतेचीं गेलीं. अंदमानच्या अधिकाऱ्यांनाहि ही धामधूम सहासात महिने चांगलीच जाणवली. बंगालचा उपसागर बोटींच्या दळणवळणाच्या दृष्टीनें सुरक्षित नाहीं असें वाटूं लागल्यामुळें, कांहीं दिवस अंदमानला येणारें बंदिवानांचें ' चलान ' बंद पडलें होतें. अंदमानमधील सहस्त्रावधि माणसांना लागणाऱ्या सगळ्या जीवनोपयोगी वस्तू हिंदुस्थानांतूनच येत असल्यामुळें दळणवळण बंद पडून सर्वांवर उपासमारीची पाळी येते कीं काय, हीहि विवंचना अंदमानच्या अधिकाऱ्यांना वाटूं लागली होती.

या उत्क्षोभक घडामोडींचा जोर क्रमानें कमी होऊं लागल्यावर व अंदमानी जीवन कांहींशा संथपणानें फिरून सुरू झाल्यावर ज्या एका आकस्मिक व दुःखद वार्तेनें सावरकरांना धक्का दिला ती वार्ता भारतसेवक के. नामदार गोखले यांच्या निधनाची होती ! दि. १९-२-१५ रोजीं घडलेल्या या शोकजनक घटनेचें वृत्त

[1] पृ. १४.

अंदमानांत पोंचल्यावर बारीनें दुष्टपणानें तें सावरकरांना कसें सांगितलें व तें वृत्त ऐकल्याबरोबर सावरकरांच्या मनांत कोणते भाव उभे राहिले हें पुढील उताऱ्यांत[1] स्पष्ट करण्यांत आलेलें आहे :

*गोखले वारले तेव्हां ती बातमी मी संध्याकाळीं जेवत असतां बारीसाहेबांनीं कारागारांत येऊन मला सांगितली : सावरकर, तुम्हाला नेहमीं बातमी हवी असते नाहीं ? ही घ्या बातमी; गोखले वारले ! ...मला क्षणभर तें खरें वाटेना. मी दुःखोद्गार काढलेले पाहून बारी म्हणाले : पण ते तुमच्या विरुद्ध होते ना ? मी म्हटलें : छे, छे ! मी त्यांच्याच महाविद्यालयांत शिक्षण घेतलें आहे. मतभेद असेल, विरोध नव्हे. ते आमच्या हिंदुस्थानांतील ह्या पिढींतले एक निःसीम देशभक्त आणि देशसेवक होऊन गेले. पण बारी म्हणाले : तुमच्या खटल्यांत त्यांच्या विरुद्ध तुम्ही भयंकर कट केल्याचा पुरावा आलेला होता तो ? आणि तुम्हांस धरल्याविना हिंदुस्थानांत शांतता प्रस्थापित होणार नाहीं असें ते म्हणाले होते ना ? मी उत्तरलों : त्याविषयीं दंतकथांवर विश्वास ठेवण्यांत अर्थ नाहीं. त्यांचीं माझीं प्रत्यक्ष संभाषणें झालीं आहेत आणि आम्हा दोघांविषयीं परस्पर दोघांसहि अत्यंत पूज्यबुद्धि वाटत असे हें त्या भाषणाचे वेळीं उपस्थित असलेल्या गृहस्थांस माहीत आहे. त्यांस देशहिताच्या दृष्टीनें माझा मार्ग क्वचित मान्य नसेल; पण, म्हणून त्यांच्या देशभक्तीची थोरवी लेशमात्र उणी होत नाहीं. आणि कटाविषयीं विचाराल तर, इंग्लंडमध्यें त्यांच्या एकदोन भाषणांनी प्रक्षुब्ध होऊन जेव्हां ' अभिनव भारतां 'तील कांहीं पुढारी त्यांच्यावर आक्रमण करण्याच्या गोष्टी...बोलले तेव्हां त्या अमंगल विचारांचा तीव्र निषेध करून, प्रामाणिक मतभिन्नतेसाठीं कोणावरहि आक्रमण करणें आणि तेंहि स्वजनांवर करणें हें घोर पातक आहे, हा खराखुरा अत्याचार होईल हें मी त्यांस समजावून दिलें आणि तो ठराव संमत होऊं दिला नाहीं.*

१९१५ च्या फेब्रुवारीच्या उत्तरार्धांत संभाषणाच्या प्रसंगानें व्यक्त झालेला गोखले यांच्याविषयींचा आदरभाव दि. ९–३–१९१५ रोजीं धाडलेल्या वार्षिक पत्रांतहि पुनरुक्त झालेला आहे. गोखले यांनीं सारा जन्म देशसेवेंत घालविला, त्यांच्या देशप्रेमाला स्वार्थाचा डाग लागलेला नव्हता इत्यादि गोष्टी मोकळ्या मनानें लिहून[2] सावरकरांच्या बुद्धीनें या पत्रलेखनप्रसंगीं गोखले यांच्याविषयींचें आनृण्य संपादिलें आहे. याच पत्रांत सावरकरांनीं आपल्या बंधूंना Did you get the poe-

१ माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १६२–१६३
२ An Echo from Andamans : P. 34

ms on Guru and Ravi? ( गुरुरवींवरील कविता पोंचल्या ना ! ) असा प्रश्न विचारला आहे.[1]

या पत्रांत निर्दिष्ट झालेली गुरुवरील कविता म्हणजे सावरकरांनीं भारतीय कारावासांत असतांना रचलेली श्री गुरुगोविंदसिंहावरील कविता होय. १९०९ सालीं पांच वर्षांच्या काळ्यापाण्याची शिक्षा झाल्यामुळें जे युक्तप्रांतीय राजबंदी अंदमानांत धाडण्यांत आले होते त्यांच्यापैकीं एकाबरोबर सावरकरांची ही गुरु गोविंदसिंहावरील कविता बाहेर आली. या सज्जनानें ही कविता बहुधा कंठगत करूनच हिंदुस्थानांत आणली असली पाहिजे. गुरु गोविंदसिंहांवरील कवितेबरोबरच ज्या दुसऱ्या कवितेचा उल्लेख ' Poem on Ravi ' या शब्दांनीं करण्यांत आलेला आहे ती कविता भारतीय कविश्रेष्ठ रवींद्रनाथ टागोर यांच्यासंबंधींची होय. १९१३ सालीं रवींद्रनाथांना त्यांच्या श्रेष्ठ काव्यगुणांबद्दल ' नोबेल ' पारितोषिक देण्यांत आलें. ही वार्ता अंदमानांत पोंचल्यावर सावरकरांच्या मनांत जे विचार स्फुरले ते या कवितेंत व्यक्त झाले आहेत. १९१३ सालीं अंदमानांत रचण्यांत आलेली ही कविता १९१४ सालीं केव्हां तरी वरील सज्जनाबरोबर बाहेर आली. या सज्जनानें या दोन्ही कविता आपल्या बंधूंना नेऊन दिल्या असल्या पाहिजेत, अशा विश्वासानें सावरकरांनीं ' Did you get the poems on Guru and Ravi?' असा प्रश्न या पत्रांत विचारला आहे.

कविश्रेष्ठ टागोर यांच्या कवित्वाला त्रिखंडांत मान्यता मिळाली व त्यामुळें भारताची महति जगभर दुमदुमली याबद्दल रवींद्रनाथांचें अभिनंदन करण्यासाठीं सावरकरांनीं अंदमानांत जी कविता रचिली ती यापूर्वींच हिंदुस्थानभर प्रसिद्ध व्हावयाला पाहिजे होती. आजहि त्या कवितेचें बंगालींत व इंग्रजींत नीटस भाषांतर झालें तर, स्वाभिमानी वंगबंधु आणि इंग्रजी जाणणारें भारताबाहेरील जग या सर्वांना सावरकरांच्या ठिकाणीं असणाऱ्या श्रेष्ठ काव्यशक्तीची ओळख पटूं शकेल. ही कविता हिंदुस्थानांत आल्यावर, १९१५ सालच्या सुमारास ती रवींद्रनाथांना परिचित करून देण्यांत आली होती, हेंहि त्यांतल्या त्यांत सद्भाग्यच समजलें पाहिजे !

आपली राजधानी परत घेण्यासाठीं भारतमाता एका सैनिक बाष्परथांतून विजयोत्साहानें निघाली आहे, तिच्या त्या बाष्परथांत तिच्याभोंवतीं कवींची व कलावंतांची गर्दी झालेली आहे, त्या गर्दींत घुसून सावरकर भारतमातेला आपली वीरगीति सादर करीत आहेत, इतक्यांत भारतमाता सावरकरांना म्हणते :

> कविकक्ष पूर्ण हा माझा ।
> परि, उणीव तेथें जा जा ।
> क्रांतिच्या बाष्पयंत्राचा ।। कक्ष तो ।।

भारतमातेची ही आज्ञा ऐकतांच सावरकर त्या ऐश्वर्यशाली डब्यांतून बाहेर पडतात आणि एकाद्या आज्ञाधारक सुपुत्राप्रमाणें ते इंजिनच्या डब्यांत शिरतात. या कल्प-

---

[1] An Echo from Andamans : P. 34.

नेचा अर्थ असा दिसतो कीं, भारतीय ऐश्वर्याची वाढ होण्यासाठीं आणि तें ऐश्वर्य जगन्मान्य होण्यासाठीं कवि व कलावंत जरूर असले तरी, त्या सर्वांना प्रेरणा व चालना देणाऱ्या क्रांतिकार्यकर्त्यांची गरज सध्यां अधिक निकडीची आहे. ती गरज भागविण्याचा मान आपल्याला मिळत आहे यांत अभिमान मानून, महाकवि होण्याची बालपणापासून मनांत वसत असलेली आकांक्षा आपण बाजूस सारली आणि महाकवीच्या वैभवांत आणि मानांत मिरवण्याऐवजीं कर्तव्यबुद्धीनें अंदमानच्या कष्टमय जीवनांत खितपत पडलों हें सावरकरांनीं या कवितेत दोन ठिकाणीं तरी सूचित केलें आहे :

मलधूम कोळशांतुनि या ।
सोधर्ण चर्मि उडवुनियां ।
मी राजकवे तव विजया ।। साजवी ।।

कवितेच्या पहिल्या टप्प्यातल्या या ओळींत ही कल्पना एका प्रकारानें व्यक्त झाली आहे; त्याप्रमाणेंच, या कवितेच्या दुसऱ्या टप्प्यांत ही कल्पना एका वेगळ्या प्रकारानें व्यक्त झाली आहे.

तद्यज्ञागारीं जेथें ।
ऋत्विग्वर बसले होते ।
हवनांहि वीतिहोत्रातें ।। अर्चितां ।।
अलकांत खोवुनी एका ।
करिं अन्य गुलाबी कलिका ।
ये यज्ञ-पूजना देखा ।। भारती ।।
निजदास्यमोचना माता ।
बद्धांजलि मधली हातां ।
ती कळी दीप्त दहनीं त्या ।। अर्पिते ।।

भारतमातेनें स्वतःच्या दास्यमोचनासाठीं आपल्या हातांतली गुलाबाची कळी प्रदीप्त यज्ञाग्नींत टाकली. ती कळी म्हणजे आपली काव्यस्फूर्ति अशी कल्पना खेळविल्यावर त्या प्रदीप्त यज्ञाग्नींतून आपली काव्यशक्ति रवींद्रनाथांच्या काव्यशक्तीचें अभिनंदन करीत आहे, ही कल्पना सावरकरांनीं पुढील ओळींत खेळविली आहे :

अलकिंच्या गुलाबा फुलत्या ।
रे, खुलत्या, डुलत्या, तुज त्या ।
अभिनंदी दहनांतुनि त्या ।। ती कळी ।।

रवींद्रनाथांचें यश हें जगदंबा भारतमातेच्या देवद्वारावर उभविलेलें चंदन-तोरण आहे, तर आपण सहाणेवर झिजूनझिजून जगदंबेच्या पूजनाला मदत करणारें चंदनाचें खोड आहों हें सांगतांना सावरकरांनीं पुढील ओळी लिहिल्या आहेत :

झिजाझिजत सह्याणेवरती ।
लघु खंड तो तुला दे ती ।
घे स्यात तोरण! प्रणती ॥ मानुनी ॥

भारताच्या काव्यविषयक परंपरेचा अभिमान, रवींद्रनाथांच्या उज्ज्वल यशामुळे त्या परंपरेंत पडलेली भर, या यशाचें अभिनंदन करण्याचा आपला अधिकार इत्यादि गोष्टींचें वर्णन करणारा या कवितेचा शेवटचा भाग पुढीलप्रमाणें आहे :

श्रीविक्रमसिंहासन तें ।
अद्यापिहि लुप्तचि परि, तें ।
वीणा कीं तरि अवतरतें ॥ त्वत्करीं ॥
कीं गान गुंगवी तीचें ।
गोलार्धें उभयहि साचें ।
प्रथमची कालिदासाचे ॥ नतरी ॥
कारागृहिं, कांचनगेहा ।
हे बंदी, राजरवींद्रा ।
शृंखला राजबंदी ह्या ॥ वंदितो ॥
कीं ह्याचि शृंखलांच्या : या
उच्छृंखल नादें जगता ।
आकर्षुनि ह्या तव गीता ॥ श्रवविलें ॥

याच पत्रांत सावरकरांनीं असें लिहिलें आहे कीं, झोंपी जाण्यापूर्वी मुक्तच्छंदांतल्या कांहीं काव्यपंक्ती रचण्याला आपण प्रारंभ केला आहे. या उल्लेखावरून असें अनुमानितां येतें कीं, 'वैनायक' वृत्ताची घडण कशी असावी हें मनाशीं ठरवून सावरकरांनीं या सुमारास या अभिनव वृत्तांत काव्य लिहिण्याला प्रारंभ केला होता. इंग्लंडमध्यें तुरुंगांत असतांना तुरुंगाच्या पहिल्या अनुभवानंतर सावरकरांना जे विचार सुचले ते 'वैनायक' वृत्तांत रचलेल्या 'मूर्ति दुजी ती' ह्या कवितेंत व्यक्त झाले आहेत. १९१४ च्या सुमारास सावरकरांनीं ही कविता रचली, असें समजण्याला हरकत नाहीं.

१९१५ सालच्या या वार्षिक पत्रांत सावरकरांचे अनेक विषयांवरील विचार सहजगत्या व्यक्त झालेले आढळतात. हिंदी सैन्य युरोपांत समरांगणावर धाडण्यांत आलें ही फार महत्त्वाची गोष्ट घडली हें मत व्यक्त करतांना सावरकरांनीं या पत्रांत पुढील छेदक[1] लिहिला आहे :

It sent a thrill of delight in my heart to hear that Indian troops were allowed to go to Europe in their thousands to fight against the best military power in the world.…Thank God! manliness, after all, is not dead yet in the land! And what a funny thing! We have been trying our

[1] An Echo from Andamans : Pp. 33–34

best to encourage foreign travel and used to congratulate ourselves if a dozen could be sent a year! And now Providence has done what we could not......thousands of Hindus,......have crossed the sea and under the Government patronage! Now let our Pundits sit hatching over the eggs of शास्त्रार्थ to see if foreign travel is permissible to the Hindus or not—permissible or not, the Hindus have crossed the sea and in crossing it they have crossed an epoch! What the crusades have done for Europe by bringing it in contact with the superior civilization of Asia, the conflict with the Europeans of our Hindu troops across the seas will do for India—for Asia.

(लष्करी दृष्टया पहिल्या प्रतीच्या सत्तेशीं लढण्यासाठीं सहस्रावधि हिंदी सैनिकांना युरोपांत जाण्याला परवानगी देण्यांत आली आहे, हें ऐकल्यामुळें माझ्या अंतःकरणांत आनंदाची संवेदनां चमकली! असो! ...आपल्या देशांतलें पौरुष अगदींच नष्ट झालेलें नाहीं ही परमेश्वराची केवढी कृपा! आणि काय मौज आहे पहा! परदेशाच्या प्रवासाला प्रोत्साहन देण्याची आम्हीं पराकाष्ठा करीत आलों व प्रतिवर्षी दहाबारा माणसें परदेशीं गेलीं कीं आम्ही स्वतःला धन्यवाद देत आलों! पण, जें आम्हांला करतां आलें नाहीं तें आज परमेश्वरी योजनेनें घडलें आहे. सहस्रावधि हिंदु खुद्द सरकारी प्रोत्साहनानें समुद्रपार झाले आहेत!...परदेशाचा प्रवास हिंदुशास्त्रांना संमत आहे कीं नाहीं याविषयींच्या शास्त्रार्थाचीं अंडीं उबवीत पंडितांनीं आतां खुशाल बसावें! हा प्रवास संमत ठरो वा न ठरो, हिंदूंनीं सिंधुबंदीची रूढि मोडली आहे. या रूढीचा उच्छेद करून समुद्रपार होतांहोतां त्यांनीं एका युगाचें उड्डाण केलें आहे! युरोपांत होऊन गेलेल्या धर्मयुद्धांच्या प्रसंगीं युरोपियन लोकांना आशियाच्या श्रेष्ठ संस्कृतीचा प्रत्यक्ष परिचय करून घेतां आला व हा परिचय त्यांना फार लाभकारक ठरला. समुद्रपार झालेल्या आपल्या हिंदु सैन्याचा युरोपियनांशीं होत असलेला सध्यांचा संघर्षहि भारताला व आशियाला लाभकारक ठरल्यावांचून राहणार नाहीं).

हिंदुसमाज सामर्थ्यसंपन्न होण्यासाठीं जातिसंस्थेवर आघात करणें अवश्य आहे; पण या आघातामुळें भारताला जगांत स्वतंत्रतेनें नांदण्याचा अधिकार मिळविण्याचा व राखण्याचा प्रश्न मात्र दृष्टिआड होतां कामा नये, या मुद्याचें विवेचन करतांना सावरकर यांनीं या पत्रांत पुढील वाक्यें[१] लिहिलीं आहेत.

Among the social institutions, the greatest curse of India is the system of castes. The mighty current of Hindu life is being threatened to perish in bogs and sands. It is no good saying 'We will reduce it to four caste-system first.' It must be swept away root and branch......The only care to be taken being not to pay so much attention and not to create so much fuss in this side-issue and our internal relation as to forget and hamper and thwart the issue—our relation with the world—but for the

---

१ An Echo from Andamans : P. 32

right adjustment of which, no internal questions can be satisfactorily solved or solved to any substantial purpose.

(हिंदूंच्या सामाजिक संस्थांपैकीं जातिसंस्था ही भारताला एकाद्या घोर शापाप्रमाणें भोंवत आहे. हिंदुजीवनाचा प्रबल ओघ दलदली व वाळूचे थर यांमध्यें लुप्त होऊन जातो कीं काय, अशी भीति निर्माण झालेली आहे. बाकीच्या जाती मोडून प्रथम चार जाती बनवूं, या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ही संस्था पाळांमुळांसकट साफ उध्वस्त केली पाहिजे...हें घडवीत असतांना फक्त एका बाबतींत खबरदारी घेतली पाहिजे. जातिसंस्थेचा हा प्रश्न गौण असून तो घरगुती स्वरूपाचा आहे. जगताशीं आपले संबंध कसे असावे हा प्रश्न सर्वांत महत्त्वाचा आहे. या महत्त्वाच्या प्रश्नाची योग्य व्यवस्था लागली नाहीं तोंपर्यंत कोणतेहि घरगुती प्रश्न समाधानकारक रीतीनें सुटणार नाहींत व जे सुटतील त्यांपासून तादृश लाभ होणार नाहीं. असें असल्यामुळें, जातिभेद नष्ट करण्याचा घरगुती प्रश्न सोडविण्याच्या नादांत त्याच विषयाकडे प्रमाणाबाहेर लक्ष लागून व नाहीं तो गोंधळ निर्माण होऊन खऱ्या व प्रधान प्रश्नाचें विस्मरण होतां कामा नये—त्या प्रश्नाची गति कुंठित होतां कामा नये व तो विषय विफलहि ठरतां कामा नये.) भारताच्या भिन्नभिन्न भागांत राहणारे लोक प्रांतिक अभिमान व भाषाभिमान यांच्या नादीं लागले तर कोणता दुरवस्था प्रसंग ओढवेल याचें सावरकरांनीं या पत्रांत केलेलें विवेचन फार दूरदर्शीपणाचें व मार्मिक आहे. ते लिहितात :[१]

The Andhra Sabha is a great and grand movement but the question of getting that province separated from the Tamil one is not ennobling...
...In this little thing and straw, we see the direction of an ominous wind to come. This is one of the unhealthy reactions of the grand Swadeshi movement and must be corrected before it is too late. The swadeshi, connected in Bengal, with the little partition question, brought in this reaction. Every province wants to be separated and shouts and invokes long life to itself. But how can the province live unless the nation lives? They all—Maharastra, Bengal, Madras—are great and will live long but through Her—India......All provinces and petty languages, instead of asking to be separated should try to get amulgamated and remove the barriers that yet remain and destroy the confusion of tongues and not hug to it. Smaller nationalities! Is not Belgium a sufficent warning? The greatest good that the British Government has done without meaning it is to melt and mould the disintegrating fractions of our Motherland and hammer us into one people.

(आंध्र सभेची चळवळ ही एक मोठी उमदी चळवळ आहे. पण, आंध्र प्रांत तामीळ प्रांतांतून वेगळा करण्याची मागणी मात्र उमदी नाहीं...या विचारसरणींत बें विषबीज दडून बसलें आहे तें आज क्षुद्र दिसत असलें तरी, त्यांतूनच उद्यां प्रचंड

---

१ An Echo from Andamans : Pp. 86-87.

विषवृक्ष निपण्याची भीति आहे. स्वदेशी आंदोलन झालें तें फार उदात्त होतें; पण, त्या आंदोलनाची ही एक रोगट प्रतिक्रिया झालेली आहे. तिला वेळींच आळा घातला पाहिजे. बंगालमध्यें स्वदेशी चळवळीची सांगड फाळणीच्या स्थानिक प्रश्नांशीं घालण्यांत आलेली होती आणि त्यामुळें ही प्रतिक्रिया निर्माण झाली. प्रत्येक प्रांत विभक्त होण्याची इच्छा धरीत आहे आणि आपल्यालाच दीर्घायुष्य लाभावें असें जोरजोरानें प्रार्थीत आहे. पण, राष्ट्र जगविल्याविना प्रांत जगणार कसा ? महाराष्ट्र, बंगाल, मद्रास हे सगळेच मोठे आहेत व ते दीर्घायुषीहि ठरतील; पण, त्यांचें मोठेपण व दीर्घायुष्य भारताश्रयी आहे ... सगळे प्रांत नि भाषा यांनीं विभक्त होण्याची मागणी करण्याऐवजीं एकजिनसी बनण्याचा प्रयत्न केला पाहिजे. एकजिनसी बनण्याच्या मार्गांत जे अडथळे असतील ते त्यांनीं नाहींसे केले पाहिजेत, भाषाभेदांमुळें उडालेला गोंधळ नष्ट करण्याला त्यांनीं झटलें पाहिजे; या गोंधळाच्या गळयाला बिलगण्याची चूक त्यांनीं करतां कामा नये. छोटेखानी राष्ट्रें ! ! बेल्जमचें उदाहरण इषारा म्हणून पुरेसें नाहीं का ! ब्रिटिश सरकारनें स्वतःच्या इच्छेविरुद्ध भारतावर जर कोणता अति मोठा उपकार केला असेल, तर तो हा कीं, आपल्या या मायदेशाला बहुजिनसी व बहुमुखी बनविणारे जे भेद होते ते वितळवून टाकून, सर्वांना एका साच्यांत टाकून, ठोकून ठाकून सर्वांचें एक राष्ट्र बनविण्याचा उद्योग त्यानें केला आहे.)

राजबंदिवानांच्या विमोचनासाठीं पंजाबांत सुरू झालेल्या चळवळीचा या पत्रांत कृतज्ञतापूर्वक निर्देश करण्यांत आला आहे. युद्धसमाप्तीच्या सुमारास राजबंदिवानांना सोडल्याचें श्रेय पदरांत पाडून घेण्यासाठीं राजकृपा जाहीर होण्याचा संभव आहे; पण, अशी कृपा खऱ्या अर्थानें सफल व्हावयाची तर तिला लोकमताचें पाठबळ असणें अवश्य आहे असें सांगून, सावरकरांनीं या पत्रांत आपल्या बंधूंना अशी सूचना दिली आहे कीं, युद्धसमाप्तीच्या सुमारास सावरकरमुक्ततेच्या मागणी-अर्जावर शेंकडों स्वाक्षऱ्या घेऊन तो अर्ज सरकारकडे धाडण्यांत यावा. असा अर्ज जाऊन, लोकांनाहि आपलें विमोचन अभिप्रेत आहे असें सिद्ध होत नसेल तर, त्या विमोचनांत कांहीं स्वारस्य नाहीं, त्यापेक्षां कायमचेंच अंदमानांत राहिलेलें बरें, असें सावरकरांनीं या पत्रांत म्हटलें आहे. या पत्रांतहि कामाबाईंच्या विषयींचा उल्लेख मोठ्या आदरानें करण्यांत आलेला आहे. सावरकर लिहितात :[१]

I was very much afraid that, owing to the invasion of France, you would be unable to hear from Madam Cama who has been, ever since my coming here, a second mother to you and who had so nobly and faithfully stood by us in the drakest hour of our life. But I was very glad to be assured that she, even in the midst of this world hubbub, remembered you and had regularly been sending letters to you. At the touch of one

१ An Enho from Andamans : P. 35.

such faithful, noble, unshaken loving hand, one's heart recovers its belief in humanity.

( मी अंदमानांत येऊन पडल्यापासून कामाबाईंनीं तुझा मातेसमान सांभाळ केला आहे. आपल्या जीवनांतल्या अगदीं अंधाऱ्या प्रहरीं या बाई अत्यंत उदारपणानें व विश्वासूपणानें आपल्या बाजूला ठाम राहिल्या आहेत. फ्रान्सवर स्वारी झाल्यामुळें तुला कामाबाईकडून कांहींच वृत्त कळूं शकणार नाहीं अशी चिंता मला वाटत होती. पण, या जागतिक हलकल्लोळांतहि, त्यांना तुझें स्मरण राहिलें आहे व त्या तुला नियमितपणानें पत्रें धाडतात हें कळल्यामुळें माझ्या मनाला आश्वासनाचें समाधान लाभलें. विश्वासूपणा, उमदेपणा, अचल प्रेम या गुणांचें मूर्तिमंत दर्शन घडविणाऱ्या अशा एका व्यक्तीमुळें, मन फिरून मानवी चांगुलपणावर विश्वास ठेवूं लागतें ! )

१९१५ च्या सप्टेंबरपर्यंत आपले बंधु आपल्याला अंदमानांत भेटण्यासाठीं येतील असें सावरकरांना या सुमारास वाटत असलें पाहिजे, असें या पत्रांतल्या एका वाक्यावरून सिद्ध होतें. स्वकीयांची भेट घेण्याबद्दलची ही आशा पुढें केव्हां व कोणत्या परिस्थितींत सफल झाली हें योग्य ठिकाणीं सांगण्यांत येईलच. गेल्या चार वर्षांच्या अवधींत अंदमानांत भोगलेले कष्ट व तेथील रुक्ष व क्लेशमय जीवनक्रमामुळें आलेला कंटाळा यांचा परिणाम पुढील उपहासगर्भ वाक्यांत व्यक्त झाला आहे :[१]

In a prison what happens on the first day happens always—if nothing worse happens In fact, it seems to be the essence of prison discipline to avoid all novelty—all chpge. Like specimens and curios in a museum, here we are, each exactly in the same place and same position, bottled and labelled with the same numbers with more or less dust abo us……Although it is true that prisoners are not free to do or say what they will, yet……every one is absolutely free to dream what he likes,

( कारागृहांत पहिल्या दिवशीं जी दिनचर्या ठरते तीच सततची दिनचर्या असते. कांहीं बदल झालाच तर तो अनिष्ट प्रकारचाच असावयाचा ! कसलेंहि नावीन्य, कसलाहि पालट घडूं नये हेंच कारागारीय शिस्तीचें सारसर्वस्व असावें, असेंच वस्तुतः भासतें. एखाद्या अजबखान्यांत मांडून ठेवलेल्या मासलेवाईक चित्रविचित्र वस्तूंप्रमाणें आमच्यापैकीं प्रत्येकजण त्याच जागीं त्याच स्थितींत आहे. त्या वस्तु बाटलींत कोंबलेल्या असतात व त्या बाटल्यांवर वर्णनात्मक चिठ्ठ्या लावलेल्या असतात; तसे आम्ही कोठड्यांत कोंबलेले आहों व आमच्यावर क्रमांकांचे बिल्ले लावलेले आहेत. त्या वस्तूंच्या बाटल्यांवर साठणारी कमजास्त धूळ हाच जसा त्यांच्या बाबतींतला बदल असतो त्याप्रमाणेंच आमच्याभोंवतीं सांठणारी विस्मृतीची कमजास्त धूळ एवढाच आमच्या बाबतींत घडणारा बदल असतो. मनांत येईल

१ An Echo from Andamans : Pp 38–39

तें करण्याला वा बोलण्याला बंदिवानांना मोकळीक नसते हें खरें; पण,...मनांत येईल त्या प्रकारच्या स्वप्नसृष्टींत विहरण्याची मुभा बंदिवानांना असते. )

अंदमानमधील राजबंदिजनांच्या जीवनावर परिणाम घडविणाऱ्या अनेक घटना भारतीय राजकारणाच्या क्षेत्रांत यापूर्वीच सुरू झालेल्या होत्या व त्या आतां पूर्णतावस्थेला येऊन पोंचल्या होत्या. १९१२ सालच्या डिसेंबरांत व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज यांच्या दिल्लीप्रवेशाच्या वेळीं त्यांच्यावर बॉंब फेंकण्याचा प्रयत्न झाला होता. तेव्हांपासून, सरकारचे पंजाबमधल्या राज्यक्रांतिकारक चळवळीचीं पाळेंमुळें खणून काढण्याचे प्रयत्न नेटानें सुरू झालेले होते. राशबिहारी बसू यांच्यावर सरकारचा जबरदस्त संशय होता; तरीहि, साऱ्या सरकारी अधिकाऱ्यांची मति गुंग करून, संयुक्त प्रांतांत व पंजाबांत राशबिहारींचे प्रयत्न धडाक्यानें चाललेच होते. १९१४ सालीं नोव्हेंबर महिन्यांत अमेरिकेंतून आलेले महाराष्ट्रीय क्रांतिकारक विष्णु गोपाळ पिंगळे यांच्याशीं राशबिहारींच्या भेटी होऊन, उठावणी केव्हां होईल वगैरे मुद्यांची चर्चाहि झाली. पण, त्यानंतर लौकरच सुरू झालेल्या दिल्ली कटाच्या खटल्याच्या निमित्तानें ज्या गोष्टी बाहेर येऊं लागल्या त्यामुळें क्रांतिकारकांना जपून पावलें टाकणें भाग पडूं लागलें. दि. ५–१०–१४ रोजीं दिल्ली कटाच्या खटल्याचा निकाल लागून अमीरचंद, अवध बिहारी, बालमुकुंद प्रभृतींना फांशीची शिक्षा सांगण्यांत आली. बालमुकुंदजी हे भाई परमानंदजींचे चुलत भाऊ. त्यांचे पूर्वज भाई मतिदास यांना करवतीनें कापूनकापून अवरंगजेबानें परलोकाला धाडिलें होतें ! त्याच ठिकाणीं भाई बालमुकुंद हे फांसावर चढले! त्यांचीं पत्नी श्रीमती रामरखी या साध्वीनें पतिनिधनानंतर अन्नपाणी सोडलें व सुमारें १५–१७ दिवस अशा स्थितींत काढल्यावर तिनेंहि आपल्या पतिदेवाला भेटण्यासाठीं स्वर्गारोहण केलें! पंजाबच्या आधुनिक इतिहासांतला हा प्रसंग[1] अत्यंत हृदयस्पर्शी आहे.

या सुमारासच सुरू झालेल्या सरकारी कारवायांतून लाहोर कटाचे खटले, बनारसकटाचा खटला वगैरे प्रकरणें उद्‌भवलीं. १९१५ च्या सप्टेंबरच्या उत्तरार्धांत लाहोर कटाच्या खटल्यांतील पहिल्या खटल्याचा निकाल लागला. या खटल्यांतील आरोपींपैकीं कर्तारसिंग, जगतसिंग, पिंगळेप्रभृति सात जणांना दि. १७–११–१५ रोजीं लाहोरच्या सेंट्रल जेलमध्यें फांशी देण्यांत आलें. भाई परमानंदजींनाहि प्रथम फांशीचीच शिक्षा सांगण्यांत आलेली होती ! पण, त्यांच्या पत्नीनें केलेल्या अर्जाचा पं. मालवीय, सर अली इमामप्रभृति पुढाऱ्यांनीं पाठपुरावा केल्यामुळें, अखेरीस त्यांची फांशीची शिक्षा रद्द होऊन, त्यांना काळ्या पाण्यावर धाडण्याचें ठरलें. १९१६ सालीं फेब्रुवारी महिन्यांत बनारस कटाच्या खटल्याचा निकाल होऊन, राशबिहारी बसूंचा उजवा हात म्हणून समजले गेलेले शचींद्रनाथ संन्यालप्रभृति क्रांतिकारक अंदमानाच्या मार्गाला लागले. महायुद्ध सुरू होण्यापूर्वी अंदमानांत असलेल्या राजकीय

---

[1] The Story of My Life by Bhai Parmanand : Pp. 77-87

कैद्यांपैकीं मुदतीच्या कैद्यांना भारतीय कारावासांतून धाडण्यांत आल्यामुळें, १९१४ चा उत्तरार्ध व १९१५ चा पूर्वार्ध या वर्षभराच्या अवधींत अंदमानांतल्या राजकीय बंदिवानांची संख्या बरीच रोडावली होती. वर ज्या भानगडींचा निर्देश करण्यांत आलेला आहे त्याच्यामुळें १९१५ च्या उत्तरार्धापासून ही संख्या फिरून वाढूं लागली. या नवागतांमध्यें शूर शीखांची संख्या बरीच होती. या नवागतांतले भाईजी अर्थात् प्रो. परमानंद हे सावरकरांच्या परिचयाचे होते. इतर मंडळींना सावरकर ओळखीत नसले तरी, सावरकरांची कीर्ति त्यांनीं ऐकलेली होती. ही मंडळी अंदमानांत आल्यामुळें, हिंदुस्थानांतल्या चळवळींची माहिती, युद्धाच्या वार्ता वगैरे महत्त्वाचें वृत्त सावरकरांना पुष्कळच ताज्या स्वरूपांत मिळालें. सावरकरप्रभृति राजबंदींनीं अंदमानांत ज्या यातना महायुद्ध सुरू होण्याच्या पूर्वी सोसल्या होत्या त्यांचें वृत्त बाहेरच्या जगांत कळल्यामुळें बाहेर किती क्षोभ उत्पन्न झाला होता, हेंहि या नवागत राजबंदींनीं सावरकरांना सांगितलें.

हे नवे कैदी अंदमानांत आल्यावर थोड्याच दिवसांत बारीनें छिलक्याचें प्रमाण वाढविण्याची व मधून मधून त्यांना कोलूवर अल्पकाळपर्यंत धाडण्याची भाषा सुरू केली. पण, नव्या बंदिवानांत भाई परमानंदांच्याच नांवाचा दुसरा जो एक तरुण परमानंद होता त्यानें एके दिवशीं बारीची चांगलीच शोभा सर्वांदेखत केल्यामुळें[1] बारीचे बेत जागच्या जागीं जिरले. या परमानंदानें काम करण्याला नकार दिल्यामुळें, बारीनें त्याला कार्यालयांत बोलावून घेतलें. बारी जरा अगडतगड बोलूं लागला त्याबरोबर ह्या तापट तरुणानें ताड्कन बारीच्या श्रीमुखांत लगावली! बारीची खुर्ची लवंडली, तो जमिनीवर पडला, त्याच्या टोपीनें जमिनीवर लोळण घेतली! बारीच्या बगलबच्च्यांनीं परमानंदाला रक्तबंबाळ केलें. सुपरिंटेंडेंट मेजर मरे यांना टेलिफोन करण्यांत आला. परमानंदाला तसाच कोठडींत कोंडून ठेवण्यांत आला. सुपरिंटेंडेंट परमानंदाला जरा रागानें बोलला तेव्हां परमानंदानें त्यालाहि ताडकन् उत्तरें दिलीं. बारीची शोभा झाली याबद्दल सर्वांनाच मनांतून आनंद होत होता. पुढें सुपरिंटेंडेंटनें परमानंदाला तीस फटक्यांची जबर शिक्षा ठोठावली! त्या बहाद्दरानें हूं कीं चूं न करतां ही शिक्षा सहन केली! बारीनें शिव्या दिल्यामुळें हा सारा प्रकार घडला या मुद्यावर भर देऊन कित्येक राजबंदिवानांनीं संप केला. मेजर मरे यांनीं बारीची कानउघाडणी केली व तोंड संभाळून बोलण्याबद्दल त्याला बजावलें. या प्रकारामुळें बारी पुष्कळच मऊ आला व काम वाढविण्याची त्याची इच्छा जागच्या जागींच जिरली.

१९१६ सालच्या अगदीं सुरुवातीसच परमानंदांचें हें प्रकरण घडलें. त्यानंतर

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. ११४–१६; The Story of My Life by Bhai Parmanand : Pp. 114–20.

थोड्या महिन्यांनीं चतरसिंग नांवाच्या राजबंद्याचें प्रकरण[1] घडलें. अंदमानांत सोसाव्या लागणाऱ्या अडचणींमुळें वैतागून गेलेल्या या शीख राजबंदिवानानें एका रविवारीं, बंदिवानांचीं वजनें घेण्याचें काम चाललें असतांना, सुपरिंटेंडेंटवर चाल केली. चतरसिंगाला तंडेल, वॉर्डर वगैरेंनीं यानंतर इतकें बेदम मारलें कीं, स्वतः सुपरिंटेंडेंटनें मध्यस्थी केली म्हणूनच चतरसिंग जिवंत राहिला. यानंतर कित्येक महिनेपर्यंत चतरसिंगाला लोखंडी पिंजऱ्यांत बंद करून ठेवण्यांत आलें होतें. सावरकरांना कोणत्या तरी बनावट कटांत दोषी ठरविण्याचे अनेक प्रयत्न बारीनें यापूर्वी केले होते; पण, सावरकरांच्या जागरूकपणामुळें ते निष्फळ ठरले होते. चतरसिंगानें जो आततायीपणा केला त्याच्या माग सावरकर–बंधूच होते असें सिद्ध करण्याचा बारीनें पुष्कळ खटाटोप केला. अंदमानमधील सारा असंतोष सावरकरांमुळें निर्माण होतो असें सिद्ध करण्याच्या हेतूनेंच बारीनें हा खटाटोप चालविला होता! पण, तोहि सफल झाला नाहीं.

नव्या राजबंदिवानांच्या आगमनामुळें निर्माण झालेल्या या क्षोभजनक घटना घडत असल्या तरी, स्वतः सावरकर यांचें वर्तन सामान्यतः नियमाप्रमाणेंच चाललेलें असल्यामुळें, अधिकाऱ्यांनीं त्यांच्यावर उघड आक्षेप घ्यावा अशी स्थिति नव्हती. या अनुकूल परिस्थितीचा नियमानुसार मिळणारा फायदा मिळाला तर तो घेण्याच्या उद्देशानें सावरकर यांनीं दि. ८-८-१९१६ रोजीं तुरुंगावरील अधिकाऱ्यांकडे एक अर्ज धाडला. आपल्याला झालेल्या शिक्षेंतलीं ५ वर्षें आतां भरून गेलीं असल्यामुळें, आपली गणना आतां दुसऱ्या वर्गाच्या कैद्यांत करण्यांत यावी, असा या अर्जाचा आशय होता. या अर्जाला अधिकाऱ्यांनीं जें उत्तर दिलें तें, दि. १६-८-१९१६ रोजीं सावरकर यांना मिळालें. सावरकर यांनीं शिक्षेच्या मुदतींतले पुरे सहा महिने हिंदुस्थानांतल्या तुरुंगांत काढलेले असल्यामुळें, ते हिशोबांत धरतां येत नाहींत; वरच्या वर्गांत बढती करण्याच्या दृष्टीनें जो काळ मोजावयाचा तो सावरकर अंदमानांत आले तेथपासून मोजला जाईल, असें या उत्तरांत सांगितलेलें होतें. बढती मिळविण्याबद्दलचा अर्ज सावरकरांनीं या सुमारास केला याचें एक कारण त्यांची खंगत चाललेली प्रकृति हें असलें पाहिजे. लहानपणीं सावरकरांनीं व्यायामानें शरीर चांगलें कमावलें होतें म्हणूनच त्या शरीरानें १९१०सालच्या मध्यापासून १९१५च्या जवळ जवळ अखेरीपर्यंत टिकाव धरला होता. पण, त्या सुमारास सावरकरांची प्रकृति वारंवार बिघडूं लागली. तुरुंगांत जें अन्न मिळे तें पोटभरीचें नसे असें म्हणतां येणार नाहीं. पण, तें पुष्कळ वेळां कच्चें असे व नेहमींच निःसत्त्व असे. यामुळें सावरकरांच्या पचनक्रियेला प्रथम त्रास होऊं लागला. पचनक्रियेची विकृति म्हणजेच सर्व आजारांचें मूळ हा वैद्यशास्त्रांतला सिद्धांत त्यांच्या बाबतींत अनुभवाला येऊं

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. १२५–२६; The Story of My Life by Bhai Parmanand : Pp. 125–26.

लागला. त्यांना वारंवार ताप येऊं लागला. पण, त्या तापावर नीट औषधोपचार होईल, तापानंतर विश्रांति मिळेल अगर पचनक्रिया सुधारावी म्हणून अन्नांत कांहीं इष्ट पालट होईल; अशी शक्यता मुळींच नव्हती. अंदमानांत मिळणाऱ्या डाळीशीं भात खाणें त्यांना अशक्य झालें. पोळी बहुधा कच्ची रहात असल्यामुळें त्यांनीं ती कायमचीच सोडून दिली. भातांत निर्मळ पाणी ओतून तो काला खाण्याचा क्रम त्यांनीं कित्येक दिवस चालविला; पण, त्यामुळें त्यांना आंवेचा विकार जडला! शेवटीं, या कोंडींतून तात्पुरता मार्ग काढण्याचा एक उपाय त्यांना सुचला. १९१४ साल संपण्याच्या सुमारास गणेशपंत सावरकर व जोशी या दोघांना एकत्र स्वयंपाक करण्याची मुभा मिळाली होती. या दोघांनीं तयार केलेल्या पदार्थांतले कांहीं पदार्थ सावरकरांना निमूटपणें पोंचविण्यांत येऊं लागले व त्यामुळें त्यांना अन्नाचे चार घांस कांहींशा चवीनें खातां येऊं लागले. यानंतर थोड्याच दिवसांनीं गणेशपंतांचा अर्धशिशीचा जुना आजार बळावला व त्यामुळें या दोन्हीहि भावांच्या प्रकृतीची फार आबाळ होऊं लागली.

भोंवतालची परिस्थिति व मनःस्थिति अशा प्रकारची असूनहि, रीतसर धाडावयाच्या वार्षिक पत्रांत तिचा उच्चार करण्याची सोय नव्हती. दि. ६-७-१६ रोजीं सावरकर यांनीं अंदमानांतून लिहिलेलें पत्र वाचतांना हें आश्चर्य वाटतें कीं इतका शारीरिक व मानसिक ताप सहन करणारा हा गृहस्थ इतक्या शांत वृत्तीनें हें पत्र लिहूं शकतो तरी कसा! हें पत्र डॉ. सावरकर व त्यांची पत्नी अशा दोघांच्या नांवें लिहिलेलें आहे. आपला आवडता धाकटा भाऊ तरी सांसारिक सुख उपभोगण्याच्या मार्गावर आहे हें पाहून संतुष्ट झालेल्या सावरकरांनीं या पत्राच्या आरंभीं कौटुंबिक सुखाला धन्यवाद दिले आहेत व ' मधुनक्तमुतोषसि मधुमत् पार्थिवङ्रजः ' या वैदिक मंत्राचा उच्चार करून, त्यांनीं आपल्या भावाच्या वैवाहिक जीवनाला आशीर्वाद दिला आहे. गृहिणीपदावर आरूढ होणाऱ्या अगर झालेल्या तरुणींनीं या पत्रांतला पुढील उतारा अवश्य लक्षांत ठेवण्यासारखा आहे :

The first and foremost consideration of a young lady should be her health It is......a debt she owes to generations not yet born. Every atom of health that a young lady dissipates is so much that is taken away from the strength of souls that are yet to rise. She is a golden link that joins the Yesterday to the Morrow. Therefore, the first care of a wife should be her health that would harmonise the beauties of her body and mind and soul. So, neither study nor pleasure should entice her away so as to tax her energy too much, but both should be indulged in only so far as to render that Health perfect and that Beauty transparently pure.

(तरुणींनीं प्रथम कसली काळजी प्राधान्येंकरून घ्यावयाची असेल तर ती आरोग्याची होय. तरुणींचें आरोग्य हें काळाच्या उदरांत असलेल्या संततीचें एक ऋण

---

१ An Echo from Andamans : Pp. 45-46

आहे. तरुणींनीं आरोग्याचा एक बिंदूहि वांया घालविला तर त्यांनीं अजात अशा आत्म्यांची तितकी शक्तिच हिरावून घेतली असें होतें. भूतकाळ व भविष्यकाळ यांची सांधेजोड करणारा सोनेरी दुवा म्हणजेच तरुण गृहिणी! शरीर, मन व आत्मा यांच्या सौंदर्याचा मिलाफ घालणाऱ्या स्वतःच्या आरोग्याची काळजी गृहिणींनीं सर्वांआधीं घेतली पाहिजे ती याच कारणामुळें होय. अध्ययन किंवा करमणूक यांपैकीं कशाच्याहि मोहानें त्यांच्या शक्तीवर वाजवीहून जास्त ताण पडतां कामा नये. त्यांनीं या दोहोंतहि रमावें; पण, तें एका विशिष्ट मर्यादेपर्यंतच! आरोग्याला ज्यायोगें पूर्णता येईल आणि सौंदर्याची शुचिता ज्यायोगें स्पष्टपणें उठून दिसेल अशा प्रकारानेंच त्यांनीं अध्ययन किंवा मनोरंजन चालवावें.)

अंदमानच्या कांटेरी जीवनाचा सावरकरांना पुरेपूर अनुभव येत असूनहि, स्वतःच्या स्थितीचें वर्णन करतांना त्यांची रसिकता व स्फूर्ति जागृत होत होती. अशीं काव्यपूर्ण वर्णनें वाचतांना मनाला जितका आनंद वाटतो तितकाच विषादहि मनाला वाटतो. अशा वर्णनांचा मासला म्हणून पुढील उतारा लक्षांत ठेवण्यासारखा आहे:

When sometimes after such a sleep I wake in my cell and hear the waves idly breaking on the beach just outside my little, high-placed and barred window, I remember the lines of Kalidas: **प्रासादवातायनदृश्यवीचिः । प्रबोधयत्यर्णव एव सुप्तं ॥** and fancying myself like that king, I laugh and play and joke all with myself.

(अशा निद्रेनंतर कधींकधीं मी आपल्या कोठडींत जागा होऊन बसतों. या कोठडीला एक लहानशीच खिडकी आहे; तीहि खूप उंचावर आहे, आणि ती बंदहि केलेली आहे. तरीहि त्या खिडकीबाहेर खेळणारा, समुद्राच्या तीरावर उगीचच आपटणाऱ्या लाटांचा आवाज माझ्या कानांवर पडतो. तो आवाज ऐकला कीं, ‘प्रासादवातायनदृश्यवीचिः प्रबोधयत्यर्णव एव सुप्तं’ या कालिदासाच्या चरणांचें मला स्मरण होतें. मी स्वतः तो राजाच आहें अशी कल्पना करून, मी स्वतःशींच हंसतों, खेळतों नी गंमत करतों.)

या पत्रांत I was glad to know the whereabouts of my dear ‘Rishi’! Is he still in the ‘service’? Holds the same ‘office’? (माझ्या आवडत्या ऋषींचा पत्ता कळल्यामुळें मला आनंद वाटत आहे. पूर्वींच्याच अधिकारावर राहून ते अजून पूर्वींचीच सेवा करीत आहेत का?) अशीं वाक्यें आहेत. हें वाक्य वाचल्यावर असें वाटूं लागतें कीं, डॉ. सावरकर यांनीं धाडलेल्या पूर्वींच्या एखाद्या पत्रांत सांकेतिक भाषेंत श्री. अय्यर यांच्यासंबंधींची कांहीं तरी माहिती लिहिली असावी. महायुद्ध चालू आहे तोंपर्यंत आपल्या बंधूंनीं आपले

१ An Echo from Andamans: P. 50

भेटीस येण्याची खटपट करूं नये आणि जी खटपट योग्य वेळीं करावयाची तीहि थेट हिंदुस्थान सरकारकडे जाऊन करावी, असाहि इषारा सावरकरांनीं या पत्रांत दिलेला आहे. सावरकर सध्यां मुंबई शहरांत स्थायिक झाले आहेत; पण, मुंबई शहरांतलें वास्तव्य त्यांना मनापासून पसंत नसावें, असें या पत्रांतील एका वाक्यावरून दिसतें. आपल्या धाकट्या बंधूंनीं मुंबईऐवजीं बडोद्यास स्थायिक व्हावें असें सावरकरांनीं या पत्रांत सुचविलें आहे. तुरुंगांतील असह्य जीवनाची छाया पत्रांत उमटूं नये, याबद्दल दक्षता घेतल्यावरही ती छाया, ओझरती का होईना, या पत्रावर पडलीच आहे. अधिकाऱ्यांच्या कपाळावर दिसणाऱ्या आंठ्या, त्यांनीं चालविलेली आदळ-आपट, त्यांच्या वृत्तींतला कठोरपणा, त्यांच्याशीं सतत करावा लागणारा झगडा व शिस्तीच्या नांवावर पावलोंपावलीं होणारा कोंडमारा या सर्व गोष्टींमुळें आपल्या गुलाम-गिरीची जाणीव मनाला सतत बोंचीत असल्याचें वर्तमान सावरकरांनीं या पत्रद्वारा आपल्या बंधूंना कळविलें आहे.

अंदमानांत ज्या कटकटी वारंवार होत त्यांतल्या कांहीं कटकटी तर बारी आपल्या हस्तकांमार्फत मुद्दामच निर्माण करीत असे. नवीन आलेल्या राजबंदिवानांनीं अंदमानांतल्या कठोर पद्धतीला विरोध करण्याला सुरुवात केल्यामुळें व अशा कांहीं प्रसंगीं सुपरिंटेंडेंटकडून बारीचीच कानउघाडणी झाल्यामुळें बारी चिडून गेला होता. राजबंदी सुपरिंटेंडेंटविरुद्धच कारवाया करीत असतात असें सिद्ध व्हावें म्हणून, तो अनेक उचापती करूं लागला होता. सुपरिंटेंडेंटवर हल्ला करण्यासाठीं राजबंदी एक सुरा तयार करीत आहेत असें सिद्ध करण्याचा घाट त्यानें या सुमारास घातला.[1] या प्रकरणांत सावरकरांना गोंवण्याचा बारीच्या हस्तकांचा डाव होता. पण, सावरकरांच्या जागरूकपणामुळें तो डाव सफल होऊं शकला नाहीं. अशीं अनेक प्रकरणे उपस्थित करून त्यांच्या द्वारा सावरकरांची बदनामी करणें हा बारीचा एक चाळाच होऊन बसला होता. जागरूकपणा व हिकमतीपणा हे गुण सावरकरांच्या अंगीं नसते तर, बारीच्या या उपद्व्यापांपैकीं एखाद्या तरी उपद्व्यापाला यश आलें असतें. पण, हे गुण व अंदमानांतील सर्वसामान्य बंदिवानांची सावरकरांवर असणारी अढळ भक्ति यांमुळें सावरकर या सर्व प्रसंगांतून शीरसलामत बाहेर पडूं शकले.

बारी व राजबंदिवान यांच्या दरम्यान कामावरून जे खटके उडत ते सारखे चालूच होते. सध्यां हिंदुमहासभेचे सर चिटणीस असलेले श्री. आशुतोष लाहिरी यांचा व बारीचा १९१७ सालच्या प्रारंभीं असाच एक खटका उडाला. श्री. लाहिरी यांनीं दररोज दोन पौंड छिलका कुटला पाहिजे असा बारीनें आग्रह धरिला. आशुबाबूंसारख्या सुशिक्षित गृहस्थाला हा जुलूम असह्य वाटला. त्यांनीं या कामाचा इनकार केला व त्यामुळें झालेल्या अनेक शिक्षाहि त्यांनीं सोसल्या. शेवटीं तर त्यांना वेतहि मारण्यांत आले. पण याहि शिक्षेला त्यांनीं अत्यंत धैर्यानें तोंड दिलें. या

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. १२३-२४.

प्रकरणाची हकीकत हिंदुस्थानांतल्या 'बंगाली' वगैरे पत्रांतून पुढें १९१८ सालीं जूनमध्यें प्रसिद्ध झाली. या माहितीच्या आधारानें कै. सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं वरिष्ठ विधिमंडळांत दि. ५-९-१८ रोजीं बरेच प्रश्न विचारले. आशुबाबूंनीं आठ महिनेपर्यंत कष्टाचें काम केलें होतें तें बारीनें त्यांना कांहीं आश्वासन दिल्यामुळें केलें होतें. या आश्वासनाचा बारीनें भंग केल्यामुळें, आशुबाबू हट्टास पेटले होते व शेवटीं पंधरा फटके खावे लागले तरी त्यांनीं आपला हट्ट सोडला नव्हता. कै. सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं वरिष्ठ विधिमंडळांत विचारलेल्या प्रश्नांत एकट्या आशुबाबूंच्याच प्रकरणाचा उल्लेख करण्यांत आलेला नाहीं. भाई भानसिंग नांवाच्या शीख बंदिवानाच्या हालअपेष्टांचाहि उल्लेख या प्रश्नांत करण्यांत आलेला आहे. भाई भानसिंग यांचें काम पुरें झालें नाहीं या निमित्तानें बारीच्या मुतावळीनें एकदां त्यांना शिव्या देण्याला प्रारंभ केला. बारीहि या शिवराळपणाची साथ करूं लागला. त्याबरोबर भाई भानसिंगजींनीं सर्वांनाच परत अहेर करण्याला प्रारंभ केला. हें सहन न होऊन, आपल्या हस्तकांनीं भाई भानसिंगजींना ठीक करावें ( म्हणजे पिटून काढावें ) अशी बारीनें सूचना दिली. या प्रकरणामुळें बहुतेक सर्व राजबंद्यांनीं फार मोठ्या प्रमाणावर संप करण्याचा निर्धार केला.

इकडे अंदमानांत या गोष्टी घडत असतांना बाहेरच्या जगांत अनेक महत्त्वाच्या घटना घडत होत्या. क्रांतिकारकांच्या चळवळी नामशेष करून टाकण्याचा हिंदुस्थान सरकारनें निर्धार केला होता व त्यामुळें पंजाबमधील व संयुक्तप्रांतांतील खटल्यांच्या मागोमाग ब्रह्मदेशांत सांपडलेल्या क्रांतिकारकांवर खटला भरण्यांत आला होता. या खटल्यांत अनेकांना शिक्षा देण्यांत आल्या व १९१७ च्या मध्याच्या सुमारास या खटल्यांतले कित्येक आरोपी अंदमानांत धाडण्यांत आले. या सुमारास महायुद्धाला जें स्वरूप मिळालें होतें, त्यामुळें ब्रिटिश मुत्सद्यांच्या तोंडची भाषा तरी पुष्कळच सौम्य झाली होती. इंग्लंडचे पंतप्रधान मि. लॉइड जॉर्ज यांनीं दि. २७-४-१९१७ रोजीं केलेल्या एका भाषणांत ब्रिटिश वसाहती व हिंदुस्थान इत्यादि विभागांच्या सहकार्याचें साम्राज्याच्या स्थैर्याच्या दृष्टीनें किती महत्त्व आहे, हें स्पष्ट केलें होतें. ब्रिटिश मुत्सद्दी अशी भाषा बोलूं लागले आहेत त्या अर्थी आतां कांहीं तरी अधिकार मिळणार असें लोकमान्य टिळकप्रभृति पुढाऱ्यांना वाटूं लागलें होतें व हे अधिकार जास्तींत जास्त प्रमाणांत कसे पदरांत पाडून घेतां येतील यासंबंधींचे उद्योग त्यांनीं सुरू केले होते. दि. १२-५-१७ रोजीं नाशिक येथें ने. ना. शास्त्री यांच्या अध्यक्षतेखालीं झालेली मुंबई प्रांताची राजकीय परिषद हा अशा उद्योगांतलाच उद्योग होता. या परिषदेंत जे ठराव पास झाले त्यांत राजकीय कैद्यांच्या मुक्ततेचा ठरावहि पास झाला. हा ठराव अध्यक्षांनीं स्वतः मांडला व त्याच्या समर्थनपर बोलतांना ते म्हणाले : असलें कर्तव्य बजावण्यास कोणाहि देशाभिमानी गृहस्थानें कचरता कामा नये.

इंग्लंडच्या पंतप्रधानांचें वरील भाषण व हिंदी पुढाऱ्यांनीं चालविलेली चळवळ

यांच्या मागोमाग थोड्याच दिवसांनीं त्या वेळचे भारतमंत्री मि. मॉंटेग्यू यांनीं पार्लमेंटमधून एक महत्त्वाची घोषणा केली. दि. २०-८-१९१७ रोजीं करण्यांत आलेल्या या घोषणेचें स्वरूप द्विविध होतें. ब्रिटिश साम्राज्याचा एक स्वयंपूर्ण घटक म्हणून हिंदुस्थानच्या क्रमाक्रमानें विकास व्हावा व हिंदुस्थानला क्रमाक्रमानें जबाबदार राज्यपद्धतीचा व स्वयंशासनपद्धतीचा लाभ व्हावा अशी इच्छा या आश्वासनाच्या एका भागांत व्यक्त झालेली होती. त्या वेळपर्यंत सैन्यांतल्या वरिष्ठ अंमलदारीच्या जागा हिंदी लोकांना यावयाच्याच नाहींत असा सरकारचा कटाक्ष होता. ही आडकाठी यापुढें दूर होईल असें या घोषणेच्या दुसऱ्या भागांत स्पष्टपणें सांगण्यांत आलेलें होतें. या घोषणेनंतर मि. मॉंटेग्यू हे सुधारणांचा कच्चा मसुदा बरोबर घेऊन लौकरच हिंदुस्थानांत यावयास निघाले.

या सर्व घडामोडी घडून येण्याच्या अगोदरपासूनच अंदमानांत असलेल्या सावरकरप्रभृति राजबंदींना त्यांची अंधुक कल्पना आलेली होती. भानासिंग प्रकरणानंतर या राजबंदींनीं अंदमानांत जो संप केला तो फार मोठा संप होता. राजबंदींच्या गाऱ्हाण्यांचा समाधानकारक निकाल लावून घेणें हा तर या संपाचा एक हेतु होताच; पण, याखेरीज दुसराहि एक हेतु या संपाच्या बुडाशीं होता. नव्या सुधारणांच्या वाटाघाटी सुरू असतांना राजबंदिवानांच्या गाऱ्हाण्यांचा प्रश्न प्रामुख्यानें लोकांच्या व सरकारच्या पुढें असला तरच या गाऱ्हाण्यांचा समाधानकारक निकाल लागूं शकेल, अशा भावनेनेंहि हा संप करण्यांत आलेला होता. या संपाचा पुढाकार अंदमानांत नव्यानें आलेल्या राजबंदिवानांनीं घ्यावा, सावरकरप्रभृति जुन्या राजबंदिवानांनीं त्याचें समर्थन करून त्याच्या प्रसिद्धीची वगैरे व्यवस्था करावी, अशी श्रमविभागणी करण्यांत आलेली होती. या श्रमविभागणीमुळें बारीप्रभृतींना सावरकरांवर उघड आक्षेप असा कांहींच घेतां येईना. १९१७ सालच्या ऑगस्ट महिन्याच्या आरंभीं रात्रींच्या पहारेकऱ्यानें केलेली एक आज्ञा सावरकरांनीं अमान्य केली व त्यामुळें त्यांना इषाराहि देण्यांत आला. पण, भोंवतालचे अनेक राजबंदिवान उघडपणें संपांत सामील होत होते त्या मानानें ही आगळीक उपेक्षणीयच होती. सावरकरांवर आक्षेप घेतां येईल असें कांहींच घडलेलें नसल्यामुळें त्यांना या सालचें वार्षिक पत्र व्यवस्थितपणें लिहितां आलें. हें पत्र दि. ५-८-१९१७ रोजीं लिहिलेलें आहे.

या पत्रांतलाहि बराच भाग डॉ. सावरकर यांच्या गृहसौख्याच्या वर्णनानें व्यापलेला आहे. यापूर्वींच्या वर्षाभरांत सौ. येसू वहिनींना केव्हांतरी प्लेगनें पछाडलें होतें, अशाविषयींचा एक उल्लेख या पत्रांत करण्यांत आलेला आहे. मादाम कामा यांच्या संबंधींचा या पत्रांतला उल्लेखहि नेहमींप्रमाणें अत्यंत जिव्हाळ्याचा आहे. नात्याच्या संबंधापेक्षां स्नेहसंबंधच जगांत कसे टिकाऊ ठरतात हें सावरकरांनीं या पत्रांत स्पष्ट केलें आहे. आमच्या प्रकृतीविषयीं उगीच हृद्रोग लावून घेऊं नको असें या पत्रांत लिहून, सावरकरांनीं आपल्या भावाला असें सुचविलें आहे कीं, आपल्या

प्रकृतींत कांहीं चिंताजनक विकृति झालेली आहे. वर ज्या नाशिक परिषदेचा उल्लेख करण्यांत आला आहे, त्या परिषदेला सावरकरांनीं या पत्रांत धन्यवाद दिले आहेत. राजबंदिवानांचा प्रश्न कॉंग्रेसकडून कां दुर्लक्षिला जातो असा आश्चर्यगर्भ प्रश्न सावरकरांनीं या पत्रांत उपस्थित केला आहे. युद्ध संपल्यानंतर आपल्या बंधूंनीं आपल्या मुक्ततेसाठीं काय करावें हें सुचवितांना सावरकरांनीं पुढील वाक्यें लिहिलीं आहेत:[१]

As soon as the war ends, please to see if a public petition for our release could be sent. Such petitions and resolutions do not in themselves bring such a release; but, they, at any rate, make it more acceptable if it ever comes.

( युद्ध संपतांच आमच्या मुक्ततेसाठीं एक सार्वजनिक अर्ज धाडतां आला तर तो धाडून पहा. केवळ असे अर्ज व ठराव यांनीं मुक्तता घडते असा अर्थ नाहीं. पण, त्यामुळें निदान एक गोष्ट तरी घडून येते. केव्हांकाळीं मुक्तता झालीच तर ती स्विकार्य वाटण्याला या उपायांचा उपयोग होतो. )

भारतांतील लोकांनीं त्यांच्या सद्यःपरिस्थितींत जीवनांतल्या क्षणिक आनंदांचा स्वीकार करतांना कोणती वृत्ति धारण करावी या विषयाचें विवेचन सावरकरांनीं या पत्रांत केलेलें आहे. तें परतंत्र देशांतल्या प्रत्येक जाणत्या नागरिकानें लक्षांत ठेवण्यासारखें असल्यामुळें, त्यांतील पुढील वाक्यें[२] उद्धृत करणें अवश्य आहे :

While there is a brief respite, a passing ray of joy, a single touch of the spring, let us not forget the hardships of winter or foolishly depend upon a[ ]l get addiction to these wines of spring, while they are dancing in the cup. No ! No ! Our......of those who are born in India in this age...... our constant companion is winter and not spring ! Let us not forget—let no young man forget—that our life is a vast Sahara, unbearable and still [i]t be borne, sandy, burning !

( [ ] संपवून अल्पकाळ उसंत मिळाली, दुःख सरून आनंदाचा ओझरता किरण दृष्टीस पडला, हिंवाळा संपून वसंताच्या एकाद्या झुळुकेचा स्पर्श झाला तरी तेवढ्यानें आपण हुरळून जातां कामा नये. हिंवाळ्यांतील हालअपेष्टा विसरून आपलें चालणार नाहीं. वसंत काळच्या उन्मादकारी आनंदाच्या मद्यानें समोरचा पेला भरलेला दिसत असला तरी, त्यावर विसंबून राहण्याचा अगर त्याव[र] आसक्त होण्याचा वेडेपणा आपल्याला करतां येणार नाहीं. छे ! प्रस्तुत काळीं हिंदुस्थानांत जन्मलेल्या लोकांचा हिंवाळा हाच कायमचा सोबती आहे; वसंत नव्हे ! आपलें जीवन हें विस्तीर्ण अशा साहरा वाळवंटाप्रमाणें आहे. [तें] वालुकामय आहे, तें तापप्रद आहे. तें असह्य आहे. पण तें सोसल्याशिवाय मात्र गत्यंतर नाहीं, ही गोष्ट कोणाहि भारतीय तरुणानें विसरूं नये. )

---

१ An Echo from Andamans : P. 57.
२ ,, ,, : P. 58.

सावरकरांनीं हें पत्र लिहिलें त्या सुमारास सुरू झालेला संप पुढें जवळजवळ सहा महिने चाललेला होता. या संपांत ज्या मागण्या म्हणून ठरविण्यांत आलेल्या होत्या त्या लिहून काढलेल्या होत्या. त्या अधिकाऱ्यांच्या हवालीं करण्याचें काम दोघां राजबंदींनीं पतकरलें होतें. या दोघांपैकीं एकजण शीख असून दुसरा पंजाबी रजपूत होते.[1] प्रथम, अधिकारी या लेखी मागण्यांचा कागद घेईनात व त्यामुळें या दोघा राजबंदींनीं अन्नत्याग केला. कांहीं दिवस हा अन्नत्याग चालल्यावर अधिकाऱ्यांनीं मागण्याचा लेखी कागद स्विकारण्यांचा समंजसपण दाखविला; ही गोष्ट पदरांत पडल्यावर अन्नत्यागी शीखानें अन्नग्रहणाला सुरुवात केली.पण,त्याचा सहकारी अन्न घेण्याला तयार होईना. या शूरानें आपला अन्नत्याग जवळ जवळ सहा महिने चालू ठेविला. शेवटीं सावरकरांनीं युक्तीनें त्याचे मन वळविल्यावर व कांहींस रागाचें अवसान आणल्यावर त्यानें अन्न घेतलें. या संपाच्या गडबडींतच रामरक्षन् नांवाचा पंजाबी ब्राह्मण मरण पावला. यज्ञोपवीत धारण करून राहण्याचा ब्राह्मण बंदिवानांचा अधिकार मान्य केला जाईपर्यंत मी अन्न घेणार नाहीं, हा आपला आग्रह रामरक्षन् यांनीं प्राणाचें मोल देऊन पुरा केला. सध्यां तुरुंगातल्या बंदिवानाना आपापल्या पंथानुसार अवश्य तीं धर्मचिन्हें धारण करतां येतात याचें श्रेय रामरक्षन् यांच्या प्राणसमर्पणाला दिलें पाहिजे. या संपाच्या भानगडींतच ज्योतीशचंद्र नांवाच्या बंगाली राजबंदिवानाला वेड लागलें.

या सर्व भानगडींकडे सावरकरांना अवश्य तें लक्ष पुरवावें लागत होतें. त्यांची स्वतःची प्रकृति या सुमारास खंगत चाललेली होती. आपण या अंदमानी कारागारांत यापुढें फार दिवस टिकूं शकणार नाहीं असें वाटूं लागल्यामुळें, त्यांचें मन अधिकाधिक उदास व उद्विग्न होऊं लागलें होते. पहिलीं पांच सहा वर्षें त्यांच्या मनाला एकांतांत कविता रचण्याचा तरी उद्योग करतां आला. पण, आतां त्यांना एवढाहि मानसिक ताण सहन होईनासा झाला. अशा असहाय परिस्थितीत ते काळ कंठीत असतांना, दि. २० ऑगस्ट रोजीं भारतमंत्र्यांनीं केलेल्या घोषणेचें वृत्त त्यांना कळलें. आतां आपण कांहींतरी केलें पाहिजे असें त्यांच्या मनानें घेतलें आणि स्वतःशीं बराचसा विचार केल्यावर आणि बरोबरच्या राजबंद्यांशीं विचारविनिमय केल्यावर हिंदुस्थान सरकारला एक पत्र धाडण्याचें त्यांनीं निश्चित ठरविलें. दि. २-१०-१७ रोजीं अंदमानच्या अधिकाऱ्यांकडून त्यांना हें पत्र धाडण्याची अनुज्ञा मिळाली ही अनुज्ञा मिळतांच सावरकरांनीं हिंदुस्थान सरकारकडे जें पत्र धाडलें तें हिंदुस्थान सरकारला मिळाल्याचें वृत्त त्यांना दि. १-२-१९१८ रोजीं कळविण्यांत आलें. या पत्रांत सावरकरांनीं मुख्यतः तीन मुद्यांचें विवेचन केलेलें होतें. हिंदुस्थानला इष्ट ध्येयाकडे नेणारी घटना निश्चितपणें देण्यांत येत असेल तर जुना सशस्त्र क्रांतीचा मार्ग

---

[1] सोहनसिंगजी व सरदार पृथ्वीसिंगजी हीं या राजबंदिवानांचीं अनुक्रमवार नांवें आहेत.

तसाच पुढें चालविण्याचें क्रांतिकारकांना कारणच उरणार नाहीं, हा या तीन मुद्यांतला एक मुद्दा होता. सुधारणाविषयक हक्क आणि राजबंदिवानांची मुक्तता या दोन गोष्टी परस्परावलंबी आहेत असें या पत्रांत विस्तारपूर्वक सांगण्यांत आलेलें होतें. नुसत्या सुधारणा दिल्या आणि राजबंदिवानांना मात्र तुरुंगांतच डांबून ठेवलें तर, जुन्या जखमा तशाच वहात राहिल्यामुळें, सुधारणा देण्यांतलें सारें स्वारस्यच नष्ट होईल, उलट सुधारणा न देतांच राजबंदिवानाची मुक्तता केली तर ती मुक्तता त्यांना निष्फळ वाटेल, असा कोटिक्रम या पत्रात करण्यांत आलेला होता.[1]

या सुमारास सावरकरांची प्रकृति दिवसेंदिवस जास्तच क्षीण होत चालली होती. दि. ४–८–१९१८ रोजीं त्यांनीं आपल्या बंधूंना जें पत्र लिहिलें आहे त्या पत्राच्या उत्तरार्धांत त्यांनीं आपल्या आजारीपणाचें वर्णन केलें आहे, तें अत्यंत हृदयविदारक आहे. या वेळीं सावरकर किती थकले होते, हें या पत्रांत नमूद केलेल्या त्यांच्या वजनावरून स्पष्ट होत आहे. वर्षाभरापूर्वीं त्यांचें वजन ११९ पौंड होतें तें या वेळीं ९८ पौंडपर्यंत खालीं उतरलें होतें. वर्षातून एकदां बंधूंना पत्र लिहिण्याची संधि मिळाली म्हणजे उत्साहानें तरारून जाणाऱ्या सावरकरांना या वेळीं एकां दमांत तें पत्र पुरें करण्याचेंहि त्राण उरलें नव्हतें सध्यां आपली स्थिति काय झाली आहे हें बंधूंना कळवितांना सावरकर यांनीं पुढील वाक्यें[2] लिहिलीं आहेत :

Eight years I bore the burden well. Innumerable and unknown hardships tested my metal and an atmosphere of frowns and threats and sighs, of demoralising and disheartening stench tried to stifle the noble breath of life—but God gave me strength to stand and stand firm and face it all for these eight years or so. But now I feel the flesh has received wounds that are hard to heal and is day by day pining away.

(आठ वर्षेपर्यंत मी हा भार नेटानें सहन केला. अज्ञात अशा असंख्य आपत्तींनीं माझी कसोटी पाहिली. अधिकाऱ्यांच्या कपाळावरील आठ्या, त्यांनीं दिलेले धाक, आम्हीं सोडलेले उसासे अशा वातावरणांत मी हे दिवस काढले. माणसाला अवनतीप्रत पोंचविणारा व निरुत्साह करणारा जो दुर्गंध शेजारीं पसरला होता, त्यामुळें उदात्त जीवनाचा कोंडमारा चालला होता. पण, या सगळ्या परिस्थितींत टिकून राहण्याचें सामर्थ्य ईश्वरानें मला दिलें आणि उणीं पुरीं आठ वर्षेपर्यंत मी पाय रोवून उभा राहिलों आणि या सगळ्याला धैर्यानें तोंड दिलें. पण, आतां माझें मलाच असें वाटूं लागलें आहे कीं, या काळांत झालेल्या जखमा भरून निघणार नाहींत. प्रत्यही माझें शरीर अधिकाधिक क्षीण होत चाललें आहे.)

हें पत्र सावरकरांच्या बंधूंना मिळाल्याबरोबर त्यांतलि महत्त्वाचा भाग प्रमुख वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करण्यांत आला. १९१८ च्या सप्टेंबर महिन्यांत झालेल्या वरिष्ठ

---

१ An Echo from Andamans : Pp. 69-72.
२ „ „ : Pp. 74-75.

स्वदेशमंडळाच्या कामकाजांत ना.सुरेंद्रनाथ बानर्जी व ना. कामिनीकुमार चांदा यांनी अंदमानांतील राजबंदींविषयीं प्रश्न उपस्थित केले तेव्हां त्यांच्याकडून सावरकरांच्या या पत्रांचा उल्लेख करण्यांत आला. त्या वेळचे गृहमंत्री सर वुइल्यम व्हिन्सेंट यांनीं या प्रश्नांना उत्तरें दिलीं त्या वेळीं अंदमानांतील सर्व कैदी सुखरूप असल्याबद्दलचें अत्यंत धाष्ट्यांचें विधान त्यांनीं केलें. अंदमानसाठीं बिनसरकारी निरीक्षकांची ( Visitors ) समिती नेमण्याला सरकार तयार नाहीं, असेंही व्हिन्सेंट साहेबांनीं सांगून टाकलें. हें सर्व खरें असलें तरी, सावरकरांच्या प्रकृतीला चिंताजनक अपाय झालेला आहे ही गोष्ट सर्वत्र प्रसृत झालेली होती आणि त्यामुळें, सर्वांना सावरकरांच्या सुरक्षिततेविषयीं चिंता वाटूं लागलेली होती. दि. १९-९-१९१८ रोजीं कै० लोकमान्य टिळक सर व्हॅलेंटाईन चिरोल यांच्यावरील खटल्याच्या कामानिमित्त विलायतेस जाण्यास निघाले. त्या वेळीं त्यांच्या कानावर सावरकरांच्या प्रकृतिसंबंधींची ही हकीकत गेलेली होती. सावरकरांचे अंदमानांत होत असलेले हाल टिळकांना किती असह्य वाटत हें श्री. ग. म. नामजोशी, यांनीं लिहिलेल्या टिळकांच्या प्रवासांतल्या आठवणीवरून स्पष्ट होत आहे. श्री. नामजोशी, लिहितात :[१]

*पोर्ट सैदला गेलों....येथें आमचा मुक्काम ३-४ दिवस होता. असो. ह्या सुमाराला चिरोल खटल्यांतील पुस्तकें पाहावयाची मला इच्छा झाली व त्यांत दादांनीं ( टिळकांनीं ) दिलेली आपली स्वतःची संगतवार त्रोटक हकीकत पहावयास मिळाली. तसेंच सावरकर बंधू यांच्या खटल्यासंबंधींहि कांहीं कागद वाचावयास मिळाले. त्या वेळेस ते शिक्षेच्या अमानुष प्रकारासंबंधीं जवळ जवळ आपणाशींच बोलूं लागले : केवळ राष्ट्राचें कल्याण व्हावें या हेतूनें प्रयत्न करीत असतां जन्मठेपीची शिक्षा देण्यापेक्षां अशा माणसाला एकदम ठार मारून टाकला तर बरा; तुरुंगांत आपलें आयुष्य कंठीत असतांना बिचाऱ्याला किती मानासिक यातना सोसाव्या लागत असतात !*

पुढें दि. २४-१२-१९१९ रोजीं बादशहांनीं भारतीय राजबंदिवानांच्या मुक्ततेविषयीं जी घोषणा केली, तिचा उल्लेख यापुढील प्रकरणांत विस्तरशः करण्यांत येणार आहेच. या घोषणेसंबंधीं एक गोष्ट मात्र याच ठिकाणीं सांगितली पाहिजे. कै. लोकमान्य टिळक यांनीं इंग्लंडमध्यें असतांना ज्या अनेकविध खटपटी केल्या त्यांमध्यें राजकीय कैद्यांना माफी देण्यांत यावी अशा विषयींहि खटपट केली होती.[२] सावरकरांच्या पत्राच्या प्रसिद्धीमुळें बाहेर ज्या खटपटी सुरू झाल्या त्यांमध्यें मुंबईच्या नॅशनल युनियननें केलेल्या खटपटीला बरेंच महत्त्व आहे. सावरकरांच्या पत्रांत त्यांच्या आजारावर उपाय म्हणून जी एक गोष्ट प्रामुख्यानें सुचविलेली होती,

---

१ लो. टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका : खंड १ : पृ. ९१.
२ केसरी : दि. ३-१२-१९.

तिच्यावर भर देऊन या यूनियनच्या मॅनेजिंग कमेटीनें दि. २७–१०–१९१८ रोजीं असा ठराव संमत केला कीं, मुंबई सरकारनें सावरकरांना अंदमानांतून काढून दुसऱ्या कोठल्या तरी आरोग्यप्रद मुलुखांत तुरुंगांत ठेवावें. १९१८ सालच्या अखेरीअखेरीला महायुद्ध संपून इंग्लंडप्रभृति दोस्त राष्ट्रांचा विजय झाल्याबद्दलचे उत्सव सुरू झाले. या उत्सवांच्या निमित्तानें सरकारनें सर्व राजकीय कैद्यांची बंध-मुक्तता करावी, ही मागणी चोहों बाजूंनीं करण्यांत येऊं लागली. या वर्षी नाताळांत दिल्ली शहरीं काँग्रेसचें अधिवेशन झालें; त्यांत लोकांच्या मनांतील वरील भावना ठरावाच्या रूपानें प्रकट झाली.

महायुद्ध संपून त्याचा निकाल अशा रीतीनें लागल्यामुळें, युद्धकालांत व युद्धपूर्वकालांत भारताच्या स्वातंत्र्यासाठीं जिवापाड कष्ट करीत आलेल्या लाला हरदयाळजींच्या मनाला जबरदस्त धक्का बसला. ज्या लालाजींनीं १९१५ च्या आरंभापासून ब्रिटिश साम्राज्याविरुद्ध कारस्थानें करण्यांत आपलें बुद्धिसर्वस्व वेंचिलें होतें, ज्या लालाजींच्या प्रयत्नांमुळें जर्मनांच्या तहाच्या वाटाघाटींच्या एका खर्ड्यांत भारतीय स्वातंत्र्याची अट घालण्यांत आलेली होती[1] व जे लालाजी कैसरनें हिंदु-स्थानांत खलिफाला राजा करण्याचें अभिवचन दिल्यामुळें उद्विग्न झाले होते[2] त्या लालाजींना युद्धाचा शेवट अशा प्रकारचा झाल्यामुळें, आपल्या विचारांची सावरासावर करणें प्राप्त झालें. अशा मनःस्थितींत असतांना लालाजींनीं लिहिलेलें एक पत्र वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झालें होतें. बारीनें या पत्राचें कात्रण काढून तें सावर-करबंधूंना मुद्दाम दाखविलें.[3] लालाजींच्या या मतपरिवर्तनामुळें अंदमानांतल्या इतर राजकीय बंदिवानांना फारच विस्मय वाटला; लालाजींच्या मनःस्थितीची व भोंवतालच्या परिस्थितीची ओळख असलेल्या सावरकरांना मात्र या मतपरिवर्तनाचें आश्चर्य वाटलें नाहीं.

भारताच्या भवितव्यासंबंधीं लालाजींचे या वेळचे विचार काय होते हें 'Hardayal's Confession of Faith' या शीर्षकाच्या एका पत्रकावरून, उघड होत आहे. दि. ३–३–१९१९ रोजीं स्टॉकहोम येथून लंडनच्या 'इंडिया' पत्राकडे लालाजींनीं हें पत्रक प्रसिद्धीला धाडिलें. युरोपांत असलेल्या भारतीय क्रांतिकारकांशीं आतां आपला कांहीं संबंध उरलेला नाहीं असें सांगितल्यावर, लाला-जींनीं या पत्रकांत हिंदुस्थान, इजिप्त, इराणप्रभृति दुर्बळ राष्ट्रांच्या भवितव्या-संबंधींचीं आपलीं मतें व्यक्त केलीं आहेत. आशिया खंड व आफ्रिका खंड या भागांतील ब्रिटिश साम्राज्याचा विध्वंस झाला तर, तेथील नागरिकांच्या दृष्टीनें तें स्थित्यंतर कितपत हितावह होईल या प्रश्नाचें उत्तर देतांना लालाजींनीं असें म्हटलें आहे कीं,

---

१ सावरकरांचीं भाषणें : १९३९ : पृ. २२६.
२ „ „ : पृ. २२५.
३ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. १६६–६७.

ब्रिटिशांच्या जागीं दुसरे प्रबळ धनी येतील व त्यामुळें या देशांची स्थिति अधिकच अवघड होईल. युद्ध व क्रांति यांचें स्वरूप सट्टयासारखें आहे आणि हिंदुस्थान, इजिप्तप्रभृति देशांतल्या दुर्बळ लोकांनीं तरी या सट्टयाच्या नादीं लागूं नये, असें मत या प्रसिद्ध क्रांतिकारकाने नमूद करून ठेविले आहे. वायव्य सरहद्दीकडून भारतावर होणारें आक्रमण व त्या आक्रमणप्रसंगी भारताला निर्माण होणारा धोका यासंबंधींचें विवेचन करताना लालाजींनीं या पत्रकांत पुढील वाक्यें लिहिलीं आहेत :

The indispensible condition for the realisation of these aims is the defence of the North-Western Frontier against invasion We need British generals and officers for the defence of the country India alone cannot defend the Khyber; the British Empire alone can do it. The North-Western Frontier must remain inviolate under all circumstances! We must be prepared to make some sacrifices for this great boon. Our fathers have suffered in vain, if we forget this lesson of India's history.

( हे हेतु सफल व्हावयाचे असतील तर एक अट अपरिहार्य म्हणून पाळली पाहिजे. भारताच्या वायव्य सरहद्दीचें आक्रमणापासून संरक्षण हीच ती अट होय. देशाच्या संरक्षणासाठीं ब्रिटिश सेनानींची व अधिकाऱ्यांची आपल्याला गरज आहे; एकट्या हिंदुस्थानला खैबरखिंड सांभाळता येणार नाहीं. फक्त ब्रिटिशसाम्राज्यच ही कामगिरी करूं शकेल. परिस्थितींत कसाहि पालट पडला तरी; वायव्य सरहद्द अभंग राहिली पाहिजे. हा महत्त्वाचा फायदा पदरांत पाडून घेतां यावा म्हणून आपण कांहीं त्याग करावयालाहि सिद्ध झालें पाहिजे. भारतीय इतिहासाचा हा बोध आपण विसरलों तर आपल्या पूर्वजांनीं भोगलेल्या हाल-अपेष्टा आपण कुच-कामी ठरविल्या, असें सिद्ध होईल.)

युद्धाचा शेवट जवळ जवळ आल्याचें दिसूं लागतांच व संकटमुक्ततेचा सुस्कारा सोडण्याची संधि प्राप्त होतांच ब्रिटननें हिंदुस्थानातली स्वातंत्र्याची चळवळ कायमची दाबून टाकण्याच्या उपायांचें संशोधन सुरू केलें. आगामी राजकीय सुधारणांना दडपशाहीची जोड दिलेली नसली तर हिंदी लोक शेफारून जातील असें वाटल्यामुळें की काय, सुधारणांची सुरुवात होण्यापूर्वीच दडपशाही करण्याची सिद्धता करून ठेवण्यांत आली. भारतीयांनीं केलेल्या क्रांतिकारक कटांची चौकशी करून, अशा कटांचा कायमचा बंदोबस्त कसा होईल हें ठरविण्यासाठीं हिंदुस्थान सरकारनें १९१७ च्या शेवटीं न्यायमूर्ति रौलेट यांच्या नेतृत्वाखालीं जी समिती नेमिली होती तिनें आपला अभिप्राय १९१८ सालीं जुलै महिन्यांत सरकारला सादर केला. १९१८ च्या ऑक्टोबर महिन्यांत रणदेवता शांत झाली. त्यापूर्वीच, भारताला मिळणारे अपुरे राजकीय अधिकार व स्वातंत्र्योत्सुक भारताच्या मागें लागणारा दडपशाहीचा ससेमिरा या दोहोंचेंहि सूतोवाच झालेलें होतें. संगत चाललेल्या प्रकृतीच्या फिकिरींत असलेल्या सावरकरांना प्रामुख्यानें आपल्या प्रकृतीकडेच लक्ष द्यावें लागत होतें.

अंदमानांत असेंच रहावें लागलें तर अपमृत्यु आपल्याला निश्चित गांठणार हें त्यांना स्पष्टपणें पटल्यामुळें, तुरुंगांतच राहावयाचें ठरलें तरी, अधिक आरोग्यदायक तुरुंगांत राहतां आलें तर बरें असें त्यांना साहजिकच वाटूं लागलें होतें. मरणप्राय वेदना देणाऱ्या शारीरिक भोगाशीं झगडत असतांना, या वेदनांतून मुक्त होण्याच्या मार्गांचे संशोधन करण्यांत सावरकरांचें मन या काळांत सारखें गुंतलेलें असे. धरि न सोडण्याचा निर्धार केल्यावरहि सावरकरांचें मन या काळांत कांहीं प्रसंगीं किती निराशाग्रस्त होत असे हें त्यांनींच लिहिलेल्या पुढील उताऱ्यावरून[1] स्पष्ट होत आहे :

*केव्हां केव्हां प्रत्यहीं एक ना एक दुखणें मागें लागल्यानें वाटावें कीं, आतां हें देहवस्त्र अगदीं पांघरतां न येण्याइतकें जीर्ण झालें यांत शंका नाहीं. पण, क्वचित् प्रकृति पुढें सुधरेलहि ! पण, वाट तरी किती पाहा-वयाची ? सहा महिने, वर्ष-दीड-वर्ष गेलें...सोशीत राहिलों. शेवटीं निश्चय केला कीं, हे कारागार कहीं आम्हांस सुटण्याचा संभव दिसत नाहीं. आणि हें कारागार सुटत नाहीं तोंवर प्रकृति सुधारत नाहीं. मग पुढें उपयोगी पडेल म्हणून कसेंबसें तोलून धरलेलें हें शरीर—द्या ना फेंकून एकदांचें !*

'माझी जन्मठेप' या पुस्तकांत गेल्या महायुद्धाच्या अवधींतलें जें अंदमानी जीवनाचें वर्णन करण्यांत आलेले आहे त्यांत अंदमानांतील राजबंदिवानांच्या प्रोत्सा-हनानें करण्यांत आलेल्या कटांचा उल्लेख अनेकवार केलेला आढळतो. भाई परमानंद यांच्या 'आत्मवृत्तां'तहि अशा कटांचा उल्लेख कित्येक ठिकाणीं करण्यांत आलेला आहे. सावरकरप्रभृति राजबंदिवान अंदमानमधील हिंदु बंदिवानांना संघटित कर-ण्याच्या कामीं या काळांत चांगलेच यशस्वी झाले होते, ही गोष्ट संशयातीत आहे. अंदमानांत तुरुंगाबाहेर वसाहतींत रहाणारे जे अनेक हिंदु होते तेहि या संघटनेंत सामील झालेले होते. अशा प्रकारें संघटित झालेल्या लोकांच्या मनांत अंदमानी परिस्थितीच्या विरुद्ध बंड करण्याचा एक मार्ग म्हणून कांहीं कट रचण्याची बुद्धि उद्भवली नसेलच, असें सांगतां येत नाहीं. महायुद्धकाळांत अंदमानच्या संरक्षणा-साठीं कांहीं लष्करी बळ ठेवण्यांत आलेलें होतें हें खरें असलें तरी, या मर्यादित लष्करी बळाच्या मानानें अंदमानांतील संघटित हिंदूंचें बळ खात्रीनें अधिक होतें. एकदम उठाव करून, पहाऱ्यावर असलेल्या शिपायांच्या हातांत असणाऱ्या व टॉवर-मध्यें ठेवण्यांत आलेल्या बंदुका हस्तगत करून घ्याव्या, या बंदुकांचा अंदमानी अधि-काऱ्यांच्याविरुद्ध उपयोग करावा व अंदमानांत झिजत, सडत रहाण्यापेक्षां सुचेल त्या व साधेल त्या मार्गानें तेथून बाहेर पडण्यासाठीं झटावें, ही कल्पना सावरकरांनीं सुचविल्यामुळें म्हणा अगर स्वतःस्फूर्तीनें म्हणा, 'गदर' चळवळींत भाग घेऊन अंदमानांत येऊन पडलेल्या तरुण राजबंदिवानांच्या मनांत खेळत राहिली असेल, हें

1 माझी जन्मठेप : पूर्वार्ध : पृ. १७५.

शक्य दिसतें. अशा कटांचा आपापसांत काथ्याकूट चाललेला असतांना बारीच्या एकाद्या हस्तकाला त्यांचा सुगावा लागत असेल आणि तो हस्तक बारीपर्यंत ही बातमी पोंचवीत असेल, हेंहि अगदीं शक्य आहे. कटाच्या भीतीनें बारी या काळांत बाव-रल्यासारखा वागत असे तो अंशतः त्याच्या अंगीं असलेल्या संशयखोर वृत्तीमुळें वागत असे हें खरें असलें तरी, राजबंदिवानांनीं कट करण्याचा उद्योग अजिबात केलाच नसेल, अशी ग्वाही देणेंहि अवघड आहे. 'कांहीं गुण सोन्याचा, तर कांहीं सोनाराचा' हेंच तत्त्व या बाबतींतहि खरें ठरण्यासारखें आहे!

महायुद्धकालांत सावरकरांनीं 'कमला' काव्य पुरें करून 'गोमांतक' काव्याला सुरुवात केली असली पाहिजे. 'गोमांतक' काव्याचा पूर्वार्ध अनुष्टुभ छंदांत रचलेला आहे. तो तरी याच कालावधींत पुरा झालेला दिसतो. १९१८ नंतरच्या काळांत सावरकरांची प्रकृति दिवसेंदिवस अधिकाधिक क्षीण होत गेली व त्यामुळें त्यांना एकदोन वर्षें तरी काव्यरचनेचें कार्यहि करतां येईनासें झालें. ही सत्यस्थिति लक्षांत घेतली म्हणजे असें वाटूं लागतें कीं, 'वैनायक' वृत्तांत रचिलेला 'गोमांतक' काव्याचा उत्तरार्धहि या काळांत थोडाफार लिहिला गेला असावा. या दीर्घ काव्या-व्यतिरिक्त सावरकरांनीं ज्या छोटया कविता रचिल्या, त्यांमध्यें कारागारीय जीवना-संबंधींच्या कांहीं छोटेखानी चुटकेवजा कविता आहेत. अशा स्फुट कवितांमध्यें सावर-करांनीं या काळांत रचिलेली 'आकांक्षा' ही कविता फार चांगली आहे. या कवि-तेचे पहिले पंचेचाळीस श्लोक 'मंदाक्रांता' वृत्तांत रचिलेले असून शेवटच्या चार ओळी 'गीति' छंदांतल्या आहेत. कालिदासाचें 'मेघदूत' काव्य व मोरोपंतांच्या कर्णपर्वांतलें 'हंसकाकीय कथानक' यांची सांधेजोड करून 'आकांक्षा' ही कविता रचलेली आहे, हें अगदीं उघड आहे. सावरकरांनीं या कवितेसाठीं 'मेघदूता'चें मंदाक्रांता वृत्त वापरिलें आहे हें साम्य जसें कोणाच्याहि लक्षांत येण्यासारखें आहे त्याप्रमाणेंच, या कवितेंतला विचार व 'मेघदूतां'तील विचार यांच्यामधील साम्यहि सहज लक्षांत येण्यासारखें आहे. कुबेरानें शाप दिल्यामुळें कालिदासाच्या शापभ्रष्ट यक्षाला एक वर्षपर्यंत कान्ताविरह घडतो व शापावधींत त्याला रामगिरीवर जाऊन पडावें लागतें. सावरकरांच्या गरुडाचा शापावधी सात वर्षांचा आहे. या दीर्घकाळांत त्याला कान्ताविरहाचें दुःख भोगावयाचें नाहीं. स्वत्व विसरून, कावळ्यांच्या मेळाव्यांत कालक्रमणा करण्याच्या प्रसंगांतून या पक्षिश्रेष्ठाला पार पडावयाचें आहे. शापभ्रष्ट गरुडांपत्याच्या पोटीं जन्मलेल्या गरुडबालिकेला पडलेलें एक उदात्त स्वप्न हा या कवितेचा विषय आहे. विक्रमशाली विहगश्रेष्ठाची पट्टराणी म्हणून आपण नांदावें, अशी या गरुड बालिकेची 'आकांक्षा' असून, तिचें वर्णन या कवितेंत केलेलें आहे.

घोर अरण्यांत उडत चाललेले कावळे व त्यांच्या समवेत चाललेली गरुड-बालिका या सर्वांची अरण्यांत सर्पाशीं गांठ पडली तेव्हां कावळ्यांची तारांबळ

उडाली व गरुडबालिकेला स्फुरण चढूं लागलें. हंसाशीं स्पर्धा करूं पहाणाऱ्या कावळ्याची सागरोल्लंघनाच्या वेळी जी फजिती झाल्याचें मोरोपंतांनीं वर्णिलें आहे तीच फजिती कावळ्यांच्या वांट्याला आली, असें सावरकरांनीं वर्णिलें आहे. सर्प-विषाचा दाह असह्य होऊन कावळे कसे पडले हें सांगतांना सावरकरांनीं 'पक्षी पर्णासम टपटपा भस्म होती गळोनी' हा सुंदर चरण लिहिला आहे. सर्पाशीं चाललेलें गरुड बालिकेचें युद्ध ज्या श्लोकांत वर्णिलें आहे ते श्लोक युद्धाची मूर्तिमंत कल्पना उभी करणारे आहेत. त्यातला एकच श्लोक या ठिकाणीं उद्धृत केला तरी तेवढा पुरेसा होईल.

> चंचूंमाजी करकचुनियां मान तो रक्त ओकी ।
> ओकी रक्ता विहग वळसे चेपतां वक्ष तो कीं, ॥
> सोडीना हा खग परि फणा हा न वा ते लपेटे ।
> वैऱ्यांची त्या जटिल पलही झुंझ घे झोंप वाटे ! ॥

या गरुडबालिकेची शापभ्रष्ट माता, गरुडावर आसक्त होऊन आपल्या लेंकीनें सुखाचा जीव दुःखांत टाकूं नये असा उपदेश करीत आहे तोंच, वादळ सुरू होतें व त्यांत त्या गरुडबालिकेच्या प्रियकराचें शौर्य कसोटीला लागतें. वादळाच्या वेळचें सृष्टीचें रुद्रस्वरूप वर्णन करतांना सावरकरांनीं पुढील ओळी लिहिल्या आहेत:

> प्याली दारू प्रकृति सहसा दोल घे वादळांच्या ।
> चोपाळ्यांच्या वरि धरुनियां साखळ्यांशीं विजांच्या ॥

ही अप्रकाशित कविता प्रसिद्ध झाल्यावर तिच्या सूचितार्थाबद्दल टीकाकारां-कडून अनेक मतें व्यक्त केलीं जातील, हें अगदीं शक्य आहे. या कवितेंत कांहींच सूचितार्थ नाहीं. असें प्रस्तुत लेखकाला वाटत नाहीं. अंदमानांत सावरकरांच्या भोंवतीं जी दारुण परिस्थिति होती ती लक्षात घेऊन या कवितेंतून एका प्रकारचा सूचितार्थ काढतां येईल व सावरकरांचा एकंदर जीवनक्रम लक्षांत घेऊन या कवितें-तून आणखी एक अर्थ काढतां येईल, असें प्रस्तुत लेखकाला वाटतें.

> गाती जेव्हां करट वधुनी कटिकां पौरुषातें ।
> उच्छिष्टान्नें पळवुनि हळू ज्ञातकौशल्य वा तें ॥
> वाटे लज्जा विषम मज तैं मी जवें झेंप घेतें ।
> सिंधुपृष्ठीं तिमि उसळतां भीति वैषम्य त्यातें ॥

महायुद्धकालांत 'एम्डेन' प्रभृति जर्मन तरींच्या वार्ता अंदमानला धडका देऊं लागल्या त्या वेळीं भिन्नभिन्न प्रकारच्या व भिन्न भिन्न प्रकृतींच्या बंदिवानांच्या मनांतील 'आकांक्षा' कोणकोणतें रूप धारण करूं लागल्यां याचें सूचक दिग्दर्शन करणें हा अशा चरणांचा हेतु असूं शकेल, असें प्रस्तुत लेखकाला वाटतें. या कवि-तेचा हा परिस्थितिसापेक्ष अर्थ दृष्टीआड केला तर, तिच्यांतून दुसरा एक अर्थ सबूं

लागतो. दास्यांत रुतून बसलेलें राष्ट्र मनानें किती मलूल होतें, अशा राष्ट्रांतील पहिल्या शापभ्रष्ट पिढ्या राजकीय ध्येयाच्या दृष्टीनें किती अल्पसंतुष्ट बनतात व अशा शापभ्रष्ट पिढयांऱ्यामध्यें नांदणाऱ्या साहसप्रिय लोकांना कसे झगडे करावे लागतात, हेंह सुचविण्याचा या कवितेचा हेतु असूं शकेल

महायुद्धाच्या या अवधींत सावरकरांच्या मनांत हिंदुत्व हा विषय बऱ्याच प्रामुख्यानें घोळत होता. जाति, पंथ, इत्यादि कृत्रिम व अपायकारक बंधनांमुळें हिंदु जीवनाचा विशाल ओघ दुर्बल झालेला आहे. तो ओघ प्रभावशालीपणानें व नव्या जोमानें फिरून वाहूं लागला पाहिजे, अशा आशयाचे विचार दि. ६-७-१६ रोजीं लिहिलेल्या पत्रात सावरकरांनीं व्यक्त केलेले आहेत. या सुमारास सावरकराच्या कल्पनेंत खेळत असलेल्या 'गोमांतक' काव्यांत हिंदुत्वावरील आघात व त्या आघातापासून हिंदुत्वाचे रक्षण याच विषयाचा ऊहापोह केलेला आहे. हिंदुत्व या प्रबंधाचें विचारसूत्र या अवधींत गुंफिलें जात असल्यामुळें, त्याचें प्रतिबिंब सावरकरांच्या तत्कालिन लखनांत स्वाभाविकपणेंच उमटलेलें दिसत आहे. 'हिंदुत्व' या प्रबंधांत हिंदु शब्दाची जी श्लोकबद्ध व्याख्या दिलेली आहे, त्या व्याख्येंतले 'पितृभू' व 'पुण्यभू' हे शब्द सावरकरांच्या कल्पनेंत १९०८ सालींच खळत होते, हें या ग्रंथांत यापूर्वीच सांगून झालें आहे, 'आसिन्धु सिन्धुपर्यंता' ही हिंदु शब्दाची व्याख्या व हिंदुत्व या प्रबंधांतल्या विचारांची जंत्री १९१९ पूर्वींच केव्हां तरी हिंदुस्थानांत पोंचली होती. १९१८ च्या उत्तरार्धापासून तरी सावरकर आजारीपणानें अंथरुणाला खिळून पडलेले होते ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे असे निष्पन्न होतें की, 'गोमांतक' काव्याचा पूर्वार्ध, 'हिंदुत्व' या प्रबंधाची रूपरेषा वगैरे साहित्य १९१५ ते १८ या तीन वर्षांत बहुतेक सिद्ध झालेलें होतें.

---

## प्रकरण १५ वें

# सुटकेचे प्रयत्न व सुटका

१९१८ सालीं ऑगस्ट महिन्यांत अंदमानांतून लिहिलेल्या पत्रात सावरकरांनीं स्वतःच्या प्रकृतीविषयीं जो उल्लेख केला होता, त्यामुळें अंदमानांतील राजबंदींच्या स्थितीकडे व स्वतः सावरकरांच्या अवस्थेकडे सर्वांचेंच लक्ष वेधलें. यामुळें, त्यांच्या बंधूंना आजवर न मिळालेली त्यांच्या भेटीची परवानगी अखेरीस मिळाली. ही परवानगी मिळून डॉ. सावरकर यांनीं आपल्या बंधूंना भेटावयास जाण्याची तयारी चालविली तोंच, सावरकर–कुटुंबावर एक आपत्ति ओढवली! गणेशपंत सावरकर यांना १९०९ सालीं पकडण्यांत आलें तेव्हांपासून, अनेक आपत्तींशीं धैर्यानें झगडून सौ. येसूवहिनींनीं इतक्या वर्षांचा काळ आशेच्या आधारावर कंठिला होता. शेवटीं या माउलीला निराशेनें ग्रासलें; व इहलोकीं तरी आपली व आपल्या पतिदेवाची गांठ होण्याचा योग दिसत नाहीं असें वाटून, तिनें १९१९ सालच्या एप्रिल महिन्यांत आपली जिवनयात्रा संपविली. या पूर्वींच्या प्रकरणांतून येसूवहिनींची जी माहिती देण्यांत आलेली आहे तिच्या साहाय्यानें या स्त्रीरत्नाची योग्यता केवढी होती याविषयींची कांहीं कल्पना वाचकांनीं केली असेलच. पण, या माउलीची योग्यता नीटपणीं वर्णिली जावी म्हणून, खुद्द सावरकरांनींच आपल्या या मातृतुल्य वहिनींबद्दल काय म्हटलें आहे तें या ठिकाणीं सांगणें अवश्य आहे.[1] १९१९ सालीं सप्टेंबर महिन्यांत सावरकरांनीं अंदमानमधून पत्र लिहिलें त्या वेळीं त्यांना अशी अंधुक आशा वाटूं लागली होती कीं, सर्वच राजबंदी सुटण्याचा संभव निर्माण झाला असल्यामुळें — आणि आपली प्रकृति फार खालावलेली असल्यामुळें —सरकार कदाचित् आपल्याला बंधमुक्त करील. पण, आतां बंधमुक्त झालों तरी वहिनींच्या मृत्यूमुळें त्या मुक्ततेंतला निम्याहून अधिक आनंद नाहींसा झालेला आहे, असें सांगतांना सावरकर लिहितात :

Half the joy of any release fades into apathy at the thought of my going back to a home, where she is not likely to come to welcome me. My earliest friend, my sister, my mother and my comrade— all in one, all at once, she really died as dies a Suttee ! - Ah ! as truly as a martyr dies for his Land or Religion, do these Indian girls of to day die panting, withering, watching for the return of their lovers who are not destined to meet them; suffering in silence, serving though unknown, paying though unacknowl edged do these Hindu girls pine away and die for their motherland, for their religon.

---

1 An Echo from Andamans : P. 84.

(सुटका झाली नि आपण घरीं परत गेलों तरी, आपल्या स्वागतासाठीं पुढें सरसावणाऱ्या वहिनी आतां त्या घरांत नाहींत असा विचार मनांत आला कीं, सुटकेच्या कल्पनेमुळें वाटूं लागणाऱ्या आनंदाचा विरस होतो आणि मन उदास होऊन जातें! माझ्या दृष्टीनें वहिनी म्हणजे काय नव्हत्या ! माझ्या बालपणांतला जिवा-भावाचा मित्र, माझी भगिनी, माझी माता, माझा सहकारी हीं सर्व नातीं वहिनींच्या एका मूर्तींत एकदम एकत्र झालेलीं होतीं. पूर्वकाळच्या स्त्रिया सती जात त्याच पद्धतीनें वहिनीहि सती गेल्या आहेत. हुतात्मा जसा आपल्या मायभूमीसाठीं अगर धर्मासाठीं आपल्या प्राणांचें बलिदान करतो, तशाच, भारतांतल्या या तरुणीहि बलिदान करीत असतात ! त्यांचा जीव झुरणीस लागलेला असतो; त्यांचें शरीर सुकून चाललेलें असतें; त्यांच्या जिवलगांच्या वाटेकडे त्यांचे डोळे लागलेले असतात. या जिवलगांच्या व त्यांच्या भेटी होण्याचा योगायोग नसतो ! तोंडावाटें शब्दहि न काढतां, त्या आपलें दुःख सोशीत असतात त्याहि देशसेवा वा धर्मसेवा करीत असतात; पण, त्या सेवेचें ज्ञान मात्र कोणाला होत नाहीं. त्याहि देशकार्यार्थ वा धर्मकार्यार्थ मोलाच्या देणग्या देत असतात; पण, त्या देणग्यांची पोंच कोणाकडूनहि दिली जात नाहीं ! हिंदी युवती अशा रीतीनें झुरतझुरत मातृभूमीसाठीं आणि धर्मा-साठीं मृत्यूला कवटाळतात ! )

डॉ. सावरकर याना अंदमानांत जाऊन आपल्या बंधूची भेट घेण्याची परवानगी मिळाली त्या सुमारासच सावरकरांना हॉस्पिटलमधून बाहेर पडण्याची मुभा देण्यांत आली होती. जवळजवळ ७–८ महिने अंथरुणावर पडून काढल्यानंतर त्यांना ही परवानगी देण्यांत आली अन्न व रुग्णशुश्रूषा या बाबतींत यापुढेंहि कांहीं काळपर्यंत त्यांच्याकडे विशेष लक्ष पुरवावें अशी सूचना अंदमानच्या अधिकाऱ्यांकडून कनिष्ठांना देण्यांत आली. याचा अर्थ असा मात्र नव्हे कीं, एप्रिल १९१९ च्या सुमारास सावर-करांची प्रकृति सुधारली. १९१९ सालीं सप्टेंबर महिन्यांत त्यांनीं जें पत्र लिहिलें, त्यांतील उल्लेखावरून असें स्पष्ट दिसतें कीं, १९१९ सालभर त्यांची प्रकृति अस्वस्थच होती. मे महिन्यांत डॉ. सावरकर, गणेशपंत सावरकर व विनायकराव सावरकर या त्रिवर्ग बंधूंची सुमारें १२–१३ वर्षांनंतर फिरून एकत्र भेट झाली. या भेटीच्या वेळीं सावरकरांच्या प्रकृतीला किंचित् आराम वाटत होता. पण, जून महिना सुरू होऊन अंदमानांत पावसाचा त्रास होऊं लागतांच, त्यांच्या प्रकृतीला जो त्रास होऊं लागला त्याचें वर्णन त्यांनीं पुढीलप्रमाणें केलें आहे :[१]

After your going back, for a week or so it continued to be well and then again either a malarious fever or an attack of dysentry upsets it and takes a toil of a lb. or so, causing my weight to fall yet more and again it continues well for a week or a fortnight further Thus have I been going on and on and consequently my weight which, last year when

---

१ An Echo from Andamans : Pp. 77–78.

दे. भ. बाबाराव सावरकरांच्या पत्नी



सौ. येसू वहिनी

## १९२८ मधील छायाचित्रे

सावरकरांचे वडील बंधु



दे. भ. बाबाराव सावरकर

सावरकरांच्या भगिनी



माई काळे

सावरकरांचे कनिष्ठ बंधु



डॉ. नारायणराव सावरकर

I wrote to you. was on the average at 99 lbs., has for the last couple of months been at 96 lbs. and 95 lbs

(तूं येथून परत गेल्यावर जवळ जवळ आठवडाभर माझी प्रकृति ठीक होती. आणि मग फिरून त्रास सुरू झाला. कधीं हिंवताप यावा, कधीं हगवणीचा त्रास व्हावा, असें होऊं लागलें. त्यामुळें सगळा बिघाड होई आणि वजनांत पौंडाभराची घट होऊन तें आणखीच खालीं जाई. असे कांहीं दिवस गेले कीं, फिरून ८-१५ दिवस प्रकृति बरी राही. असा हा क्रम एकसारखा चालला आहे. याचा परिणाम माझ्या वजनावर झाला आहे. गेल्या सालीं मी तुला पत्र लिहिलें, तेव्हांचें माझें वजन सरासरीनें ९९ पौंड होतें. गेल्या दोन महिन्यांतलें माझें वजन अनुक्रमें ९६ व ९५ पौंड आहे.)

डॉ. सावरकर आपल्या दोघा भावांना भेटून परत मुंबईस आल्याचें वृत्त दि. २४-६-१९ च्या 'केसरी'त दिलेलें आढळतें. सौ. येसूवहिनी १९१९ सालीं एप्रिल महिन्याच्या उत्तरार्धात परलोकवासी झाल्या. त्यानंतर कांहीं दिवसांनीं डॉ. सावरकर हे 'भेट होईल' अशी खात्री करून घेऊन मुंबईहून निघाले. या त्रिवर्ग बंधूंची अंदमानांत जी भेट झाली, ती १९१९ सालीं मे महिन्याच्या शेवटीं-शेवटीं झाली असावी. संशयखोर सरकारी अधिकाऱ्यांनीं भेटीच्या प्रसंगीं आपली अक्कल लढविलीच. या भेटीच्या वेळीं पर्यवेक्षक हजर होताच. पण हे बंधु मराठींत बोलून कांहीं कटबीट करतील अशी भीति वाटल्यामुळें, मराठी जाणणाऱ्या एका वार्डरला पडद्यामागें मुद्दाम बसवून ठेवण्यांत आलें होतें. भेटीला आलेल्या मंडळींत येसूवहिनींची देवतातुल्य मूर्ति नाहीं हें पाहतांच, बाबा व तात्या यांच्या चित्तांत चर्र झालें! येसूवहिनींच्या मृत्यूची वार्ता ऐकल्यावर या उभयतांना दुःखाचा उमडा आला. सौ. येसूवहिनींची योग्यता आठवून हे दोघे धैर्यशाली पुरुष अश्रू ढाळूं लागले त्याबरोबर, डॉक्टर व सौ. माई यांचेंहि दुःख ताजेंतवानें झालें व क्षणभर सारींचजणें दुःखांत मग्न होऊन गेलीं. पण, पोटभर अश्रुविमोचन करून येसूवहिनींचें आनृण्य संपादण्याचीहि सोय नव्हती! कारण, एक तासात भेट संपावयाची होती. सौ. माई व तात्या यांची स्वतंत्र भेटहि अर्धा तासपर्यंत करविण्यांत आली. डोंगरीच्या तुरुंगांत या पति-पत्नींची १९१० सालच्या शेवटीं भेट झाली; त्यानंतर ९-९॥ वर्षांनीं अंदमानांत आतां ही भेट झाली! या भेटींत या उभयतांनीं परस्परांचें सांत्वन कसें केलें असेल व परस्परांना धीर कसा दिला असेल, १९१० सालांतली सावरकरांची सुदृढ प्रकृति व या वेळची त्यांची क्षीण झालेली, खचलेली, प्रकृति यांच्यामधील फरक लक्षांत आल्याबरोबर सौ. माईंच्या जिवाचें पाणी कसें झालें असेल, आपल्या सौभाग्याचा हा ठेवा कोठेंहि असो, पण, तो सुरक्षित असो, असें माईंनीं त्या अर्ध्या तासांत शंभर वेळां परमेश्वराला कसें विनविलें असेल वगैरे गोष्टी कल्पनाशक्तींत असणारा सहृदयपणाचा अंश जागृत करूनच वाचकांनीं समजून घेतल्या पाहिजेत.

इतकें दूर आल्यासारखें एकवार अंदमान पाहून घ्यावें अशी या मंडळींची इच्छा होती. पण, अंदमानच्या अधिकाऱ्यांनीं तीहि मान्य केली नाहीं. आपल्या लाडक्या बाळची प्रकृति सुदृढ आहे, या समाधानांत बाबा व तात्या यांनीं या सर्व मंडळींची रजा घेतली व ते फिरून आपापल्या कोठड्यांत जाऊन पडले ! भेटीला आलेल्या मंडळींना त्याच दिवशीं फिरून बोटीवर चढावें लागलें ! भेटीच्या वेळीं सर्वांना जितका आनंद वाटला, तितकाच विषाद भेट संपतांना त्या सर्वांना वाटला असला पाहिजे. स्वकीयांच्या विरहाची खोल जखम अंगवळणीं पडल्यासारखी झाल्यामुळें तिची पीडा सावरकरांच्या लक्षांत येईनाशी झाली होती. या भेटीमुळें ती पीडा तीव्रपणें जाणवूं लागली.

*एकाद्या तापाच्या रात्रींत, मध्येंच एक क्षणभर डोळा लागावा, एकादें गोड स्वप्न पडावें आणि क्षणांत पुन्हां जाग येऊन आजारी अंथरुणावर तळमळत पडावें, तशी या भेटीनंतर आपली अवस्था झाली,*

असें सावरकरांनीं कबूल केलें आहे.[1]

गेलीं ८–९ वर्षें राजबंदिवानांनीं अंदमानच्या 'परमेश्वरा'ला वठणीवर आणण्याचे जे प्रयत्न केले होते त्यांना या सुमारास फळ आलें होतें. बारी व त्याचे पठाणी-इस्लामी हस्तक यांची प्रतिष्ठा पार मावळली होती व बंदिवानांशीं माणुसकीनें वागणें प्राप्त आहे हें त्यांच्या ध्यानांत आलें होतें पठाणी अधिकाऱ्यांची वारंवार शोभा होत गेल्यामुळें, अधिकारपदावर कित्येक हिंदु बंदिवानांची योजना झाली होती, सावरकरांनीं अंदमानमधल्या बंदिवानांत जी संघटना केली होती व बंदिवानांच्या शिक्षणाच्या ज्या योजना त्यांनीं आखल्या होत्या त्यांचा लाभ या अधिकारपदस्थ बंदिजनांना मिळालेला असल्यामुळें, बंदिशाळेची अंतर्गत व्यवस्था सुरळीतपणें चालविण्याची जबाबदारी बारीनें त्यांच्यावर सोंपविली होती. भोंवतालची परिस्थिति कांहीं अंशीं सुधारलेली असली तरी, सावरकरांना आजारीपणामुळें वेळ अगदीं कंटाळवाणा वाटत असे. सावरकरांचें दुखणें क्षयावर जातें कीं काय, अशी शंका डॉक्टरलाहि येऊं लागल्यामुळें, स्वतः सावरकरांचे मनहि बरेंच अस्वस्थ असे. रुग्णालयांत विचार करीत पडावें, आपल्यापेक्षांहि कष्टद स्थितींत काळ कंठणारे आपले शेंकडों देशबांधव भारतांतल्या खेड्याखेड्यांतून उपेक्षित स्थितींत आहेत हा विचार मनांत आला कीं, आपण त्यांतल्या त्यांत सुखी आहों असें वाटावें, मुंग्यांचीं वारुळें, मांजरांचीं भांडणें, कोंबड्याच्या हालचाली, अंदमानी बुलबुलांचें सौंदर्य, यांतलें जें दृश्य दृष्टिपथांत येईल त्याच्या मदतानें मनाचें रंजन करावें, अशा रीतीनें महिनेच्या महिने घालवावे लागल्यामुळें, सावरकरांच्या मनावर कोणता परिणाम झाला हें पुढील सूचक वाक्यांवरून[2] लक्षांत येण्यासारखें आहे :

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ १८९.
२ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ १७९.

*कारागारांत एकांताच्या अतिरेकानें मन इतकें अंतर्मुख होतें कीं, त्यास बळानें बाहेर ढकलावें तरीहि तें बहिर्मुख होत नाहीं. बाहेरच्या गोष्टींत गुंगण्याची संवय सुटून जाते. तेच ते जुने विचार घोळीत बसण्याची भंगड संवय मनाला लागते.*

जगण्याची आशा मंदावत चाललेली आहे, शरीराचा क्षीणपणा प्रत्यहीं वाढत चाललेला आहे व बुद्धीचा उत्साह क्षणोक्षणीं मावळत चाललेला आहे. अशा परिस्थितींत, मृत्यूचे पाश शरीराभोंवतीं दृढतर होत चालल्याची जाणीव मनाला एकीकडे ग्रासीत असतांना, सावरकरांच्या मनांत जे मृत्यूसंबंधींचे विचार संचरले ते 'मरणोन्मुख शय्येवर' या कवितेंत व्यक्त झालेले आहेत. 'वैनायक' वृत्तांत लिहिलेल्या या कवितेचे २१८ चरण आहेत. मृत्यूसंबंधींच्या कवितांचें स्मरण जागृत करीत असतांना, प्रस्तुत लेखकाला आंग्ल कविश्रेष्ठ ब्राउनिंगच्या 'Prospice' या कवितेचें व टेनिसनच्या 'Crossing the Bar' या कवितेचें सहज स्मरण झालें. पहिल्या कवितेंतला धीरोदात्तपणा व दुसऱ्या कवितेंतला सूचक व शांत उदात्तपणा या गुणांबद्दल त्या कविश्रेष्ठांचें कौतुक केल्यावरहि प्रस्तुत लेखकाला असें म्हणावेंसें वाटतें कीं, 'कृतांतकटकामलध्वजजरा दिसूं' लागल्यावर या आंग्ल कवींनीं ज्या धैर्यानें मृत्यूला पाचारिलें आहे, त्या धैर्याच्या मानानें सावरकरांचें धैर्य निःसंशय श्रेष्ठ प्रतीचें आहे. ऐन तारुण्यांत, अंगीकृत व्रताच्या उद्यापनाच्या नादांत, अनंत यातना भोगल्यावर, मायभूमीपासून व मायेच्या माणसांपासून वियोग झालेला असतांना, मृत्यूचे कठोर पाश शरीराभोंवतीं करकचून आंवळले जात असतांना, भारताचा हा स्वातंत्र्यवीर

> ये मृत्यो ये । तूं ये ! यावयाप्रती ।
> निघालाचि असशिल जरि ये तरी सुखें !

असें छातीठोकपणें मृत्यूला सांगत आहे, हें पाहिलें म्हणजे या स्वातंत्र्यवीराच्या धृतीला धन्यवाद दिल्याशिवाय कोणाच्यानेंहि राहवणार नाहीं. ग्रीक पौराणिक कथेंतला प्रॉमिथियस हा एका खडकाला बांधलेला होता. एक गिधाड त्याच्या शरीरांतल्या मांसाचा प्रत्यहीं हप्त्याहप्त्यानें अपहार करीत होतें. अशा वेदनापूर्ण मृत्यूला तोंड देणाऱ्या प्रॉमिथियसच्या धैर्याचें व शौर्याचें जें कौतुक त्रिखंडांत आजहि केलें जातें, तेंच कौतुक 'ये, मृत्यो ये' हे उद्‌गार काढणाऱ्या सावरकरांच्याहि वांट्याला आलें पाहिजे.

माझ्या पेल्यांत अश्रूंच्या मदिरेशिवाय दुसरें कांहीं शिल्लक राहिलेलें नाहीं, ती अक्षय्य मदिरा नैवेद्य म्हणून तुला प्रिय असेल तर खुशाल ये व त्या नैवेद्याचा स्वीकार कर, अशी मृत्यूला विनंति करून आपण ऐन तारुण्यांतच ऋणमुक्त कसे झालों आहों हें कवीनें विस्तारानें सांगितलें आहे. देवर्षिपितरांचें ऋण आपण कसें

फेडलें हें विस्तारानें सांगतांना देव-ऋणमुक्ततेचें वर्णन आलें आहे. त्यांतील पुढील भाग शब्दागणिक हृदयद्रावक आहे :

आणि त्याचे रणयज्ञाग्नींत पेटल्या ।
अस्थि अस्थि मांस मांस इंधनें तशीं ।
जळत जळत आज असे शेष राहिली ।
राख यौवनाची मम !

पितरांच्या ऋणांतून मुक्त होण्यासाठीं आपण आज शास्त्रानुसार दत्तविधान करीत आहों असें सांगून, 'अभिनव भारतां' तलीं सर्व लेंकरें मानववंशाच्या गौरवार्थ आपण दत्तक घेत आहों असें ज्या चरणांत कवीनें सांगितलें आहे त्या चरणांतला जिव्हाळा, विश्वप्रेम इत्यादि गुण अत्यंत श्रेष्ठ दर्जाचे आहेत. ज्या मानवजातींतल्या एका वंशानें देशस्वातंत्र्यासाठीं तळमळणाऱ्या या तरुण कवीचे इतके हाल केले त्या वंशाबद्दलचा रोषद्वेषाहि या ठिकाणीं मावळला आहे व मानव्याशीं तद्रूपता पावून हे चरण स्फुरलेले आहेत :

पितृऋणा फेडाया आजि अहो मी ।
शास्त्रातें अनुसरोनि, दत्तविधानें ।
निपुत्रिकत्व वारियलें : पुत्र अखिल हे
अभिनव भारतचीं मम ! जेथजेथ कीं ।
पाळण्यांत विलसतसे नयनकमल तें ।
तेथ तेथ मींच बघें सृष्टि कुतुहला ।
ज्या ज्या स्मितमधुर मुखीं मधुर विलसते ।
कैशोरी कोमलता, प्रेमपूर्ण कीं ।
तें तें मुख बघतांची हृदयिं माझिया ।
वत्सलता ये उचंबळोनि आणखी ।
नवउन्नति शील भालपटलिं दिसत जें ।
उदयोन्मुख तेज तरुण, तें पुनःपुन्हां ।
माझ्याही उदयोन्मुख होति हृदीं या ।
आशा नव, आकांक्षा उच्च, भावि त्या ।
आमुचिया वंशाच्या गौरवाचिया ।
भारतीय केवल ना, मानवीय कीं ।
वंशाच्या गौरवार्थ ! तरुण कोंवळीं ।
सर्व मुलें माझीचीं ! अखिल मानवी ।
यौवनांत अनुभवीन यौवनास मी ।

पृथ्वीच्या महासंग्रहालयांतलीं अनेक दृश्यें आपण पाहिलीं आहेत, अनेक अनुभव आपण अनुभाविले आहेत, असें सांगतांना कवीनें आपल्या कुलांतल्या व्यक्तींचें स्मरण केलें आहे व कवि म्हणून आपण जी मान्यता मिळविली तिच्याबद्दल समाधान व्यक्त केलें आहे, या कवितेंतला हा भागहि संस्मरणीय आहे :

सत्कुल, अव्यंग देह, परम दयाळू ।
जनक आणि जननी ती; त्याहुनीहि कीं,
वात्सल्यें पुण्यें, प्रतिपाळिता तसा,
अग्रज जो अग्रगण्य तापसांमधें;

*　　　*　　　*

कांहींशी मान्यताहि शारदेचिया ।
राजसभेमाजी कविरत्नभूषिता ।

इच्छेच्या बीजांतून उपभोगाचीं फलें निर्माण व्हावीं व या फळांतलीं इच्छेचीं बीजें फिरून चौफेर पसरावीं, हा क्रम न संपणारा आहे असें सांगण्यासाठीं कवीनें ययातीचें उदाहरण दिलें आहे व मृत्यूला असें सांगितलें आहे कीं, जिवनाचा लेख या पानावरच संपावयाचा असला तरी तो संपविण्याला आपली तयारी आहे. ही तत्परता ज्या जाणिवेंतून निर्माण झाली, त्या जाणिवेचें वर्णन पुढील ओळींत करण्यांत आलेलें आहे :

म्यां असतां दिवस नसे व्यर्थ गमविला ।
दिवसास्ताचेंहि म्हणुनि दुःख ना मला ।

मृत्यूनंतरचा आपला प्रवास सुखकरच होणार अशा विश्वासानें उत्स्फूर्त झालेल्या या कवीनें 'नहि कल्याणकृत्कश्चित् दुर्गतिं तात गच्छति', व 'शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टश्च जायते' या गीतावचनांचा हवाला दिला आहे. 'अदृष्ट नगरांतले सर्वोत्तम बंगले आपल्यासाठीं राखून ठेविलेले आहेत ही जाणीव मृत्यूलाहि व्हावी म्हणून कवि म्हणतो :

मरणाची वेस जयामाजि उघडते ।
त्या अदृष्ट नगरांतिल अति सुरम्य ते ।
राखवूनि ठेवियले असाति बंगले ।
आधींची आम्हांस्तव भरुनियां अम्ही ।
कर्माच्या धर्माच्या, नियत विसारा !

मृत्यूमुळें दुसरेंतिसरें कांहीं होत नसून जीव अभावांत ओसरत असेल तर, एका विपलांत 'माझा मी' विश्वाच्या अंतर्हित 'मीं'त मावळून जाईल व असें घडलें तर,

मरण म्हणजे मरण न ठरतां ती मुक्तीच ठरेल असा कोटिक्रम करून कवीनें मृत्यूला विनविलें आहे : येणार असशील तर झटकन ये !

मृत्यूपेक्षां मृत्यूच्या परिवारांतले रोग वगैरे सैनिकच जास्त भयप्रद असतात असें सांगितल्यावर कवीनें मृत्यूला म्हटलें आहे : जे लोक तुझ्या स्वागतासाठीं सिद्ध नसतील त्यांच्यावर या सैनिकांची धाड चाल करून गेली तर तें क्षम्य ठरेल; माझ्या बाबतींत तसा कांहीं प्रकार नाहीं.

मी तों जीं नुघडतील फोडिलीं तरी ।
जाणाराचि, तीं दारें उघडुनी स्वयें ।
या माझ्या गेहाचीं, स्वागता असें ।
अनिवार्या सिद्ध तुझ्या ! म्हणुनि शक्य कीं
ये तरि, हे अखिल वीर-वीर-विजेत्या !
एकलाचि, अपुरस्सर, आणि अकस्मात् ।

आपल्या सैनिकांसह येण्याचीच तुझी इच्छा असली तरीहि माझी इरकत नाहीं, आज दोन वर्षें मी शरपंजरीं खिळून पडलों आहें व रोगांशीं झगडत आहें, तसाच अखेरपर्यंत झगडण्याला मी सिद्ध आहें असें सांगून, कवीनें हा सोशिकपणादेखील कर्तव्यपालनाचाच एक भाग आहे असें कवितेच्या शेवटीं सांगितलें आहे. यमाच्या नजरेला नजर भिडविणाऱ्या नचिकेताची कथा ज्यांना असंभाव्य वाटत असेल, त्यांनीं ' मरणोन्मुख-मृत्युशय्येवर ' ही कविता तादात्म्य वृत्तीनें वाचावी; नचिकेताच्या कथेंत फार खोल अर्थ असल्याचा साक्षात्कार त्यांना झाल्याशिवाय राहणार नाहीं !

मृत्यूशीं झगडा करीत सावरकर यांनीं दोन वर्षें काढलीं हें ' मरणोन्मुख-मृत्युशय्येवर ' या कवितेंत सूचित झालेंच आहे. दि. २१-९-१९१९ रोजीं सावरकर यांनीं डॉ. सावरकर यांना पत्र लिहिलें त्यांतहि प्रकृतीच्या अस्वास्थ्यासंबंधींचे हृदय-विदारक उल्लेख आहेतच. सर्व परिस्थितीचा विचार केला तर असें म्हणावें लागतें कीं, १९१७ सालापासून सावरकरांची प्रकृति खंगत चालली ती १९१८ व १९१९ या दोन वर्षांत फारच बिघडली. १९१९ सालच्या अखेरीअखेरीस त्यांची प्रकृति सुधारूं लागली तोंच गणेशपंतांची प्रकृति भयंकर बिघडली ! गणेशपंतांचा आजार, अधिकाऱ्यांनीं त्यांच्या बाबतींत केलेली अक्षम्य हेळसांड इत्यादींचें वर्णन सावरकरांनीं लिहून ठेविलें आहे[1] तें वाचण्याजोगें आहे :

*माझी मरणोन्मुख शय्या गुंडाळून ठेविली न ठेविली तोंच ती पुन्हां पसरावी लागली; ती माझ्या ज्येष्ठ बंधूंसाठीं !...काळ्या चवाळ्याचा कोट घालून, पित्ताशय बिघडून ठणका लागल्यामुळें वांकून चालत ते रुग्णालयांत जात आहेत, तिथें एक उद्धट आणि मेणघुणा हिंदी मद्रासी मेडिकल असिस्टंट*

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ.१८३.

*डोळे वटारून, बूट आपटून, त्यांस किंचित् ओढाताण करून म्हणत आहे, " कुठें दुखतें आहे ?...लबाडी आहे सगळी !" आणि, या अपमानानें खिन्न होऊन, त्याचा प्रतिवाद करण्यासाठीं पुन्हां रुग्णालयांत जायचेंच नाहीं ...म्हणून निश्चय करीत तो कष्टभोगी देशभक्त...खोकल्यानें एकसारखी ढांस लागलेल्या स्थितींत कण्हत आपल्या कोठडीकडे परत नेला जात आहे—तो दुःखद देखावा मला अजून दिसत आहे...अंदमानमध्यें असेतों त्यांच्या त्या दुखण्याची हेळसांडच चालली होती. ते एका चाळींत खोकूं लागले कीं, बाजच्या दोन्ही चाळींत ती ढांस ऐकणारास घाबरें करी ...अशा स्थितींत त्या कर्मवीरानें अंदमानांत शेवटचें दीड वर्ष घालविलें.*

अंदमानांत सावरकरबंधूंच्या प्रकृतीला असे हेलकावे बसत होते त्या अवधींत महायुद्धांत ब्रिटिश सरकारचा विजय झाला म्हणून कैद्यांना मुक्त करण्यांत यावें ही मागणी जोर धरूं लागली होती. १९१९ च्या जून जुलै महिन्यांत बिनराजकीय कैद्यांपैकीं कित्येकांची मुक्तता होऊं लागली. प्रांतिक सरकारांच्या मतांचा विचार करून, राजकीय कैद्यांचीहि मुक्तता केली जाणार आहे, अशी वार्ता प्रसृत झाली. पंजाबांतल्या लष्करी कायद्याच्या काळांत ज्यांना कठोर शिक्षा देण्यांत आल्या होत्या त्या लाला हरकिसनलाल प्रभृतींची मुक्तता व्हावी, अशी मागणी करण्या-साठीं न्यायमूर्ती चंदावरकर यांनीं थेट व्हाइसरॉयांची भेट घेतली. बाहेर घडत असलेल्या अशा गोष्टींकडे सावरकर यांचें लक्ष होतें हें दिनांक २१–९–१९१९ रोजीं लिहिलेल्या पत्रांतल्या पुढील उताऱ्यावरून [२] स्पष्ट होत आहे :

I do not know whether you in India know anything about the order that was read out here on the day of the peace celebrations in England, concerning the amnesty of prisoners. On that day or owing to the remission granted on that day, some convicts have upto this time been released from that convict colony. But so far as the political prisoners are concerned, nothing beyond the vaguest promises was done, not a simple day's remission has been as yet positively granted to any of them barring a couple of Bengali P. P. S.

( इंग्लंडांत झालेल्या विजयोत्सवाच्या दिवशीं येथें बंदिविमोचनाविषयींचा एक हुकूम वाचून दाखविण्यांत आला. या हुकुमाचें वृत्त हिंदुस्थानांत तुम्हांला मिळालें आहे कीं नाहीं कोण जाणे ! त्या दिवशीं—किंवा त्या दिवशीं जी सूट देण्यांत आली तिच्यामुळें—या गुन्हेगार वसाहतींतले कांहीं गुन्हेगार कैदी यापूर्वी बंधमुक्त करण्यांत आले आहेत. पण, अत्यंत मोघम अशा आश्वासनांपलीकडे राजबंदिवानांच्या बाबतींत अद्याप तरी कांहीं घडलें नाहीं. एकदोघा बंगाली राजबंदिवानांव्यतिरिक्त इतरांना एक दिवसाची सूटसुद्धां पक्केपणीं देण्यांत आलेली नाहीं ! )

---

१ केसरी : दि. १५–७–१९.

२ **An Echo from Andmans : P. 79.**

राजबंदींची मुक्तता व्हावी या मागणीला लोकमताचा जोरदार पाठिंबा आहे हें सिद्ध व्हावें म्हणून मुक्ततेच्या मागणीअर्जावर शेंकडों लोकांच्या स्वाक्षऱ्या घेतल्या जाव्या ही सावरकरांची सूचना अंमलांत आणण्याचें काम मुंबईच्या ' नॅशनल यूनियन 'नें अंगावर घेतलें. श्री. अ. ह. गद्रे हे अत्यंत उत्साहानें स्वाक्षऱ्या मिळविण्याचें काम करूं लागले. सेनापति बापट यांनीं हें काम पुण्यास जोरानें सुरू केलें. दि. ११-११-१९ रोजीं पुण्यास सार्वजनिक सभेच्या दिवाणखान्यांत या मागणीचा पुरस्कार करण्यासाठीं सभा होऊन, प्रो. शि. म. परांजपे, सभाध्यक्ष श्री. सी. के. दामले प्रभृतींचीं भाषणें झालीं. प्रो. परांजपे यांनीं या प्रसंगींच्या आपल्या भाषणांत पुढील उद्गार काढिले :

*या विजयोत्सवप्रसंगीं सरकार आम्हांस सर्वत्र दीपोत्सव करण्यास सांगत आहे. सरकारच्या या सूचनेस अनुसरून आम्हीहि अशी विनंति करतों कीं, तुमच्या राज्यकारभारावर जो एक काळा डाग आहे तेवढा काढून टाकून, तुम्हीहि राजकीय कैद्यांच्या अंधारकोठड्या खुल्या करा; म्हणजे आमच्या घरोघरीं आपोआपच आनंदानें दीपोत्सव होईल.*

बाहेर राजबंदिवानांच्या मुक्ततेसाठीं ही खटपट चालली असतांनाच, अंदमानांतल्या एका राजबंदिवानावर अन्नत्याग करण्याचा प्रसंग आला. अंदमानचा चीफ कमिशनर व भाई परमानंद यांची कांहीं बोलाचाली होऊन, भाईजींनीं अन्नत्याग करण्याचा निर्धार केला. यापूर्वींच भाईजी जीविताला कंटाळले होते; या ताज्या प्रसंगामुळें त्यांची उद्विग्नता परमावधीला पोंचली. अन्न वर्ज्य करून ते एक आठवडाभर आपल्या कोठडींत पडून राहिले. पुढें त्यांना सक्तीनें अन्न घालण्यांत येऊं लागलें. असा प्रकार जवळ जवळ दोन महिने चालला होता.[१] इतक्यांत दि. २४-१२-१९ रोजीं राजबंदिविमोचनासंबंधींचा बादशाही जाहीरनामा प्रसिद्ध झाला. भाईजींनीं आपला अन्नत्याग थांबवावा अशी खटपट सावरकरप्रभृतींनीं यापूर्वींपासूनच सुरू केली होती. बादशाही जाहीरनाम्याचा फायदा ज्या राजबंदिवानांना मिळण्याचीं निश्चित लक्षणें दिसत होतीं त्यांत भाईजी असल्यामुळें, त्यांचा अन्नत्याग थांबविण्याची खटपट फिरून सुरू झाली. शेवटीं सुटका निश्चित होणार असें दिसल्यावर, भाईजींनीं आपला अन्नत्याग थांबविला.

दि. २४-१२-१९ रोजीं राजबंदीविमोचनासंबंधींचा बादशाही जाहिरनामा प्रसिद्ध झाला त्यांतील महत्त्वाचा भाग पुढीलप्रमाणें आहे :

It is My earnest desire at this time that, so far as possible, any trace of bitterness between My people and those who are responsible for My Government should be obliterated. Let those, who in their eagerness for political progress, had broken the law in the past, respect it in the future. Let it become possible for those, who are charged with the

१ The Story of my Life by Bhai Parmanand : Pp. 161-62

maintenance of peaceful and orderly Government to forget the extravagances which they have had to curb. A new era is opening ...I therefore direct my Viceroy to exercise in My name and on My behalf My Royal clemency to political prisoners in the fullest measure which, in his judgment, is compatible with the public safety. I desire him to extend it on this condition to persons who, for offences against the state or under any special or emergency legislation are suffering imprisonment or restriction upon their liberty.

(आमचे प्रजाजन व राज्यकारभाराची जबाबदारी वाहणारे अधिकारी यांच्यामधलि कटुपणाच्या खाणाखुणा शक्यतोंवर पुसल्या जाव्या अशी आमची सद्यःकाली मनःपूर्वक इच्छा आहे. राजकीय प्रगतीसाठीं अधीर झालेल्या ज्या लोकांनीं यापूर्वीं कायद्याचें उल्लंघन केलें त्यांनीं यापुढें कायद्याचें पालन करावें. देशाची राज्यव्यवस्था शांततेनें व व्यवस्थेनें चालविण्याची जबाबदारी ज्यांच्यावर सोंपविण्यांत आली आहे, त्यांनीं यापूर्वीं अतिरेकांचें दमन केलेलें आहे. हे अतिरेक विसरून जाणें या जबाबदार लोकांना शक्य होवो. सध्यां एका नव्या मन्वंतराचा प्रारंभ होत आहे...यासाठीं, आम्ही आमच्या प्रतिनिधीला आमच्या नांवानें व आमच्या वतीनें क्षमादान करण्याचा आदेश देतों. राजबंदिवानांना ही क्षमा भरपूर प्रमाणांत देण्यांत यावी. हें क्षमादान सार्वजनिक सुरक्षिततेला धरून आहे कीं नाहीं हें आमच्या प्रतिनिधीनें विवेकपूर्वक ठरवावें. सरकारविरुद्ध गुन्हे केल्यामुळें किंवा विशेष कायद्यांचें अगर आणीबाणीच्या प्रसंगासाठीं केलेल्या कायद्यांचें उल्लंघन घडल्यामुळें, जे कारावासांत आहेत अगर ज्यांचें स्वातंत्र्य निर्बंधित झालेलें आहे त्या सर्वांना या अटीवर या क्षमेचा लाभ मिळावा, अशी आमची इच्छा आहे.)

बादशहांनीं औदार्यानें राजबंदिवानांना क्षमादान केलें असलें तरी, कोठावळेपणा करूं इच्छिणाऱ्या स्थानिक अधिकाऱ्यांना बादशहाच्या शब्दांतून शंभर पळवाटा काढतां येतील हें ओळखून, या क्षमादानाच्या जाहीरनाम्यानंतर आठवडाभरांतच अमृतसर येथें झालेल्या काँग्रेसच्या नेत्यांनीं काँग्रेसच्या अधिवेशनांत राजबंदिवानांच्या मुक्ततेच्या प्रश्नावर भर दिला. अमृतसर काँग्रेसमध्यें पास झालेल्या ठरावांतला बारावा ठराव याविषयींचा असून, त्याचा आशय पुढीलप्रमाणें होता : बादशाही जाहिरनाम्यांतील राजकीय कैद्यांच्या मुक्ततेच्या कलमाप्रमाणें हिंदुस्थानांतील व अंदमानांतील कैदी अद्याप मुक्त करण्यांत आलेले नसून, बादशाही जाहीरनामा ज्या उदार वृत्तीनें काढण्यांत आला त्याच वृत्तीनें त्याचा विचार व्हावा. काँग्रेसच्या बरोबर अमृतसर येथेंच मुस्लीम लीगची बैठक झाली. त्या बैठकींतहि वरील आशयाचा प्रस्ताव संमत करण्यांत आला. बादशाही जाहीरनामा प्रसिद्ध झाल्याबरोबर ज्या संस्थांनीं सावरकरबंधूंसुद्धां सर्व राजबंद्यांच्या मुक्ततेची मागणी करण्यासाठीं व्हॉइसरॉयकडे तारा धाडल्या त्यांत बार्शी येथील होमरूल लीगची शाखा, यवतमाळ डिस्ट्रिक्ट ॲसोसिएशनप्रभृति संस्था होत्या.

प्रांतिक सरकारच्या शिफारशींप्रमाणें राजबंदी मुक्त होऊं लागले तेव्हां सर्व प्रांतांत ब्रह्मदेशानें आघाडी मारल्याचें आढळलें! हिंदुस्थान सरकारचे गृहमंत्रि म्हणून १९१४ साली अंदमानांत सावरकरांना भेटलेले सर रेजिनॉल्ड क्रॅडॉक हे या सुमारास ब्रह्मदेशचे गव्हर्नर होते. ब्रह्मदेशांतल्या सर्व राजबंदीवानांना मुक्त करण्याचें श्रेय त्यांनी संपादिलें. त्यामुळें, या बाबतींत कंजूषपणा करणाऱ्या इतर प्रांतिक सरकारांचें वर्तन जास्तच अश्लाघ्य दिसूं लागलें. बंगाल प्रांतांतले एकूण २७३ राजबंदी वेगवेगळ्या कारागृहांत कुचंबत पडलेले होते. १९२० सालच्या फेब्रुवारी महिन्याच्या सुरुवातीलाच त्यांतले २१९ मुक्त झाले होते. मुंबई प्रांतांतल्या एकूण ५४ राजबंदिवानांपैकीं मात्र अवघे ४ राजबंदिवान या अवधीपर्यंत मुक्त झाले होते. आपल्या बंधूंना बादशाही जाहीरनाम्याचा लाभ मिळावा म्हणून डॉ. सावरकर यांनीं तत्परतेनें हिंदुस्थान सरकारला पत्र धाडलें. १९२० च्या जानेवारीच्या मध्याच्या सुमारास या पत्राचें उत्तर आलें. त्यांत असें लिहिलें होतें कीं, माफीच्या यादींत सावरकरबंधूंचीं नांवें नाहींत. मुंबईच्या नॅशनल यूनियनतर्फें हजारों स्वाक्षऱ्यांचा सावरकरमुक्ततेची मागणी करणारा अर्ज भारतमंत्र्यांकडे धाडण्यांत आलेला होता. १९२०च्या फेब्रुवारी महिन्याच्या आरंभीं भारतमंत्र्यांनीं हा अर्ज परत पाठवून दिला!

सावरकरांच्या मुक्ततेची मागणी करण्याचे हे यत्न चालले असतांना, सर अलेक्झँडर कार्ड्यू यांच्या अध्यक्षतेखालीं नेमण्यांत आलेली, कारागृहांच्या व्यवस्थे-बद्दल चौकशी करणारी समिती अंदमानांत गेली. गुन्हेगारांची वसाहत म्हणून अंदमानचें ठाणें यापुढें चालू ठेवावें कीं नाहीं, हा प्रश्नहि या समितीपुढें निर्णयासाठीं ठेवण्यांत आलेला होता. या समितीपुढें आपलें लेखी म्हणणें मांडण्याची सावरकरांना संधि मिळाली व त्यांनीं २४–१–२० रोजीं समितींतल्या सदस्यांना भेटून आपलें म्हणणें सादर केलें. दंडविज्ञानाच्या मूलभूत तत्त्वांची छाननी सावरकरांनीं आपल्या या आवेदनपत्रांत[1] अधिकारयुक्त शब्दांत केली होती. भारताच्या सुरक्षितपणाच्या दृष्टीनें अंदमानद्वीपपुंजाचें महत्त्व किती आहे, हें सावरकरांनीं चांगलें ओळखलें असल्यामुळें, त्या द्वीपपुंजाकडे भारताचें दुर्लक्ष होईल, अशी कोणतीच योजना त्यांना मान्य होण्यासारखी नव्हती. अंदमानांतलें बंदिजीवन सुधारलें पाहिजे असें त्यांनीं आग्रहानें प्रतिपादलें. पण, ही वसाहत कायमची उठविण्याच्या कल्पनेला त्यांनीं कसून विरोध केला. अंदमानांत भोगाव्या लागलेल्या हालअपेष्टांमुळें अंदमाना-वरच रुष्ट झालेल्या राजबंदिवानांना सावरकरांचें मत विचित्र वाटूं लागलें व अनेक वेळां वादविवाद करून सावरकरांनीं तें मत त्यांना पटवून दिलें. सावरकरांचे या विषयींचे विचार किती अचूक व दूरदर्शीपणाचे होते हें प्रस्तुत युद्धांत सिद्ध झालेलेंच आहे. या सर्व विचारांचे सार सावरकरांनीं पुढलि छेदकांत[2] सांगितलें आहे :

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २०६–२०९.

२ ,, ,, ,, : पृ. २०९

*अंदमान हा हिंदुस्थानचा एक जलदुर्ग आहे. आज नाहीं उद्यां इथें वैमानिक नि सामुद्रिक ठाणें स्थापन केलें जाईल. आणि पूर्वेच्या राजकीय महत्त्वाकांक्षेचा अन्याय्य आक्रम जर कधीं हिंदुस्थानांत झाला तर त्यांच्या सामुद्रिक रणनौकांस आणि विमानांस पहिला शह अंदमानचा दुर्ग देईल, मग हिंदुस्थानचा तट !*

बादशाही जाहीरनाम्याचा लाभ अंदमानमधीलहि पुष्कळशा राजबंदिवानांना मिळणार असें स्पष्ट दिसूं लागलें. ब्रह्मदेशांतल्या कैद्यांमागोमाग पंजाबांतले शीख व बंगालमधील कांहीं तरुण सुटले. शेवटीं भाई परमानंद यांच्या मुक्ततेचा सुदिन उगवला. सुटकेच्या दिवशीं भाईजी व सावरकर यांची अंदमानांत भेट झाली तिचें वर्णन सावरकर यांनीं पुढील वाक्यांत केलें आहे :१

मोठ्या प्रेमानें आमची भेट घेऊन आणि 'आपली सुटका होण्याची वास्तविक पाळी ! मला जाणें किती संकोचास्पद वाटतें !' असें म्हणत, अश्रुपूर्ण नेत्रांनीं त्यांनीं आमचा निरोप घेतला. 'आपणांस जातांना पाहून आम्हांस आम्ही सुटलों नाहीं याची आठवणही होऊं न देणारा उत्कट आनंद होत आहे' असें म्हणत, आम्हीही त्यांची प्रीतिपुरस्सर बिदागी केली.

आपल्या बरोबरीच्या कांहीं देशभक्तांना अंदमानांत सोडून तेथून निघतांना भाईजींना किती वाईट वाटलें हें स्वतः भाईजींनीं पुढील शब्दांत सांगितलें आहे :२

There was also a pang of regret at the separation from those with whose lot had been cast for some time our own. Bortunes—life and death, pleasure and pain, hope and despair. The thought that they would now be left behind brought tears in my eyes; I could not bear to look at them.

( कांहीं काळपर्यंत आमचें भाग्य ज्यांच्या भाग्याशीं निगडित झालें होतें, ज्यांनीं व आम्हीं मिळून एकत्र जगण्यामरण्याचे अनुभव घेतले, सुखदुःखें सोशिलीं व आशानिराशा पचविली, त्यांचा व आपला आतां वियोग होणार हें पाहून दुःख मनाला बोचूं लागलें. हे आपले मित्र आतां इथेंच राहणार हा विचार मनांत आल्यामुळें, माझे डोळे अश्रूंनीं भरून आले. मला त्यांच्याकडे बघवेना ! ) आपल्यामागें अंदमानांत अडकून पडलेल्या बंदिवानांच्या मुक्ततेसाठीं झटण्याचा निश्चय करून, भाईजी अंदमानांतून बाहेर पडले.

सावरकरांची मुक्तता होणें दुर्घट आहे असें लोकाग्रणींच्या लक्षांत येऊं लागतांच मुक्ततेच्या खटपटी करण्याची तत्परता अधिकच वाढूं लागली. १९२० च्या फेब्रुवारीच्या शेवटीं वरिष्ठ विधिमंडळाच्या बैठकींत श्री. विठ्ठलभाई पटेल यांचा या विषयाबद्दलचा ठराव चर्चेला निघाला. ठरावाला पाठिंबा देतांना श्री. दादासाहेब

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २१७

२ The Story of My Life : P. 166.

खापर्डे यांनीं सावरकरबंधूंची सर्व हकीकत सांगितली. या बंधूंच्या बाबतींत किती अन्याय झाले आहेत हें सांगण्याचा श्री. दादासाहेब खापर्डे यांचा प्रयत्न उपड्या घड्यावर ओतलेल्या पाण्याप्रमाणें निष्फळ ठरला. सरकारतर्फे उत्तर देतांना मि. मॅक्फर्सन् यांनीं सांगितलें : ना. खापर्डे यांनीं ज्यांचा उल्लेख केला त्या इसमांचा विचार आतांच करण्यांत येणार नाहीं. याच प्रसंगीं ना. सुरेंद्रनाथ बानर्जी यांनीं श्री. बारींद्रकुमार घोष यांच्याविषयीं माहिती विचारली. तेव्हां मि. मॅक्फर्सन् यांनीं बारींद्रकुमार घोष कलकत्यास आले असल्याचें वृत्त निवेदून सुरेंद्रबाबूंना चकित करून सोडलें! वरिष्ठ विधिमंडळाच्या याच बैठकींत, मार्च महिन्याच्या उत्तरार्धात ना. खापर्डे यांनीं सावरकर यांच्याविषयीं प्रश्न विचारला तेव्हां, सावरकरांच्याविषयीं पुन्हां एकदां विचार चालू आहे, असें उत्तर सरकारतर्फे देण्यांत आलें. सावरकरांच्या मुक्ततेविषयीं आग्रह धरणारें एक पत्र लो. टिळक यांनीं भारतमंत्री मि. मॉँटेग्यू यांना धाडिलें होतें अशी विश्वसनीय माहिती प्रस्तुत लेखकाला मिळालेली आहे. हें पत्र १९२० च्या फेब्रुवारी–मार्च महिन्याच्या सुमारासच गेलें असावें.

बाहेर चाललेल्या या खटपटींच्या जोडीनेंच सावरकरांनीं स्वतःच चालविलेल्या खटपटींचाहि उल्लेख केला पाहिजे. पंजाब-बंगाल वगैरे प्रांतांतील बहुतेक राजबंदी सुटून गेले तरी राजक्षमेचा लाभ आपल्याला मिळत नाहीं हें पाहून, सावरकरांनीं शेवटीं स्वतःच सरकारला या बाबतींत जागें करण्याचें ठरविलें. यासाठीं त्यांनीं गव्हर्नर–जनरलकडे जो अर्ज केला तो दि. ६–४–२० रोजीं अंदमानच्या चीफ कमिशनरच्या स्वाधीन करण्यांत आला व चीफ कमिशनरमार्फत तो दि. १२–४–२० रोजीं व्हाइसरॉयकडे रवाना झाला. या अर्जाचें उत्तर दि. १९–८–२० रोजीं सावरकरांना पोंचलें. या अर्जावर सरकारी गोटांत ३–३॥ महिने खल चालला होता. यावरून असें अनुमान निघण्यासारखें आहे कीं, हिंदुस्थान सरकारनें विलायतेंतल्या मुत्सद्यांशीं विचारविनिमय करून, मगच या बाबतींतलें आपलें धोरण ठरविलें असावें. सावरकरबंधूंना राजक्षमेचा लाभ तूर्त तरी देण्याला व्हॉइसरॉय सिद्ध नाहीं, असा सरकारी उत्तराचा आशय होता.

सावरकर–मुक्ततेसाठीं लोकाग्रणींनीं जे प्रयत्न केले त्यांत गांधीजींनीं 'यंग इंडिया'च्या दि. २६–५–२० च्या अंकांत लिहिलेल्या 'सावरकर–बंधू' या लेखाला स्थान दिलें पाहिजे. या लेखांत माहितीच्या दृष्टीनें कांहीं ठळक चुका झालेल्या आहेत. विनायकराव सावरकर यांच्या जन्माचें वर्ष १८८४ देण्यांत आलें आहे. विनायकरावांना १९०९ सालीं मुलगा झाला होता हें चुकीचें विधान तर हास्यास्पदहि आहे! १८५७ च्या प्रसंगावर सावरकर यांनीं लिहिलेल्या ग्रंथाचा उल्लेख History of the Sepoy Revolt of 1857 या शब्दांनीं करून, गांधीजींनीं या प्रख्यात ग्रंथाचें नांवहि आपल्याला धडपणीं माहीत नाहीं, असें सुचविलें आहे.

What is more, I think it may be safely stated that the cult of violence has. at the present moment, no following in India.

( माझ्या मतें विशेष गोष्ट ही आहे कीं, सध्यां हिंदुस्थानांत अत्याचाराच्या, पंथाला अनुयायी उरलेले नाहींत, असें बिनघोकपणें म्हणावयाला हरकत नाहीं.) हें विधान या लेखांत करण्याचें प्रयोजन काय, असाहि प्रश्न विचारतां येण्यासारखा आहे.

या लेखांत असे कांहीं दोष असले तरी, गांधीजींनीं सावरकरबंधूंची वकिली मुद्देसूदपणें केली आहे. डॉ. सावरकर यांनीं अतःपर या बाबतींत आपल्याकडे अर्ज करूं नयेत असें सरकारनें कळविल्यामुळें व सावरकरांना सोडतां येत नाहीं, हें हिंदुस्थान सरकारचें मत पार्लमेंटांत सांगून मि. मॉंटेग्यू हे स्वस्थ बसल्यामुळें आपण हा विषय हातीं घेण्याला प्रवृत्त झालों, असें या लेखाच्या शेवटीं गांधीजींनीं ध्वनित केलें आहे. बादशाही जाहीरनाम्यांतल्या शब्दांचा कीस काढल्यावर. गांधीजींनीं या लेखांत सरकारला असें बजाविलें आहे कीं, जाहीरनाम्याची अघळपघळ भाषा विचारांत घेतली आणि सावरकर-बंधू हे राजकीय कैदी आहेत हें निर्विवाद सत्य मान्य केलें कीं, नुसतें मौन धारण केल्यानें आपली या बाबतींतली जबाबदारी संपली, असें सरकारला मानतां येणार नाहीं. सावरकरबंधूंना अतःपर डांबून ठेवायचे असतील तर, आपल्या धोरणाचें विस्तृत समर्थन करून सरकारनें लोकांचें समाधान केलें पाहिजे, असाहि इषारा गांधीजींनीं या लेखांत दिलेला आहे.

राजक्षमेचा लाभ मिळून पुष्कळसे राजबंदी अंदमानांतून मुक्त झाल्यावर कांहीं महिन्यांनीं—म्हणजे १९२० च्या जुलै महिन्यांत—सावरकरांना अंदमानांतच एक सवलत मिळाली. या वेळीं त्यांना बढती मिळून, कांहीं कारकुनी काम करण्याची संधि त्यांना देण्यांत आली. या संधीचा लाभ घेत असतांनाहि अनेक गोष्टी त्यांच्या मार्गांत आडव्या आल्या; पण, शेवटीं ही सवलत त्यांना बरेच दिवस उपभोगितां आली. आपली सुटका होण्याचें कांहीं एक लक्षण दिसत नाहीं असें लक्षांत आल्याबरोबर, सावरकरांनीं अधिकाऱ्यांकडे आवेदनपत्रें धाडण्याचा सपाटा सुरू केला. छापखाना वगैरे विभागांतलीं वरिष्ठ अधिकाराचीं कामें आपल्याला मिळावीं, मुक्तता होत नसेल तर वसाहतींत संचार करण्याचें स्वातंत्र्य, सहकुटुंब अंदमानांत राहण्याची अनुज्ञा वगैरे गोष्टींतली एकादी गोष्ट तरी आपल्याला मिळावी, अशी तगादेवजा मागणी अधिकाऱ्यांकडे करण्याचा क्रम त्यांनीं सुरू ठेविला. या सुमारास अंदमानांतील बारीबाबांचें राज्य संपुष्टांत आलें असल्यामुळें, बंदिवानांचें शिक्षण वगैरे उपयुक्त कार्यांकडे सावरकरांना निर्वेधपणें व भरपूर लक्ष पुरवितां येऊं लागलें होतें.

दि. १ ऑगस्ट १९२० रोजीं लोकमान्य टिळक यांना स्वर्गवास घडला ही वार्ता दुसऱ्या दिवशीं सकाळीं अंदमानांत पोंचली. या शोचनीय घटनेमुळें, मनाला वाटणारी तळमळ व्यक्त करण्याचा एक मार्ग म्हणून अंदमानभर सर्वांनीं दिवसभर उपवास पाळावा, अशी कल्पना सावरकरांच्या मनांत आली. सावरकरांच्या मनांतला

हा संकल्प तास दोन तासांत सगळया अंदमानभर फैलावला. दहा वाजतां जेवणाच्या वेळीं कारागारापासून तों थेट रासबेटापर्यंत शेंकडों लोकांनीं आपापलें जेवण घेण्याचें नाकारलें. या संघटित राष्ट्रीय उपोषणाचें व शोकप्रदर्शनाचें वृत्त अधिकाऱ्यांना कळलें तेव्हां त्यांना सक्रोध आश्चर्य वाटलें; पण, हें प्रकरण विकोपास नेण्याचा वेडे-पणा त्यांच्यापैकीं कोणी केला नाहीं! अंदमानचा अधिकारीवर्ग बदलल्यामुळें व अंतस्थ संघटना चांगल्यां प्रकारें झालेली असल्यामुळें, या सुमारास बंदिवानांचें सामुदायिक शिक्षण, प्रासंगिक सभा वगैरे कार्यक्रमहि व्यवस्थितपणें पार पडूं शकत असत.

दि. ६ जुलै १९२० रोजीं अंदमानांतून लिहिलेल्या पत्रांत भारतमंत्र्यांकडे हजारों स्वाक्षऱ्यांचा अर्ज धाडल्याबद्दल सावरकरांनीं आपल्या देशबांधवांना धन्यवाद दिले आहेत. अखिल मानववंशावरील प्रेम म्हणजे देशप्रेमाचें उदात्त स्वरूप होय असें समजणारे भारतीय देशभक्त क्रांतीच्या मार्गाला कां लागले या प्रश्नाचा ऊहापोह सावरकरांनीं या पत्रांत केला आहे. मानववंशांतल्या एका लहानशा भागानें आपल्या आक्रमक प्रवृत्तीमुळें सर्व मानवजातीच जविनच धोक्यांत आणल्याचें दृश्य दिसूं लागलें व त्यामुळें क्रांतिकारकांना कठोर उपायांचा अवलंब करण्यावांचून गत्यंतर उरलें नाहीं असें सांगतांना, सावरकरांनीं पुढील विचार[१] व्यक्त केले आहेत :

It was this very principle that......forced us to take to the surgeon's knife and feel that severity for the moment would certainly be mercy in the long run. But even while combating force with force, we heartily abhorred—and do yet abhor—all violence; for violence is force aggressively used, force that is life-killing......Thus, we were revolutionists under necessity, and not by choice.

(शस्त्रक्रिया करणाऱ्या भिषग्वराच्या हातांतलें हत्यार हातीं घेण्याला आम्ही क्रांतिकारक प्रवृत्त झालों ते या तत्त्वामुळेंच प्रवृत्त झालों. तात्कालिक कठोरपणा हाच परिणामीं दयेसारखा ठरेल असें निश्चित वाटल्यामुळेंच आम्ही त्या मार्गाला लागलों. पण, तेव्हां जरी आम्ही शक्तीचा शक्तीनें प्रतिकार करीत होतों तरी, आम्ही अत्या-चाराचा मनःपूर्वक तिटकारा करीत होतों व अद्यापहि करतों; कारण, आक्रमक रीतीनें केलेला शक्तीचा उपयोग—प्राणघातक पद्धतीनें केलेला शक्तीचा उपयोग—तेवढाच अत्याचार होय. एवंच, नाइलाज म्हणून आम्ही क्रांतिकारक बनलों, स्वेच्छेनें नव्हे.)

अंदमानांत येणाऱ्या बडया सरकारी अधिकाऱ्यांकडून सावरकरांना वारंवार असें बजाविण्यांत येई कीं, पूर्वीच्या भारतीय राजांविरुद्ध तुम्ही बंड पुकारिलें असतें तर, त्यांनीं तुम्हांला हत्तीच्या पायांशीं तुडवून मारून टाकिलें असतें. या दहशत-बाजीला सावरकर यांनीं या पत्रांत पुढील मार्मिक कोटिक्रमानें उत्तर दिलें आहे. सावरकर लिहितात[२] :

---

१ **An Echo from Andamans : Pp. 89-90.**
२ **An Echo from Andamans : P. 92.**

Speaking relatively to barbarian times, it is true, that I had a fair trial and a just sentence and the Government is at liberty to derive whatever satisfaction they can from the compliment that they give a fairer trial and a juster sentence to their captives than the cannibals used to do. But, it should not be forgotten that if, in olden days, the rulers, flayed their rebels alive, then, the rebels too, when they got the upper hand, flayed alive the rulers as well. And if the British people treated me or other rebels more justly, i. e. less barbarously, then they may rest assured that they too would be as leniently treated by the Indian rebels, if ever the tables are turned.

( जंगली युगाच्या तुलनेनें पाहतां, माझ्यावरील आरोपांची चौकशी नीटपणीं झाली व मला शिक्षाहि न्यायसंमत सांगण्यांत आली, हें खरें. नरमांसभक्षक लोकांच्या हातीं त्यांचे शत्रू सांपडले तर, ते लोक त्या शत्रूंना ज्या रीतीनें वागवीत असत त्यापेक्षां ब्रिटिश सरकार आपल्या शत्रूंची चौकशी नीटपणीं करतें व त्यांना शिक्षा अधिक न्यायीपणानें देतें, या प्रशंसेंत जें समाधान सांठविलेलें असेल तें सरकारनें सुखेनैव उपभोगावें ! पण, एक गोष्ट मात्र त्यांनीं विसरूं नये. पूर्वींच्या काळचे राजे आपल्या शत्रूच्या अंगावरील कातडी सोलून त्यांना जिवें मारीत हें जसें खरें आहे, त्याचप्रमाणें हेंहि खरें आहे कीं, जेव्हां या शत्रूंची सरशी होत असे तेव्हां, तेहि राज्य-कर्त्यांच्या अंगावरील कातडी सोलून त्यांचा प्राण घेण्याला सोडीत नसत. मी व इतर बंडखोर यांना ब्रिटिश लोकांनीं अधिक न्यायानें—म्हणजेच कमी रानटीपणानें—वागविलें असेल तर, त्यांनींहि असा विश्वास बाळगावा कीं, दैवाचा फांसा तसा पडलाच नि भारतीय बंडखोरांचा वरचष्मा झालाच तर, तेहि ब्रिटिश लोकांना तितक्या सौम्यपणानें वागवितील. )

१९२० सालीं ऑक्टोबर महिन्याच्या उत्तरार्धांत कर्नल वेजवुड हे ब्रिटिश मजूर पक्षाचे पुढारी हिंदुस्थानांत आले. मुंबई, दिल्ली वगैरे शहरांत कांहीं काळ घालविल्यावर कर्नल वेजवुड हे नोव्हेंबरच्या प्रारंभीं लाहोरांत गेले. आगस्टमध्ये भाई परमानंद हे विश्रांतीसाठीं काश्मीरांत जाऊन राहिले होते. ते या सुमारास लाहोरास परत आले व त्यांनीं कर्नल वेजवुड यांची भेट घेऊन, अंदमानांतली सर्व हकीकत त्यांच्या कानावर घातली व सावरकरप्रभृति राजबंदींच्या मुक्ततेची आग्रह-पूर्वक मागणी केली. या माहितीवर आधारलेले अंदमानविषयक लेख लिहून, कर्नल वेजवुड यांनीं ते १९२१ च्या जानेवारी-फेब्रुवारी महिन्यांत इंग्लंडमधील वृत्त-पत्रांतून प्रसिद्ध केले. यानंतर लौकरच रेव्ह. सी. एफ्. अँड्र्यूज यांनीं लिहिलेले कित्येक अंदमानविषयक लेखहि प्रसिद्ध झाले. १९१४ सालीं अंदमानांत जाऊन आल्यावर क्रॅडॉक साहेबांनीं ज्या शिफारशी केल्या होत्या त्या सरकारनें प्रसिद्ध कराव्या अशी मागणी होऊं लागली व त्यामुळें अंदमान व तेथील उर्वरित राजबंदी हा प्रश्न सरकारपुढें फिरून दत्त म्हणून उभा राहिला !

मध्यंतरींच्या काळांत, स्वतःच्या परिस्थितींत इष्ट असा पालट व्हावा यासाठीं

सावरकरांनीं प्रयत्न चालविलेच होते. मुक्तता होत नसेल तर अंदमानांत ' स्वतंत्र ' म्हणून राहण्याची संधि तरी आपल्याला मिळावी—ही संधि मिळण्याचा अधिकारच आतां आपल्याला प्राप्त होत असल्यामुळें, ती संधि अवश्य देण्यांत यावी, अशीं आवेदनपत्रें धाडण्याचा सपाटा त्यांनीं चालविला होता. या सुमारास अंदमानांतलें बारी-राज्य संपलें होतें. बारी परत स्वदेशीं गेला होता व त्याच्या मेहुण्याला बढती मिळून तो त्याच्या जागेवर आला होता. या गृहस्थाच्या अंगीं बरीच माणुसकी असल्यामुळें, त्यानें अंदमानच्या कारभारांत पुष्कळच इष्ट बदल घडवून आणले. दि. २८-९-२० रोजीं सावरकरांना कारकुनी काम करण्याची अनिर्बंध मोकळीक मिळाली व पुढें नोव्हेंबरच्या प्रारंभीं सावरकरांना तेलगुदामावरील फोरमनच्या जागेवर नेमण्यांत आलें. अंदमानी व्यवस्थेंत ही जागा फार महत्त्वाची समजली जात असे. या जागेवर सावरकरांची नेमणूक झालेली दिसतांच, पूर्वीं त्यांना छळणारे वॉर्डर वगैरे सर्वजण अगदीं गोगलगाय बनले व बंदिवानांचें शिक्षण, या शिक्षणाचे निमित्तानें हिंदी प्रचाराची चळवळ, शुद्धीची चळवळ इ० कार्यक्रम पुष्कळच राजरोसपणें करण्याला सावरकरांना या काळांत संधि मिळाली.

बाहेर अंदमानबद्दल फार बोभाटा होऊं लागला त्याचा परिणाम म्हणून असो अगर 'काडर्यू कमिटी'नें केलेल्या शिफारशींचा परिणाम म्हणून असो, अंदमानाची बंदीवसाहत बंद करण्याबद्दलचा विचार हिंदुस्थान सरकारच्या गोटांत खेळूं लागला. या विचाराची वार्ता अंदमानांत येऊन पोंचल्याबरोबर तेथें जे जन्मठेपीचे कैदी होते त्यांनीं स्वतःची अशी समजूत करून घेतली कीं, अंदमानची बंदीवसाहत उठल्याबरोबर आपली उरलेली शिक्षा रद्द होईल व आपण मोकळे होऊन, आपल्या मुलांमाणसांत जाऊन पडूं. ही त्यांची समजूत अगदीं निराधार व भ्रामक होती. अंदमानांतून उचलून या गुन्हेगारांना भारतीय तुरुंगांत डांबून ठेवण्यापलीकडे हिंदुस्थान सरकार कांहींच करणार नव्हतें; पण, मुक्ततेच्या आशेनें वेडे बनलेले जे बंदिवान होते त्यांना हा विवेक सुचत नसे. भारतीय तुरुंगांत डांबून पडण्यापेक्षां अंदमानांत स्वकष्टानें प्राप्त करून घेतलेले अधिकार उपभोगीत राहण्याची सावरकरांची उत्सुकता या आशांध बंदिवानांना आकलन करतां येत नसे. अंदमानाची बंदीवसाहत बंद होऊं नये असें अंदमानच्या अधिकाऱ्यांना वाटे ! याचें कारण असें होतें कीं, वसाहत बंद झाली तर आपलें कसें होईल ही स्वार्थी भीति त्यांना कासावीस करीत होती. कारणें कांहींहि असलीं तरी, वसाहत बंद होऊं नये या मुद्यावर सावरकर व अंदमानचे अधिकारी यांचें एकमत होतें. अधिकाऱ्यांशीं नेहेमीं झगडणाऱ्या सावरकरांनीं या प्रसंगीं अधिकाऱ्यांशीं सहकार्य कसें केलें हें गूढ या बंदिवानांना समजत नसे. संभ्रान्त मनःस्थितींतल्या या बिचाऱ्या बंदिजनांची स्थिति वर्णन करण्यासाठीं सावरकर यांनीं पुढील वाक्य लिहिलें आहे :

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २५३.

*कच्चा गडी एकाद्या पटाईत मल्लाशीं नियुद्ध खेळावयास उतरला तर त्या मल्लाचा चुकून पुढें केलेला हातहि धरण्यास, क्वचित् तो आपल्यास फसविण्यासाठींच पुढें केलेला आहे असें समजून, जसा कचरतो आणि त्यावर उलट पेंच मारण्याची संधि गमावतो तशीच साधारण जनसमूहाची राजकारणादिक व्यवहारांत पुष्कळ वेळां स्थिति होते.*

निकोबार हें बेट भारतीय संस्कृतीच्या कक्षेंतलें असूनहि, हिंदूंच्या उपेक्षेमुळें त्यावर मलायी आणि ब्रह्मी लोकांचा पगडा बसला; तशी अंदमानची स्थिति होऊं नये असें सावरकरांना मनापासून वाटत असल्यामुळें, अंदमानामधील बंदीवसाहत बंद करण्याच्या कल्पनेला त्यांचा विरोध होता. ही वसाहत बंद होतांच, हिंदु बीजाची व हिंदु धर्माची तीन पिढया वाढत आलेली संतति नष्ट होईल, तेथें घालण्यांत आलेलें बंदिवानांच्या तीन पिढयांच्या रक्त–बीज–श्रमांचें भांडवल व्यर्थ जाईल, असें सावरकर यांचें मत झालें होतें. अंदमानांत राहण्याच्या निमित्तानें हिंदु बंदिवानांनीं अधिकांत अधिक लाभकारक सवलती पदरांत पाडून घ्याव्या असें त्यांचें भोंवतालच्या बंदिवानांना सांगणें असे. स्वतःच्या उदाहरणानें आपलें म्हणणें सबळ करण्यासाठीं सावरकरांनीं या सुमारास सरकारकडे एक आवेदनपत्र धाडलें. त्याचा आशय पुढीलप्रमाणें[1] होता :

हिंदुस्थानांत परत धाडतांच माझी मुक्तता होणार नसेल, तर मी अंदमानमध्येंच राहूं इच्छितों. मात्र दहा वर्षें भरलीं असल्यानें मला सहकुटुंब किंवा 'स्वतंत्र तिकिटावर' राहतां यावें. कारागारांत ठेवायचें तर मला अंदमानांतच ठेवावें.

या सुमारास हिंदुस्थानांत सुरू झालेल्या असहकारितेच्या आणि खिलाफतीच्या चळवळीची चर्चा अंदमानांतहि होऊं लागली. खिलाफतीच्या चळवळीबद्दलचें '**ही खिलाफत नाहीं, आफत आहे**' हें सावरकरांचें वाक्य भोंवतालच्या सर्व बंदिवानांच्या तोंडीं खेळूं लागलें. लो. टिळक निवर्तल्याबरोबर राष्ट्रच्या राष्ट्र बुद्धिभ्रष्ट बनलें व भलत्या कल्पनांचा प्रचार सुरू झाला, यामुळें सावरकरांना जी हळहळ वाटे ती त्यांनींच पुढील शब्दांत[2] वर्णिली आहे :

*हिंदुस्थानांत लो. टिळक वारतांच खिलाफत आणि असहकार या चळवळी जोरावल्या. कोणी असामान्य पुरुष निवर्तला असतां, तो धक्का निसर्गाला देखील सहन न झालासा होऊन, मोठमोठाले अशुभ झंझावात...सुरू होतात, असा एक पुरातन समज आहे. लोकमान्यांसारखा धुरंधर नाहींसा होतांच हा खिलाफतीच्या अत्यंत आत्मघातक चळवळीचा आणि एका वर्षांत चरखा फिरवून आणि अहिंसेच्या अत्यंत विपर्यस्त व्याख्येवर उभारलेल्या*

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २५९.
२ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २६०.

*तेजोहीन आणि तेजोनाशक असहकारितेनें स्वराज्य मिळवूं इच्छिणाऱ्या आत्मवंचक उन्मादाचा हा तसाच एक अशुभ झंझावात सुटला आहे.*

सहकारिता व असहकारिता यांच्याविषयीं सावरकरांना त्या वेळीं काय वाटे याविषयींचें पुढील विवेचनहि[1] बोधप्रद आहे :

*खरें राजकारण सहकारीहि नसतें आणि असहकारीहि नसतें. तर, तें प्रतिसहकारीच असतें. जर सहकारानें प्रश्न सुटत असेल तर विपक्षाशीं अवश्य सहकार करावा. जर सहकार नाहीं तर असहकार ! तो केव्हां निःशस्त्र स्वरूप धारण करतो, केव्हां सशस्त्र. आणि तो निःशस्त्र विरोधहि तात्पुरताच असला पाहिजे.* **असहकार हें तत्त्व नव्हे, तो एक तात्कालिक उपाय आहे.** *सर्व मनुष्यमात्रांनीं सहकार करावा हेंच ध्येय होय. आणि तो सहकार परस्परांनीं परस्पराहितास अनुकूल असा करावा किंवा करणें भाग पाडलें जावें. अशाच स्वरूपाचा राहणार असल्यानें, त्यासच प्रतिसहकार किंवा प्रतियोग म्हणतात.*

डॉ. सावरकर हे १९२० सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या शेवटीं शेवटीं अंदमानांत जाऊन आपल्या बंधूंना फिरून भेटून आले. ' लवकर हवापालट न झाल्यास वडील बंधूंना क्षय होईल ' ही डॉ. सावरकर यांच्या मनांतील भीति डिसेंबर महिन्यांत जाहीर रीतीनें व्यक्त करण्यांत आली.[2] या भेटीच्या वेळीं विनायकराव सावरकर यांनीं आपल्या स्वतःविषयीं व गणेशपंतांच्या प्रकृतीविषयीं पुढील उद्गार[3] आपल्या कनिष्ठ बंधूंसमोर काढले.

*बाळ, तुझ्यापासून वस्तुस्थिति लपवून ठेवण्याचें मला कारण दिसत नाहीं. ...म्हणून सांगतों कीं, आतां तूं आमच्या दोघांच्या जीवनांतली शेवटली बातमी ऐकण्यास सिद्ध होऊन राहा. आतां फार दिवस निभतील असें दिसत नाहीं. तरी देखील, असंभवनीय गोष्टीहि घडतात, हेंहि विसरूं नकोस. पण, आतां तो संभव अगदीं विरळ ! बहुधा ही शेवटची भेट !*

नागपूर कॉंग्रेसच्या वेळीं असहकारितेची वृत्ति परमावधीला पोंचलेली होती. त्यामुळें नागपूर कॉंग्रेसमध्यें राजकीय कैद्यांच्या बंधमुक्ततेची मागणी सोडून देण्यांत आली. कॉंग्रेसनें राजकीय कैद्यांबद्दल सहानुभूतीचा ठराव पास केला व त्यांनीं देशाकरितां धैर्यानें दुःख सहन करावें असें सुचविलें. असहकाराच्या या वावटळींत न सांपडलेले जे कांहीं देशभक्त शिल्लक उरले होते त्यांत कौन्सिल ऑफ स्टेटचे सदस्य श्री. रंगास्वामी अय्यर हे होते. सावरकर-बंधूंना बंधमुक्त करण्याची विनंति करणारा ठराव त्यांनीं पाठविला व १९२१ च्या मार्च महिन्याच्या शेवटीं कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २६१-२६२.
२ केसरी : दि. १४-१२-२०. ३ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २६२-६३.

या ठरावावर चर्चा झाली. या चर्चेच्या वेळीं श्री. रंगास्वामी अय्यर यांनीं सरकारला असें सांगितलें कीं, मुक्त झालेले सावरकर विशेष कांहीं करतील अशी भीति सरकारला वाटत असेल तर, त्याबद्दलची जोखीम पत्करण्याला मी तयार आहें—यासाठीं हवी तेवढी मोठी रक्कम जामिनकी म्हणून भरण्याला सुद्धां माझी तयारी आहे! इकडे सावरकरांविषयीं ही चर्चा चालू होती त्या सुमारासच, अंदमानांत मर्यादित स्वातंत्र्य मिळण्याच्या दृष्टीनें सावरकरांची प्रगति होत होती. अंदमानांत पाय टाकल्यापासून त्यांच्यावर भयंकर स्वरूपाचा कैदी म्हणून शिक्का पडलेला होता. या शिक्याचें निदर्शक म्हणून जें ' D Ticket ' त्यांच्या गळयांत लोंबत होतें तें दि. २१–१–२१ रोजीं प्रथम निघालें. दि. १०–२–२१ रोजीं या तिकिटांतून त्यांची कायमची मुक्तताहि झाली!

आपली मुक्तता होत नाहीं अशी निश्चिति होऊन सावरकर एकेक दिवस कंठीत होते, तों एके दिवशीं सायंकाळीं त्यांना एका वॉर्डरनें एक चिठ्ठी गुप्तपणें आणून दिली. मुंबई इलाख्यांतल्या कोणत्या तरी तुरुंगांत ठेवण्याच्या निमित्तानें आपल्याला अंदमानांतून हलविलें जाणार ही वार्ता सावरकरांना या चिठ्ठीमुळें कळली. यामुळें सावरकरांना समाधान तर वाटलेंच नाहीं; उलट विषादच वाटला. सावरकरांना हिंदुस्थानांत आणलें अशी बढाई मारून सरकार लोकांची सहानुभूति आपल्या बाजूला वळवून घेईल व अंदमानांत स्वतंत्रपणें राहण्याऐवजीं आपल्यावर मात्र तुरुंगांत सडत पडण्याचा प्रसंग येईल, या विचारानें त्यांचें मन उद्विग्न झालें. इतके दिवसांनंतर आतां त्यांना आपल्या ज्येष्ठ बंधूंसह एकत्र राहतां येऊं लागलें होतें. हिंदुस्थानांतल्या तुरुंगांत हेंहि सुख लाभण्याची शाश्वति नव्हती. लौकिकदृष्ट्या सरकारची जी कृति 'कृपा' या सदरांत जमा होणार होती, तिचें सत्यस्वरूप अशा प्रकारचें होतें!

दुसऱ्या दिवशीं सकाळीं सावरकरांनीं जवळच्या पुस्तकांची बांधाबांध केली. सावरकरांना अंदमानांतून हलविणार ही वार्ता बंदिजनांत पसरल्यामुळें, सावरकरांबद्दलचा भक्तिभाव व्यक्त करण्यासाठीं कामगारांतले बंदिजन व बाहेरचे स्वतंत्र यांची धडपड सुरू झाली. मागें राहणाऱ्या लोकांच्या दृष्टीनें ज्या गोष्टी सांगून–पढवून ठेवावयाच्या त्या सावरकरांनीं सांगून टाकल्या. सावरकरांना घेऊन जाणारी शिपायांची तुकडी येत आहे व ' साहेब ' येत आहे अशी वर्दी देण्यांत आली, तेव्हां सावरकर एका विश्वासांतल्या बंदिवानाला

एक देव, एक देश, एक आशा
एक जाति, एक जीव, एक भाषा।

या राष्ट्रमंत्राची संथा देत होते. बेडी वगैरे न घालतांच सावरकर-बंधूंना तुरुंगाच्या दाराबाहेर काढण्यांत आलें. मृत्यूच्या विक्राळ जबड्यासारखें भयंकर वाटणारें

तें दार ! त्या जबड्यांत इतकीं वर्षें काढून सावरकर-बंधू सुदैवानें एकदांचे बाहेर पडले ! दारांतून बाहेर पडतांना विनायकराव गणेशपंतांना म्हणाले :[१]

*बाबा ! हा एवढासा उंबरा जीवनमरणाच्या सीमेची रेषा आहे. ओलांडला! मरणाच्या सीमेंतून जीवनाच्या सीमेंत हा वितीएवढा उंबरा ओलांडून आपण पुन्हां एकदां पाय टाकला ! आतां पुढचें पुढें ! !*

सावरकरबंधू शिपायांच्या कडक पहाऱ्यांत समुद्राकडे जाणाऱ्या वाटेनें जाऊं लागले. त्यांच्या दर्शनार्थ बंदिजनांनीं गोळा होऊं नये म्हणून बंदोबस्त करण्यांत आला होता. पण, त्या बंदोबस्ताला जुमानण्याची प्रवृत्ति त्या दिवसापुरती तरी लोप पावली होती. जमादारीचें काम करणारा एक बंदिवान एकदम पुढें सरसावला आणि कशाचीहि पर्वा न करतां, चाफ्यांच्या फुलांची एक साधी माळ त्यानें सर्व बंदिवानांच्या वतीनें सावरकरांच्या गळ्यांत घातली ! सावरकरांच्या कंठांत आजवर अनेकांनीं सहस्रावधि पुष्पमाला घातल्या असतील; पण, अंदमानांतून बाहेर निघतांना अंदमानांतल्या बंदिजनांच्या प्रेमाची निशाणी म्हणून गळ्यांत पडलेली ती पुष्पमाला —बिनवासाच्या फुलांवर गुलाबपाणी शिंपडून त्यांना सुवासिक करतात, त्याप्रमाणें बिनवासाच्या चाफ्यांच्या फुलांवर भक्तिभावाचें सिंचन केल्यामुळें सुवासिक बनलेली ती पुष्पमाला—सावरकरांच्या स्मृतींत सदैव स्थान पटकावून राहील, यात शंकाच नाहीं !

' महाराजा ' बोटींतून मायदेशाकडे परत येणाऱ्या सावरकर-बंधूंना प्रवासांत वेड्यांच्या इस्पितळाचा अनुभव मिळाला; कारण, ज्या पिंजऱ्यांत त्यांना कोंडलें होतें त्यांत वेड्यांची भरती केलेली होती. या वेड्यांच्या बाजारांतून आपल्याला पृथक् करण्यांत यावें अशी खटपट केल्यावर, सावरकरांना त्याच पिंजऱ्याच्या समोरच्या अंधारांत वेगळें ठेवण्यांत आलें. तळमजल्यावर कोंडण्यांत आल्यामुळें दोघांहि बंधूंना गुदमरल्यासारखें होई. त्यामुळें त्याबद्दलहि चळवळ करावी लागली. बोटीवरच्या उतारूंच्या समंजसपणामुळें सावरकरांना या प्रवासांत अन्न मात्र ठीक मिळालें ! तीन दिवस प्रवासांत काढल्यावर, चौथ्या दिवशीं दुपारच्या सुमारास दुरून हिंदुस्थानचा किनारा दिसूं लागला ! ज्या प्रिय मातृभूमीच्या उद्धारासाठीं सावरकरांनीं इतक्या हालअपेष्टा सोसल्या होत्या व प्रत्यक्ष मृत्यूशीं संग्राम केला होता त्या मातृभूमीचें इतक्या दीर्घ कालानंतर दर्शन झालें त्या वेळीं सावरकरबंधूंचें मन भावनांनीं कसें उचंबळून आलें असेल हें समजण्याला कविहृदयाचीच आवश्यकता आहे असें नाहीं. ज्याच्या ठिकाणीं ' मन ' म्हणून कांहीं तरी आहे असा प्रत्येक इसम या भावनांचें स्वरूप ओळखूं शकेल ! १९२१ च्या मे महिन्याच्या मध्याच्या सुमारास सावरकरबंधूंना कलकत्त्यास आणून अलीपूर तुरुंगांत डांबून ठेवण्यांत आलें.

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २६८.

सावरकरांच्या आयुष्यांतला जो भाग अंदमानांत गेला, त्याची या ठिकाणीं समाप्ति होत असल्यामुळें या कालखंडांतील त्यांच्या जीवनक्रमाचे कांहीं विशेष याच ठिकाणीं सांगणें इष्ट आहे. अंदमानांत हालअपेष्टा भोगून परत जिवंत आलेल्या देशभक्तांपैकीं कित्येकांनीं त्यानंतर राजकारणाला जवळजवळ रामरामच ठोकला. अंदमानांतील आपत्तींचें हलाहल पचवावें लागल्यामुळें, सावरकरांच्या चित्तवृत्तीवर व आरोग्यावर कायमच्या स्वरूपाचा कांहीं परिणाम झाला आहे. एकांतप्रियता, बाह्य जगांतील शिष्टाचारादि गोष्टींचें विस्मरण, वारंवार उद्भवणारा आजार, इत्यादि रूपांनीं हे परिणाम आजहि दृग्गोचर होत आहेत. पण, हे परिणाम घडले असूनहि, सावरकरांची देशकार्य करण्याबद्दलची तळमळ ओसरलेली नाहीं. परिस्थिती-प्रमाणें ज्या प्रकारची देशसेवा करतां येण्यासारखी असेल ती सतत करीत राहण्याचें व्रत सावरकरांनीं केव्हांच सोडलें नाहीं. राजकीय प्रश्नांचा विचार करतांना त्यांच्या बुद्धीचें तेज अद्यापहि तळपतें—अंदमानच्या भेसूरपणामुळें तें तेज मालवलें नाहीं—हें पाहून सध्यांचे व्हाइसरॉय यांनीं आश्चर्य प्रकट केलें व अशाच तऱ्हेचे आश्चर्याचे उद्गार थोरथोर भारतीय मुत्सद्यांनींहि काढले, अशी माहिती प्रस्तुत लेखकाला मिळालेली आहे. सावरकरांच्या वृत्तींत बालवयांतच जो ध्येयवाद बिंबला होता त्यामुळेंच हा चमत्कार घडला, असें म्हणणें प्राप्त आहे.

बारीनें अंदमानांत सावरकरप्रभृति राजबंदींना छळलें यांत नवल नाहीं. बारी हा अधिकारी होता व सावरकरप्रभृति राजबंदी हे त्याच्या पंजाखालीं सांपडलेले असहाय बंदी होते. पण, अशा परिस्थितींतहि सावरकरांनीं बारीची रग जिरविली, हें लक्षांत बाळगण्यासारखें आहे. पुराणांतरीं वर्णिलेल्या कालिया-मर्दनासारख्या प्रसंगांचें ज्या भक्तिभावानें कौतुक केलें जातें त्याच भक्तिभावानें सावरकरकृत 'बारी-मर्दना'च्या प्रसंगाचेंहि कौतुक कोणी करील, तर तें रास्त ठरेल. बारीच्या हातीं सत्ता होती; त्याला मऊ आणणाऱ्या सावरकरांजवळ धैर्य व हिकमती बुद्धि होती! सत्ता आणि बुद्धि यांच्या या द्वंद्वांत अखेरीस बुद्धीचा विजय झालेला दिसतो. या हिकमती बुद्धिमत्तेच्या बळावर सावरकरांनीं अंदमानांतलि बंदिजनांची संघटना केली, त्यांचें शिक्षण चालविलें व त्यांना राष्ट्रीय दृष्टीचा लाभ करून दिला. अंदमानांत घडणाऱ्या अत्याचारांच्या हकीकती बाहेर धाडून, त्या वृत्तपत्रांतून प्रसिद्ध करण्याच्या कामीं सावरकरांची हिकमती बुद्धि उपयोगी पडली. या हिकमती बुद्धीच्या बळावर सावरकरांनीं बेड्यांतून निघणाऱ्या आवाजांच्या आधारावर ध्वनि-लिपिहि बसविली! अशा हिकमती क्वचित् फसल्या व त्यामुळें प्रसंगीं शिक्षा भोगावी लागली तर ती भोगतांना सावरकरांची विनोदबुद्धि त्यांना उपयोगी पडत असे. चोरून वृत्तपत्रें आणल्याबद्दल सावरकरांना एकदां हात-कड्यांची शिक्षा सांगण्यांत आली होती. ही शिक्षा भोगीत असतांना, बारी एकदां मुद्दाम सावरकरां-कडे गेला व त्यानें, 'हें रे काय!' असा प्रश्न विचारला. 'हें पोस्टेज' असें

उत्तर हजरजबाबीपणानें देऊन, सावरकरांनीं बारीला चीत करण्याचा प्रयत्न केला तेव्हां बारी म्हणाला, 'जरा महाग पडलें, नाहीं?' विनोदबुद्धि, हजरजबाबी-पणा, वगैरे गुणविशेषांमुळें सावरकरांना अनेक अडचणींतून पार पडतां आलें. अंदमानमध्यें राहून आलेल्या कित्येक राजबंदिवानांचीं मनें परस्परांविषयीं किती कलुषित झालीं हें या देशभक्तांनीं लिहून ठेवलेले वृत्तांत वाचतांना लक्षांत येतें. सावरकरांच्या बाबतींत हा प्रकार घडलेला आढळत नाहीं. ज्या बारीनें त्यांचा इतका छळ केला, त्याच्याविषयीं अगर त्याच्या कुटुंबियांविषयीं देखील कटुभावना सावर-करांच्या मनांत नाहीं, हें लक्षांत ठेवलें म्हणजे राजबंदिवानांपैकीं कोणाहि विषयींची अढी त्यांच्या मनांत कां नाहीं हें सहज लक्षांत येतें. प्रत्येक मनुष्याच्या स्वभावाचा बरा भागहि लक्षांत घ्यावा, वाईट भागहि परिचित करून घ्यावा, आणि या दुहेरी परिचयानंतर बऱ्या भागाचा शक्य तो उपयोग करून घ्यावा, या धोरणानें सावर-कर अंदमानांत वागले व त्यामुळेंच तेथील राजबंदिवानांपैकीं कोणीहि त्यांच्या विषयीं कांहीं वाईट उद्‌गार काढलेले नाहींत.)

भोंवतालच्या राजबंदिवानांवर व इतर बंदिजनांवर सावरकरांची छाप किती प्रमाणांत पडलेली असे याचें दिग्दर्शन यापूर्वी करण्यांत आलेंच आहे. अंदमानांत रचलेल्या आपल्या कांहीं कविता सावरकरांनीं ज्या युक्तीनें बाहेर धाडल्या त्या युक्तीचें सविस्तर वर्णन केल्यानें, हा मुद्दा अधिक स्पष्ट होणार आहे. अलाहाबादच्या 'स्वराज्य' पत्राचे तीन संपादक सावरकरांपूर्वीच अंदमानांत धाडण्यांत आलेले होते. त्यांपैकीं एकजण सावरकरांचा विशेष निष्ठावंत भक्त बनला. हा गृहस्थ जन्मठेपीचा बंदी नव्हता. तो 'अवधीचा बंदी' असल्यानें त्याची मुक्तता कोणत्या वेळेस होईल हें निश्चित ठरलेलें होतें. त्याच्या मुक्ततेच्या समयापर्यंत आपण जितक्या कविता रचूं तितक्या त्याच्याबरोबर बाहेर धाडण्याची युक्ति योजून सावरकरांनीं ती अंमलांत आणिली. या गृहस्थांची मायभाषा हिंदी होती. प्रारंभीं त्यांना मराठी मुळींच येत नव्हतें. सावरकरांनीं त्यांना थोडेंफार मराठी शिकविलें. अर्थज्ञान न होतांही वेदमंत्र कंठगत करण्याचें सामर्थ्य भारतीयांच्या अंगीं आहे याची जाणीव सावरकरांना होती. त्याचप्रमाणें या संपादकमहाशयांनाहि ही जाणीव होती. मराठी भाषेचें तांत्रिक ज्ञान झाल्याबरोबर, या महाशयांनीं सावरकरांनीं रचलेल्या कविता पाठ करण्याला प्रारंभ केला. १९१४ च्या आगेमागें हे गृहस्थ आपल्या शिक्षेचा अवधि संपवून परत हिंदुस्थानांत आले. त्यानंतर थोडक्या दिवसांनीं ते डॉ. सावरकरांना भेटले. कंठगत काव्यसंग्रह त्यांनीं डॉ. सावरकरांना म्हणून दाखविला व डॉ. सावरकरांनीं तो टिपून घेतला. कवितांच्या शेकडों ओळी वर्षानुवर्षें मुखोद्‌गत करून ठेवणाऱ्या सावरकरांच्या धारणाशक्तीचें कौतुक करणें रास्तच आहे; पण, त्या कवितांचा पहिला खंड अशा रीतीनें हिंदुस्थानपर्यंत आणणाऱ्या या महाशयांच्या

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. १५७–१५८.

धारणाशक्तीची तारीफ करावी तेवढी थोडीच आहे. या सद्गृहस्थांची सावरकरांवर अनन्य भक्ति नसती तर हा निष्फळ खटाटोप त्यांनीं केलाच नसता!

आरंभीआरंभींच्या काळांत सावरकरांना कागदाचें बोटभर चिठोरें किंवा पेन्सिलीचा बारीकसा तुकडासुद्धां मिळत नसे. त्यामुळे, रचिलेल्या कविता रक्षण्याचें काम करतांना त्यांना फार प्रयास पडत. कविता मुखोद्गत कराव्या हा मार्ग तर सावरकरांनीं रूढ केलाच होता. पण, या पद्धतीलाहि कांहीं मर्यादा आहेतच. या मर्यादा लक्षांत येऊं लागल्यावर सावरकरांनीं काव्यपंक्ती लिहून काढण्याची एक युक्ति लढविली. कोठून तरी घायपातीच्या कांट्यासारखा एकादा कांटा मिळवावा किंवा कोणाजवळ तरी संधान बांधून एकादा बारीकसा खिळा मिळवावा आणि त्या कांट्याचा किंवा खिळयाचा पेन्सिल म्हणून उपयोग करून, खोलीच्या चुना लाविलेल्या भिंतींवर कविता लिहीत सुटावें, असा क्रम कित्येक दिवस चालला होता. खोली बदलण्याची वेळ आली अगर वर्षाच्या शेवटीं भिंतींना नव्यानें चुना फांसण्याची वेळ आली कीं, सावरकरांना भिंतींवर कोरून ठेवलेल्या कविता घाईघाईनें पाठ कराव्या लागत! 'कमला' 'गोमांतक' हीं दीर्घ काव्यें आणि यापूर्वींच्या दोन प्रकरणांत उल्लेखिलेलीं छोटीं काव्यें मिळून ज्या सहासात हजार पद्यपंक्ती बनतात त्या सर्व अशा रीतीनें तोंडपाठ करण्यांत आलेल्या होत्या, ही गोष्ट बाह्य जगाला नीटपणीं कळली तर सावरकरांच्या मार्सेलिस येथील धाडसाप्रमाणेंच, ही गोष्टहि जगाला कौतुकावह वाटेल! हा सर्व कवितासंग्रह लिहून काढण्याची संधि सावरकरांना अंदमानांतच शेवटींशेवटीं लाभली असावी, असें दिसतें. रत्नागिरी जिल्ह्यांतल्या खेड तालुक्यांतील एक इसम शिक्षा होऊन अंदमानांत धाडण्यांत आला होता. सावरकरांना अंदमानांतून हलविण्यांत आलें त्या वेळीं, त्यांनीं आपल्या कवितासंग्रहाची हस्तलिखित वही या बंदिवानाच्या स्वाधीन केली होती. आपल्याजवळ असलेल्या प्रत्येक वस्तूची झडती घेण्यांत येईल असें आगाऊ ओळखून, सावरकरांनीं या वहीची अशी व्यवस्था लावली असावी. हा बंदिवान आपली शिक्षा भोगून सुटून आला तेव्हां ही वहीहि त्याच्याबरोबर सुरक्षितपणें बाहेर आली. १९४२ च्या ऑक्टोबर-नोव्हेंबर महिन्यांत या सावरकरभक्तानें ही वही त्या भागांतल्या एका कार्यकर्त्याजवळ दिली. त्याच्यामार्फत ती वही सावरकरांकडे चालली असतांना, प्रस्तुत लेखकाला ती पहावयास सांपडली. १९२० सालीं सावरकरांना प्रथम लेखकाचें काम देण्यांत आलें व पुढें कांहीं दिवस तर ते अंदमानच्या तेलकोठीवरील अधिकारी होते. या मुदतींत केव्हां तरी सावरकरांनीं पुरेसे कागद हस्तगत केले असले पाहिजेत आणि आपल्या अंदमानी तपश्चर्येचें फळ—म्हणजेच या कविता—त्यांनीं लिहून काढल्या असल्या पाहिजेत.

अलीपूर तुरुंगांत पाय ठेवल्याबरोबर सावरकरबंधूंची ताटातूट करण्यांत आली —त्यांना एकत्र ठेवणें सरकारी अधिकाऱ्यांना श्रेयस्कर वाटलें नाहीं! या तुरुंगांत

हे दोघे बंधु सुमारें पंधरा दिवस होते. नंतर गणेशपंतांना तेथून हलवून विजापूरच्या तुरुंगांत नेऊन ठेवण्यांत आलें व विनायकरावांना रत्नागिरीच्या तुरुंगांत डांबून टाकण्यांत आलें ! या उभयता बंधूंना अलीपूर तुरुंगांतून इलविण्यांत आलें त्या सुमारासच—म्हणजे दि. २६-५-२१ रोजीं—कलकत्त्याच्या 'कॅपिटल' नांवाच्या अँग्लो-इंडियन वृत्तपत्रांत सावरकर-बंधूंविषयींचा कांहीं मजकूर प्रसिद्ध झाला. Ditcher's Diary या शीर्षकाखालीं कांहीं तरी मजकूर खरडणाऱ्या कोणा खर्डेघाशानें आपली अक्कल लढवून असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला कीं, सरकार सावरकरांना बंधमुक्त करीत नाहीं, हें बरोबरच आहे.

Government of India are by no means unreasonable in refusing to release the Savarkar brothers, who, Mr. Gandhi himself confesses, are frank revolutionaries.

( सावरकरबंधूंना मुक्त करण्याला हिंदुस्थान सरकार नकार देतें यांत गैर-वाजवी असें कांहींच नाहीं. हे बंधु उघडउघड क्रांतिकारक आहेत अशी कबुली गांधींनी देखील दिली आहे. ) हा निष्कर्ष काढतांना या खर्डेघाशानें जी कारणपरंपरा दिली होती, ती मोठी मजेदार होती. महायुद्ध सुरू होण्यापूर्वी सावरकरबंधूंनीं अंदमानांतल्या अधिकारीवर्गाची मर्जी संपादन केली होती व त्यामुळें सावरकर-बंधूंना—विशेषत: गणेशपंत सावरकर यांना—अंदमानांतल्या बिनतारी यंत्राचा उपयोग करण्याची मुभा मिळाली होती, असा जांवईशोध लावून त्या शोधावर या खर्डेघाशानें भला मोठा डोलारा उभारला होता. महायुद्ध सुरू झाल्यावर सावर-करबंधूंनीं या बिनतारी यंत्राच्या द्वारा सुमात्रा बेटांतल्या जर्मनच्या बिनतारी यंत्राशीं संधान जोडलें व त्यामुळें अंदमानच्या आसपास शत्रूच्या नौकांचा सुळसुळाट सुरू झाला वगैरे भाकडकथा रंगवून, या पोटभरू लेखकानें सावरकरबंधूंच्या बाबतींतल्या सरकारी धोरणाचें समर्थन केलें होतें.[1] अंदमानांतून आपले बंधु हिंदुस्थानच्या तुरुं-गांत आले न आले, तोंच त्यांच्याबद्दलचा असा विषारी लेख प्रसिद्ध झाला हें पाहून डॉ. सावरकर यांना चिंता वाटूं लागली. बंधूंच्या मुक्ततेचा मार्ग मोकळा होण्याच्या दृष्टीनें या लेखाकडे दुर्लक्ष करणें हितावह नाहीं असें ठरवून, त्यांनीं या पत्राच्या व्यवस्थापकांना कोर्टात खेंचण्याचें ठरविलें. मुंबईचे सॉलिसिटर्स मणिलाल अँड खेर यांच्यामार्फत त्यांनीं 'कॅपिटल' पत्राचे संपादक व व्यवस्थापक यांच्यावर नोटिस बजावली. लेखकाचें नांव जाहीर करण्यांत यावें व लेखांत जीं बदनामी करणारीं विधानें करण्यांत आलीं आहेत त्यांच्याबद्दल बिनशर्त माफी मागण्यांत यावी, असें या नोटिशीच्या द्वारा 'कॅपिटल' पत्राच्या व्यवस्थापकाला कळविण्यांत आलें होतें. आक्षेपार्ह विधानें जाहीर रीतीनें परत घेतलीं गेलीं, तर हें प्रकरण लांब-विण्याची सावरकरांची इच्छा नाहीं, असें आश्वासनही नोटिशींत देण्यांत आलें होतें.

---

१ Life of Barrister Savarkar by Chitra Gupta या पुस्तका-च्या परिशिष्ट चारमध्यें ( पृ. १४२-४४) 'कॅपिटल' पत्रांतला मूळ लेख दिलेला आहे.

बरेच आढेवेढे घेतल्यावर 'कॅपिटल' पत्रानें दि. २८-७-१९२१ रोजीं पुढील मजकूर[१] प्रसिद्ध केल्यामुळें हें प्रकरण थांबविण्यांत आलें :

The Editor and the Publisher of the Capital deeply regret having published the defamatory remarks which appeared in the Ditcher's Diary in the issue of the Capital, dated 26th May, 1921 and hereby tender him an unconditional apology.

The Editor and the Publisher withdraw the remarks made in respect of both the Savarkar brothers and deeply regret that they should have been published, however innocently.

(कॅपिटल पत्राच्या २६ मे १९२१ च्या अंकांत 'डिचर्स डायरी' या सदरांत मुद्रित झालेल्या मजकुरांतील बदनामी करणाऱ्या विधानांबद्दल सदर पत्राचे संपादक व प्रकाशक यांना मनःपूर्वक खेद वाटत आहे. त्या विधानांबद्दल संपादक व प्रकाशक विनशर्त माफी मागत आहेत. उभयतां सावरकर बंधूंच्या बाबतींत करण्यांत आलेलीं विधानें संपादक व प्रकाशक मागें घेत आहेत. हीं विधानें प्रसिद्ध झालीं तीं कोणत्याहि दुष्ट हेतूमुळें झालीं नाहींत; पण, कशा रीतीनें का असेनात, तीं प्रसिद्ध झालीं हें खरें. या प्रसिद्धीबद्दल संपादक व प्रकाशक यांना अंतःकरणपूर्वक वाईट वाटत आहे.)

'कॅपिटल' पत्रानें केलेल्या विधानांबद्दल असा प्रश्न उपस्थित होतो कीं, हीं विधानें करणाऱ्या लेखकानें सगळाच भर आपल्या कल्पनेवर ठेवून मजकूर खरडला असेल, कीं, कोठून तरी मिळालेल्या अर्धवट माहितीवर विश्वास ठेवून हा मजकूर लिहिल्यामुळें हा लेखक तोंडघशीं पडला असेल! लेखकानें सर्वस्वीं कल्पनेवर भर ठेवून मजकूर लिहिला नसावा, असें दिसतें. सुंदरबनमध्यें शस्त्रास्त्रें आणण्याचा व उतरविण्याचा कट, त्या निमित्तानें चिनी समुद्रापासून गंगासागरापर्यंतच्या भागांत हिंडणारीं जर्मन जहाजें वगैरे या पत्रांतला भाग कल्पनानिर्मित नाहीं. 'Sedition Committee Report' हा विस्तृत सरकारी अहवाल १९१९ मध्येंच प्रसिद्ध झालेला होता. या अहवालाचें सातवें प्रकरण German Plots (जर्मन कारस्थानें) या नांवाचें असून, त्यांत जर्मनीच्या मदतीनें महायुद्ध काळांत क्रांतिकारकांनीं काय-काय अचाट उद्योग केले याचें रसभरित वर्णन करण्यांत आलेलें आहे. तेव्हां, पत्रांतला हा भाग तरी निव्वळ कल्पनानिर्मित मानतां येत नाहीं. या सगळ्या उलाढालींपाशीं सावरकरांचा—विशेषतः गणेशपंत सावरकरांचा—संबंध जोडण्याचें साहस लेखकानें केलें त्याला मात्र लेखी आधार नव्हता आणि म्हणूनच या लेखांतल्या विधानांबद्दल माफी मागण्याचा प्रसंग 'कॅपिटल' पत्राच्या संपादकांवर व प्रकाशकावर ओढवला!

ज्या विधानांना लेखी आधार नव्हते तीं विधानेंसुद्धां लेखकानें केवळ कल्पनेनें निर्माण केलीं असतील, असें दिसत नाहीं. १९२० च्या मार्चमध्यें बंगाली क्रांतिकारक अंदमानांतून सुटून स्वप्रांतांत परत येऊं लागले. ते परत आल्यावर त्यांच्यापैकीं

---

१ Life of Barrister Savarkar by Chitra Gupta : P. 144.

कित्येकांना लोकांनीं स्वाभाविकपणेंच असें विचारलें असावें कीं, अरे, तुम्ही सगळे राजबंदी क्षमेचा लाभ घेऊन सुटलांत! सावरकरबंधूंना मात्र याचा लाभ मिळत नाहीं, याचें कारण काय? या कारणाचें आपापल्या पद्धतीप्रमाणें स्पष्टीकरण करतांना कोणातरी मुक्त बंदिवानानें अंदमानच्या बिनतारी यंत्राशीं गणेशपंतांचा संबंध जोडून दिला असावा. असा संबंध जोडण्यांत या देशभक्ताच्या मनांत कांहीं दुष्ट हेतु नसेल, हें संभाव्य आहे. अंदमानांत दिवस काढीत असतांना तेथील राजबंदिवानांचे जे वाद होत त्यांत प्रसंगविशेषीं प्रांतिक अभिमानाचा अभिनिवेशहि डोकावत असे, हें खरें आहे! पण ती कटुता कोणा वंग राजबंदिवानाच्या मनांत शिल्लक राहिल्यामुळें, त्यानें सावरकरबंधूंबद्दल मुद्दाम कांहीं तरी खोटीं विधानें केलीं असतील, हें प्रस्तुत लेखकाला संभाव्य वाटत नाहीं. सावरकरबंधूंच्या चरित्रांत अद्भुताची भर घालण्याची उत्सुकता सर्वांनाच असल्यामुळें, महायुद्ध सुरू झाल्यानंतर कांहीं महिन्यांनीं, अंदमानांत त्यांच्याविषयीं हव्या त्या गप्पा कशा पसरत असत याचें दिग्दर्शन यापूर्वीं करण्यांत आलेंच आहे. सावरकर-चरित्रावर अद्भुतरसाचे दोन कुंचले फिरवण्याच्या उत्सुकतेनें, कोणा तरी मुक्त वंग राजबंदिवानानें गणेशपंतांचा बिनतारी यंत्राशीं संबंध जोडला! अशा अद्भुत गोष्टी नेहमींच वायुवेगानें सहस्रमुखांनीं पसरत असतात. तशीच हीहि गोष्ट पसरतपसरत अनेकांच्या कानांवर गेली असली पाहिजे. सावरकरबंधु अंदमानांतून सुटून अलीपूर तुरुंगांत आले त्या सुमारास या बंधुद्वयाबद्दल जनतेला वाटणारी उत्सुकता स्वाभाविकपणेंच जागृत झाली! या उत्सुकतेचें समाधान करण्याचा प्रयत्न करण्याच्या नादांत 'कॅपिटल' पत्रांतल्या Ditcher's Diary या सदरांत मजकूर लिहिणाऱ्या कोणा तरी माणसानें वडाची साल पिंपळाला जोडून कांहीं तरी अद्भुत गोष्ट रंगविली व शेवटीं पत्राच्या संपादकाला व प्रकाशकाला नाकदुऱ्या काढाव्या लागल्या, असा वास्तविक प्रकार असावा, असें दिसतें.

गणेशपंत सावरकरांना १९२१ सालांतले सात महिने व १९२२ चा बहुतेक जानेवारी महिना एवढा काळ विजापूरच्या कारागृहांत कंठावा लागला! या कारागृहांत त्यांना एका ओसाड नि भयाण खोलींत अगदीं एकटें कोंडून ठेवण्यांत आलें होतें. अगोदरच त्यांची प्रकृति क्षीण झालेली; त्यांत ही एकांत कोठडीची शिक्षा! त्यामुळें गणेशपंतांचे या ७–८ महिन्यांत फार हाल झाले. १९२१ च्या डिसेंबर महिन्याच्या प्रारंभीं डॉ. सावरकर हे गणेशपंतांना भेटण्यासाठीं गेले. त्या वेळीं डॉक्टर महाशयांच्या अंगावर गांधी-पेहेराव होता. कारागृहाचे अधिकारी त्या वेशामुळें बुजून गेले व प्रथम भेटीला नकार देण्यांत आला. ही तक्रार वरपर्यंत पोंचवून, डॉ. सावरकर यांनीं लवकरच गणेशपंतांची भेट घेतली. १९२२ सालीं जानेवारी महिन्याच्या शेवटींशेवटीं गणेशपंतांना विजापूर तुरुंगांतून साबरमती तुरुंगांत नेण्यांत आलें. अंदमानपासून गणेशपंतांच्या प्रकृतींत क्षयाचीं पूर्वचिन्हें दिसूं लागलीं होतीं. तुरुंगांत

त्यांच्या प्रकृतीकडे कोणी लक्षच दिलें नाहीं. त्यामुळें त्यांची प्रकृति जास्तच बिघडत चालली. त्यांना आंत्रिक क्षयरोग झाला असावा अशी भीति १९२२ च्या जूनच्या सुमारास वाटूं लागली. कृष्णानंदजी नांवाच्या राजबंदिवानानें कांहीं खटपट करून गणेशपंतांच्या प्रकृतीविषयींची हृदयद्रावक माहिती बाहेर फोडली. ती प्रसिद्ध झाल्यावर, गणेशपंतांच्या सुटकेच्या प्रश्नाकडे मुंबई सरकारला दुर्लक्ष करतांच येईना. त्यामुळें १९२२ सालीं सप्टेंबर महिन्याच्या आरंभीं गणेशपंतांना मुंबई सरकारनें मुक्त केलें. तीनचार महिने औषधोपचार झाल्यावर त्यांची प्रकृति साधारणपणें बरी झाली.

अलीपूर तुरुंगांतून विनायकराव सावरकर यांना रत्नागिरीच्या तुरुंगांत धाडण्यांत आलें. १९२१ च्या मे अखेरपासून पुढील कमींतकमी दोन वर्षें तरी त्यांना रत्नागिरीच्याच तुरुंगांत दिवस काढावे लागले. या तुरुंगांत त्यांना अगदीं एका बाजूस एका कोठडींत बंद करून टाकण्यांत आलें. अंदमानांत दहा वर्षें झगडून, त्यांनीं ज्या सवलती मिळविल्या होत्या त्या सर्व नाहींशा होऊन जणूं कांहीं ते नव्यानेंच तुरुंगांत आले आहेत अशा रीतीनें त्यांना वागविण्यांत येऊं लागलें. त्यांच्या प्रकृतिमानाचा विचार करून अंदमानांतील अधिकारी त्यांना अलीकडे बरें अन्न देऊं लागले होते. शेवटीं शेवटीं अंदमानांत त्यांना थोडें फार दूधहि मिळूं लागलें होतें. भोंवतालच्या बंदिजनांचा सहवास, लेखनसाहित्य जवळ ठेवण्याची अनुज्ञा वगैरे गोष्टी अंदमानांत त्यांना मिळूं लागल्या होत्या. त्या सर्व काढून घेण्यांत आल्यामुळें, सावरकरांचें जीवन फिरून अत्यंत कष्टमय होऊं लागलें. त्यांना या ठिकाणीं सुताचें काम देण्यांत आलें होतें. १९२१ च्या जून महिन्यांत तर, त्यांना कारागृहांतील जीवन अत्यंत दुःसह झालें.

असें दुःसह जीवन सहन करीत जगण्यापेक्षां जीवनाचा कायमचा अंत करून टाकलेला बरा, असा विचार त्यांच्या मनांत येऊं लागला. एक दिवस तर, आत्महत्या करण्याची प्रवृत्ति विशेषच बळावूं लागली. कोठडीच्या भिंतीला उंचावर खिडकीच्या गजापर्यंत पोंचून गळफांस लावून घ्यावयाचा हा उदासवाणा विचार त्यांच्या मनांत स्थिरावूं लागला. पण, ती दिवसाची वेळ असल्यामुळें,या विचाराची अंमलबजावणी तत्काळ करणें शक्य नव्हतें. हळुहळू त्यांचें मन स्थिर आणि विवेकशील बनूं लागलें. "अंदमानांत इंदुभूषणपासून तों प्रो. परमानंदांपर्यंत जे अनेक बंगाली, पंजाबी, शीख, इ० देशभक्त यातनांस कंटाळून आत्मघातास कर्तव्य समजूं लागले, त्यांस ज्या कारणासाठीं तूं त्या कृत्यापासून परावृत्त केलेंस, त्याच कारणासाठीं तूंहि परावृत्त हो,"[१] असें त्यांच्या विवेकानें त्यांना सुचविल्यावर, ते फिरून कारागृहांतील कठोर तपस्या करूं लागले.

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २७७–२७८.

या प्रसंगानंतर अल्प काळांतच, त्यांनीं आपल्या कारावासाची कठोर कथा संकलित रूपानें लिहून काढण्याचा विचार मनांत योजला. या संकलित लेखनाचीं टांचणें-टिपणें करण्याला अवश्य असणारा कागद जवळ नसल्यामुळें, या ग्रंथाचे भाग-विभाग त्यांनीं मनांत नीट जुळविले; आणि, सुताचें काम चालू असतांनाच, भोंवतालीं पडलेल्या लाल विटांच्या तुकड्याताकड्यांनीं त्यांनीं या ग्रंथाचीं पहिलीं टिपणें केलीं. 'माझी जन्मठेप' या नांवानें पुढें जे लेख प्रसिद्ध झाले-व ज्या लेखांना पुढें ग्रंथाचें रूप आलें—त्या सर्वांची पहिली जुळणी अशा प्रकारें करण्यांत आली. १९२१ च्या अखेरीच्या काळांत आणि १९२२ च्या आरंभींच्या काळांत मिळून ' हिंदुत्व ' हा इंग्रजी प्रबंधहि तुरुंगांतच लिहिला गेला. त्या वेळीं सुरू असलेल्या कॉंग्रेसच्या चळवळींतले कित्येक राजबंदिवान रत्नागिरीच्या तुरुंगांत धाडण्यांत आलेले होते. या राजबंदिवानांना कागद वगैरे जवळ बाळगण्याची सवलत मिळत असे. सावरकरांना एकांत कोठडींत ठेवण्यांत आलेलें होतें व त्यामुळें या राजबंदींची व सावरकरांची भेट प्रायः होत नसे. हें खरें असलें तरी, तुरुंगांतल्या बिनतारी तारायंत्रानें सावरकर व हे राजबंदी यांच्या दरम्यान दळणवळण चालत असेच. या दळणवळणामुळें सावरकरांना कागद मिळूं शकले; आणि, ते मिळतांच, त्यांनीं ' हिंदुत्वा ' वरील प्रबंध लिहून काढण्याला आरंभ केला. या सुमारास—म्हणजे १९२१ च्या उत्तरार्धात—मलबारमधील मोपल्यांनीं तेथील हिंदूंवर जे अत्याचार केले त्यांच्या वार्ता सावरकरांना तुरुंगांत मिळत असत. क्वचित् प्रसंगीं या मोपला-बंडाची चर्चा इतर राजबंदिवानांबरोबर करण्याची संधीहि सावरकरांना लाभत असे. मोपल्यांच्या अत्याचारांचा विचार करतांना या भ्रान्त देशभक्तांची बुद्धि कशी वाहतीला लागते हें प्रत्यक्षच लक्षांत आल्यामुळें, हा ग्रंथ तत्काळ लिहून काढणें सावरकरांना अवश्य वाटलें असावें. कारागारांतील अधिकाऱ्यांची नजर चुकवून या ग्रंथाच्या हस्तलिखितांचीं पृष्ठें लिहून काढण्याचा तडाखा सावरकरांनीं सुरू केला. हस्तलिखिताचा बराचसा भाग लिहून झाला, तेवढा चोरून बाहेर धाडून देण्याची व्यवस्थाहि यशस्वी रीतीनें करण्यांत आली. अशा रीतीनें हें सर्व हस्तलिखित रत्नागिरीच्या तुरुंगाच्या भिंती ओलांडून बाहेर आलें व नागपूरचे वकील श्री. विश्वनाथराव केळकर यांनीं १९२३ सालीं ' हिंदुत्व ' हा प्रबंध प्रथम प्रसिद्ध केला. या प्रबंधाच्या प्रसिद्धीच्या वेळीं सावरकर कैदेंत असल्यामुळें, प्रसिद्धीच्या वेळीं लेखकाचें खरें नांव प्रगट होणें शक्यच नव्हतें. ' A Mahratta ' या टोपण नांवानें हा ग्रंथ प्रथम प्रसिद्ध झाला. 'हिंदु राष्ट्रवादाची स्मृति ' असें वर्णन करण्याच्या योग्यतेचा हा ग्रंथ ग्रंथकर्त्याच्या नांवाशिवाय प्रथम प्रसिद्ध झाला ! १९२३ सालीं प्रथम प्रसिद्ध झालेल्या या प्रबंधाची दुसरी आवृत्ति १९४२ सालापर्यंत निघूं शकली नाहीं ही एकच गोष्ट सुशिक्षित हिंदूंच्या आस्थाशून्यपणाची निदर्शक म्हणून लक्षांत ठेवण्यासारखी आहे. तर्कशुद्ध विचारसरणी, इतिहास-पुराणादि ग्रंथांचें सूक्ष्म ज्ञान,

आणि भाषेचा सुटसुटीतपणा इत्यादि गुणांमुळें हा प्रबंध नमुनेदार उतरलेला आहे. या प्रबंधांतील ' हिंदु ' शब्दाची व्याख्या मान्य करण्याला अद्यापहि कित्येक लोक खळखळ करतात; पण, हिंदुस्थानांतल्या विविध वंशांचें व मतपंथांचें एकसूत्रीकरण करणारी इतकी सुटसुटीत अशी दुसरी व्याख्या यापूर्वी तरी कोणी केलेली नाहीं. हा सबंध प्रबंध म्हणजे

आसिंधु-सिंधुपर्यंता यस्य भारतभूमिका।
पितृभूः पुण्यभश्चैव स वै हिंदुरिति स्मृतः

या व्याख्येचें विस्तृत विशदीकरणच आहे.

या सुमारास रत्नागिरी तुरुंगांत जे कॉंग्रेसवादी राजबंदी ठेवण्यांत आले होते त्यांच्या हिंदु-मुसलमान ऐक्याविषयींच्या भ्रान्त कल्पना नाहींशा करण्यासाठीं सावरकरांना वादविवाद करावे लागत. त्याप्रमाणेंच, या देशभक्तांच्या मनांत सत्य, अहिंसा, असहकार इत्यादि गोष्टींचा जो सांवळागोंधळ झालेला होता, तो नाहींसा करण्यासाठींसुद्धां सावरकरांना त्यांच्याशीं वारंवार वादविवाद करावे लागत. अशा वादविवादप्रसंगीं हे असहकारी 'सत्यवान' असें भासवीत कीं, गुप्तपणानें केलेली कोणतीहि गोष्ट असहकाराच्या तत्त्वज्ञानाला वावडी आहे ! पण, हेच 'सत्यवान' आपल्या खाण्यापिण्याच्या बाबतींत स्वतःची कांहीं सोय व्हावी म्हणून अगर दुसऱ्यानें गुप्तपणानें मिळविलेलें वृत्तपत्र वाचतां यावें म्हणून, हवी ती छपवाछपव करण्याला सिद्ध असत. स्वतःच्या सोयीसाठीं तत्त्वज्ञानाचा एक तराजू वापरणारे आणि राष्ट्रहिताच्या विचाराच्या वेळीं वेगळा तराजू वापरूं पाहणारे दांभिक लोक देशभक्त म्हणून गप्पा मारूं लागत तेव्हां त्यांचा दंभस्फोट करण्याच्या कामांतहि सावरकरांना पुढाकार घ्यावा लागे.

कारागृहांतून हिंदूंना मुसलमान करण्याचें काम किती पद्धतशीरपणें चालतें हें अंदमानांतलि अनुभवामुळें सावरकरांना चांगलेंच कळून चुकलें होतें ! रत्नागिरीच्या तुरुंगांतहि हा बाटविण्याचा प्रकार पद्धतशीरपणें चालतो असें लक्षांत आल्याबरोबर त्यांनीं तेथेंहि शुद्धीची चळवळ सुरू केली. मुसलमानाच्या स्पर्शामुळें फुटाणे विटाळतात या वेडगळ समजुतीच्या आहारीं जाऊन, हिंदु बंदिवान स्वतःची उपासमार करून घेत आहेत हें कळल्याबरोबर सावरकरांनीं अंदमानांतल्या हिंदुबंदिवानांना एक कानमंत्र सांगितला होता; व हिंदु बंदिवानांनीं त्या मंत्राचा प्रभाव दाखविल्याबरोबर पठाण नि मुसलमान बंदिवानांची खोड मोडली होती.[१] याच प्रकाराची आवृत्ति सावरकरांना रत्नागिरी तुरुंगांत काढावी लागली. वेळीं अवेळीं 'बांग' देत मुसलमान बंदिवान आरडाओरडा करूं लागले. व त्यामुळें इतर बंदिवानांची झोंपमोड होऊं लागली. यांत धर्मपालनाचें नांवहि नसून इतरांना सताव-

---

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. ४९.

ण्याचीच वृद्धि आहे हें लक्षांत आल्याबरोबर, सावरकरांनीं हिंदु बंदिवानांना एक युक्ति सुचविली. या आरडाओरडीवर तोडगा म्हणून हिंदु बंदिवानहि वेळीं अवेळीं भजनांचा व रामनामाचा उच्चैर्घोष करूं लागले.[1] त्रास देणारांनाच त्रास पोहोंचूं लागल्याबरोबर ते सामोपचाराचें बोलणें बोलावयास तयार झाले.

शुद्धीची चळवळ, हिंदूंचा पुढाकार इत्यादि कार्यांत सावरकर लक्ष घालूं लागल्यावर तुरुंगांतील मुसलमान अधिकारी व कैदी यांच्या डोळयांत ते खुपूं लागले. या लोकांनीं एकदां तुरुंगांत मारामारी करण्याचा कट केला. सावरकरांना या कटाची चाहूल लागलेली असल्यामुळें, त्यांनीं सर्वांना सावध असण्याचा इषारा दिलेला होता. ठरल्याप्रमाणें मुसलमान गुंडांनीं उठावणी केली. पण, सावरकर आणि हिंदु बंदिवान हे जागृत असल्यामुळें, त्यांची ही उठावणी यशस्वी झाली नाहीं. संघटित उठावणीला संघटित प्रतिकारानें उत्तर देण्यांत आल्यामुळें, ही मारामारी चांगलीच रंगून, अखेरीस अधिकाऱ्यांना मध्यें पडावें लागलें व सशस्त्र पोलिस आणावे लागले. हें पाहिल्यावर मुसलमानांनीं माघार घेतली. याचा एक इष्ट परिणाम असा झाला कीं, कारागारांत धर्मांतर करण्याची बंदी असावी ही सावरकरांची मागणी अधिकाऱ्यांना मान्य करावी लागली.

बंदिवानांना शिक्षण देण्याचें कार्य सावरकरांनीं रत्नागिरीच्या तुरुंगांतहि सुरू केलें. सर्वसामान्य बंदिवान वाचनाभिमुख झाल्याबरोबर त्यांच्या वृत्तींत इष्ट असा फरक पडूं लागला व त्यामुळें त्यांना शिस्तींत वागविणें अधिकाऱ्यांनाहि सोयीचें वाटूं लागलें. हे सर्व सुपरिणाम लक्षांत येऊं लागल्यामुळें, अधिकाऱ्यांकडून या शिक्षणाच्या कार्यास प्रोत्साहन मिळूं लागलें. याचा फायदा घेऊन सावरकरांनीं रत्नागिरी तुरुंगांतील ग्रंथालयाकडे लक्ष देण्यास प्रारंभ केला. या ग्रंथालयांत नांव घेण्यासारखे मराठी ग्रंथ यापूर्वीं नव्हतेच. सावरकर ग्रंथालयाकडे लक्ष देऊं लागल्यामुळें, ग्रंथालयांत अनेक चांगल्या ग्रंथांची भर पडली. मुसलमान व ख्रिस्ती कैद्यांच्या उपासतापासांचे वेळीं सरकार त्यांची योग्य ती सोय करतें; पण, हिंदु बंदिवानांच्या उपोषणदिनांकडे लक्ष देण्यास सरकार तयार नसतें हें पाहून सावरकरांनीं या बाबतींतहि चळवळ सुरू केली. सध्यां हिंदु कैद्यांना वर्षांतून पांच प्रसंगीं उपोषणाला योग्य ते पदार्थ पुरविले जातात. आषाढी व कार्तिकी एकादशी, महाशिवरात्र, रामनवमी व गोकुळअष्टमी हे ते पांच प्रसंग होत.

रत्नागिरीच्या तुरुंगांत हळुहळू घरच्या मंडळींच्या भेटीगांठी होण्याची शक्यता निर्माण झाली व वाचावयाला पोटभर पुस्तकें मिळणेंहि शक्य झालें. रामदासांच्या समग्र ग्रंथांचें पारायण सावरकरांनीं या तुरुंगांत फिरून एकदां केलें. पृथ्वीराज रासा, भविष्यपुराण, ' वैदिक इंडिया ' इत्यादि ग्रंथ त्यांनीं या कारागारांत असतांनाच वाचले. सावरकर रत्नागिरी तुरुंगांत होते त्या अवधींतच ' कमला ', ' गोमांतक '

१ माझी जन्मठेप : उत्तरार्ध : पृ. २८२.

'सप्तर्षि' इ. काव्यांच्या प्रसिद्धीची योजना बाहेर आंखण्यांत आली. 'गोमांतक' कवितेचें कर्तृत्व 'महाराष्ट्र भाट' या काल्पनिक नांवाच्या व्यक्तीकडे देण्यांत आलें व इतर कविता 'विजनवासी'च्या कविता म्हणून प्रसिद्ध झाल्या. सावरकरांचें लेखन मुद्रित होण्याच्या बाबतींत ज्या दुर्दैवी घटना घडत आल्या त्यांतली एक घटना अशी कीं पुष्कळसें मुद्रण प्रकटपणें न झाल्यामुळें, स्वतः ग्रंथकर्त्याची दृष्टि लिखाणावर शेवटपर्यंत फिरत राहण्याचा योग साधला नाहीं. ऱ्हस्वदीर्घाच्या चुका, शब्द तोडतांना झालेल्या चुका, प्रसंग व संदर्भ लक्षांत न आल्यामुळें झालेल्या चुका अशा चुकांनीं सावरकरांच्या मुद्रित कविता दूषित झालेल्या आढळतात.

या सुमारास गांधीप्रणीत राजकीय चळवळी जोरानें सुरू झालेल्या असल्यामुळें, अनेक प्रतिष्ठित लोक देशभक्तीचा एक कार्यक्रम म्हणून तुरुंगांत जाऊं लागले होते. 'राजकीय कैदी' हा स्वतंत्र वर्ग मान्य करण्यांत यावा व कैद्यांचा दर्जा लक्षांत घेऊन त्यांना तुरुंगांत वागविण्यांत यावें, ही मागणी देशभर केली जात होती. या मागणीला मुंबईच्या विधिमंडळानें १९२३ च्या फेब्रुवारी महिन्याच्या प्रारंभीं मान्यता दिली. याच सुमारास डॉ. सावरकर यांनीं रत्नागिरीस जाऊन आपल्या बंधूंची भेट घेतली. विनायकरावांची प्रकृति यथातथाच असल्याचें त्यांना आढळलें. १९२३ सालीं मे महिन्याच्या सुरुवातीला रत्नागिरी शहरांतच तिसरी महाराष्ट्र प्रांतिक परिषद झाली. या परिषदेंत सावरकर-मुक्ततेच्या मागणीचा प्रश्न स्वाभाविकपणेंच निघाला. अंदमानांत व हिंदुस्थानांत मिळून सावरकरांनीं तेरा वर्षें सक्तमजुरीची शिक्षा भोगली असल्यामुळें, त्यांची प्रकृति क्षीण नि निःशक्त झालेली आहे; सबब त्यांना तावडतोब बंधमुक्त करण्यांत यावें, असा ठराव या परिषदेंत संमत करण्यांत आला. बॅ. जम्नादास माधवजी मेथा यांच्या अध्यक्षतेखालीं स्थापन झालेल्या सावरकर-मुक्तता समितीनें सावरकरांची बाजू जगाला कळावी म्हणून एक छोटेखानी इंग्रजी पुस्तक या सुमारासच प्रसिद्धिलें. नागपूरचे श्री. विश्वनाथराव केळकर यांनीं १९२३ सालीं मे व जून महिन्यांत मिळून तीन विस्तृत लेख केसरींत लिहिले व सरकार सावरकरांच्या बाबतींत किती दीर्घद्वेषीपणानें वागत आहे हें सिद्ध केलें. १९२३ सालीं सप्टेंबर महिन्याच्या मध्याच्या सुमारास मुंबई येथें मारवाडी विद्यालयांत श्री. विठ्ठलभाई पटेल यांच्या अध्यक्षतेखालीं सभा होऊन सावरकर-मुक्ततेची मागणी करणारा ठराव संमत करण्यांत आला. १९२३ च्या डिसेंबरांत कोकोनाडा येथें कॉंग्रेसचें अधिवेशन झालें. त्यांतहि सावरकर यांच्यावर झालेल्या अन्यायाचा निषेध करण्यांत आला. या सुमारास केव्हां तरी सावरकरांना रत्नागिरीच्या कारागृहांतून हलवून येरवड्यास नेण्यांत आलें असावें, असें दिसतें.

या सुमारास महाराष्ट्रांत मुळशी सत्याग्रहाचें आंदोलन चाललें असल्यामुळें येरवड्यांत पुष्कळ राजकीय बंदिवान ठेवण्यांत आलेले होते. सावरकरांना प्रथम कांहीं दिवस एकांत कोठडींत डांबून ठेवण्यांत आलें होतें. सावरकरांच्या बरोबर

अंदमानांत असलेले कांहीं पंजाबी बंदिवानहि यापूर्वीच येरवड्यास आणण्यांत आले होते. सत्याग्रही बंदिवानांची या क्रांतिकारक बंदिवानांकडे पाहण्याची दृष्टि कांहींशी विपर्यस्त आहे, असें सावरकरांना आढळून आलें. ही दृष्टि निवळावी म्हणून सावरकरांनीं या नवागत सत्याग्रही बंदिवानांपाशीं चर्चा करण्याची सुरुवात केली. हिंदुसंघटनाविषयक कार्यासंबंधींच्या या मंडळींच्या कल्पनाहि फार विचित्र होत्या. सावरकरांना या कल्पनांचें खंडन करण्याच्या कामाकडेहि लक्ष पुरवावें लागलें. सावरकरांना येरवड्यांत आणून ठेवण्यांत आल्यावर थोड्याच दिवसांनीं पूर्वी पोर्टब्लेअर येथें असलेले मेजर मरे यांना येरवडा कारागृहाचे पर्यवेक्षक म्हणून नेमण्यांत आलें.

या सुमारास सावरकरांच्या मुक्ततेच्या प्रश्नाचा विचार करण्यांत मुंबई सरकार गढून गेलें असावें, असें मानण्याला आधार आहे. सावरकरांनीं अंदमानांत असतांना कट केले वगैरे जो बोभाटा झालेला होता त्याला पोषक असें कांहींहि रत्नागिरीच्या तुरुंगांत सावरकर होते त्या अवधींत घडलें नव्हतें. गणेशपंत सावरकर सुटल्याला वर्ष झालें होतें; त्या काळांतलें त्यांचें वर्तन सरकारनें संशयखोर बनावें अशा पद्धतीचें नव्हतें. १९२० सालीं झालेली विधिमंडळांवरील बहिष्काराची चूक दुरुस्त करण्याचें ठरवून राष्ट्रीय बाण्याचे लोक 'स्वराज्य पक्षीय' प्रतिनिधी म्हणून विधिमंडळांत घुसणार ही गोष्ट स्पष्ट झाली होती. या प्रतिनिधींनीं लकडा लावल्यामुळें सावरकरांची मुक्तता झाली असें दिसण्यापेक्षां, सरकारनें सावरकरांना स्वेच्छेनें सोडिलें असें जगाला दिसणेंच जास्त श्रेयस्कर होय, असा विचार मुंबई प्रांताच्या अधिकाऱ्यांच्या मनांत घोळत नसेलच, असें नाहीं.

नव्या सुपरिंटेंडेंटनें सावरकरांना क्विनाईन विक्रीच्या कारखान्यावरील मुख्य अधिकारी म्हणून नेमलें. त्यामुळें सावरकरांना कैद्यांचें शिक्षण, ग्रंथालयाची सुधारणा, वगैरे गोष्टींकडे राजरोसपणें लक्ष देतां येऊं लागलें. येरवड्याच्या अधिकारी मंडळांत असलेले एक मद्रासी गृहस्थ ख्रिस्ती समाज सोडून आपल्या मूळच्या हिंदुसमाजांत येऊं इच्छितात असें सावरकरांना कळल्यावर, त्यांनीं त्यांच्या शुद्धीकरणाची सर्व व्यवस्था केली. या गृहस्थांचें शुद्धीकरण व एका शुद्धीकृत नर्सबरोबर त्यांचा विवाह या दोन्ही गोष्टी लवकरच मुंबईस घडून आल्या. या सुमारास गांधींजींनाहि येरवड्याच्या कारागृहांत ठेवण्यांत आलेलें होतें. त्यामुळें गांधीजींच्या विचारसरणीविषयीं राजबंदिवानांबरोबर चर्चा करण्याचा प्रसंग सावरकरांवर वारंवार येत असे. गांधीजींच्या असहयोगी मतांचा व खिलाफत–प्रचाराचा तीव्र निषेध सावरकरांनीं चालविला होता. क्रांतिकारकांपैकीं जे लोक फांशी गेले होते वा मेले होते त्यांचीं नांवेंहि भोंवतालच्या सत्याग्रही राजबंदींना अवगत नाहींत, असें सावरकरांच्या लक्षांत आलें. त्यामुळें, त्या थोर देशभक्तांचीं चरित्रें बैठकींतून क्रमाक्रमानें सांगण्याला सावरकरांनीं प्रारंभ केला.

या संधीसच मुंबईचे तेव्हांचे गव्हर्नर सर जॉर्ज लॉईड यांनीं येरवड्याच्या कारागृहास भेट दिली व सावरकरांची मुक्तता कोणत्या अटींवर करतां येईल, या गोष्टीची त्यांनीं मनमोकळेपणानें चर्चा केली. येरवड्याचे पर्यवेक्षक मेजर मरे यांचे मार्फत या भेटीची व चर्चेची हकीकत गांधीजींना कळली होती.

यानंतर कांहीं दिवसांनीं सावरकर पन्नास साठ राजबंदिवानांपुढें मदनलाल धिंग्रा यांच्या विषयींची माहिती सांगत होते. इतक्यांत त्यांना कारागृहाच्या कार्यालयांत नेण्यासाठीं एक सार्जंट आला. सावरकर कार्यालयांत पोंचले. मुंबई सरकारकडून आलेलें एक कथन पर्यवेक्षकानें सावरकरांपुढें ठेविलें. या कथनांत सावरकरांनीं कांहीं दुरुस्ती केली. पाहिली दुरुस्ती जरा लांब झाल्यामुळें, पर्यवेक्षकानें तिच्यांत थोडी छाटाछाट केली. ही दुरुस्ती शेवटीं उभयमान्य झाली. सावरकर आपल्या कोठडींत परत आले. पर्यवेक्षकानें हें कथन वर धाडून दिलें. यानंतर थोड्याच दिवसांनीं म्हणजे रविवार दि. ६–१–२४ रोजीं सावरकरांची येरवड्यांतून मुक्तता झाली. आदल्याच दिवशीं डॉ. सावरकर त्यांना भेटले होते; पण, तोंपर्यंत मुक्ततेची वेळ इतकी जवळ आली आहे अशी कल्पना कोणालाच आलेली नव्हती. दहा पांच बंदिवानांना सावरकर धिंग्रा प्रकरणाचा उत्तरार्ध सांगत होते तोंच त्यांच्या सुटकेची वार्ता येऊन पोंचली. कार्यालयांत पोंचल्यावर पर्यवेक्षकानें सावरकरांना त्यांच्यावरील निर्बंधांची कल्पना स्पष्ट करून सांगितली. पांच वर्षेपर्यंत सावरकरांनीं कोणत्याहि राजकीय चळवळींत भाग घेऊं नये, ही एक अट त्यांच्यावर घालण्यांत आली होती. या अवधींत त्यांनीं रत्नागिरी जिल्ह्याच्या सीमेंत राहिलें पाहिजे, अशी दुसरी अट त्यांच्यावर लादण्यांत आलेली होती.

सावरकर सुटल्याची बातमी गांवांत डॉ. भट यांना कळली त्याबरोबर ते सावरकरांना स्वगृहीं आणण्यासाठीं येरवड्यास गेले. सावरकरांचा मुक्काम पुण्यांत पांचचार तासच होता. या अवधींत कित्येक मंडळी डॉ. भट यांच्या येथें जाऊन सावरकरांना भेटली. श्री. न. चिं. केळकर हे त्या वेळीं गायआळींत रहात होते. त्यांच्या घरीं जाऊन सावरकरांनीं त्यांची भेट घेतली. या पांचचार तासांत सावरकर व प्रो. अण्णासाहेब परांजपे यांचीहि भेट झाली होती, असें समजतें. मुंबईचें 'नवाकाळ' दैनिक सुरू होण्याच्या वाटाघाटी त्या सुमारास चाललेल्या होत्या. परांजपे-सावरकर भेटींत सहज 'नवाकाळ' असा शब्द निघाला तेव्हां सावरकर विनोदानें म्हणाले : अण्णा ! मी नवाकाळ वगैरे फारसा ओळखीत नाहीं; मी जुना काळच जाणतों ! त्या दिवशीं दुपारीं ३॥ वाजण्याच्या सुमारास निघणाऱ्या गाडीनें सावरकर मुंबईस रवाना झाले व तेथें एकदोन दिवस राहून रत्नागिरीस गेले. दि. ७–१–२४ च्या 'टाइम्स ऑफ इंडिया'त Current Topics या सदरांत सावरकरांच्या मुक्ततेच्या निमित्तानें तीनचार परिच्छेद प्रसिद्ध झाले. या परिच्छेदांचा शेवट पुढील अशुभसूचक वाक्यांनीं केलेला आढळतो :

At Ratnagiri, he will have a predecessor of a very different stamp. After the third Burmese War, king Thibaw was exiled to Ratnagiri and it was there that he died.

(सावरकर ज्या रत्नागिरीस जात आहेत तेथें त्यांच्या आधीं अगदीं वेगळ्या प्रकारचा एक इसम स्थानबद्ध म्हणून ठेवण्यांत आलेला होता. तिसऱ्या ब्रह्मी युद्धानंतर थिबा राजाला निर्वासित करून रत्नागिरीस ठेवण्यांत आलें होतें व तेथेंच त्याचें देहावसान झालें !)

———

## प्रकरण १६ वें : उपसंहार

# अलीकडचा काळ : ओझरती ओळख

पततु नभसो गच्छत्वस्तं निमज्जतु वारिधौ
व्रजतु वरुणागारद्वारं प्रभाभिरनादृतः ॥
तदपि तरणिर्दत्वा पादं शिरस्सु महीभृताम् ।
दलिततिमिरव्रातः प्रातः पुनः सकृदेष्यति ॥

सावरकर कारागृहांतून मुक्त झाले व स्थानबद्ध म्हणून ते रत्नागिरी येथें राहूं लागले त्या वेळीं त्यांचें वय ४१–४२ वर्षांचें होतें. १९२४ पासून पुढचीं जवळजवळ साडेतेरा वर्षें सावरकरांनीं रत्नागिरी येथें काढली. व अलीकडचीं सहा वर्षें त्यांचें वास्तव्य मुंबई येथें आहे. या जवळजवळ वीस वर्षांच्या काळांतील त्यांचें चरित्र नीटपणीं सांगावयाचें तर, या ग्रंथाचीं सुमारें १५० पृष्ठें तरी त्या कामीं खर्च करावीं लागतील. कागद व वेळ ह्या दोहोंचीहि या बाबतींतली मर्यादा कठोरपणानें पाळणें अवश्यच असल्यामुळें, या अवधींतल्या कांहीं महत्त्वाच्या गोष्टी अगदीं तांत्रिक पद्धतीनें सांगून, हें चरित्र पूर्ण करणें अवश्य आहे.

रत्नागिरी येथील साडे तेरा वर्षांच्या स्थानबद्धतेच्या काळांत सावरकर मुंबई सरकारच्या संमतीनें कांहीं वेळां रत्नागिरी जिल्ह्याच्या हद्दीबाहेर निश्चित काळपर्यंत राहिले होते. १९२४ सालच्या पावसाळ्यांत ते अशा रीतीनें नाशिक येथें राहिले असतां, त्यांना महाराष्ट्रीय जनतेच्या वतीनें जवळजवळ १२ हजार रुपयांची थैली अर्पण करण्यांत आली. हा द्रव्यनिधि गोळा करण्यासाठीं जी समिति स्थापन झाली होती तिच्यांत श्री. तात्यासाहेब केळकर, डॉ. गोपाळराव पळसुले, डॉ. वि. दा. फाटक, मुंबईचे डॉ. वेलकर ही मंडळी प्रमुख होती. हा निधि अर्पण करण्याचा समारंभ डॉ. मुंजे यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. या प्रसंगीं शंकराचार्य डॉ. कुर्तकोटी यांनीं सावरकरांना आशीर्वादपर पत्र व महावस्त्र पाठविलें होतें.

सावरकरांना सोडतांना सरकारनें असें जाहीर केलें होतें कीं, त्यांच्यावर घालण्यांत आलेल्या अटी पांच वर्षांच्या अवधीच्या आहेत. ही मुदत संपण्याच्या सुमारास सावरकरांवरील अटी सर्वस्वीं रद्द व्हाव्या यासाठीं पुष्कळ जोराची चळवळ करण्यांत आली होती. या चळवळीच्या निमित्तानें मुंबईस भरलेल्या एका सभेंत श्री. बाळासाहेब खेर यांचें भाषण झालें होतें. सावरकरांवरील अटींचा प्रश्न मुंबई कौन्सिलांतहि मधूनमधून उपस्थित केला जाई. अशा एका प्रसंगीं वीर नरिमन यांनीं सावरकरांना संपूर्णपणें मुक्त करण्याबद्दलचीं समर्पक कारणें मार्मिक-

पणानें मांडली होती. या प्रसंगीं लोकांच्या मागणीला नकार देतांना सरकारनें असें स्पष्ट शब्दांत सांगून टाकलें कीं, सावरकरांवर ज्या अटी घातलेल्या आहेत त्यांचा भंग त्यांच्याकडून करण्यांत आलेला आहे ! हा भंग कसा झाला याचें स्पष्टीकरण करण्याची सरकारची तयारी नाहीं, असेंहि गृहमंत्र्यांनीं सांगून टाकलें ! सावरकरांकडे संशयग्रस्त वृत्तीनें पहाण्याच्या या सरकारी वृत्तीचा परिणाम १९३२ सालीं दिसून आला. या वर्षीं रत्नागिरीच्या चव्हाण नांवाच्या एका तरुणानें मुंबई येथें धोबीतलाव भागांत एका सार्जेंटावर गोळी झाडण्याचा प्रयत्न केला. या प्रकरणाशीं सावरकरांचा कांहीं तरी संबंध असावा अशा संशयाच्या आहारीं जाऊन सरकारनें सावरकरांना पंधरा दिवसपर्यंत रत्नागिरी येथील तुरुंगांत ठेविलें होतें. सावरकरांना बंधमुक्त करण्याचा प्रश्न मुंबई कौन्सिलमधील सभासद खाजगी रीतीनें अगर उघडपणें मधूनमधून उपस्थित करीत असत; पण, हॉट्सनपासून बेलपर्यंतच्या सर्व गृहमंत्र्यांना सावरकरांबद्दल सारखीच भीति वाटत असल्यामुळें, मुंबईप्रांतांत द्विदल राज्यपद्धति चालू होती तोंपर्यंत, अशा यत्नांना यश येऊं शकलें नाहीं !

रत्नागिरीसारख्या अगदीं बाजूच्या ठिकाणीं राहून सावरकरांनीं या अवधींत जें हिंदुसंघटनेचें कार्य केलें तें बहुमोल आहे. आपल्याला निष्कारण पुढारीपण चिकटवून घेऊन कित्येक माणसें ज्या कार्याला हीन लेखतात तें सर्व प्रकारचें कार्य सावरकरांनीं या काळांत स्वतः केलेलें आहे. पायपिटी करून, मानखंडना पत्करून, लोकापवादाला न भिऊन, सर्व प्रकारच्या लोकांच्या समजुती पाडून व प्रत्येक लहान-मोठ्या संधीचा शक्य तो फायदा घेऊन हिंदुसंघटनेचें कार्य पुढें कसें रेटावें हें ज्याला शिकावयाचें असेल त्यानें सावरकरांचें या अवधींतलें कार्य नीट अभ्यासिलें पाहिजे. सावरकरांच्या या कार्यामुळें रत्नागिरी जिल्ह्यांत सार्वजनिक कामापुरती तरी अस्पृश्यता जवळजवळ नाहींशी झाली. परधर्मांत गेलेल्या अगर परधर्मांत जन्मलेल्या लोकांना हिंदु करून घेणारावर कोणती जबाबदारी येऊन पडते, हेंहि सावरकरांनीं या काळांत आपल्या वर्तनानें लोकांना पटवून दिलें. धाक्रस-कुटुंबाला हिंदु करून घेतल्यावर सावरकरांनीं या कुटुंबांतल्या मुलींचीं लग्नें नीटपणीं करून देण्याची जबाबदारी पार पाडली; इतकेंच नव्हे तर, एका मुलीच्या लग्नाच्या वेळीं, स्वतः पीतांबर नेसून त्यांनीं कन्यादानहि केलें ! शुद्धि करण्याइतकेंच शुद्धि पचविण्याचें कार्य महत्त्वाचें आहे, हें सावरकरांनीं या काळांत आपल्या वर्तनानें सूचित केलें. दसरा, संक्रांत, सत्यनारायण, सहभजन, हळदीकुंकू, सहभोजन अशा अनेकविध कार्यक्रमांच्या द्वारा त्यांनीं रत्नागिरीचा हिंदु समाज एकजिनसी बनविण्याचा प्रयत्न केला. रत्नागिरी जिल्ह्यांत दळणवळणाचीं साधनें बेताचीं असूनहि आणि या जिल्ह्याच्या डोंगराळ नि खडकाळ रचनेंतून प्रवास करणें सुखावह नसूनहि, सावरकरांनीं या जिल्ह्याचा बहुतेक सर्व भाग पादाक्रांत केला; आणि शुद्धि, अस्पृश्यता-

निवारण, संघटना, स्वदेशीव्रतपालन इत्यादि विषयांचें महत्त्व त्यांनीं लोकांना पटवून दिलें.

रत्नागिरी येथें बसून सावरकर जे विचार प्रसृत करीत त्याचा प्रकाश नुसत्या महाराष्ट्रांतच नव्हे तर बहुतेक सर्व हिंदुस्थानभर पसरत असे. रत्नागिरी येथील हिंदु-सभेनें रक्षाबंधनाचा खरा अर्थ ओळखून ठिकठिकाणच्या हिंदुसभांकडे व हिंदु नेत्यांकडे राख्या पाठविण्याचा उपक्रम सुरू केला होता. हुतात्मा स्वामी श्रद्धानंदजी यांनीं या उपक्रमाचें अभिनंदन केलें होतें. १९२४ सालच्या अखेरीला सावरकर व मौ. शौकतअल्ली यांची एक महत्त्वाची मुलाखत झाली. मुंबईच्या 'लोकमान्य' पत्राच्या महाराष्ट्र विशेषांकांत ही मुलाखत प्रसिद्ध झाल्याबरोबर, त्या मुलाखतींत जे मुद्दे उपस्थित झाले होते त्यांच्याविषयींची चर्चा दिल्ली, पंजाबकडील अनेक पत्रांतून सुरू झाली व स्वतःला सावरतांसावरतां मौ. शौकतअल्ली यांची गाळण उडून गेली! लीपिशुद्धि, भाषाशुद्धि, हिंदु जगताच्या उत्थानाच्या दृष्टीनें नेपाळच्या स्वतंत्र राज्याचें महत्त्व इत्यादि विषयांची चर्चा सावरकरांनीं सुरू केली; त्याबरोबर ती चर्चा उत्तर हिंदुस्थानपर्यंत जाऊन पोंचली.

सावरकरांच्या योग्यतेप्रमाणें त्यांना स्थान व मान देण्यांत यावा अशा अर्थाच्या निदान दोन तरी सूचना या काळांत करण्यांत आलेल्या होत्या. 'प्रगति' साप्ताहिकाचे संपादक श्री. त्र्यं. शं. शेजवलकर यांनीं अशी सूचना केली होती कीं, कॉंग्रेसचें अध्यक्ष-पद मंडित करण्याचें स्वातंत्र्य सरकार सावरकरांना देणार नाहीं हें ओळखूनहि, त्यांची एकवार कॉंग्रेसच्या अध्यक्षपदीं निवड करण्यांत यावी. गोलमेज परिषदेला प्रतिनिधि म्हणून सावरकरांना इंग्लंडला पाठविण्यांत यावें, अशीहि सूचना करण्यांत आलेली होती. या दोन सूचनांपैकीं कोणतीच सूचना रुजूं शकली नाहीं हें, कॉंग्रेस व सर-कार यांच्या स्वभावाचा विचार करतां, स्वाभाविकच ठरतें!

या काळांत सावरकरांच्या हातून लेखन पुष्कळ झालें. 'हिंदुपदपादशाही' हा इंग्रजी ग्रंथ त्यांनीं या काळांतच लिहिला व प्रसिद्धिला. 'माझी जन्मठेप' या नांवानें जें पुस्तक पुढें प्रसिद्ध झालें तें पुस्तकहि याच काळांत तयार झालें. प्रथम सावरकरांचे अंदमानांतील अनुभव 'केसरी'त प्रसिद्ध झाले. या अनुभवांचा उरलेला भाग पुढें 'श्रद्धानंद' पत्रांत प्रसिद्ध झाला; आणि, खंडशः प्रसिद्ध झालेल्या या भागांच्या आधारावर पुढें 'माझी जन्मठेप' या पुस्तकाची उभारणी झाली. या पुस्तकाचें गुजराथी भाषांतर होऊन तें प्रसिद्ध होण्याची सर्व तयारी झालेली होती. इतक्यांत मूळ मराठी पुस्तकच सरकारनें जप्त करून टाकलें! श्री. विजयकुमार सिंह यांनीं अगदीं अलीकडे 'In Andaman : The Indian Bastille' हें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. या पुस्तकांत अंदमानी जीवनाचें चित्र चांगल्या प्रकारें रेखाटण्यांत आलेलें आहे. भाई परमानंद, बारींद्रकुमार घोष, उपेंद्रनाथ बानर्जी प्रभृति देशभक्तांनीं स्वतःचे अंदमानविषयक अनुभव लिहून ठेविले आहेत, तेहि चांगले आहेत. पण

'माझी जन्मठेप' या सावरकरांच्या पुस्तकाबद्दल असें निश्चित म्हणावेंसें वाटतें कीं, बंदिवानांच्या जीवनाचें वर्णन करणारे जे ग्रंथ जगाच्या वाङ्मयांत प्रसिद्ध आहेत त्यांच्या परिगणनेंतसुद्धां या ग्रंथाला फार उच्च स्थान द्यावें लागेल. सावरकरांच्या ज्या लिखाणाचें केव्हां तरी इंग्रजी भाषांतर होणें अवश्य आहे, त्यांत 'माझी जन्मठेप' हा ग्रंथ अग्रेसर ठरेल. 'माझी जन्मठेप' हा ग्रंथ सरकारनें लोकांपासून हिरावून घेतल्यामुळें, सावरकरांनीं पुढें 'काळें पाणी' ही याच विषयावरील कादंबरी लिहिली. याशिवाय त्यांनीं लिहिलेलीं 'उःशाप', 'उत्तर-क्रिया' व 'संन्यस्त खड्ग' हीं तीन नाटकेंहि याच काळांत लिहिलीं गेलीं आहेत.

१९२६ ते ३० पर्यंत 'श्रद्धानंद' पत्र चालू होतें. त्या अवधींत सावरकर दर अंकाला सरासरीनें चार पांच स्तंभ तरी मजकूर लिहून धाडीत असत. त्यांच्यावर सरकारी निर्बंध असल्यामुळें, कांहीं मजकूर टोपण नांवानें किंवा नांवाशिवायच प्रसिद्ध होई. कॉंग्रेसनें मद्रासच्या अधिवेशनांत स्वातंत्र्य हें ध्येय मान्य केल्याबरोबर, सावरकरांना जें समाधान वाटलें तें समाधान कोणत्या प्रकारचें होतें हें ज्याला समजून घ्यावयाचें असेल त्यानें 'श्रद्धानंदा'च्या फाइलींतला असा मजकूर हुडकून वाचला पाहिजे. 'श्रद्धानंदां'त क्रांतिकारक व त्यांच्या चळवळी यांच्या संबंधींचे जे जे लेख प्रसिद्ध झालेले आहेत त्यांतले पुष्कळ लेख सावरकरांचे आहेत. 'श्रद्धानंद' बंद झाल्यानंतरच्या काळांत सावरकरांचे पुष्कळसे लेख 'किर्लोस्कर' प्रभृति मासिकांतून प्रसिद्ध होऊं लागले. या लेखांचें संकलन करण्यांत आलेलें असून 'सावरकर-साहित्य' या नांवाच्या पांच पुस्तकांत हे लेख विभागलेले आहेत. या लेखांतून कित्येक प्रसंगीं जी पुनरुक्ति झालेली आहे ती प्रचारकी थाटाला शोभण्यासारखी आहे. लेखांचें संकलन करतांना ही पुनरुक्ति टळली असती तर बरें झालें असतें. या पांच पुस्तकांत ज्या 'गोष्टी' म्हणून लिहिलेल्या आहेत त्याही सावरकर-साहित्यांत गाळतां आल्या असत्या. साहित्य या दृष्टीनें ज्याला कांहीं दर्जा आहे, आणि विचार–प्रवर्तनाचें ज्यांत कांहीं सामर्थ्य आहे, असें लेखन निवडून निवडून काढलें तरी, सावरकर–साहित्याच्या आकाराचीं निदान दोन तरी पुस्तकें होतील इतकें लेखन शिल्लक उरेल.

सावरकर रत्नागिरीस स्थानबद्ध होते तरी तेथें जाऊन त्यांच्याशीं हितगुज करणारे लोक थोडेथोडके नव्हते. बेळगांव कॉंग्रेसनंतर श्री. व्ही. व्ही. एस्. अय्यर हे रत्नागिरीस गेले होते व सावरकरांची भेट घेऊन नंतरच ते मद्रासेस गेले. अंदमानांत सावरकरांच्या परिचयाचे झालेले श्री. नानी गोपाळ, नुकतेच दिवंगत झालेले जबलपूरचे बॅ. ग्यानचंद वर्मा, अगदीं परवां परवां दिवंगत झालेले शचींद्रनाथ संन्याल इ० मंडळी रत्नागिरीस जाऊन सावरकरांना भेटून गेली होती. गांधीजी हे मुद्दाम सावरकरांना भेटण्यासाठीं रत्नागिरीस गेले नव्हते; पण, १९२७ च्या मार्च महिन्यांत रत्नागिरीस गेल्या वेळीं तेहि सावरकरांच्या घरीं गेले होते. या दोन श्रेष्ठ भारत-पुत्रांमध्यें सुमारें पाऊण तासपर्यंत जी चर्चा झाली ती 'हिंदुसंघटन' या विषयाचा अभ्यास

करणाऱ्या लोकांनीं अभ्यासण्याजोगी आहे. सावरकर १९२४ सालीं नाशिक येथें होते त्या अवधींत, लो. ना. बापूजी अणे यांच्याशीं त्यांचा परिचय झाला.

सावरकर रत्नागिरीस होते त्या काळांत त्यांच्या जुन्या स्नेह्यांपैकीं व परिचितांपैकीं कित्येकजण इहलोक सोडून गेले ! नाशिकचे कवि गोविंद, श्री. व्ही. व्ही. एस्. अय्यर, लाला लजपतराय, प्रो. अण्णासाहेब परांजपे, पं. शामजी कृष्णवर्मा, कामाबाई इत्यादि मंडळींच्या मृत्यूचे प्रसंग या काळांत घडले. कवि गोविंद, पं. शामजी कृष्णवर्मा इत्यादि मंडळींच्या मृत्यूमुळें सावरकरांच्या मनांत ज्या भावना उत्पन्न झाल्या त्या 'श्रद्धानंद' पत्रांत व्यक्त झालेल्या आढळतात. लाला लजपतराय यांच्या मृत्यूनंतर रत्नागिरी येथें जी शोकसभा झाली त्या शोकसभेंत सावरकरांचें अत्यंत हृदयस्पर्शी भाषण झालें होतें. प्रो. अण्णासाहेब परांजपे यांच्या मृत्यूची वार्ता कळल्याबरोबर सावरकरांनीं त्यांच्या कुटुंबीयांना जी तार धाडली तींत फार जिव्हाळा आहे. अशा राजकारणी आप्तांव्यतिरिक्त इतरहि कांहीं आप्तांच्या मृत्यूचा आघात सावरकरांना या काळांत सोसावा लागला. सावरकरांचे श्वशुर श्री. भाऊसाहेब चिपळूणकर व सावरकरांच्या सासूबाई हीं उभयतां या काळांतच इहलोक सोडून गेलीं ! सावरकरांचे मेहुणे श्री. भास्करराव काळे यांचें देहावसान या काळांतच झालें !

या दुःखाच्या प्रसंगांवर अल्पसा उतारा म्हणून कीं काय, कांहीं सुखाचे प्रसंगहि सावरकरांना या काळांत अनुभवितां आले. १९२५ सालीं त्यांची मुलगी कुमारी प्रभाताई हिचा जन्म झाला. या मुलीच्या पाठीवर झालेली एक मुलगी अशक्त होती; ती आजारीआजारीच असे. त्यामुळेंच कीं काय, सावरकर तिच्या संगोपनाकडे विशेष लक्ष पुरवीत असत. ही मुलगी सरासरी १॥–२ वर्षांची होऊन मेली. त्यानंतर १९२८ सालीं सावरकरांचा मुलगा चि. विश्वास याचा जन्म झाला. रत्नागिरी येथें राहून सावरकरांनीं ज्या शुद्धिकार्याला चालना दिली त्यामुळें गोमांतक, वसई वगैरे विभागांत शुद्धिकार्याला जोर चढला. सावरकरांच्या कार्याच्या प्रभावामुळें जीं थोर माणसें त्यांच्याकडे आकृष्ट झालीं व सावरकरांपाशीं फार आपलेपणानें वागूं लागलीं त्यांत श्रीमंत भागोजी शेठ कीर यांची गणना होते. या सद्गृहस्थांच्या औदार्यामुळें रत्नागिरी येथें अखिल हिंदूंचें पतितपावन मंदिर उभारलें गेलें त्यासमयीं सावरकरांना धन्यता वाटली असेल, यांत संशय नाहीं.

या अवधींत सावरकर ज्या चळवळी करीत होते त्या चळवळींना पोषक अशा पुष्कळ कविता त्यांनीं प्रसंगाप्रसंगानें रचिल्या. 'हिंदूंचें एकतागीत', सध्यां हिंदुसभेंत प्रचलित असलेलें ध्वजगीत वगैरे हिंदुत्वनिष्ठ गीतें या काळांतच रचलीं गेलीं आहेत. पंजाबी देशभक्त भगतसिंगजी यांना फांशी देण्यांत आल्यावर, सावरकर यांनीं भगतसिंगांच्या हौतात्म्यावर एक पोवाडा रचला होता व सावरकरांच्या सान्निध्यांत असणाऱ्या कित्येक तरुणांनीं तो मुखोद्गतहि केला होता, असें समजतें. या काळांत

माखनचे श्री. रानडे यांनीं सावरकरांचें छोटेखानी मराठी चरित्र लिहिलें. चित्रगुप्त-लिखित सावरकर-चरित्र हें इंग्रजी पुस्तकहि या काळांत प्रसिद्ध झालें. या काळांत सावरकरांच्या कांहीं पुस्तकांचीं हिंदी भाषांतरेंहि झालीं.

* * *

१९३७ सालीं मे महिन्यांत सावरकरांच्यावरील निर्बंध शेवटीं दूर झाले. या महत्त्वाच्या गोष्टीचें श्रेय त्या वेळचे मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड ब्रॅबोर्न, हंगामी मंत्रि-मंडळांतील पंतप्रधान सर धनजीशहा कूपर वगैरे सर्वांनाच दिलें पाहिजे हें खरें; पण, न्यायीपणानें व हिशोबीपणानें बोलावयाचें तर असें म्हटलेंच पाहिजे कीं, ह्या श्रेयांतला फार मोठा हिस्सा एकटे बॅ. जम्नादास मेथा यांचा आहे. सावरकरांच्यावरील निर्बंध दूर करण्याचा प्रश्न हंगामी मंत्रिमंडळांत निघाला तेव्हां लॉर्ड ब्रॅबोर्न यांनीं पूर्वींच्या अटी शिथिल करण्याला तत्परतेनें मान्यता दिली; पण, कांहीं निर्बंध शिल्लक उरावे असेंहि त्यांनीं सुचविलें. या प्रसंगीं बॅ. जम्नादास मेथा यांनीं प्रसंगोचित कोटिक्रम केला नसता तर सावरकरांना लाभलेली संपूर्ण निर्बंधमुक्तता दुर्लभ ठरली असती.

सावरकर निर्बंधमुक्त झाले व ते आतां रत्नागिरी सोडून मुंबईस जाऊन रहाणार असें दिसूं लागलें त्यावेळीं रत्नागिरीच्या मंडळींनीं अनेक प्रसंग साधून त्यांना प्रेमानें निरोप दिला. रत्नागिरीच्या ' बलवंत ' पत्रातर्फे निरोप देण्यांत आला तेव्हां एका वक्त्यानें जरा अतिप्रसंग केला. त्याबरोबर सावरकरांनीं त्याला चांगलें झणं-झणीत उत्तर दिलें. सावरकरांचा घोडा पूर्वींच्या अश्वमेधीय घोड्याप्रमाणें दिग्-विजयाकरितां बाहेर पडला आहे; पण, मध्येंच कोठें तरी न गुरफटतां तो दिग्-विजयी ठरो, असें म्हणण्याचें धाष्टर्य या वक्त्यानें केलें होतें. त्याला उत्तर देतांना सावरकर म्हणाले :

*माझें घोडें अडखळेल, अशी भीति व्यक्त करण्यांत आली आहे. पण, आमचें घोडें कोठें आहे व पूर्वीं कोठें होतें याचा शोध करून नंतर त्यावर टीका करणें बरें. आमचीं घोडीं जेथें आहेत तेथपर्यंत इतरांचीं घोडीं अजून पोंचावयाचीं आहेत. सर्व देशभक्तांच्या उद्योगाचा आपापल्या परीनें उपयोग होतो; पण, दुसऱ्यांना दोष देतांना प्रत्येकानें आपलें स्वतःचें कार्य किती आहे, याची छाननी करावी.*

रा. ब. परुळेकर यांच्या अध्यक्षतेखालीं सभा होऊन सावरकरांना रत्नागिरी नगरातर्फे निरोप देण्यांत आला तेव्हां तेथील कॉंग्रेसकार्यकर्ते श्री. मोरोपंत जोशी यांनीं सावर-करांबद्दल जे उद्‌गार काढले ते, सर्वसामान्य कॉंग्रेसजनांच्या वृत्तीचा विचार केला तर, विवेकीपणाचे ठरतात. श्री. जोशी म्हणाले : सावरकर कोणत्याही पक्षाला मिळाले तरी देशहित करण्याच्या बुद्धीनेंच ते तसें करतील; कारण तेहि देशाचे एक वैद्यच आहेत. सावरकर निर्बंधमुक्त होऊन भारतीय राजकारणांत प्रवेश

करण्याला समर्थ झाले याबद्दल त्या वेळीं अनेक लोकाग्रणींनीं आनंद व्यक्त केला. हा आनंद व्यक्त करतांना लो. ना. बापूजी अणे यांनीं जे उद्गार काढिले होते ते आज खरे ठरले आहेत. नाशिक येथें आपली व सावरकरांची पहिली भेट झाली त्या वेळीं आपण सावरकरांविषयीं काय मत बनविलें हें सांगतांना लो. ना. अणे यांनीं या प्रसंगीं पुढील भाषा वापरलेली आढळते :

*'ध्येयनिष्ठा व कार्यक्रमाचें व्यवहारसौकर्य यांचा मेळ करणें जरूर आहे, अशी त्यांची विचारसरणी असल्याचें मला आढळून आलें.' परकीयांनीं पूर्व विचारानें रचलेल्या व स्वकीयांच्या संशयाकुल मनःस्थितीनें दृढ बनूं पहाणाऱ्या चक्रव्यूहाचा भेद करूं शकणारा पराक्रमी वीर अभिमन्यू, हे गौरवपर शब्द लोकनायकांनीं या प्रसंगां वापरले. यापुढील राजकारणाचा विचार करतांना भारतीयांचें लक्ष प्रयाग व वर्धा येथून निघून, रत्नागिरीकडे ओढलें जाईल असेंहि भाकित श्री. बापूजी अणे यांनीं वर्तवून ठेविलें.*

सावरकर रत्नागिरी सोडून निघाले नि त्यांच्या सार्वजनिक राजकारणी जीवनाला एकदम सुरुवातच झाली. कोल्हापूर, सांगली, मिरज, पंढरपूर, पुणें या मार्गानें ते मुंबईस गेले व त्यांच्या सुटकेबद्दलच्या व सत्कारासंबंधींच्या वार्तांनीं वातावरण दुमदुमून जाऊं लागलें. तेव्हांपासून आजपर्यंतच्या काळांत सावरकरांनीं महाराष्ट्रांतल्या बहुतेक जिल्ह्यांना भेटी दिलेल्या आहेत. साडेतेरा वर्षे रत्नागिरी जिल्ह्याची सेवा घडलीच असल्यामुळें, ते कदाचित् रत्नागिरीस फिरून गेले नसावे. बाकीच्या जिल्ह्यांत फक्त सातारा जिल्हाच असा आहे कीं, ज्या जिल्ह्यांत सावरकरांचा संचार अद्याप मुळींच झालेला नाहीं. १९३७ सालच्या शेवटीं अहमदाबाद येथील हिंदुमहासभेच्या अध्यक्षस्थानीं त्यांची निवड झाली. अहमदाबाद, नागपूर, कलकत्ता, मदुरा, भागलपूर व कानपूर या सहा ठिकाणीं गेल्या सहा वर्षांत हिंदुसभेचीं जीं अधिवेशनें झालीं तीं सर्व सावरकरांच्याच अध्यक्षतेखालीं झालीं. सावरकर इतक्या सातत्यानें या पदावर राहिल्यामुळें कांहीं टीकाखोर लोकांकडून त्यांच्यावर टीका केली जाते. पण, या बाबतींत सावरकरांचा इलाज नाहीं, अशी स्थिति आहे. नागपूर, कलकत्ता व मदुरा या सर्व ठिकाणच्या अधिवेशनांचीं निमंत्रणें देतांना त्या त्या प्रांतांतील हिंदुसभा-कार्यकर्त्यांनीं अशी अटच घातलेली होती कीं, सावरकर अध्यक्ष होणार असतील तरच अधिवेशनाचें निमंत्रण देण्याची आपली इच्छा आहे! अध्यक्षपदाचा मान भोगून सावरकरांचा मोठेपणा वाढणार आहे, असें ज्याला खरोखरच वाटत असेल त्याच्या बुद्धिमत्तेची तारीफ करावी, तेवढी थोडीच होणार आहे! माणसें आणि स्थानें यांच्या परस्परसंबंधांचा विचार करतांना असें दिसतें कीं, स्थानमाहात्म्यामुळें कांहीं माणसें मोठीं दिसतात; तर उलटपक्षीं, व्यक्तीच्या माहात्म्यामुळें कांहीं स्थानें अधिक उन्नत दिसतात. हिंदुमहासभेच्या अध्यक्षपद-प्राप्तीमुळें

सावरकर मोठे झालेले नसून सावरकर अध्यक्ष लाभल्यामुळें आणि लाभत गेल्या-मुळें, हिंदुमहासभेचा दरारा व प्रतिष्ठा यांच्यांत वाढ झालेली आहे.

कानपूरच्या अधिवेशनाच्या वेळीं सावरकरांनीं अध्यक्षपदाचा लढा लढविला त्याला कारणहि तसेंच होतें. खुद्द हिंदुमहासभेच्या गोटांतच मुसलमानांच्या पाकिस्थान-मागणीच्या बाबतींत चल-बिचल झाल्याची जबरदस्त शंका त्या वेळीं व्यक्त केली जात होती, हिंदुस्थानचें अखंडत्व हा विषय हिंदुमहासभेच्या तत्त्वप्रणालीपैकीं अत्यंत जिव्हाळयाचा विषय असल्यामुळें, त्या विषयावर खंबीर मतें असणारा अध्यक्षच या प्रसंगीं निवडला गेला पाहिजे, असा सावर-करांचा आग्रह होता. अखिल भारतीय कीर्तिचा व या विषयावर खंबीर मतें बाळगणारा दुसरा कोणीहि नेता दृष्टि-पथांत असता तर, सावरकरांनीं आपल्या हातानें त्याला अध्यक्षस्थानीं बसविला असता. अशा नेत्याच्या अभावीं, त्यांनीं अध्यक्ष-पदाच्या निवडणुकीचा लढा लढविला यांत गैर काय झालें, हें प्रस्तुत लेखकाला तरी समजत नाहीं! "या बिकट प्रसंगीं इंग्लंडचें रक्षण मीच करूं शकेन—अन्य कोणाला तें जमणार नाहीं!" असें छातिठोकपणानें सांगून, इंग्लंडच्या पंतप्रधान-पदाची जबाबदारी स्वशिरावर घेणाऱ्या थोरल्या पिट्चें आपण जें कौतुक करतों तें जर यथार्थ असेल तर, सावरकरांनीं कानपूरच्या हिंदुमहासभेच्या अधिवेशनाच्या अध्यक्षपदाचा लढा लढविला व तो जिंकला, याबद्दलहि आपल्याला कौतुकच वाटलें पाहिजे! महायुद्धासारखी सर्वांना चिंताग्रस्त करणारी घटना जोंपर्यंत चालू आहे, तोंपर्यंत तरी अध्यक्षपदावरील व्यक्ति बदलणें श्रेयस्कर नाहीं, हेंच मत या बाबतींत दूरदर्शीपणाचें ठरण्यासारखें आहे. It is unsafe to change horses in midstream. या इंग्रजी वाक्यांतलें सत्य या प्रश्नाला तंतोतंत लागू पडत आहे!

सावरकरांनीं या काळांत महाराष्ट्राबाहेर जो संचार केला तोहि त्यांच्या प्रचारशील व पराक्रमशील स्वभावाला शोभणाराच आहे. सध्यां ब्रिटिश हिंदुस्थानचे जे अकरा प्रांत निर्माण करण्यांत आलेले आहेत त्या प्रांतांतले सीमाप्रांत व ओरिसा हे दोन प्रांत वगळले तर बाकीच्या सर्व प्रांतांना सावरकरांनीं भेटी दिलेल्या आहेत. त्रावणकोर, काश्मीर, बडोदें वगैरे हिंदु संस्थानांनाही त्यांनीं या काळांत भेटी दिलेल्या आहेत. सावरकरांचें प्रकृतिमान लक्षांत घेतलें, दौऱ्याची दगदग संपवून ते परत आले म्हणजे बहुतेक वेळां ते चार सहा दिवस तरी आजारी पडतात ही गोष्ट लक्षांत ठेविली आणि दौरा चालू असला म्हणजे चर्चा, गांठी-भेटी, व्याख्यानें इ० कार्यक्रमांत त्यांना पुरेशी झोंपहि मिळत नाहीं हें मान्य केलें म्हणजे, इतके कष्ट भोगलेले सावरकर या वयांत एकसारखी इतकी दगदग सोसूं शकतात कशी याचेंच आश्चर्य वाटतें! भारतीय राजकारण खऱ्या अर्थानें करूं इच्छिणाऱ्या कोणाहि माण-साला फिरती टाळतां येणार नाहीं, हें अगदीं खरें आहे. पण, या फिरतीला पुरीं पडणारीं माणसें किती थोडीं आहेत, हें पाहिलें म्हणजे स्वतःच्या प्रकृतीकडे दुर्लक्ष करून सावरकर

दौरे कां काढतात, हें समजूं शकतें. गांधीजी, पं. जवाहरलाल नेहरू, श्री. राजगोपाळाचारियर, श्री. अच्युतराव पटवर्धन ही कॉंग्रेसमधील मंडळी या फिरतीच्या बाबतींत खंबीर आहेत. लो. ना. बापूजी अणे, डॉ. मुंजे, तपस्वी बाबासाहेब परांजपे ही मंडळीहि फिरण्याचा कंटाळा न करणारी आहेत. हिंदुमहासभेचें राजकारण प्रभावी व्हावें ही मनांतली तळमळ व तें प्रभावी होण्याच्या दृष्टीनें जी फिरती करणें अवश्य आहे ती करूं शकणाऱ्या समर्थ माणसांचा तुटवडा असल्याची जाणीव या दोन गोष्टींच्या संयोगामुळेंच, अतिरिक्त श्रम करून सावरकरांना वारंवार दौरे काढावे लागतात.

गेल्या सहा वर्षांत हिंदुमहासभेनें जे दोन लढे लढविले त्या लढ्यांत सावरकरांचें नेतृत्व महासभेच्या दृष्टीनें फार उपकारक ठरलें आहे. निजामविरोधी निःशस्त्र प्रतिकाराचा लढा व भागलपूरच्या हिंदुमहासभेच्या अधिवेशनाच्या वेळीं करावा लागलेला लढा या दोन लढ्यांची चाणाक्षपणानें चिकित्सा करणाऱ्या माणसाच्या हें लक्षांत येईल कीं, लढा म्हणजे लढाई हें ओळखून सावरकर वागत असतात. 'भाषा लढाईची, आणि करणी कैकाड्याची' अशा पद्धतीनें ते वागत नाहींत. आपलें बळ, आपल्या प्रतिपक्षाचें बळ, आपले मित्र, आपल्या प्रतिपक्षाचे मित्र, आपलें वैगुण्य, आपल्या प्रतिपक्षाचें वैगुण्य, या सगळ्यांचा विचार करूनच सावरकर लढे चालवितांना वागत असतात. लढा चालविण्याचें जोखिम अंगावर घेणाऱ्या इसमाच्या अंगीं तो चालविण्याचें कौशल्य असलें पाहिजे हें जसें खरें आहे त्याप्रमाणेंच, स्वपक्ष-प्रतिपक्षाचें बलाबल हिशोबांत धरून लढ्याचें पर्यवसान म्हणून काय साधावयाचें याविषयींचीहि स्पष्ट कल्पना त्याला असली पाहिजे. लढा थांबवावा कसा व कोठें हें ठरवितांनाहि लढा चालविणाऱ्या नेत्याचें नेतृत्व पुष्कळ वेळां सिद्ध होत असतें. या दृष्टीनें या दोन लढ्यांकडे पाहिलें तर असें म्हणावें लागतें कीं, हे दोन्ही लढे योग्य मर्यादेंत आवरते घेण्याचें कौशल्य सावरकरांनीं दाखविलें आहे.

१९३९ च्या ऑगस्ट महिन्याच्या आरंभीं सावरकरांनीं हिंदुमहासभेतर्फे चाललेला निजामविरोधी लढा संपविला. तो संपवितांना हिंदुमहासभेनें जो ठराव पास केला त्या ठरावावर डॉ. आंबेडकर यांनीं 'Thoughts on Pakistan' या आपल्या पुस्तकांत टीका केली आहे. निजाम राज्यांत मुसलमानांच्या लोकवस्तीचें प्रमाण अत्यल्प असून, निजामी सुधारणांत मुसलमानांना पन्नास टक्के प्रतिनिधित्वाचा अधिकार देण्यांत आला व या अन्यायी हिस्सेरशीला हिंदुमहासभेनें मान्यता दिली, असें डॉ. आंबेडकर यांचें म्हणणें आहे. यावर डॉ. आंबेडकर यांनीं असें भाष्य केलें आहे कीं, या ठिकाणीं निम्मेनिम प्रतिनिधित्वाला मान्यता देऊन हिंदुमहासभेनें अखिल भारतीय राजकारणांतहि त्याच घातकी तत्त्वाची मशीद आपल्या गळ्यांत बांधून घेतली आहे! जवळजवळ उठून गेलेल्या झाडाला बारीकसा कोंब फुटल्याचें दिसूं लागल्यामुळें समाधान व्यक्त करणाऱ्या इसमानें सर्वच झाडांच्या बाबतींत नुसत्या

कौमावर समाधान मानण्याची तयारी दर्शविली आहे, असें म्हणणाऱ्या माणसाचें मत जितकें तर्कशुद्ध ठरेल तितकेंच डॉ. आंबेडकर यांचें हें मत तर्कशुद्ध ठरेल! या ठरावाची मांडणी थोडी वेगळ्या पद्धतीनें करतां आली असती, हें प्रस्तुत लेखकाला मान्य आहे. पण, प्रस्तुत मुद्दा ठरावाच्या मांडणीसंबंधाचा नसून, लढा योग्य वेळीं थांबविण्याबाबतच्या धोरणाचा आहे. हा लढा थांबल्यावर सुमारें महिन्याभरांतच चालू महायुद्ध सुरू झालें व त्यामुळें ब्रिटिश सरकारच्या दृष्टीनें निजामसारख्या संस्थानिकांचा भाव एकदम वाढला! ही परिस्थिति उत्पन्न होण्यापूर्वींच हा लढा थांबला नसता तर, हिंदुसभा व आर्यसमाज यांचे जे सहस्रावधि कार्यकर्ते निजामी तुरुंगांत खितपत पडलेले होते त्यांचें काय झालें असतें; हा प्रश्न दृष्टीसमोर आणिला म्हणजे हा लढा या वेळीं थांबविणाऱ्या पुढाऱ्याचें शहाणपण प्रत्ययाला येतें! भागलपूरच्या लढया-नंतर सावरकरांनीं गयेहून भागलपुरास यावें, असा आग्रह धरणारे थोरथोर पुढारी भागलपूरच्या तुरुंगांत होते. आपण भागलपुरास गेलों तर तेथील हिंदु जनतेच्या उत्साहाला केवढें भरतें येईल, त्याचा फायदा घेऊन चारदोन उपटसुंभ मुसलमान कसे वागतील व त्यामुळें बिहारच्या गव्हर्नरला आपल्या वर्तनाचें समर्थन करण्याची संधि कशी मिळेल हें सर्व ओळखून, सावरकरांनीं हा लढा संपला असल्याचें जाहीर केलें व भागलपूरला येण्याला स्पष्ट नकार दिला. लढा चालवावा कसा एवढयाच प्रश्नापुरतें पाहिलें तर गांधीजी सावरकरांच्या बरोबरीचे ठरतील-अगर, कांहींच्या मतें ते श्रेष्ठहि ठरतील; पण, चालविलेल्या लढयांतून फलनिष्पत्ति कशी करून घ्यावी व या दृष्टीनें लढा कसा आंवरावा या मुद्याचा विचार करतांना, सावरकर गांधीजींपेक्षां निस्संशय श्रेष्ठ ठरतात. Gandhiji knows how to lead, but he does not often know where to lead (नेतृत्व म्हणजे रान उठविणें ह्या अर्थी गांधीजी थोर नेते आहेत; पण, रान उठविल्यावर शिकार साधावी कशी हें त्यांना अवगत नाहीं!) हे उद्‌गार या बाबतींत अगदीं सार्थ आहेत!

चालू महायुद्ध सुरू झाल्यावर सावरकरांना एकदोन प्रसंगीं व्हाइसरॉय साहेबांच्या भेटीला जावें लागलें. ते व्हाइसरॉयसाहेबांच्या पहिल्या भेटीला गेले त्यापूर्वीं सर चिमणलाल सेटलवाड, सर कावसजी जहांगीर प्रभृतींनीं काढलेल्या एका पत्रकावर त्यांनीं स्वाक्षरी केली होती व त्यामुळें कांहीं धंदेवाईक टीकाकारांनीं त्या वेळीं अशी कोल्हेकुई केली होती कीं, आपल्याला व्हाइसरॉयसाहेबांच्या भेटीचें निमंत्रण यावें, यासाठीं सावरकरांनीं ही सोयरीक जोडली आहे! सावरकरांनीं कोणत्याहि पत्रकावर सही केली नसती तरी त्यांना व्हाइसरॉयाकडून भेटीचें निमंत्रण आलेंच असतें, अशी प्रस्तुत लेखकाची त्या वेळीं खात्री होती व त्यामुळें, सावरकरांनीं या पत्रकावर निष्कारण सही केली, असें मत त्यानें त्या वेळीं 'त्रिकाळ' पत्रांत व्यक्त केलें होतें. तें मत बदलण्याचें त्याला आजहि कारण दिसत नाहीं. या मुलाखतीच्या वेळीं सावरकरांनीं व्हाइसरॉयसाहेबांपुढें वास्तववादी दृष्टीनें भारतीय राजकारणाची जी चिकित्सा



नित्यपरिचित वेषांत सावरकर

कार्यालयांत चर्चा करीत बसलेले



हिंदु-राष्ट्रपति सावरकर

केली तशी चिकित्सा व्हाइसरॉयच्या भेटीला गेलेल्या इतर ५१ पुढाऱ्यांपैकीं कोणीहि केली नव्हती, अशी माहिती दिल्लींतल्या माहीतगार माणसांकडून त्या वेळीं प्रसृत करण्यांत आली होती. सर स्टॅफोर्ड क्रिप्स भारताच्या विच्छेदनाची योजना आपल्या पोतडींत भरून हिंदुस्थानांत आल्यावेळीं, सावरकर त्यांना भेटले होते. 'इंडियन यूनियन' या शब्दाची वाटाघाट चालू असतांना, ऐतिहासिक माहितीच्या आधारें चर्चा करून सावरकरांनीं क्रिप्स-साहेबांना निरुत्तर केलें ! हिंदुसभावादी वृत्तपत्रांत जाणतें पत्रपांडित्य शिल्लक असतें तर, अशा प्रसंगांचा उपयोग करून त्यांनीं सावरकरांचें केवढें तरी कौतुक केलें असतें ! अमेरिकन पत्रपंडित व अमेरिकन पुढारी सावरकरांच्या भेटीला येतात तेव्हां, ऐतिहासिक माहितीच्या आधारें सावरकरांनीं केलेली चर्चा ऐकून तेहि अधिक शहाणे होऊन परत जातात !

सावरकर लोकांकडे चहाला जात नाहींत नि ते इतरांना आपल्याकडे चहाला बोलावीत नाहींत यामुळें रुष्ट झालेले कांहीं प्रतिष्ठित सज्जन सावरकरांना लब्ध-प्रतिष्ठित, अहंमन्य, माणुसघाणे इत्यादि विशेषणें लावतात. चहाच्या निमित्तानें एक-मेकांकडे जाण्यायेण्याचे प्रसंग साधल्यानें आपल्या माणसांचें आपलेपण वाढतें हें ओळखून, सावरकरांनीं मुंबई-पुण्याच्या आपल्या अनुयायांपैकीं कांहीं ठळक अनु-यायांकडे जाण्यायेण्याचा पायंडा पाडला तर ती गोष्ट हिंदुमहासभेच्या संघटनेच्या दृष्टीनें परिणामीं हितावह ठरण्याचा संभव आहे. स्वतःचें घर सोडून दुसऱ्याच्या येथें शक्यतोंवर जावयाचें नाहीं हा स्वभाव-विशेष सावरकरांच्या ठिकाणीं आढळतो तो एका दृष्टीनें योग्यहि आहे. त्यांच्या जीवनाची घडण ज्या लोकविलक्षण पद्धतीनें घडलेली आहे तिच्यामुळेंहि हा स्वभाव–विशेष त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न झाला असेल. वर ज्या आक्षेपाचा उल्लेख केला त्याला एक उत्तर असें कीं, चहाच्या देवाणीघेवाणींतून उत्पन्न होणारें राजकारण हें सावरकरांच्या वृत्तीला मानवणारें राजकारण नसल्यामुळें, ते चहाच्या प्रसंगीं दुसऱ्याकडे जाण्याला फारसे उत्सुक नसावेत. एका थोर राजकीय पक्षाच्या पुढाऱ्यानें कोणातरी माणसाच्या इच्छेला मान देण्यासाठीं अगर त्याची लहर सांभाळण्यासाठीं त्याच्या घरीं चहाला जाण्याइतकें स्वतःला स्वस्त बनवून घ्यावें कीं काय, हा महत्त्वाचा प्रश्नहि याबाबतींत विचारांत घेण्यासारखा आहे. पण, आपले खंबीर अनुयायी आणि इतर लोक यांच्यामध्यें पंक्तिप्रपंच करून सावरकर अशा अनुयायांच्या घरीं केव्हां केव्हां जाण्याचा व त्यांना आपल्यापाशीं केव्हां तरी बोला-वण्याचा अधिकार गाजावितील तर, तें त्यांच्या कार्याच्या वाढीलाहि पोषकच ठरेल.

सावरकर हिंदुमहासभेबाहेरच्या लोकांशीं अगदींच मिळतमिसळत नाहींत असें कोणी म्हणतील तर तें मात्र पूर्णांशानें खरें नाहीं. सर चिमणलाल सेटलवाड यांनीं आपल्या येथें कांहीं बड्या मंडळींना चहाला बोलावलें होतें. त्या प्रसंगीं ने. ना. श्रीनिवासशास्त्री यांची व सावरकरांची भेट झाली. ने. ना. शास्त्री यांचा या भेटीमुळें सावरकरांविषयीं काय ग्रह बनला हें 'सावरकरांचें व्यक्तिमत्व'

या परिशिष्टांत यापुढें सांगण्यांत येईलच. सर तेज बहादुर सप्रू यांच्या नेतृत्वाखालीं ज्या अपक्ष परिषदेच्या बैठका भरल्या त्यांतल्या तीन बैठकांत तरी सावरकरांनीं भाग घेतला होता. सुमारें दोन वर्षांपूर्वीं सप्रू परिषदेची बैठक मुंबई येथें भरली त्या वेळीं सावरकरांची प्रकृति बरी नव्हती. सावरकर-सदनांत जाऊन या परिषदेच्या प्रमुखांनीं चर्चा केली व त्या वेळीं या परिषदेनें जो ठराव संमत केला त्याच्यावर सावरकरांच्या प्रेरणेचें पुट चांगलेंच पसरलेलें होतें, असा बोभाटा त्या वेळीं झालेला होता. सप्रू-परिषदेच्या पुण्याच्या बैठकींतहि सावरकरांनीं भाग घेतला होता; आणि अलीकडे ——म्हणजे गांधीजींच्या २१ दिवसांच्या उपोषणानंतरच्या काळांत—डॉ. जयकर यांच्या बंगल्यावर अपक्ष-परिषदेच्या पुढाऱ्यांची जी बैठक झाली त्या बैठकीलाहि सावरकरांनीं महत्त्वाचें मार्गदर्शन केलें, अशी माहिती मिळते.

१९४० सालच्या पावसाळ्यांत सावरकर 'सायटिका' नांवाच्या आजारानें बरेच महिने आजारी होते. या आजारांतून उठून ते हिंदुमहासभेचें काम तडफेनें करूं शकतील कीं काय, ही भीति त्या वेळीं पुष्कळांना वाटत होती. या आजाराचे कांहीं परिणाम त्यांना कायमचेच बिलगून बसलेले दिसत आहेत. या आजारांत ते मुंबईच्या एका रुग्णालयांत असतांना, त्यांना भेटण्याचें कर्तव्य पार पाडण्यासाठीं प्रस्तुत लेखक त्या रुग्णालयांत गेला होता. रुग्णालयावरील प्रमुख सावरकरांच्या भेटीला जाणाऱ्या इसमांना असें बजावून सांगत कीं, तुम्ही सावरकरांपाशीं बोलतां कामा नये. रुग्णालयाच्या प्रमुखानें सद्भावनेनें दिलेला इषारा तंतोतंत पाळावा म्हणून, प्रस्तुत लेखकानें सावरकरांना भेटल्यावर फक्त दोनच वाक्यें उच्चारिलीं व पांचदहा मिनिटें त्यांच्याजवळ काढून तो तेथून निघूं लागला. त्या वेळीं हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी मंडळाच्या वाढीची भाषा प्रथमच हवेंत घुमूं लागली होती. अशा महत्त्वाच्या व आणीबाणीच्या प्रसंगीं आपण आजारी पडलों याबद्दलचें दुःख सावरकरांना व्यथा देत होतें ! ते या विषयासंबंधीं बोलूं लागले व बोलतांबोलतां विव्हळ होऊं लागले ! तेव्हां प्रस्तुत लेखकाला एका अर्थीं असह्य दुःख झालें तर दुसऱ्या अर्थीं त्याला सावरकरांच्याबद्दल आदरहि वाटला ! अशा अवस्थेंत पडलेल्या या गृहस्थाच्या मनांत देशाच्या चिंतेशिवाय दुसरी कसली चिंता नांदूं शकतच नाहीं हें पाहून, सावरकरांना मनोमन धन्यवाद देऊन, कसें तरी त्यांचें बोलणें थांबवून, त्यांचा निरोप घेऊन त्याला तेथून निघून जावें लागलें !

अनेक आपत्तींना तोंड देऊन, हिंदु जगताची व भारताची सेवा अहर्निश करूं इच्छिणारा हा थोर देशभक्त आज आपल्या वयाच्या ६१ व्या वर्षांत पदार्पण करीत आहे याबद्दल प्रत्येक हिंदुमात्राला धन्यता वाटली पाहिजे. सायंकाळच्या समयीं सूर्य अस्ताला जातो तेव्हां त्याचें लोपणारें तेज पाहून मूढ माणसाच्या मनांत कोणत्या कुकल्पना येतात याचें दिग्दर्शन या प्रकरणाच्या आरंभीं घालण्यांत आलेल्या संस्कृत श्लोकांत करण्यांत आलेलें आहे. सावरकर अंदमानांत गेले व त्यांचें तेजस्वी

जीवन दृष्टिआड झालें त्या वेळीं मूढ माणसाच्या मनांत जे विचार उभे राहिले असतील ते विचार आणि वरील श्लोकांत सूचित करण्यांत आलेले विचार यांमध्यें मोठासा फरक नसेल. पण, सायंकाळच्या समयीं अस्ताला गेलेला सूर्य जसा प्रभात-काळीं क्षितिजावर उगवतो आणि त्याचें तेज जसें घटकोघटकीं वाढूं लागतें त्याच-प्रमाणें सावरकरांच्यासारख्या तेजस्वी देशभक्ताचें तेजहि वाढत जाणार आहे, अशी श्रद्धा सर्वांनीं बाळगली पाहिजे. आकाशांत तळपणाऱ्या सूर्यानें आपलें तेज फांकावें एवढेंच त्याच्या हातीं आहे. त्या तेजाचा उपयोग आरोग्यप्रद रीतीनें व्हावयाचा कीं अपायकारक रीतीनें व्हावयाचा हें त्याच्या हातीं नसून, इतरांच्या हातीं आहे. सावरकरांच्या तेजाचा उपयोग देशस्वातंत्र्याच्या प्राप्तीच्या कामीं व हिंदुहिताच्या रक्षणाच्या कामीं जास्तींत जास्त कसा होईल; याची चिंता इतरांनीं वाहिली पाहिजे. सावरकरांच्या दीप्तींत आपलें तोंड उजळ करून घेतल्यानें " सावरकर-की–जय " असें नुसतें ओरडत बसल्यानें, अगर कुत्सितपणानें टीका करण्याच्या नादांत सावरकरांच्या देशभक्तिविषयींची शंका घेतल्यानें हें कार्य साधणार नाहीं, हें सावरकरांच्या या षष्ट्यब्द–समारंभाच्या शुभप्रसंगीं सर्वांनीं ओळखलें पाहिजे. प्रत्येक हिंदु स्वतःच्या अंतर्यामीं हिंदुत्वाची जाणीव जागृत ठेवण्याचा निर्धार या प्रसंगीं करील व तीस कोटी लोकांच्या बलाढ्य हिंदु राष्ट्राचे आपण घटक आहों हें ओळ-खून, लहानसहान व्यवहारांतहि वागण्याचा संकल्प तो या प्रसंगीं करील तर, आजच्या या षष्ट्यब्द-समारंभाच्या प्रसंगीं सावरकरांना जेवढा संतोष वाटेल तेवढा संतोष त्यांना लक्षावधि रुपयांच्या राशींनींहि वाटणार नाहीं, योजनभर लांबीच्या मिरवणुकींनींहि वाटणार नाहीं आणि स्वर्गलोकाला जाऊन भिडणाऱ्या जयघोषांनींहि वाटणार नाहीं! हिंदु राष्ट्र सुसंघटित, सामर्थ्यसंपन्न व स्वातंत्र्यसंपन्न करण्याच्या कामीं मी प्रत्यहीं यथाशक्ति कांहीं तरी करीन, असा या प्रसंगीं निश्चय करून हिंदु जगतांतील लक्षावधि लोक आजपासूनच वागूं लागतील तर, आज सावरकरांना 'शतायुषीभव' हा जो प्रातिनिधिक आशीर्वाद आपण देऊं, तो खरा ठरूं शकेल.

———

# परिशिष्ट

# सावरकरांच व्यक्तिमत्व : कांहीं विशेष

## स्वातंत्र्यलालसामूलक स्वदेशप्रेम

भारतीय राजकारणाच्या आधुनिक युगांत जे देशभक्त होऊन गेले व जे अद्याप सुदैवानें जिवंत आहेत त्या सर्वांचा विचार केला तर असें दिसतें कीं त्यांतले पुष्कळसे देशभक्त प्रसंगपरत्वें व परिस्थितिपरत्वें देशभक्तीकडे वळले. आय्. सी. एस्. च्या परीक्षेंत नापास झाल्यामुळें वा आय्. सी. एस्. होऊन परत आल्यावर सरकारी नोकरीचा सासुरवास न मानवल्यामुळें देशभक्तिकडे वळलेल्या कांहीं भारतीयांनीं श्रेष्ठ प्रतीची देशभक्ति दाखविलेली आहे. वकिल-डॉक्टरीसारख्या धंद्यांत जन्मभर पैसे मिळविल्यावर, त्या संपत्तीला झिलई द्यावी म्हणून देशभक्तीच्या मार्गाकडे वळल्या-वरहि कांहीं लोकांनीं चांगल्या प्रतीची देशसेवा केली आहे. सार्वजनिक जीवनाशीं हरघडी संबंध येणाऱ्या वृत्तपत्रव्यवसायापाशीं निगडित झाल्यामुळें, कित्येकांच्या मागें देशभक्तीचा व्याप लागलेला आहे व त्यांतल्या कित्येकांनीं हा व्याप भूषणावह रीतीनें सांभाळला आहे. जीवनाच्या ओघांत, प्रसंगपरत्वें देशभक्ती-कडे वळलेल्या या भारतीयांनीं भारताची श्रेष्ठ प्रतीची सेवा केली आहे हें खरेंच, पण, सावरकर यांचें वैशिष्ट्य असें कीं, त्यांच्या जीवनाचा ओघ खऱ्या अर्थानें सुरू झाला तेव्हांपासून ते देशभक्तच आहेत. देशभक्ति हेंच ज्यांचें जीवनकार्य आहे; हेंच आपलें जीवनकार्य असल्याची ज्यांना स्पष्ट जाणीव आहे व या जाणिवेमुळें जे एकाद्या प्रेषिताच्या आत्मविश्वासानें देशविषयक बाबतींत बोलतात अशा अगदीं थोडक्या भारतीय नेत्यांच्या परिगणनेंत सावरकर यांचें स्थान फार श्रेष्ठ आहे.

सावरकर यांच्या व्यक्तिमत्वांतला स्थायिभाव कोणता या प्रश्नाचें ' देशभक्ति ' एवढेंच उत्तर दिलें तर तें अपुरें पडेल. तें उत्तर पुरें करण्यासाठीं ' देशभक्ति ' या शब्दाबरोबरच ' स्वातंत्र्यलालसा ' या शब्दाचाहि उपयोग करावा लागेल. देशभक्ति व स्वातंत्र्यलालसा यांचें परतंत्र राष्ट्रांत तरी साहचर्यच असलें पाहिजे हें खरें असलें तरी, धोरण म्हणून, व्यवहार म्हणून, सिद्धांत म्हणून, कित्येक हिंदी देशभक्त निर्भेळ स्वातंत्र्याचा पुरस्कार करतांना थोडें आगेमागें पहात व पाहतात हें विसरून चालणार नाहीं. सावरकर यांची देशभक्ति स्वातंत्र्यलालसामूलक आहे व त्यांना भारतीय स्वातंत्र्याची तळमळ लागलेली आहे तीहि एका विशिष्ट विचार-प्रणालीमुळें लागलेली आहे. भारतीय मानवसमाज हा उभ्या मानवजातीचा एक महत्त्वाचा घटक आहे. सर्व मानवजात सुखासमाधानांत नांदावयाची असेल तर,

भारतीय मानवसमाजहि सुखासमाधानांत नांदला पाहिजे व जोंपर्यंत हा समाज परकी सत्तेच्या पुढें नम्र झालेला आहे तोंपर्यंत तो सुखांत नांदणें अशक्य आहे अशी सावरकरांची विचारसरणी असल्यामुळें, त्यांची भारतीय स्वातंत्र्याची लालसाहि निःस्वार्थी व उदात्त स्वरूपांत व्यक्त होते.

## मार्गासंबंधींचा निश्चय

स्वातंत्र्यलालसामूलक स्वदेशप्रेम हा सावरकरांच्या व्यक्तिमत्वाचा विशेष आहे त्याप्रमाणेंच ही स्वातंत्र्यलालसा सफल करून दाखविण्याच्या व हें स्वदेशप्रेम प्रभावी ठरविण्याच्या मार्गासंबंधींचा निश्चय, हाहि सावरकरांच्या व्यक्तिमत्वाचा एक ठसठशीत विशेष आहे. शस्त्रशक्तीनें संपन्न असलेलें एक राष्ट्र दुसऱ्या निःशस्त्र राष्ट्रावर अधिराज्य गाजवीत असेल तर त्या निःशस्त्र राष्ट्रानें स्वातंत्र्यसंपन्न होण्याला कोणता उपाय योजावा या प्रश्नाचें सावरकरांचें उत्तर निःसंदिग्ध आहे. सशस्त्र क्रांति याच एका प्रभावी साधनानें व मार्गानें निःशस्त्र व पराक्रांत राष्ट्रें स्वातंत्र्यसंपन्न होऊं शकतात हा त्यांचा ठाम सिद्धान्त आहे. परक्यांची सत्ता डोक्यावर आहे तोंपर्यंत सशस्त्र क्रांतीची तयारी उघडपणानें करतां येत नाहीं म्हणून गुप्त मंडळ्या स्थापणें अवश्य ठरतें हा उपदेश त्यांनीं मॅझिनीच्या प्रस्तावनेंत व Indian War of Independence या ग्रंथांत केला आहे. गुप्त मंडळ्या स्थापून जी शस्त्रसिद्धता करावयाची ती जर थोड्या फार प्रमाणांतहि उघडपणें करतां येत असेल तर ती अवश्यमेव केली पाहिजे हा त्यांचा आग्रह त्यांच्या या बाबतींतल्या विचारसरणीचा एक महत्त्वाचा भाग आहे. प्रस्तुत महायुद्ध सुरू झाल्यापासून त्यांनीं हिंदूंना लष्करीकरणाचा उपदेश करण्याचें काम धडाक्यानें सुरू केलें त्याच्या पोटांत जे अनेक अर्थ भरलेले आहेत त्यांतला एक अर्थ असा आहे कीं, शस्त्रें वापरण्याचें ज्ञान, शस्त्रें बनविण्याच्या शास्त्रांचें ज्ञान इत्यादींनीं हिंदु राष्ट्र या समरप्रसंगीं सज्ज झालें तर, उद्यांच्या स्वातंत्र्यसंगरांत त्या सज्जतेचा उपयोग झाल्याशिवाय राहणार नाहीं. महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष या नात्यानें सावरकरांनीं १९३८ सालीं जें भाषण केलें त्यांत 'लेखण्या मोडा, बंदुकी घ्या' असा उपदेश करण्यांत आला होता व त्यामुळें ललित-वाङ्मयाच्या नखरेलपणाचा बाजार मांडून बसलेल्या कित्येक साहित्यिकब्रुवांचा पित्तप्रकोप झाला होता! पण, या भाषणानंतर सुरू झालेल्या चालू महायुद्धांत जे अनुभव येत आहेत त्यावरून हेंच सिद्ध होत आहे कीं, सावरकरांचा उपदेश नुसत्या महाराष्ट्रानेंच नव्हे, तर सगळ्या दोस्त राष्ट्रांनीं अनुसरण्याजोगा होता.

## फ्रान्सचें पतन व चर्चिलचा इषारा

चालू महायुद्ध सुरू झाल्यानंतर फ्रेंच राष्ट्राची जी त्रेधातिरपिट उडाली तिची कारणमीमांसा Andre Maurois या ग्रंथकारानें 'Why France Fell?'

या आपल्या ग्रंथांत केली आहे. या ग्रंथाच्या सुरुवातीलाच इंग्लंडचे पंत-प्रधान मि० चर्चिल व ग्रंथ-लेखक यांचा एक संवाद दिला आहे. कादंबऱ्या, लघुकथा, चरित्रें इ० लिहून आपल्या लेखणीला शीण देण्याऐवजीं यापुढें कांहीं वर्षे एकच विषय ध्यासपूर्वक फ्रेंच जनतेपुढें मांडा; फ्रेंचांचें नाविक वर्चस्व नष्ट झालें, जर्मनीनें या बाबतींत आघाडी मारली, याची जाणीव सतत तेवत ठेवा—असें चर्चिलसाहेबांनीं अट्टाहासानें म्हटलें. तरीही हा लेखक जरा 'जरतारी' पद्धतीनें बोलूं लागला. त्याबरोबर चर्चिलसाहेबांनीं आवाज चढविला व म्हटलें : Culture and literature, Mr. Maurois, are all very well; but a culture without strength soon ceases to be a living culture. (संस्कृति नि साहित्य ! ठीक आहेत या साऱ्या गोष्टी; पण सामर्थ्यहीन संस्कृति अल्प काळांतच निर्जीव बनते, हें ध्यानांत ठेवा.) 'मधुकर' वृत्तीचा परिपोष करणाऱ्या साहित्याला संस्कृतिपोषक साहित्यहि म्हणतां यावयाचें नाहीं. या दृष्टीनें पाहिलें तर आधुनिक मराठी साहित्यांतलें शेंकडा नव्वद साहित्य चुलखंडांत जाळून टाकण्याच्या योग्यतेचें आहे. सावरकरांनीं खरोखर हें सांगावयाला हवें होतें; पण, तसें न सांगतां त्यांनीं इतकेंच म्हटलें कीं, अगोदर सामर्थ्यसंपन्नतेचा विचार करा; साहित्य नि संस्कृतीचा विचार यथाकाल करतां येईल ! महाराष्ट्रासारख्या 'विचार-संपन्न' मुलुखांतल्या साहित्यिकांनीं या विचाराचा वस्तुतः गौरव करावयाला हवा होता. तो न करतां ते रागावले ! याचाच अर्थ असा कीं, मी मी म्हणणारांच्या मेंदूवरही हा विचार वारंवार आदळीत राहिलेंच पाहिजे !

## गांडीवधनुष्य भंगलें; मशीनगन्स आल्या !

शस्त्रपुरस्काराइतकाच दुसराहि एक विषय सावरकरांच्या व्यक्तिमत्वाच्या चर्चेत महत्त्वाचा ठरतो. तो विषय म्हणजे सावरकरांनीं केलेला शास्त्रपुरस्कार किंवा विज्ञानपुरस्कार हा होय. सध्यांच्या युगांत शस्त्रविद्या व विज्ञान यांचें नातें इतकें निकटचें झालेलें आहे कीं, पहिल्याचा पुरस्कार करणाऱ्याला दुसऱ्याकडे कानाडोळा करून चालणारच नाहीं ! सावरकर ऐतिहासिक व्यक्तींचें गुणगान करतात म्हणून त्यांची थट्टा करणारे कांहीं टवाळ विचारतात : सिंहगड सर करण्यासाठीं सावरकर आज 'घोरपड' वापरणार आहेत कीं काय ? स्वतः सावरकरांनीं या विषयावर नेमकें काय लिहिलेलें आहे, हें उघड्या डोळ्यांनीं वाचण्याची तसदी न घेतांच हवें तें भरकटत सुटण्याचा ज्यांचा धंदा बनला आहे, त्यांची लेखणी कोणीच अडवूं शकणार नाहीं ! पण, ज्यांना सुबुद्धपणानें लिहावयाचें व बोलावयाचें असेल, त्यांना सावरकरांच्या लिखाणांतले पुढील उतारे मार्गदर्शक ठरल्याशिवाय राहाणार नाहींत !

[१] मनूनें राजधर्मांत युद्धनीतीचा सनातन धर्म म्हणून जो सांगितला त्यांत चतुरंग दळाचा सविस्तर उल्लेख आहे. पण, तोफखान्याचा वा वैमानिक दळाचा नामनिर्देशहि नाहीं. आणि सैन्याच्या अग्रभागीं शौरसेनी लोक असावेत असें जें सांगितलें तें मनूच्या काळीं हितावह होतें म्हणूनच सांगितलें असलें तरीहि, ह्या नियमास अपरिवर्तनीय सनातन धर्म समजून जर आमचे सनातन धर्मसंघ आजहि केवळ धनुर्धरांना पुढें घालून आणि आठघोडी रथ सजवून एकाद्या युरोपच्या अर्वाचीन महाभारतांत शत्रूस थरारविण्यासाठीं अगदीं श्रीकृष्णाचा पांचजन्य फुंकीत गेले तर, पांचजन्य करीतच त्यांना परत यावें लागेल, हें का सांगावयाला पाहिजे!

[२] श्रुति नि श्रौत (संस्कृति) त्या काळच्या जगांत त्यांच्या शत्रूशीं लढतांना दिग्विजय गाजवूं शकली म्हणून आजच्या विज्ञानयुगांतहि तसा टिकाव धरूं शकतील ही आशा व्यर्थ आहे...महाभारतांतील गांडीव धनुष्य भंगलें! आतां मशीनगन्सशीं गांठ आहे. जर हें सांगितल्यानें स्वतःच्या प्रौढीच्या पोकळ वल्गना करीत रहाणाऱ्या आमच्या 'बाबावाक्यं प्रमाणं' प्रवृत्तीचें अवसान खचलें, तेजोभंग झाला तर त्यांतच राष्ट्राचें हित आहे.

सावरकर जो शस्त्रपुरस्कार नि विज्ञानपुरस्कार करतात त्याचा संबंध केवळ शस्त्रपुरस्काराशीं तेवढांच आहे, असेंहि नाहीं. यांत्रिक व वैमानिक संस्कृति ही जगाच्या संस्कृतीचा अपरिहार्य भाग म्हणून इतउत्तरच्या काळांत सतत नांदणार आहे, तिच्याकडे पाठमोरें होणें हा शुद्ध बुद्धिभ्रंश आहे, तिचा डोळसपणानें स्वीकार करणें, तिचें आनंदानें स्वागत करणें यांतच भारतीय समाजाच्या उत्कर्षाचीं बीजें सांठलेलीं आहेत, तिचा उपहास करून समाजांत नांदणाऱ्या भोळसटपणाच्या वाढीला मदत करणें हें राष्ट्रघातकीपणाचें कृत्य आहे असें सावरकरांनीं शेंकडों वेळां प्रतिपादिलें आहे. ज्या भोळसटपणाच्या विचारकथेचें कित्येकांकडून 'गांधीवाद' या गोंडस शब्दानें वर्णन केलें जातें तिच्याशीं सावरकर कां सहमत होऊं शकत नाहींत या प्रश्नाचा नीट उलगडा करावयाचा तर, गांधीजी व सावरकर यांच्या वृत्तींतल्या या मूलभूत भेदापर्यंत जाऊन भिडण्याशिवाय गत्यंतर नाहीं. सावरकरांचीं या बाबतींतलीं मतें व कॉंग्रेसमधील जवाहरपंथाचीं मतें यांच्यामध्यें विलक्षण साम्य आहे, सावरकरांच्या लेखांतल्या पुढील उताऱ्यांवरून स्पष्ट होईल :

[३]सटवी-जिवतीची इतकी पत्रास राखणाऱ्या हिंदुस्थानांतच बालमृत्यूंची भयंकर सांथ सारखी चालू आहे! आणि त्या सटवीला कधींहि धूप न जाळणाऱ्या, शांतिपाठाचा पाठ कधींहि न मांडणाऱ्या आणि सुवेराचा विटाळ घरभर कालवणाऱ्या

१ सावरकर साहित्य : भाग १ : पृ. ४२.
२ सावरकर साहित्य : भाग २ : पृ. ४२.
३ सावरकर साहित्य : भाग २ : पृ. १४

पण प्रकाश, वायु, शल्यौषधींची काळजी घेणाऱ्या त्या युरोपांतील बाळबाळंतिणीच्या वाटेस जाण्याची सटवीच्या बापाचीहि छाती होत नाहीं...मुलगे इकडे दक्षिण ध्रुवावर नि तिकडे उत्तर ध्रुवावर चढाई करणारे आणि मुली इंग्लिश चॅनल एका दमांत पोहणाऱ्या नि अटलांटिक महासागर विमानाच्या एका झेंपेंत उडून जाणाऱ्या!

[१] आपल्या लोकांत अजूनहि यंत्रशीलपणा जो इतका कमी आहे त्याचें मुख्य कारण म्हणजे आमच्या समाजांतील देवभोळेपणा अजूनहि उतास जात आहे, हेंच होय. दोनशें वर्षांपूर्वी युरोपहि ख्रिश्चन धर्मानुसार असाच देवभोळा होता; तेव्हां त्यांतहि यंत्रशीलपणा नव्हता. युरोपमध्यें ही देवलसी वृत्ति हाणून पाडणारी विज्ञान-वृत्ति जेव्हां उगवली तेव्हांच काय ती त्या विज्ञानाच्या नियमांवर अधिष्ठिलेली यंत्र-शीलता युरोपमध्यें भरभराटूं लागली; पण, हिंदुस्थानांत आजहि अगदीं राष्ट्राचे 'सर्वाधिकारी' म्हणून गाजणारे गांधीजींसारखे अनेक पुढारीदेखील बिहारमधल्या भूकंपाचें कारण अस्पृश्यतेचें 'पाप' म्हणून आंतल्या 'दैवी आवाजाच्या' शपथेवर सांगत आहेत...ज्या राष्ट्राचे सर्वाधिकारीच इतके धर्मभोळे त्या राष्ट्रांतील सामान्य जनतेच्या देवभोळ्या भाबडेपणाचें वर्णन काय करावें? युरोपमध्यें आज १९३६ वा सन चालू आहे तर आमच्या इकडे प्रगतीचा १७३६ वा!

[२] टकळी चालविणाऱ्या आत्मबलाच्या सेना त्या टकळीच्या प्रभावें जपानचें सारें यंत्रबळ तुच्छविण्यास सजल्या आहेत. केवळ चरख्याच्या चढाओढीनें लँकेशायर-च्या नि साऱ्या जगांतील गिरण्यांना कुलपें ठोकलीं जातील अशी प्रतिज्ञा करणाऱ्या सेनानींचा तांडाचा तांडा राष्ट्रीय सभेच्या उच्चासनावर चरखे फिरवीत बसलेला आहे आणि आतां त्यांच्या जोडीस दळणकांडणांच्या यंत्रांनीं (ओढवलेल्या) संकटापासून या देशास रक्षावयासाठीं कंबर कसून आलेल्या नव्या सेनानींचा तांडा या राष्ट्रीय सभेच्या उच्चासनावर कुणी जात्यानें हातीं दळीत नि कुणी उखळांत तांदुळ हातीं कांडीत व्यग्र झालेले आढळण्याचाहि संभव आहे...धर्मशास्त्रांतील भाबडेपणाप्रमाणेंच या अर्थशास्त्रांतील भाबडेपणासहि आपल्या राष्ट्रानें ठोकरून दिलेंच पाहिजे!

## जनहितबुद्धि नि लोकप्रियता

अज्ञ, भोळसट, संन्यासप्रेमी, 'अध्यात्म'परायण अशा हिंदु मनाला दोषलिप्त ठेवून स्वतःच्या लोकप्रियतेची हुंडी शिक्यावर चढावी अशी लवमात्र इच्छा नसल्यामुळेंच सर्वसामान्य हिंदु माणसाच्या पचनशक्तीला न पेलण्यासारखे वरील विचार सावरकरांनीं आग्रहानें मांडले. त्यांनीं हे व असे विचार मांडल्यामुळें त्यांचा कित्येक प्रसंगीं सार्वजनिक निषेधहि झाला. 'वरं जनहितं ध्येयं केवला न जनस्तुतिः' हें सावरकरांच्या जीवनक्रमाचें ब्रीदवाक्य असल्यामुळें, त्यांनीं ते निषेध सहन केले.

---

१ सावरकरसाहित्य : भाग २ : पृ. ४५-४६.
२ सावरकर साहित्य : भाग २ : पृ. ५५-५६.

जनस्तुति, लोकप्रियता यांच्याच केवळ नादीं लागावयाचें नाहीं, जनहित—म्हणजे भारतांतील राष्ट्रीय जनतेचें हित—हेंच सर्वश्रेष्ठ मानावयाचें हा सावरकरांचा बाणा असल्यामुळें, त्यांना प्रसंगीं किती कष्टांत दिवस काढावे लागले आहेत, याची कल्पना कोणाला फारशी नसेल. अंदमानांत त्यांनीं भोगलेले कष्ट लोकप्रसिद्ध आहेत; पण, लोकप्रियतेच्या नादीं न लागण्याच्या या आग्रहामुळें त्यांनीं भोगलेले कष्ट तितके लोकप्रसिद्ध नाहींत. १९३७ सालीं ते रत्नागिरीहून सुटून पुण्यास आले; तत्पूर्वी पुण्याच्या काँग्रेसवाल्यांनीं त्यांच्याविरुद्ध मारे काहूर माजविलें होतें! ज्या उद्‌गारांमुळें हें काहूर माजलें ते उद्‌गार त्यांना टाळतां आले असते. पण, मनांतले विचार व विचारपूर्वक बनलेलीं मतें दडवून ठेवण्याची त्यांना संवय नाहीं व तशी जरुरीहि त्यांना कधीं भासलेली नाहीं. राष्ट्रहितबुद्धीनें प्रेरित होऊन विचार करावा व त्या विचाराचें फळ म्हणून जें मत ठरेल तें स्पष्टपणें मांडावें व त्या मताप्रमाणें आचार ठेवावा, हा सावरकरांच्या वागणुकीचा स्पृहणीय विशेष आहे. आपलीं खरीं मतें दडवून काँग्रेसमध्यें जाण्याचें त्यांनीं १९३७ सालीं ठरविलें असतें तर, त्यांच्या वैभवाला सीमा उरली नसती. पण, असें करणाऱ्या पं. नेहरू, श्री. सुभाषचंद्र बोस प्रभृतींची गांधीसाम्राज्यांत काय दुर्दशा झाली आहे—अगर होण्यासारखी आहे—याची स्पष्ट कल्पना असल्यामुळें व स्वतःचें स्वतंत्र सिंहासन निर्माण करण्याचा आत्मविश्वास अंगीं असल्यामुळें, सावरकरांनीं काँग्रेसच्या लोकप्रिय मार्गाचा मोह झिडकारून दिला! १९३७ सालीं जुलै महिन्यांत ते दादरला राहूं लागले. त्यानंतर ५–६ महिने तरी असे गेले कीं, त्या काळांत त्यांची जी उपेक्षा मुंबईत होत होती व ज्या दैन्यांत त्यांना दिवस काढावे लागत होते त्याचा चटका त्यांच्या मनालाहि प्रसंगीं जाणवला असेल! जनहितबुद्धि हाच एक स्थिर विचार चित्तांत ठेवून वागावयाचें, तसें वागतांना लोकप्रियता मिळाली तर ती स्वीकारावयाची, ती मिळाली नाहीं तरी मनांत कुढावयाचें नाहीं, याच धोरणानें सावरकर वागत आलेले आहेत. सहजप्राप्य लोकप्रियतेचा उघड्या डोळ्यांनीं त्याग करावयाचा व प्रचलित राजकारणी भोळेपणा नष्ट करण्यासाठीं झटतांना कष्ट सोसावे लागले तर ते कर्तव्यबुद्धीनें सोसावयाचे, हें सावरकरांच्या व्यक्तिमत्वाचें एक महत्त्वाचें अंग आहे. देशभक्तीच्या कार्यांत ज्या अनेक आवडीच्या गोष्टींचा त्याग करावा लागतो त्या गोष्टींमध्यें लोकप्रियतेचाहि अंतर्भाव होतो हें ते उत्तम प्रकारें जाणतात! हें जाणूनहि ते आपलीं मतें निर्भयपणानें बोलतात आणि तरीहि त्यांची लोकप्रियता टिकून राहते, हा त्यांच्या तपश्चर्येचा परिणाम आहे.

## मुत्सद्यांवर छाप कां पडते ?

इतिहासाचें सूक्ष्म अध्ययन, तर्कशुद्ध विचारसरणी व निर्भयपणा या गुणसमुच्चयामुळें सावरकरांची इतरांवर छाप पडते. चालू युद्धाच्या प्रारंभीं लॉर्ड

लिन्लिथगो यांनीं ज्या ५२ हिंदी पुढाऱ्यांना भेटीसाठीं बोलावलें होतें त्यांत सावरकर स्वाभाविकपणेंच होते. जपानच्या बाजूनें येणाऱ्या संकटाची उपेक्षा करणाऱ्या लष्करी अधिकाऱ्यांचीं सगळीं धोरणें कशीं चुकत गेलीं आहेत व त्या चुकीच्या धोरणांमुळें हिंदुस्थानला चालू युद्धांत केवढा मोठा धोका आहे याचें सावरकरांनीं केलेलें विवरण लिन्लिथगोसाहेबांना विचारार्ह वाटलें व १२–१३ वर्षें अंदमानांत काढलेल्या या क्रांतिकारकाची विचारसरणी इतकी तर्कशुद्ध व वास्तववादी असल्याचें पाहून त्यांना अचंबा वाटला, असें वृत्त त्या वेळीं दिल्लींत पसरलें होतें. सर स्टॅफोर्ड क्रिप्स यांच्याशींहि बोलण्यासाठीं सावरकर गेले होते. दक्षिण आफ्रिका, उत्तर अमेरिका, ऑस्ट्रेलिया इत्यादि ठिकाणच्या राज्यघटनेंतून उचललेला Union हा शब्द हिंदुस्थानला लावून, क्रिप्ससाहेबांनीं प्रांतांना हिंदी संयुक्त राज्यघटनेंतून फुटून बाहेर पडण्याचा अधिकार अर्पण करण्याचा घाट घातला व या पाताळयंत्री पाकिस्तान–योजनेच्या समर्थनार्थ स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा बडेजाव माजविला. त्या प्रसंगीं सावरकर यांनीं ऐतिहासिक आधार व सडेतोड कोटिक्रम यांच्या द्वारा क्रिप्ससाहेबांना असें झणझणीत उत्तर दिलें कीं, त्याची प्रशंसा करण्याचा मोह संयुक्त प्रांतांतल्या कांहीं काँग्रेसछाप वृत्तपत्रांनाहि अनावर झाला. अपक्ष परिषदेच्या कांहीं बैठकींना सावरकर उपस्थित होते. त्या वेळीं सर तेजबहादुर सप्रूंसारख्या ज्येष्ठ मुत्सद्यांच्या मनावरहि त्यांनीं विलक्षण छाप पाडली ! क्रांतिकारक म्हटला कीं तो उगीच कांहीं तरी बढाई मारणारा, आपल्या अज्ञानाचीच प्रौढी मिरविणारा व वास्तवापासून दूर राहण्यांतच पुरुषार्थ मानणारा असावयाचा अशी समजूत करून बसलेल्या या ज्येष्ठ मुत्सद्यांचा सावरकरांच्या व्यवहारी व वास्तववादी विचारसरणीशीं परिचय झाला तेव्हां, आपण कांहीं एक नवा अनुभव घेत आहों असें त्यांना वाटलें.

अशा एकाद्या प्रसंगीं भारतांतले ज्येष्ठ मुत्सद्दी व सावरकर यांची भेट झाली म्हणजे त्यांना सावरकरांबद्दल काय वाटतें हें पुढील उताऱ्यावरून वाचकांना समजूं शकेल. १९४१ च्या डिसेंबर महिन्याच्या शेवटीं मद्रास येथें तेविसाव्या प्रागतिक परिषदेचें अधिवेशन झालें. त्यांत ने. ना. शास्त्री यांनीं जें भाषण केलें त्याच्या इतिवृत्तांतून पुढील वाक्यें उद्धृत केलेलीं आहेत :

The speaker said he was not well acquainted with Mr. Savarkar and he had met him only once at one of those infructuous, pacificatory teas, organised by Sir Chimanlal Setalvad. On that occasion, he had expected to see a gentleman perverse, obstinate and loud, but found a thin-looking, quiet Maharastra chap, speaking slowly and deliberately, seldom, raising his voice and always apparantly in full posssesion of his mind and knowing exactly what he wanted.......He at once conceived a great admiration for the man and his own estimate of the person had been confirmed by Mr. Savarkar's behaviour during this trying episode. ( Bhagalpur )

( ने० ना० शास्त्री म्हणाले : माझा सावरकरांशीं तसा फारसा परिचय नाहीं. सर चिमणलाल सेटलवाड यांनीं एकदां चहाला कांहीं मंडळींना पाचारिलें होतें. प्रायः निष्फळ ठरणाऱ्या या चहा-पानाच्या शांतिसूक्ती प्रसंगीं माझी व सावरकरांची एकदांच भेट झालेली आहे. हेकट, आडमुठा, आरडाओरड करणारा, एकादा इसम आपल्या नजरेस पडेल, अशी माझी अटकळ होती. पण, मला जे गृहस्थ प्रत्यक्ष भेटले ते अंगानें सडपातळ असून, वृत्तीनें शांत होते. हा बेटा महाराष्ट्रीय अगदीं हलके पण विचारपूर्वक बोलत होता. त्याचा आवाज क्वचितच चढत होता. त्याच्या मानसिक शक्ति त्याच्या पुरत्या ताब्यांत होत्या आणि आपलें उद्दिष्ट काय तें त्याला पक्केपणीं अवगत होतें··मला या इसमाबद्दल एकदम कौतुक वाटूं लागलें. या [भागलपूरच्या] कसोटीच्या प्रसंगीं सावरकरांच्या वर्तनामुळें माझें हें मत ठाम झालें आहे. )

## आपला न्यूनगंड व इंग्रजी वक्तृत्व

सावरकरांचें वक्तृत्व हा त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा एक महत्त्वाचा भाग आहे. इंग्रजी, हिंदी व मराठी या तिन्ही भाषांत सावरकर वक्तृत्व करतात हें खरें आहे. नागपूरच्या हिंदुमहासभेच्या अधिवेशनांत 'हिंदी' 'हिंदी' 'इंग्रजी' 'मराठी' 'मराठी' अशा विविध अर्थांच्या सूचक आरोळ्या उठूं लागल्या तेव्हां त्यांनीं आलटून पालटून या तीनहि भाषांत वक्तृत्व गाजविलें व श्रोत्यांना दिपवून सोडलें! प्रस्तुत लेखकानें सावरकरांचें इंग्रजी 'व्याख्यान' अद्याप ऐकलेलें नाहीं; पण, अपक्ष परिषदेचें अधिवेशन, फर्ग्युसन कॉलेजच्या विद्यार्थी वृंदातर्फे झालेला सन्मान अशा कांहीं प्रसंगीं त्यांनीं दिलेलीं इंग्रजी व्याख्यानें उत्कृष्ट वठलीं होतीं, असें त्यानें ऐकलें आहे. सावरकर इंग्रजी चांगलें बोलत असतील यांत प्रस्तुत लेखकाला संशयहि वाटत नाहीं. सुशिक्षित महाराष्ट्रीय समाजाला इंग्रजी वक्तृत्वाच्या बाबतींत ज्या एका न्यूनगंडानें उगीचच घेरलें आहे तो नाहींसा झाला तर, इंग्रजी वक्तृत्वाच्याही बाबतींत महाराष्ट्र मागें पडणार नाहीं. सर्वसामान्य महाराष्ट्रीय सुशिक्षिताच्या इंग्रजी वक्तृत्वाबद्दल इतका विश्वास बाळगणारा प्रस्तुत लेखक सावरकरांच्या त्या क्षेत्रांतल्या कर्तृत्वाबद्दल साशंक असेल, ही गोष्टच संभवत नाहीं. कै० बिपिनचंद्रपाल यांच्या इंग्रजी वक्तृत्वाला त्यांच्या भरदार आवाजानें उठाव मिळत असे, सरोजिनी नायडूंच्या इंग्रजी वक्तृत्वाला काव्यात्मकता व शब्दश्रीमंती यांच्यामुळें तेज चढतें, बॅ. बाबासाहेब जयकर यांचें वक्तृत्व रेखीवपणामुळें खुलून दिसतें व बॅ. जम्नादास मेथा यांचें वक्तृत्व बहुश्रुतपणा, प्रत्युत्पन्नमतित्व व घटिंगणपणा या गुणांमुळें श्रोत्यांच्या मनाची पकड घेतें. या प्रसिद्ध वक्त्यांचे वक्तृत्वविषयक विशेष सावरकरांच्या इंग्रजी वक्तृत्वांत आढळत नसतील हें खरें; पण, त्यांच्या मराठी वक्तृत्वांत जे विशेष आहेत तेच त्यांच्या इंग्रजी वक्तृत्वाला शोभा देण्याला पुरेसे आहेत. सावरकर हिंदी वक्तृत्व करूं

लागले म्हणजे मात्र कित्येक वेळां असें वाटतें कीं, हिंदी जाणणारे लोक केवळ 'सावरकरांचें वक्तृत्व' म्हणूनच हें वक्तृत्व सहन करीत असावेत!

१९१५ सालापासूनच्या काळांत प्रस्तुत लेखकानें पुष्कळ नामांकित वक्त्यांच्या वक्तृत्वाचा आस्वाद घेतला आहे. कै. लोकमान्य टिळक, कै. प्रो. अण्णासाहेब परांजपे कै. अच्युतराव कोल्हटकर, श्री. तात्यासाहेब केळकर, डॉ. जयकर, लो. ना. अणे, प्राध्यापक फडके, नगरचे पटवर्धनबंधु अशा अनेक महाराष्ट्रीय वक्त्यांचीं व्याख्यानें त्यानें जशीं ऐकलीं आहेत त्याप्रमाणेंच डॉ. ॲनी बेझंट, देवी सरोजिनी नायडू, बिपिनचंद्र पाल, कै. चित्तरंजनदास, कै. लाला लजपतराय, पं. मदनमोहन मालवीय, श्रीनिवास शास्त्री, बॅ. जमनादास मेहता, श्री. राजगोपाळाचारियर इत्यादि परप्रांतीय पुढाऱ्यांच्या वक्तृत्वाची लज्जतहि त्यानें अनुभविली आहे. इतर पुढाऱ्यांच्या ठिकाणीं असलेल्या वक्तृत्वगुणाबद्दल योग्य तो आदर बाळगूनहि प्रस्तुत लेखकाला असें म्हणावेंसें वाटतें कीं, सावरकरांचें वक्तृत्व खरोखरच अप्रतिम आहे. सावरकरांचें वक्तृत्व सावरकरांच्या वक्तृत्वासारखें आहे असेंच म्हणावें लागेल; त्याला दुसरी उपमा सांगतां यावयाची नाहीं!

## सावरकरांचा आवाज नि ध्वनिक्षेपक यंत्र

दूरध्वनिक्षेपक यंत्र निघालें नव्हतें—अगर आजच्या इतकें वापरांत आलें नव्हतें—त्या काळीं वक्त्याचा पहाडी आवाज हें त्याचें एक मोठें भांडवल असे. कै. बिपिनचंद्र पाल हे या भांडवलाचा भरपूर उपयोग करीत असत; त्या काळांत सावरकरांवर २०–२५ हजारांच्या श्रोतृवृंदासमोर व्याख्यान देण्याचा प्रसंग आला असता तर त्यांचें व्याख्यान सर्वांना ऐकूं गेलें असतें कीं नाहीं, याबद्दल शंका वाटते. सावरकर इंग्लंडला गेले तेव्हां त्यांचें वय २३–२४ वर्षांचें होतें व त्या ऐन उमेदीच्या काळांत त्यांनीं आठदहा हजारांच्या सभा मंत्रमुग्ध केल्या होत्या. पण, त्या काळांतहि त्यांना 'पहाडी' आवाजाची देणगी होती, असें दिसत नाहीं. दूरध्वनिक्षेपक यंत्र व सावरकरांचें वक्तृत्व यांचा संयोग मात्र इतका बेमालूम बनून गेला आहे कीं, हें यंत्र सावरकरांच्या वक्तृत्वाच्या लहरी उठविण्यासाठींच अवतीर्ण झालें असावें असें भासतें; आणि, सावरकरांच्या आवाजाचे चढउतार, त्यांच्या वक्तृत्वाची गति, त्यांच्या वाणीची गोडी हे सर्व गुण या यंत्राच्या वैशिष्ट्याशीं मिलाफ होण्यासाठींच सिद्ध झालेले आहेत कीं काय असा भास होतो. या यंत्राच्या साहाय्यानें बोलतांना चांगल्याचांगल्या वक्त्यांचा आवाज निष्कारणच ताणला जातो व आवाज उगीचच चढल्यामुळें वक्तृत्वाचा प्रसंगीं बेरंग होतो. सावरकरांच्या आवाजाची या बाबतींतली अप्रतिम ठेवण यंत्राला व स्वतःला सांभाळून घेऊन श्रोत्यांना अनिरुद्ध संतोष देत राहते. यंत्र व सावरकर ही जोडी समोरासमोर ठाकली कीं अगदीं अल्प वेळांत यंत्र सावरकरमय होतें व सावरकर यंत्रमय होऊन जातात!

## गुरु परांजपे नि शिष्य सावरकर

विद्वत्ता, कल्पकता, श्रोत्यांच्या मनोवृत्ति चेतविण्याचें सामर्थ्य इत्यादि वक्तृत्व-गुणांच्या बाबतींत सावरकर व त्यांच्या राजकारणी स्फूर्तीचे एक गुरु कै. अण्णासाहेब परांजपे यांच्यामध्यें साम्य असल्यामुळें, या दोन थोर पुरुषांच्या वक्तृत्वगुणांची तुलना करण्याचा मोह अनेकांना होतो. पण, सकृद्दर्शनीं या दोघांच्या वक्तृत्वगुणांत पुष्कळसें साम्य आढळलें तरी, त्यांच्या वक्तृत्वाची एकंदर प्रकृति बरीचशी भिन्न आहे. कै. प्रो. परांजपे यांच्या राजबिंड्या शरीराची देणगी सावरकरांना मिळालेली नाहीं. परांजप्यांची ती उंचपुरी मूर्ती, त्यांचें तें भरदार शरीर, त्यांचा तो ऐटबाज अंगरखा, मूळचाच विशाल असलेला ललाटप्रांत विशाल दिसावा अशा बेतानें डोक्यावर बसविलेली त्यांची ती मोतिया रंगाची पगडी, ऐश्वर्यसंपन्नतेची साक्ष पटविणारी त्यांच्या कानांतली ती घवघवीत भिकबाळी; त्यांच्या अंगावर रुळणारें तें रुईफुलीकांठी उपरणें, त्यांच्या पायांतला तो लालभडक जोडा, आंतल्या तेजस्वितेचें जणूं प्रतिबिंबच पडल्यामुळें तुकतुकीत व तुळतुळीत दिसणारा त्यांचा तो मस्तकप्रांत इत्यादींशीं तुलना करण्यासारखें सावरकरांच्या जवळ कांहींच नाहीं ! या सर्व बाबतींत सावरकर इतके साधे व सामान्य आहेत कीं, एकाद्या अनोळखी लोकांच्या सभेंत सावरकर सभेपूर्वी गुपचुप जाऊन बसले तर, सहस्रावधि श्रोत्यांना मंत्रमुग्ध करणारा विख्यात वक्ता तो हाच, हें कोणाला कळणार व पटणारसुद्धां नाहीं !

जनमनावर छाप बसवूं पाहणाऱ्या गृहस्थाला अवश्य असणारी ही अनुकूलता लाभली असूनहि, कै. अण्णासाहेब परांजपे यांचें भाषण कांहीं प्रसंगीं तितकेंसें वठत नसे; याच्या उलट, ही अनुकूलता नसूनहि, सावरकरांचें भाषण क्वचित्च खुलत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, एका विवक्षित प्रकारच्या वक्तृत्वशैलीचा आश्रय करण्याची कै. अण्णासाहेब परांजपे यांनीं पद्धत पाडल्यामुळें, त्यांच्या वक्तृत्वाची रंगत ही पुष्कळशा प्रमाणांत परिस्थितीवर अवलंबून राही. विषय अनुकूल असला, समोरचा श्रोतृवृंद भरपूर व रसिक आहे अशी खात्री असली, विषय खुलवीत नेण्याला हवा तेवढा वेळ असल्याचा विश्वास वाटत असला आणि चित्तवृत्ति प्रसन्न असली कीं, अण्णासाहेबांच्या वक्तृत्वाला जें तेज चढे तें खरोखर अलौकिक असे ! अशा प्रसंगीं ते श्रोत्यांना तासन्तास भोंवतालच्या परिस्थितीचें पार विस्मरण पाडीत व कधीं पेशवाईंतल्या नाहीं तर शिवशाहींतल्या वैभवाशीं त्यांना तन्मय करून सोडीत तर कधीं कल्पनेच्या विमानांत बसवून ते श्रोत्यांना इंद्रलोकचंद्रलोकांचेंहि दर्शन घडवीत ! व्याजोक्ति, वक्रोक्ति, उपहास या सहजस्फूर्त अलंकारांनीं विनटलेली त्यांची वाग्गंगा दुथडी वाहूं लागली कीं, तिच्याकडे पहात, समाधानाच्या समाधीचें सुख उपभोगीत, श्रोते तासन्तास चित्रासारखे बसून रहात ! पतंगाच्या ऊर्ध्व गतीला वारा अनुकूल असला तर तो सरसरत विद्युल्लतेला जाऊन भिडतो; पण वारा जर अनुकूल नसला तर, सामान्य वृक्षाच्या उंचीपर्यंत चढतांचढतांच त्या पतंगाला

कष्ट होतात ! तशी अण्णासाहेबांच्या वक्तृत्वाची अवस्था होती. रंग भरला तर त्यांच्या वक्तृत्वाचा आस्वाद रत्नजडित सुवर्णपात्रांतल्या अमृताच्या आस्वादासारखा भासे; रंग भरला नाहीं तर मात्र, घांस तोंडांत फिरूं लागल्याचा भास झाल्याशिवाय रहात नसे !

स्फूर्तीवरच सर्व भर देणाऱ्या वक्तृत्वगुणावर किंवा लेखनगुणावर क्वचित् असा प्रसंग आला, तर त्यांत आश्चर्य नाहीं. कारण, स्फूर्ति ही कांहीं खिशांतल्या हातरुमालासारखी हुकमी हातीं लागणारी चीज नव्हे. सावरकरांच्या वक्तृत्वांतहि स्फूर्तीचा अंश असतो. त्यांच्या वक्तृत्वाचें परांजपे यांच्या वक्तृत्वाशीं ज्या महत्त्वाच्या बाबतींत साम्य आहे त्यांतली स्फूर्ति ही बाब फार महत्त्वाची आहे. 'स्फूर्तीची मग करुनी नौका व्योमसागरावरि जाऊं' या केशवसुतांच्या उक्तींतला अनुभव गुरु परांजपे यांच्या वक्तृत्वप्रसंगीं श्रोत्यांना येत असे त्याप्रमाणेंच शिष्य सावरकर यांच्या वक्तृत्वप्रसंगींहि श्रोत्यांना तो अनुभव येतोच! पण, फरक असा कीं, स्फूर्तीच्या नौकेंतून व्योमसागरावर आक्रमण केल्यावर पुढें काय करावयाचें याचें परांजपे यांना स्फूर्तीच्या तंद्रींत कित्येक वेळां विस्मरण होत असे; सावरकरांना तसें विस्मरण होत नाहीं. 'उडुरत्नें या गरिब धरेवरि उधळुनियां देऊं' असें म्हणतम्हणत आपण वर चाललों आहों; सामान्य ज्ञान, सामान्य कल्पनाशक्ति इत्यादींच्या बळावर आपलें अनुसरण करूं पाहणाऱ्या आपल्या श्रोत्यांची कुवत ओळखूनच आपण वर चढलों तर 'गरिब धरेवरील' आपल्या श्रोतृवृंदाचा व आपला संबंध टिकून राहील, हें अवधान सुटलें तर हा संबंधहि तुटेल—याचें स्मरण सावरकरांच्या मनांत सदैव जागृत असतें; व्योमसागराचें मंथन करण्याच्या नादांत परांजपे या स्मरणालाहि प्रसंगीं पारखे होत असत ! शेले व वर्ड्स्वर्थ या दोघांहि आंग्ल कवींनीं Skylark (चंडोल) या पक्ष्यावर सुंदर कवनें रचलीं आहेत. शेलेचा चंडोल आपल्या सहज-स्फूर्त गानमाधुर्यानें धरित्रीवरील जीवमात्राला प्रमुदित करतो; पण, स्वतःच्या स्फूर्तीच्या दीप्तींत झांकोळून गेलेल्या कवीप्रमाणें तो जीवमात्राच्या दृष्टीनें अदृश्य व अप्राप्य ठरतो; वर्ड्स्वर्थचा चंडोलहि गायनाचा आनंद लुटीत अस्मान गांठतो; पण तें गांठण्याच्या भरीं भरल्यामुळें सततच्या परिचयाच्या पृथ्वीशीं असलेला त्याचा संबंध मात्र सुटत नाहीं. परांजपे यांचें वक्तृत्व शेलेच्या चंडोलाची आठवण करून देत असे; सावरकरांचें वक्तृत्व वर्ड्स्वर्थच्या चंडोलाचें स्मरण करून देतें !

## वक्तृत्वाचा विकास कसा झाला ?

स्फूर्तीचा ईश्वरदत्त गुण आपल्याला लाभला आहे याची जाणीव सावर-करांना बारातेरा वर्षांच्या वयांतच झाली; पण, या गुणावरच सारी मदार ठेवली तर आपल्या वक्तृत्वाचें तेज सतत टिकणार नाहीं हें ओळखून, त्यांनीं हा स्फूर्तीचा हिरा अभ्यासाच्या कोंदणांत बसविण्याचा झटून यत्न केला. वक्तृत्वकला या विषयावरील

कांहीं मराठी पुस्तकें त्यांनीं नाशिक येथील विद्यार्जनाच्या काळांतच वाचलीं. विविध विषयांवरील ग्रंथ मननपूर्वक वाचण्याची आणि गद्य व पद्य ग्रंथांतल्या संस्मरणीय उताऱ्यांचें पाठांतर करण्याची संवय त्यांनीं त्या काळींच स्वतःला लावून ठेविली. वक्तृत्व व निबंधलेखन यांचा संबंध काय हें मनाशीं ठरवून, त्यांनीं व्याख्यान देण्यापूर्वी व्याख्यानाच्या विषयावर निबंध लिहून काढण्याचा परिपाठ पाडला. विषयप्रवेश परिणामकारक व्हावा म्हणून काय करावें लागतें, विषयविवेचनाच्या सर्वमान्य पद्धती कोणत्या, विरोधी मुद्यांचें खंडन ठसकेबाजपणानें कसें करतां येतें, स्वतःच्या मुद्यांचें उठावदार रीतीनें मंडन करण्याचे मार्ग कोणते, व्याख्यानाचा समारोप चटकदार रीतीनें करतांना कोणकोणत्या सरणींचा अवलंब करतात इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें त्यांनीं मोठ्या आस्थेवाईकपणानें निश्चित केलीं. कोणत्याहि विषयावरील वक्तृत्व भरदार व चटकदार व्हावयाचें तर त्या विषयाच्या अभ्यासाला पुष्कळशा अवांतर ज्ञानाचीहि जोड मिळावी लागते हें ओळखून, त्यांनीं आपल्या वाचनांत विविधता निर्माण केली व हें विविध प्रकारचें वाचन प्रसंगीं हुकमी उपयोगी पडावें यासाठीं त्यांनीं वाचलेल्या ग्रंथांचीं टांचणें करून ठेवण्याची शिस्त स्वतःला लावून घेतली. पुढें कॉलेजमध्यें शिकत असतांना त्यांनीं डेमॉस्थेनिस, सिसेरो इत्यादींच्या वक्तृत्वाचे नमुने अभ्यासिले व मेकॉलेच्या इतिहासांतील छेदक, महाभारतांतले ओजस्वी संवाद वगैरे मुखोद्गत करून टाकिले. मूळची ईश्वरदत्त स्फूर्ति, कित्येक वर्षें केलेले अविश्रांत श्रम व वक्तृत्वाचा अखंडित सराव यांचें फळ म्हणून सावरकरांचें आजचें अमोघ वक्तृत्व विकसित झालें आहे. विषयाशीं तद्रूप झाल्याविना—विषय लोकांना पटवून दिल्याशिवाय चैन पडत नाहीं असें वाटल्याविना—विषयाच्या प्रतिपादनांत भावनोत्कटता उतरत नाहीं हेंहि सावरकरांना चांगलें विदित आहे.

सावरकरांचें वर्णन करतांना बॅ. असफअल्लींनीं Fragile as an anaemic girl, restless as a mountain torrent and keen as the edge of a Toledo blade (रक्तक्षय झालेल्या मुलीसारखे कृश, गिरिप्रपातासारखे धडपडणारे आणि टोलेडोच्या तलवारीच्या लप्‌लप् करणाऱ्या पात्यासारखे तल्लख) असे शब्द[1] वापरले आहेत. दूरध्वनिक्षेपक यंत्रासमोर उभे राहून व्याख्यानाच्या रंगांत आलेल्या आजच्या सावरकरांनाहि हा शब्दप्रयोग लागू पडेल, इतका तो यथार्थ आहे. देशप्रेमाच्या तंद्रींत ज्यानें आयुष्यभर कष्ट सोसले तोच बृहस्पति आपल्यापुढें उभा आहे कीं दुसराच कोणी साधासीधा मराठा गडी आपल्यापुढें उभा राहिला आहे अशा शंकेत श्रोत्यांचें मन क्षणभर निमग्न व्हावें इतका साधा सामान्य पेहराव सावरकरांच्या अंगावर असतो. गांधीजींच्या प्रसाददीक्षेमुळें देशभक्तीला अलीकडे जी नाटकी साधेपणाची व कृत्रिम गबाळेपणाची झालर लागली आहे तीहि त्यांच्या वेषांत

---

१ Life of Barrister Savarkar by Chitra Gupta : P. 124

आढळावयाची नाहीं अगर जुन्या पिढींतल्या कित्येक देशभक्तांच्या पेहरावांत जें विलायती वैभव आढळे तेंहि त्यांच्या ठिकाणीं आढळावयाचें नाहीं. ते सभास्थानीं मुद्दामच उशिरां येतात असाहि आक्षेप घेणारे लोक प्रस्तुत लेखकानें पाहिले आहेत. कै. लोकमान्य टिळक यांच्यावरहि असाच आक्षेप घेतला जात असे. उशिरा येण्यांत नाटकीपणा असतो हा या आक्षेपकांच्या मनांतला आशय प्रस्तुत लेखकाला मुळींच मान्य नाहीं. सावरकरांची व्याख्यानाची वेळ ठरली तरी, त्या कार्यक्रमाच्या आगेमागें किती विविध कार्यक्रमांची दाटी झालेली असते व अशा कार्यक्रमांचे व्यवस्थापक सावरकरांसारख्यांना किती अनियमितपणें वापरतात याची यथार्थ कल्पना ज्याला झालेली आहे तो इसम उशिरा येण्यामुळें सावरकरांना नाटकी म्हणणार नाहीं.

सहचारिणीप्रमाणें नेहमीं बरोबर असणारी छत्री समोरच्या टेबलावर ठेवून संथ आवाजांत सावरकर व्याख्यानाला सुरुवात करतात तेव्हां पहिलीं पांचचार मिनिटें श्रोत्यांना इतकेंच वाटतें कीं, हा वक्ता जें सांगणार आहे तें कसलीहि गुंतागुंत न ठेवतां सांगितलें जाणार आहे व जें सांगावयाचें आहे तें या वक्त्याला मनापासून पटलेलें आहे. हातवारे नाहींत, आवाजाची धडपड नाहीं, शब्दांची उतरंड लावण्याचा आटापिटा नाहीं; कोटया, उपमा, अलंकार वगैरे साधण्याचा हव्यास नाहीं—यांतलें कांहींच नसून हा वक्ता आपल्यावर मोहनी तर पसरीत चालला आहे, हा चमत्कार कसा घडत आहे अशा विचारांत श्रोते निमग्न होत आहेत तोंच, विषयप्रतिपादनाच्या व वक्तृत्वाच्या सहज वेगामुळें, सावरकरांच्या भावना उद्दीपित होत जातात आणि या उद्दीपित भावनांना शोभेल अशी भाषाशैली त्यांना आपोआप स्फुरूं लागते. या भावनांच्या उद्दीपनामुळें, त्यांना आवेशहि चढतो व वाणीची गति, मुद्रेचा आविष्कार, अभिनय इत्यादि रूपानें हा आवेश नेटकेपणानें व्यक्त होतो.

## सावरकरांचें वक्तृत्व व नाटकीपणा

सावरकरांच्या वक्तृत्वांत नाटकीपणा आहे असें कांहीं लोक म्हणतात. पण, कै. गणपतराव जोशी या नटश्रेष्ठाचा नाटकीपणा जसा हृदयंगम असे त्याप्रमाणेंच, सावरकरांच्या वक्तृत्वांत नाटकीपणा असलाच तर तोहि हृदयंगम आहे. 'हॅम्लेट' नाटकाच्या आरंभीं भुतासमोर थरथर कांपणारे व गर्भगळित झाल्यासारखे अगदीं हलक्या आवाजांत बोलणारे गणपतराव, 'मठांत जाऊन जोगीण होऊन बैस' असें ऑफिलियाला सांगणारे गणपतराव, 'हें चित्र पहा व हें चित्र पहा' असें खोंचून सांगतांना स्वतःच्या जन्मदात्रीला गर्भगळित करूं पाहणारे गणपतराव व स्मशानांतल्या मुडदेफरासांशीं बोलतांना, वेश्याव्यवसायाचें गलिच्छ स्वरूप स्पष्ट करण्यासाठीं पहाडी आवाजांत बोलणारे गणपतराव हीं गणपतरावजींचीं एकाच भूमिकेंतलीं विविध रूपें आठवून एकादा इसम त्यांना नाटकी म्हणाला तर त्याला असें बजावावें लागेल कीं, नाटकीपणामुळें असले चमत्कार होत नसतात; तन्मयता हीच अशा चमत्कारांची जननी असते! सावरकरांच्या वक्तृत्वामुळें जो चम-



सावरकरांच्या हाताचा ठसा

त्कार घडल्याचा प्रत्यय सहस्रावधि लोकांना येतो तो चमत्कारही नाटकीपणामुळें होत नसून, वक्त्याच्या तन्मयपणामुळें होत असतो. १९०८ च्या राष्ट्रीय आंदोलनांत 'राष्ट्रीय' मुसलमान म्हणून नांवाजलेले सय्यद हैदर रेझा या नांवाचे एक मुसलमान गृहस्थ १९०९ सालीं लंडनला गेले असतांना, भारतभवनांत त्यांची व सावरकरांची वक्तृत्वाच्या बाबतींत झटापट झाली. या झटापटीच्या वेळीं हजर असलेल्या बॅ. असफअल्लींनीं अगदीं स्पष्ट शब्दांत असें कबूल केलें आहे कीं, तळमळीच्या वक्तृत्वापुढें पढिक वक्तृत्व फिकें कसें पडतें, हा अनुभव त्या वेळीं आला.

## विशेष रंगणारीं व्याख्यानें

व्याख्यानाच्या पूर्वीं किंवा व्याख्यानाच्या सुरुवातीस सावरकरांना कोणी डिंवचलें असलें म्हणजे सावरकरांचें व्याख्यान प्रारंभापासूनच वरच्या पट्टींत सुरू होतें व मग त्यांत कांहीं विशेषच रंग भरत जातो. अहमदाबादच्या हिंदुमहासभेच्या अधिवेशनानंतर तेथील महाराष्ट्रीय समाजातर्फे सावरकरांना मानपत्र अर्पण करण्यांत आलें. या कामीं पुढाकार घेणाऱ्या मंडळींपैकीं प्राध्यापक रामभाऊ आठवले यांनीं आपल्या प्रास्ताविक भाषणांत हेतुतःच कांहीं प्रश्नांना चालना दिली व असें सुचविलें कीं,अशा सर्व प्रश्नांचीं समर्पक व सडेतोड उत्तरें सावरकरांनीं द्यावीं,अशी श्रोत्यांची अपेक्षा आहे. त्या वेळचें सावरकरांचें व्याख्यान म्हणजे श्रोत्यांना मिळालेली पंचपक्वान्नी मेजवानीच होती ! कॉंग्रेस पुढाऱ्यांची गेल्या ऑगस्टमध्यें धरपकड सुरू झाली तत्पूर्वी ७।८ दिवस पुणें येथें हिंदुत्वनिष्ठ कार्यकर्त्यांचा मेळावा जमला होता. कॉंग्रेसचें आंदोलन सुरू झालें तर हिंदुमहासभेनें कोणतें धोरण आचरावें यासंबंधींची मोकळी चर्चा चालली असतांना सावरकर या मेळाव्यांत येऊन बसले. ते आल्यावरहि या विषयाची बरीच भवति न भवति झाली व त्यानंतर सावरकरांनीं थोडक्यांत समारोप केला. या ऊहापोहामुळें सावरकरांचे विचार चेतविले गेले होते. याचा परिणाम म्हणून त्या दिवशीं त्यांचें प्रकट व्याख्यान किती ओजस्वी झालें हें पुण्यांतल्या अनेक लोकांना अद्याप स्मरत आहे. या सभेला आलेल्या कांहीं कॉंग्रेसजनांनींहि त्या दिवशीं सावरकरांनीं केलेला बिनतोड कोटिक्रम ऐकून माना डोलविल्या !

गाण्याच्या मैफलींत रंगणारे रसिक असें सांगतात कीं, खऱ्या अर्थानें रंगलेली बैठक समाप्त होते त्या वेळीं गवई व रसिक श्रोते यांचा लय अशा रीतिनें लागतो कीं, बैठक संपल्यावरहि बराच वेळ शेवटच्या गाण्याचे स्वर वातावरणांत घुमत राहतात व त्या स्वरांचे पडसाद श्रोत्यांच्या अंतःकरणांतहि उमटत असल्यामुळें, श्रोत्यांना कांहीं वेळ तरी निःशब्द रहावें असें वाटतें. सावरकरांच्या उत्कृष्ट व्याख्यानांच्या शेवटींहि हीच स्थिति होते. अध्यक्ष अगर चिटणीस यांनीं आतां कांहीं बोलूं नये असें श्रोत्यांना वाटतें याचें कारण त्यांची त्या त्या व्यक्तींबद्दलची अनादरबुद्धि हें नसतें. 'नादब्रह्मीं सकल रंगलें विश्व डोलूं हें लागलें' अशा तंद्रींत आपण

स्वत:लाहि विसरलों असतांना कोणी आपल्याला धक्का देऊं नये, इतकीच श्रोत्यांची अपेक्षा असते व समारोपाचें भाषण किंवा आभारप्रदर्शनाचें भाषण यांच्यामुळें हा धक्का बसतो म्हणून ते अस्वस्थ बनतात. १९३९ सालीं मे महिन्यांत पुण्याच्या वसंत व्याख्यानमालेंत सावरकर यांनीं 'लाला हरदयाळ 'वर व्याख्यान दिलें. व्याख्यान संपून श्रोते रस्त्याला लागल्यावरहि कांहीं रसिक माणसें निःशब्द स्थितींत सभास्थानीं उभीं होतीं. नादब्रह्माचा साक्षात्कार झाल्यामुळें त्यांना जें समाधान झालें होतें त्या समाधानाची समाधि अद्याप उतरली नव्हती! प्रस्तुत लेखक अशा एका श्रोत्या-जवळ गेला व त्यानें त्याला मुद्दाम विचारलें : कसें काय झालें व्याख्यान ? हा श्रोता सावरकरांच्या राजकीय मतप्रणालीशीं समरस होणारा नव्हता! तथापि व्याख्याना-बद्दलचें समाधान म्हणून त्याच्या तोंडावर अवर्णनीय असें स्मित झळकून गेलें! '**स्मितानें सौख्य सुचवितां मुखाचे शब्द मग वांया**' अशी त्याची अवस्था झाली होती.

## गटेची वल्गना नि सावरकरांची वल्गना

दि. १-८-३९ रोजीं पुण्यास टिळक-स्मारक-मंदिरांत सावरकरांनीं 'गांधी-वाद, बाबूवाद व भाईवाद' या विषयावर व्याख्यान दिलें. या व्याख्यानाच्या शेवटीं सावरकर म्हणाले[1] :

*गटेच्या काळीं प्रशियाचे तुकडे तुकडे होऊन प्रशियाच्या राजवाड्यांत गादीवर नेपोलियन बसला होता. तेव्हां गटेनें कविता केली कीं, या सिंहासनावर माझा राजा परत बसलेला पाहीपर्यंत व हा परका राजा जाईपर्यंत मी असाच भीक मागत हिंडेन. गटेची ती वल्गना—*

*आज चारपांच पिढ्यांनंतर सत्य ठरली आहे!*

*आज हिटलरच्या नेतृत्वाखालीं सारें जर्मन राष्ट्र, सारे जर्मन लोक, एका निशाणाखालीं एकत्र झालेले आहेत.*

*वटवृक्षाचें बीज मोहरीहूनहि लहान असतें; पण, त्या बीजांत जी स्फूर्ति असते—जी वल्गना असते—ती वाढतां वाढतां तिचा प्रचंड वटवृक्ष बनून, त्या-खालीं गाईचीं खिल्लारें विसांवा घेतात, उन्हानें श्रांत झालेल्यांना तो वटवृक्ष सांवली देतो.*

*मलाहि एक वल्गना करूं द्या!*

*माझें गाणें मला गाऊं द्या!*

*या जगांत आपणाला जर हिंदुत्वाचें मानाचें राष्ट्र म्हणून जगावयाचें असेल तर, तसा आपला अधिकार आहे आणि तें राष्ट्र हिंदुध्वजाखालींच स्थापन झालें पाहिजे. या नाहीं तर पुढील पिढींत ही वल्गना खरी ठरेल.*

---

१ दैनिक त्रिकाळ : दि. ३-९-३९.

*माझी ही कल्पना खोटी ठरली तर वेडा ठरेन मी ! माझी ही कल्पना खरी ठरली तर प्रॉफेट ठरेन मी ! माझा हा वारसा मी तुम्हांला देत आहें !*

व्याख्यानाचा हा समारोप रंगत चालला त्या वेळीं सभाध्यक्ष श्री. तात्यासाहेब केळकर हे आनंदानें कसे डोलत होते व शेवटीं तर त्यांच्या डोळ्यांत एकदोन अश्रुबिंदु कसे चमकले हें प्रस्तुत लेखकानें अगदीं जवळून न्याहाळून पाहिले आहे. या समारोपाची मोहनी अशी टिकाऊ ठरली कीं, श्री. यशवंतराव जोशी यांच्या डोक्यांत समारोपाचे हे शब्द कित्येक दिवसपर्यंत भिरभिरत राहिले व याच शब्दांचा प्रारंभीं उपयोग करून एक सुंदर लघुकथा लिहिण्याचा मोह त्यांना आवरतां आला नाहीं !

## ' हेहि दिवस जातील ! '

श्री. तात्यासाहेब केळकर यांनीं एका व्याख्यानप्रसंगीं अकबरबादशहाच्या हातांतल्या अंगठीची गोष्ट सांगितली होती. या अंगठीवर' हेहि दिवस जातील 'अशा आशयाचे शब्द कोरलेले होते. बालपणांत हालअपेष्टा भोगीत असतांना अंगठीवर कोरलेल्या या शब्दांनीं अकबराची आशा टिकवून धरली व उत्तेजित केली. पुढें अकबर साम्राज्याचा स्वामी बनला तेव्हां या अंगठीनें त्याला असें सांगितलें कीं, जीवनाच्या आकाशांत भाग्याचे मेघ केव्हां भरून येतील व ते केव्हां विरून जातील याचा नेम नसल्यामुळे भाग्यशाली माणसांनीं विनम्रपणानें वागण्यांतच खरें शहाणपण आहे. अकबराच्या अंगठीवर कोरलेल्या या शब्दांचा खरा बोध सावरकर यांच्या वर्तनांत प्रत्यहीं प्रतिबिंबित झालेला आढळतो. अंदमानी कारावासांत अपमान, छळ वगैरेंशीं झुंजत असतांना, या शब्दांतल्या बोधामुळें त्यांनीं स्वतः आशा सोडली नाहीं; इतकेंच नव्हे तर, निराश झालेल्या अनेक भारतपुत्रांचीं अंतःकरणें त्यांनीं फिरून आशोत्फुल्ल केलीं. ' हेहि दिवस जातील ' या शब्दांतला बोध त्या अवस्थेंत सावरकरांना तसा उपयोगी पडला. सध्यां ते त्या मानानें सुखांतच नव्हे तर वैभवांतहि आहेत. अनेक कारणांमुळें दीन बनलेल्या हिंदुराष्ट्राजवळ सावरकरांचा गौरव करण्याच्या योग्यतेचा असा एकच मान आहे. हिंदुमहासभेचें अध्यक्षपद एकमुखानें अर्पण करणें हाच तो अनन्यसाधारण मान होय. कृतज्ञ हिंदुराष्ट्रानें त्यांना हा मान सतत सहा वर्षें दिला आहे. प्राप्त परिस्थितींत शक्य ती देशसेवा करण्याचें स्वातंत्र्य, आप्तस्वकीयांचा सहवास मोकळेपणानें उपभोगण्याचें सुख इत्यादिकांचा लाभ ते आज घेऊं शकत आहेत. पण, तो घेतांना ' हेहि दिवस जातील ' हे शब्द त्यांच्या नजरेसमोर सतत वावरत आहेत कीं काय, असा भास होतो. त्यांच्या वर्तनांतला हा गूढार्थ ज्यांना नीटपणीं समजूं शकत नाहीं अशीं कांहीं माणसें त्यांना प्रसंगीं तऱ्हेवाईक, प्रसंगीं कंजूष म्हणत असतील, असाहि संभव आहे. देशस्वातंत्र्यार्थ जन्मभर धडपड करण्याचें व्रत घेतलेल्या आपल्यासारख्या माणसानें साध्यांतला साधा पेहराव, साध्यांतलें साधें अन्न वगैरेंचा सतत सराव ठेवला पाहिजे, जिला 'विलासी' म्हणतां येईल अशा प्रकार-

च्या राहणीचा आपण अव्हेरच केला पाहिजे, ही जाणीव वैयक्तिक जीवनांत सावरकर सदैव बाळगतात, असें त्यांच्या राहणीचें बारकाईनें अवलोकन केलें तर आढळून येतें. या साधेपणाची जाहिरात करून व त्याचें अगडबंब तत्त्वज्ञान बनवून, ढोंगी साधेपणाला देशभक्तीच्या सिंहासनावर बसविण्याची चूक मात्र त्यांनीं केलेली नाहीं!

## सावरकरसदन व फुलबाग

सावरकर व त्यांचें कुटुंब या उभयतांनाहि फुलांची उत्कट आवड आहे. अंदमानांत असतांना प्रारंभीं बरेच दिवस सावरकर यांना परत स्वदेशांत येण्याची व स्वातंत्र्य मिळण्याची आशा वाटत नव्हती. त्यावेळीं त्यांच्या मनांत भविष्यकाळाबद्दलच्या ज्या कल्पना चमकून जात त्यांत एक कल्पना अशी होती कीं, अंदमानांत आपण मर्यादित स्वातंत्र्य उपभोगीत सहकुटुंब कालक्रमणा करीत राहूं. अंदमानांत मर्यादित स्वातंत्र्याचा उपभोग घेतांनाहि झोंपडीपुढें फुलांचीं झाडें व फुलांचे वेल लावण्याची सावरकरांची कल्पना दादरला स्वतःचें घर बांधल्यावर मूर्तस्वरूपांत अवतरली असली तर आश्चर्य काय? भोळया व भाविक वृत्तीच्या माई सकाळीं स्वतः या बागेंत फिरतात व देवपुजेसाठीं लागणारीं फुलें वेंचून नेतात; तर सायंकाळीं सावरकर स्वतः या बागेंत तन्मयतेनें फिरतांना दिसतात! माईच्या तन्मयतेंत भाविकपणा असतो तर सावरकरांच्या तन्मयतेंत रसिकता असते. शरीरस्वास्थ्य टिकावें म्हणून टिळक जसे कधीं फिरावयाला बाहेर गेले नाहींत त्याप्रमाणेंच सावरकरहि शरीरस्वास्थ्यासाठीं कधीं फिरावयाला जात नाहींत. तशाच महत्त्वाच्या सार्वजनिक कामाशिवाय घर सोडून बाहेर जावयाचें नाहीं हा त्यांचा रत्नागिरीपासूनचा रिवाज मुंबईतहि कायम राहिलेला आहे. त्यामुळें, संध्याकाळच्या वेळीं निर्वेधपणा व मोकळीक असली कीं, ते या बागेंत फिरतांना दिसतात! आणि त्यांचें हें फिरणें येरझारा घालण्याच्या पद्धतीचें नसतें! प्रत्येक बारीकसारीक वेलाशीं व झाडाशीं थांबून ते त्यावरील पानाफुलांचें निरीक्षण करतील, मागें पाहिलें तेव्हांपासूनच्या काळांत त्यांत कांहीं बदल झाला आहे कीं काय हें सूक्ष्मपणानें पाहतील, हें निरीक्षण चालू असतांनाच मनांत उद्‌भवणाऱ्या कल्पनांशीं खेळतील आणि मग पुढें सरकतील! सावरकर अशा तन्मयतेनें मनोविनोद करीत असतांना जो कोणी त्यांना पाहील त्याच्या मनांत एकच विचार येईल : क्रांतीच्या झंझावाताशीं खेळण्यांत ज्याच्या आयुष्याचा बहुतेक काळ गेला आहे अशा या थोर पुरुषाच्या या समाधानांत लवमात्रहि व्यत्यय आणणें हें शुद्ध पाप आहे, असें त्याला वाटेल. गेल्या यमद्वितीयेच्या दिवशीं सायंकाळीं सात साडेसातच्या दरम्यान प्रस्तुत लेखक सावरकरसदनांत गेला त्या वेळीं, सावरकर या समाधानाचा आस्वाद घेत होते. बागेच्या लोखंडी प्रवेशद्वाराशीं उभें राहून त्यानें जवळजवळ अर्धा तास या समाधानांत पोहणाऱ्या सावरकरांना पाहिलें. संध्यासमय सुरू झाला होता. भोंवतालच्या जगाबद्दलच्या विस्मृतीचें तम व स्वतःच्या स्फूर्तीची दीप्ति यांच्या मिश्रणांत तळपणाऱ्या

कवीच्या आकृतीप्रमाणें सावरकरांची आकृति त्या संध्यारागांत दीप्तिमान् दिसत होती! पुढें होऊन त्यांच्या त्या समाधीचा भंग करणें प्रस्तुत लेखकाच्या जिवावर आलें! या निरीक्षणांत जात असलेला वेळ फार महत्त्वाच्या कार्यानिमित्त खर्चिला जात आहे असें वाटून त्यानें आपल्या स्मरणशक्तीला बजावलें :

स्मरणशक्तिके जागृत होई
दर्शनदुर्लभ शोभा पाहीं
विसरूं नको गे यांतिल कांहीं
वारंवार! कोठुनी असें दिसणार?

* * *

## ऐहिक विजयाचा मार्ग हाच!

राजकारणाला भगवंताचें अधिष्ठान हवें असें म्हणणाऱ्या पुष्कळशा लोकांच्या मनांत 'भगवंताचें अधिष्ठान' या शब्दांच्या द्वारा एका विशिष्ट प्रकारच्या अर्थाचा बोध होत असतो. राजकारण ही शुद्ध ऐहिक चळवळ आहे, तिचें यशापयश प्रामुख्यानें भौतिक साधनांच्या उणेपुरेपणावर अवलंबून असतें असें समजणारे सावरकर भगवंताच्या अधिष्ठानाची महति फारच कमी मानतात, हें त्यांच्या लेखांतल्या पुढील उताऱ्यावरून[1] स्पष्ट होत आहे :

*ऐहिक यश ज्या चळवळीस हवें तिनें ऐहिक, भौतिक, प्रत्यक्ष सृष्टींत उपयोगी पडतील तेवढीं साधनें संपादून विपक्षावर सामर्थ्यांत मात केली कीं ती चळवळ बहुधा यशस्वी होते. मग तिला ज्याच्या त्याच्या धार्मिक पोथ्यांतील कल्पनांप्रमाणें न्यायाचा, पुण्याचा, स्नानसंध्याशील उपायांनीं मिळविल्या जाणाऱ्या भगवंताच्या आध्यात्मिक अधिष्ठानाचा पाठिंबा असो वा नसो !... ज्यांना आपल्या चळवळीस ऐहिक यश हवें त्यानें त्यानें आमच्या पक्षास न्याय आहे, आमच्या पक्षास देव आहे, सत्य आहे, यास्तव तो आमचा पक्ष विजयी होणारच अशा वल्गना करण्याचें आणि अशा आंधळ्या निष्ठेत निश्चिंत राहण्याचें सोडून, धार्मिक अर्थीं भगवंताच्या अधिष्ठानाच्या नादीं न लागतां,* **'सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें'** *इतकेंच काय तें खरें मानावें आणि वैज्ञानिक, सामर्थ्यशाली, प्रत्यक्षनिष्ठ अशा ऐहिक साधनांनीं विपक्षांहून वरचढ होण्याचा यत्न करावा. ऐहिक विजयाचा मार्ग हाच! अन्यायी, परोपद्रवी व्हावें असें नव्हे; तर न्याय झाला तरी तो समर्थ नसेल तर व्यर्थ होय; समर्थ अन्याय त्याच्यावर कुरघोडी केल्यावांचून राहणार नाहीं; दुर्बल पुण्याईहि पंगु होय, हें विसरूं नये.*

---

1 सावरकर साहित्य : भा. १ : पृ. १३-१४.

हे तर्ककर्कश विचार वारंवार मांडणाऱ्या सावरकरांनीं कानपूर येथील हिंदु-महासभेच्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून आपल्या भाषणाच्या शेवटीं शेवटीं कोणते विचार मांडले हें पाहण्यासारखें आहे. ते म्हणाले [१] :

As has happened so many times in Hindu History that it was precisely in the darkest hour that the Avatar destined to relieve us was born, it is not quite unlikely, nay, it is more likely than not that the spirit of Rensissance of the Hindu race may yet find an opportunity to assert itself and, as if by a miracle similar to those our Puranas sing, Hindudom emerges triumphant over all the forces of evil, which are attacking it today.

(हिंदूंच्या विमोचनासाठीं होणारा अवतार हिंदु इतिहासाच्या अगदीं अंधाऱ्या प्रहरीं नेमका होतो असें अनेकवार घडलें आहे. त्याप्रमाणेंच, या समयीं-ही हिंदु-जातीच्या पुनरुत्थानाच्या चेतनेला आपला प्रभाव गाजविण्याला अवसर सांपडेल; आणि मग, आपल्या पुराणांतून वर्णिलेल्या चमत्कारासारखा एकादा चमत्कार होऊन, आपल्यावर आघात करणाऱ्या सर्व दुष्ट शक्तींवर मात करून, हिंदु-जगत् विजयशाली ठरेल. ही घटना अगदींच असंभाव्य नाहीं–इतकेंच नव्हे तर ती संभाव्यतेच्या कक्षेंतच विशेषत: बसण्यासारखी आहे.)

## तर्कनिष्ठेला मुरड कां घातली ?

या दोन अवतरणांपैकीं पहिल्या अवतरणांतली विचारनिष्ठा ठसठशीत आहे; दुसऱ्या अवतरणांत जी अवतारनिष्ठा व चमत्कारनिष्ठा डोकावली आहे ती तशी व तितकी ठसठशीत नाहीं. ज्या गोष्टी बाह्य परिस्थितीमुळें स्पष्ट शब्दांत बोलतां येत नाहींत त्या सुचविण्यासाठीं सावरकरांनीं वरील अवतरणांतल्या दुसऱ्या अवतरणांत अवतार व चमत्कार या कल्पनांचा आश्रय केला असेल, ही शक्यता दृष्टिआड करून चालणार नाहीं. पण, अशा रीतीनें अगदीं आपलेपणानें या दोन अवतरणांचा एकत्र विचार केला म्हणजे, सावरकरांनींहि शेवटीं अवतारकल्पनेचा व चमत्कारकल्पनेचा आश्रय केला, हें मान्य करण्यावांचून गत्यंतरच उरत नाहीं ! तब्बल सहा वर्षें हिंदु-सभेचें अबाधित नेतृत्व केल्यावर सावरकरांनीं आपल्या पूर्वीच्या सडेतोड, तार्किक विचारसरणीला ही जी मुरड घातली ती कां, असा प्रश्न सावरकरांचे प्रतिपक्षीच विचारतील असें नव्हे, तर, उघडया डोळ्यांनीं सावरकरांच्या विचारांचा अभ्यास करणारे त्यांचे अनुयायीहि हा प्रश्न विचारण्याला प्रवृत्त होतील. प्रस्तुत लेखकाच्या मतें याचें स्पष्टीकरण असें आहे कीं, हिंदुमहासभा ही संस्था हळुहळू अधिकाधिक लोकाभिमुख करावयाची असेल तर, लोकांना चिरपरिचित व सुबोध अशा कल्पनांचा आश्रय करून तिच्या नेत्यांनीं बोललें पाहिजे, ही आवश्यकता सावरकरांनाहि मनोमन पटूं लागल्यामुळेंच, त्यांच्या तोंडून अवतार व चमत्कार हे शब्द निघाले असावेत.

---

१ The Mahratta : 1-1-43.

## हिंदुमहासभेच्या लोकाभिमुखतेचें प्रसादचिन्ह

आणि हा समज खरा असेल आणि हिंदुमहासभेला अधिकाधिक लोकाभिमुख बनविण्याची जरुरी पटल्यामुळें, स्वतः सावरकरांचे विचार त्या दिशेनें चालू लागले असतील तर, ती गोष्ट हिंदुसमाजाच्या भवितव्याच्या दृष्टीनें निःसंशय श्रेयस्कर अशीच आहे. कारण, सध्यांच्या काळांत कोणतीहि संस्था प्रभावशाली ठरावयाची असेल तर ती लोकाभिमुख असली पाहिजे, तत्त्वाभिमुख असली पाहिजे आणि नियमाभिमुखहि असली पाहिजे. तत्त्वाभिमुखतेच्या बाबतींत हिंदुमहासभा ही संस्था श्रेष्ठ आहे. तिला हा जो श्रेष्ठपणा लाभला आहे त्याचें फार मोठें श्रेय सावरकरांना दिलें पाहिजे. या संस्थेंत नियमाभिमुखता किंवा शिस्तपालन व लोकाभिमुखता हे गुण वाढावयाला हवे आहेत. या दोहोंपैकीं लोकाभिमुखता या गुणाची वाढ व्हावी या हेतूनें प्रेरित होऊन सावरकर यांनीं कानपूरच्या भाषणांत अवतार व चमत्कार या कल्पनांचा आश्रय केला असेल तर, हिंदुमहासभेच्या या दिशेनें होणाऱ्या प्रगतीचें तें प्रसादचिन्हच आहे, असें म्हणावें लागेल. सावरकरांची बुद्धि एकदां या दिशेकडे वळली तर हिंदु-महासभेला लोकाभिमुख बनविण्याचा चमत्कार ती अगदीं अल्पकाळांत करून दाखवील, असा विश्वास वाटतो.

## कांहीं आक्षेप : निरसन

सावरकर रत्नागिरीहून सुटून मुंबईस जाऊन कायमचे राहिले व हिंदुमहा-सभेचें नेतृत्व त्यांच्याकडे गेलें तेव्हांपासून, त्यांच्याविरुद्ध—म्हणजे त्यांच्या लौकिक वर्तनाविरुद्ध—अनेक आक्षेप घेतले गेले आहेत. ते लोकांना भेटत नाहींत, ते लोकांकडे चहापानाला जात नाहींत, सामान्य शिष्टाचार त्यांच्याकडून पाळले जात नाहींत, वगैरे आक्षेप चांगल्याचांगल्या गृहस्थांकडून घेतले गेले आहेत. या आक्षेपांत सत्याचा अंश कांहीं प्रमाणांत असल्यामुळें, सावरकरांच्याबद्दल ज्यांच्या मनांत शुद्ध आदर आहे अशीहि पुष्कळ मंडळी दुखविली गेली आहेत. पण, या आक्षेपांचा विचार करतांना टीकाखोरपणा न दाखवितां आपलेपणाच दाखविणें अवश्य आहे, असें प्रस्तुत लेखकाचें म्हणणें आहे. टीकाखोरपणानें आक्षेप घेणाऱ्या लोकांना जे अनुभव आले असतील तसले अनुभव थोड्याफार प्रमाणांत स्वतः घेतल्यानंतरहि, प्रस्तुत लेखकाचें असें म्हणणें आहे कीं, असल्या आक्षेपांचा उच्चार करण्यापूर्वीं बराच विचार होणें अवश्य आहे. ज्ञानकोशकार कै. डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर हे लोकांजवळून घेत-लेले पैसे बुडवीत असत असा आक्षेप भरल्यातोंडीं घेणारे कांहीं पंडितब्रुव समाजांत आहेत. त्यांच्या आक्षेपांना जी किंमत द्यावयाची तीच सावरकरांवर घेतल्या जाणाऱ्या कित्येक आक्षेपांना दिली पाहिजे. कै. डॉ. केतकर हे विक्षिप्त असतील; पण, ते अप्रामाणिक खास नव्हते! आपल्या कार्याच्या व विचारांच्या तंद्रींत त्यांना खाण्या-पिण्याचेंहि अवधान नीटसें रहात नसे. लौकिक व्यवहारांतला विसराळूपणा त्यांना

हातउसने पैसे देणाऱ्या कित्येक मित्रांना बाधला असेल हें मान्य करूनहि, डॉ. केतकर हे लबाडीनें पैसे बुडवीत ही टीका मान्य करण्याला प्रस्तुत लेखक तयार नाहीं ! सावरकरांच्या बाबतींत आपलेपणानें विचार करणारालाहि त्यांच्यावरील अनेक आक्षेप अशाच कारणांसाठीं ग्राह्य वाटणार नाहींत. जो गृहस्थ मृत्यूच्या प्रांतांत जाऊन तुमच्याआमच्या सुदैवानें परत आपल्यांत आला, आपल्याला फिरून आपल्या देशबांधवांत जाऊन मिसळणें शक्य नाहीं या दुःखद विचाराच्या जाणिवेचा दगड हृदयावर सतत ठेवला गेल्यामुळें, ज्या गृहस्थाच्या लौकिक भावनांचा फुलोरा ऐन वसंतऋतूंत मातींत मिसळून गेला आणि मृत्यूशीं घडीघडी झगडतांना ज्याच्या भावनाप्रधान मनाला अकालीं मरंगळ आली, त्या गृहस्थाच्या लौकिक वर्तनांत शिष्टाचाराच्या नियमांचा भंग झाल्यासारखा दिसला अगर सामान्य जनांकडून केल्या जाणाऱ्या अपेक्षा फसल्यासारख्या वाटल्या तर त्यांत अनैसर्गिक असें काय आहे ? बारा वर्षें मौनव्रत पाळून एकांतांत गायत्रीपुरश्चरण करणारा मनुष्य फिरून समाजांत वावरूं लागला तर कित्येक दिवसपर्यंत ता लौकिक व्यवहार उरक-तांना बिचकल्यासारखें करतो, भांबावून जातो, अडखळल्यासारखा होतो! २५-३० वर्षांच्या ऐन तारुण्याच्या वयापासून पुढील बारा वर्षें—म्हणजेच लौकिक व्यवहारांत रुळण्याचा ऐन उमेदीचा काळ—अंदमानच्या यमपुरींत घालवावा लागल्यामुळें, आणि त्यानंतरचीं तेरा वर्षें रत्नागिरीसारख्या बाजूच्या ठिकाणीं घालवावीं लागल्या-मुळें, सावरकरांच्या हातून शिष्टाचारांचें पालन यथायोग्य रीतीनें होत नसलें तर तो दोष सावरकरांचा नव्हे; ज्या पारतंत्र्यानें त्यांना इतकीं वर्षें अंधारांत व यातनांत पिचत ठेवलें, त्या या अभागी देशाच्या मागें लागलेल्या पारतंत्र्याचा तो दोष आहे!

### सनदशीर नि क्रांतिकारक संस्थांमधील भेद

सावरकरांनीं हिंदुमहासभेचें नेतृत्व पत्करलें त्यापूर्वीं त्यांनीं जें राजकारण केलें होतें, तें प्रायः गुप्त पद्धतीचें आणि क्रांतिकारक स्वरूपाचें होतें. त्या राजकारणाच्या कार्यपद्धतीचा प्रकार व हिंदुमहासभेसारख्या सनदशीर संस्थेमार्फत चालणाऱ्या राज-कारणाचा प्रकार यांमध्यें मूलभूत फरक आहे हीहि गोष्ट सावरकरांना उत्तर वयांत समजून घ्यावी लागत असल्यामुळें, हिंदुमहासभेच्या कार्यपद्धतीला अद्यापि यावें तसें घसघशीत स्वरूप येऊं शकलेलें नाहीं. सनदशीर राजकारणांत मोकळ्या मनानें केलेल्या चर्चेला व विचारविनिमयाला प्राधान्य असतें. क्रांतिकारकांची राजकारण-पद्धति ही कार्यप्रधान असते. हा फरक व्हावा तितका स्पष्ट न झाल्यामुळें, हिंदु-महासभेंत पुरेशी चर्चाहि होत नाहीं; आणि, ती क्रांतिकारक संस्था नसल्यामुळें, ती म्हणण्यासारखी कार्यप्रधानहि बनत नाहीं. सनदशीर संस्थेमार्फत राजकारण करूं पाहणाऱ्या नेत्यानें स्वतः कमी बोलून व सहकाऱ्यांना अधिक बोलावयाला लावून त्यांचा दृष्टिकोन समजून घेतला पाहिजे व त्यांच्या विचारांतील चुका समजून दिल्या-

घेतल्या पाहिजेत. दुसऱ्यांचें म्हणणें ऐकून घेण्यापेक्षां स्वतःचें म्हणणें जोरानें सांगण्याची व तें जोरानें सांगितलें गेल्यामुळें दुसऱ्याला पटलें असलें पाहिजे असें समजण्याची प्रवृत्ति सावरकरांच्या ठिकाणीं असल्यामुळें, हिंदुमहासभेंतील कित्येक प्रमुख नेत्यांचेंहि प्रमुख प्रश्नांबाबत त्यांच्याशीं अद्याप एकमत झालेलें नाहीं. हिंदुमहासभेच्या लष्करीकरणाच्या कार्यक्रमावर प्रस्तुत लेखकाची पूर्ण श्रद्धा आहे; पण, हिंदुमहासभेच्या वर्किंग कमिटीच्या पुष्कळशा सभासदांचीं मनें या प्रश्नाबाबत संशयग्रस्त आहेत हें भागलपूर येथे गोळा झालेल्या पुढाऱ्यांशीं झालेल्या चर्चेच्या वेळीं त्याच्या लक्षांत आलें. ज्या संस्थेच्या कार्यकारी सभेंतील प्रमुखांच्या मनात अत्यंत जिव्हाळ्याच्या प्रश्नावरहि वैचारिक एकरूपता नाहीं ती संस्था देशाचें मार्गदर्शन कसें करूं शकेल हा प्रश्न त्याच्या मनांत तेव्हापासून सारखा घोळूं लागला व अद्यापहि तो प्रश्न केव्हां तरी त्याच्या मनांत जोरानें उसळतो !

आज तरी अशी स्थिति आहे कीं, हिंदुमहासभा या संस्थेवर सावरकरांच्या प्रभावी व्यक्तिमत्वाचा ठसा पुरेपूर उमटलेला आहे. या संस्थेंतील प्रत्येक व्यक्तीला सावरकर बनतां येणार नाहीं, असें म्हणण्यांत कोणत्याहि व्यक्तीचा उपमर्द होतो असें प्रस्तुत लेखकाला वाटत नाहीं. ज्या थोर व्यक्तीच्या व्यक्तिमत्वावर आपलें व आपल्या संस्थेचें वैभव आधारलेलें आहे त्या व्यक्तीनें जन्मादारभ्य काय काय केलें, तें करण्यांत त्या व्यक्तीचे हेतू काय काय होते, दीर्घकालपर्यंत केलेल्या विचारांचें व भोगलेल्या यातनांचें फळ म्हणून आज ती व्यक्ति जें मार्गदर्शन करीत आहे त्यामधील हेतु कांय व आपापल्या मर्यादित क्षेत्रानुसार व कर्तृत्वानुसार ते हेतू सफल करण्यासाठीं आपण काय करूं शकूं या प्रश्नांचा कसोशीनें विचार करून सावरकरांचें नेतृत्व मान्य करणारे लोक कार्योन्मुख होतील तर, स्वतः सावरकरांनाहि धन्यता वाटेल व ज्या कार्यासाठीं ते वयाच्या साठाव्या वर्षींहि जिवापाड मेहेनत करीत आहेत तें कार्यहि यशालाभाला आल्याशिवाय राहाणार नाहीं. तोंडापुरतें सावरकरांचें म्हणणें मान्य करण्याऐवजीं त्यांच्या अनुयायांनीं अशा डोळसपणानें त्यांचें नेतृत्व पत्करलें आणि स्वतःला शक्य असेल तेवढें कार्य तळमळीनें पार पाडण्याचें ठरविलें तर, हा चरित्रग्रंथ लिहिण्यांतला एक मुख्य हेतु पूर्णांशानें सफल झाला, असें प्रस्तुत लेखक समजेल.

———

# ठळक व्यक्तींच्या नांवाची सूचि

( नांवापुढील अंक ग्रंथांतल्या पृष्ठांचे सूचक आहेत. )

---

# शिवराम लक्ष्मण करंदीकर

यांनीं लिहिलेलीं

## इतर पुस्तकें

१. **टिळक भारत** : पृष्ठसंख्या ३१५; किंमत ४ रु. आजच्या तरुण पिढीसाठीं लोकमान्यांच्या विशाल जीवनाचें रसरशीत चित्रण.

२. **पाकिस्तानचें संकट** : पृष्ठसंख्या २४०, किंमत २॥ रुपये. हिंदूंवर व हिंदुस्थानवर ओढवलेल्या या घोर संकटाचें यथार्थ स्वरूपदर्शन. संभाव्य धोके व उपाययोजना यांचें दिग्दर्शन.

३. **जात्यावरच्या ओंव्या** : पृष्ठसंख्या १०४; किंमत १॥ रु. वृत्त-पत्री लेखनाच्या अनुषंगानें लिहिलेल्या लघुकथा, व्यंग्यकथा व लघुनिबंध.

४. **सावरकरांचे सहकारी** : पृष्ठसंख्या ७२, किंमत १॥ रु. पं. शामजी कृष्णवर्मा, हुतात्मा मदनलाल धिंग्रा व ऋषीजी अय्यर यांचीं संपूर्ण रसभरित चरित्रें.

५. **सावरकर व सावरकर-वाद** : पृष्ठसंख्या ३२ किंमत ॥ सावरकरांच्या विचारसूत्रांचें धांवतें विवेचन.

१० रुपये किंमतीचीं हीं सर्व पुस्तकें एकदम घेऊं इच्छिणारांनीं ७ रुपये म.ऑ.नें खालील पत्त्यावर धाडावे.

**१ ऑगस्ट १९४७ पर्यंत म्हणजे** चालू वर्षीतल्या टिळक पुण्यतिथीपर्यंत **वरील सवलत चालू राहील.**

**पत्रव्यवहाराचा पत्ता** : आदर्श मुद्र-णालय, ३९५।५ सदाशिव पेठ, पुणें २.